# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.



## पुरवणी खंड

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर एम्. ए. पीएच्. डी.

यांनीं

मंडळांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला

## विभाग तेविसावा

पुरवणीखंड विभाग पहिला

## हिंदुस्थानखंड



ज्ञानं राष्ट्रधनं महत्तममिदं ब्राह्मण्यसंरक्षकम् ।
लोके क्षत्रियवैश्यकार्यघटनालौकर्थसंस्थापकम् ॥
कर्तृत्वागमबोधको ननु भवेज्ज्ञानार्थयत्नोऽधुना ।
ज्ञात्वा नागपुरे सुपण्डितजनैः संघः शुभो निर्मितः ॥

१९२७

मुद्रक व प्रकाशक—श्री. व्यं. केतकर, ज्ञानकोश छापखाना,
८२१ सदाशिव पेठ, पुणें.

# संपादकमंडळ

मुख्य संपादक

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, एम्. ए. पीएच्. डी.

संपादकीय कार्यव्यवस्थापक

रा. रा. यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए. एल्एल. बी.

उपसंपादक

रा. रा. चिंतामण गणेश कर्वे, बी. ए.

रा. रा. लक्ष्मण केशव भावे, बी. ए. एल्एल्. बी.

हौलवेचे वेदशास्त्रसंपन्न चिंतामणभट्ट शंकर दातार.

मिस्. एच्. कोहन, बी. ए. (लंडन).

रा. रा. पांडुरंग (आबा) मार्तंड चांदोरकर.

रा. रा. वामन त्र्यंबक आपटे, बी. ए. एल्एल्. बी.

# प्रस्तावना

स्वदेशविषयक ऐतिहासिक वाङ्मयाचा मुख्य उपयोग आजच्या एकंदर व्यवहाराशीं नागरिकाचा परिचय करून देऊन त्यास चालू कार्यपरंपरेंत भाग घेण्यास सोपें करावें किंवा जे भाग घेत असतील त्यांशीं सहकारिता करण्यास समर्थ करावें हा असतो. भारतीय जनतेचा बाहेरच्या जगाशीं संबंध, अत्यंत व्यापकपणें, ज्ञानकोशाचा पहिला विभाग 'हिंदुस्थान आणि जग' यांत वर्णिला आहे तर खुद्द भारतीय स्थिति व विकास यांचें सविस्तर अवलोकन या विभागांत केलें आहे. भारतीय संस्कृतीचें आद्यवाङ्मय जें श्रुतिस्मृति व इतिहासपुराणें त्याविषयीं प्रस्तुत ग्रंथांत विवेचन आहेच. आणि हिंदुस्थानचा इतिहास अत्यंत प्राचीन काळापासून आजतागाईत या ग्रंथांत दिला आहे. तसेंच लोकसमाज, हिंदुस्थानची राज्यव्यवस्था व त्याचे शासनसत्तात्मक विभाग व परदेशीय राजकारण हीं सर्व या ग्रंथांत दिलींच आहेत. सांपत्तिक स्थिति व हिंदुस्थान सरकारचा सांपत्तिक व्यवहार यांचें समालोचन या ग्रंथांत जितकें दिलें आहे तसें इतर कोणत्याहि मराठी ग्रंथांत नसल्यामुळें वाचक वर्गास त्याचें महत्त्व वाटणार आहे. बौद्धिक प्रगति व आरोग्य यांच्याविषयीं तेंच सांगतां येईल.

या मजकुरांत नवें असें कांहींच नाहीं. तथापि या ग्रंथाचें वैशिष्ट्य अत्यंत विविध माहितीच्या एकीकरणांतच आहे. भारतीय समाजशास्त्रविषयक जें प्रकरण यांत आहे त्या प्रकरणांत विचारनावीन्य, त्याप्रमाणेंच निर्णयनावीन्य आणि पद्धतिनावीन्य हीं दिसून येतील. भारतीय समाजाचा ओघ पाहतां त्यांत सामाजिक प्रगतीचे कांहीं विशिष्ट नियम दिसून येतात. व समाज आपली प्रगति आपल्याच पद्धतीनें करीत आहे आणि समाजिक सुधारणेची व सामाजिक प्रगतीची कल्पना नवीन नाहीं इत्यादि गोष्टी वाचकांस सहज पटतीलच.

शेवटच्या प्रकरणांत गेल्या आठ वर्षांचा राजकीय प्रगतीचा आढावा घेतला आहे. लोकांस जसजसे अधिकाधिक अधिकार मिळतात तसतसे राजकारण प्रपंचांत जास्त लोक पडतात आणि त्यामुळें समाजास नेतृत्वहि अधिक विविध मिळतें. पक्षांचा उपयोग हा असतो कीं, निरनिराळ्या विचारपद्धतींस व निरनिराळ्या हितसंबंधास संघीभूत होण्याची संधि मिळते व त्या संघामार्फत आपल्या विचारपद्धतीचा राजशासनावर परिणाम घडविण्यास किंवा आपल्या हितसंबंधांचें संरक्षण करण्यास सवड मिळते. हें संघीकरण समाजांत चालू असतां निवडणुकीच्या प्रसंगीं ज्या दोस्त्या कराव्या लागतात त्यां मुळें सर्व समाजांतील बहुविध व्यक्तींस जागृति मिळते. व आपल्या हितसंबंधांसाठीं हातपाय हलविण्याची शक्ति उत्पन्न होते. हा सामाजिक परिणाम नवीन राजकारणानें उत्पन्न झाला आहे खचित; व हा परिणाम वाढत जाणार आहे.

प्रस्तुत ग्रंथ व 'हिंदुस्थान आणि जग' हा विभाग हीं दोन पुस्तकें वाचलीं असतां भारतीय नागरिकत्व व हिंदुसमाजाचें नागरिकत्व या दोन्ही दृष्टींनीं लोकांची तयारी होण्यास मदत होईल.

हिंदुस्थानचें एकीकरण व्हावें व एकराष्ट्र व्हावें यासंबंधानें लोकमत वाढत चाललें आहे. पण हें राष्ट्र कसें बनवावयाचें यासंबंधानें हिंदुस्थानचें मन अजून तयार झालें नाहीं. हिंदुसमाजांत अंतःसंघटना होऊन तो समाज बाह्यांच्या सात्मीकरणास अनुकूल आणि समर्थ व्हावा या तऱ्हेचें सामाजिक ध्येय हिंदूंस अंधुकपणानें दिसूं लागलेंसें दिसतें. त्याशिवाय शुद्धिसंघटनाच्या तत्त्वांस जोर मिळाला नसता.

शुद्धिसंघटना याचें उर्फ समाजांत समानता वाढविण्याच्या चळवळीचें खरें महत्त्व आणि तत्त्व समाजांतील अत्यंत सुशिक्षित वर्गास देखील पूर्णपणें समजल्यासारखें दिसत नाहीं. एकीकडे संघटनेची आवश्यकता बोलावयाची व दुसरीकडे आपापसांतील भेदभाव कायम ठेवण्याकडेच प्रवृत्ति दिसावयाची इत्यादि प्रकार चालू आहेतच. पण ते पाहून निराश होण्याचें कारण नाहीं. संक्रमणावस्थेच्या कालांत हे प्रकार व्हावयाचेच. नवीन तत्त्व समजलें म्हणजे जुनीं अंतःकरणें एकाएकीं पालटतात असें होत नाहीं. जुन्या भेदांचें रक्षण करण्यासाठीं जो अट्टहास उत्पन्न होतो तो नवीन प्रवृत्तीच्या जयाचा सूचक आहे. ही गोष्ट लक्षांत ठेवली असतां जुन्या भेदांचा आग्रहानें पुरस्कार करणारीं पण व्यवहारांत मात्र ते भेद न पाळणारीं माणसें दिसूं लागलीं म्हणजे जुने भेद लयास जाऊं लागले आहेत अशीच खात्री पटून मन आशावादी होऊं लागतें.

एकमेकांवरील विश्वास व जें आपलें आहे तें मिळविण्याविषयीं धडपड हीं वाढूं लागलीं आहेत हेंहि परिस्थिति अवलोकन करणारांस दिसून आल्यावांचून रहाणार नाहीं.

आपली अंतर्घटना अगोदर करून मग परागंदा झालेल्या आपल्या लोकांविषयीं काळजी करावी असें मत वारंवार मांडण्यांत येतें. पण विकासक्रम पाहतां तो उलट दिसतो. आपल्या विदेशीं असलेल्या बांधवांची स्थिति सुधारण्याविषयीं उत्कंठा लोकांत अगोदर उत्पन्न झाली व त्याविषयींच्या प्रश्नास अगोदर महत्त्व मिळालें; व नंतर अंतर्घटनेविषयीं जास्त खटपट होऊं लागली; असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. तसेंच एकंदर हिंदुसमाजांतील संख्या वाढवावी, व आहे ती रक्षण करावी या भावनेस जोर मिळाल्यावर हिंदुसमाजाची अंतःस्थ स्थिति अधिक सुधारावी या भावनेस जोर अधिक मिळाला. ही परिस्थिति लक्षांत घेतां हिंदुस्थानच्या बाहेरच्या हिंदु जगासंबंधीं ग्रंथ अगोदर बाहेर पडावा व हिंदुस्थानविषयक प्रस्तुत ग्रंथ नंतर बाहेर पडावा हा ज्ञानकोशमंडळाचा उत्पादनक्रम अयुक्तिक झाला असें वाटत नाहीं.

**भारतीय संस्कृतीचें आद्यवाङ्मय** हें प्रकरण(१ लें,पृ. ४ पासून)मुख्यतः **रा. यशवंत रामकृष्ण दाते** यांच्या हातचें आहे. **रा. चिंतामण गणेश कर्वे** यांनीं **भरतखंडवर्णन** (प्र. २ रें), **लोकसमाज** (प्र. ४ थें), **सांपत्तिक स्थिति** (प्र. ७ वें) व **सद्यःस्थिति व स्वयंशासन** (हें शेवटलें प्रकरण) हे विषय मुख्यतः तयार केले आहेत. **रा. आबा चांदोरकर** यांनीं **हिंदुस्थानचा इतिहास** (प्र. ३ रें) लिहिला आहे. **रा. लक्ष्मण केशव भावे** यांनीं **बौद्धिक प्रगति** (प्र. ८ वें) व **आरोग्य** (प्र. ९ वें) हीं प्रकरणें मुख्यतः तयार केलीं व **रा. वामन त्र्यंबक आपटे** यांनीं **हिंदुस्थानची राज्यव्यवस्था** (प्र. ९ वें) हा भाग लिहिला आहे.

**श्री. व्यं केतकर.**

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश–पुरवणीखंड

## विभाग पहिला–हिंदुस्थानखंड.

### ग्रंथसंक्षेप.

### प्रकरण पहिलें.

#### भारतीय संस्कृतीचें आद्यवाङ्मय.



---

### प्रकरण दुसरें.

#### भरतखंडवर्णन.



---

### प्रकरण तिसरें.

#### हिंदुस्थानचा इतिहास.

---

## प्रकरण चौथें.

### लोकसमाज.

---

## प्रकरण पांचवें.

### हिंदुस्थानची राज्यव्यवस्था.

---

## प्रकरण सहावें.

### हिंदुस्थानचे शासनसत्तात्मक विभाग अथवा प्रांतवर्णन.



---

## प्रकरण सातवें.

### सांपत्तिक स्थिति

### व्यापार, दळणवळण व आर्थिक परिस्थिति.

---

## प्रकरण आठवें.

### बौद्धिक प्रगति.

---

## प्रकरण नववें.

### आरोग्य.



---

## प्रकरण दहावें.

### भारतीय समाजशास्त्र.



---

## प्रकरण अकरावें.

### सद्यःस्थिति व स्वयंशासन.



---

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## पुरवणी—हिंदुस्थानखंड.

### प्रकरण १ लें.

### भारतीय संस्कृतीचें आद्यवाङ्मय.

**भारतीय जनता व संस्कृति**—आपणांला आज भारतीय जनतेमध्यें चार निरनिराळे सांस्कृतिक थर दिसतात. त्यांतील सर्वांत प्राचीन थर द्राविडांचा होय. पण सांस्कृतिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा थर आर्यन् लोकांचा होय. यांचा प्रसार सर्व हिंदुस्थानभर असून दक्षिणेमध्यें त्यांच्या संक्रस्तींत द्राविड मिश्रण झालें आहे. आज द्राविड संस्कृति ही आर्यन् संस्कृतीची उपसंस्कृति होय. आज "द्राविड" लोक आपणांस सांस्कृतिक पृथक्त्वाचे लोक म्हणून आढळत नसून त्यांचें स्वतंत्र अस्तित्व केवळ भाषाभिन्नत्वानें व्यक्त होतें. यानंतरचा महत्त्वाचा थर म्हटला म्हणजे मुसुलमानी जनतेचा होय. मुसुलमानांमध्यें परकीय रक्त बेताचेंच असावें. त्यांचें अस्तित्व सांस्कृतिक रूपानेंच देशांत आहे. यांचा प्रसार उत्तर हिंदुस्थानांत विशेषतः पंजाब, व बंगाल प्रांतांत आढळतो. यानंतर कालानुक्रमानें ख्रिस्ती अथवा यूरोपीयन लोक हिंदुस्थानांत आले. संख्येच्या दृष्टीनें जरी त्यांस विशेष महत्त्व नसलें तरी सांस्कृतिक दृष्ट्या या लोकांचें महत्त्व विशेष आहे. हिंदुस्थानाचा एकंदर बाह्य जगाशीं संबंध यांच्याचमुळें उत्पन्न झाला आहे. तथापि ख्रिस्त्यांपैकीं थोडे पूर्वीं आलेले जे सीरियन ख्रिस्ती त्यांचें आज मुळींच महत्त्व नाहीं म्हटलें तरी चालेल. याखेरीज आज आपणांस भारतीय जनतेमध्यें यहुदी या स्वतंत्र वंशाचे कांहीं लोक आढळतात. यांच्यामध्येंहि तीन निरनिराळे वर्ग आहेत. एक कोचीनमधील ब्याच प्राचीन काळीं आलेल्या यहुद्यांचा; यांच्यांतहि काळे व गोरे अथवा पूर्वकालीन व उत्तरकालीन असे भेद आहेत. दुसरा कोंकणी अथवा बेने इस्रायल यांचा; व तिसरा अर्वाचीन काळीं आलेल्या बगदादी नवागतांचा. यांचेंहि, एकंदर भरतखंडाचा विचार करूं गेलें असतां सांस्कृतिक अगर संख्येच्या दृष्टीनें फारसें महत्त्व नाहीं. त्याप्रमाणेंच आपणांस मुंबईच्या आसपास थोडीशी पारशी या मूलतः भिन्न संस्कृतीच्या लोकांची संख्या आढळते. हे लोक हिंदुस्थानांत जरी स्थायिक होऊन राहिले आहेत, तरी त्यांनीं येथील संस्कृतीवर म्हणण्यासारखा कांहींच परिणाम घडवून आणिला नाहीं व आज जें त्यांस थोडेंसें महत्त्व आहे तें त्यांच्या व्यापारी साहसामुळें आणि ब्याच अंशीं भारतीय बनून त्यांनीं जी भारतीय सेवा केली तीमुळें होय.

वरील निरनिराळ्या संस्कृतींचा हिंदुस्थानांतील संस्कृतीवर निरनिराळ्या बाबतींत परिणाम झालेला आहे. आर्यन संस्कृतीचें कार्य आपणांस वाङ्मय, कला, धर्म, शासनशास्त्र, कायदा, वैद्यक, ज्योतिष इ॰ शास्त्रें यांच्या परिणतींत झालेलें दिसून येतें. व त्याचा इतिहास साकल्यानें इतरत्र दिलेलाच आहे. मुसुलमानी संस्कृतीचें कार्य आपणांस विशेषतः वाङ्मय, कला, शासनशास्त्र, कायदा, व धर्म या बाबतींत दिसून येतें. यूरोपीय अगर पाश्चात्त्य संस्कृतीचें कार्यहि अनेकांगीं असून ती आज जगाची मुख्य संस्कृति झाली आहे.

आतां आपण थोडक्यांत प्रत्येक संस्कृतीच्या कार्याचा व फलाचा हिशोब घेऊं, व तो घेतांना अर्थात् स्वाभाविकपणें हिंदु संस्कृतीकडे प्रथम लक्ष देऊं. व या संस्कृतीच्या विकासाचा आढावा घेतांना वाङ्मयाकडे अगोदर लक्ष देऊं. भारतीय ग्रंथांत आद्यस्थान वैदिक वाङ्मयास आहे. वेदांचें सविस्तर विवेचन करण्यासाठीं प्रस्तावनाखंडांत एक हजारावर पृष्ठें खर्चीं पडलीं आहेत, तर येथें केवळ परिचायक अल्प विवेचन करून पुढील वाङ्मयौघाकडे वळतां येईल. याचें धार्मिक वाङ्मय "श्रुतिस्मृति-पुराणें" हे होय. श्रुतींच्या अभ्यासामुळें भारतीय शास्त्रीय वाङ्मयाच्या ब्याच शाखांस प्रारंभ झाला. पूर्वमीमांसेखेरीज इतर दर्शनें उपनिषदाच्या आभ्यासानें निर्माण झालीं. इतिहास पुराणांचें संरक्षण यज्ञसंस्थेमुळें झालें आणि या सर्व प्रयत्नामुळें जो शास्त्रीय पद्धतीचा विकास झाला त्यानें वैद्यक, शिल्प, धर्मशास्त्र आणि अर्थशास्त्र यांस शास्त्रीयत्व आणून दिलें.

**वेदग्रंथ**—वेद या शब्दाचे दोन अर्थ आहेत; एक अर्थ धन, आणि दुसरा अर्थ ज्ञान. या दोन्हीं अर्थांनीं "वेद" हा शब्द वेदग्रंथांत वापरला आहे. वैदिक वाङ्मय तयार झाल्यानंतर कांहीं काळानें वेद हे "अपौरुषेय" म्हणजे ईश्वरी करणीचे व "अनादि" म्हणजे जगाच्या आरंभींच असलेले, म्हणून मत प्रसृत झालें. पण खुद्द वेदग्रंथांत तशी भावना दिसत नाहीं. जुन्या लोकांची कल्पना वेद हे यज्ञासाठीं अवतरले अशी आहे. ती कल्पना मात्र

बऱ्याच अंशीं सत्य आहे. म्हणजे यज्ञ व्यवस्थितपणें कसे करावेत हें सांगण्यासाठींच वेदग्रंथ तयार झाले. तयार झाले म्हणजे नवीनच सर्व मजकूर लिहिला गेला असें नव्हे, तर जुनींच अनेक सूक्तें गोळा केलीं गेलीं, व तीं केव्हां व कोणत्या क्रियेसह म्हणावीं हे ठरविलें गेलें. तीं सूक्तें केव्हां म्हणून काय क्रिया करावी हें सांगणारीं जीं पुस्तकें त्यांना "ब्राह्मणें" म्हणतात. आणि सूक्तें ज्या संग्रहांत एकत्र करून ठेवलीं त्या संग्रहास "मंत्र" अथवा "संहिता" म्हणतात. मंत्र आणि ब्राह्मणें मिळून वेद होतो. "उपनिषदें" म्हणजे प्रत्यक्ष वेदांचा भाग नव्हत. पण तीं वेदांस जोडलेलीं आहेत असें समजतात. यांच्यामध्यें आध्यात्मिक विचार पुष्कळ आहे. आणि ईश्वरविषयक विचाराच्या दृष्टीनें यांचें महत्त्व मोठें आहे. मंत्र व ब्राह्मणें मिळून जो समुच्चय होतो त्यास "कर्मकांड" म्हणतात. यज्ञयाग करण्यापेक्षां ज्ञानप्राप्ति करून घेणें हें अधिक महत्त्वाचें आहे असें जेव्हां लोकांस वाटूं लागलें तेव्हां यज्ञ बंद पडूं लागले व मंत्र व ब्राह्मणें यांचा अभ्यास कमी होऊं लागला व वेदांताचा म्हणजे ज्ञानकांडाचा अभ्यास वाढूं लागला.

**वेद, यज्ञ व ब्राह्मणें**—वैदिक वाङ्मयाचे आज चार वेद झाले आहेत. ते म्हटले म्हणजे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद हे होत. यज्ञ करण्यास चार प्रकारचे ऋत्विज लागत, त्यांस "होता, अध्वर्यु, उद्गाता व ब्रह्मा" असें म्हणत. होत्याचें अभ्यासाचें पुस्तक म्हणजे ऋग्वेद, अध्वर्यूचें यजुर्वेद, उद्गात्याचें सामवेद आणि ब्रह्मयाचें पुस्तक अथर्ववेद होय. होत्यांनीं म्हणावयाचे मंत्र ऋग्वेदसंहितेंत आहेत आणि ते मंत्र केव्हां म्हणून यज्ञांतली काय क्रिया करावी हें ऋग्वेदाचें ब्राह्मण सांगतें. येणेंप्रमाणें इतर वेदांच्या संहिता व ब्राह्मणें यांच्याहि उपयोगाची गोष्ट आहे.

ऋग्वेद-संहिता ही सर्वांत जुन्या मंत्रांची संहिता आहे. ऋग्वेदांतील बरींचशीं सूक्तें व बरींचशीं इतर सूक्तें मिळून अथर्ववेद झाला आहे. सामवेदामध्यें बहुतेक सूक्तें ऋग्वेदांतलींच आहेत. सामें म्हणजे गाण्यांच्या चाली. ऋग्वेदांतीलच सूक्तें पण तीं जर भिन्न भिन्न चालींवर म्हटलीं तर तीं भिन्न भिन्न सामें होत. यज्ञामध्यें कोणतीं सामें कोणत्या चालीवर आणि कोणत्या प्रसंगीं म्हणावीं या ज्ञानासच "सामवेद" अथवा "औद्गात्र" म्हणतात. हें निराळें वाङ्मय नाहीं, पण अध्वर्यूचा यजुर्वेद हें मात्र निराळें वाङ्मय आहे.

यज्ञांत जे लोक होत्याचें काम करावयास शिकत त्यांचे वंशज ते ऋग्वेदी ब्राह्मण, व अध्वर्यूचें काम करावयास शिकत ते यजुर्वेदी ब्राह्मण. या दोहोंस प्राचीन काळीं गृह्य कर्में भिन्न नसावींत. पण पुढें कालांतरानें त्यांचीं हीं कर्मेंहि भिन्न झालीं.

यज्ञ करावयास साहाय्यक ग्रंथ मुख्यत: म्हटले म्हणजे मंत्र व ब्राह्मणें होत. पण पुढें यज्ञ करण्याच्या पद्धतींत अनेक गोष्टी शिरून व वेदांप्रमाणें होत असलेल्या यज्ञपद्धतींत फेरफार होऊन यज्ञ करण्यास साहाय्यक म्हणून स्वतंत्र पुस्तकें तयार झालीं, त्यांस "श्रौतसूत्रें" म्हणतात. आतांपर्यंत "यज्ञ" हा अनेक कर्मांस सोपा शब्द म्हणून वापरण्यांत आला, पण वेदांत यज्ञस्वरूपी अनेक कर्में सांगितलीं आहेत. त्यांचें वर्गीकरण "सप्तहवि:संस्था" व "सप्तसोमसंस्था" म्हणून केलेलें आहे. एक दिवसापासून बारा दिवसांपर्यंत जे यज्ञ चालत त्यांस ऋतु असें म्हणण्यांत येई. बारा दिवसांहून जास्त दिवस (सहा महिने अगर अनेक वर्षें) जे याग चालत त्यांस "सत्रें" म्हणत. या सत्रांचेंहि विवेचन वेदांत आहे. सत्रांमध्यें यजमान व ऋत्विज असा फरक नसे, तर सर्वच यजमान आणि सर्वच ऋत्विज अशी त्यांत कार्यपद्धति आहे. सत्रांचें विवेचन करतांनां श्रौतसूत्रांत गोत्रप्रवरविवेचन आलें आहे. या वेदांत सांगितलेल्या सर्व क्रियांस कर्म किंवा श्रौतकर्म म्हणण्यांत येई. श्रौतकर्म म्हणजे तीन अग्नींवर होणारें कर्म होय. या श्रौतकर्मांचेंच "सप्तहवि:संस्था" आणि "सप्तसोमसंस्था" असें वर्गीकरण आहे. सप्तहवि:संस्थांमध्यें अग्न्याधान, अग्निहोत्रहोम, दर्शपूर्णमास, चातुर्मास्यें, आग्रयणेष्टि, निरूढपशुयाग व सौत्रामणि हे प्रकार येतात. सप्तसोमसंस्थांमध्यें अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, अतिरात्र, अप्तोर्याम व वाजपेय हे प्रकार येतात. सत्रांचे जे प्रकार वेदांत सांगितले आहेत त्यांमध्यें संवत्सरसत्र, गवामयन, स्वर्गसत्र, अश्वमेध हे प्रकार येतात. यांशिवाय इतर कर्में सांगितलीं आहेत त्यांपैकीं, बृहस्पतिसव, ब्राह्मणसव, वैश्यसव, पृथ्वीसव, सोमसव, ओदनसव हीं मुख्य होत. राज्याभिषेकहि त्यांपैकींच आहे. सव याचा अर्थ अभिषेक असा आहे. वर सांगितलेल्या क्रिया म्हणजे श्रौतधर्म होय. श्रौतधर्म जेव्हां संक्षिप्त होऊं लागला तेव्हां आरण्यकीय धर्म व स्मार्तधर्म हीं पुढें आलीं. यज्ञोपवीतधारण, ब्रह्मयज्ञ, स्नानविधि, त्रिसुपर्ण इत्यादि स्मार्त धर्माच्या गोष्टी आरण्यकांत मांडल्या आहेत.

हीं कर्में चालू असतां यज्ञ करणाऱ्या ऋत्विजांमध्यें अनेक वादाचे प्रश्न उपस्थित होत, व निरनिराळे पक्ष होत. त्या पक्षांचा परिणाम असा झाला कीं, प्रत्येक पक्षानें आपापल्या संहितेची थोडीबहुत फरक करून निरनिराळी आवृत्ति काढली. यामुळेंच यजुर्वेदी मंडळींत "शुक्ल" व "कृष्ण" असे प्रथम भेद झाले, आणि त्यानंतर त्यांत आणखी कलह वाढून पुढें १०१ भेद झाले. त्यांसच १०१ आध्वर्यवें म्हणतात. या भेदांपैकीं कांहीं टिकले व इतर सर्व लयास गेले. प्रत्येक निरनिराळ्या भेदाच्या मंडळींनीं आपली निरनिराळी संहिता करावी असें झालें. त्या सर्व 'वेदशाखा' म्हणून आज ज्ञात आहेत. या विशिष्ट शाखांत पुन्हां भेद उत्पन्न झाला नाहीं, असें नाहीं. पुढें जे भेद झाले त्यांचा परिणाम निरनिराळ्या शाखा वाढून झाला नाहीं, तर भिन्न पक्षांच्या लोकांनीं आपापल्याकरितां निरनिराळीं "सूत्रें" तयार केलीं. सूत्रभेदांस शाखांचे पोटभेद म्हटलें पाहिजे.

वेद हे केव्हां झाले याविषयीं आज एवढेंच सांगतां येईल कीं वेदांच्या संहिता करण्यासाठीं तीन निरनिराळ्या काळीं प्रयत्न झाले. व कुरुयुद्धानंतरहि वैदिक वाङ्मयांत भर पडत होती ही गोष्ट पारिक्षित जनमेजयाचा उल्लेख वेदांत येतो त्यावरून स्पष्ट होत आहे. शेवटचें संहितीकरण कुरुयुद्धानंतर शें--दोनशें वर्षांनीं झालें असावें.

वैदिक वाङ्मयाचा प्रारंभकाल कोणता असा प्रश्न विचारला असतां एवढेंच सांगतां येईल कीं, "दाशराज्ञयुद्ध" म्हणून एक युद्ध प्राचीन काळीं झालें, व त्यानंतर ऋग्वेदांतील बहुतेक सूक्तें झालीं आहेत, कां कीं त्या युद्धाचा अगर त्या युद्धाशीं संबंध असलेल्या व्यक्तींचा किंवा त्या व्यक्तींशीं संबंध असलेल्या व्यक्तींचा उल्लेख ज्या सूक्तांत नाहीं अशीं सूक्तें ऋग्वेदांत थोडींच आहेत. हें युद्ध केव्हां झालें हें निश्चयात्मक सांगवत नाहीं. तथापि एवढें सांगतां येईल कीं, युद्धांतील स्वारी करणारा एक पक्ष दिवोदास व त्याचा मुलगा किंवा नातू सुदास हा होय. व दुसरा पक्ष यदु, तुर्वश, अनु वगैरे या देशांतील राजे होते. सुदास ज्या लोकांचा नेता होता ते लोक "भरत" हें होत. व त्यांनीं पृथु व पर्शु (पार्थियन व पर्शीयन)लोकांच्या साहाय्यानें हिंदुस्थान जिंकलें. पौराणिक राजपरंपरा खरी मानल्यास असें म्हणतां येईल कीं, दाशरथी रामचंद्रानंतर शें-दोनशें वर्षांनीं हें युद्ध झालें असावें.

ऋग्वेदामध्यें आर्य आणि दास असे दोन वर्ण वर्णिले आहेत व हे एकमेकांचे शत्रू म्हणून सांगितले आहेत. आर्य म्हणजे स्वारी करणारे लोक आणि दास म्हणजे देशांतील लोक, असा समज कांहीं लोकांनीं प्रसृत केला पण तो चुकीचा आहे. आर्य-दास-विरोध उपासनापद्धतींतील विरोध होता. हा केवळ आपल्या ग्रंथांतच नाहीं तर पारशांच्या ग्रंथांतहि आहे; आर्य गोरे होते व दास काळे होते व त्यांच्या एकत्र येण्यामुळें 'वर्ण म्हणजे रंगमूलक वर्ग उत्पन्न झाले' ही समजूतहि चुकीची आहे; समाजांत गुणकर्मप्रमाणें वर्ग ऋग्वेदकालींहि होते पण त्या वर्गास वर्ण ही संज्ञा नव्हती, वर्ण याचा अत्यंत प्राचीन अर्थ संप्रदाय असावा. वेदांमध्यें आर्यन् लोकांचा काळ्यांवर जय वर्णिला नसून स्वारी करणाऱ्या भरतांचा इतर आर्यन् लोकांवर जय वर्णिला आहे.

ऋग्वेदामध्यें अनेक देवतांची स्तुति आहे; वरुण, अग्नि इंद्र, द्यौ, सोम, मित्र, विष्णु, आदित्य, सूर्य, सविता, पूषन्, मरुत्, रुद्र, अदिति, दिति, वायु, अश्विन्, उषा, पृथ्वी इत्यादि देवतांची स्तुति आहे. याशिवाय पुरूरवा व उर्वशी यांचा संवाद, यम-यमीसंवाद इत्यादि आख्यानसूक्तेंहि पुष्कळ आहेत, कांहीं संस्कारसूक्तें आहेत व कांहीं लौकिक सूक्तें आहेत. अथर्ववेदामध्यें बरींच विविध प्रकारचीं सूक्तें आहेत, राजास युद्धांत जयप्राप्त्यर्थ, रोगनिवारणार्थ, स्त्रियांस सवतींच्या नाशासाठीं, वगैरे अनेक प्रकारचे मंत्र आहेत.

वैदिक ग्रंथ स्वरांसहित छापला जातो. व ते स्वर प्रातिशाख्यप्रमाणें नियमित होतात. प्रातिशाख्यें हीं मंत्र म्हणण्याची अत्यंत प्राचीन पद्धति दाखवीत नाहींत. आजची म्हणण्याची पद्धत प्रातिशाख्यांस अनुसरून नाहीं. अत्यंत प्राचीन काळीं मंत्र सस्वर म्हणत नसावेत. हें स्वर नंतर शाखानुसार निरनिराळ्या शिकविण्याच्या पद्धतींत शिरले असावेत. हौत्रकांनीं म्हणावयाचे हौत्र मंत्र यज्ञांत म्हणतांना निःस्वरच म्हणावे लागतात.

**सूतवाङ्मय आणि सूतसंस्कृति**—भारतीय वाङ्मयपैकीं वेदग्रंथांचें सविस्तरपणें प्रस्तावनाखंडांत विवेचन केलें आहेच व त्याचाच वर थोडक्यांत अनुवाद केला आहे. तसेंच रामायण, महाभारत व पौराणिक वाङ्मय यांच्या पाठीशीं असलेली जी "सूतसंस्कृति" तिचेंहि सविस्तर वर्णन "बुद्धपूर्वजग" या विभागाच्या उत्तर भागांत केलें आहे. त्यांत मुख्यत्वेंकरून खालील गोष्टी सांगितल्या आहेत.

(१) सूतसंस्कृति ही आर्यन् संस्कृति होती.

(२) हिचा विस्तार पूर्वेस बिहारपर्यंत, दक्षिणेस दंडकारण्यापर्यंत होता, व बहुतकरून सिंहलद्वीपांतहि हीच नांदत होती.

(३) या संस्कृतींत शिव, विष्णु हीं दैवतें होतीं.

(४) या संस्कृतींत विद्याधर, गंधर्व, अप्सरा, यक्ष, राक्षस, किन्नर, पिशाच्च इत्यादि देवयोनींवर विश्वास होता.

(५) हींत अग्निधर्म संपुष्टांत आलेला पण थोडा-बहुत शिल्लक होता.

(६) या संस्कृतीचें वाङ्मय वीरकथा, दृष्टांतादाखल उपदेशपर कथा, वगैरे होतें.

(७) या संस्कृतींत मुनि व यति हे दोन परमार्थास वाहिलेले वर्ग असावेत, पण ऋषी असतील कीं नाहीं ही शंका आहे.

(८) सूतसंस्कृतीचा ऐतिहासिक काल म्हणजे दाशराज्ञ युद्धपूर्व हजारों वर्षांचा काल होय. या कालांतच दाशरथी रामाचा काल येतो.

मांत्र संस्कृतीच्या लोकांचा व सूतसंस्कृतीच्या लोकांचा संबंध आल्यावर दोहोंची मिळून एक संस्कृति गंगेच्या काठीं निर्माण झाली. हें एकीकरण यज्ञविकासकालीं म्हणजे यजुर्वेदकालीं झालें. त्या दोन संस्कृतींच्या मिलाफामुळें एकमेकांवर झालेले परिणाम येणेंप्रमाणें:—

(१) सूतसंस्कृतीशीं संबंध जोडण्यासाठीं पौराणिक ग्रंथांतील प्राचीन राजांचीं नावें यज्ञविधींशी जोडण्यांत आलीं.

(२) इतिहासपुराणादि वाङ्मयास व नाग, गंधर्व पिशाच्चादि वर्गांस यज्ञविधींतील दिवस वांटले गेले.

(३) शिव, विष्णूंचीं अर्वाचीनकाळीं परिचित स्वरूपें त्यांच्या तत्कालीन कथांसह वेदग्रंथांत व यज्ञमंत्रांत शिरलीं.

(४) या दोघांच्या संपर्कानें यज्ञकर्म तात्पुरतें विस्तीर्ण झालें, व पुढें देश्यांची उचल होऊन यज्ञकर्म संपुष्टांत आलें आणि भारतीय संस्कृतीस पुन्हां सूतसंस्कृतीचें वळण मिळालें आणि वैदिक संस्कृति केवळ अंगास चाटून गेल्यासारखें झालें. फरक एवढाच कीं, यज्ञकर्तेपणामुळें उत्पन्न झालेली ब्राह्मणज्ञाति पुढें जातिस्वरूप पावून हिंदुस्थानच्या एकंदर वाङ्मयास आणि आयुष्यक्रमास विशिष्ट वळण लावती झाली. तिनें स्थानिक संस्कृति जशीच असेल तशी घेऊन तिचे विधिनिषेध, उत्सव, वाङ्मय, सणवार यांच्यामध्यें व्यवस्थितपणा आणण्यास सुरवात केली. त्यामुळें सर्व सूतसंस्कृतीचें स्वरूप जरी बदललें नाहीं तरी तिच्यावर वेदांस मानणाऱ्या ब्राह्मण जातीचें दडपण पडलें व सर्व संस्कृतींस लोक वैदिक संस्कृतीच म्हणूं लागले.

आपणापाशीं सूतसंस्कृतीचें जें वाङ्मय आहे तें ब्राह्मणीं, बौद्ध व जैन आवृत्तिकारांनीं विकृत केलेलें असें मिळालेलें आहे आणि त्यामुळें सूतसंस्कृतींतील एखाद्या कथेचें खरें स्वरूप काय असावें हें आज केवळ अनुमानानेंच काढावयाचें आहे. महाभारत हें त्या प्रकारच्या कथांचें मुख्य संग्रहस्थान आहे. कांहीं सूतकथा रामायण व इतर पुराणें यांत ग्रथित झाल्या आहेत तर कांहीं जातकांत व कथासरित्सागरादि ग्रंथांत आहेत.

केवळ प्राचीन इतिहास या दृष्टीनें महाभारताकडे न पहातां वाङ्मय या दृष्टीनेंहि त्याकडे पाहिलें पाहिजे. आतां आपण प्रत्यक्ष महाभारताकडेच वळूं.

**महाभारत हें काय आहे**—महाभारत हा एक वीरकथासंग्रह असून तो काव्यमय आहे असें थोडक्यांत त्याचें वर्णन करतां येईल. महाभारत हें फक्त एक काव्य आहे एवढेंच नाहीं तर तें एक ग्रंथभांडार आहे. महाभारत या शब्दांचा अर्थ भरतांच्या महायुद्धाचा वृत्तान्त असा आहे. भरत हें एक क्षत्रिय राष्ट्र होतें असें वेदामध्यें वर्णन आहे. दुष्यंत व शकुन्तला यांचा पुत्र भरत याचा ब्राह्मणांमध्यें उल्लेख केलेला आहे. हा भरत भरतांच्या राजवंशाचा मूळपुरुष होय असें उत्तरकाळीं मानिलें गेलें.

हे भरत गंगा—यमुना नद्यांच्या वरच्या भागाकडे रहात असत. भरताच्या वंशजांपैकीं कुरु या नांवाचा राजा फार प्रमुख होता व त्याचे वंशज ते कौरव. हे भारत लोकांवर इतके दिवस राज्य करीत होते कीं, कालांतरानें त्या लोकांच्या एका राष्ट्राला कुरु किंवा कौरव हें नांव मिळालें; व त्यांच्या प्रदेशाला कुरुक्षेत्र असें म्हणूं लागले अशी मांडणी विंटरनिझ्झनें केली आहे. कुरु नांवाचा राजा असावा हें मत केवळ पुढील विचारार्थ कल्पना या पलीकडे गेलें आहे असें आम्हांस वाटत नाहीं 'भारत' याचा अर्थ भरत लोकांची लढाई असा आहे. (पाणिनि, ४. २, ५६) प्रत्यक्ष महाभारतांत 'महाभारत-युध्द (१४.८१,८) म्हणजे भरतांची मोठी लढाई असा शब्द आढळतो व महाभारताख्यानम् ( १. ६ २,३९ ) याचा अर्थ भरत लोकांच्या मोठया लढाईची गोष्ट असा शब्द आहे. 'महाभारत'हा शब्द ' महाभारताख्यानम् ' या शब्दाचा संक्षेप आहे.

' कुरुक्षेत्र ' हा शब्द यजुर्वेदांत व ब्राह्मण ग्रंथांत आपल्या परिचयाचा झालेला आहे. कौरवांच्या राजघराण्यांतील भांडणावरून, एक घनघोर युद्ध होऊन

बराच रक्तपात झाला; त्या युद्धांत कुरुंचें जुनें घराणें व त्या बरोबरचचें भरतांचें कुल याचा बहुतेक नायनाट झाला. हें घनघोर युध्द कधीं झालेंच नाहीं अशी कल्पना व्यक्त झाली आहे आणि फक्त महाभारतावरूनच आप ल्याला या युद्धाची माहिती मिळते. इतर पुराव्या-वरून तें सिध्द होत नाहीं ही गोष्ट आधार म्हणून सांगितली जाते. तरी देखील हें युद्ध इतिहास असेल अशी भावना होते. या भयंकर युद्धाची हकीगत गीतांच्या रूपानें अनेकांकडून सांगितली गेली; व कोणी एका महाकवीनें या गीतांवरून कुरुक्षेत्रावरील महायुद्धाचें एक वीर काव्य तयार केलें असावें; ( इलीअड व निबेलुंगेन या गीतांप्रमाणें ) एक विध्वं-सकारक भयंकर युद्धाची शोकपर्यवसायी गोष्ट हा या वीरकाव्याचा मुख्य विषय आहे. हें जुनें वीरकाव्य हा महाभारताचा मुख्य भाग आहे.

शेंकडों वर्षांच्या अवधींत, या मुख्य भागाशिवाय, निरनिराळ्या प्रकारच्या अनेक पद्यांचा या काव्यांत समावेश झाला. प्रथमतः जुन्या वीरकाव्याशीं थोडा बहुत संबंध असलेल्या कित्येक दंतकथांचा समावेश त्या काव्यामध्यें झाला; त्या दंतकथांमध्यें महायुद्धाचा कोठेंहि उल्लेख केलेला नाहीं; त्या दंतकथांमध्यें वीरांचा प्राचीन इतिहास किंवा त्यांच्या सर्व प्रकारच्या पराक्रमांची हकी-गत दिलेली आहे. कित्येक प्रसिद्ध राजे व प्राचीन काळचे वीर पुरुष यांच्या अर्धवट गोष्टींचाहि या काव्यांत समावेश झाला; तथापि कुरूंच्या महायुद्धाच्या गीतांशीं या गोष्टींचा कांहीं एक संबंध नाहीं. या जुन्या सूतकाव्यांचा किती भाग उपकथा या नात्यानें मूळ काव्यांत होता व कोणत्या भागाचा पाठीमागून या मूळ काव्यांत समावेश केला गेला हें ओळखतां येणें जवळ जवळ अशक्य आहे. आपलें महाभारत हें फक्त भारतीय युद्धासंबंधाचेंच वीरकाव्य आहे असें नाहीं, तर जुन्या सूतांच्या काव्याचेंहि भांडार त्यांत आहे.

वीरकाव्यें सूतांचीं असून तीं ब्राह्मणांच्या ताब्यांत कशीं व कां आलीं व येतांना काय फेरफार झाले यासंबंधानें विंटरनिझ्झ म्हणतो. "हीं वीरगीतें अधिकाधिक लोकप्रिय होऊं लागलीं तेव्हां, हें वीरकाव्यहि आपल्या ताब्यांत घेण्याची अधिकाधिक धडपड ब्राह्मणांनीं केली असली पाहिजे. या शुद्ध ऐहिक काव्याचा त्यांच्या स्वतःच्या पारमार्थिक काव्यांशीं व धर्मशास्त्रविषयक वगैरे मिश्र प्रकारच्या ज्ञानाशीं कसा मिलाफ करावयाचा हेंहि त्यांस अवगत होतें. याचा परिणाम असा झाला कीं, देवांविषयींच्या ब्राह्मणांनीं रचिलेल्या पौराणिक गोष्टी व ब्राह्म-णांच्या तत्त्वज्ञानविषयक, नैतिक व धर्मशास्त्रासंबं-धाच्या वगैरे उपदेशपर गोष्टी, या सर्वांचा महाभारतांत प्रवेश झाला. आपल्या मतांचा प्रसार करून, आपलें वजन वाढवून तें कायम राखण्याच्या कामीं या लोक-प्रिय वीरकाव्याचा ब्राह्मणांनां फार उपयोग झाला. ब्राह्मणांचे फार प्राचीन पूर्वज जे ऋषी ते होमहवन व तपश्चर्या करून मनुष्यांवर व देवांवरहि विलक्षण ताबा मिळवीत असत; परंतु त्यांनां कोणी त्रास दिला असतां, शाप देऊन, राजे, मोठे लोक व इंद्र यांचाहि ते पाडाव करीत असत. अशा प्रकारच्या अनेक अद्‌भुत गोष्टी व दंतकथा, या वीरकाव्यांत ब्राह्मणांनीं घुसडून दिल्या.

परंतु महाभारत हें फार लोकप्रिय असून, त्याचा फार प्रसार झाल्यामुळें व विशेषतः क्षत्रिय लोकांमध्यें त्याचा फार प्रसार झाल्यामुळें, त्या ग्रंथावर वैदिक पर-परेचा संस्कार फारसा राहिला नाहीं किंवा तो ग्रंथ एखाद्या वैदिक संप्रदायाच्या मालकीचाहि झाला नाहीं. वेद जाणणाऱ्या विद्वान ब्राह्मणांनीं महाभारतांत दुरुस्ती करून तें सुधारण्याचें काम फारसें केलें नाहीं. व याचें मुख्य कारण श्रौतधर्म मृतकल्प होऊन आरण्यकीय धर्माकडे ब्राह्मणादि समाजाची प्रवृत्ति झाल्यानंतर या ग्रंथावर संस्करण झालें हें होय. म्हणूनच ब्राह्मणांचें ज्या ठिकाणीं बरेंच वर्चस्व आहे त्या ठिकाणींहि ब्राह्मणांच्या धर्मशास्त्रासंबंधीं व यज्ञयागासंबंधीं अगदीं थोडी माहिती आढळते. यज्ञविषयक ज्ञान पौराण कालांत किती कमी होतें आणि पुराणाची प्रवृत्ति श्रौतधर्मास अगदीं कमी महत्त्वाचें करावें अशी असल्यामुळें इतिहास पुराण ग्रंथां-वर काय परिणाम झाला हें वेदविद्या विभागांत सांगि-तलेंच आहे. महाभारतांत सुधारणा करून त्याचें उप-बृंहण करण्याचें काम ज्या लोकांनीं केलें ते बहुधा राज-पुरोहित असून सूतांप्रमाणेंच राजाश्रयी असावेत व म्हणू-नच वीरकाव्याची यांनां चांगली माहिती झाली. विष्णु किंवा शिव यांच्या प्रसिद्ध क्षेत्रांच्या ठिकाणीं यात्रेच्या-वेळीं व देवळांत उपाध्यायपणाचें काम, पुढें पुढें हे वैदिक विद्येच्या दृष्टीनें कमी शिकलेले पुरोहितच करीत असत. पवित्र स्थलांसंबंधाच्या व विष्णु व शिव या देवांसंबंधाच्या पौराणिक कथांची जोपासना करण्याचें काम या पुरोहितांनीं केलें. ही गोष्ट मुख्यत्वेंकरून जरी पुराणां-संबंधीं खरी असली तरी महाभारतालाहि पुष्कळ अंशीं तीच गोष्ट लागू आहे. पुराणाच्या धर्तीवरील स्थानिक कथा, विष्णु व शिव यांच्या पौराणिक कथा,

पुराणासारख्या विश्वघटनेच्या गोष्टी, भूगोल शास्त्रविषयक यादी व वंशावलिवर्णनें यांचा प्रवेश महाभारतांत झाला."

सर्वांत वरिष्ठ प्रतीचा देव म्हणून ज्या ठिकाणीं विष्णूची पूजा प्रचलित होती, त्या ठिकाणीं वीरकाव्यांची अधिक जोपासना झाली, यामुळें महाभारतांतील पारमार्थिक व उपदेशपर भागांत, विष्णूला बरेंच प्रामुख्य दिलें आहे. विष्णूच्या उपासनेसंबंधीं व भक्तिपर संवाद अनेक ठिकाणीं कां असावे हें यावरून समजण्यासारखें आहे. शिवासंबंधींहि बऱ्याच गोष्टी या ग्रंथांत आहेत; व शिवोपासनेसंबंधींच प्रक्षिप्त भागहि बराच आहे; परंतु हा भाग फारच पाठीमागून आंत घातलेला आहे हें सहज ओळखितां येतें. शिवपूजा ज्या ठिकाणीं प्रचलित होती अशा ठिकाणीं त्या वीरकाव्याचा जेव्हां प्रसार झाला तेव्हां हा शिवासंबंधींचा भाग घुसडण्यांत आला असावा. विशिष्ट दैवतोपासनेसंबंधीं मजकूर निरनिराळ्या वेळीं अंतर्भूत करण्यांत येत असे याला ग्रांथिक आधार आहे. दुर्गा व हेरंब यांचीं नावें ज्या श्लोकांत आहेत ते श्लोक भांडारकर इन्स्टिटयूटनें जमविलेल्या अनेक प्रतींत सांपडत नाहींत. ब्राह्मणांशिवाय हिंदुस्थानांत धर्मपरायण लोकांचा आणखी एक वर्ग होता; यांनीं प्राचीनकाळीं वाङ्मयाचा प्रसार करून, लोकांचीं मनें आपल्याकडे वळवून घेण्याचा ब्राह्मणांपेक्षां अधिक प्रयत्न केला. हे लोक म्हणजे संन्यासी, वानप्रस्थाश्रमी व भिक्षु लोक होत. बुद्धाच्या वेळीं हिंदुस्थानांत प्रचलित असलेले निरनिराळे पंथ याच लोकांनीं काढिले. या लोकांचेंहि निराळें काव्य होतें. साधूंच्या गोष्टी व सूत्रें यांमध्यें सर्व संगपरित्याग, आत्मयज्ञ व भूतदया या तत्त्वांचें प्रतिपादन केलेलें असे. त्यांच्या काल्पनिक कथा, दृष्टांत, व नैतिक गोष्टी, या सर्वांचा उद्देश यतींचें तत्त्वज्ञान व नीतिशास्त्र उदाहरणें देऊन लोकनिदर्शनास आणणें हा आहे. अशा निवृत्तीपर काव्याचाहि भाग महाभारतांत बराच आहे. याचें मुख्य कारण सूतसंस्कृतीनें वैदिक धर्मा विरुद्ध जी उचल केली ती वेदांतच आरण्यक धर्माच्या रूपानें दृष्ट झाली. आणि षड्दर्शनांमध्यें पूर्वमीमांसा खेरीज करून इतर जें वाङ्मय आहे तें मंत्र व ब्राह्मण यांच्या अभ्यासाचें नसून आरण्यकें व उपनिषदें यांच्या अभ्यासाचें आहे व यामुळें या वाङ्मय परंपरेचाहि परिणाम महाभारत ग्रंथावर बराच झाला आहे.

महाभारत हें फार अद्भुत वाङ्मय आहे; लढाईच्या देखाव्याचीं उत्तम उत्तम वर्णनें असलेलीं अशीं गीतें तत्त्वज्ञान, धर्म व कायदा यांचें कंटाळवाणें स्पष्टीकरण ज्यांत आहे असें धार्मिक उपाध्यायांचें काव्य, आणि भूतदया व्यक्त करणारें व पारमार्थिक ज्ञानप्रद असें निवृत्तिपर काव्य हीं सर्व महाभारतांत आहेत.

महाभारत हें जरी वीरचरित्र आहे, तरी भारतीय ग्रंथकार तें आर्ष महाकाव्य आहे असें समजतात; व जुन्या स्मृतीला अनुसरून त्यांत शास्त्र, कायदा व तत्त्वज्ञानहि सांगितलेलें आहे असें समजण्यांत येतें; महाभारतास स्मृतीचा आधार असल्यामुळें त्यांतील प्रमाणें निर्विवाद आहेत. व पंधराशें वर्षांपेक्षां अधिक कालापासून भारतीयांस तें एक मनोरंजनाचें साधन झालें आहे, एवढेंच नव्हे तर, तें बोधप्रद व ज्ञानप्रदहि झालेलें आहे.

हल्लीं हस्तलिखित प्रतींत तें जसें आढळतें तसेंच व व तेवढेंच तें निदान पंधराशें वर्षांपूर्वीं होतें. हल्लींप्रमाणेंच त्या प्राचीन ग्रंथालाहि एक मोठी प्रस्तावना असून त्यांत एकंदर गोषवारा दिलेला होता; त्या काव्याची दंतकथात्मक उत्पत्ति दिलेली असून, मूलधर्मग्रंथ या दृष्टीनें त्याची स्तुति केलेली होती. त्याचे अठरा भाग केलेले होते; त्या प्रत्येकाला 'पर्व' असें म्हणत, हरिवंश या नांवाचा आणखी एक भाग पुरवणीदाखल मागून जोडिला गेला. या शिवाय शंभर पर्वांमध्यें विभागणी त्यावेळेस प्रचलित असून तीं जुनीं पर्वनामें पाठसंशोधन पध्दतीप्रमाणें काढतां येण्याजोगीं आहेत असें भांडारकर इन्स्टिटयूटमध्यें चाललेल्या संशोधनावरून दिसतें. याची एकंदर श्लोकसंख्या सुमारें एकलक्ष आहे. या प्रचंड ग्रंथांत जरी निरनिराळे विषय आहेत, तरी हा सर्व एकच स्वतंत्र ग्रंथ आहे असें अद्यापि लोक समजतात. अत्यंत पूज्य असा जो कृष्णद्वैपायन ऋषि किंवा व्यास त्यानें हा ग्रंथ केला. याच ऋषीनें चार वेद रचिले व पुराणें केलीं असें म्हणतात. महाभारतांतील नायकांचा हा समकालीन असून जवळचा नातलगहि होता असा त्याचा संबंध महाभारतांत आढळतो.

पराशर नांवाच्या एका प्रसिद्ध ऋषीचा हा पुत्र होय. एके दिवशीं सत्यवती या ऋषीच्या दृष्टीस पडली. ही मुलगी एका कोळ्याला माशाच्या पोटांत सांपडली होती; व कोळी लोकांनींच तिचें पालन पोषण केलें होतें. तिचें सौंदर्य पाहून तो ऋषि इतका मोहित झाला कीं, तिच्याशीं समागम करावा अशी त्याला इच्छा झाली. पुत्र झाल्यावर आपलें कौमार्य आपल्याला परत मिळावें या अटीवर तिनें ऋषीचें म्हणणें कबूल केलें; ही तिची अट व आपल्या अंगाला येणारी माशांची

घाण जाऊन आपल्या अंगाला अद्भुत सुगंध यावा हीहि तिची इच्छा त्या ऋषीनें मान्य केली. त्या दोघांचा समागम झाल्यानंतर यमुनानदीमधील एका द्वीपामध्यें तिला एक पुत्र झाला; द्वीपामध्यें जन्मलेला म्हणून त्याचें नांव द्वैपायन असें ठेवण्यांत आलें. तो मुलगा मोठा झाल्यावर तपश्चर्या करूं लागला. आईची परवानगी घेऊन निघून जाते वेळीं 'माझी गरज लागली असतां माझें स्मरण करतांक्षणींच मी तुला भेटेन' असें त्यानें आपल्या आईला सांगितलें. सत्यवती पुन्हां कुमारी झाली; नंतर कुरुराजा, शंतनु याच्याशीं तिचें लग्न झालें. चित्राङ्गद व विचित्रवीर्य असे त्याच्यापासून तिला दोन पुत्र झाले. शंतनु व चित्राङ्गद हे मरण पावल्यावर विचित्रवीर्य हा राजा झाला; परंतु तो लहानपणीं निपुत्रिक मरण पावला; त्याला दोन बायका होत्या. आपला वंश बुडूं नये म्हणून त्या वेळेच्या धर्मशास्त्राप्रमाणें द्वैपायनानें आपल्या भावजयींच्या ठिकाणीं संतति उत्पन्न करावी, यासाठीं सत्यवतीनें द्वैपायनास बोलाविण्याचें ठरविलें. द्वैपायन हा जरी तपस्वी होता, तरी तो अगदीं कुरूप असून त्याचे केंस व दाढी खरखरीत होतीं व त्याला गरगर फिरणारे काळे डोळे असून त्याची कांतीहि काळीच होती (म्हणूनच कदाचित् त्याचें नांव कृष्ण म्हणजे काळा असें असावें.) व त्याच्या अंगापासून दुर्गंध येत होता. एका राजपुत्रीजवळ तो जातांच त्याची मुद्रा तिला असह्य झाल्यामुळें तिनें डोळे मिटून घेतले. त्या कारणामुळें तिला जन्मांध पुत्र झाला. हाच पुढें झालेला राजा धृतराष्ट्र होय. व्यास दुसऱ्या स्त्रीजवळ गेला तेव्हां त्याला पाहून ती पांढरी फटफटीत झाली. त्याचा परिणाम असा झाला कीं तिला निस्तेज असा पुत्र झाला; व म्हणूनच पाण्डु म्हणजे 'फिक्का' असें याचें नांव पडलें. महाभारतांतील मुख्य पांच नायकांचा हा पिता होय. द्वैपायनानें आणखी एकदां पहिल्या स्त्रीशीं समागम करण्याचें ठरविलें; परंतु ती आतां हुशार झाल्यामुळें, तिनें आपल्या ऐवजीं आपल्या एका दासीला त्या ऋषीकडे पाठविलें; ही गोष्ट त्या ऋषीच्या लक्षांत आली नाहीं. त्या दासीला त्या ऋषीपासून विदुर नांवाचा पुत्र झाला. हा चतुर असून धृतराष्ट्र व पाण्डुपुत्र यांचा हितेच्छु मित्र होता असें महाभारतांत सांगितलेलें आहे. (१. ६३, १००) हा कुरूप व दुर्गंधयुक्त ऋषि, कृष्णद्वैपायन व्यास हा महाभारतांतील नायकांचा पितामह होता असें अनेक ग्रंथांवरून समजतें. यानेंच सर्व महाभारत रचिलें अशी समजूत आहे.

महाभारताच्या प्रस्तावनेवरून असें कळतें कीं, त्याचे तिन्ही पुत्र मरण पावल्यावर त्यानें आपलें काव्य प्रसिद्ध केलें. आपला शिष्य वैशंपायन यास तें काव्य शिकविलें व जनमेजय राजानें सर्पसत्र केलें त्यावेळीं त्यानें तें सर्व काव्य म्हणून दाखविलें. लोमहर्षणाचा पुत्र सूत उग्रश्रवस् यानें तें त्यावेळीं ऐकिलें. नैमिषारण्यांत शौनकानें द्वादशवर्षीय सत्र केलें त्यावेळीं जमलेल्या ऋषींनीं जनमेजयापासून ऐकिलेली महाभारताची गोष्ट सांगण्यास, सूत उग्रश्रवस् यास विनंति केली. सूतानें तें कबूल करून, वैशंपायनानें सांगितलेली गोष्ट सांगण्याचे अगोदर जनमेजयाच्या सर्पसत्राची गोष्ट त्यानें त्या ऋषींनां सांगितली.

महाभारतांत सर्वत्र फक्त अनेक जुन्या महाकाव्यांप्रमाणें संभाषणेंच आढळतात. यावरून त्याचें प्राचीनत्व दिसून येतें. उग्रश्रवस् यानें त्याचा सारांश सांगितला; त्या काव्यामध्यें वैशंपायन हाच वक्ता आहे. वैशंपायनाच्या गोष्टींत कित्येक प्रक्षिप्त गोष्टी निरनिराळ्या लोकांच्या तोंडीं घातल्या आहेत. एका गोष्टीमध्यें दुसऱ्या अनेक गोष्टींची भर घालणें ही गोष्ट प्राचीन वाङ्मयांत नेहमीं आढळते. "वैशंपायन उवाच," "युधिष्ठिर उवाच" वगैरे ठरीव सूत्रवत् शब्दांनीं अनेक वेळां, मुख्य गोष्टी व इतर लोकांचीं भाषणें यांस सुरवात केलेली आहे.

महाभारताच्या प्रस्तावनेंत आढळणारा ग्रंथकर्त्याचा हा सर्व उपोध्दात जरी विचित्र आहे तरी त्यांतील कांहीं कांहीं विधानें लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत; उदाहरणार्थ असें म्हटलें आहे कीं व्यास ऋषीनें आपला ग्रंथ सारांश—रूपानें सांगितला व त्या ग्रंथाचें सविस्तरपणेंहि त्यानें दिग्दर्शन केलें; तें काव्य म्हणणारे निरनिराळे लोक तीन निरनिराळ्या ठिकाणीं त्या काव्यास सुरवात करितात; व त्याचा विस्तारहि कमी अधिक प्रमाणांत आहे. उग्रश्रवाच्या मताप्रमाणें त्या काव्यांत ८८०० श्लोक आहेत; परंतु भारताची संहिता २४००० श्लोकांत आपण रचिली असें व्यासाचें म्हणणें आहे; "उपकथांशिवाय तज्ज्ञ लोक सर्व काव्य २४००० श्लोकांत म्हणतात." दुसऱ्या एका ठिकाणीं असें एक चमत्कारिक विधान केलें आहे कीं, ६० लक्ष श्लोकांचें एक वीरकाव्य व्यासानें लिहिलें; ३० लक्ष श्लोक देवांसंबंधाचे, पंधरा लक्ष स्वर्गस्थ पितरांसंबंधाचे, चौदा लक्ष गंधर्वांसंबंधाचे

व एक लक्ष सामान्य लोकांसंबंधाचे आहेत. यावरून महाभारत किती मोठें असावें यासंबंधींची प्राचीनांची समजूत व्यक्त होते. 'शतसाहस्रीसंहिता' म्हणजे एक लक्ष कवितांचा संग्रह असेंहि त्यास नांव आहे. महाभारत एकच ग्रंथ आहे असें श्रद्धावानांचें जरी ठाम मत असलें तरी पूर्वीचा लहान ग्रंथ हळूहळू वाढत जाऊन त्यास हल्लींचें स्वरूप प्राप्त झालें याची जाणीव प्राचीनांनां होती, हें वरील निरनिराळ्या विधानांवरून स्पष्ट होतें.

लोकांनां महाभारताचें महत्त्व किती वाटतें हें महाभारताच्या प्रस्तावनेंत फारच अतिशयोक्तीनें सांगितलेलें आहे. परंतु कर्मठ लोकांप्रमाणें महाभारताचा विचार न करितां चिकित्सक दृष्टीनें त्याचा जे लोक विचार करितात त्यांनां त्या ग्रंथांत कोणत्याहि प्रकारचें कौशल्य आढळून येत नाहीं; तो ग्रंथ एकाच मनुष्यानें लिहिला असावा असें वाटत नाहीं; इतकेंच नव्हे तर तो ग्रंथ कोणी हुशार मनुष्यानें रचिला असावा असेंहि वाटत नाहीं असें विंटरनिट्झ म्हणतो. महाभारत हें एक प्रचंड वाङ्मय आहे. त्यांतील विरोधात्मक तत्त्वें काव्यामध्यें एकत्र आणण्याचा प्रयत्न कोणीहि सूज्ञ मनुष्यानें केला नाहीं; व तसें शक्यहि झालें नसतें. काव्याचा गंधहि नाहीं अशा कांहीं धर्मशास्त्रज्ञांनीं, टीकाकारांनीं व अडाणी लेखकांनीं निरनिराळ्या शतकांत लिहिलेलें भिन्न भिन्न काव्य गोळा करून त्याची ही विसंगतपणें मांडणी केली आहे. या प्राचीन कालच्या प्रचंड काव्यांत हल्लींच्या विद्वान लोकांनां अस्सल प्रतीच्या काव्याचा बराच भाग सांपडला आहे; त्यांत चिरस्थायी व अमूल्य काव्यकला व अगाध ज्ञान दिसून येतें. महाभारत हा एकच ग्रंथ आहे, असें नसून तें एक ग्रंथभांडार आहे. यामुळें प्राचीनांच्या हृदयांतील अत्यंत गूढ विचारांची कल्पना येण्यास तें फार सोईचें आहे. महाभारत व त्याचे अनेक भाग यांमध्यें असलेल्या विषयांचें जें खालीं निरीक्षण केलें आहे, त्यावरून ही गोष्ट दाखवितां येईल.

**महाभारताचें मुख्य कथानक.**– १८४६ सालीं एक पुस्तक प्रसिद्ध करून महाभारताच्या स्वरूपाचें चिकित्सापूर्वक ज्ञान जर्मनींतील काव्यव्यासंगी लोकांनां समजवून देण्याचा मोठा प्रयत्न ॲडाल्फ हाल्ट्झमन यानें केला. तेव्हांपासून यूरोपमध्यें याच्या पद्धतशीर अभ्यासास प्रारंभ झाला असें म्हणतां येईल. महाभारत हें केवळ वीरकाव्य नाहीं, तर प्राचीन वीरगीतांत अनेक प्रकारें दुरुस्ती होऊन व त्या गीतांत अनेक प्रकारची भर पडून विपर्यस्त रूप पावलेला असा तो वीरगीतांचा अवशेष आहे अशी आपली योग्य समजूत करून त्यानें आपल्या कामास म्हणजे प्राचीन भारतीयांच्या काव्य कर्तृत्वाच्या अभ्यासास प्रारंभ केला. दुरुस्ती होऊन विरूप झालेल्या या ग्रंथावरून प्राचीन कालचें मूळ वीरकाव्य तयार करण्यास आपण समर्थ आहोंत असा त्यास मोठा आत्मविश्वास होता. कांहीं भाग गाळून टाकून, कांहीं भागांची छाटाछाट करून व कांहीं भागांत फेरबदल करून, हिंदु लोकांचें वीरकाव्य आपण जर्मन भाषेंत आणिलें असें त्यास वाटलें; अस्तित्वांत असलेल्या जुन्या ग्रंथाच्या शब्दशः भाषांतरापेक्षां प्राचीन सूतवर्ग जें महाभारत गाऊन दाखवीत असत त्या प्रत्यक्ष महाभारताची कल्पना या आपण तयार केलेल्या ग्रंथावरून अधिक चांगल्या प्रकारें होईल असेंहि त्यास वाटलें. बुद्धिप्रभाव व काव्यमय कल्पना यांच्या जोरावर हाल्ट्झमन यानें पुष्कळ वेळां खऱ्या गोष्टी लिहिल्या आहेत; परंतु मूळ संस्कृत ग्रंथाला सोडून कांहीं गोष्टी अशा लिहिल्या आहेत कीं त्यावरून त्यानें महाभारताचें यथातथ्य दिग्दर्शन केलें नसून, त्याच्या मनाप्रमाणें वाटेल तशी त्यानें त्याची मांडणी केली आहे असेंच म्हणावें लागतें. त्यानें अशक्य अशा अनेक गोष्टी लिहिल्या आहेत.

तथापि, महाभारताच्या प्रचंड गीतसमूहामधून, कौरवपांडवांच्या लढाईचा वृत्तान्त हा जो मुख्य भाग तो निवडून काढणें बरेंच सोपें आहे; प्रत्यक्ष वीरकाव्याचा हाच (लढाईचा वृत्तान्त) विषय आहे. पुढील संक्षिप्त कथाभागांत ही गोष्ट स्पष्ट केली जाईल. मुख्य नायकांचा ज्यांत संबंध आहे अशा कांहीं महत्त्वाच्या उपकथांसह महायुद्धाची कच्ची हकिगत आपण लक्षांत घेऊं; मूळ वीरकाव्यासंबंधाच्या शंकास्पद काल्पनिक विधानांचा विचार न करितां व मुख्य कथानकाशीं संबंध नसलेली प्रत्येक गोष्ट प्रथमतः लक्षांत न घेतां, हल्लीं उपलब्ध असलेल्या महाभारत ग्रंथाचा आपण विचार करूं.

प्राचीनकालीं भरतभूमीमध्यें कुरुकुलवंशी शंतनु राजा राज्य करीत होता. या शंतनूस मानवदेहधारी श्रीगंगेपासून भीष्म नांवाचा मुलगा झाला होता, व तो अनेक वीरोचित गुणांनीं युक्त असून युवराज म्हणून ठरला गेला होता. तथापि एके दिवशीं शंतनूला कोळ्याची मुलगी सत्यवती ही दृष्टीस पडली, तिच्यावर तो आसक्त झाला आणि तिच्यासाठीं त्यानें मागणी घातली. सत्यवतीचा बाप हा कोळ्यांचा राजा होता. त्यानें सत्यवतीच्या

मुलास राज्य मिळेल तरच तुम्हांस ती देऊं या अटीवर शंतनूची मागणी कबूल केली. शंतनूस तें कबूल होईना, तथापि सत्यवतीचा विसरहि पडेना. आपला बाप खिन्न चित्त आहे हें भीष्माच्या नजरेस आलें. त्यानें चौकशी केली व त्यास कारणहि कळलें. तो स्वत: सत्यवतीच्या बापाकडे गेला, आणि बापासाठीं सत्यवतीला मागणी घातली, स्वत: राज्यावरचा हक्क सोडून दिला, व आपलीं मुलें तंटा करावयास उपस्थित होऊं नयेत म्हणून आजन्म ब्रह्मचर्याची शपथ वाहिली. शंतनु-सत्यवती यांचें लग्न झालें. त्यांनां चित्रांगद व विचित्रवीर्य हीं दोन मुलें झालीं. कांहीं दिवसांनीं शंतनु वारला, आणि त्याचा मुलगा चित्रांगद हा गंधर्वांबरोबर युद्धांत मृत्यु पावला. भीष्मानें विचित्रवीर्यास राजा केलें, तथापि विचित्रवीर्य निपुत्रिक मरण पावला. त्याला दोन बायका होत्या. वंशक्षय होऊं नये म्हणून भीष्मानें नियोगानें त्या विधवांच्या ठायीं प्रजोत्पत्ति करावी असें सत्यवतीनें सुचविलें. तथापि कांहीं झालें तरी आपण केलेली प्रतिज्ञा न मोडण्याचा भीष्मानें संकल्प कळविला, तेव्हां सत्यवतीस आपल्या पराशरप्राप्त विवाहपूर्व पुत्राची म्हणजे कृष्णद्वैपायन व्यासाची आठवण झाली, आणि भीष्माच्या संमतीनें व्यासाची विचित्रवीर्याच्या पत्नींच्या ठायीं पुत्रोत्पत्तीसाठीं योजना झाली. त्यानें दोघींच्या ठायीं धृतराष्ट्र व पंडु हे अनुक्रमें पुत्र उत्पन्न केले व धृतराष्ट्रमातेनें व्यासाशीं अप्रिय संभोग चुकविण्यासाठीं आपल्याऐवजीं पाठविलेल्या दासीच्या ठायीं विदुराची उत्पत्ति झाली. धृतराष्ट्र जन्मांध होता म्हणून पंडु राजा झाला. धृतराष्ट्राचें लग्न गांधार राजकन्या गांधारी हिच्याबरोबर झालें व त्यांनां शंभर मुलगे झाले, त्या शंभरांत दुर्योधन हा वडील होता. पंडूला दोन बायका होत्या: थोरली यादव राजकन्या पृथा अगर कुंती व धाकटी मद्रराजकन्या शल्याची बहीण माद्री. कुंतीला तिघे मुलगे होते; ते धर्म, भीम व अर्जुन होत आणि माद्रीला नकुल व सहदेव हे होते. यांच्या उत्पत्तीसंबंधानें कथा अशी आहे कीं ते मुलगे पंडूचे औरस नसून क्षेत्रज होते. पंडूनें मृगरूप धारण-करणारा ऋषि संभोग करीत असतां त्याचा मृग समजून वध केला. ऋषीनें त्यास शाप दिला कीं तूंहि मैथुनप्रवृत्त झाल्यास मृत होशील. अर्थात् पंडूला पुत्रोत्पत्ति होणें शक्यच नव्हतें.

परंतु कुंतीनें वंशवृध्दीकरितां आपणांपासून प्रजा उत्पन्न करण्याकरितां देवांची प्रार्थना केली तेव्हां यमधर्मापासून युधिष्ठिर, वायूपासून भीम, इंद्रापासून अर्जुन याप्रमाणें तिला तीन पुत्र झाले. कुंतीच्या प्रार्थनेवरून अश्विनांनीं माद्रीच्या ठिकाणीं नकुल व सहदेव या जुळ्या मुलांची उत्पत्ति केली.

**धृतराष्ट्राच्या दरबारीं कौरव व पांडव—**

लौकरच पंडु मृत्यु पावल्यामुळें धृतराष्ट्र गादीवर आला. माद्रीनें पंडूबरोबर सहगमन केल्यामुळें कुंती पंडूच्या पांचहि मुलांस बरोबर घेऊन हस्तिनापुरास धृतराष्ट्राच्या दरबारीं गेली. तेथें या मुलांचें त्यांच्या चुलतभावांबरोबर शिक्षण झालें.

पंडूचे पुत्र लहानपणीं खेळावयाच्या खेळांमध्येंहि धृतराष्ट्राच्या पुत्रांपेक्षां अधिक प्रावीण्य दाखवीत. यामुळें धृतराष्ट्रपुत्र त्यांचा मत्सर करीत. विशेषत: भीम हा अतिशय आडदांड असून पुष्कळ वेळां आपल्या दांडगेपणानें धृतराष्ट्राच्या मुलांस त्रास देत असे. उदाहरणार्थ एखाद्या वेळीं हीं मुलें झाडावर चढलीं असतां भीम तें झाड इतकें जोरानें हालवी कीं, हीं मुलें त्यांनीं वेंचलेल्या फळांसुद्धां खालीं पडत. यामुळें दुर्योधन भीमाचा अतिशय द्वेष करी व त्यानें अनेक वेळां त्याचा जीव घेण्याचाहि विचार केला, परंतु भीमास त्यापासून प्रत्यक्ष फारसा त्रास झाला नाहीं. हीं मुलें मोठीं झाल्यावर कृप व द्रोण या दोन प्रसिद्ध शस्त्रविद्यानिपुण ब्राह्मणांची त्यांचे शिक्षक म्हणून योजना झाली. यांच्या शिष्यांमध्यें धृतराष्ट्र व पंडु यांच्या मुलांबरोबरच द्रोणपुत्र अश्वत्थामा व एक सारथीपुत्र कर्ण हेहि होते. द्रोणाच्या शिष्यांमध्यें दुर्योधन व भीम हे गदायुद्धामध्यें, अश्वत्थामा अस्त्रविद्येमध्यें, नकुल आणि सहदेव हे खड्गयुद्धामध्यें व युधिष्ठिर रथविद्येंत प्रवीण झाला. परंतु अर्जुनानें धनुर्विद्येंत प्रावीण्य मिळविलें एवढेंच नव्हे तर तो सर्वच विद्यांत सर्वांपेक्षां अधिक निष्णात झाला, यामुळें धृतराष्ट्राचे पुत्र त्याचा अतिशय मत्सर करीत.

सर्व राजपुत्रांचें शिक्षण पूर्ण झाल्यावर द्रोणानें आपल्या शिष्यांचें कौशल्य दिसून येण्याकरितां कांहीं खेळ करविले. त्यावेळीं राजा, राण्या व अनेक योध्दे हजर असून एकंदर समारंभ मोठा थाटाचा झाला. भीम आणि दुर्योधन यांचें गदायुध्द इतक्या चुरशीचें झालें कीं, त्यांनां एकमेकांपासून बळानें दूर करावें लागलें. अर्जुनाची धनुर्विद्येंतील नैपुण्याबद्दल वाहवा झाली; परंतु कर्णानेंहि रंगणांत येऊन अर्जुनानें केलेल्या गोष्टी करून दाखविल्या, त्यामुळें अर्जुनास फार राग आला. परंतु

दुर्योधनास अतिशय आनंद होऊन त्यानें कर्णास आलिंगन दिलें व त्यास निरंतर मैत्रीचें वचन दिलें. कर्णानें अर्जुनास द्वंद्वयुध्दास आव्हान केलें. परंतु पांडवांनीं तो सूतपुत्र म्हणून त्याचा उपहास केला.

**युधिष्ठिर युवराज होतो, पांडवांविरुद्ध कट (लक्षागृह)**—एक वर्षानंतर धृतराष्ट्रानें युधिष्ठिराला कुरुकुलांत वडील म्हणून, आणि त्याच्या शौर्य व इतर सद्गुणांमुळें युवराज नेमलें. इतर पांडवांनींहि शस्त्रास्त्रविद्येंत पूर्णपणें प्रावीण्य मिळवून स्वतःच निरनिराळ्या स्वाऱ्या करून विजय संपादन केले. धृतराष्ट्राच्या कानांवर जेव्हां हे पांडवांचे पराक्रम आले आणि ते अधिकाधिक बलवान होताहेत असें त्यास कळून आलें तेव्हां त्याला आपल्या मुलांबद्दल अधिकाधिक काळजी वाटूं लागली. अर्थात् जेव्हां दुर्योधन, दुःशासन, कर्ण व कौरवांचा मामा शकुनि यांनीं पांडवांविरुध्द एक कट रचला तेव्हां धृतराष्ट्रानेंहि त्यास अनुकूलता दर्शविली. त्यांनीं पांडवांनां कोणत्या तरी सबबीवर वारणावतास पाठविण्याबद्दल धृतराष्ट्राचें मन वळविलें. वारणावत येथें दुर्योधनानें पांडवांस राहण्याकरितां एका कारागिराकडून लाख व इतर ज्वालाग्राही पदार्थांचें एक घर बांधविलें. त्या घरांत पांडव रात्रीं निजले असतां तें जाळून पांडवांचा नाश करण्याचा त्यांचा बेत होता. परंतु विदुरानें या कपटकारस्थानाची माहिती म्लेंच्छ भाषेच्या द्वारें युधिष्ठिरास अगोदरच देऊन ठेवली होती. ही भाषा एका भारतेतर जातीची असून ती इतरांस कळत नसे. पांडवांनीं आपला संशय येऊं नये व दुसऱ्या एखाद्या मार्गानें मारेकरी वगैरे घालून कौरवांनीं आपला नाश करूं नये म्हणून त्या बेताप्रमाणें वारणावतास जाऊन लाक्षागृहांत राहण्याचें ठरविलें. परंतु त्या लाक्षागृहास आग लागल्यावर त्यांनीं अगोदरच तयार करून ठेवलेल्या एका विवरमार्गानें पांडव अरण्यांत निघून गेले, व लाक्षागृहांत तें घर बांधणारा कारागीर व आपल्या पांच मुलांस घेऊन निजलेली एक हीन कुलांतील स्त्री एवढीं जळून गेलीं. इकडे कुंतीसह सर्व पांडव जळून गेले अशी लोकांची समजूत होऊन धृतराष्ट्राच्या दरबारीं त्यांचे और्ध्वदेहिक संस्कार चालू होते तों पांडव स्वतः आपल्या मातेसह गंगेच्या पलीकडे अरण्यांत भटकत होते. अशा तऱ्हेनें फिरत असतां, मध्यरात्रीच्या सुमारास ते श्रमून, तहान व भूक यांनीं त्रस्त असे एका दाट जंगलांत आले. कुंतीनें तहान लागल्याचें सांगितल्यावरून भीमानें तिला व आपल्या भावांनां एका वडाच्या झाडाखालीं ठेविलें व आपण पाण्याच्या शोधाकरितां निघाला, व पाण्यांत राहणाऱ्या पक्ष्यांच्या मागोमाग जाऊन एका तळ्यावर आला. तेथें त्यानें स्नान केलें व पाणी पिऊन, पाणी नेण्याकरितां आपलें वस्त्र पाण्यांत भिजवून घेतलें. तो घाईघाईनें परत येऊन पाहतो तों सर्वांस त्या झाडाखालीं गाढ झोंप लागली आहे असें त्यास आढळून आलें. आपल्या आईस व भावास अशा स्थितींत पाहून त्यानें फार शोक केला.

**हिडिंब राक्षस व त्याची बहीण**—त्या वडाच्या झाडाजवळ हिडिंब नांवाचा एक भयंकर राक्षस राहात होता. त्याला मनुष्याचा वास येऊन त्यानें एका उंच झाडावरून त्या निजलेल्या लोकांस पाहिलें. तेव्हां त्याच्या तोंडास पाणी सुटून त्यानें आपली बहीण हिडिंबा हिस ते कोण लोक आहेत तें पाहून येण्यास सांगितलें व त्यांचें मांस व रक्त यांची मेजवानी झोडून आपण आनंदानें गाऊं व नाचूं असें म्हटलें. हिडिंबा तेथें येते तों तिची दृष्टि भीमावर जाऊन तिचें त्याच्यावर अतिशय प्रेम बसतें. तेव्हां ती एका सुंदर स्त्रीचें रूप धारण करून हास्यमुखानें त्याच्या जवळ येते आणि त्यास सांगते कीं, या जंगलांत माझा भाऊ हिडिंब या नांवाचा राक्षस राहातो, त्यानें मला येथें पाठविलें आहे परंतु माझें तुझ्यावर प्रेम असून मी तुझ्याशिवाय इतर कोणाहि मनुष्याची इच्छा करीत नाहीं आणि तूं जर माझ्यावर प्रेम करशील तर मी तुझी सुटका करीन. भीम तिला उत्तर करतो कीं, माझी आई व भाऊ यांस अशा स्थितींत टाकून माझ्या मनांत कामविकार उत्पन्न होणें शक्य नाहीं. तेव्हां ती त्यास आपल्या भावंडांस जागें करावयास सांगते व त्यांचीहि सुटका करण्याचें आश्वासन देते. परंतु भीम उत्तर करतो कीं, माझ्या आईस अथवा भावंडांस झोंपेंतून उठविण्याचें मुळींच कारण नसून मला यक्ष, राक्षस, गंधर्व वगैरेंची मुळींच भीति वाटत नाहीं. मीच त्या राक्षसाचा समाचार घेतों. त्याचवेळीं आपल्या बहिणीस बराच वेळ झाला असें पाहून हिडिंब स्वतःच तेथें येतो आणि आपल्या प्रेमवेड्या बहिणीस रागानें मारावयास जातो. परंतु भीम पुढें येऊन त्यास द्वंद्वयुध्दास आव्हान करतो. तेव्हां दोघांचें तुमुल युध्द होऊन भीम त्या राक्षसास ठार मारतो. परंतु त्या गडबडीनें त्याचे भाऊ जागे होतात. भीम हिडिंबेचाहि नाश करावयास पाहातो. इतक्यांत युधिष्ठिर त्यास स्त्रीहत्येपासून परावृत्त

करतो. हिडिंबेच्या प्रार्थनेवरून भीम तिच्याबरोबर एक पुत्र होईपर्यंत राहाण्याचें कबूल करतो. तेव्हां युधिष्ठिर, भीमानें दिवसा त्या राक्षसीणीबरोबर राहावें व सायंकाळीं परत यावें अशी व्यवस्था करतो. नंतर हिडिंबा भीमाला घेऊन अंतरिक्षांतून उडत जाऊन सुंदर अशा एका पर्वतशिखरावर येते व तेथें तीं सुखोपभोग घेत राहातात. हिडिंबेला घटोत्कच नांवाचा पुत्र होतो. तोहि एक बलवान् राक्षस असून पांडवांनां भारतीयुध्दामध्यें बरेंच साहाय्य करतो.

**बकासुर आणि ब्राह्मणकुटुंब**—पांडव तापसांच्या वेषांत निरनिराळ्या अरण्यांतून अनेक प्रकारचीं साहसें अनुभवीत फिरतां फिरतां एकचक्रा नांवाच्या नगरांत आले आणि तेथें एका ब्राह्मणाच्या घरीं राहिले. दिवसा ते भिक्षा मागून आणून कुंतीच्या स्वाधीन करीत व ती सायंकाळीं त्याचे दोन भाग करून एक भीमास देई आणि बाकीचा सर्व मिळून खात. एका दिवशीं भीम व कुंती एकटींच घरीं असतांना तीं ज्या ब्राह्मणाच्या घरी राहात होतीं त्याच्या घरांतून मोठ्यानें शोक व आक्रोश चाललेला त्यांस ऐकूं आला. प्रथम त्यांस ब्राह्मणाचें शोकाकुल भाषण ऐकूं आलें; त्यांत त्यानें, मनुष्य जातीच्या एकंदर दुःखमय जीवितासंबंधीं शोकाचे उद्गार काढून असें म्हटलें, "माझा सर्व कुटुंबासह नाश झाला तर फार चांगलें, कारण मला आपली बायको, मुलगी किंवा लहान मुलगा यांचा नाश झालेला डोळ्यानें पाहावत नाहीं व मी स्वतः एकटाच मेलों असतां माझ्या कुटुंबाचे अतिशय हाल होतील ही गोष्टहि स्पष्टच आहे." नंतर त्याच्या बायकोनें भाषण केलें "मुलांचें पोषण करून वंश जिवंत ठेवण्याकरितां आपण जगणें अवश्य आहे. मी आपणांस एक पुत्र व एक कन्या देऊन आपल्या आयुष्यांतील कर्तव्य पूर्ण केलें असल्यामुळें मला सुखानें मरण्यास हरकत नाहीं. माझ्याऐवजीं आपण मेला असतां माझ्या एकटीच्यानें मुलांचें पोषण होणें शक्यच नाहीं. मी दुष्टांच्या हातून मुलीचें रक्षण करण्यास अगर मुलास ब्राह्मणाला योग्य असें शिक्षण देण्यास असमर्थच आहे उलट आपणांस दुसरें लग्न करतां येण्यासारखें आहे. पण मी विधवा झाल्यास आमचें आयुष्य अतिशय दुःखांत जाणार. कारण ज्याप्रमाणें एखाद्या फेंकून दिलेल्या मांसाच्या तुकड्यावर अधाशी पक्ष्यांची धाड येते त्याप्रमाणें अभर्तृक स्त्रीवर पुरुष अत्याचार करतात. तेव्हां मीच आपला जीव देणें युक्त आहे." मुलीनें आईबापांचें भाषण ऐकून कुटुंबाकरितां माझेंच मरण जास्त योग्य होय अशा अर्थीं भाषण केलें. ती म्हणाली, "पुत्र हा स्वतःसारखा असून बायको ही मित्रासारखी असते, परंतु कन्या ही केवळ दुःखमय आहे असें म्हणतात. त्याअर्थी या दुःखाचा त्याग करा व मला मरण्याचें माझें कर्तव्य करूं द्या." याप्रमाणें या तिघांचें संभाषण होत असतां व तीं एकीकडे शोक करीत असतां ब्राह्मणाचा लहान मुलगा प्रत्येकाजवळ जाऊन व हास्य करून कोमल आवाजांत म्हणे कीं, "बाबा रडूं नका; आई रडूं नको; ताई, रडूं नको" तसेंच जमिनीवरील एक गवताची काडी हातांत घेऊन "हिनें मी राक्षसास ठार करीन" असेंहि तो भाषण करी, आणि याप्रमाणें त्याचें गोड भाषण ऐकतांच त्यांचीं शोकपूर्ण हृदयें आनंदानें भरून येत. इतक्यांत पांडवांची आई कुंती आंत येऊन त्यांनां त्यांच्या दुःखाचें कारण विचारूं लागली. तेव्हां तिला सांगण्यांत आलें कीं, त्या शहराच्या जवळ एक बकासुर नांवाचा राक्षस राहात असून त्याला त्या गांवांतून नियमित वेळीं एक गाडाभर भात, दोन रेडे आणि एक मनुष्य करादाखल द्यावा लागत असे. ही पाळी क्रमानें सर्व कुटुंबांवर येत असे. आणि सध्यां त्या कुटुंबावर ती पाळी आली होती. कुंतीनें त्या ब्राह्मणाचें शांतवन करून आपल्या पांच मुलांतील एक मुलगा आपण कर म्हणून देऊं असें सांगितलें. परंतु ब्राह्मणाला आपल्या येथील पाहुण्या ब्राह्मणानें आपल्याकरितां जीव द्यावा ही गोष्ट पसंत पडेना. तेव्हां कुंतीनें आपला मुलगा एक वीर पुरुष असून तो त्या राक्षसास खात्रीनें मारील; परंतु ही सर्व गोष्ट गुप्त ठेवली पाहिजे असें सांगितलें. भीम आपल्या आईच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यास ताबडतोब तयार झाला आणि दुसऱ्या दिवशीं तो राक्षसाकरितां न्यावयाचा अन्नाचा गाडा हांकीत अरण्यांत घेऊन गेला. अरण्यांत गेल्याबरोबर त्यानें त्या अन्नावर ताव मारण्यास सुरवात केली, आणि राक्षस मोठ्या आवेशानें आला तरी तो मुळींच डगमगला नाहीं. त्या राक्षसानें रागाऊन त्याच्या पाठीवर गुद्दे मारण्यास सुरवात केली. तरीहि भीमानें खाण्याचें काम तसेंच चालू ठेविलें. सर्व अन्न खाऊन झाल्यानंतर भीम द्वंद्वयुद्धास तयार झाला. त्या दोघांनीं मोठमोठीं झाडें उपटून एकमेकांवर फेंकण्यास सुरवात केली. नंतर त्यांचें दारुण युध्द होऊन भीमानें त्या राक्षसास आपल्या ढोपरावर धरून मोडून त्याचे दोन तुकडे

केले. नंतर राहिलेले बकासुराचे नातेवाईक व इतर प्रजानन राक्षस यांजकडून यापुढें आपण मनुष्य मारणार नाहीं असें वचन घेऊन भीम परत आला. तेव्हां शहरांत मोठा आनंद झाला. परंतु पांडव गुप्तच राहिले.

**द्रौपदीचें स्वयंवर व विवाह**—कांहीं दिवसांनीं पांडवांनीं एकचक्रा नगरी सोडून पांचाल देशाकडे जाण्याचें ठरविलें. वाटेंत त्यांनां पांचालांचा राजा द्रुपद आपल्या मुलीचें स्वयंवर करणार आहे अशी बातमी लागली. त्या बंधूंनीं स्वयंवरास जाण्याचें ठरवून द्रुपदाच्या राजधानीमध्यें ते एका कुंभाराच्या घरीं ब्राह्मण वेषानें भिक्षा मागून राहूं लागले. द्रुपदानें एक फार कठिण असें धनुष्य तयार केलें होतें आणि आकाशांत उंचावर यंत्ररचना करून एक लक्ष्य बसविलें होतें आणि जो वीरपुरुष तें धनुष्य सज्ज करून त्या लक्ष्याचा भेद करील त्यास आपली मुलगी कृष्णा ही देण्याचें त्यानें प्रसिद्ध केलें होतें. द्रुपदाच्या आमंत्रणावरून अनेक देशांचे राजे, कर्ण, दुर्योधनादि कौरव वगैरे स्वयंवराच्या सुशोभित मंडपांत जमा झाले होते. तसेंच प्रेक्षक म्हणून पुष्कळ ब्राह्मणहि आले होते. त्यांतच पांच पांडव होते. अनेक दिवसपर्यंत हा समारंभ चालू असून सर्व राजे व ब्राह्मण यांचें द्रुपदानें मोठ्या थाटानें आतिथ्य चालविलें होतें. अखेरीस सोळाव्या दिवशीं आपल्या सख्यांसह रूपवती कृष्णा सुंदर वस्त्रभूषणांनीं सुशोभित अशी सभामंडपांत प्राप्त होते, व तिचा भाऊ धृष्टद्युम्न पुढीलप्रमाणें मोठ्या आवाजांत जाहीर करतो:—"जमलेले राजे लोकहो, हें धनुष्य आणि तें उंचावर लावलेलें लक्ष्य यांकडे पाहा. या फिरत असलेल्या सच्छिद्र चक्रांतून पांच बाण मारून जो सत्कुलोत्पन्न वीर त्या लक्ष्याचा वेध करील त्याला ही द्रुपदाची कन्या माळ घालील." यानंतर तो आपल्या बहिणीला दुर्योधनादि सर्व राजांचीं नांवें सांगतो. सर्व राजे त्या सुंदर कृष्णेचें रूप पाहून मोहित होतात, व एकमेकांचा मत्सर करूं लागतात व प्रत्येकजण तिला मिळविण्याची इच्छा करतो. एका मागून एक राजे तें धनुष्य वांकविण्याचा प्रयत्न करतात परंतु कोणालाच यश येत नाहीं. नंतर कर्ण पुढें येऊन धनुष्याला गुण चढवून लक्ष्यवेध करावयास जातो इतक्यांत 'मी सूताला वरणार नाहीं' असें द्रौपदी मोठ्यानें म्हणते. तेव्हां कर्ण विकट हास्य करून आणि सूर्याकडे दृष्टि फेंकून धनुष्य खालीं ठेवितो. नंतर शिशुपाल, जरासंध शल्य इत्यादि मोठमोठे राजे धनुष्य वांकविण्याचा व्यर्थ प्रयत्न करतात. नंतर ब्राह्मणांमधून अर्जुन पुढें येतो. तेव्हां त्याच्या भव्य आकृतीकडे पाहून कांहीं लोकांस त्याबद्दल आदर वाटतो, तर मोठमोठ्या वीरांच्या आखाड्यांत एका ब्राह्मणानें प्रवेश करण्याचें धार्ष्ट्य दाखविल्याबद्दल कांहींनां राग येतो. अशा स्थितींत अर्जुन पुढें येऊन एका निमिषांत धनुष्यास गुण चढवून लक्ष्यवेध करतो. जेव्हां कृष्णा त्या तेजस्वी तरुणाकडे पाहाते तेव्हां ती त्याला मोठ्या आनंदानें माला समर्पण करते. व अर्जुन तिच्यासह सभागृहांतून बाहेर येतो.

तथापि जेव्हां द्रुपद त्या ब्राह्मणालाच मुलगी देणार असें इतर राजांस आढळून येतें तेव्हां त्यांस हा आपला अपमान झाला असें वाटतें. कारण स्वयंवर हें क्षत्रियांकरतां असून ब्राह्मणांकरितां नाहीं. ते राजे द्रुपदास ठार मारण्याचा प्रयत्न करतात परंतु भीम व अर्जुन त्याच्या मदतीस धांवून जातात. भीम एक मोठें झाड उपटून घेऊन त्याच्या शेजारीं उभा राहातो. तेव्हां तो यमासारखा भयंकर दिसतो. अर्जुनहि आपलें धनुष्य सज्ज करून उभा राहातो. अर्जुनाचें कर्णाशीं व भीमाचें शल्याशीं युद्ध होतें. बऱ्याच निकराच्या युद्धानंतर कर्ण व शल्य आपला पराभव झाल्याचें कबूल करतात. तेव्हां सर्व राजे युद्ध सोडून देऊन आपापल्या घरीं परत जातात. नंतर पांडव कृष्णेसह कुंभाराच्या घरीं जातात. तेथें कुंती त्यांची वाट पाहात असते. नंतर अर्जुन आपली आई व भाऊ यांच्या समक्ष असें विधान करतो कीं, आपण जिंकलेली द्रुपदकन्या कृष्णा इच्याशीं एकटेच लग्न लावणार नसून ती आपल्या परंपरागत कुलाचाराप्रमाणें पांचहि भावांची बायको होईल.

स्वयंवराच्या ठिकाणीं यादवांचा अधिपति कृष्ण हाहि हजर असतो. तो पांडवांचा मामेभाऊ लागत असे. कारण वसुदेव हा कुंतीचा भाऊ होता. त्यानेंच फक्त पांडव गुप्त वेषांत असूनहि त्यांस ओळाखलें होतें. म्हणून तो आपला भाऊ बलराम यासह पांडवांच्या मागोमाग जातो आणि कुंभाराच्या घरीं पांडवांची गांठ घेऊन त्यांस आपलें नातें सांगतो. यामुळें पांडवांस फारच आनंद होतो. परंतु पांडव ओळखले जाऊं नये म्हणून कृष्ण व बलराम हे तेथून लवकरच निघून जातात.

धृष्टद्युम्नहि आपल्या बहिणीस ज्यानें जिंकलें तो वीर कोण हें पाहण्यासाठीं पांडवांच्या मागोमाग जातो. आणि त्या कुंभाराच्या घरांत लपून बसून पांडव

हे घरीं आल्यावरोबर आपल्या आईस कसें आदरानें वंदन करतात, कुंती द्रौपदीला अन्न तयार करून वाढण्याबद्दल कशी माहिती देते आणि सायंकाळचें जेवण झाल्यावर सर्वांत धाकटा भाऊ दर्भ पसरून कसे ठेवतो, त्यांवर सर्व भाऊ आपापल्या मृगचर्मावर कसें शयन करतात व द्रौपदी आणि कुंती या अनुक्रमें त्यांच्या पायथ्याशीं व उशाशीं कशा निजतात आणि झोंपी जाण्यापूर्वी त्या भावांचें युद्धांतील पराक्रमाविषयीं वगैरे कसें संभाषण होतें हें आइून ऐकतो. नंतर धृष्टद्युम्न आपल्या पित्याकडे परत येऊन त्यास सांगतो कीं, त्यांच्या संभाषणावरून ते ब्राह्मण नसून क्षत्रियच असावे. हें ऐकून राजास फार आनंद होतो. दुसऱ्या दिवशीं सकाळीं द्रुपद पांडवांनां आपल्या राजवाड्यांत बोलावतो. कारण द्रौपदीचा आतां मोठ्या थाटानें विवाह करावयाचा असतो. यावेळीं युधिष्ठिर आपण पंडूचे पुत्र असून आम्ही मृत झालों असेंच लोक समजतात असें सांगतो. हें ऐकून द्रुपदास फारच आनंद होतो कारण अर्जुनास जांवई करण्याची त्याची फार दिवसांची इच्छा असते. तो आपल्या मुलीचें लग्न अर्जुनाशीं लावण्याची तयारी करीत आहे तोंच युधिष्ठिर त्यास द्रौपदी ही पांचहि भावांची बायको झाली पाहिजे असें सांगतो. तेव्हां द्रुपदास फार आश्चर्य वाटतें. पांडवांनीं आपल्या कुलांत ही चाल पूर्वापार चालत आली आहे असें सांगून त्याच्या मनांतील किंतु दूर केल्यावर द्रौपदीचें प्रथम युधिष्ठिर हा सर्वांत वडील म्हणून त्याशीं व नंतर इतर सर्व भावांशीं लग्न लागतें. कुंती आपल्या स्नुषेस आशीर्वाद देते आणि कृष्ण आपल्या नूतन विवाहित नातेवाईकांस मोठमोठ्या देणग्या पाठवितो.

**पांडवांस त्यांचें राज्य परत मिळतें**—पांडव हे जिवंत असून द्रौपदीला स्वयंवरांत अर्जुनानें जिंकली ही गोष्ट लवकरच सर्वत्र पसरते. या लग्नामुळें पांडवांनां द्रुपद व त्याचे पांचाल आणि कृष्ण व त्याचे यादव यांचें साहाय्य लाभतें. या गोष्टीमुळें दुर्योधन व त्याच्या मित्रांस फार वाईट वाटतें व ते खिन्न मनानें हस्तिनापुरास परत येतात. पांडवांपासून आपण फार सावधगिरीनें राहिलें पाहिजे असें दुर्योधनाचें मत असून त्यांचा कपटानें घात करावा असें तो सुचवितो. कर्णाचें मत उघड युध्द करावें असें असतें, परंतु भीष्म, विदुर व द्रोण हे पांडवांस अर्धें राज्य देऊन त्याबरोबर सख्य राखण्याचा धृतराष्ट्रास उपदेश करतात. धृतराष्ट्र त्यांचें म्हणणें मान्य करून पांडवांस अर्धें राज्य देतो व त्यांनीं खांडवप्रस्थ नांवाच्या ठिकाणीं राहावें असें ठरतें. युधिष्ठिर ही गोष्ट आनंदानें मान्य करतो व पांडव कृष्णासह खांडवप्रस्थास जातात आणि तेथें इंद्रप्रस्थ (हल्लींची दिल्ली) नांवाचें शहर व किल्ला स्थापन करतात.

**अर्जुनाचें तीर्थाटन व पराक्रम**—इंद्रप्रस्थ येथें पांडव आपल्या स्त्रीबरोबर समाधानानें राहूं लागले. त्यांनीं एकमेकांत मत्सर राहूं नये म्हणून नारदाच्या सल्ल्यानें आपसांत असें ठरविलें होतें कीं, जर एखाद्या भावानें दुसरा भाऊ व द्रौपदी यांच्या एकांताचा भंग केला तर त्यानें एक वर्ष वनवासांत घालवून ब्रह्मचर्याचें पालन करावें. या नियमामुळें ते एकमेकांशीं सलोख्यानें राहिले. एके दिवशीं कांहीं चोरांनीं एका ब्राह्मणाच्या गाई चोरल्यामुळें तो राजवाड्यांत राजाकडून आपल्या प्रजेचें नीट रीतीनें संरक्षण होत नाहीं अशी मोठमोठ्यानें तक्रार करीत धांवत आला. अर्जुनाच्या मनांत तावडतोब त्याच्या मदतीला जावयाचें होतें. परंतु कर्मधर्मसंयोगानें त्याचीं शस्त्रें ज्या खोलींत होतीं त्या खोलींत युधिष्ठिर आणि द्रौपदी हीं एकांतांत होतीं. तेव्हां अर्जुनाला मोठा विचार पडला. आपण आपल्या क्षात्रधर्मास उचित असें वर्तन करून ब्राह्मणाचें संरक्षण करतांना आपल्या स्त्रीसंबंधाचा नियम मोडावा कीं तो नियम पाळून क्षात्रधर्मास अनुचित असें वर्तन करावें. असा त्याजपुढें मोठा विकट प्रश्न होता. अखेरीस त्यानें त्या खोलींत जाऊन शस्त्रें आणावयाचें ठरविलें आणि चोरांचा पाठलाग करून ब्राह्मणाच्या गाई त्यास परत आणून दिल्या. नंतर त्यानें घरीं येऊन युधिष्ठिरास सांगितलें कीं, आपण कराराप्रमाणें बारा महिने गृहत्याग करणार. युधिष्ठिरानें त्याची समजूत करण्याचा प्रयत्न केला, तथापि त्यानें जें योग्य तें कोणत्याहि प्रसंगीं केलेंच पाहिजे असें म्हणून वनवास पत्करला.

या वनवासांत त्यानें अनेक प्रकारचीं साहसें अनुभविलीं. एका प्रसंगीं तो गंगेंत स्नान करून व नंतर पितृतर्पण करून पाण्याच्या बाहेर येण्याच्या बेतांत आहे, इतक्यांत उलूपि नांवाच्या एका नागराजाच्या कन्येनें त्यास नागलोकांत ओढून नेलें. तेथें तिनें त्यास आपलें त्यावर प्रेम बसलें असून आपला स्वीकार करण्याची विनंति केली. अर्जुनानें आपण ब्रह्मचर्यव्रत अंगीकारल्यामुळें आपणास तुझें म्हणणें मान्य करतां येणार नाहीं असें सांगितलें परंतु तिनें त्यास तें व्रत फक्त द्रौपदीसंबंधानेंच

असून तो क्षत्रिय असल्यामुळें आर्तत्राण हा त्याचा धर्म असून त्यानें स्वीकार न केल्यास आपण आत्महत्या करणार व आत्महत्येपासून परावृत्त करणें हा त्याचा धर्म होय असें त्यास सांगितलें. अर्जुनास तिच्या म्हणण्यास उत्तर देतां आलें नाहीं व आपल्या कार्यावर दृष्टि ठेवून त्यानें तिचें म्हणणें मान्य करून तिच्याबरोबर एक रात्र घालविली.

दुसऱ्या एका प्रसंगीं तो मणिपूर येथील चित्रवाहन राजाच्या चित्रांगदा नांवाच्या मुलीच्या प्रेमपाशांत सांपडला. परंतु ती पुत्रिका कन्या असल्यामुळें राजानें तिला जो पुत्र होईल तो आपणास मिळावा या अटीवर तिला अर्जुनास देण्याचें कबूल केलें. अर्जुनानें ती अट मान्य करून तिच्यासह तो मणिपुरांत कांहीं दिवस राहिला. पुढें तिला पुत्र झाल्यावर तो तेथून निघाला.

याप्रमाणें अनेक तीर्थें पाहिल्यावर व अनेक साहसांतून पार पडल्यावर तो द्वारकेस जाऊन कृष्णास भेटला. तेथें त्याचें मोठ्या थाटानें स्वागत झालें. कांहीं दिवसांनंतर रैवतक पर्वतावर यादवांच्या वृष्णि व अंधक या कुलांचा एक मोठा उत्सव होता. सर्व शहरांतील लहान मोठे लोक मोठ्या आनंदानें तेथें जमून नृत्य गीतांत दंग झाले होते. कृष्णाचा भाऊ बलराम हा रेवतीसह मद्यपानांत गुंग होता. वृष्णींचा राजा उग्रसेनहि आपल्या एक हजार बायकांसह तेथें आला होता. तसेंच अनेक राजेहि आपल्या स्त्रियांसह तेथें आले होते. त्यावेळीं अर्जुन, कृष्णाची रूपमती बहीण सुभद्रा हिला पाहून मोहित झाला. तेव्हां अर्जुनानें कृष्णास आपणास तिची प्राप्ति कशी होईल असें विचारलें. तेव्हां कृष्णानें अर्जुनास क्षत्रियाला योग्य असें तिचें हरण करण्यास सांगितलें. कारण स्वयंवर हें पुष्कळदां अनिश्चित असतें. तेव्हां अर्जुनानें युधिष्ठिराची सुभद्रेचें हरण करण्याबद्दल संमति विचारली व ती मिळतांच अर्जुन एका दिवशीं शिकारीच्या निमित्तानें शस्त्रास्त्रांनीं युक्त अशा रथांत बसून निघाला. व सुभद्रा एकटीच रैवतक पर्वतावर सहल करून द्वारकेकडे परत येत असतां तिला आपल्या रथांत घालून इंद्रप्रस्थाकडे निघाला. तेव्हां द्वारकेंत मोठी गडबड उडाली. मद्याच्या धुंदींत असलेला बलराम अर्जुनानें आतिथ्यनीतीचा भंग केल्याबद्दल त्यावर फार संतापला. परंतु कृष्णानें आपल्या आप्तांची लवकरच समजूत केली. त्यानें सांगितलें कीं, अर्जुनानें वास्तविक यांत कांहींच अपराध केला नाहीं. कारण यादव हे शुल्क घेऊन सुभद्रेचा विक्रय करणार नाहींत अशी त्याची खात्री असल्यामुळें स्वयंवरासारख्या अनिश्चित गोष्टींवर विसंबून राहण्यापेक्षां सुभद्रेचें हरण करणें हाच मार्ग त्यास योग्य वाटला. वास्तविक या विवाहास कोणतीच हरकत नव्हती. तेव्हां अर्जुनास परत बोलावून आणून सलोखा करण्यास त्यानें सांगितलें. त्याप्रमाणें घडून येऊन अर्जुन व सुभद्रा यांचा विवाह झाला. नंतर अर्जुन द्वारकेस सुभद्रेसह कांहीं दिवस राहिल्यावर पुष्करादि तीर्थें पाहून इंद्रप्रस्थास परत आला. द्रौपदीनें सुभद्रेबरोबर लग्न लावल्याबद्दल अर्जुनास दोष दिला. परंतु सुभद्रेनें तिची सेवा करण्याचें कबूल केल्यावरून ती शांत झाली. नंतर द्रौपदी, सुभद्रा आणि कुंती हीं सर्व आनंदानें एकत्र राहिलीं. सुभद्रेपासून अर्जुनास अभिमन्यु नांवाचा एक पुत्र झाला. तो आपल्या पित्याचा व चुलत्यांचा फारच आवडता होता, द्रौपदीलाहि प्रत्येक पतीपासून एक एक पुत्र झाला.

**युधिष्ठिर सार्वभौम राजा होतो**—युधिष्ठिरानें फार न्यायानें व नीतीनें राज्य केलें. त्यामुळें त्याची प्रजा त्याच्यावर फार अनुरक्त असून मोठ्या सुखानें व शांततेनें रहात होती. त्याचे भाऊहि मोठ्या आनंदानें आयुष्य क्रमीत होते. तथापि अर्जुनाचें कृष्णाबरोबर विशेष सख्य असे. एके दिवशीं ते दोघे यमुनेच्या तीरावरील राईमध्यें बोलत असतां—व द्रौपदी, सुभद्रा इत्यादि स्त्रियांसह संभाषण करीत असतां—तेथें एका ब्राह्मणाच्या रूपानें अग्नि प्राप्त होतो, आणि त्यास खांडववन जाळण्याची व त्यांनां मदत करण्याची विनंति करतो. अग्नीला अनेक यज्ञांतील हवी भक्षण करून अजीर्ण झालेलें असतें आणि त्यावर उपाय म्हणून खांडववन भक्षण करण्यास त्यास ब्रह्मदेवानें सांगितलेलें असतें. परंतु त्यानें तें वन भक्षण करण्याचा प्रयत्न करतांच तेथील प्राणी अग्नि विझवून त्याचा बेत सिध्दीस जाऊं देत नाहींत. तेव्हां अर्जुन व कृष्ण यांनीं येऊन आपणांस या कामीं मदत करावी अशी तो विनंति करतो. तसेंच अर्जुनास एक दिव्य रथ, गांडीव धनुष्य व अक्षय भाता आणि कृष्णास गदा व दिव्यचक्र अर्पण करतो. या साधनांनीं ते अग्नीला खांडववन भक्षण करण्यास मदत करतात व त्यांतून बाहेर जाण्याचा प्रयत्न करणाऱ्या प्रत्येक प्राण्यास ठार मारतात. फक्त मय नांवाच्या एका राक्षसास, तो कुशल कारागीर असल्यामुळें जाऊं देतात.

आपला जीव वांचविल्याबद्दल मयासुर युधिष्ठिरास एक विलक्षण सभागृह बांधून देतो. त्यांत अनेक चमत्कार केलेले असतात. कांहीं दिवसांनीं कृष्णाच्या संमतीनें युधिष्ठिर राजसूययज्ञ करण्याचा बेत करतो. हा यज्ञ सार्वभौम राजा किंवा एखादा दिग्विजयी राजानेंच करावयाचा असतो. तेव्हां तत्कालीन सर्वांत बलिष्ठ असा मगध देशाचा राजा जरासंध यास नाहींसा करणें जरूर असतें. त्याचा भीम द्वंद्वयुध्दामध्यें नाश करतो. यानंतर अर्जुन, भीम, सहदेव आणि नकुल हे क्रमानें उत्तर, पूर्व, दक्षिण आणि पश्चिम दिशांस दिग्विजय करण्यास निघतात आणि त्यांच्या पराक्रमामुळें युधिष्ठिर सार्वभौम राजा होतो. नंतर मोठ्या थाटानें राजसूय यज्ञ करण्यांत येतो. कौरवांसह अनेक राजांस निमंत्रण जातें. आणि यज्ञसमारंभ आटोपल्यावर सर्वांस बहुमानपूर्वक देणग्या देण्यांत येतात. भीमाच्या सूचनेवरून कृष्णास अग्रपूजेचा मान देण्यांत येतो. परंतु चेदि देशाचा राजा शिशुपाल या गोष्टीस विरोध करतो तेव्हां भांडण होऊन कृष्णाच्या हातून शिशुपालाचा वध होतो.

यज्ञसमारंभ पूर्ण झाल्यावर निरनिराळ्या देशचे राजे परत जातात. कृष्ण सुद्धां द्वारकेस परत जातो. फक्त दुर्योधन व त्याचा मामा शकुनी हे आणखी कांहीं दिवस पांडवांच्या राजवाड्यांत राहतात. तो राजवाडा पाहात असतां दुर्योधनाच्या फार चुका होतात. एका ठिकाणीं स्फटिकाच्या जमिनीस तो पुष्करणी समजतो आणि स्नान करण्याकरितां कपडे काढतो. उलट दुसऱ्या एका ठिकाणीं एका कृत्रिम पुष्करणीस तो जमीन समजून आंत पडतो. तेव्हां भीम व अर्जुन मोठ्यानें हंसतात. या चेष्टेमुळें दुर्योधन फारच चिडतो कारण आधींच त्यास पांडवांबद्दल मत्सर वाटत असतो. याप्रमाणें मत्सर व द्वेष यांनीं भरलेल्या मनानेंच तो पांडवांचा निरोप घेऊन हस्तिनापुरास येतो.

**द्यूत**—दुर्योधन आपली मानहानी मोठ्या दुःखानें शकुनीस सांगतो आणि आपल्या शत्रूंचा असा उत्कर्ष झालेला आपल्याच्यानें पाहावत नसून जर पांडवांचा नाश आपणांकडून झाला नाहीं तर लवकरच आपण आपल्या जीविताचा अग्नि, पाणी किंवा विष यांच्या साहाय्यानें नाश करूं असें सांगतो. तेव्हां शकुनी त्यास असा सल्ला देतो कीं, आपण एक द्यूतसमारंभ घडवून आणावा व त्यास युधिष्ठिरास आमंत्रण द्यावें आणि आपण स्वतः द्यूतांत प्रवीण असल्यामुळें आपणांस युधिष्ठिराचें राज्य द्यूतांमध्यें सहज घेतां येईल. याप्रमाणें बेत ठरवून धृतराष्ट्राची संमति मिळविण्याकरितां लागलीच ते धृतराष्ट्राकडे जातात. प्रथम तो आपण विदुराची सल्ला घेतल्याशिवाय कांहींच बोलत नाहीं असें सांगतो परंतु विदुर हा नेहमीं युधिष्ठिराचीच बाजू घेतो असें दुर्योधनानें त्यास सांगितल्यावर तो वृद्ध राजा त्याचें म्हणणें कबूल करून द्यूतास परवानगी देतो व युधिष्ठिरास आमंत्रण करण्याकरितां प्रत्यक्ष विदुरासच पाठवितो. विदुर धृतराष्ट्रास सावध करतो आणि यापासून पुढें अनर्थ ओढवल्याशिवाय राहाणार नाहींत असें बजावतो. धृतराष्ट्रालाहि त्याबद्दल भीति वाटते परंतु तो पुढील भवितव्याबद्दल नशिबावर हवाला ठेवतो. तेव्हां विदुर युधिष्ठिराकडे जाऊन त्याला द्यूताचें आमंत्रण देतो. युधिष्ठिरहि दैवावर हवाला ठेवून मोठ्या नाखुशीनें त्या आमंत्रणाचा स्वीकार करतो व द्रौपदी व आपले बंधू आणि इतर परिवार यांसह हस्तिनापुरास जाण्यास निघतो. धृतराष्ट्राच्या राजवाड्यामध्यें त्यांचें मोठ्या सत्कारानें व आदरानें स्वागत होतें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं युधिष्ठिर आपल्या बंधूंसह द्यूतागारांत जातो, तेथें दुर्योधनादि कौरव अगोदरच जमलेले असतात. शकुनी युधिष्ठिरास द्यूतास आव्हान करतो आणि युधिष्ठिर कांहीं पण लावतो व हरतो. याप्रमाणें युधिष्ठिर एकामागून एक आपली सर्व संपत्ति, सोनें, जवाहीर, दासदासी, हत्ती, रथ, घोडे सर्व पणास लावतो आणि प्रत्येक वेळीं हरतो. तेव्हां विदुर धृतराष्ट्रास द्यूत बंद करून सर्व कुलाचा नाश करण्यास प्रवृत्त झालेल्या दुर्योधनास आपणापासून वेगळा करण्याचा सल्ला देतो. तेव्हां दुर्योधन विदुराची अत्यंत कटु शब्दांत निर्भर्त्सना करून त्यास राजद्रोही, कौरवांच्या अन्नावर वाढलेला साप इत्यादि दूषणें देऊन तो नेहमीं शत्रुपक्षांत सामील असतो असें म्हणतो. विदुर धृतराष्ट्रास पुन्हां पुन्हां जागा करतो पण व्यर्थ. शकुनि युधिष्ठिरास तिरस्कारानें तुझ्याजवळ आणखी कांहीं पणास लावावयास आहे काय असें विचारतो. यावेळीं युधिष्ठिर द्यूताच्या व्यसनानें पूर्णपणें पछाडला जाऊन आपलें सर्वस्व, बैल, गाई, आपली राजधानी व सर्व राज्य पणास लावतो व हरतो. नंतर राजपुत्र, आपले भाऊ, नकुल आणि सहदेव यांसहि पणास लावतो. सरतेशेवटीं तो स्वतःलाहि पणाला लावतो व हरतो. शकुनी उपहासानें म्हणतो कीं, युधिष्ठिरानें स्वतःला पणास लावण्यांत

मोठासा शहाणपणा केला नाहीं कारण त्याजवळ अर्जुनहि पणाला लावण्याला एक मौल्यवान वस्तू आहे, ती म्हणजे द्रुपदकन्या पांचाली ही होय. आणि युधिष्ठिर द्रौपदीलाहि पणास लावल्याचें जाहीर करतो त्यामुळें भीष्म, द्रोण, कृप, इत्यादि तेथें बसलेल्या सर्व लोकांस अत्यंत आश्चर्य व भीति वाटते. अखेरीस फांसे टाकण्यांत येतात आणि सर्व लोक उत्कंठेनें पाहात असतां शकुनीला आणखी एकदां जय मिळतो.

दुर्योधन मोठ्यानें हास्य करून विदुरास द्रौपदीला दासी म्हणून झाडणें वगैरे काम करण्याकरतां घेऊन येण्यास सांगतो. विदुर त्याला बोध करून त्याच्या वर्तनानें कौरवांचा नाश होईल असें बजावतो आणि सांगतो कीं, द्रौपदी ही दासी होतच नाहीं कारण युधिष्ठिरानें जेव्हां तिला पणास लावली तेव्हां तो स्वतःचाच धनी नव्हता. तेव्हां दुर्योधन द्रौपदीला आणण्याकरितां एका सूतास पाठवितो. द्रौपदी त्या दूतास प्रथम युधिष्ठिरानें स्वतःस हरविलें कीं तिला हरविलें हें विचारण्यास पुन्हां परत पाठविते. दुर्योधन तिला तूं हा प्रश्न स्वतःच सभागृहामध्यें येऊन विचार असा निरोप पाठवितो. जेव्हां ती नाकारते आणि दूतास तसाच परत पाठविते तेव्हां दुर्योधन दुःशासनास तिला बलानें घेऊन येण्यास पाठवितो. दुःशासन अंतःपुरांत जाऊन द्रौपदी धडपड करीत असतां तिचे केंस धरून ओढून घेऊन येतो. ती रजस्वला असल्यामुळें एकच वस्त्र नेसलेली असते ती भीष्म, द्रोण वगैरे कोणीच आपली बाजू घेत नाहींत म्हणून शोक करते आणि मोठ्या निराशेनें पांडवांकडे दृष्टि टाकते. पांडवांनां आपलें द्रव्य व राज्य गेल्याचें मुळींच दुःख वाटत नाहीं परंतु द्रौपदीच्या त्या दृष्टीनें ते लज्जा व क्रोध यांनीं व्यास होतात. भीमाला हा क्रोध न आवरून तो युधिष्ठिराला द्रौपदीस पणास लावल्याबद्दल दोष देतो व मारण्यास धांवतो. परंतु अर्जुन त्याचें निवारण करून युधिष्ठिर हा वडील असल्यामुळें त्यास मान दिला पाहिजे व त्याचें ऐकिलें पाहिजे असें सांगतो. इतक्यांत दुर्योधनाचा सर्वांत धाकटा भाऊ विकर्ण सर्व सभासदांस द्रौपदी रास्तपणें जिंकली गेली आहे काय, असा प्रश्न विचारतो. व सर्व स्तब्ध बसले आहेत असें पाहून द्रौपदी जिंकिली गेली नाहीं असें जाहीर करतो. तथापि कर्ण म्हणतो कीं, ज्या अर्थी कौरवांनीं पांडवांचें सर्वस्व जिंकलें आहे त्या अर्थी पांडवांची स्त्री द्रौपदी हीहि कौरवांची झाली आणि ज्याअर्थी द्यूतांत त्यांचीं वस्त्रेंहि जिंकिलीं गेलीं त्याअर्थीं तींहि हिरावून घेतलीं पाहिजे असें म्हणतो. पांडव आपलीं उत्तरीय वस्त्रें काढून ठेवतात व दुःशासन कर्णानें खूण केल्यावरून द्रौपदीचें वस्त्र हिसकून घेण्यास जातो. इतक्यांत ती विष्णूचा अवतार जो श्रीकृष्ण त्याची प्रार्थना करते. व त्याच्या कृपेनें दुःशासनानें तिचीं कितीहि वस्त्रें फेडलीं तरी ती सवस्त्रच रहाते. परंतु भीम पुढें दिल्याप्रमाणें प्रतिज्ञा करतो. "सर्व जगतांतील वीरहो, माझी प्रतिज्ञा ऐका. अशी प्रतिज्ञा आजपर्यंत कोणत्याहि मनुष्यानें केली नसेल व पुढेंहि कोणी करणार नाहीं. जर मी या दुष्ट व मूर्ख भरतापसदाची छाती फोडून त्यांतील रक्त प्राशन करून ही आपली प्रतिज्ञा पूर्ण केली नाहीं तर माझ्या पूर्वजांमध्यें मला स्थान मिळू नये."

ही प्रतिज्ञा ऐकून तेथें जमलेल्या सर्व योद्ध्यांस व वीरांस भयानें धडकी भरते. तेथें हजर असलेल्या सर्व लोकांस कौरवांनीं द्रौपदीस जिंकलें किंवा नाहीं हा धर्मशास्त्राचा प्रश्न सोडविण्याची विनंति विदुर करतो. पण व्यर्थ. द्रौपदी आपल्या प्रश्नाचें उत्तर देण्यास आपल्या सर्व आप्तांस दुःखित अंतःकरणानें विनंति करते, परंतु व्यर्थ. प्रत्यक्ष नीतिमान असा भीष्महि "धर्मशास्त्रप्रवीण असूनहि न्याय ही अनिश्चित वस्तु असून 'बळी तो कान पिळी' अशीच या जगांत रीति आहे, युधिष्ठिर मूर्तिमंत धर्मच असल्यामुळें त्यानेंच या गोष्टीचा निवाडा करावा," असें उत्तर देतो. दुर्योधन सुद्धां तिरस्कारानें द्रौपदी जिंकली आहे कीं नाहीं यावर त्याचें मत विचारतो व जेव्हां तो तिकडे दुर्लक्ष करून स्तब्ध राहतो तेव्हां तो पांडवांचा, द्रौपदीच्या समोर आपली डावी मांडी उघडी करून अश्रुतपूर्व असा अपमान करतो. तेव्हां भीम 'मी जर ही तुझी मांडी युध्दांत चूर्ण करणार नाहीं तर मला माझ्या पितरांत स्थान मिळणार नाहीं' असे भयंकर शब्द उच्चारतो.

याप्रमाणें आणखी कांहीं भाषणें होत असतां धृतराष्ट्राच्या प्रासादामध्यें कोल्ह्याचें ओरडणें व इतर अपशकून होतात. यामुळें वृध्द धृतराष्ट्रास भीति वाटून त्याला मध्यें पडावें असें वाटतें. तो दुर्योधनाची पुष्कळच निर्भर्त्सना करतो. आणि द्रौपदीचें शांतवन करून तिला कांहीं वर मागण्यास सांगतो. ती युधिष्ठिरास स्वतंत्र करण्यास सांगते आणि दुसरा वर दिल्यावर इतर पांडवांची मुक्तता करण्यास सांगते. तिला तिसरा

वर मागण्यास सांगितलें असतां पांडव स्वतंत्र झाल्याबरोबर त्यांनां पाहिजे त्या गोष्टी मिळविण्यास ते समर्थ असल्यामुळें आणखी कांहीं अपेक्षा नाहीं असें ती उत्तर देते. त्यावेळीं दुर्योधन, द्रौपदीमुळें पांडवांनीं आपलें संकटापासून रक्षण केलें म्हणून उपहास करतो. तेव्हां भीमास अतिशय राग येऊन कौरवांस तेथल्या तेथें ठार करावें कीं काय असें त्यास वाटतें. परंतु अर्जुन त्यास शांत करतो. व युधिष्ठिरहि युध्द करण्यास मना करतो. धृतराष्ट्रहि युधिष्ठिरास त्याचें सर्व राज्य परत देऊन झाल्या गोष्टी विसरून जाण्यास सांगतो. याप्रमाणें पांडव शांत मनानें इंद्रप्रस्थास परत जाण्यास निघतात.

**पुन्हां द्यूतकर्म आणि पांडवांचा वनवास**—पांडव हस्तिनापुरांतून निघून गेले नाहींत तोंच दुर्योधन, दुःशासन आणि शकुनी पुन्हां धृतराष्ट्राजवळ जमतात, आणि त्याला पांडवांचा अशा रीतीनें अपमान झाल्यानंतर त्यांस मोकळें सोडल्यापासून किती भय आहे तें समजावून सांगतात. आणि त्याची पुन्हां द्यूत खेळण्यास संमति मिळवितात. यावेळीं जो हरेल त्यानें बारा वर्षें वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास पतकरावा व अज्ञातवासांत ओळखूं आल्यास पुन्हां बारा वर्षें वनवासांत घालवावीं असा पण लावतात. धृतराष्ट्राची राणी गांधारी कौरवकुलाचा नाश टाळण्याकरितां दुर्योधनास टाकून द्यावें असा त्यास सल्ला देते व त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न करते, परंतु त्यास भुरळ पडून तो आपली संमति देतो. नंतर पांडव वाटेंतच असतांना त्यांस परत बोलावण्याकरितां दूत पाठविण्यांत येतात. युधिष्ठिर पुन्हां दैवाच्या फेऱ्यांत सांपडून द्यूताचें आमंत्रण स्वीकारतो. ते सर्व पुन्हां परत येऊन द्यूतास पुन्हां आरंभ होतो व युधिष्ठर पुन्हां हरतो व त्यांस तेरा वर्षें वनवासास जावें लागतें.

**पांडव मृगचर्में धारण करून वनवासास जाण्यास निघतात**—दुर्योधन आणि दुःशासन यांस आपल्या विजयामुळें आनंद होऊन ते त्यांचा उपहास करतात. पण भीम त्यांस फार कठोर भाषणें करतो. ज्याप्रमाणें दुर्योधन आमचीं अंतःकरणें शब्दांनीं विध्द करीत आहे त्याप्रमाणें मी त्याचें हृदय युध्दामध्यें विध्द करीन आणि दुःशासनाचें रक्त प्राशन करीन अशी तो पुन्हां प्रतिज्ञा करतो. अर्जुन कर्णाला ठार मारण्याची, सहदेव शकुनीला मारण्याची व नकुल धृतराष्ट्राच्या इतर सर्व पुत्रांस मारण्याची प्रतिज्ञा करतो परंतु युधिष्ठिर, धृतराष्ट्र, भीष्म, आणि इतर कौरव यांचा व शहाण्या विदुराचा मोठ्या प्रेमानें निरोप घेतो. कुंती विदुराच्या घरीं राहाते परंतु द्रौपदी पांडवांबरोबर वनवासास जाते. आणि मोठ्या दुःखानें आपल्या सासूचा निरोप घेते. कुंती अश्रुपूर्ण नयनांनीं वनवासास निघालेल्या आपल्या पुत्रांचा निरोप घेते. पण युधिष्ठिराखेरीज ते सर्व कौरवांचा चवदाव्या वर्षीं सूड घेण्याचा निश्चय करतात. त्यावेळीं अपशकून होतात. आणि नारदाच्या तोंडून धृतराष्ट्राला त्याच्या कुलाचा नाश होणार हें भविष्य कळतें आणि आपण द्यूतास व वनवासास विनाकारण संमति दिली असा त्यास पश्चात्ताप होतो.

**पांडवांचा बारा वर्षांचा वनवास**—हस्तिनापुरांतील अनेक रहिवासी पांडवांबरोबर वनवासास जातात आणि युधिष्ठिर मोठ्या मुष्किलीनें त्यांस परत घराकडे पाठवितो, कांहीं ब्राह्मण त्याच्याबरोबर पुष्कळ दिवस राहातात, त्यांस भोजन घालतां यावें म्हणून युधिष्ठिर सूर्याची तपश्चर्या करतो व त्यापासून त्यास इच्छा केली असतां अन्न देणारी थाळी मिळते. तिच्या साहाय्यानें तो ब्राह्मणांस भोजन घालतो आणि त्यांसह उत्तरेकडे काम्यक वनांत जातो. या अरण्यांत राहाणाऱ्या किर्मीर नांवाच्या राक्षसास भीम ठार मारतो. हा बकासुराचा भाऊ असून हिडिंबाचा मित्र होता.

इकडे धृतराष्ट्र विदुराबरोबर सल्लामसलत करतो. तो त्यास पांडवांस वनवासाहून परत बोलावून संधि करण्यास सांगतो. तेव्हां धृतराष्ट्र विदुर हा नेहमीं पांडवांचा पक्ष घेतो म्हणून त्याजवर रागाऊन त्यास वाटेल तिकडे निघून जाण्यास सांगतो. विदुर काम्यक वनांत पांडवांकडे जाऊन त्यांस सर्व हकीगत सांगतो. धृतराष्ट्रास विदुरास बोलल्याबद्दलचा पश्चात्ताप होऊन तो संजय या आपल्या सूतास विदुरास परत बोलावून आणण्यास पाठवितो. त्याप्रमाणें विदुर परत येऊन त्या दोघां भावांत सख्य होतें.

पांडवांचे मित्र व आप्त यांस जेव्हां त्यांच्या वनवासाची हकीकत समजते तेव्हां ते त्यांस भेटण्याकरितां अरण्यांत येतात. प्रथम अर्थात् कृष्ण येतो. द्यूताच्यावेळीं तो एका युध्दांत गुंतला असल्यामुळें त्यास पांडवांस साहाय्य करतां येत नाहीं. तो हजर असता तर खात्रीनें त्यानें द्यूत बंद केलें असतें. परंतु कृष्ण जेव्हां दुर्योधनाशीं युद्ध करून पांडवांस पुन्हां राज्यावर

बसविण्याची सूचना करतो तेव्हां युधिष्ठिर त्याच्या म्हणण्यास रुकार देत नाहीं. तथापि द्रौपदी कौरवांनीं केलेल्या अपमानाबद्दल फार शोक करते. पुढें द्रौपदी व भीम युधिष्ठिरास धैर्य धरून आपल्या सामर्थ्यानें राज्य परत मिळविण्यास पुन्हां पुन्हां सांगतात. परंतु युधिष्ठिर आपण बारा वर्षे वनवासांत घालविण्याचें दिलेलें वचन पूर्ण करणार असें सांगतो. भीम त्यास अपौरुषत्वाचें दूषण लावतो आणि वनवासाचे पूर्ण झालेले तेरा महिने तेरा वर्षांप्रमाणें धरावे किंवा वचनभंगाबद्दल एखादा यज्ञ करून प्रायश्चित्त घ्यावें असें सुचवितो. तेव्हां युधिष्ठिर दुर्योधनाच्या बाजूसहि भीष्म, द्रोण, कृप, कर्ण इत्यादि योद्धे असल्याची अडचण पुढें मांडतो. इतक्यांत तेथें व्यास ऋषि येऊन अर्जुनाला कौरवांस जिंकण्याकरितां दिव्य अस्त्रें मिळविण्यासंबंधींचे मंत्र सांगतत. तेव्हां युधिष्ठिर लवकरच अर्जुनाला अस्त्रप्राप्ति होण्याकरितां इंद्राकडे पाठवितो. अर्जुन हिमालयामध्यें फिरत असतां त्यास यतिवेषांत इंद्र भेटतो आणि त्यास अस्त्रें मिळविण्याकरितां प्रथम शिवास प्रसन्न करून घेण्यास सांगतो. नंतर अर्जुन तीव्र तपश्चर्या करतो तेव्हां शिव किराताच्या वेषानें तेथें येतो. त्या वेषधारी किराताबरोबर अर्जुनाचें तुमुल युद्ध होऊन अखेरीस शिव प्रगट होऊन त्यास अमोघ अशीं अस्त्रें देतो. यम, वरुण, कुबेर इत्यादि दिक्पालहि प्रगट होऊन आपापलीं अस्त्रें त्यास देतात. नंतर इंद्राचा सारथी मातली तेथें येऊन त्यास इंद्राकडे घेऊन जातो. तेथेंहि त्यास अनेक शस्त्रास्त्रांची प्राप्ति होते. तो इंद्रलोकांत पांच वर्षे मोठ्या सुखानें राहातो आणि इंद्राच्या आज्ञेनें एक गंधर्व त्यास नृत्य आणि गीत या कला शिकवतो.

इकडे पांडव अरण्यामध्यें राहून शिकार वगैरे करून त्या शिकारीवर व कंदमुळांवर आपली उपजीविका करतात. अर्जुन इतके दिवस दूर राहिल्यामुळें त्यांस त्याच्याबद्दल काळजी वाटूं लागते व इंद्रलोकांतून आलेल्या लोमश ऋषीनें तो तेथें सुखानें राहात आहे असें सांगितलें असतांहि ते त्याच्या शोधार्थ निघतात. ते गंधमादन पर्वतावर फिरत असतां एक मोठें विजा व मेघांचा गडगडाट यांनीं युक्त असें वादळ होऊन त्यांस भीति वाटते व द्रौपदी श्रमानें आणि भीतीनें मूर्च्छित होते. तेव्हां भीम आपल्या हिडिंबेपासून झालेल्या घटोत्कच नांवाच्या पुत्राचें स्मरण करतो व तो तत्काल प्रगट होऊन द्रौपदीला आपल्या पाठीवर घेतो आणि इतर राक्षसांस बोलावून पांडवांस पाठीवर घेऊन गंगेच्या तीरावर कैलास पर्वतावर असलेल्या एका आश्रमाजवळ आणतो. तेथें तीं एका बदरीवृक्षाखालीं राहातात.

द्रौपदीला दिव्य कमलांची इच्छा होते व ती पूर्ण करण्याकरितां भीम अरण्यांतून जातो. वाटेंत तो अनेक श्वापदांचा संहार करतो. एक हत्ती उचलून दुसऱ्या हत्तीवर टाकून तो त्यास ठार मारतो किंवा, एका सिंहाकडून दुसऱ्या सिंहास ठार करतो किंवा आपल्या एका बुक्कीनेंच त्यास ठार करतो. तेथें त्यास हनुमंताची भेट होते आणि तो त्यास यापुढें फक्त अमरलोकच जातात असें सांगून पुढें जाण्याची बंदि करतो. परंतु भीम त्यास आपण कोण आहोंत हें सांगून रस्त्यांतून दूर होण्यास सांगतो. परंतु तो आजाऱ्याचें मिष करून दूर न होतां त्यास आपली शेंपूट उचलून टाकून वाट करून घेण्यास सांगतो. भीम त्याची शेंपूट उचलण्याचा प्रयत्न करतो परंतु त्याच्यानें ती उचलत नाहीं. अखेरीस आपण रामायणांत प्रसिद्ध असलेले हनुमान आहों असें तो त्यास सांगतो. तेव्हां दोघेहि वायुपुत्र असल्यामुळें भीमास आपला भाऊ भेटल्याबद्दल फार आनंद होतो व त्यांचें बरेंच संभाषण होतें. अखेरीस हनुमान त्याला कुबेराच्या बागेचा रस्ता दाखवितो परंतु तेथील फुलें तोडूं नको असें बजावतो. नंतर ते एकमेकांचा निरोप घेतात. भीम लवकरच दिव्य कमलें असलेल्या कुबेराच्या बागेंतील पुष्करणीजवळ येतो. तेथें राक्षस आडवे येऊन त्यास कुबेराच्या परवानगीशिवाय फुलें तोडण्यास मनाई करतात. भीम त्यांस वीर पुरुष कधीं परवानगी विचारीत नसून आपणांस पाहिजे ती वस्तू तशीच घेतात असें उत्तर देतो. तो राक्षसांबरोबर युद्ध करून त्यांस पळवून लावतो आणि फुलें तोडतो.

याप्रमाणें अनेक साहसांतून व राक्षसांशीं युद्धें करून ते काळ घालवीत असतां पांच वर्षे होतात तों अर्जुन इंद्रलोकांतून परत यावयास निघतो. त्याला भेटण्याकरितां ते सर्व बंधू कैलासपर्वतावर येतात. भीमाचें कुबेराच्या बागेचे रक्षक यक्ष आणि राक्षस यांबरोबर पुन्हां युद्ध होतें आणि तो अनेकांस ठार मारतो. त्यामध्यें एक मणिमत् नांवाचा असून तो एकदां अगस्ति ऋषीच्या डोक्यावर थुंकल्यामुळें कुबेरास शाप मिळाला होता. भीमानें त्यास मारल्यामुळें कुबेराची शापापासून मुक्तता होते आणि त्यामुळें भीमानें त्या राक्षसास मारल्याबद्दल त्यास राग न येतां उलट तो भीम आणि त्याचे बंधू यांचें मोठ्या आनंदानें स्वागत करतो.

त्या पर्वतावर त्यांची इंद्राच्या रथांत बसून येत असलेल्या अर्जुनाशीं भेट होते. परस्परांचें कुशल विचारून झाल्यावर अर्जुन त्यास आपण समुद्रावर राहाणाऱ्या निवातकवच राक्षसाशीं व आकाशांतून गमन करणाऱ्या हिरण्यपुरांतील लोकांशीं केलेल्या युध्दाची हकीकत सांगतो.

याप्रमाणें पांडव कुबेराच्या उपवनांत सुखानें चार वर्षें एका रात्रीप्रमाणें व्यतीत करतात. पृथ्वीवरील आपल्या सुखदुःखांचा व पुढील युध्दाचा विसर पडूं नये म्हणून ते स्वर्गांतून परत येण्याचा निश्चय करतात व कैलास पर्वतावरून उतरून यमुनेच्या तीरावरील अरण्यांत येतात.

येथें भीमावर एक संकट येतें व त्यांतून युधिष्ठिर त्याचा बचाव करतो. तो अरण्यांत फिरत असतां एक अजगर त्याच्या अंगाभोंवतीं इतक्या त्वेषानें विळखा घालतो कीं, त्यास त्यांतून आपली सुटका करून घेतां येत नाहीं. अशा स्थितींत युधिष्ठिराच्या नजरेस आपला भाऊ पडतो. तो अजगर दुसरा कोणी नसून अगस्तीच्या शापानें स्वर्गांतून च्युत होऊन सर्परूप झालेला प्राचीन नहुष राजा असतो. त्याची त्यानें विचारलेल्या सर्व तात्त्विक प्रश्नांचीं उत्तरें देणारा मनुष्य मिळाल्याशिवाय त्या शापांतून सुटका व्हावयाची नसते. युधिष्ठिर त्याच्या सर्व प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें देतो तेव्हां तो भीमास सोडून देतो आणि आपलें पूर्व रूप धारण करून स्वर्गास निघून जातो.

यानंतर लवकरच ते काम्यक वनांत येतात. तेथें कृष्ण त्यांची भेट घेतो आणि द्रौपदीला तिच्या मुलांची वार्ता सांगून युधिष्ठिरास कौरवांशीं होणाऱ्या युध्दाकरितां आपल्या पक्षाचे राजे नक्की करण्यास व इतर युध्दाची तयारी करण्यास सांगतो. परंतु युधिष्ठिर नेहमींप्रमाणेंच आापल्या वचनास चिकटून राहून तेरा वर्षें पुरीं झाल्याखेरीज आपण युध्दाचा विचार करणार नाहीं असें सांगतो.

पांडवांनां भेटण्याकरितां अरण्यामध्यें अनेक तपोनिष्ठ ब्राह्मण येत असत. यांपैकीं एक ब्राह्मण धृतराष्ट्राच्या दरबारीं जाऊन पांडवांनां विशेषतः द्रौपदीला अरण्यामध्यें किती त्रास होत होता याचें वर्णन करतो, तें ऐकून धृतराष्ट्रास फार वाईट वाटतें व पश्चात्ताप होतो. परंतु दुर्योधनास फार आनंद होऊन कर्ण व शकुनी यांच्या चिथावणीवरून तो अरण्यामध्यें त्यांच्या दुःखाकडे पाहून आनंद मानण्याच्या हेतूनें त्यांची भेट घेण्याचा विचार करतो. तेथें जाण्यास निमित्त म्हणून ते धृतराष्ट्रास, अरण्यांतील आपल्या गोशाळेस भेट देऊन तेथील कळप पाहून गुरांची मोजणी करून वांसरांवर खुणा करून यावयाचें आहे असें सांगतात. परंतु ते पांडव असलेल्या स्थलाकडे जात असतां वाटेंत त्यांस गंधर्व अडवतात तेव्हां युद्ध होऊन गंधर्वांचा राजा दुर्योधनास जिंकून कैदेंत टाकतो. तेव्हां कौरव पांडवांजवळ मदतीची याचना करतात व युधिष्ठिरहि ती नाकारीत नाहीं. नंतर मोठें तुमुल युद्ध होऊन गंधर्व राजाच्या कैदेंतून पांडव दुर्योधनाची सुटका करतात. तेव्हां अपमान आणि लज्जा यांनीं दुःखित होऊन दुर्योधन आपले प्राण द्यावयास तयार होतो. परंतु त्याचे मित्र त्याला या बेतापासून मोठ्या प्रयासानें परावृत्त करतात.

यानंतर कर्ण पांडवांचा अपमान करण्याची एक नवीनच युक्ति शोधून काढतो. तो दुर्योधनास राजसूय यज्ञ करतां यावा म्हणून सर्व पृथ्वीचा दिग्विजय करण्यास निघतो. दिग्विजयाहून परत आल्यावर एक यज्ञ करण्यांत येतो परंतु एकाच कुलामध्यें राजसूय यज्ञ फक्त एकदांच करावयाचा असल्यामुळें राजसूयाच्या ऐवजीं वैष्णव याग करण्यांत येतो. हा याग यापूर्वी फक्त विष्णूनेंच केला होता अशी समजूत होती. पांडवांचा उपमर्द करण्यासाठीं दुर्योधन या यागास त्यांस बोलावतो. युधिष्ठिर सभ्यतेनें हें आमंत्रण नाकारतो परंतु भीम त्या दूताबरोबर असा निरोप पाठवितो कीं, "तेरा वर्षें पूर्ण झाल्यावर रणयज्ञामध्यें पांडव कौरवरूपी घृताची आहुति देतील." वनवासांतील शेवटच्या वर्षामध्यें पांडवांवर एक मोठें संकट येतें. एके दिवशीं सर्व बंधू शिकारीस बाहेर गेले असतां व द्रौपदी एकटीच घरीं असतां तिला सिंधु देशाचा राजा जयद्रथ हा त्या मार्गानें जात असतां पळवून नेतो. लागलीच पांडव त्याच्या पाठोपाठ जाऊन त्याचा पराभव करतात आणि भीम व अर्जुन त्याला शिक्षा करतात. भीम त्याला ठारच मारणार होता परंतु तो धृतराष्ट्राचा जांवई असल्यामुळें युधिष्ठिर त्यास जिवंत सोडतो.

द्रौपदीचें हरण झाल्यामुळें पांडव फार दुःखित होतात. जरी जयद्रथाला शिक्षा करण्यांत आली तरी पांडवांस हा मोठा कमीपणा वाटतो. विशेषतः युधिष्ठिर वारंवार दुःखित होऊन या सर्व अनर्थाचें कारण आपणच असल्याबद्दल स्वतःस दोष देतो. विशेषतः त्यास द्रौपदीस होणाऱ्या जाचामुळें फार दुःख होतें. युधिष्ठिराला

कर्णाइतकें दुसऱ्या कोणत्याच कौरवाबद्दल भय वाटत नव्हतें, कारण कर्णास उपजतांच कवच व कुंडलें असल्यामुळें तो अभेद्य होता. युधिष्ठिराची कर्णाबद्दलची भीति घालविण्यासाठीं इंद्र ब्राह्मणरूपानें कर्णाकडे येऊन कवचकुंडलांचीं भिक्षा मागतो. कर्णानें कोणतीच गोष्ट ब्राह्मणाला नाहीं म्हटलेली नसल्यानें तो आपल्या अंगावरील कवचकुंडलें डोळ्याचें पातें न लववितां काढून देतो. तेव्हां इंद्र त्यास उलट एक शक्ति देतो मात्र ती अतिशय कठिण प्रसंगीं व फक्त एकाच शत्रूच्याविरुद्ध उपयोगांत आणावयाची असते.

द्रौपदीहरणामुळें विषण्ण चित्त झालेले पांडव काम्यक वन सोडून द्वैतवनांत जातात. तेथें त्यांच्यावर अखेरचें एक संकट येतें. एक मृग रानांत फिरत असतां एका ब्राह्मणाच्या अरणी त्याच्या शिंगांत अडकून त्यांसह तो पळून जातो. ब्राह्मणास अग्निमंथनाकरितां त्यांची जरूरी असल्यामुळें तो पांडवांकडे येऊन त्यांस त्या परत आणून देण्यास सांगतो. ते मृगाचा पाठलाग करतात. परंतु तो त्यांच्या आटोक्यांत न येतां दृष्टीआड होतो. तेव्हां ते आपल्या दुर्दैवास दोष देतात. याप्रमाणें विफल पाठलागामुळें श्रमून व तहानेनें व्याकूळ होऊन ते इकडे तिकडे पाण्याचा शोध करूं लागतात. नकुल एका झाडावर चढून पाहत असतां त्यास दूर अंतरावर एक तळें दृष्टीस पडतें. युधिष्ठिराच्या आज्ञेनें तो भात्यामध्यें पाणी घेऊन येण्याकरितां जातो. तेथें एक स्वच्छ पाण्यानें भरलेलें तळें त्याच्या दृष्टीस पडतें व त्यासभोंवती बगळे उभे असतात, परंतु तो पाणी पिण्यास जात असतां अंतरिक्षांतून त्याला एका यक्षाचे शब्द ऐकूं येतात. "मित्रा, हें तळें माझें असून तूं अतिक्रम करूं नकोस. प्रथम माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दे व नंतर पाणी पी व घेऊन जा." परंतु नकुल त्या शब्दांकडे लक्ष देत नाहीं व पाणी पितो. तेव्हां तो मृतवत होऊन जमिनीवर पडतो. त्यास जाऊन बराच वेळ झाल्यामुळें त्याला शोधण्याकरितां सहदेव येतो व त्याचीहि तीच गति होते. नंतर युधिष्ठिर अर्जुनास पाठवितो, त्याचीहि तीच गति झाल्यामुळें अखेरीस भीम येतो व तो त्या अदृश्य यक्षाशीं युद्ध करण्याचा व्यर्थ प्रयत्न करतो. तोहि तळ्याचें पाणी पिऊन मृत होऊन पडतो. अखेरीस युधिष्ठिर कांहीं तरी अनिष्ट झालें आहे असें समजून आपल्या भावांचें काय झालें आहे हें पाहाण्याकरितां स्वतः निघतो. त्या सर्वांस मृतावस्थेंत पाहून भीतियुक्त मनानें तो मोठ्यानें शोक करण्यास लागतो. तो तळ्याकडे चालला असतां त्यालाहि तलावाकडे जाण्याचा व प्रश्नांचीं उत्तरें दिल्याशिवाय पाणी पिण्याचा निषेध करण्यांत येतो. युधिष्ठिर आपण प्रश्नांचीं उत्तरें देण्यास तयार असल्याचें सांगतो. यानंतर फार मजेदार प्रश्नोत्तरें होतात व त्यांमध्यें कांहीं कूटप्रश्न सोडून दिल्यास प्राचीन वैदिक ब्रह्मोद्याप्रमाणें सर्व भारतीय नीतिशास्त्राचें विवेचन करण्यांत येतें.

**यक्ष**–भूमीहून गुरुतर काय आहे, आकाशाहून उंच काय आहे, वायूहून शीघ्रतर काय आहे, आणि तृणाहून लघुतर काय आहे?

**युधिष्ठिर**–भूमीहून माता गुरुतर आहे, आकाशाहून पिता उंच आहे, मन वायुहून शीघ्र आहे आणि चिंता तृणाहून लघुतर आहे.

**यक्ष**–प्रवाश्याचा मित्र कोण, घरीं राहाणाऱ्याचा मित्र कोण, आजाऱ्याचा मित्र कोण आणि मृत्यूच्या द्वारीं असलेल्याचा मित्र कोण?

**युधिष्ठिर**–प्रवाश्याचा मित्र विद्या, घरीं राहणाऱ्याचा मित्र भार्या, आजाऱ्याचा मित्र वैद्य आणि मरणाऱ्याचा मित्र दान होय.

**यक्ष**–मनुष्याचा दुर्जय असा शत्रु कोण, अनंत असा रोग कोणता, साधु कोण व असाधु कोण?

**युधिष्ठिर**–क्रोध हा दुर्जय शत्रु होय, लोभ हा अनंत व्याधि होय, सर्वांचें हित करणारा तो साधु आणि निर्दय तो असाधु होय.

**यक्ष**–मोह कशाला म्हणावें, मान कशास म्हणावें, आळस कशास म्हणावें व शोक कशास म्हणावें?

**युधिष्ठिर**–धर्माच्या अज्ञानास मोह म्हणावें, आत्माभिमानास मान म्हणावें, धर्मनिष्क्रियतेस आळस म्हणावें आणि अज्ञानास शोक म्हणावा.

**यक्ष**–ऋषी स्थैर्य कशास म्हणतात, धैर्य कशास म्हणतात, स्नान कशास म्हणतात व दान कशास म्हणतात?

**युधिष्ठिर**–स्वधर्माच्या ठिकाणीं स्थीरतेस स्थैर्य म्हणतात, इंद्रियनिग्रहास धैर्य म्हणतात, मनाचा मल नाहींसा करणें यास स्नान म्हणतात व भूतांचें रक्षण करणें यास दान म्हणतात.

**यक्ष**–ब्राह्मण्य कशास म्हणतात, कुल, वृत्ति, स्वाध्याय किंवा विद्या यांपैकीं कशामुळें ब्राह्मण्य प्राप्त होतें?

**युधिष्ठिर**–कुल, स्वाध्याय, विद्या हीं ब्राह्मण्यास कारण होत नसून वृत्तीच निःसंशय कारण आहे. ब्राह्मणानें आपल्या चारित्र्याकडे विशेष प्रथम लक्ष दिलें पाहिजे व नंतर इतर गोष्टी केल्या पाहिजेत. कारण त्याचें चारित्र्य नष्ट झाल्याबरोबर तोहि नष्ट होतो. जे शास्त्रांचें पठन, पाठन व चिंतन करतात, ते जर व्यसनी असतील तर मूर्ख होत. जो क्रीयावान तोच पंडित होय. दुर्वृत्त मनुष्यानें चारी वेदांचें अध्ययन केलें असलें तरी तो शूद्रापेक्षांहि नीच होय परंतु जो अग्नि-होत्र पाळून इंद्रियनिग्रह करतो तोच ब्राह्मण होय.

याप्रमाणें युधिष्ठिराचीं उत्तरें ऐकून यक्षाला इतका संतोष होतो कीं, तो त्याच्या चार भावांपैकीं एका भावास जिवंत करण्यास तयार होतो आणि युधिष्ठिरास त्यांपैकीं कोणास जिवंत करावें असें विचारतो, तेव्हां युधिष्ठिर नकुलास जिवंत करण्यास सांगतो. याचें कारण तो असें सांगतो कीं, आपल्या पित्यास दोन स्त्रिया असून दोघां स्त्रियांचा निदान एक एक पुत्र जिवंत असणें रास्त होय. म्हणून नकुलास जिवंत केलें असतां माद्रीचाहि एक पुत्र जिवंत राहील. या उत्तरानें यक्ष इतका संतुष्ट होतो कीं, तो लागलीच सर्व भावांस जिवंत करतो. वास्तविक तो यक्ष दुसरा कोणी नसून युधिष्ठिराचा पिता प्रत्यक्ष यमधर्मच असतो. तसेंच अंत-र्धान पावण्यापूर्वीं तो पांडवांस अज्ञातवासामध्यें तुम्हीं गुप्त राहाल असाहि वर देतो. कारण आतां पांडवांचीं वनवासाचीं बारा वर्षें पूर्ण होऊन त्यांनां तेरावें वर्ष अज्ञातवासांत गुप्तपणें घालवावयाचें असतें.

**पांडव विराटाच्या दरबारीं जातात**—पांडव मत्स्यदेशाचा राजा विराट याच्या दरबारीं जाऊन गुप्त वेषानें निरनिराळीं नांवें व वेष धारण करून राहण्याचा निश्चय करतात. ते आपलीं शस्त्रास्त्रें नगराबाहेरील स्मशाना-मध्यें एका वृक्षावर लपवून ठेवतात व तेथें कोणीहि जाऊं नये म्हणून त्यावर एक प्रेत टांगून ठेवतात. हें त्यांचें कृत्य पाहात असलेल्या एका धनगरास ते असें सांगतात कीं, त्यांचीं एकशें ऐशीं वर्षांची वृद्ध माता मरण पावली असून ते आपल्या पूर्वजांच्या चालीप्रमाणें तिचा प्रेतसंस्कार करीत आहेत. प्रथमतः विराटाकडे युधिष्ठिर जातो आणि आपण एक कुशल द्यूतकार आहों असें सांगतो व राजा त्यास आपला सहचर व मंत्री म्हणून नेमतो. नंतर बाकीचे भाऊहि क्रमानें येतात. भीमाची आचाऱ्याच्या जागीं नेमणूक होते. अर्जुन बृहन्नला नांव धारण करून आपण क्लीब आहों असें सांगतो. त्याची उत्तरेला नृत्य शिकविण्याकडे नेमणूक होते. नकुलाची अश्वशालेवर व सहदेवाची गोशालेवर नेमणूक होऊन, द्रौपदी राणीची दासी म्हणून राहाते. पांडव विराटाच्या दरबारीं लवकरच फार प्रिय होतात. विशेषतः भीमानें ब्रह्मयात्रेमध्यें जीमूत नांवाच्या जगद्विख्यात् मल्लाला ठार मारल्यामुळें त्याची फारच चहा होते.

परंतु द्रौपदीवर एक चमत्कारिक संकट येतें. राजाचा शालक व सेनापति कीचक याची द्रौपदीवर नजर जाऊन तो तिच्या राशीस लागतो. द्रौपदीनें तेथें राहातेवेळेस आपण पांच गंधर्वांची पत्नी असून आपले पती आपलें संरक्षण करण्यास गुप्त रीतीनें तयार असतात असें आधींच राणीस सांगितलेलें असतें. द्रौपदी कीचकाशीं संकेत करून त्याला एका रात्रीं नृत्यशाळेंत बोलाविते. तेथें लपून बसलेला भीम त्याशीं युद्ध करून त्यास ठार मारतो. नंतर द्रौपदी पाहारेकऱ्यांस हांक मारून आणून कीचकानें आपणाशीं लगट केल्यामुळें आपल्या गंधर्व-पतीनें त्यास ठार मारलें असें सांगते. कचिकाचे आप्त बलिष्ठ असून ते कीचकाच्या प्रेताबरोबर द्रौपदीसहि जाळून टाकण्याचा प्रयत्न करतात. परंतु भीम गंधर्व-वेषांत तेथें येऊन एकशें पांच कीचकांस ठार करून द्रौपदीची सुटका करतो. तेव्हां गंधर्वांच्यामुळें भीति-प्रद झालेल्या या दासीस काढून टाकण्यास तेथील नाग-रिक राजास सांगतात व राजा त्याप्रमाणें आज्ञा करतो. परंतु द्रौपदी राणीजवळ आणखी तेरा दिवस राहाण्याची परवानगी मागते आणि त्यानंतर आपणांस आपले गंधर्व घेऊन जातील असें सांगते. कारण तेरा दिवसांनंतर त्यांचीं तेरा वर्षें पूर्ण व्हावयाचीं असतात.

दुर्योधन पांडवांचा शोध करण्याकरितां अनेक हेर पाठवितो परंतु त्यांस पांडवांबद्दल कांहींच माहिती लागत नाहीं. परंतु ते गंधर्वांनीं कीचकास ठार मारल्याची वार्ता सांगतात. तेव्हां दुर्योधनास फार आनंद होतो. कारण मत्स्य देशाशीं त्याचें वैर असतें. कीचकानें त्रिगर्त देशाचा राजा शूरसेन यासहि पुष्कळ त्रास दिलेला असतो. यामुळें त्रिगर्त व कौरव एक होऊन मत्स्यदेशा-वर स्वारी करण्याचा बेत करतात. पांडवांचीं तेरा वर्षें पूर्ण होणार तोंच त्रिगर्तांनीं मत्स्यदेशावर स्वारी करून विराटाच्या गायी पळवून नेल्याची बातमी येते. विराट युद्धाची तयारी करून युधिष्ठिर, भीम, नकुल व

सहदेव यांसहि शस्त्रें देऊन त्रिगर्तांशीं युद्ध करण्यास निघतो. तेव्हां मोठें युद्ध होऊन विराट कैद होतो परंतु भीम लागलीच त्याची सुटका करतो व पांडवांच्या साहाय्यानें अखेरीस त्रिगर्तांचा पराभव होतो. परंतु पांडव स्वतः उघडकीस येत नाहींत.

विराट त्रिगर्तांशीं युद्ध करण्यांत गुंतला असतां कौरव दुसऱ्या बाजूनें मत्स्यदेशावर स्वारी करून बरींच गुरें पळवून नेतात. तेव्हां शहरांत मागें राहिलेल्या उत्तर राजपुत्राकडे गोपाल येऊन त्यास कौरवांशीं युद्ध करण्यास जाण्यास सांगतात.परंतु त्याच्याजवळ सारथी नसतो. तेव्हां द्रौपदी उत्तरेच्या मार्फत अर्जुनास सारथी म्हणून नेण्यास सांगते. त्याप्रमाणें त्यास कवच देण्यांत येऊन ते दोघे युद्धास जातात. उत्तर जेव्हां कौरवांची अफाट सेना पहातो तेव्हां भीतीनें रथांतून उडी टाकून पळूं लागतो परंतु अर्जुन त्यास पकडून रथांत नेऊन त्यास धीर देतो. नंतर तो ज्या वृक्षावर शस्त्रास्त्रें लपविलेलीं असतात त्याजवळ येऊन आपलीं शस्त्रें घेतो. तो जेव्हां आपण अर्जुन आहों असें उत्तरास सांगतो तेव्हां त्यास धीर यतो. नंतर उत्तर अर्जुनाचें सारथ्य करतो आणि एक दारुण युद्ध होऊन अर्जुन दुर्योधन, कर्ण, भीष्म आणि इतर कौरव योद्ध्यांबरोबर युद्ध करून मोठा विजय संपादन करतो. कौरवांस आपणांबरोबर युद्ध करणारा अर्जुन असावा असा जरी संशय येतो तरी ते त्यास ओळखीत नाहींत.

याप्रमाणें विजय मिळविल्यावर अर्जुन आपलीं शस्त्रें पुन्हां त्या झाडावर ठेवून बृहन्नला रूपानें उत्तराचा सारथी म्हणून पुनः नगरांत येतो व उत्तरास ही गोष्ट गुप्त ठेवण्यास सांगतो. इतक्यांत विराट आणि इतर पांडव त्रिगर्तांचा पराभव करून परत आलेले असतात व विराटास आपला पुत्र कौरवांशीं युद्ध करण्यास गेला आहे हें ऐकून फार काळजी वाटते. परंतु लौकरच त्याच्या विजयाची बातमी त्याला कळते व उत्तराचें मोठ्या थाटानें स्वागत करण्यांत येतें. तो कौरवांचा पराभव आपण स्वतः केला नसून एका देवानें तरुण मनुष्याच्या रूपानें आपणांस साहाय्य केलें असें सांगतो. तीन दिवसांनीं तेरावें वर्ष पूर्ण होतें, व पांडव सभागृहामध्यें प्रगट होऊन आपली ओळख देतात. तेव्हां विराटास आश्चर्य वाटतें व त्यास फार आनंद होऊन तो आपली मुलगी उत्तरा अर्जुनास देऊं करतो; परंतु अर्जुन तिचा स्वीकार आपणा स्वतःकरितां न करतां आपला पुत्र अभिमन्यु याच्याकरितां करतो व तिला आपली सून करून आपल्या इतक्या दिवसांच्या निकट साहचर्यांतहि ती शुध्द राहिली असल्याचें दिग्दर्शित करतो. लवकरच अभिमन्यु आणि उत्तरा यांचा मोठ्या थाटानें विवाह होतो आणि द्रुपद, कृष्ण इत्यादि अनेक राजे मोठमोठ्या देणग्या देऊन त्या समारंभास हजर राहातात.

**संधीकरितां शिष्टाई व युद्धाची तयारी**—या विवाहसमारंभाकरितां एकत्र झालेले पांडव व त्यांचे मित्र एका ठिकाणीं बसून कौरवांसंबंधीं यापुढें काय धोरण ठेवावयाचें याचा विचार करतात. कृष्ण असें सुचवितो कीं, दुर्योधनाकडे पांडवांचें अर्धें राज्य परत मिळण्याबद्दल वाटाघाट करण्याकरितां एखाद्या शिष्टास पाठवावें. बऱ्याच विचारानंतर द्रुपदाच्या वृद्ध पुरोहिताची कौरवांकडे शिष्टाई करण्यास जाण्याकरितां योजना होते.

तथापि या वाटाघाटीस आरंभ होण्याच्या पूर्वीहि पांडव व कौरव दोघेहि आपल्या बाजूस शक्य तितके राजे मिळवण्याचा प्रयत्न करतात, व कांहीं राजांकडे दोघांचेहि दूत एकदमच जातात. याप्रमाणें दुर्योधन स्वतः कृष्णाला आपल्या बाजूस वळविण्याकरितां त्याकडे जातो. तो येतो त्यावेळीं कृष्ण निद्रिस्थ असतो व त्याच्या मागोमाग अर्जुन येतो. कृष्ण जागा झाल्यावर त्याच्या दृष्टीस प्रथम अर्जुन पडतो. दुर्योधन प्रथम आलेला असतो व अर्जुन प्रथम दृष्टीस पडतो तेव्हां कृष्ण दोघांनांहि नकारात्मक उत्तर न देतां, एकास आपलें यादव सैन्य व दुसऱ्यास आपला सल्ला देऊं करतो. दुर्योधन सैन्य पत्करतो आणि अर्जुन सल्ला घेण्यास राजी होतो. याकरितां कृष्ण आपण प्रत्यक्ष युद्धांत भाग न घेतां अर्जुनाचें सारथ्य करून पांडवांस फक्त सल्ला देत जाऊं असें कबूल करतो. मद्रदेशाचा राजा शल्य हाहि आपलें सैन्य घेऊन युधिष्ठिराकडे जाण्यास निघाला असतां वाटेंत दुर्योधन त्यास कौरवांस मिळण्याची विनंति करतो. तो त्याचें म्हणणें मान्य करतो पण तसाच पुढें युधिष्ठिराकडे जातो. युधिष्ठिर हा नेहमीं सद्गुणांचा आदर्श समजला जातो तरी शल्यानें कौरवांकडे जाऊन फितुरी करण्यास अनुमोदन देतो व असें ठरतें कीं, शल्यानें कौरवांच्या बाजूनें युद्ध करावें परंतु कर्णाचें सारथ्य करीत असतां त्याचें अर्जुनाशीं युद्ध व्हावयाच्या वेळीं त्याचा उत्साहभंग करावा व रथ हांकण्यांत चुका कराव्या.

याप्रमाणें दोन्हीहि बाजू युद्धाची तयारी करीत असतां द्रुपदाचा वृद्ध पुरोहित शिष्टाईसाठीं धृतराष्ट्राकडे जातो व त्यास पांडवांच्या सामाच्या अटी कळवितो. राजा त्याचें मोठ्या आदरानें स्वागत करतो परंतु त्यास कांहींच निश्चित उत्तर न देतां मी आपला सारथी संजय यास युधिष्ठिराकडे शिष्टाईकरितां पाठविणार आहे असें सांगतो. त्याप्रमाणें लवकरच तो संजयास युधिष्ठिराकडे पाठवितो व आपली साम करण्याची इच्छा आहे असें कळवितो परंतु पांडवांस कांहींच देऊं करीत नाहीं. तेव्हां युधिष्ठिर आपणास इंद्रप्रस्थ आणि अर्धे राज्य परत मिळावें, नाहीं तर युद्ध सुरू होईल असा उलट जबाब पाठवितो. आपल्याच आप्तइष्टांमध्यें युद्ध होऊन संहार होऊं नये म्हणून दुर्योधनानें आपणांस पांच गांव दिले तरी सुद्धां आपण राजी आहों असें तो कळवितो. या संजयानें आणलेल्या उत्तराचा सर्व कौरव एकत्र जमून विचार करतात. भीष्म, द्रोण आणि विदुर दुर्योधनाचें मन वरील गोष्टीस संमति देण्यास वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न करतात. धृतराष्ट्र स्वतः दुर्बल व असमर्थ असल्यामुळें या बैठकींत कांहींच न ठरतां ती मोडते.

पांडवहि पुन्हां संधीबद्दल विचार करतात व कृष्ण स्वतः शिष्टाईस जाण्याचें अंगावर घेतो. पांडव या गोष्टीस मोठ्या आनंदानें मान्य होतात. भीमसुद्धां यावेळीं संधीबद्दल असें भाषण करतो कीं, त्यामुळें जणुंकाय पर्वत हलका व्हावा किंवा अग्नि थंड व्हावा असा भास होतो व कृष्णालाहि आश्चर्य वाटतें. उलट पांडवांकडील कांहीं योद्धे आणि विशेषतः पांडवांची स्त्री द्रौपदी ही शिष्टाईबद्दल नापसंति दर्शवून तावडतोब युद्ध सुरू करावें असेंच सुचविते. परंतु युधिष्ठिर अखेरीस शिष्टाई करून पाहाण्याचेंच ठरवितो. कृष्णास निरोप देतांना त्यास कुंतीची आठवण होऊन मोठ्या सद्गदित अंतःकरणानें तो त्यास विदुराच्या घरीं असलेल्या कुंतीची भेट घेऊन तिचें कुशल विचारून येण्यास सांगतो.

कृष्ण कौरवांकडे जात असतां वाटेंत त्यास अनेक ऋषी वगैरे अशिर्वाद देतात. धृतराष्ट्र त्याचें मोठ्या थाटानें स्वागत करतो परंतु तो विदुराच्याच घरीं उतरण्यास जातो. लागलीच तो कुंतीची भेट घेऊन तिला युधिष्ठिराचे प्रणाम कळवितो. ती पुत्रवियोगाबद्दल फारच दुःख करते परंतु विशेषतः द्रौपदीचा झालेला अपमान तिला दुःसह होतो आणि ती युधिष्ठिरास त्याच्या दौर्बल्याबद्दल दोष देते. ती कृष्णाबरोबर पांडवांनां आपल्या क्षात्रधर्मास विसरूं नका, व मृत्यूचेंहि भय वाळगूं नका असा निरोप पाठविते. ती म्हणते "वीर मातेनें ज्याकरितां पुत्रास जन्म द्यावयाचा असतो तो प्रसंग आतां आलेला आहे." दुसऱ्या दिवशीं सकाळीं कृष्ण कौरवांच्या सभेंत जातो आणि आपलें सामाबद्दलचें भाषण करतो. धृतराष्ट्र, आपणांस साम करण्याचीच इच्छा आहे परंतु दुर्योधनापुढें आपलें कांहीं चालत नाहीं असें सांगतो. तेव्हां कृष्ण दुर्योधनापुढें आपलें सामाबद्दलचें म्हणणें मांडतो. भीष्म, द्रोण आणि विदुरहि दुर्योधनानें सामाच्या अटी कबूल कराव्या यासाठीं शिकस्त करतात. परंतु दुर्योधन, पांडवांस आपण सुईच्या अग्रावर रहाण्याइतकीहि जमीन देणार नाहीं असें सांगतो. रागानें सभागृह सोडून गेल्यावर कृष्ण, कौरवांमधील सद्बुद्धिप्रवृत्त लोकांनीं दुर्योधन व त्याचे सहकारी यांस कैद करून पांडवांच्या स्वाधीन करावें असें सुचवितो. धृतराष्ट्र या गोष्टीस संमति देत नाहीं परंतु आपल्या हट्टी पुत्राचें मन वळविण्यास गांधारीस निरोप पाठवितो. गांधारी दुर्योधनास राज्य दिल्याबद्दल धृतराष्ट्रास दोष देते. परंतु दुर्योधनाचें मन वळविण्याचा प्रयत्न करण्यांत मुळींच यश येत नाहीं. दुर्योधन व त्याचे मित्र कृष्णालाच कैद करण्याचा बेत करतात व अशा रीतीनें एका बलिष्ठ शत्रूची आयतीच वाट लावण्याची योजना करतात. परंतु हा त्यांचा बेत उघडकीस येऊन धृतराष्ट्र व विदुर हे शिष्टाईच्या नियमांचा भंग करण्याच्या या बेताबद्दल त्यास फारच दूषण देतात. भीष्म व द्रोण यांचीहि साम करण्याबद्दलची खटपट फुकट जाऊन ही शिष्टाईहि निष्फळ ठरते.

कृष्ण परत जाण्यापूर्वी कर्णाची एकदां गुप्तपणें भेट घेतो. हा लोकांमध्यें सूतपुत्र म्हणून प्रसिद्ध असतो. परंतु वास्तविक गोष्ट अशी असते कीं, तो कुंतीला कौमार्यावस्थेंतच सूर्यापासून तिचें कौमार्य भंग न होतां, झालेला असतो. ती त्याचा जन्म झाल्यावर लज्जेनें त्याला एका टोपलींत घालून नदींत सोडून देते. तो एका सूताला सांपडतो व तोच त्याचें पालन करतो.

कर्ण हा अर्थात पांडवांचा भाऊ होता. कृष्ण त्याला ही गोष्ट सांगून पांडवांच्या राज्यावर बसून युधिष्ठिरास युवराज नेमावें म्हणून त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न करतो. आणि पांडवहि या गोष्टीस कबूल होतील असें सांगतो. परंतु कर्ण दुर्योधनाचा विश्वासघात करण्याचें नाकारतो. आणि जेव्हां कुंती प्रत्यक्ष सूर्याच्या मदतीनें

त्याचें मन पांडवांच्या पक्षास जाण्याकरितां वळवितें तेव्हां कर्ण तिला निष्ठुरपणें असें उत्तर देतो कीं, ज्याअर्थी तूं आजपर्यंत मला कधींहि आईप्रमाणें वागविलें नाहीं त्याअर्थी मीहि यापुढें तुझ्याशीं पुत्राप्रमाणें वागण्यास तयार नाहीं.

तेव्हां कृष्ण पांडवांकडे परत येऊन संधि करण्याच्या कामांत आपणांस यश आलें नाहीं असें सांगतो. कृष्ण जेव्हां आपणांस कैद करण्याचाहि प्रयत्न झाल्याची हकीकत सांगतो तेव्हां पांडव मोठ्यानें युद्धाची रणगर्जना करतात. दोन्हीहि पक्ष आतां जोरानें युध्दाची तयारी करतात. पांडव, द्रुपदपुत्र धृष्टद्युम्न याची आपल्या सेनापतीच्या जागीं योजना करतात आणि कौरव भीष्मास सेनापति नेमतात. भीष्म दुर्योधनाला सर्व रथीयोध्दयांची माहिती देत असतां कर्णाला तो सर्वांत खालचें स्थान देतो. त्यामुळें भीष्म मृत्यु पावेपर्यंत आपण युद्ध करणार नाहीं अशी कर्ण शपथ घेतो. नंतर भीष्म पांडवांकडील योध्दयांची माहिती देतो आणि शिखंडीखेरीज बाकीच्या सर्वांशीं आपण युध्द करण्यास तयार आहों असें सांगतो. शिखंडी हा प्रथम द्रुपदास कन्यारूपानें झालेला असून एका यक्षाकडून त्यास पुरुषत्व मिळालेलें असतें. त्यामुळें भीष्म हा अद्यापि त्यास स्त्रीच समजून तो त्याशीं युद्ध करण्यास तयार नसतो.

युध्दाची पूर्णपणें तयारी झाल्यानंतर दुर्योधन उलूक नांवाच्या नटास पांडवांकडे पाठवितो, आणि तो अतिशय चीड आणणाऱ्या शब्दांत पांडवांस युध्दाचें आव्हान करतो. पांडवहि तशाच प्रकारच्या शब्दांत त्यास उत्तर देऊन परत पाठवितात. नंतर दोन्ही सैन्यें कुरुक्षेत्रावर जातात.

**अठरा दिवसांचें भारती युद्ध**—दोन्हीहि सैन्यें आपापल्या पक्षाच्या मित्रसैन्यांसह कुरुक्षेत्रामध्यें एकमेकांसमोर तळ देतात. शत्रुमित्र कसे ओळखावे यासंबंधीचे विशिष्ट शब्द निश्चित करण्यांत येतात. नंतर दोघांमधील युध्दाचे नियम ठरविण्यांत येतात. एकाच दर्जाच्या व एकाच प्रकारचीं शस्त्रें वापरणाऱ्या सैनिकांनीं परस्परांशीं युध्द करावें. रथींनीं फक्त रथींशीं युद्ध करावें, हत्तीवर बसणाऱ्यांनीं हत्तीवर आरूढ झालेल्यांशीं, अश्वारूढांनीं अश्वारूढांशीं, व पदातींनीं पदातींशीं युद्ध करावें. शरण आलेला, निःशस्त्र, आश्रयार्थ आलेला यांस मारूं नये. वाहनें हांकणारे, ओझ्याचीं जनावरें, कवच व शस्त्रास्त्रें घेऊन बरोबर येणारे आणि वाद्यें वाजविणारे यांसहि मारावयाचें नाहीं असें ठरतें.

युद्ध सुरू होण्यापूर्वीं व्यास प्रगट होऊन धृतराष्ट्राचा सारथी संजय यास युद्धभूमीवर होणारी प्रत्येक गोष्ट पाहतां येण्याची दिव्यशक्ति देतात. तसेंच त्यास धृतराष्ट्रास दररोज युध्दाची हकीकत सांगतां यावी म्हणून त्यास शस्त्रांनीं अभेद्य करतात. यापुढील युध्दाचें वर्णन संजयानें प्रत्यक्ष पाहिल्याप्रमाणें त्याच्या तोंडीं घातलें असून तें फारच बहारीचें आहे.

युध्दास आरंभ होण्यापूर्वींच येथें कृष्णार्जुनसंवादरूपानें भगवद्गीता सांगितलेली आहे.

कौरव व पांडव यांचे पितामह वृध्द भीष्म पहिले दहा दिवस कौरवांचें सैनापत्य करतात. भीष्म मोठ्या आवेशानें भाषण करून सर्व योध्दयांनां युध्दाकरितां प्रोत्साहन देतात. ते म्हणतात "वीरहो, स्वर्गाचें दार तुमच्यापुढें मोकळें आहे, त्यांतून तुम्ही इंद्रलोक, ब्रह्मलोक यांप्रत जा. एखाद्या रोगानें घरीं मरण येणें हें वीरास उचित नव्हे. रणांगणावर मृत्यु येण्याचा प्रयत्न करणें हें प्रत्येक वीराचें कर्तव्य आहे." याप्रमाणें ते मोठ्या शौर्यानें रणांगणावर जातात व तीं दोन्ही सैन्यें युध्दाकरितां एकत्र होतात, तेव्हां त्यांचीं शस्त्रास्त्रें व कवचें सूर्यप्रकाशांत चमकत असतांना दिसतात.

मेघगर्जनेप्रमाणें भासणाऱ्या वीरांच्या गर्जना आणि काणठळ्या बसविणारीं रणवाद्यें युध्दाच्या आरंभाचा इशारा देतात. कौरव आणि पांडव यांमध्यें आतां मोठें घनघोर युध्द होतें. सर्व वीर आप्तसंबंध विसरून जातात. पिता पुत्रास ओळखीत नाहीं, भाऊ भावास ओळखीत नाहीं, मामा भाच्यास जुमानींत नाहीं किंवा मित्र मित्रास स्मरत नाहीं. रणांगणामध्यें हत्ती भयंकर नाश करतात. आणि रक्तपात सुरू होतो. आतां या वीराचें, तर नंतर त्या वीराचें द्वंद्वयुध्द सुरू झालेलें दिसतें. केव्हां पांडव तर केव्हां कौरव विजयी होतात, परंतु रात्र पडली कीं सर्व वीर आपापल्या जागीं परत जातात आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं युध्दाच्या तयारीनें दोन्ही सैन्यें एकत्र जमलीं म्हणजे पुन्हां युध्दास सुरवात होते. भीष्म आणि अर्जुन यांची अनेकदां अनेक वेळीं गांठ पडते व ते इतक्या शौर्यानें लढतात कीं, देव व असुरहि त्यांचें युध्दकौतुक पहात राहतात. परंतु प्रत्येक वेळीं कौरवांचें कांहीं तरी नुकसान होतें, त्यामुळें दुर्योधन भीष्मास पांडवांस फारच सवलत दिल्याबद्दल दोष देतो. तसेंच पांडवांचा नाश झाला असतां कृष्ण अर्जुनास प्रत्यक्ष भीष्माशीं युध्द न केल्याबद्दल दोष देतो. दुर्योधनाचे

बरेचसे भाऊ रणांगणांत पडतात. तेव्हां तो पांडवांवर दया दाखविल्याबद्दल पुन्हां भीष्मास दोष देतो. आणि शत्रूचा पराजय करण्यास किंवा कर्णास सैनापत्य देण्यास भीष्मास सांगतो. तेव्हां भीष्म क्रोध आणि दुःख यांनीं व्याप्त होऊन दुसऱ्या दिवशीं शिखंडीखेरीज सर्वांशीं मोठ्या निकरानें युध्द करण्याचें कबूल करतो. तो म्हणतो " हे गांधारीपुत्रा, तूं आज सुखानें निद्रा घे. मी उद्यां असा विजय संपादन करतों कीं, जगाच्या अंतापर्यंत तो लोकांच्या स्मरणांत राहील. " त्याप्रमाणें युध्दाच्या नवव्या दिवशीं पांडवांचा खरोखरच फार नाश होतो. भीष्म यमाप्रमाणें शत्रुपक्षाचा पडशा पाडीत जातो परंतु अर्जुन भीष्माला पितामह म्हणून मान देऊन युध्दामध्यें त्याबद्दल पुष्कळच आदर व पक्षपात दाखवितो. ही गोष्ट कृष्णाच्या नजरेस येऊन तो स्वतःच भीष्मास ठार मारण्यास जातो, परंतु अर्जुन त्यास त्याच्या शस्त्र न धरण्याबद्दलच्या प्रतिज्ञेची आठवण करून त्याचें निवारण करतो. भीष्मानें पळवून लाविल्यामुळें पांडवांकडील योध्दे आपल्या शिबिरास परत येतात.

त्या दिवशीं रात्रीं पांडव एकत्र बसून विचार करतात. भीष्मानें शिखंडीबरोबर युध्द करावयाचें नाहीं असें ठरविलें असल्यामुळें शिखंडीला भीष्मापुढें उभा करून अर्जुनानें त्याच्या पाठीमागें राहून भीष्मावर बाण सोडावे असें ते ठरवितात. अर्जुनास आपल्या बालपणीं आपण भीष्माच्या मांडीवर कसे खेळत असूं व त्यास तात म्हणून कशी हांक मारीत असूं याचें स्मरण होऊन तो फारच नाखुशीनें वरील गोष्ट कबूल करतो. तथापि कृष्ण भीष्मास मारण्यास फक्त तोच उपाय आहे व आपल्या शत्रूस ठार मारणें हें क्षत्रियाचें कर्तव्यच आहे असें सांगून त्याची समजूत करतो.

याप्रमाणें दहाव्या दिवशीं सकाळीं पांडवांच्या सैन्याच्या अग्रभागीं शिखंडीस उभें करण्यांत येतें व कौरवांच्या सैन्याच्या अग्रभागीं भीष्म उभा असतो. भीष्माच्या सभोंवती कौरव व पांडव यांमध्यें सर्व दिवसभर युद्ध चालतें. दोन्ही पक्षांचे हजारों लोक युद्धांत पडतात. अखेरीस पाठीमागें लपून बसलेल्या अर्जुनासह शिखंडी भीष्मापुढें प्राप्त होतो. तेव्हां भीष्म कोणताहि प्रतिकार न करतां शिखंडीचे बाण हास्यमुखानें आपणाकडे येऊं देतो; परंतु शिखंडीनें कितीहि जोरानें बाण सोडले तरी त्यांमुळें भीष्मास मुळींच इजा होत नाहीं. तथापि शिखंडीच्या मागें लपलेला अर्जुन लवकरच भीष्मावर एकामागून एक बाणांचा वर्षाव सुरू करतो तेव्हां शेजारीं असलेल्या दुःशासनाकडे वळून भीष्म म्हणतो कीं, यमदूताप्रमाणें माझे प्राण आकर्षण करणारे हे बाण शिखंडीचे नव्हेत. हे विषारी सर्पांप्रमाणें माझ्या गात्रांमध्यें जोरानें प्रवेश करणारे बाण शिखंडीचे नसून अर्जुनाचे असले पाहिजेत. तो आपली शक्ति एकवटून अर्जुनावर एक बाण सोडतो, तों अर्जुन त्यास पकडून त्याचे तीन तुकडे करतो. नंतर भीष्म आपलें रक्षण करण्याकरितां ढाल व तरवार घेतो. परंतु अर्जुन त्या ढालीचेहि शतशः तुकडे करून टाकतो. इतक्यांत युधिष्ठिर आपल्या सर्व सैनिकांस भीष्मावर हल्ला करण्यास सांगतो. तेव्हां त्या एकाकी उभ्या असलेल्या योद्ध्याकडे पांडवांचे सर्व सैनिक जोरानें पुढें सरसावतात. अखेरीस सायंकाळच्या सुमारास सूर्य अस्तास जाण्यापूर्वी थोडा वेळ अनेक जखमा होऊन भीष्म आपल्या रथांतून खालीं पडतो. तेव्हां त्याच्या अंगाला इतके बाण लागलेले असतात कीं, त्याच्या शरीराचा जमिनीस स्पर्श न होतां तो तसाच शरपंजरीं पडतो.

त्यावेळीं पांडवपक्षीय वीरांना अतिशय आनंद होतो. उलट कौरव सैन्यांत हाहाःकार उडतो. भीष्माच्या मृत्यूमुळें युद्ध तहकूब करण्यांत येतें. आणि कौरव व पांडव सर्व मोठ्या आदरानें व दुःखानें भीष्माभोंवतीं जमतात. तो त्यांच्याबरोबर बोलण्याचा प्रयत्न करतो परंतु त्याचें डोकें खालीं लोंबत असतें म्हणून तो उशी मागतो. तेव्हां सुंदर सुंदर उशा आणण्यांत येतात परंतु भीष्म स्मित मुखानें त्या नाकारतो. तेव्हां अर्जुन आपल्या भात्यांतून तीन बाण काढून त्यांवर भीष्माचें शिर तोलून धरतो आणि भीष्महि वीरास अशा प्रकारचीच शय्या योग्य असें म्हणून समाधान झाल्याचें दाखवितो. मृत्यूच्या द्वारीं असलेला भीष्म दुर्योधनास मोठ्या कळकळीनें संधि करण्यास सांगतो. तो म्हणतो, " माझ्या मृत्यूबरोबर या युध्दाचा शेवट होऊं दे आणि पांडवांबरोबर सख्य कर. " परंतु निश्चयानें मृत्यु पावणाऱ्या रोग्यास ज्याप्रमाणें औषध आवडत नाहीं त्याप्रमाणें दुर्योधन भीष्माच्या या म्हणण्यास रुकार देत नाहीं.

उध्दट परंतु उदार असा कर्णहि त्या मृत्युशय्येवर पडलेल्या वीरास अभिवादन करण्यास येतो. भीष्महि एका हातानें त्यास आलिंगन देऊन तो कुंतीचा पुत्र व पांडवांचा भ्राता असल्यामुळें त्यास पांडवांशीं संधि करण्यास सांगतो, परंतु कर्ण आपणांस दुर्योधनाशीं

निष्कपट राहून रणांगणामध्यें पांडवांशीं वीरास उचित असेंच तर्तन करणें योग्य होय असें म्हणतो व या विरुध्द आपणांस वर्तन करणें अशक्य आहे असें सांगतो. आपले संधि करण्याचे सर्व प्रयत्न निष्फल झालेले पाहून भीष्मास फार दुःख होतें. तथापि कर्णाचें म्हणणें योग्य वाटून तो त्या शूर योध्द्यास युध्दाची अनुज्ञा देतो.

भीष्म पतन पावल्यामुळें यापुढें कर्ण युध्दांत सामील होतो, व त्याच्या सूचनेवरून द्रोणास सेनापति नेमण्यांत येतें. त्याच्या धुरीणत्वाखालीं अकराव्या पासून पंधराव्या दिवसापर्यंत युध्द चालतें.

युध्दाच्या तेराव्या दिवशीं पांडवांचें एक मोठें नुकसान होतें. अर्जुनाचा तरुण परंतु शूर पुत्र अभिमन्यु शत्रुसैन्यांत फार दूरवर जातो आणि सिंधुराज जयद्रथ याच्यामुळें अभिमन्यु व त्याचे रक्षक यांमध्यें फार अंतर पडतें व दुःशासनाचा पुत्र त्याचा वध करतो. अर्जुन आपल्या पुत्राच्या मृत्यूबद्दल जयद्रथावर सूड उगविण्याचा निश्चय करतो. त्याप्रमाणें चवदाव्या दिवशीं मुख्यत: अर्जुन व जयद्रथ यांचें युध्द होतें व तें सर्व दिवस चालून अखेरीस जयद्रथ मृत्यु पावतो व अर्जुन सूर्यास्तापूर्वी त्याचा वध करून आपली प्रतिज्ञा पूर्ण करतो. याचवेळीं भीम कौरव सैन्यांत धुमाकुळ उडवून धृतराष्ट्राचे अनेक पुत्र ठार मारतो.

परंतु या दिवशीं सूर्यास्त झाल्यानंतरहि युध्द थांबत नाहीं. या दिवशीं दोहींकडील वीरांस इतका त्वेष आलेला असतो कीं काळोख पडला तरी ते दिवे व मशाली यांच्या साहाय्यानें युध्द करीतच राहातात. या दिवशीं अनेक योध्दे मोठमोठे पराक्रम करतात परंतु विशेषत: कर्ण पांडवसैन्यांत फारच प्रलय करतो. अखेरीस कृष्णाच्या सूचनेवरून घटोत्कच राक्षसास कर्णावर पाठविण्यांत येतें. कर्ण त्याबरोबर मोठ्या शौर्यानें युध्द करतो. घटोत्कचहि कौरव सैन्याचा पुष्कळ नाश करून अखेरीस कर्णाच्या हातून मृत्यु पावतो. परंतु मरतांनाहि तो राक्षस कौरवांच्या पुष्कळशा सैन्यास जमिनीवर पडतांना चिरडून टाकतो. भीमपुत्र घटोत्कच याच्या मृत्यूमुळें पांडवांस फार दुःख होतें, परंतु कर्णानें इंद्रापासून प्राप्त झालेली व अर्जुनाकरितां राखून ठेवलेली शक्ति घटोत्कचास मारण्यासाठीं उपयोगांत आणल्यामुळें कृष्णास आनंद होतो कारण त्याला हीच गोष्ट पाहिजे होती.

याप्रमाणें दोन्हीहि पक्षांचे सैनिक झोपेनें व्याप्त होईपर्यंत युध्द चालू राहतें. फारच थोडे निश्चयी वीर सावधपणें युध्द करीत राहातात. पुष्कळसे निद्रा व श्रम यांनीं व्याप्त होऊन हत्ती किंवा रथावरच निद्रित होतात. कांहीं झोपेच्या भरांत आपल्या पक्षाकडील लोकांसच मारतात. तेव्हां अर्जुनास दया येऊन तो सर्व योध्द्यांस मोठ्या गंभीर आवाजांत निजावयास जाण्याची आज्ञा करतो. त्याचे शत्रूहि ही आज्ञा मोठ्या आनंदानें मान्य करतात आणि याबद्दल देव व मनुष्य त्याचें अभिनंदन करतात, आणि तसेच रणांगणांत हत्ती, घोडे योध्दे वगैरे झोंपी जातात.

याप्रमाणें पहाट होईपर्यंत युद्ध चालतें व युध्दाचा पंधरावा दिवस उजाडतो, त्यावेळीं सर्व योध्दे हत्ती, घोडे, रथ यांवरून खालीं उतरून उगवणाऱ्या सूर्याची प्रार्थना करतात. याप्रमाणें कांहीं क्षण युध्द थांबून लागलीच पुन्हां सुरू होतें. द्रोणाच्या हातून द्रुपद व विराट हे दोन महावीर पडतात. पांडवांकडील वीर द्रोणास मारण्याचा पुष्कळ प्रयत्न करतात परंतु कोणासहि यश येत नाहीं. द्रोण व अर्जुन या गुरुशिष्यांचें मोठें चुरशीचें युध्द होतें परंतु अर्जुन आपल्या गुरूपेक्षां कोणत्याहि बाबतींत कमी नसल्यामुळें या युध्दांत कोणीच हार जात नाहीं. यावेळीं कृष्ण एक युक्ति योजतो. तो भीमाकडून अश्वत्थामा या नांवाच्या एका हत्तीचा वध करवितो आणि द्रोणाजवळ येऊन मोठ्यानें अश्वत्थामा मरण पावला असें पुकारतो. अश्वत्थामा हें द्रोणाच्या पुत्राचेंहि नांव असल्यामुळें त्यास भीति वाटते परंतु त्याचा त्या गोष्टीवर विश्वास बसत नाहीं. अखेरीस सत्यवादित्वाबद्दल प्रसिध्द असलेला युधिष्ठिरहि कृष्णाच्या सांगण्यावरून तीच गोष्ट सांगतो. तेव्हां त्यास तें खरें वाटतें. तो आपलीं शस्त्रास्त्रें टाकून देऊन विचारमग्न स्थितींत उभा राहातो. त्याच क्षणीं द्रुपदाचा पुत्र धृष्टद्युम्न त्या पंचायशीं वर्षांच्या वृध्द वीराचें शीर धडापासून वेगळें करतो. अर्जुन आपल्या वृध्द गुरूस मारूं नये म्हणून मोठ्यानें ओरडतो परंतु त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. यापूर्वींच धृष्टद्युम्न द्रोणाचें शीर कौरव सैन्यांत फेंकून देतो तेव्हां कौरव वीर भिऊन पळून जातात. अश्वत्थाम्यास आपल्या पित्याच्या मृत्यूची वार्ता यानंतर कळून येते, तेव्हां तो पांचाल व पांडव यांचा सूड घेण्याचा निश्चय करतो.

द्रोणाच्या मृत्यूनंतर कर्णास सैनापत्य मिळतें परंतु त्यास त्या पदाचा फक्त दोनच दिवस उपभोग मिळतो. युध्दाच्या सोळाव्या दिवशीं भीम आणि अश्वत्थामा, अर्जुन व कर्ण

हे फार मोठे पराक्रम करतात; परंतु त्यांचा युध्दाचा शेवट लावण्याच्या कामीं फारसा उपयोग होत नाहीं. सतराव्या दिवशीं कर्ण मद्रदेशाचा राजा शल्य यानें आपलें सारथ्य करावें अशी इच्छा प्रदर्शित करतो. कारण अर्जुनाला कृष्णासारखा उत्तम सारथी असल्यामुळें तसा सारथी मिळाल्याखेरीज कर्णास अर्जुनाची बरोबरी करणें शक्य नव्हतें. प्रथमतः शल्य हीन कुलांतील मनुष्याचें सारथ्य करण्याचें नाकारतो. परंतु कर्णासमोर आपणांस वाटेल तें भाषण करण्याची मुभा मिळावी या अटीवर तो कबूल होतो व या सवलतीचा पूर्ण फायदा घेतो. कर्णाचें सारथ्य करीत असतां तो त्याची अतिशय निंदा करतो. कर्णहि शल्याचें राष्ट्र जें मद्र त्यांतील लोक असत्यभाषी, ढोंगी, मद्यपी, अनीतिमान व व्यभिचारी आहेत म्हणून निंदा करतो. उलट कर्णाच्या राज्यांतील अंग लोक आपल्या बायकामुलांचा विक्रय करतात म्हणून शल्य कर्णास दूषण लावतो. अखेरीस दुर्योधन त्या दोघांची समजूत करतो व ते रणांगणावर जातात.

अर्जुन कर्णाशीं लगट करण्याचा प्रयत्न करीत असतां भीम धृतराष्ट्राच्या पुत्रांमध्यें खूप कोलाहल माजवितो व त्यांपैकीं पुष्कळांस ठार मारतो. आपल्या अजस्र गदेच्या प्रहारानें दुःशासनाला रथावरून खालीं पाडून तो त्याच्यावर उडी मारून बसतो आणि त्याचें ऊर फोडून आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें त्याचें रक्त प्राशन करतो. हें भयंकर कृत्य पाहून त्याचे शत्रू भयानें कंपित होऊन पळून जातात. इतक्यांत अर्जुन व कर्ण यांची गांठ पडून दोघांमध्यें भयंकर युध्द होतें. त्या युध्दांत इंद्र अर्जुनास व सूर्य कर्णास मदत करतात. आपल्या भयंकर सुळ्यांनीं एकमेकांस फाडणाऱ्या रानटी हत्तीप्रमाणें ते वीर एकमेकांवर बाणांचा वर्षाव करतात. अर्जुन कर्णास चीत करण्याचा पुष्कळ प्रयत्न करतो परंतु त्यास यश येत नाहीं. इतक्यांत कर्णाच्या रथाचें एक चाक जमिनींत रुततें तेव्हां कर्ण तें चाक वर ओढण्याचा प्रयत्न करीत असतां तो युद्धनीतिप्रमाणें थोडा वेळ युध्द थांबविण्यास सांगतो परंतु कृष्ण अर्जुनास तिकडे मुळींच लक्ष न देण्यास सांगतो व नेहमीं धर्मयुध्द करणारा अर्जुन, कर्ण रथचक्र वर काढण्याचा प्रयत्न करीत असतां त्यास कपटानें मारतो. तेव्हां कर्णाच्या शरीरांतून एक प्रकारचें तेज बाहेर येऊन त्याची शरीरकांति मृत्यूनंतरहि तशीच राहते.

यावेळीं पांडवांच्या सैन्यामध्यें फार आनंद होतो परंतु कौरव भीतीनें पळून जातात.

दुर्योधन मोठ्या मुष्कीलीनें आपल्या सैन्यास गोळा करून त्यांच्यामध्यें युध्दाकरितां उत्साह उत्पन्न करतो. अठराव्या दिवशीं शल्य सैनापत्य करतो. त्याच्याशीं युधिष्ठिर द्वंद्वयुध्द करून मध्यान्हाच्या सुमारास त्याचा वध करतो. तेव्हां सर्व कौरव पळून जातात; फक्त दुर्योधन व शकुनी मूठभर लोकांसह युध्द चालू ठेवतात. सहदेव शकुनीचा वध करतो. अर्जुन व भीम भयंकर संहार करतात, व सर्व कौरव सैन्याचा पूर्णपणें विध्वंस होतो.

दुर्योधन एकटाच पळून जाऊन एका तळ्यांत लपून बसतो. त्याखेरीज कृतवर्मा, कृप आणि अश्वत्थामा इतकेच जिवंत राहतात. यावेळीं सूर्य अस्तास जातो, व कौरवांचा तळ उजाड व भयाण दिसतो. पांडव अखेरीस पळून गेलेल्या दुर्योधनास शोधून काढतात. युधिष्ठिर त्यास द्वंद्वयुध्दास आव्हान करतो. दुर्योधन आपणास सकाळपर्यंत युद्ध करतां येणार नाहीं व आपण येथें भीतीमुळें आलों नसून श्रमामुळें विश्रांतीकरितां आलों आहों असें सांगतो. परंतु युधिष्ठिर तावडतोब युध्द झालें पाहिजे असें म्हणतो व आपणांपैकीं एकासहि ठार मारल्यास त्यास राज्य मिळेल असें सांगतो. अखेरीस दुर्योधन व भीम यांमध्यें द्वंद्वयुध्द व्हावें असें ठरतें व त्याप्रमाणें दोघेहि गदायुद्धास आरंभ करतात. कृष्णाचा भाऊ बलदेव हाहि यात्रेला गेलेला असतो तो त्याच सुमारास परत येतो, व द्वंदयुध्द पाहण्यास थांबतो. देवहि तो युध्द चमत्कार मोठ्या कौतुकानें पाहतात. ज्याप्रमाणें झोंबी खेळणारे दोन बैल एकमेकांस शिंगांनीं धडका देतात त्याप्रमाणें ते दोन वीर एकमेकांवर गदेचे प्रहार करतात. दोघांच्याहि शरीरांतून रक्तप्रवाह चालू असतां ते आपलें युध्द चालूच ठेवतात. एखाद्या मांसाच्या तुकड्याकरितां ज्याप्रमाणें दोन मांजरें एकमेकांस ओरबाडतात त्याप्रमाणें गदांनीं ते एकमेकांस विध्द करतात. दोघेहि शौर्याची कमाल करतात व युध्दाचा शेवट अनिश्चितच राहतो. तेव्हां कृष्ण अर्जुनाजवळ म्हणतो कीं, भीम जरी दुर्योधनापेक्षां अधिक शक्तिमान असला तरी दुर्योधन हा अधिक कुशल असल्यामुळें भीमाला सरळ युध्दामध्यें केव्हांहि यश यावयाचें नाहीं. तसेंच भीमानें दुर्योधनाची मांडी चूर्ण करण्याची प्रतिज्ञा केल्याची त्यास आठवण देतो. तेव्हां अर्जुन भीमासमोर आपल्या

मांडीवर थाप मारतो. भीमाच्या लक्षांत ती खूण येते. व दुर्योधन प्रहार करण्याकरितां उडी मारीत असतां भीम त्याच्या मांडीवर आघात करतो. तेव्हां एखादें झाड उपटून पडावें त्याप्रमाणें तो जमिनीवर कोसळतो. परंतु तें युध्द पहात असलेला बलदेव भीमाला अधर्मयुध्द केल्याबद्दल दोष देतो. कारण गदायुध्दाच्या नियमांप्रमाणें प्रतिस्पर्ध्यास नाभीच्या खालीं प्रहार करावयाचा नसतो. बलदेव रागानें आपल्या रथांत बसून निघून जातो, आणि भीम हा कपटानें युध्द करणारा व दुर्योधन हा धर्मानें युध्द करणारा अशीं यांचीं नांवें जगांत राहतील असें म्हणतो.

नंतर युधिष्ठिर कृष्णाला हस्तिनापुरास धृतराष्ट्र व गांधारी यांचें सांत्वन करण्यास पाठवितो व कृष्णहि आपल्या शक्तीप्रमाणें तें कार्य करतो. पांडव ती रात्र शिबिराच्या बाहेर एका नदीवर घालविण्याचें ठरवितात.

अश्वत्थामा व त्याचे सोबती यांस दुर्योधनाच्या पतनाची बातमी कळल्याबरोबर ते त्या ठिकाणीं येऊन त्या मांडी मोडून पडलेल्या वीराकरितां दुःख करतात. परंतु अश्वत्थामा पांडवांचा नाश करण्याची प्रतिज्ञा करतो व दुर्योधन त्यास सेनापति नेमतो.

**पांडवांच्या शबिरांतील रात्रीची कत्तल**—महा युध्दांतून वांचलेले हे तीन कौरव वीर दुर्योधनाची रजा घेऊन रणांगणापासून कांहीं अंतरावर असलेल्या एका झाडाखालीं येतात व तेथें रात्र घालविण्याचा बेत करतात. कृप व कृतवर्मा यांस लवकरच झोंप लागते; परंतु क्रोध व सूडाची तीव्र इच्छा यामुळें अश्वत्थाम्यास झोंप येत नाहीं. थोड्या वेळानें ते ज्या झाडाखालीं बसलेले असतात त्या झाडावर एक कावळ्यांचा थवा विश्रांति घेत असलेला त्यास आढळतो व एकाएकीं एक भयंकर घुबड येऊन त्या सर्व निद्रिस्थ पक्ष्यांस ठार मारून टाकतांना त्याच्या दृष्टीस पडतें. या दृश्यामुळें आपले शत्रू निद्रिस्थ असतां त्यांच्यावर छापा घालून त्यांचा खून करण्याची कल्पना त्यास सुचते. तो आपल्या सोबत्यांस जागें करून आपली कल्पना त्यांस सांगतो. तेव्हां कृप आपला शत्रु निद्रिस्त व असाहाय्य असतां त्यास मारणें हें पातक आहे असें म्हणून त्या बेतापासून त्यास परावृत्त करण्याचा प्रयत्न करतो; परंतु अश्वत्थामा पांडवांनीं सत्याच्या सेतूचा कधींच शतशः भंग केला आहे असें म्हणून आतां आपण फक्त सूडाचाच विचार केला पाहिजे आणि त्या विचारापासून आपणांस कोणताहि मनुष्य परावृत्त करूं शकणार नाहीं असें सांगतो. "मी माझ्या पित्याचा घात करणाऱ्या पांचालांचा रात्रीं झोंपेच्या वेळींच नाश करीन. त्याकरितां मला पुढील जन्म एखाद्या कीटकाच्या किंवा पक्ष्याच्या योनींत घ्यावा लागला तरी हरकत नाहीं." याप्रमाणें निश्चय करून तो रथांत बसून शत्रूच्या शिबिराकडे जातो. व आपण चोराप्रमाणें शिबिरांत प्रवेश करून कोणी बाहेर पळून जाण्याचा प्रयत्न केल्यास त्यास ठार मारण्याकरितां बाकीच्या दोघांस दरवाजांत उभे करतो. प्रथम तो धृष्टद्युम्नाच्या शिबिरांत प्रवेश करून त्यास लाथ मारून जागा करतो व एखाद्या पशूप्रमाणें त्याचा गुदमरून प्राण घेतो. नंतर तो मृत्यूप्रमाणें एका तंबूतून दुसऱ्या तंबूत व एका बिछान्यापासून दुसऱ्या बिछान्याकडे जाऊन एकामागून एक, निर्दयपणें सर्व निद्रिस्थ व अर्धवट जागे असलेल्या वीरांचा, द्रौपदीचे पांच पुत्र व शिखंडी यांसह वध करतो. मध्यरात्र होण्यापूर्वीच शत्रूकडील सर्व वीरांचा नाश होतो. हजारों वीर रक्तामध्यें लोळत पडलेले असतात. राक्षस व पिशाच्चें यांच्या झुंडीच्या झुंडी या घात केलेल्या वीरांचें रक्त व मांस यांची मेजवानी झोडण्याकरितां त्या शिबिरांत लोटतात. सकाळीं त्या सर्व क्षेत्रावर मृत्यूच्या भयाण शांततेचें साम्राज्य पसरलेलें असतें.

इकडे हे तीन वीर मृत्यूच्या द्वारीं असलेल्या दुर्योधनाकडे येऊन त्याला सर्व शत्रुपक्षीय वीरांचा नाश केल्याची हकीगत सांगतात. दुर्योधनाला ही आनंददायक बातमी समजतांच तो मोठ्या सुखानें प्राण सोडतो.

इकडे या सर्व प्रलयामधून वांचलेला धृष्टद्युम्नाचा सारथी पांडवांनां त्यांचे व द्रुपदाचे सर्व पुत्र आणि सर्व सैन्य यांचा नाश झाल्याची वार्ता कळवितो. तेव्हां युधिष्ठिर मूर्च्छित होतो व त्याचे बंधू मोठ्या कष्टानें त्याला पुन्हां सावध करतात. नंतर तो द्रौपदी व इतर कुटुंबांतील स्त्रियांस बोलावतो. तो शिबिराकडे परत येतो त्यावेळीं तेथील दृश्य पाहून त्याचा धीर खचतो. इतक्यांत द्रौपदी पुढें येऊन आपल्या पुत्रांच्या व भावाच्या मृत्यूबद्दल शोकानें व्याकुळ होऊन तीक्ष्ण अशा औपरोधिक शब्दांत युधिष्ठिराचें, त्यानें मिळविलेल्या या मोठ्या विजयाबद्दल अभिनंदन करते. तथापि पुत्रांबद्दलच्या शोकाइतकाच अश्वत्थाम्याबद्दल तिच्या मनांत द्वेष उत्पन्न होऊन त्याचा सूड उगवल्याखेरीज अन्न न घेण्याचा ती निश्चय करते.

तेव्हां भीम अश्वत्थाम्याच्या पाठीस लागतो परंतु त्याचा पराजय होत नाहीं. अखेरीस अश्वत्थामा द्रौपदीनें मागितलेला आपल्या डोक्यावरील मणि स्वतःच काढून देतो. आपल्याजवळ असलेल्या ब्रह्मास्त्रानें कुरुकुलांतील अखेरचा अंकुर जो उत्तरेच्या पोटांतील गर्भ त्याचा तो नाश करतो. यामुळें उत्तरा पुढें एका मृत बालकास जन्म देते परंतु कृष्ण त्यास जिवंत करतो. याचें नांव परीक्षित असें असून याचा पुत्र जनमेजय याच्याच यज्ञामध्यें महाभारत प्रथम पठण केलें जातें. कृष्ण अश्वत्थाम्यास "तू रोगी होऊन दुर्गंधियुक्त शरीरानें मनुष्यापासून दूर अशा जंगलामध्यें तीन हजार वर्षे फिरत राहशील" असा शाप देतो. कदाचित हा भाग आरंभीं महाभारतांत नसावा.

**स्त्रियांचा मृतांबद्दलचा शोक**—धृतराष्ट्रास अत्यंत दुःख होतें. तेव्हां विदुर व संजय त्याचें शांतवन करण्याचे पुष्कळ प्रयत्न करतात, परंतु त्यांस यश येत नाहीं. अखेरीस स्वतः व्यास येऊन त्याचें शांतवन करतात. आतां मृतांचे और्ध्व देहिक संस्कार करावयाचे असतात त्यांकरितां धृतराष्ट्र, गांधारी व इतर राजस्त्रियांस पाचारण करतो. तेव्हां त्या मोठमोठ्यानें शोक करीत रणांगणाकडे जातात. वाटेंत त्यांनां कौरवांकडील जिवंत राहिलेले तीन योध्दे भेटतात; व आपण रात्रीच्या वेळीं पांडवांच्या शिबिरांत केलेल्या भयंकर नाशाचें वृत्त सांगतात. परंतु पांडव आपला सूड घेतील म्हणून तेथें न थांबतां ते पळून जातात. लवकरच पांडव व कृष्ण येऊन त्यांस मिळतात, अखेरीस मोठ्या प्रयासानें कृष्ण पांडवांचें व वृद्ध धृतराष्ट्र व गांधारी यांचें कसेंबसें सख्य घडवून आणतो परंतु ही गोष्ट त्यांस फार कठिण जाते. कारण भीमानें गांधारीच्या शंभर पुत्रांपैकीं एकहि पुत्र जिवंत न ठेवल्यानें तिला भीमास क्षमा करणें फारच जड जातें. परंतु द्रौपदीचे सर्व पुत्र मृत झालेले असल्यामुळें दोघीहि समदुःखी असल्यामुळें त्यांचें कसेंबसें सख्य होतें. नंतर गांधारी आपल्या पुत्रांकरितां शोक करते. हा भाग अत्यंत करुणरसपूर्ण असून गांधारीनें केलेलें रणांगणाचें वर्णन फारच हृदयद्रावक आहे.

नंतर सर्व मंडळी रणांगणावर येतात. तेथें त्यांच्या दृष्टीस भयंकर असा देखावा पडतो. छिन्नविच्छिन्न झालेल्या प्रेतांसभोंवतीं पक्षी, कोल्हे, नरमांसभक्षक राक्षस वगैरेंचे थवेच्या थवे जमलेले असतात. व त्यांतूनच मृत वीरांच्या स्त्रिया व माता अतिशय शोक करीत हिंडत असतात. गांधारी हें सर्व पाहून कृष्णाला उद्देशून पुन्हा शोक करते. तिच्या दृष्टीस दुर्योधनाचें प्रेत पडतें आणि तिला दुर्योधनानें ज्यावेळीं युध्दाकरितां जातांना तिचा निरोप घेतला त्या प्रसंगाची आठवण होते. ती म्हणते, " ज्याला नेहमीं सुंदर स्त्रिया पंख्यांनीं वारा घालीत त्याला आतां हिंस्र पक्षी आपल्या पंखांनीं वारा घालीत आहेत. " तथापि आपल्या शूर पुत्रांच्या मरणापेक्षां किंवा आपल्या रणांगणांत मृत्यु पावून स्वर्गांत स्थान मिळविलेल्या शंभर पुत्रांच्या मरणापेक्षां आपल्या सुना त्या प्रेतांच्या राशींमध्यें आपले पती व पुत्र यांचीं प्रेतें शोधून काढण्याकरितां आपले केस मोकळे टाकून निराशेनें इकडून तिकडे फिरत असतांना पाहून तिला अतिशय शोक होतो. तिला ज्याप्रमाणें कृष्णमेघांमध्यें चंद्र असावा त्याप्रमाणें मोठमोठ्या हत्तींच्या शवांमध्यें आपला चतुर पुत्र विकर्ण छिन्नविच्छिन्न झालेला दृष्टीस पडतो. नंतर मृत्यूनेंहि ज्याचें तेज यत्किंचितहि कमी झालें नाहीं असा अर्जुनपुत्र अभिमन्यु तिच्या दृष्टीस पडतो. त्याची तरुण स्त्री त्याच्याजवळ येऊन त्याच्या शरीरावर हात फिरविते. त्याचें कवच काढून त्याचे रक्तानें माखलेले केंस सावरते व त्याचें शिर अंकावर घेऊन त्याच्याशीं अत्यत प्रेमानें भाषण करते. आणि स्वर्गांतील अप्सरांशीं क्रीडा करीत असतां मधून मधून आपलें स्मरण व्हावें म्हणून त्याचा विनंति करते. नंतर गांधारीच्या दृष्टीस एका वेळीं ज्याबद्दल सर्व वीरांस भीति वाटत असे परंतु आतां वादळाच्या योगानें उपटून पडलेल्या झाडाप्रमाणें जो जामनीवर पडलेला आहे असा कर्ण पडतो. नंतर तिचा जांवई सिंधु देशचा राजा जयद्रथ यास ती पाहाते. त्याच्या स्त्रिया त्याच्या प्रेताभोंवतीं जमलेले पक्षी हांकून देण्याचा व्यर्थ प्रयत्न करीत असतात व तिची कन्या दुःशला शोक करीत करीत आपल्या पतीचें शिर शोधीत असते. तेथेंच मद्रदेशचा राजा शल्य हाहि पडलेला असतो. त्याची जीभ गिधाडें खात असतात व त्याच्या स्त्रिया गाळांत रुतलेल्या हत्तीभोंवतीं जमणाऱ्या हत्तीणींप्रमाणें त्याच्या प्रेताभोंवतीं शोक करीत बसलेल्या दिसतात. शरपंजरीं पडलेला भीष्महि तिच्या नजरेस पडतो व तो अस्तास जाणाऱ्या सूर्याप्रमाणें भासतो. याप्रमाणें द्रोण, द्रुपद इत्यादि अनेक मोठमोठ्या मृत वीरांबद्दल शोक करून अखेरीस ती कृष्णाला कौरव व पांडव त्यांचा नाश न

टाळल्याबद्दल रागानें दोष देते आणि " यापुढें छत्तीस वर्षांनीं तूं आपल्याहि कुलाचा नाश घडवून आणशील आणि तुला स्वतःलाहि अरण्यांत भयंकर रीतीनें मृत्यु येईल " त्यास असा शाप देते.

नंतर युधिष्ठिर सर्व मृतांचा प्रेतसंस्कार करण्याबद्दल आज्ञा देतो. तेव्हां मोठमोठ्या चिता रचून त्यांवर तूप व तेल ओतण्यांत येतें. सुगंधी काष्ठें आणि उंची वस्त्रें, मोडलेले रथ व शस्त्रास्त्रें प्रेतांबरोबर दग्ध करण्यांत येतात. याप्रमाणें सर्व शत्रुमित्रांबद्दल शोक व त्यांचा प्रेतसंस्कार झाल्यानंतर मृतांस तिलांजली देण्याकरितां तीं सर्व गंगेवर येतात.

कदाचित् पहिल्या महाभारतकाव्याचा येथेंच शेवट झाला असावा. परंतु सध्यांच्या महाभारतांत पांडवांची कथा पुढें चालविली आहे.

**अश्वमेध**—मृतांस तिलांजलि देण्याच्या वेळीं कुंती कर्ण हा आपला पुत्र असून युधिष्ठिरानें आपला वडील भाऊ म्हणून त्यास तिलांजली दिली पाहिजे असें प्रथमच सांगते. तेव्हां युधिष्ठिराला सर्व आप्त व मित्र यांजबरोबर आपल्या भावाचाहि नाश केल्याबद्दल फारच दुःख होतें व मोठ्या उद्वेगानें तो राज्य सोडून यति होऊन अरण्यांत जाण्याचा आपला बेत जाहीर करतो. त्याचे बंधू व कृष्ण त्यास राज्याचा स्वीकार करण्याबद्दल पुष्कळ विनंति करतात परंतु तो आपला निश्चय सोडीत नाहीं.तेव्हां प्रत्यक्ष व्यास तेथें येऊन त्यास सर्व पापांचा क्षय करण्याकरितां अश्वमेध यज्ञ करण्यास सांगतात. युधिष्ठिर त्यांचें म्हणणें मान्य करतो व यज्ञाची तयारी करण्यांत येते. विधीप्रमाणें अश्वमेधाचा अश्व पृथ्वीवर फिरण्याकरितां सोडण्यांत येतो व त्याचें रक्षण करण्याकरितां अर्जुनाची योजना होते. तो अश्वाबरोबर निरनिराळ्या देशांतून सर्व देशभर पर्यटन करतो. या पर्यटनांत त्यास कुरुयुध्दामध्यें पराभव पावल्यामुळें त्याचे शत्रू बनलेल्या अनेक राष्ट्रांशीं व योद्धयांशीं युध्दें करावीं लागतात. अर्जुन पुष्कळ पराक्रम करतो परंतु शक्य त्या ठिकाणीं युध्द करण्याचें टाळून सर्व पराभूत राजांस यज्ञाकरितां आमंत्रण करतो. एक वर्षानंतर तो अश्वासह यज्ञाकरितां हस्तिनापुरास परत येतो व तेथें त्याचें स्वागत करण्यांत येतें. नंतर यज्ञास आरंभ होऊन सर्व निमंत्रित राजे तेथें प्राप्त होतात. यज्ञसमारंभ पूर्ण झाल्यानंतर युधिष्ठिर सर्व पृथ्वीचें दान व्यासास करतो. व्यास उदार मनानें ती त्यास परत करून ब्राह्मणांस पुष्कळ धन देण्यास सांगतो व युधिष्ठिर ब्राह्मणांनां पुष्कळ धन देऊन त्यांचा आशिर्वाद घेतो व आपल्या पातकांपासून मुक्त होऊन यापुढें नीतीनें राज्य करतो.

**धृतराष्ट्राचा अंत**—धृतराष्ट्र हा वडील असल्यामुळें प्रत्येक गोष्टींत त्याचा सल्ला घेण्यांत येतो व गांधारीलाहि मान देण्यांत येतो. याप्रमाणें तो वृध्द राजा पांडवांच्या दरबारीं पंधरा वर्षें पांडवांशीं सख्य ठेवून राहतो. फक्त भीमाबद्दल त्याचें मन निवळत नाहीं. भीमानें त्याच्या पुत्रांचा नाश केल्यामुळें त्याचें मन त्याला पूर्णपणें क्षमा करण्यास कधींहि तयार होत नाहीं व भीमहि कटु भाषणानें त्याचें मन वरच्यावर दुखवीत असे. अखेरीस पंधरा वर्षांनीं तो वृध्द राजा अरण्यांत जाऊन वानप्रस्थ होऊन रहाण्याचा बेत करतो व युधिष्ठिर मोठ्या नाखुषीनें त्यास संमति देतो. परंतु कृष्ण सर्व नीतिमान राजे आपला अंत रणांगणांत किंवा अरण्यामध्यें वानप्रस्थाश्रमांत करून घेतात असें म्हणतो. याप्रमाणें धृतराष्ट्र व गांधारी हीं अरण्यांत रहावयास जातात व कुंती, संजय आणि विदुर हींहि त्यांस जाऊन मिळतात. कांहीं कालानंतर विदुर मरणाच्या द्वारीं असतां पांडव अरण्यांत जाऊन आपल्या आप्तांची भेट घेतात. यानंतर दोन वर्षांनीं धृतराष्ट्र, गांधारी आणि कुंती हीं वणव्यांत सांपडून जळून गेल्याची व संजय हिमालयाकडे गेल्याची बातमी येते.

**कृष्ण व यादवकुलाचा नाश**—कुरुयुद्धानंतर छत्तीस वर्षांनीं पांडवांनां गांधारीचा शाप खरा झाल्याची व कृष्ण आणि त्याचें सर्व कुल नाश पावल्याची बातमी येते. एका उत्सवामध्यें मद्याच्या निशेमध्यें वृष्ण व अंधक या दोन कुलांतील वीरांचें भांडण होऊन त्यांचें परस्परांत युद्ध होतें व सर्व यादव एकमेकांस ठार मारतात. कृष्ण आपला बंधु बलदेव याचा शोध करतो तों तो आसन्नमरण असलेल्या स्थितींत त्याच्या दृष्टीस पडतो. बलदेवाच्या नाकांतून एक मोठा पांढरा सर्प बाहेर पडून समुद्राकडे जातो व तेथें नागराज वासुकी त्याचें स्वागत करतो. नंतर कृष्ण त्या अरण्यांत बसून विचारांत मग्न होतो. तेथें जरा या नांवाचा एक व्याध त्यास मृग समजून त्याच्या नाजुक असलेल्या तळपायावर बाण मारतो व त्यामुळें तो मरण पावतो.

**पांडवांचें महाप्रस्थान**—पांडवांस त्यांच्या जिवलग मित्राच्या मरणानें फार दुःख होऊन ते आपल्या अखेरच्या प्रवासास निघतात. युधिष्ठिर परीक्षिताची

राज्यावर स्थापना करून आपल्या प्रजेचा निरोप घेतो. नंतर ते पांचहि बंधू व त्यांची स्त्री द्रौपदी वल्कलें धारण करून एका कुत्र्यासह हिमालयपर्वतावर चढून मेरुपर्वतापर्यंत जातात. मार्गांत प्रथम द्रौपदी मृत होऊन पडते. नंतर सहदेव, नंतर नकुल, त्यामागून अर्जुन आणि शेवटीं भीम याप्रमाणें मृत्यु पावतात. यानंतर इंद्र आपल्या दिव्य रथांत बसून युधिष्ठिरास स्वर्गांत नेण्याकरितां येतो. परंतु आपल्या बंधूविरहित आपणांस स्वर्गांत राहावयाचें नाहीं असें सांगून युधिष्ठिर त्याबरोबर जाण्याचें नाकारतो. तेव्हां इंद्र त्याचे बंधू व द्रौपदी हीं पुन्हां स्वर्गांत भेटतील असें सांगतो. परंतु युधिष्ठिर आपणांबरोबर आपल्या कुत्र्यासहि स्वर्गांत प्रवेश मिळाला पाहिजे असें म्हणतो. परंतु ती गोष्ट इंद्र मुळींच कबूल करीत नाहीं. अखेरीस कुत्र्याचें रूप धारण केलेला धर्म स्वतः प्रगट होऊन युधिष्ठिराची सत्यनिष्ठेबद्दल वाहवा करतो. याप्रमाणें ते स्वर्गास जाऊन पोहोंचतात. परंतु तेथें आपले भाऊ किंवा द्रौपदी हीं दृष्टीस न पडल्यामुळें युधिष्ठिर तेथें राहाण्याचें नाकारतो. तेथें तो प्रत्यक्ष दुर्योधनालाहि स्वर्गांतील एका सिंहासनावर बसलेला व त्यास तेथें मान मिळत असलेला पाहून आपणांस हा स्वर्गवास पुरे, आपण आपले बंधू व कर्ण इत्यादि वीर ज्या लोकांत असतील तेथें जातों असें सांगतो. तेव्हां देव त्याच्याबरोबर एक दूत देऊन त्याला यमलोकांत पाठवितात. तेथें पापी लोक भोगीत असलेल्या भयंकर यातना त्याच्या दृष्टीस पडतात. या भयंकर दृश्यापासून तो मागें फिरण्याच्या विचारांत आहे तोंच त्याला थांबण्याविषयीं विनंति करणारे आवाज ऐकूं येतात. कारण त्याच्या शरीरापासून निघणाऱ्या सुगंधित वायूनें त्या पीडित आत्म्यांस समाधान वाटतें. तेव्हां त्या दुःखपिडीत जीवांबद्दल दया येऊन तो त्यांस तुम्ही कोण आहां असें विचारतो. तेव्हां ते आपण त्याचे बंधू व इतर आप्त आहों असें सांगतात. तेव्हां त्यास दैवी न्यायाबद्दल संताप व दुःख होऊन तो आपण स्वर्गांत येण्यास तयार नसून नरकांतच राहाणार असा निरोप त्या दूताबरोबर देवांकडे पाठवितो. परंतु लवकरच देव त्याच्याकडे येतात आणि इंद्र त्यास सांगतो कीं, ज्या लोकांचें पुण्य थोडें असून पाप पुष्कळ असतें त्यांस प्रथम स्वर्गांत व नंतर नरकांत पाठविण्यांत येतें. परंतु ज्यांचें पाप थोडें असतें ते नरकामध्यें थोड्या वेळांतच त्याबद्दल प्रायश्चित भोगून निरंतर स्वर्गसुखाचा अनुभव घेतात. त्याला स्वतःलाहि द्रोणास फसविल्याबद्दल प्रथम नरकांत यावें लागलें आणि त्याप्रमाणेंच त्याचे बंधू व इतर मित्र यांच्याहि पापांचें नरकामध्यें क्षालन होईल. इतक्यांत लवकरच नरकांतील सर्व यातना व दुःखें अदृश्य होऊन आपण स्वर्गांत असून आपणांस देवांचें रूप प्राप्त झालें आहे असें त्या सर्वांस दिसून येतें.

महाभारताचा वर सारांशरूपानें सांगितलेला भाग हा महत्त्वाचा असून यानें सुमारें अठरा पर्वांतील अर्धा भाग व्यापला आहे. इतर अर्धा भाग हा मुख्यत्वेंकरून उपदेशपर व कथात्मक असून त्याचा प्रत्यक्ष कौरव व पांडव यांमधील युद्धाशीं फारसा संबंध नाहीं. त्या भागाबद्दल माहिती पुढें दिली आहे.

**महाभारतांत अंतर्भूत झालेलीं प्राचीन वीरकाव्यें**—राजांच्या वंशावळी पठण करणें किंवा जरूर पडल्यास कल्पनेनें त्या तयार करणें हें हिंदुस्थानांतील सूतांचें एक काम असे. यामुळें प्राचीन आर्षकाव्यांत व पुराणांत वंशवर्णनाचें महत्त्व फार होतें. संभवपर्व नांवाच्या आदिपर्वांतील एका उपपर्वांत, कौरवपांडवांची वंशावळी दिलेली आहे; तींत त्यांच्या प्राचीन पूर्वजांची उत्पत्ति देवांपासून झालेली आहे, असें दाखविलें आहे. प्राचीन काळच्या या राजांच्या अनेक मनोरंजक गोष्टीहि त्या पर्वांत सांगितल्या आहेत. भरतकुलांत उत्पन्न झालेल्या कौरव पांडवांच्या पूर्वजांमध्यें अर्थात एका भरताचा उल्लेख आढळतो. व या भरतावरूनच महाभारत हें नांव पडलें असावें अशी एक उपपत्ति आहे, परंतु भरत हें एक ऋग्वेदकालीन राष्ट्र असल्याचें आपणांस ऋग्वेदावरूनच दिसून येतें व दुष्यन्तपुत्र भरत याशीं देशाच्या नांवाचा संबंध वेदोत्तरकालीं जोडला गेला असावा. हा भरत हा दुष्यंत व शकुंतला यांचा पुत्र होता. कालिदासाच्या शाकुंतल नाटकावरून शकुंतलेचें नांव सर्व जगास आतां परिचित झालें आहे. तिची कथाहि संभवपर्वांत सांगितलेली आहे.

परंतु महाभारतांतील शकुंतलेच्या कथेंत नंतर बराच फेरबदल झाला आहे. कारण आपणांस उपलब्ध झालेल्या गोष्टींत जुन्या वीरकाव्याचें मूळस्वरूप अगदीं थोड्या प्रमाणांत दृष्टीस पडतें असा आक्षेप विंटरनिट्झ आणतो, तो आम्हांस बरोबर वाटत नाहीं. कालिदासाच्या नाटकांतील प्रसंग व कथानक हीच कविकृति असावीसें वाटतें. आक्षेप काढतांना प्रमाणें म्हणून विंटरनिट्झ म्हणतोः अरण्य,

शिकार व आश्रम यांचें केलेलें वर्णन वीरकाव्याला शोभणारें नसून तें अर्वाचीन, दिखाऊ दरबारी काव्यासारखें पांडित्यदर्शक आहे व गोष्टहि चित्ताकर्षक नसून ती फारशा कुशलतेनेंहि रचलेली दिसत नाहीं. शापामुळें व अंगठी हरवल्यामुळें दुष्यंतानें शकुंतलेला ओळखिलें नाहीं असें कालिदासानें दर्शविलें आहे. परंतु महाभारतांतील कथेंत दुष्यंतानें शकुंतलेला कां ओळखिलें नाहीं हें सांगितलेलें नाहीं. या ठिकाणीं इतकेंच सांगितलें आहे कीं, आपल्या पुत्राविषयीं दरबारच्या लोकांच्या मनांत शंका येऊं नये म्हणून ईश्वरी निकालाची त्यानें वाट पाहिली. 'शकुंतलेचें म्हणणें खरें असून तिचा पुत्र, दुष्यंत राजाचाच आहे' अशी आकाशवाणी होईपर्यंत शकुंतला व तिचा मुलगा यांनां आपण ओळखित नाहीं असें त्यानें दर्शविलें. या ठिकाणचे दोन श्लोक खात्रीनें जुन्या शकुंतलाकाव्यापैकीं असून ते जुन्या सूत लोकांच्या काव्यांतीलच असले पाहिजेत असें विंटरनिट्झ मानतो.

आपल्या व आपल्या मुलाच्या हक्कांसाठीं भांडत असलेली शकुंतला व तिला ओळख देण्याची ज्याला इच्छा नाहीं असा राजा या दोघांच्या संभाषणांत अनेक जुनें व मूळ श्लोक कायम ठेविलेले असावेत. हा संभाषणाचा भाग जुन्या कथानकांत फार महत्त्वाचा असला पाहिजे; व शकुंतलेच्या भाषणांत कांहीं नैतिक म्हणीहि आल्या असाव्यात.

मुलापासून बापाला कसें सुख प्राप्त होतें याबद्दलहि शकुंतलेनें भाषण केलें असावें; परंतु विवाहसुख, पतिपत्नींचें कर्तव्य, आईबापांचें कर्तव्य, व सत्य या संबंधाचीं जीं सुंदर तत्त्वें शकुंतलेच्या तोंडीं घातलीं आहेत तीं सर्व प्राचीन वीरकाव्यपैकीं असावीं असें विंटरनिट्झला वाटत नाहीं. धर्मशास्त्रांतून घेतलेले विवाहसंबंधाचे व वारसासंबंधाचे नियम कांहीं पद्यांत आढळतात. अशा पद्यांवरून असें वाटतें कीं ब्राह्मण पंडितांनीं नीतिशास्त्र व धर्मशास्त्र यांवरील ग्रंथ लिहितांना शकुंतलेच्या भाषणाचा उपयोग केला असावा.

याशिवाय या भाषणांत प्राचीन लघुकाव्याचेंहि कांहीं उत्कृष्ट मासले दृष्टीस पडतात. तथापि मूळ भारतांतील कथा साधी व अकृत्रिम असून नाटकांतील अंगठी हरवल्याचा वगैरे भाग कालिदासकल्पित असले पाहिजेत व वरील नीतिशास्त्र व धर्मशास्त्रीय विवेचन महाभारतास ब्राह्मणी संस्करण होतांना अंतर्भूत केलें गेलें असावें असें आम्हांस वाटतें.

महाभारतांतील नायकांच्या पूर्वजांमध्यें ययाति राजाचें नांव आहे; त्याची माहिती संभवपर्वांत दिलेली आहे. परंतु ज्याप्रमाणें धर्म व नीतिविषयक तत्त्वप्रतिपादनासाठीं शकुंतलाकथानकाचा उपयोग करण्यांत आला आहे, त्याचप्रमाणें पूर्वीं फार मोठया असलेल्या ययातीच्या कथेला नैतिक कथानकाचें स्वरूप देण्यांत आलें असावें; नंतर निवृत्तिपर काव्याचा तो एक आवडता विषय होऊन बसला. तथापि त्यांतील प्राचीन वीरकाव्यांचीं सर्व लक्षणें नाहींशीं झालेलीं नाहींत; त्या राजाच्या दोन स्त्रियांची कथा विनोदपरिप्लुत भाषेंत सांगितलेली आहे; व त्यामध्यें जुन्या वीरकाव्याच्या छटा दृग्गोचर होतात. ययातीच्या उपाख्यानाचा कांहीं भाग पुढें दिला आहे.

असुरांचा पुरोहित शुक्र याची कन्या देवयानी हिचा असुरराजकन्या शर्मिष्ठा ही अपमान करते म्हणून शुक्र त्या राजास सोडून जाण्यास तयार होतो, तेव्हां त्याचें शांतवन करण्याकरितां तो राजा आपल्या मुलीस देवयानीची दासी म्हणून देतो. पुढें लवकरच देवयानीचा विवाह ययाति नामक राजाशीं होतो. तेव्हां ती त्यापासून शर्मिष्ठा या दासीशीं कोणताहि संबंध ठेवणार नाहीं असें वचन घेते. परंतु राजा आपलें वचन मोडून शर्मिष्ठेशीं गुप्तपणें विवाह करतो व तिच्यापासून त्याला तीन पुत्र होतात. देवयानीस ती गोष्ट कळून येऊन ती आपल्या पित्याकडे गाऱ्हाणें करते. तेव्हां ययाति तत्काल जरेनें व्याप्त होईल असा शुक्र त्यास शाप देतो. अखेरीस ययातीच्या विनवणीवरून त्यास आपली जरा दुसऱ्या कोणासहि देतां येईल असा उश्शाप देतो. ययाति एकदम जराव्याप्त झाल्यामुळें व आयुष्यांतील सुखोपभोगाची इच्छा पूर्ण न झाल्यामुळें आपल्या मुलांपैकीं एकेकास आपली जरा घेऊन तारुण्य देण्याबद्दल विचारतो. तेव्हां सर्व मोठया मुलांनीं नाकारल्यामुळें ययाती त्यांस शाप देतो. सर्वांत धाकटा मुलगा पुरु त्याचें म्हणणें मान्य करून आपलें तारुण्य देऊन त्याचें म्हातारपण घेतो. ययाति आणखी एक हजार वर्षें तारुण्य व सर्व सुखांचा उपभोग घेतो. तो आपल्या दोन राण्यांसह विलास करतो एवढेंच नव्हे तर विश्वाची नांवाच्या अप्सरेबरोबरहि तो विलास भोगतो, तरीहि त्याची भोगेच्छा तृप्त होत नाहीं. अखेरीस हजार वर्षें पूर्ण झाल्यावर तो म्हणतोः—"भोगेच्छा भोगानें कधींहि तृप्त होत नाहीं तर उलट अग्नींत तूप ओतल्याप्रमाणें ती

वाढतच जाते. सुवर्ण, पशु, स्त्रिया यांनीं भरलेली सर्व पृथ्वीहि मनुष्यास पुरी पडत नाहीं याचा विचार करून आत्म्याच्या पूर्तीकडे लक्ष दिलें पाहिजे."

नंतर तो पुरु या आपल्या पुत्रास त्याचें तारुण्य परत देऊन त्याची राज्यावर स्थापना करतो व अरण्यांत तप करण्यास निघून जातो. या तपाच्या प्रभावानें तो स्वर्गांत जाऊन तेथें त्यास देवऋषि फार मान देतात. एका प्रसंगीं इंद्राशीं बोलतांना केलेल्या दर्पोक्तीवरून त्यास स्वर्गांतून घालवून देण्यांत येतें, परतु पुन्हां आपल्या नातवांबरोबर त्यास स्वर्गाचा प्राप्ति होते. ययातीचा पिता नहुष याचा महाभारतांत अनेक ठिकाणीं उल्लेख येतो. वेदांमध्यें प्रसिद्ध असलेल्या पुरुरव्याचा हा बलिष्ठ नातु असून हा दस्यूंच्या संघांचा नाश करतो. परंतु तो ऋषींपासूनहि करभार घेतो व त्यांस वाहनें उचलावयास लावतो. देवांवर श्रेष्ठत्व मिळवून तो इंद्रपद घेतो व शचीचीहि इच्छा करतो. उद्दामपणानें तो अगस्त्य ऋषीस रथ ओढावयास लावतो तेव्हां तो त्यास सर्परूपानें दहा सहस्र वर्षे पृथ्वीवर वास करशील असा शाप देतो.

महाभारतामध्यें अनेक संपूर्ण वीरकथा उपाख्यानें म्हणून अंतर्भूत केलेलीं आढळतात. प्रसिद्ध नलदमयंती-आख्यान हें अशा उपाख्यानांत प्रमुख आहे. पांडव वनवासांत असतां, एकदां बृहदश्व ऋषि त्यांना येऊन भेटले, तेव्हां युधिष्ठिर आपल्या दुर्दैवाची हकीकत त्यांस सांगून, माझ्यापेक्षां अधिक दुर्दैवी राजा कधीं झाला होता काय असा त्या ऋषींस प्रश्न करतो. तेव्हां दुर्दैवी नल राजानें आपल्या पुष्कर नांवाच्या भावाबरोबर द्यूत खेळून आपलें सर्वस्व गमावून आपल्या सुंदर व पतिव्रता स्त्रीबरोबर वनवास पत्करिला; व तेथेंहि कलीनें त्यांचा पिच्छा पुरविल्यामुळें, चालण्यानें दमून जाऊन जिला गाढ झोंप लागली आहे अशा आपल्या एकनिष्ठ पत्नीला अरण्यांत सोडून तो निघून गेला व पुढें ती दुःखी व श्रमित होऊन चेदी देशाच्या राणीकडे आश्रयार्थ गेली व नल कर्कोटक नागाच्या दंशामुळें रूप पालटल्यानंतर ऋतुपर्णाकडे सारथी व आचारी म्हणून राहिला व अखेरीस दीर्घ कालानंतर त्यांचें पुनर्मीलन कसें झालें इत्यादि कथा त्या ऋषीनें युधिष्ठिरास सांगितली.

ही सर्व हकीकत हृदयद्रावक रीतीनें, साध्या व सरळ भाषेंत एखाद्या अद्भुत गोष्टीप्रमाणें पण विनोदपूर्ण अशी सांगितलेली आहे.

या कथानकाचा नायक नलनैषध व शतपथ-ब्राह्मणामधील नडनैषिध हे दोन्ही एकच होत. "नडनैषिध प्रत्येक दिवशीं यमाला दक्षिणेकडे वाहून नेतो" असें त्या ठिकाणीं म्हटलें आहे. यावरून तो शतपथकालीं हयात असून दक्षिणेकडे स्वाऱ्या करीत असला पाहिजे असें दिसतें व यावरून त्याच्या अतिशय प्राचीनत्वाचा बोध होतो. हा भाग महाभारताच्या जुन्या घटकांपैकीं असला पाहिजे. तसेंच इतर पुराणांसारखा या काव्यांत पाल्हाळ दिसत नाहीं; वरुण व इंद्र यांसारख्या वेदांतील देवांचाच फक्त यांत उल्लेख असून विष्णु व शिव यांचा उल्लेख आढळत नाहीं. या काव्यांत दिसून येणारी सांस्कृतिक स्थिति फारशी विकास पावलेली दिसत नसून बरीच प्राचीन असावी. या काव्याच्या पहिल्या दोन सर्गांत, प्रेम व लग्नासाठीं वधूचा अनुनय या गोष्टींत दर्शविलेली रमणीयता व अद्भुतता अगदीं प्राचीन काव्यांत कोठेंहि आढळून येत नाहीं. फक्त पुरूरवस् व उर्वशी यांच्या प्रेमविषयक काव्यावरून असें वाटतें कीं, अगदीं प्राचीन काळींहि भारतयि लोकांनां अद्भुत प्रेमकथा अवगत असावी. हें काव्य अतिशय लोकप्रिय असल्यामुळें संस्कृतमध्यें व अर्वाचीन भारतीय भाषांमध्यें या काव्याचें वारंवार रूपांतर झालेलें आहे.

महाभारतांतील दुसरें महत्त्वाचें उपाख्यान म्हटलें म्हणजे रामोपाख्यान होय. महाभारताच्या इतर भागांप्रमाणे नल-काव्यामध्येंहि कांहीं प्रक्षिप्त भाग आहे. नलोपाख्यान हें सुंदर व प्राचीन सूत काव्यांपैकीं एक महत्त्वाचें काव्य आहे. परंतु रामचरित्रावर रामायण हें एक स्वतंत्र आर्षकाव्य असल्यामुळें महाभारतांतील रामोपाख्यान हें फक्त वाङ्मयेतिहासदृष्टीनेंच महत्त्वाचें आहे. वाल्मीकीनें आपलें आर्षकाव्य ज्या वीरगीतांच्या आधारानें लिहिलें तीं वीरगीतें किंवा प्रत्यक्ष रामायण यांचा सारांश काढून प्रस्तुत रामोपाख्यान तयार झालें असावें; परंतु अगदीं प्राचीन काळच्या रामाच्या पराक्रमासंबंधीं गीतांचें व महाभारतांतील रामोख्यापानाचें स्वरूप हीं सारखीं नाहींत. रामाच्या पत्नीला रावणानें पळवून नेऊन पुष्कळ दिवसपर्यंत कैदेंत ठेविलें होतें, यामुळें युधिष्ठिराची स्त्री द्रौपदी हिचें अपहरण झाल्यावर त्याला अत्यंत विषाद वाटल्यामुळें, त्याचें सांत्वन करण्यासाठीं मार्कंडेय ऋषीनें हें रामोपाख्यान त्यास सांगितलें. महाभारतांत इतर ठिकाणींहि रामोपाख्यानासंबंधीं

अनेक उल्लेख आलेले आहेत. उदाहरणार्थ भीम व हनुमान यांच्या भेटीसंबंधीं हकीकत पूर्वी दिलेलीच आहे.

महाभारतांतील पांचव्या पर्वातील प्राचीन सूतकाव्याच्या एका महत्त्वाच्या भागाचा अद्यापि विचार करावयाचा आहे. हा भाग म्हणजे वीरमातां विदुला हिची कथा होय. क्षत्रियांचें कर्तव्य विसरूं नका असा आपल्या मुलांस कुंतीनें कृष्णाबरोबर निरोप पाठविला; व त्या प्रसंगीं क्षत्रियपत्नी विदुला हिनें संजय नांवाच्या आपल्या मुलास युद्धास कसें उद्युक्त केलें याबद्दल कथा सांगितली. सिंधु राजानें पराभव केल्यामुळें संजयाचें धैर्य अगदीं खचून जाऊन तो आपली माता विदुला व पत्नी यांसह हालअपेष्टा भोगीत होता; परंतु अतिशय जोरदार भाषणानें त्याच्या भित्रेपणाबद्दल व आळसाबद्दल विदुलेनें त्याची निर्भर्त्सना करून क्रोधयुक्त शब्दांनीं तिनें त्याला युद्धास प्रवृत्त केलें. या प्राचीन वीरकाव्याची भाषा फारच जोरदार आहे.

अनेक प्रकारें विदुलेनें त्याची कानउघाडणी व निंदा केल्यावर, ज्याचें भाषण नेहमीं संक्षिप्त असे अशा त्या संजयानें उत्तर केलें कीं, " लढाईत जय मिळविण्यास माझ्याजवळ कांहीं साधन नाहीं; व मला मृत्यु आला तर तुझें कोणत्याहि प्रकारें कल्याण होणार नाहीं. "

परंतु क्षत्रियानें न डगमगतां आपलें कर्तव्य केलें पाहिजे असा संजयास त्याच्या आईनें पुन्हां उपदेश केला; व तो जरी मंदमति होता तरी सरते शेवटीं त्याच्या आईनें त्याच्या ठिकाणीं कर्तव्यजागृति उत्पन्न केली.

ज्यावर ब्राह्मणी संस्कार विशेष झाला नाहीं अशा कांहीं वीरकाव्यांपैकीं हा एक भाग आहे. क्षत्रियतेजानें ज्याला स्फूर्ति दिली आहे अशा जुन्या सूतकाव्यांत वरचेवर ब्राह्मणी संस्करणें होत असत. महाभारताच्या बाराव्या पर्वात प्राचीन इतिहासभाग आहे. संजयाच्या पुत्राच्या मरणानंतर संजयाचें सांत्वन करण्यासाठीं नारदानें त्यास तो इतिहास सांगितला आहे. प्राचीनकाळीं अनेक शूर राजांनांहि मृत्युवश व्हावें लागलें असा त्या इतिहासाचा तात्पर्यार्थ आहे. परंतु त्यापेक्षां त्यांनीं जे अनेक यज्ञ केले, व विशेषतः त्यांनीं ऋत्विजांनां जीं मोठमोठीं दानें दिलीं त्यांस येथें प्रामुख्य देण्यांत आलेलें आढळतें. प्रत्येक स्त्री चार घोड्यांच्या रथामध्यें बसली आहे, त्या रथामागें सोन्याच्या माळा घातलेले असे शंभर हत्ती चालले आहेत, प्रत्येक हत्तीमागून हजार हजार अश्व चालले आहेत, प्रत्येक अश्वामागून हजार हजार गाई, व प्रत्येक गाईमागून हजार हजार अज व शेळ्या चालले आहेत, अशा सुवर्णालंकृत दहा लक्ष सुंदर स्त्रिया एका राजानें यज्ञाची दक्षणा म्हणून ऋत्विजांनां दिल्या असें वर्णन आहे. यांतील मूळ वीरकाव्य कोणतें व ब्राह्मणी संस्करण कोणतें हें शोधून काढणेंहि अवघड आहे.

**महाभारतांतील ब्राह्मणी संस्करण पावलेल्या कथा**—हिंदुस्थानांतील प्राचीन सूतकाव्यें हळू हळू लोप पावूं लागल्यामुळें व ब्राह्मण संस्कृतीचें वर्चस्व वाढूं लागल्यामुळें महाभारत हा ग्रंथ ब्राह्मणांच्या ताब्यांत गेला. त्यामुळें महाभारतांत देवांविषयींच्या अनेक महत्त्वाच्या कथा एवढेंच नव्हे तर ब्राह्मणांनीं रचिलेलीं सुंदर काव्यें व त्यांचें चातुर्य दर्शविणारे असे इतर महत्त्वाचे भागहि महाभारतांत आढळतात.

जनमेजय राजाच्या सर्पसत्राची गोष्ट पौराणिक कथा व आख्यायिका या दृष्टीनें मनोरंजक आहे; सर्प व गरुड यांची उत्पत्ति व त्यांमधील वैर इत्यादि अनेक कथा या सर्पसत्राच्या कथेंत आलेल्या आहेत. परंतु हें सर्पसत्र म्हणजे दुसरें कांहीं नसून सर्पांचा नाश करण्यासंबंधींचा तोडगा किंवा जादु होती अशी समजूत विंटरनिट्झ व्यक्त करतो. याप्रकारचें स्पष्टीकरण करणें म्हणजे ऐतिहासिक कथाभाग न ओळखणें होय. हें सर्पसत्र म्हणजे नागराष्ट्राच्या संहारावर रूपक होय हें मागें वेदविद्या या भागांत (पृष्ठ २२४) स्पष्ट केलेंच आहे. तथापि सर्पनाशाकरितां यज्ञ करणें ही गोष्टहि प्राचीन काळीं रूढ असून याच्या यूरोपमध्यें असलेल्या अस्तित्वाबद्दल पुरावा मांडणारा लेख डॉ. विंटरनिट्झ यांनीं लिहिला आहे. [ दास श्लांगेनोपफर देस महाभारत–कुल्टुर गोश्चिक्टिलचेस औस डेर टिएरवेल्ट. प्राग, १९०४. ] जनमेजयाचा पिता परीक्षित यास तक्षक नांवाच्या नागराजानें दंश केल्यामुळें तो मरण पावला. आपल्या पित्याच्या मरणाचा सूड घेण्यासाठीं एक मोठा यज्ञ करण्याचें जनमेजयानें ठरविलें व ऋत्विजांच्या मंत्रसामर्थ्यानें पृथ्वींतील जवळच्या व दूरच्या सर्व सर्पांनां तेथें आणून अग्निकुंडांत उडी घेण्यास भाग पाडिलें इत्यादि वर्णन फारच स्वाभाविक व बहारीचें आहे.

या सर्पसत्राच्या गोष्टीला वैदिक ग्रंथांतील कद्रू व विनता यांची जुनी गोष्ट जोडली आहे. कद्रू ही पृथ्वी

व सर्पमाता विनता ही आकाशाची कमान असून पुराणांतील गरुडपक्षाची आई होय. या गोष्टींत समुद्रमंथनाच्या हकीकतीचाहि समावेश केलेला आहे; ही समुद्रमंथनाची गोष्ट रामायण व इतर पुराणांत आलेली असून आधुनिक काव्यांतून वगैरे दृष्टान्त व उपमा देण्यामध्यें या कथेचा आपणांस वारंवार उपयोग केलेला आढळतो. या प्रचंड कार्यासाठीं देव व दानव एकत्र होऊन अमृत मिळविण्यासाठीं त्यांनीं समुद्रमंथन केलें; मन्दर पर्वतास मन्थन-दंड करून वासुकि सर्पास दोरी बनविलें, प्रथमत: फेंसांतून चंद्र निघाला; नंतर अनुक्रमें लक्ष्मी, सुरा इत्यादि रत्नें बाहेर आलीं. सरते शेवटीं देदीप्यमान असा अमृतकुंभ घेऊन धन्वन्तरी बाहेर आला. ही सर्व हकीकत आपल्या प्रत्यक्ष डोळ्यासमोर उभी रहावी अशा रीतीनें या गोष्टीचें वर्णन केलेलें आहे.

आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीचा वरील गोष्टींत समावेश केला आहे. जनमेजयाप्रमाणें रुरूनेंहि सर्व सर्पांचा नि:पात करण्याची शपथ घेतली. जनमेजयाच्या सर्पसत्राची ही पूर्णिका असल्यामुळें या गोष्टीस महत्त्व आहे.

या गोष्टींतील नायक रुरू हा च्यवनाचा वंशज होता. या च्यवनाला अश्विनीकुमारांनीं पुन्हां तारुण्य मिळवून दिलें असें ऋग्वेदांत सांगितलेलें आहे. ब्राह्मणग्रंथांत या पुनर्युवीकरणाची गोष्ट सविस्तरपणें दिलेली आहे; व महाभारतांतहि या गोष्टीची पुनरावृत्ति झालेली आहे. या दंतकथेचें वेदामधील स्वरूप व या वीरकाव्यांतील स्वरूप यांची तुलना करणें बोधपर होईल. महाभारतांत ही गोष्ट जशी आहे तशी खालीं देऊन, ब्राह्मणग्रंथांतील कथानक व महाभारतांतील कथानक यांमध्यें महत्त्वाचे फरक काय आहेत ते देतों.

भृगपुत्र, च्यवन यानें एका सरोवराच्या कांठीं कडक तपश्चर्या चालविली. एखाद्या खांबाप्रमाणें हालचाल न करतां तो इतकीं वर्षे उभा राहिला कीं, सरते शेवटीं त्याच्यावर मातीचा एक ढीग तयार झाला व तो स्वत: मुंग्यांच्या वारुळाप्रमाणें दिसूं लागला. या सरोवरापाशीं एकदां अनेक अनुयायांसह शर्याति राजा आला. त्याची तरुण कन्या सुकन्या, आपल्या मैत्रिणींसह अरण्यांत खेळत असतां त्या वल्मीकापाशीं आली. त्या वारुळांत त्या ऋषीचे फक्त दोन डोळे काजव्याप्रमाणें दिसत होते. मौजेनें व जिज्ञासेनें त्या मुलीनें कांव्यानें चकाकणाऱ्या वस्तु म्हणून त्या ऋषीचे डोळे डंवचून फोडिले. तेव्हां त्या ऋषीनें रागानें शर्यातीच्या सैन्यामध्यें मलमूत्राचा अवरोध करून टाकिला. त्या राजानें पुष्कळ वेळपर्यंत त्या अरिष्टाचें कारण शोधिलें. अखेरीस त्या महातपस्व्याचा अपमान झाला असें कारण कळतांच त्याची क्षमा मागण्यासाठीं तो त्याच्याकडे गेला. राजानें आपली मुलगी दिल्यास ऋषि समेट करण्यास कबूल झाला. अशा प्रकारें ती तरुण मुलगी त्या वृद्ध व अशक्त ऋषीची पत्नी झाली. एके दिवशीं स्नानगृहांतून स्नान करून बाहेर पडतांना ती अश्विनीकुमारांच्या दृष्टीस पडली. त्या वृद्ध व कुरूप मनुष्यापेक्षां आपल्यापैकीं कोणाची तरी बायको होण्याविषयीं त्यांनीं तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु आपल्या पतीशीं एकनिष्ठपणें रहाण्याची तिनें आपली इच्छा प्रदर्शित केली. तिच्या पतीला त्यांनीं पुन्हां तरुण बनवावें व नंतर त्या तिघांपैकीं वाटेल त्याला तिनें पसंत करावें असें अश्विनीकुमारांनीं सुचविलें. च्यवनाला ही गोष्ट पसंत पडल्यामुळें त्या मुलीनेंहि आपली संमति दिली. नंतर अश्विनीकुमारांनीं त्या वृध्द ऋषीस एका तळ्यामध्यें उतरण्यास सांगून त्या दोघांनींहि त्या तळ्यांत बुडी मारिली. नंतर ते तिघेहि सारखेच तेजस्वी होऊन वर आले. नंतर नीट विचार करून सुकन्येनें च्यवनालाच पसंत केलें. पुन्हां तारुण्य प्राप्त करून दिल्याबद्दल अश्विनीकुमारांस सोमरस देण्याचें च्यवनानें वचन दिलें. शर्यातीसाठीं च्यवनानें यज्ञ केला, त्यावेळीं त्यानें अश्विनीकुमारांस सोमरस दिला. परंतु मर्त्य लोकांत वैद्य म्हणून हिंडणाऱ्या अश्विनीकुमारांस सोम मिळाला हें इंद्रास पसंत पडलें नाहीं. इंद्रानें घेतलेल्या या आक्षेपाकडे लक्ष न देतां च्यवनानें तसाच यज्ञ चालविला. कोपाविष्ट इन्द्र त्याच्यावर वज्र टाकण्याच्या बेतांत होता; परंतु त्यावेळीं त्या ऋषीनें तें वज्र नि:सत्त्व करून टाकिलें व इंद्राचा पूर्णपणें पाणउतारा करण्यासाठीं, च्यवनानें आपल्या तप:सामर्थ्यानें मद नांवाचा एक भयंकर राक्षस उत्पन्न केला. त्याचा एक जबडा पृथ्वीवर असून दुसरा आकाशापर्यंत गेलेला होता; अशा त्या भयंकर तोंडाचा राक्षस इंद्राजवळ येऊन गिळून टाकण्याची त्याला भीति दाखवूं लागला. गर्भगळित झाल्यामुळें देवेंद्रानें त्या ऋषीची करुणा भाकिली; च्यवनानें संतुष्ट होऊन मादक सुरा, स्त्रिया, द्यूत व मृगया यांमध्यें त्याची विभागणी करून त्या राक्षसाला नाहींसें करून टाकिलें.

.. या काव्यांतील कथेचें स्वरूप वैदिक वाङ्मयांतील कथेपेक्षां पुष्कळ अर्वाचीन आहे हें इतर ठिकाणांप्रमाणें येथेंहि स्पष्ट दिसतें. अतिशयोक्ति, विनयाचा पूर्ण अभाव व ब्राह्मण व तपस्वी यांचें देवांवरील फाजील वर्चस्व हे ब्राह्मणी अर्वाचीन काव्याचे विशिष्ट गुण आहेत. देवांच्या वैदिक दंतकथेंतील इंद्राच्या गोष्टींतहि; ऋग्वेदसूक्तांत आलेल्या दैत्यांचा, इंद्र हा जेता होता असें सांगितलेलें नाहीं. इंद्र व वृत्र यांमधील युद्धाचें जुनें स्वरूप महाभारतांतहि आहे हें खरें आहे—महाभारतांत ही गोष्ट दोन वेळां सविस्तर दिलेली आहे—तथापि इंद्रानें वृत्रास मारून ब्रह्महत्येचें पातक केलें या गोष्टीवर बराच जोर दिला आहे. या भयंकर पापाचें क्षालन करण्यासाठीं त्यास कसे कष्ट भोगावे लागले हें फार मोठया विस्तारानें सांगितलें आहे. कांहीं वेळपर्यंत स्वर्गांतील आपल्या राज्यपदास त्यास मुकावें लागलें; व नहुषाला त्याची जागा मिळाली अशी मांडणी केली आहे.

धार्मिक ब्राह्मणांच्या तपःसामर्थ्याच्या योगानें इंद्राच्या वर्चस्वासहि धक्का पोहोंचे, हें कित्येक गोष्टींवरून सिद्ध होतें. तपश्चर्येच्या योगानें प्रत्यक्ष इंद्राला यमाकडे पाठवितां येईल असेंहि म्हटलें आहे. कडक तपश्चर्येच्या योगानें देवांनां डोईजड होणाऱ्या ऋषीला मोह पाडण्यासाठीं, एखाद्या सुंदर अप्सरेला त्याच्याकडे पाठविण्याची युक्ति इंद्राला अनेक वेळां योजावी लागली.

इंद्राचा मित्र अग्नि याचेंहि पूर्वीचें वैभव नाहींसें झाल्याचें महाभारतांत दाखविलें आहे. तथापि अग्नि व अग्निदेव यांच्या वैदिक कल्पनांशीं महाभारतांतील अग्नीच्या गोष्टींचा संबंध जोडलेलाच आहे. 'स्त्रियांचा पति' असें ऋग्वेदांत त्याला नांव आहे. परंतु अग्नीच्या साध्या प्रेमकथांचें महाभारतांत वर्णन केलें आहे. नील राजाच्या सुंदर मुलीवर तो एकदां आसक्त झाला. राजकन्येच्या सुंदर ओष्ठांतील मधुर श्वासानें चेतविल्याशिवाय राजवाड्यांतील पवित्र अग्नि प्रज्वलित होत नसे. अग्नीला आपली मुलगी देऊन टाकणें राजाला भाग पडलें. या उपकाराबद्दल, तूं अजिंक्य होशील व तुझ्या शहरांतील स्त्रियांनां विषयोपभोगाविषयीं पूर्ण स्वातंत्र्य मिळेल असा त्या राजाला अग्नीनें वर दिला. अग्नीच्या खादाडपणाचाहि वेदांत उल्लेख केलेला आहे. भृगु ऋषीच्या शापामुळें तो सर्वभक्षक झाला असें महाभारतांतील गोष्टींत सांगितलें आहे. अग्नीला अनेक बंधू असून, तो पाण्यामध्यें किंवा अरणीमध्यें लपून बसतो या वैदिक कल्पना असून या कल्पनांवरूनच ब्राह्मणग्रंथांत काल्पनिक कथा रचिल्या गेल्या. परंतु अग्नि लपून कां बसला व देवांनीं त्याला शोधून कसा काढिला याबद्दलची सविस्तर हकीकत फक्त महाभारतांतच दिली आहे.

शतपथब्राह्मणांतील मनु व मत्स्य यांच्या जलप्रलयाची गोष्टहि महाभारतांत येणाऱ्या वेदांतील कथांपैकींच आहे. उच्च काव्यकल्पना असलेल्या बऱ्याच भागांत महाभारतांतील मत्स्यकथा व ब्राह्मणामधील दंतकथा यांमध्यें बरीच भिन्नता दिसून येते. उदाहरणार्थ एखाद्या उन्मत्त स्त्रीप्रमाणें खवळलेल्या महासागरांत वाटेल तिकडे वहात जाणाऱ्या जहाजांचें वर्णन घ्या. सेमिटिक जलप्रलयाच्या कथांप्रमाणेंच महाभारतामध्येंहि जहाजामध्यें बीं नेल्याचा उल्लेख आहे ही गोष्ट महत्त्वाची आहे. हिंदु लोकांतील जलप्रलयाची कल्पना सेमिटिक जलप्रलयाच्या गोष्टीवरून घेतली असावी असें यावरून कांहीं पाश्चात्त्य अनुमानितात. परंतु तेथील उपसंहाराहून या गोष्टीचा उपसंहार भिन्न आहे. या ठिकाणीं मीं ब्रह्मदेव आहे असें प्रसिद्ध करून पुन्हां जगदुत्पत्ति करण्यासाठीं त्या मत्स्यानें मनूला बोलाविलें. त्याप्रमाणें कडक तपश्चर्या करून मनूनें जग उत्पन्न केलें.

मृत्युसंज्ञक स्त्रीची गूढ व सुंदर गोष्ट विशेष परिचयाची नाहीं. तिचा महाभारतांत दोन वळां उल्लेख आलेला आहे. लढाईंत अनेक वीर पतन पावल्यामुळें शोकग्रस्त होऊन, "मृत्यु मृत्यु म्हणून म्हणतात तो कोणाचा कोण ? तो कसा उत्पन्न झाला ? तो लोकांचें कां हरण करितो ?" वगैरे प्रश्न युधिष्ठिरानें विचारले असतां, आपल्या पुत्राच्या मरणामुळें ज्याचें कशानेंहि सांत्वन होईना अशा अनुकम्पक राजाला, नारदानें सांगितलेली गोष्ट व्यासानें युधिष्ठिराला सांगतली. त्या गोष्टीचें संक्षिप्त कथानक खालीं दिल्याप्रमाणें आहे—

ब्रह्मयानें प्राण्यांनां उत्पन्न केल्यावर, त्यांची संख्या एकसारखी वाढत जाऊन हानि बिलकुल होत नव्हती. जगांतील प्राण्यांची संख्या अवाढव्य वाढल्यामुळें आपल्याला आतां भार सहन होत नाहीं अशी पृथ्वीनें ब्रह्मदेवाजवळ तक्रार केली. नंतर तो प्राण्यांची संख्या कमी कशी करावी याचा विचार करूं लागला; पण त्याला कोणताहि उपाय सुचेना. यामुळें त्याला क्रोध येऊन त्याच्या रोमरंध्रांतून क्रोधाग्नि बाहेर येऊं लागला.

त्या ज्वाळांनीं सर्व जग व्यापून टाकिलें व सर्वांचा निःपात होतो कीं काय अशी भीति वाटूं लागली. परंतु रुद्राला प्राण्यांची कींव आली; व त्याच्या मध्यस्थीमुळें ब्रह्मदेवानें आपला क्रोधाग्नि नाहींसा केला; व प्राण्यांना उत्पत्ति व लय हीं दोन्ही असावींत अशी त्यानें आज्ञा केली; नंतर श्यामनयना, श्यामवस्त्र परिधान केलेली व उत्तमोत्तम अलंकार धारण केलेली अशी एक स्त्री त्याच्या अंगांतून निघाली. दक्षिण दिशेकडे जाण्याची तिची इच्छा होती; परंतु ब्रह्मदेव तिला हांक मारून म्हणाला, "हे मृत्यो, जगांतील प्राण्यांचा संहार करून टाक; विश्वसंहाराच्या माझ्या विचारापासून व माझ्या क्रोधापासून तुझी उत्पत्ति झालेली आहे; म्हणून, मूर्ख, पण्डित वगैरे या सर्वांचा एकदम संहार करून टाक." नंतर कमलाचा मुकुट धारण केलेली अशी ती मृत्यु—देवता मोठ्यानें आक्रोश करूं लागली; परंतु ब्रह्मदेवानें तिचे अश्रू आपल्या हातांत पकडले, या भयंकर कृत्यापासून आपली सुटका करण्याबद्दल तिनें त्याची प्रार्थना केली; "हे भूताधिपते, तुला वंदन असो, लाडकीं मुलें, विश्वासु मित्र, आईबाप, बंधु, ऋषी वगैरे निरपराधी प्राण्यांचा माझ्या हातून अकालीं संहार घडूं न देण्याच्या कामीं तूं माझ्यावर कृपा कर;अशा प्रकारें प्राणहानी झाल्यास माझी निंदा होईल, अशी मला भीति वाटते व त्या दुर्दैवी लोकांचे अश्रू मला जाळून भस्म करून टाकतील अशीहि मला भीति वाटते." परंतु ब्रह्मदेवाचें वाक्य अनन्यथाकरणीय असल्यामुळें तिचें कांहीं एक चाललें नाहीं;परंतु लोभ, क्रोध, द्रोह, मोह, ईर्ष्या, असूया व निर्लज्जता इत्यादि दुर्गुणांच्या योगानें लोक बिघडून जातील, व माझ्या हातांत असलेले तुझे अश्रू रोग बनून ते प्राण्यांचा संहार करतील; व अशा रीतीनें संहाराबद्दलचा दोष तुझ्यावर येणार नाहीं. उलटपक्षीं पापी लोक आपल्या पापामुळें नाश पावतील; तूंच स्वतः धर्म आहेस व प्राण्यांबद्दल राग, द्वेष न बाळगणारी धर्माधिष्ठात्री देवताहि तूंच आहेस. इत्यादि गोष्टी सांगून तिचें समाधान करण्यांत आलें.

ही गोष्ट, मनूची गोष्ट व जलप्रलयाची गोष्ट, या तिन्ही गोष्टींत ब्रह्मदेवाला उच्च पद दिलेलें आहे यावरून त्या गोष्टी फार प्राचीन आहेत हें सिध्द होतें.

या मृत्युदेवतेच्या गोष्टींत रुद्रापेक्षां ब्रह्मदेवाचा दर्जा उच्च प्रतीचा कल्पिलेला आहे. ब्रह्मदेवानें रुद्रास "लहानग्या पुत्रा" असें संबोधिलें आहे. सर्व देवांमध्यें रुद्र श्रेष्ठ आहे असें ज्या गोष्टींत सांगितलें आहे त्या गोष्टी महाभारतांतील ब्राह्मणी काव्यांपैकीं अगदीं अलीकडच्या दिसून येतात.

विष्णूला उच्च पद ज्या गोष्टींत दिलेलें आहे त्या गोष्टींवरूनहि हीच गोष्ट दिसून येते. प्रचलित असलेल्या विष्णूच्या किंवा शिवाच्या उपासनेप्रमाणें ब्राह्मणांच्या जुन्या गोष्टींत किंवा दंतकथांत पुष्कळ वेळां फेरबदल करण्यांत आला. वैष्णवांच्या व विशेषतः शैवांच्या अशा प्रकारच्या पुरवण्या एखाद्या सुंदर चित्रावरील डागाप्रमाणें वारंवार दृष्टीस पडतात; या पुरवण्या सहज ओळखितां येतात, व त्या काढून टाकिल्या तर तें काव्य फारच उच्च प्रतीचें ठरतें. विष्णु व शिव यांची ज्या कथानकांत स्तुति केली आहे तीं कथानकें काव्य या दृष्टीनें कनिष्ठ प्रतीचीं आहेत.

पौराणिक कथांमध्यें इतर कोठेंहि मृत्यु देवतेचा उल्लेख आलेला नाहीं. परंतु वरील गोष्टींत मृत्यु देवता ही धर्माची अधिष्ठात्री देवता असल्याचें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें, यम व धर्म हे एकच होत अशी कल्पना सर्व महाभारतांत आहे. ब्रह्मवैवर्त पुराणांत मृत्यु देवतेचा आणखी फक्त एकदां उल्लेख आला आहे.

तथापि एकंदर ब्राह्मणी कथांपैकीं पतिव्रता सावित्रीच्या रमणीय अद्भुत कथेंत, यम व धर्म हे एकच आहेत हें जसें सुंदरपणें दाखविलें आहे तसें तें इतरत्र कोठेंहि दाखविलेलें नाहीं. त्या काव्याचें स्वरूप कांहींसें पारमार्थिक असल्यामुळें व त्यांत थोड्या पौराणिक कथा आल्यामुळें व बहुतेक गोष्ट अरण्यांतील आश्रमामध्यें घडल्यामुळें ब्राह्मणी दंतकथांमध्यें सावित्र्योपाख्यानाचा समावेश करतां येईल. हें उपाख्यान प्राचीन सूतकाव्यांत असावें असें निश्चितपणें म्हणतां येत नाहीं. कारण, पति पसंत करण्याच्या कामीं राजकन्या सावित्रीचें स्वतंत्रपणाचें आचरण, नारद ऋषी व तिचा पिता यांनीं आपली नापसंती दर्शविली असतांहि तिनें स्वतः पसंत केलेल्या मनुष्यासच वरण्याचा तिचा दृढ निश्चय, व आपण होऊन तिनें केलेली तपश्चर्या, तिनें केलेले यज्ञयाग, घेतलेलीं व्रतें व पाळलेले नियम, व विशेषतः आपल्या नवऱ्यासाठीं तिनें केलेली धीटपणाची मध्यस्थी, व यमावरहि ज्याचा परिणाम झाला असें तिचें चातुर्ययुक्त भाषण, या सर्व गोष्टींवरून ब्राह्मणी कल्पनेप्रमाणें असलेल्या अनुकरणीय स्त्रियांची आठवण न होतां द्रौपदी, कुन्ती, विदुला, वगैरे वीरकाव्यांतील स्त्रियांची आठवण होते.

परंतु सावित्री–गीत ज्यानें गाऊन दाखविलें तो सूत अगर ब्राह्मण कोणीहि असला तरी तो फार मोठा कवि होता यांत संशय नाहीं. जणुं काय, ती स्त्री आपल्याला प्रत्यक्ष दिसत आहे अशा प्रकारें त्या उच्च प्रतीच्या स्त्रीचें चरित्र रचण्याचें काम फक्त महा कवीच करूं शकेल. प्रेम व निष्ठा, सद्गुण व चातुर्य यांनीं भवितव्यता व मृत्यु यांच्यावर मिळविलेल्या जयाचें वर्णन नीतिशास्त्रोपदेशाप्रमाणें यत्किंचितहि कंटाळवाणें न होतां इतक्या उत्कृष्टपणें व सहृदयतेनें करणें हें फक्त खऱ्या कवीसच शक्य आहे. व इतकें सुंदर चित्र प्रतिभासंपन्न कवीच रेखाटूं शकेल. अत्यंत दुःखित अंतःकरणानें ती पतिव्रता आपल्या आसन्नमृत्यु अशा पतीबरोबर धैर्यानें चालली आहे. सर्पदंश झाल्यावर तिच्या पतीनें आपलें डोकें तिच्या मांडीवर ठेविलें आहे व भयंकर यम त्याचे प्राण बांधून नेऊं लागला आहे अशा स्थितींत आपल्या नवऱ्याच्या प्राणांसाठीं तिनें यमाशीं वाग्युद्ध केलें आहे व सुदैवानें त्या पतिपत्नीची पुन्हां भेट होऊन, एकमेकांनां आलिंगन देऊन तीं दोघें चंद्रप्रकाशांतून आपल्या घराकडे जाऊं लागलीं आहेत इत्यादि सर्व प्रसंग अगदीं प्राचीन काळीं निबिड अशा अरण्यांत घडलेला दाखविला आहे व त्या अरण्याच्या निर्जनतेची कल्पना आपल्याला या काव्यांत उत्तम प्रकारें करून दिलेली आहे; त्या अरण्यांतील फुलांचा सुवास आज आपण प्रत्यक्ष अनुभवीत आहोंत असें तेथील वर्णन वाचून वाटावयास लागतें; अशा प्रकारचें हें अद्भुत व निरुपमेय काव्य आहे.

सावित्री या पतिव्रतेच्या स्मरणार्थ किंवा स्वतः सौभाग्य व सुखप्राप्ति व्हावी म्हणून, आर्य स्त्रिया प्रत्येक वर्षी हें व्रत ( सावित्री व्रत ) अद्यापि पाळतांना आपण पहातोंच व या व्रताच्या वेळीं महाभारतांतील हें काव्य म्हणणें व श्रवण करणें हा त्या व्रताचा मुख्य भाग आहे हेंहि आपणांस ठाऊक आहेच. या काव्याचीं यूरोपीय भाषांतहि अनेक भाषांतरें झालीं आहेत.

ऋष्यशृंगाची कथा तीर्थयात्रा नांवाच्या प्रकरणांत आहे. अर्जुनाच्या भावांचें सांत्वन करण्यासाठीं आलेला लोमश ऋषीहि त्यांच्याबरोबर यात्रा करूं लागला. ज्या ज्या तीर्थांच्या ठिकाणीं ते गेले त्या प्रत्येक तीर्थाची माहिती त्या ऋषीनें त्यांनां सांगितली. अशा प्रकारें ब्राह्मणांनीं रचिलेल्या अनेक कथांचा समावेश या प्रकरणांत झालेला आहे. या बहुतेक कथा महाभारतास ब्राह्मणी संस्करण मिळतांना अंतर्भूत झाल्या असाव्या. उदाहरणार्थ, या प्रकरणांत पूर्वी सांगितलेली च्यवनाची व प्रख्यात अगस्त्य ऋषीचीहि कथा आहे. समुद्रांत रहाणाऱ्या कांहीं दैत्यांशीं युद्ध करतां यावें म्हणून, देवांनीं अगस्त्य ऋषीस समुद्र शोषून टाकण्यास सांगितलें व त्यानें तो समुद्र सहज प्राशन करून टाकिला. यासारख्या दुसऱ्याहि अगस्त्य ऋषीसंबंधीं अनेक कथा मधून मधून आढळतात.

देव व इतर लोक यांवर ब्रह्मर्षींचें प्रचंड वर्चस्व होतें हें दाखविण्याचा या अगस्त्यकथेचा उद्देश आहे. वसिष्ठ व विश्वामित्र हे प्रसिद्ध ऋषी अनेक कथांचे नायक आहेत असें महाभारतांत आढळून येतें व या कथांवरून अखेरीस ब्राह्मणांचें वर्चस्व दिसून येतें; परंतु ब्राह्मण व क्षत्रिय यांमध्यें वर्चस्वाबद्दल भांडण चालूं होतें हें या कथांवरून स्पष्ट दिसून येतें. या कथांचा उद्गम वैदिक कालामध्यें असून, रामायणामध्यें व इतर पुराणांमध्येंहि या कथा निरनिराळ्या रूपांत आलेल्या आहेत. या सर्व कथांत वसिष्ठाच्या धेनुहरणाची कथा फार प्रसिद्ध आहे. तिचा सारांश असा: विश्वामित्र हा क्षत्रिय असून, कान्यकुब्ज ( कनोज )–देशाचा राजा गाधी याचा पुत्र होता. एके दिवशीं शिकार करीत असतां विश्वामित्र राजा वसिष्ठ ऋषीच्या आश्रमांत आला. वसिष्ठाजवळ एक कामधेनु होती. खाद्य, पेय, रत्नें, वस्त्रें वगैरे ज्या गोष्टींची वसिष्ठास गरज लागे ती वस्तू ‘ दे ’ असें म्हटल्याबरोबर ती नन्दिनी धेनु त्यास देत असे. या उत्कृष्ट धेनूस अवलोकन करतांच ती आपणांपाशीं असावी असें विश्वामित्रास वाटलें; व त्या कामधेनूबद्दल वसिष्ठास तो दशसहस्र गाई देऊं लागला; परंतु यज्ञयागादि कृत्यांसाठीं लागणारें सर्व साहित्य त्या कामधेनूपासून मिळत असल्यामुळें वसिष्ठ ती कामधेनु विश्वामित्रास देईना. परंतु क्षत्रियांच्या रीतीप्रमाणें विश्वामित्र ती गाय बलात्कारानें नेऊं लागला; तेव्हां आतिथ्यधर्मास अनुसरून वसिष्ठानें विश्वामित्रास कांहीं एक अडथळा केला नाहीं; परंतु त्या अद्भुत गाईनें आपल्या अंगापासून अनेक बलाढ्य वीर उत्पन्न केले, त्यांनीं विश्वामित्राच्या सैन्याचा पराभव करून त्यास पिटाळून लाविलें. क्षत्रियांच्या सामर्थ्यापेक्षां ब्राह्मणांचें सामर्थ्य एकंदरींत अधिक आहे, असें त्या गर्विष्ठ राजास कळून आलें. तेव्हां ब्राह्मण होण्यासाठीं त्यानें

आपलें राज्य सोडून देऊन कडकडीत तपश्चर्या केली. व अविश्रांत श्रम करून त्यानें आपला हेतु सफल करून घेतला. यापुढील कथाभागाचें पाश्चात्यांतील अहस्वेर कथेशीं बरेंच सादृश्य आहे.

ब्राह्मण झाल्यावरहि विश्वामित्राचें वसिष्ठाशीं असलेलें वैर कायम राहिलें. राक्षसानें पछाडिलेल्या कल्माषपादानें, विश्वामित्राच्या चिथावणीवरून वसिष्ठाच्या पुत्रांस ठार मारिलें. परंतु वसिष्ठ इतका शांत होता कीं, कोपाविष्ट होण्यापेक्षां तो मरण्यास तयार झाला. आत्महत्या करण्याच्या उद्देशानें त्यानें मेरुपर्वतावरून उडी टाकिली, परंतु तो एका लोंकरीच्या गड्ड्यावर पडला. त्यानें अग्नींत उडी टाकिली परंतु अग्नीपासून त्याला कांहीं एक इजा झाली नाहीं. आपल्या गळ्यासभोंवतीं एक शिला बांधून त्यानें समुद्रांत उडी टाकिली, परंतु तो पुन्हां जिवंत बाहेर निघाला. म्हणून उद्विग्न होऊन तो आपल्या आश्रमांत परत आला. परंतु तेथें आपलीं मुलें नाहींत हें पाहून दुःखामुळें आत्महत्या करण्याचा तो पुन्हां विचार करूं लागला. आपले अवयव दोरीनें घट्ट बांधून पूर आलेल्या प्रवाहामध्यें त्यानें उडी टाकिली, परंतु त्या प्रवाहानें त्याचीं सर्व बंधनें तोडून टाकून त्याला एका किनाऱ्यावर नेऊन सोडिलें. हिंडत हिंडत, सुसर, व इतर हिंस्र प्राणी असलेल्या एका नदीपाशीं येऊन त्यानें त्या नदींत उडी टाकिली; परंतु भीतीनें त्या प्राण्यांनीं त्यास कांहीं एक इजा केली नाहीं. आपल्याला आत्महत्या करतां येत नाहीं असें पाहून, अनेक टेंकड्या व देश हिंडल्यावर तो आपल्या आश्रमांत परत आला. वाटेंत त्याची स्नुषा अदृश्यंती भेटली; व वेदांतील सूक्तें म्हणणाऱ्या त्याच्या मुलाच्या आवाजासारखा आवाज त्याच्या कानीं पडला. तो आवाज अद्यापि गर्भावस्थेंत असलेल्या त्याच्या नातवाचा होता; गर्भावस्थेंतच तो सर्व वेद शिकला होता ( तो आज बारा वर्षें अदृश्यंतीच्या गर्भांत होता. ) पुढें आपला वंश कायम रहाणार आहे असें कळतांच आत्महत्येचा विचार वसिष्ठानें सोडून दिला.

अशा प्रकारच्या ब्राह्मणी कथा वाङ्मयदृष्ट्या महत्त्वाच्या आहेत यांत शंका नाहीं; ब्राह्मणांचें केवळ वैभव दर्शविण्यासाठीं किंवा एखादें तत्त्व प्रस्थापित करण्यासाठीं रचिलेल्या अशा अनेक गोष्टी महाभारतांत आहेत, उदाहरणार्थ, आपल्या गुरूची आज्ञा पाळण्यासाठीं पराकाष्ठा करणाऱ्या उद्दालक आरुणिसारख्या शिष्यांच्या गोष्टी आहेत. एक प्रवाह अडवून शेतास पाणी देण्याची गुरूनें त्याला आज्ञा केली होती. परंतु प्रवाह अडविण्यास त्यास कांहीं एक साधन न सांपडल्यामुळें त्यानें स्वतःच्या देहाच्या योगानें तो प्रवाह अडवून टाकिला. एका राजानें एका ब्राह्मणाची गाय दुसऱ्या कोणास देऊन टाकिल्यामुळें, शिक्षा म्हणून त्याला सरड्याचा जन्म मिळाला अशीहि एक गोष्ट सांगितलेली आहे. ब्राह्मणांनां गोदान करणें यासारखें दुसरें पुण्य नाहीं हें दर्शविणाऱ्या दुसऱ्या अनेक कथा सांगितलेल्या आहेत. ज्ञानलालसेनें नचिकेतानें मृत्यूपलीकडे काय आहे हें यमास विचारण्यासाठीं यमलोकांत थोडे दिवस वास केला असें एका प्रसिद्ध उपनिषदांत सांगितलें आहे. गोदान करणाऱ्या लोकांस मिळणारा स्वर्ग पहाण्याची नचिकेतानें इच्छा प्रदर्शित केल्यामुळें, गोदानापासून प्राप्त होणाऱ्या पुण्यासंबंधीं एक मोठें व्याख्यान देऊन यमानें त्यास संतुष्ट केलें असें महाभारतांत सांगितलें आहे.

छाया व पादत्राण देणें हें पुण्यप्रद आहे हें सिद्ध करण्यासाठीं असें सांगितलें आहे कीं जमदग्नि ऋषि एकदां सूर्यावर क्रुध्द होऊन त्याला आकाशांतून खालीं ओढण्याच्या बेतांत होता; इतक्यांत छाया व पादत्राण देऊन सूर्यानें त्याचें सांत्वन केलें. विशेषतः उपदेशपर प्रकरणांत व बाराव्या व तेराव्या पर्वांत अशा प्रकारच्या अनेक कथा आहेत. महाभारताच्या या उपदेशपर भागांत इतिहास या सदराखालीं पुष्कळ लहान लहान कथा आलेल्या आहेत; धर्मशास्त्र, नीतिशास्त्र किंवा तत्त्वज्ञान वगैरे विषयांवरील फक्त वादविवाद उपस्थित करण्यासाठीं व त्या वादविवादांस एक प्रकारचें विशिष्ट स्वरूप देण्याच्या कामीं या गोष्टींचा उपयोग होतो. याज्ञवल्क्य, जनक, इत्यादि उपनिषदांतील तत्त्वप्रतिपादक या कथांमध्यें कधीं कधीं आढळतात ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे; उपनिषदें व बौध्द संवाद याप्रमाणें महाभारतांतील उपदेशपर इतिहासांतहि, राजे व ऋषी यांशिवाय सुशिक्षित स्त्रियांचाहि उल्लेख आलेला आहे.

**महाभारतांतील दृष्टांतपर व नीतिपर कथा**— ह्या सर्व बोधपर गोष्टी किंवा कथा जरी संवादरूपानें वर्णिलेल्या आहेत तरी बहुतांशानें ब्राह्मणी काव्यापेक्षां नीतिवैराग्यपर काव्यांतच यांचा अंतर्भाव होतो. नीतिवैराग्यपर काव्यांत व ब्राह्मणी काव्यांत बहुतांशीं समाजामध्यें लुप्त झालेल्या देवांविषयींच्या

प्राचीन कथा वर्णिलेल्या आढळतात व नीतिवैराग्यपर काव्यांत कल्पित गोष्टी, यक्ष किन्नरादिकांच्या कथा इ. लोकांच्या आवडीच्या वाङ्मयाशीं निकट संबंध दृष्टोत्पत्तीस येतो. कारण एक तर हीं नीतिवैराग्यपर काव्यें या कथांवरूनच रचलेलीं असतात आणि दुसरें त्यांचें स्वरूपहि बहुतांशीं या कथांसारखेंच असतें.

ब्राह्मणी कथा ऐतिहासिक संवादांप्रमाणेंच पुरोहित वर्गाचा हितसंबंध रक्षण करणाऱ्याच दृष्टीनें रचिलेल्या आहेत व त्यांत त्यांनींच प्रस्थापिलेलीं नीतितत्त्वें शिकविलेलीं आहेत. या शिकवणीची पराकाष्ठा लोकांनीं यज्ञयाग करून देवापेक्षां ब्राह्मणाचीच पूजा—अर्चा करावी असें जें प्रतिपादन केलें आहे, तें त्यांत दिसून येतें.

उलटपक्षीं नीतिवैराग्यपर काव्यांमध्यें मनुष्याच्या सर्वसाधारण नैतिक वर्तनाचें उद्घाटन असून त्यांत प्रामुख्यानें भूतमात्रावर प्रेम करावें व ऐहिकाचा परीत्याग करावा या उच्चतम तत्त्वाचें प्रतिपादन केलें आहे. मानवजातीची सर्वसाधारण नीतितत्त्वें प्रगल्भ दशेस नीतिवैराग्यपर काव्यांतच आलेलीं दृग्गोचर होतात व हीं सर्वसाधारण तत्त्वें मुख्यतः अखिल प्राणिमात्रांविषयीं प्रेम व इहलोकांविषयीं वैराग्य शिकवतात. ब्राह्मणांचा फायदा करून देईल अशीं शिकवण करणाऱ्या वाङ्मयांतील तत्त्वांचें खंडन प्रथम उपनिषदांमध्यें आढळतें व तदनंतर बौद्ध व जैन सांप्रदायिक ग्रंथामध्यें आहे, तितकेंच महाभारत व कांहीं पुराणांतून आढळून येतें. यामुळें निरनिराळ्या वाङ्मयांतून साधुसंतांविषयीं असलेल्या त्याच त्या कथा व बौद्धिक व नैतिक तींच तीं तत्त्वें अक्षरशः जशींच्या तशींच लिहिलेलीं आढळतात हीं कांहीं मोठी आश्चर्य करण्यासारखी गोष्ट नव्हे. भरतखंडांत प्रचलित असलेल्या कल्पित कथांतील जुन्यांत जुन्या कथा आपणांला या महाकाव्यांतच वाचावयास मिळतात. आणि त्या प्रचलित असलेल्या कथांचाच वास्तविक योग्य ठिकाणीं नीति व धर्म यांचीं तत्त्वें मनावर ठसावण्याकडे उपयोग केला आहे. एका ठिकाणीं धृतराष्ट्राचा मंत्रि त्याला खालीलप्रमाणें उपदेश करीत आहे. " धृतराष्ट्रा, ज्याप्रमाणें एका धूर्त जम्बुकानें व्याघ्र, अश्व, लांडगा व मुंगूस ह्या चार मित्रांचा भक्ष्य मिळेपर्यंत उपयोग करून घेतला व नंतर लुच्चेगिरीनें त्या सर्व मित्रांच्या हातावर तुरी देऊन तें सर्व भक्ष्य आपल्या एकट्याच्याच घशांत टाकलें त्याप्रमाणें तूं पांडवांशीं वर्तन कर." दुसऱ्या एका ठिकाणीं शिशुपालानें भीष्माला एका जरठ ढोंगी हंसाची उपमा दिलेली आहे. ती गोष्ट अशीः हंस नेहमीं नीतितत्त्वाविषयीं प्रवचन करीत असे व या रीतीनें त्यानें सर्व बरोबरीच्या पक्ष्यांचा पूर्ण विश्वास संपादन केला, तो इतका कीं, त्यांनीं आपलीं सर्व अंडीं संभाळण्याकरितां त्याच्या स्वाधीन केलीं. त्यानें तीं अंडीं हळूहळू भक्षण करण्याचा क्रम चालविला, याप्रमाणें बरींचशीं अंडीं नाहींशीं केलीं. अशा रीतीनें आपली फसवणूक केल्याबद्दल त्या ढोंगी हंसाला त्यांनीं ठार मारलें. तशीच भीष्माला उद्देशून एका विश्वासघातकी मांजराची गोष्ट उलूकानें दुर्योधनाच्या तर्फे युधिष्ठिराला सांगितलेली आढळते. ती अशीः गंगातीरावर एक मांजर उंच हात करून कडक तपश्चर्या करण्याचें ढोंग करून उभें होतें. तें वरून इतकें सात्त्विक, सुशील व सभ्य दिसत होतें कीं पक्ष्यांनीं त्याचें पूजन आरंभिलें. इतकेंच नव्हे तर उंदरांनीं सुद्धां त्यास आपलें संरक्षक नेमिलें. त्यानें मोठ्या आनंदानें व प्रेमानें त्यांचें योग्य पालन करण्याचें त्यांनां आश्वासन दिलें व आपण तपाच्या योगानें पाऊलभरदेखील हालण्यास असमर्थ झालों आहों असें भासविलें. मग अर्थातच मूषक त्यास नदीवर नेऊन पोंचवीत असत. त्या ठिकाणीं तो त्यांनां गट्ट करी. अशा रीतीनें तें लट्ठ बनलें. धूर्त विदुरदेखील कल्पित गोष्टींत मर्मज्ञ व वाकबगार दिसून येतो. त्याच्या तोंडीं शहाणपणाचीं अनेक वचनें घातलेलीं आढळून येतात; उदाहरणार्थ, त्यानें धृतराष्ट्राला स्वतःचें हित साधण्याकरितां पांडवांनां न छळण्याविषयीं उपदेश करतांना पुढील गोष्ट सांगितली. एका राजाकडे सुवर्णाची विष्ठा टाकणारे कांहीं पक्षी होते. त्यानें लोभानें त्यांच्या पोटांतील सर्व सुवर्ण एकदम मिळण्याकरितां त्यांचा वध केला. याप्रमाणें तो पक्षांनां व रोज मिळणाऱ्या सुवर्णालाहि मुकला. कौरवपांडवांमध्यें शांति व सख्य घडवून आणण्याकरितां विदुरानें दुसरीहि एक गोष्ट सांगितली आहे. एका व्याधानें पसरलेल्या जाळ्यांत दोन कपोत सांपडले असतां ते त्या जाळ्यासकटच उडाले. परंतु कांहीं वेळानें आपसांत त्यांचें भांडण सुरू झाल्यानें ते खालीं पडून व्याधाच्या हातांत सांपडले.

बहुतेक बोधप्रद कल्पित गोष्टी व तशाच दृष्टांतपर कथा आणि नीतिपर संवाद बाराव्या व तेराव्या पर्वांत आढळतात, व कांहीं इतर पर्वांतील नीतिपर भागांत आढळतात. यामधील अनेक गोष्टी बौध्दांच्या संग्रहांत व त्या नंतरच्या कथासंग्रहांत आलेल्या आहेत.

कांहीं यूरोपीय कथाग्रंथांतहि घेतलेल्या आहेत. उंदीर व मांजर यांची मैत्री सर्वथा अशक्य आहे या अर्थाच्या गोष्टी बेनफे यानें सर्व देशांतील वाङ्मयांतून शोधून काढल्या आहेत व त्यांची एक मालिका बनविली आहे.

पुष्कळशा सुंदर दृष्टांतकथा महाभारतांतील नीतिपर भागांतून आलेल्या आहेत. उदाहरणार्थ नम्रता धारण करणें उत्तम हा शहाणपणाचा सिद्धांत मनांत ठसविण्याकरितां नद्या व समुद्र यांमधील फार प्राचीन संवाद एका ठिकाणीं दिलेला आहे. समुद्र नद्यांस विचारितो, "तुम्हीं मोठमोठे विशाल वृक्ष, मुळें आणि शाखा यांसहवर्तमान उपटून वाहून मजकडे आणितां; परंतु आकारानें बारीक असलेला वेत कधींहि आणीत नाहीं." यावर गंगा त्यास उत्तर देते, "हे वृक्ष आपल्या जागेवर ताठ उभे असतात त्यामुळें जेव्हां पुराच्या प्रवाहाला अडथळा होतो तेव्हां त्यांनां आपली जागा सोडावी लागते तसें वेताला करावें लागत नाहीं. आमचा वेग आला आहे असें पाहतांच वेत नम्र होतो तसे दुसरे होत नाहींत. म्हणूनच आमचा वेग निघून गेल्यानंतर वेत पुनः पूर्ववत् ताठ उभा राहतो."

विदुरानें राजा धृतराष्ट्राला कूपांत पडलेल्या ब्राह्मणाची जी दृष्टांतकथा सांगितलेली आहे तिचा लौकिक साऱ्या जगभर झालेला आहे. या गोष्टीला सार्वदेशीय वाङ्मयामध्यें जें महत्त्व आहे तें लक्षांत घेऊन ती सार रूपानें पुढें देत आहों.

एक द्विज एका महान अरण्यांत फिरत असतां वाट चुकून हिंस्र पशूंनीं गजबजलेल्या एका अति गहन वनांत येऊन पोंचला, तो भयभीत झालेला ब्राह्मण कोठें वाट सांपडते काय म्हणून दाही दिशांकडे धावऱ्या धावऱ्या पाहात त्या वनांत इतस्ततः धावूं लागला. पुढें धावतां धावतां त्यानें सभोंवार पाहिलें तों त्या घोर अरण्यांत जिकडे तिकडे सांपळे व पाश मांडले आहेतु, एका अति भयंकर स्त्रीनें आपल्या हातांनीं त्यास मगर मिठी मारिली आहे, व पांच पांच फडांचे पर्वतप्राय नाग सर्वत्र आहेत असें दिसलें. त्या वनामध्यें एक खोल विहिर होती. तिच्या सभोंवार वेलींची गुंतागुंत झाली असून त्यांतच पुष्कळ गवत रुजलेलें होतें. त्या जलाशयांत तो बिचारा ब्राह्मण पडला. परंतु नशिबानें एका वेलीच्या गुंतागुंतींत त्याचे पाय अडकले. आणि फणसाचें मोठें फळ लोंबतें त्याप्रमाणें तो खालीं डोकें वर पाय होऊन त्या जलाशयांत उलटा लोंबूं लागला. तेथें त्याला आणखी एक भयंकर दृश्य दिसतें. त्या कूपामध्यें एक महा बलाढ्य व भयंकर सर्प त्याच्या नजरेस पडतो. व वर विहिरीच्या कांठावरच एक भला मोठा हत्ती दिसतो. त्या हत्तीला सहा तोंडें व बारा पाय असून तो कूपाकडे हळू हळू येत आहे असें त्याच्या दृष्टीस पडतें. जलाशयाजवळील एका वृक्षाच्या खांदीवर नाना प्रकारचे घोर स्वरूपाचे व भीतिकारक भुंगे घोंगावत आहेत आणि मध तयार करीत आहेत असें तो पहातो. त्या मधाची खालीं गळत असलेली धार तो लोंबणारा पुरुष एक सारखा प्राशन करतो. परंतु त्याला जीविताबद्दल निराशा उत्पन्न होत नाहीं. कांहीं काळे व पांढरे उंदीर त्या वृक्षाचीं मुळें कुरतडीत आहेत हें पाहूनहि त्याची जीवाची आशा सुटत नाहीं.

विदुर रूपकाचा अर्थ स्पष्ट करतांनां त्या दयार्द्र अंतःकरण झालेल्या धृतराष्ट्र राजाला म्हणतो, तें महान् अरण्य म्हणजे महासंसार होय. ज्यांनां व्याल म्हटलें आहे ते व्याधी होत. ती घोर स्त्री जरा होय. कूप हा प्राण्यांचा देह होय. विहिरीच्या तळाशीं असणारा भयंकर भुजंग हा काल होय. त्या कूपामध्यें उत्पन्न झालेली वेल जिला अडकून तो मनुष्य लोंबत असतो ती प्राण्यांची जीविताशा होय. सहा तोंडांचा व बारा पायांचा गज म्हणजे संवत्सर होय, सहा ऋतू हींच त्याचीं सहा मुखें व बारा महिने हेच त्याचे बारा पाय होत. उंदीर दिवस आणि रात्र होत, व मधाच्या धारा म्हणजे विषयसौख्यें जाणावीं.

हा दृष्टांत म्हणजे निवृत्तिपर काव्यांतील ही एक अस्सल भारतीय कृति आहे यांत शंका नाहीं. ही कल्पना बौद्ध संप्रदायांत प्रथम आली आहे अशी बेनफे वगैरे पाश्चात्त्य पंडितांची समजूत आहे. परंतु ही कल्पना बौद्ध संप्रदायांतील जीविताच्या कल्पनेशीं जितकी जुळते तितकीच ती जैन व इतर भारतीय यतिसंप्रदायांतील जीवितकल्पनेशीं जुळते. बौद्धानीं जी या कल्पनेची मांडणी केली तीमुळें बहुधा पाश्चात्त्य देशांत ह्या कल्पनेचा प्रवेश झाला असावा. ही कल्पना जी पाश्चात्त्य वाङ्मयांत शिरली ती " बारलाम आणि जोसेफ व कलील आणि दिम्न " या प्रकारच्या सामान्य जनतेच्या आवडीच्या वाङ्मयाबरोबर शिरली असावी. वरील ग्रंथ प्रथम भरतवर्षांत लिहिले गेले व पुढें ते सार्वदेशीय होऊन बसले ही गोष्ट विंटरनिट्झ मान्य करतो.

हें रूपक कोणत्याहि विशिष्ट संप्रदायाचें नाहीं. जैन बौद्ध, महंमद संप्रदायी, ख्रिस्ती व यहुदी या सर्वांनां सारखेंच बोधप्रद असलेलें हें रूपक निरनिराळ्या

देशांच्या वाङ्मयांत निरनिराळ्या काळीं कसें प्रादुर्भूत झालें याचा इतिहास अन्स्र्टस्ट कुन्ह यानें लिहिला आहे.

या दृष्टांताप्रमाणेंच महाभारतांतील दुसऱ्या अनेक नीतिपर कथा बौद्ध ग्रंथांतून घेतल्या असाव्या असें कोणा कोणांस (विशेषतः पाश्चात्त्यांस) वाटण्याचा संभव आहे. परंतु बारकाईनें पाहिलें असतां या कथा ब्राह्मण, बौद्ध व इतर संप्रदाय या सर्वांच्या सारखेंच परिचयाचें जें सामान्य कथावाङ्मय त्यांतून घेतलेल्या असाव्यात असेंच वाटूं लागतें. उदाहरणार्थ शिबि राजाची कथा अगदीं बौद्ध वळणावरची दिसते, एवढेंच नव्हे तर तिपिटकामध्यें एके ठिकाणीं हा स्वार्थत्यागी राजा एका याचकानें मागितल्यावरून आपले डोळे त्याला काढून देतो असें वर्णन आलेलें आहे. हीच गोष्ट महाभारतांत तीन तऱ्हांनीं सांगितली आहे. एका ठिकाणीं श्येनाच्या तडाक्यांत सांपडलेल्या कपोताचें संरक्षण करण्याकरितां राजानें आपल्या शरीरांतून मांस काढून दिलें असें वर्णन आहे. ह्याच शिबि राजाचा ययातीच्या कथेमध्यें उल्लेख आढळतो. येथें शिबि हा ययाति राजाच्या चार सात्विक वंशजांपैकीं असून त्या सर्वांनीं स्वर्गांतील आपापलीं स्थानें त्या राजाला दिलीं व शेवटीं त्याबरोबरच ते स्वर्गाप्रत गेले. तिसऱ्या एका ठिकाणीं शिबीचें औदार्य व अलोट संपत्ति या विषयींचें वर्णन ब्राह्मणी पद्धतीनें केलेलें आहे. त्या ठिकाणीं शिबी मोठा धार्मिक, यज्ञ करणारा, ब्राह्मणांनां पृथ्वीवर पावसाच्या थेंबागणिक बैल दान करणारा, व आकाशांत चमकणाऱ्या ताऱ्यांइतक्या आणि गंगेच्या पात्रांत असणाऱ्या वाळूच्या कणांइतक्या गाई दान करणारा असें वर्णिलें आहे.

नीतिवैराग्यपर काव्यांतील लोकप्रिय झालेल्या आत्मयज्ञाच्या किंवा स्वार्थत्यागाच्या कथांपैकींच कपोत आणि पारधी ही एक सुरस कथा आहे. पंचतंत्रांतील गोष्टीमध्यें या कथेचा समावेश केलेला आहे. शत्रूवर प्रेम, मनोनिग्रह व आत्मयज्ञ या तत्त्वांचा कळस ह्या पापविनाशक पवित्र इतिहासाव्यतिरिक्त क्वचितच आढळेल. आपणाशिवाय अतिथीला अन्नदान देण्याकरितां दुसरें कांहीं नाहीं व दुष्ट व्याधानें आपली प्रिय भार्या पकडली असें पाहून कपोतानें अग्नीमध्यें आपणांस जाळून घेतलें व लगेच त्याच्या भार्येनेंहि प्राणत्याग केला. कपोतद्वयाचें एकमेकांवरील निःसीम प्रेम व त्यांनीं केलेला स्वार्थत्याग पाहून त्या दुष्ट व्याधाचें मन कळवळलें व त्यानें आपला रानटी उपजिविकेचा क्रम सोडून दिला व साधू बनला. सरतेशेवटीं त्यानें अग्निप्रवेश केला ही गोष्ट बौद्ध तत्त्वानुसार लिहिलेली नाहीं, कारण बौद्ध धर्मांत आत्महत्या करण्यास परवानगी नाहीं.

नीतिवैराग्यपर काव्याची दुसरी बाजू स्वर्गाप्रत न जाणाऱ्या धर्मनिष्ठ मुद्गल मुनीच्या कथेंत स्पष्ट केली आहे. मुद्गल मुनि निष्पाप व धर्मनिष्ठ असल्यामुळें त्यास स्वर्गास नेण्याकरितां देवदूत त्याजकडे आला. मुद्गलानें अगोदर स्वर्गामधील प्राण्यांचा जीवनक्रम कोणत्या तऱ्हेचा असतो असें त्यास विचारलें तेव्हां त्या देवदूतानें स्वर्गाचें वैभव व धर्मनिष्ठ लोकांस मिळणारें सुख यांचें वर्णन त्यापुढें केलें, पण हें स्वर्गसुख अक्षय्य टिकणारें नाहीं ही गोष्ट मात्र त्या देवदूतानें छपविली नाहीं. प्रत्येकानें आपापल्या कर्माचें फल भोगलेंच पाहिजे. फलाचा उपभोग संपला कीं प्रत्येकानें स्वर्गामधून उतरून मृत्युलोकीं नवीन जन्म घेतलाच पाहिजे. असल्या प्रकारच्या स्वर्गाची कथा ऐकण्याचें त्या मुनीनें नाकारलें व वैराग्यपर तप करण्यास सुरवात केली व शेवटीं शुद्ध ज्ञानयोगाचा अवलंब करून ध्याननिष्ठ होऊन राहिला व संसाराविषयीं पूर्ण वैराग्य संपादन करून तो शाश्वत असें जें निर्वाण किंवा मोक्षरूपी उत्कृष्ट फल जो विष्णुलोक त्याप्रत पावला.

उपनिषदांमध्यें कर्मवाद किंवा मनुष्याचें भवितव्य याचा प्रथम उल्लेख केला आहे. महाभारतांत पुष्कळ गहन कथांमधून कर्म हाच प्रतिपाद्य विषय असलेला आढळतो. त्या कथांपैकीं सर्प, मृत्यु, काळ व कर्म याविषयीं एक सुरस कथा आहे. ती अशी:—गौतमी नांवाची एक वृद्ध ब्राह्मणी होती. एके दिवशीं आपला पुत्र सर्पदंश होऊन मरण पावला असें तिनें पाहिलें. अर्जुनक नांवाचा एक लुब्धक स्नायुपाशानें त्या सर्पाला बांधून त्या ब्राह्मणीस म्हणाला तुझ्या पुत्राचा प्राण घेणारा पन्नगाधम कशा प्रकारें ठार मारूं. गौतमी म्हणाली "सर्पाला जर मारिलें तर पुत्र जिवंत होईल काय? या प्राण्याचा वध करून कोणतें हित होणार आहे; उलट पापाचा बोजा जड होईल." त्या पारध्यानें ज्याअर्थीं इंद्रानें वृत्राला मारलें त्याअर्थीं शत्रूला मारणें योग्य आहे असें सांगितलें. परंतु शत्रूस त्रास देणें किंवा त्याचें निर्दालन करणें यामध्यें कोणत्याहि प्रकारचें हित नाहीं असें गौतमीला वाटलें. अशा रीतीनें संवाद चालला असतांना ती दंश केलेली नागीण म्हणाली कीं, "गौतमीपुत्राला दंश करून मारला ह्यांत माझ्याकडे काय दोष? मृत्यूच्या प्रेरणेनें निमित्त कारण मात्र मी झालें आहें." गौतमीपुत्राचा वध

करण्याचा दोष नागिणीकडे आहे कीं काय याविषयीं नागिणी व लुब्धक यांच्यामध्यें कडाक्याचा वाद चालला असतांना मृत्यु त्या स्थळीं अवतरून वधाचा दोष मजकडे किंवा नागिणीकडे नसून काळाकडे आहे असें त्यानें प्रतिपादिलें. जी जी गोष्ट म्हणून घडते ती काळाच्या आज्ञेवरूनच घडते; जी जी वस्तु अस्तित्वांत आहे ती काळाच्याच आज्ञेनें अस्तित्वांत आहे; वारा ज्याप्रमाणें मेघांनां इतस्ततः प्रेरितो त्याप्रमाणें काल हा आपल्या इच्छेनुसार मृत्यूला सर्वत्र प्रेरित करतो. मृत्यु कालाच्या अंकित आहे. लुब्धक, पुत्रवधाचा दोष मृत्यु व सर्प या दोघांवर सारखा आहे असें प्रतिपादित असतां काळ त्या ठिकाणीं अवतीर्ण झाला व म्हणाला मी काळ, मृत्यु, किंवा सर्प गौतमीपुत्राच्या निधनाबद्दल दोषी नसून कर्म ज्याला म्हणतात त्याच्या प्रेरणेनें आम्ही हें कृत्य केलें. त्याच्या मृत्यूचें दुसरें कोणतेंहि कारण नसून त्याचें कर्म हेंच कारण आहे.

ज्याप्रमाणें मृत्तिकेच्या गोळ्यापासून कुलाल हा वाटेल तें पात्र तयार करतो त्या प्रमाणेंच मनुष्याच्या कर्मापासून त्यास तदनुसार स्थिति प्राप्त होते; आणि प्रकाश व छाया ह्यांचा जसा निरंतर नित्य संबंध असतो तसाच कर्म व कर्ता ह्यांचा तत्तत्स्थित्यनुरूप नित्य संबंध असतो. माझ्या व आपल्या कर्मामुळेंच माझा पुत्र मरण पावला असें गौतमीनें आपलें सांत्वन करून घेतलें.

मनुष्यानें मृत्यूशीं कसें वागावें हा प्रश्न भारतीय तत्त्ववेत्त्यानीं व कवींनीं वारंवार नीतिपर सूत्रें किंवा काव्यें रचून सोडवला आहे, आणि शोकहारक व सांत्वन करणाऱ्या नानाविध कथा रचिल्या आहेत. त्या कथांपैकीं गृध्र, जम्बुक व मृत बालक ह्यांची एक सुंदर कथा आहे. तिचा सारांश खालील प्रमाणें आहे.

एका ब्राह्मणाला एकुलता एक लहान मुलगा होता. तो मुलगा वारला तेव्हां त्याचें प्रेत घेऊन कांहीं आप्तबांधव दुःखयुक्त व शोकाकुल होऊन रुदन करीत करीत स्मशानांत गेले. शोकामुळें त्यांनां त्या बालकाला भूमीवर टाकून परत जाण्याचें धैर्य होईना. त्यांचा तो रुदन शब्द ऐकून एक गृध्र त्यांच्याजवळ येऊन म्हणाला "व्यर्थ शोक करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कोणीहि मर्त्य काळाच्या तडाक्यांत सापडल्यावर जिवंत होत नाहीं. तेव्हां विलंब न लावतां आपल्या स्थानाकडे परत जा." नंतर एक जंबूक त्यांच्याजवळ आला व मनुष्यांच्या निर्दयतेबद्दल त्यांस पुष्कळ दोष देऊन आपल्या पुत्राविषयींच्या प्रेमाचा त्याग करून इतक्या लवकर तुम्ही परत कसे चालला असें त्यानें त्यांस विचारलें. तेव्हां ते सर्व लोक दुःखानें परत फिरले. तेव्हां प्रेताजवळ बसलेल्या गृध्रानें त्यांच्या धैर्यशून्यत्वाची निर्भर्त्सना केली; व म्हणूं लागला "मृतासंबंधीं कोणीहि शोक करूं नये पण स्वतःसंबंधानें शोक करावा. मृताबद्दल शोक करण्यापेक्षां पापमुक्त व्हाल अशी तजवीज करा. प्राण्यानें ज्या प्रकारचें कर्म केलें असेल त्याच्या अनुरोधानें त्याला सुखदुःखाची प्राप्ति होते. पापपुण्यानुसार मूर्ख व शहाणा तसाच श्रीमंत किंवा गरीब हे काळाच्या दाढेंत सांपडतात. मृताविषयीं शोक तरी काय म्हणून करीत आहां? मृत्यूला विनाकारण कां दोष देतां?"

ती सर्व मंडळी मृताला सोडून परत चालली असतां जंबुकानें फिरून त्यांनां परत फिरविलें. बालकाविषयीं असलेलें प्रेम शिथिल न करण्याचा त्यानें उपदेश केला. दैवाविरुद्ध नेहमीं प्रयत्न केला पाहिजे. फिरून मृत बालक सजीव होण्याचा संभव आहे, असें जंबुकानें सांगितलें. त्यावर गृध्र म्हणाला, "मला हजार वर्षें पूर्ण झालेलीं आहेत पण कोणीहि एखादा पुरुष मरण पावल्यानंतर पुनरपि जिवंत झाल्याचें माझ्या पाहाण्यांत नाहीं. जो आपले आईबाप, आप्त, मित्र, जिवंत असतांना त्यांची काळजी घेत नाहीं तो नीतिदृष्ट्या मोठा गुन्हा करतो. जो नेत्रानें पाहात नाहीं व कोणत्याहि प्रकारची हालचाल करीत नाहीं अशा मृत पुत्राबद्दल रोदन करीत बसून काय करणार?" गृध्रानें ती मंडळी घराकडे परत जावी म्हणून हरतऱ्हेचा प्रयत्न केला; व तसाच जम्बुकानें त्यांनां स्मशानांत राहून घेण्याचा प्रयत्न केला. असें बरेंच वेळां झालें. गृध्राला व जम्बुकाला अतिशय भूक लागल्यामुळें प्रेत आपणास खावयास सांपडेल अशा हेतूनें त्या दोघांनींहि आपलें साध्य साधण्याचा आटोकाट प्रयत्न केला. शेवटीं परमेश्वर शंकर उमादेवीच्या सांगण्यावरून त्या स्थळाप्रत आले व त्या रुदन करणाऱ्या बिचाऱ्या आप्तबांधवांवर दया करून त्यांनीं तें बालक जिवंत केलें.

महाभारतांत नीतिपर कथांमधून वैराग्यपर नीतितत्त्वेंच केवळ ग्रथित केलेलीं नसून व्यवहारामध्यें हरघडी दिसून येणारें पिता व पुत्र आणि पति व पत्नी यांमधील प्रेम व त्यापासून शिकण्यासारखीं व्यावहारिक नीतितत्त्वेंहि ग्रथित केलेलीं आढळतात.

ह्या कथांपैकीं विलंबानें कर्म करणाऱ्या चिरकारिकाची एक कथा आहे. एके समयीं त्याच्या मातेच्या हातून व्यभिचार घडला तेव्हां त्याच्या पित्यानें 'तूं आपल्या मातेचा वध

कर ' असें सांगितलें. त्या समयीं चिरकारिकानें आपल्या स्वभावाप्रमाणें पुष्कळ वेळ विचार केला व पित्राज्ञेप्रमाणें मातेचा वध करण्याच्या कार्यांत बराच विलंब केला.त्यानें पित्राज्ञेनुसार मातृहत्त्येचें पातक करावें कां पित्याची आज्ञा पाळणें हें जें कर्तव्य त्याचें उल्लंघन करावें ह्याचा सर्व बाजूंनीं विचार करण्यास प्रारंभ केला. अशा रीतीनें पुष्कळ वेळ विचार करीत बसलेल्या व आपल्या नांवाप्रमाणेंच विलंबानें कर्म करण्याऱ्या चिरकारिकाला पाहून त्याच्या पित्याला म्हणजे गौतम ऋषीला संतोष झाला. कारण आतां गौतम ऋषीचा पत्नीवरचा रोष कमी झाला होता. या कथेमध्यें चिरकारिकाचें आत्मगत भाषण फार मजेदार व साध्या भाषेंत लिहिलेलें आहे. गोड गोड शब्दांमध्यें पितृप्रेम व कर्तव्यकर्म वर्णिलें आहे व मातृप्रेम तर फारच मोहक शब्दांनीं ग्रथित केलें आहे.

जोंपर्यंत माता असते तोंपर्यंत योग्य काळजी घेतली जाते. मातृनिधनानें छत्र नाहींसें होतें. जो मनुष्य दरिद्री असला तरी आई ! म्हणून घरांत येतो तो शोक पावत नाहीं आणि त्याला वार्धक्य येत नाहीं. पुत्रपौत्र ह्यांनीं मनुष्य युक्त असला तरी त्याला मातेचा आश्रय असल्यास तो वयाच्या शंभराव्या वर्षाच्या शेवटींहि दोन वर्षांच्या लहान मुलाप्रमाणें वागेल. ज्या वेळीं मनुष्याला मातेचा वियोग होतो त्या वेळींच तो खरा वृद्ध होतो. त्या वेळेसच तो खरा दुःखी होतो, आणि त्या वेळींच त्याला सर्व जग ओसाड होतें. मातेसारखी दुसरी सावली नाहीं, मातेसारखा दुसरा रक्षक नाहीं; आणि मातेसारखी प्रिय अशी दुसरी कोणीहि नाहीं.

ह्या सर्व कथांमधील मुख्य मर्म पात्रांच्या तोंडीं घातलेल्या भाषणांत आहे. हे सर्व इतिहास वास्तविक बोधप्रद संवादाच्या स्वरूपानें लहान लहान प्रस्तावनेदाखल लिहिले असल्यामुळें ह्यांनां इतिहास-संवाद असें नांव ठेवणें शक्य आहे. बौध्द ग्रंथांतील किंवा उपनिषद् ग्रंथांतील कथांच्या तोडीच्या कांहीं कथा इतिहास-संवादांत आहेत. उदाहरणार्थ, विदेहदेशच्या जनक राजाचें भाषण उपनिषदांतून घेतल्यासारखें वाटतें.आतां माझें कांहींच नसल्यामुळें माझें द्रव्य अनंत आहे. आतां मिथिला नगरी जरी दग्ध झाली तरी माझें कांहींच जळून जाणार नाहीं. " अशा तऱ्हेचे विचार उपनिषदांतून घेतल्यासारखे दिसतात.

एकदां पिंगला नामक वेश्या संकेतस्थानीं गेली होती. पण तेथें तिला तिच्या प्रियाचा समागम झाला नाहीं, यामुळें ती दुःख पावली. पुढें तिला उपरती होऊन दुःख करण्याचें टाकून ती भारतीय नीतितत्त्वाचें जें उच्चतम ध्येय आत्मशांति त्याप्रत पोहोंचली.

आपल्या आशेची निराशा केल्यामुळेंच पिंगलेला सुखांत निमग्न होतां आलें. पिंगलेच्या कथेंतील श्लोक वाचले कीं थेरिगाथा नांवाच्या बौद्ध ग्रंथांतील श्लोकांची आठवण होते. उपनिषदांप्रमाणेंच महाभारतांतील कथांतून सुद्धां उच्च प्रकारचें ज्ञान निकृष्ट दर्जाच्या नीच जातींतील लोकांच्या तोंडीं घातलेलें आहे. मनुष्याला तत्त्वज्ञान व नीति, आणि धर्माप्रमाणें आचरण यांच्या योगानेंच द्विजत्व प्राप्त होतें, केवळ ब्राह्मण कुळांत जन्मला म्हणून ब्राह्मण होत नाहीं, वगैरे तत्त्वें मांस क्रयविक्रय करणाऱ्या सात्विक धर्मव्याधानें कौशिक ब्राह्मणाला शिकविलीं. तसेंच ब्राह्मणी वैराग्य संपादन केलेल्या जाजली ऋषीला तुलाधार नांवाच्या वाण्यानें उपदेश केला आहे. भारतीय नीतितत्त्वांच्या इतिहासांत हा संवाद अतिशय महत्त्वाचा असल्यामुळें सारांशरूपानें पुढें दिला आहे.

पूर्वीं एका अरण्यांत जाजली नांवाचा कोणी एक अरण्यवासी ब्राह्मण रहात होता. त्यानें पूर्वीं अत्यंत भयंकर तपश्चर्या केली होती. त्यानें वल्कलें आणि कृष्णाजिन परिधान करून जटा वाढविल्या होत्या. त्याच्या शरीरावर मळाचीं जणूं पुटेंच चढलीं होतीं. पावसाला व सोसाट्याच्या वाऱ्याला न जुमानतां तो अरण्यभर फिरला. त्यानें कडक उपवास केले. एकादां तो महातपस्वी योगांत निमग्न होऊन अव्यग्रपणें काष्ठाप्रमाणें निश्चल होऊन राहिला आकाशांतून जलाची वृष्टि होऊं लागली तेव्हां तें जल त्यानें मस्तकावर धारण केल्यामुळें त्याच्या त्या गुंतलेल्या जटा भिजून गेल्या व अगदीं मलीन झाल्या तरीहि तो ध्यानस्थ बसला होता. पुढें कुलिंग (चिमण्या) पक्ष्यांनीं त्याच्या मस्तकावर आपलें घरटें केलें व कालांतरानें तेथेंच अंडीं घातलीं. तदनंतर तीं अंडीं मोठीं होऊन त्यांतून पक्ष्यांचीं पिलें निर्माण झालीं व कांहीं दिवसांनीं तीं उडून गेलीं. हें जरी त्या ब्रह्मर्षीला दिसून आलें तरी तो यत्किंचितहि हलला नाहीं. असें हें खडतर वैराग्य पाहून त्या तपोनिष्ठ जाजलीला अभिमान उत्पन्न झाला व मलाच काय ती भक्तीची कल्पना लाधली व मीच धर्म संपादन केला असें म्हणून त्यानें उघडया मैदानांत दंड थोपटला. तेव्हां " हे जाजले, तुला धर्मामध्यें तुलाधाराची सर नाहीं ! हे द्विज, काशीमध्यें एक महाज्ञानी तुलाधार रहात असतो त्याला देखील तूं बोलतोस असें बोलणें योग्य होणार नाहीं. मग तुझी कथा

काय," अशी आकाशवाणी झाल्याचें त्यानें ऐकलें. तेव्हां जाजलीला फार वाईट वाटलें व तुलाधाराची भेट घेण्याकरितां व धर्मामध्यें तो कितपत पुढें गेला आहे हें पाहण्याकरितां तो काशीस गेला.

तुलाधार हा सर्व प्रकारचे रस, गंध, औषधी, वनस्पती आणि त्यांचीं फळेंमुळें विकणारा एक वाणी होता. काशीस जाजली जाऊन पोहोंचला व त्यानें तुलाधारास विचारिलें "तुलाधारा, तुला धर्मज्ञानाचा लाभ झाला आहे तेव्हां हें ज्ञान तुला कोठून प्राप्त झालें तें सर्व तूं मला पूर्णपणें सांग." तेव्हां उत्तरादाखल तुलाधारानें खालीं दिल्याप्रमाणें एक लांबलचक नीतीवर भाषण केलें. "हे जाजले, ज्याला लोक प्राचीन असें समजतात आणि जो सर्व प्राण्यांनां हितकर व दयाविशिष्ट आहे तो सनातन धर्म आणि त्याचीं सूक्ष्म तत्त्वें हीं मला अवगत आहेत. प्राण्याशीं मुळींच द्रोह न करतां अथवा प्रसंगच पडल्यास अल्पसा द्रोह करून उपजीविका करणें हाच श्रेष्ठ धर्म होय. या धर्माच्या आश्रयानें मी आपली उपजीविका करीत आहे. दुसऱ्याकडून काष्ठें आणि तृण आणवून मीं हें आपलें घर तयार केलेलें आहे. आळता, पद्मकाष्ठ, आणि कमी-अधिक प्रतीचे सुंगधी पदार्थ व नाना प्रकारचे रस ह्यांचा मी विक्रय करतों. तथापि मी मद्यविक्रय करीत नाहीं. मी क्रयविक्रय कोणत्याहि तऱ्हेनें फसवून करीत नाहीं. जो पुरुष वाणीनें, मनानें आणि क्रियेनें सर्वांचा मित्र असतो व सर्वांचें हित करण्यामध्यें आसक्त असतो; तोच धर्मवेत्ता होय. मी कोणाच्या अनुरोधानें वागत नाहीं, कोणाचा द्वेष करीत नाहीं व कोणाची इच्छाहि करीत नाहीं. मी सर्व प्राण्यांशीं सारखाच वागतों. हे जाजले, माझें व्रत पहा—माझा तराजू सर्व प्राण्यांसंबंधानें सारखाच आहे. मनुष्याला जेव्हां दुसऱ्याची भीति वाटत नाहीं आणि तो कोणाचा अभिलाष करीत नाहीं व द्वेषहि करीत नाहीं तेव्हां तो ब्रह्मस्वरूपी बनतो."

नंतर अहिंसेवर बोलत असतांनां तुलाधार म्हणाला, "प्राण्यांची हिंसा न करणें याहून श्रेष्ठ दुसरा कोणताहि धर्म नाहीं. जनावरे पाळणें हें देखील एक प्रकारचें दुष्ट कृत्य होय, कारण आपण त्यास त्रास देतों व मारून खातों. गुलाम दास बनवून सेवेस ठेवणें व सजीव प्राण्यांचा क्रयविक्रय करणें हें सुद्धां निंद्यच आहे. कृषिकर्मरूपी उपजीविका देखील फारच निर्दयपणाची आहे, कारण नांगरतांना भूमीचें विदारण होऊन तिजमध्यें रहात असलेल्या प्राण्यांचे प्राण जातात." त्यावर जाजलीनें कृषिकर्म व जनावरांचें पालन केलेंच पाहिजे असें सांगितलें कारण, जर पशू व औषधी ह्यांनां मारिलें नाहीं किंवा धक्का लाविला नाहीं तर यज्ञ करतां यावयाचे नाहींत व शेती करण्याचें बंद केलें तर हा लोक जिवंतच राहणार नाहीं. नंतर तुलाधारानें खरा यज्ञ म्हणजे काय यावर एक लांबलचक भाषण केलें. व त्यांत यज्ञ पुरोहितांचा विशिष्ट हेतु संपादण्याच्या मिषानें; एखाद्या फलाची इच्छा करून व जिवंत प्राण्यांची हत्याकरून करूं नये असें निवेदन केलें.

सरते शेवटीं तुलाधारानें जाजलीच्या डोक्यावर घरटें करून राहिलेल्या कुलिंग पक्ष्यांस हांक मारली व वरीलप्रमाणें उपदेश केला त्याजबद्दल त्यांस साक्षी ठेविलें. मनुष्यमात्रावर प्रेम करणें हाच खरा धर्म असें तत्त्व त्यानें प्रतिपादिलें व त्यास त्या कुलिंग पक्ष्यांनीं अनुमति दिली.

महाभारतांतील पिता--पुत्रसंवादांत जसा ब्राह्मणी नीति व भारतीय वैराग्य यांमधील बारीक तुलनात्मक भेद दृष्टीस पडतो तसा इतर ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. या संवादांत ब्राह्मणी धर्माचा पुरस्कर्ता पिता व स्वार्थी पुरोहितधर्मापासून अलिप्त होऊन वैराग्य उत्पन्न झालेला पुत्र वैराग्याचा पुरस्कर्ता असें मानलें आहे. पुत्रानें बौद्ध व जैन धर्मांत प्रायश्चित असलेल्या वऱ्याचशा तत्त्वांचा पुरस्कार केला आहे. महाभारतांत पुत्राच्या तोंडीं घातलेला प्रत्येक श्लोक बौद्ध किंवा जैन ग्रंथांत आढळतो. शांतिपर्व, अ. १७९ याशीं जैनांचें उत्तराध्ययन सूत्र जुळतें तसाच शां. प.अ. १७४ हा बौद्ध धम्मपद ४७ शीं जुळतो. तथापि त्यावरून महाभारतांतील श्लोक बौद्ध ग्रंथांवरून घेतले असें म्हणतां येणार नाहीं.

हा संवाद बाह्यतः बौद्ध धर्मांतील तत्त्वानुसार रचिलेला दिसतो. तरी हा उपनिषदामध्यें ग्रथित केलेलें जें वेदांततत्त्व आत्मवाद, त्याप्रत पोंचवितो ही कांहीं मोठी विशिष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट नाहीं. कारण सांप्रतकालीं निरनिराळ्या प्रॉटेस्टंट पंथांत जितका मतभेद दिसून येतो त्यांपेक्षां जास्त मतभेद प्राचीन काळांतील भारतीय वैराग्यपर संप्रदायामध्यें क्वचितच दिसून येतो. म्हणूनच उपनिषद् किंवा बौद्ध व जैन धर्मानुसार रचिलेल्या कथांशीं महाभारतांतील निवृत्तिपर रचिलेल्या संवादाचें किंवा कथांचें साम्य जुळतें ही कांहीं आश्चर्य मानण्यासारखी गोष्ट नाहीं.

**महाभारतांतील बोधप्रद अध्याय**—आतांपर्यंत वर्णन केलेले बहुतेक इतिहाससंवाद महाभारतांतील

बऱ्याचशा लांबलचक नीतिपर व बोधप्रद भागांतूनच कथन केलेले आढळतात. अशा तऱ्हेचे नैतिक भाग कमीजास्त प्रमाणानें महाभारतांतील बहुतेक सर्व पर्वांतून अंतर्भूत केलेले दिसतात. या भागांतून मुख्यत्वेंकरून तीन तत्त्वांचा उल्लेख केलेला आहे. त्यांनां भारतीय लोक नीति, धर्म आणि मोक्ष म्हणतात. नीतीमध्यें ऐहिक संसारज्ञान व त्यांतहि प्रामुख्यानें व्यवहारधर्म व राजकारण यांचा समावेश होतो. धर्मामध्यें सर्वसाधारण नीतितत्त्वें व आचारनियम सांगितलेले असतात. आणि मोक्षामध्यें सर्व तत्त्वज्ञानाचें जें उच्चतम ध्येय निर्वाण, कैवल्य किंवा मोक्षप्राप्ति यां ध्येयाचा समावेश होतो, हीं सर्व तत्त्वें सुरस कथांतून किंवा सुंदर सूत्रांतून किंवा वचनांतून प्रतिपादन केलेलीं आहेत असें नाहीं, कारण बाराव्या व तेराव्या पर्वांत तत्त्वज्ञान व धर्म या विषयावर रुक्ष व कंटाळवाणे लांबलचक अध्याय सांपडतात.

शांतिपर्व व अनुशासनपर्व यांचा मुख्य काव्याशीं विशेषसा संबंध दिसून येत नाहीं. परंतु आश्वमेधिक पर्वामध्यें दिलेल्या कथांचा संबंध स्त्रीपर्वाशीं दिसतो. उपरिनिर्दिष्ट भीष्माच्या कथांमुळेंच शांतिपर्व व अनुशासनपर्व महाकाव्यांत अंतर्भूत करतां आलें. असंख्य बाणांनीं विद्ध झालेला इच्छामरणी भीष्माचार्य शरशय्येवर सहा महिनेपर्यंत रणभूमीवर पडला होता. व त्या कालांत त्यानें युधिष्ठिराला धर्म, नीति व तत्त्वज्ञान शिकविलें. म्हणजे भीष्म धर्मगुरु, तत्त्वज्ञानी व योगी असे तीन तऱ्हेचे आचार्य बनले होते.

शांतिपर्वाला युधिष्ठिराच्या निराशेपासून आरंभ होतो, कारण बरेचसे शूर योद्धे व त्याचे आप्तइष्ट कुरुयुद्धामध्यें मारले गेले होते. युधिष्ठिर आत्मनिंदा करून नैराश्यानें ऐहिक संसाराचा त्याग करून कोणत्या तरी अरण्यांत जाऊन साधुवृत्तीनें राहिलेलें आयुष्य कंठण्याचा निश्चय करतो, परंतु त्याचे धाकटे बंधू त्याचें मन निवृत्तिमार्गाकडून प्रवृत्तिमार्गाकडे वळवतात. व म्हणूनच ऐहिक संसाराचा परित्याग करून निवृत्तिमार्ग आचरणें श्रेयस्कर कां संसारामध्यें राहून गृहस्थाश्रमांतील राजधर्म स्वीकारून प्रवृत्तिमार्गाकडे वळणें श्रेयस्कर या विषयावर लांबलचक खल केलेला आढळतो. महर्षि व्यास म्हणतात कीं अगोदर राजानें आपल्या धर्मानुसार राजाचीं कर्तव्यें बजवावींत व नंतर आयुष्य संपत आलें म्हणजे वृद्धपणीं अरण्यांत जाऊन यतिधर्म पाळावा. व्यासानें युधिष्ठिराला राजधर्म शिकण्याकरितां भीष्माचार्याकडे जाण्यास सांगितलें. व त्याच्या आज्ञेनुसार युधिष्ठिर आपल्या परिवारासहित शरशय्येवर रणभूमींत पडलेल्या भीष्माकडे गेला व राजनीति व इतर धर्म या विषयावर भीष्मांचें म्हणणें त्यानें ऐकून घेतलें. बाराव्या व तेराव्या पर्वांमध्यें तत्त्वज्ञान, नीति व राजधर्म या विषयांवर भीष्माचार्यांचीं व्याख्यानें ग्रथित केलेलीं आहेत.

शांतिपर्वांतील पहिल्या निम्या अध्यायांत राजधर्म किंवा भूपतीचीं कर्तव्यें किंवा आपद्धर्म कथन केलेला आहे. या अध्यायांतून प्रथम राजाचें महत्त्व व संक्षेपत: त्याचे धर्म व राजनीति किंवा राजकारण सांगितलेलें असून नंतर वर्णाश्रमधर्म, चार आश्रमांचे धर्म, पितृधर्म, आचार्यधर्म, आपद्धर्म, आत्मसंयमन, यतिधर्म, सत्यप्रीति, व आयुष्यांतील धर्म, अर्थ, व काम या तिन्ही ध्येयांचा संबंध वगैरे विषय आलेले आहेत.

शांतिपर्वांतील शेवटच्या अध्यायांतून मोक्षधर्म सांगितलेला आहे, व त्यामुळेंच या पर्वाच्या शेवटच्या भागांत प्रामुख्यानें तत्त्वज्ञान आढळतें. यांत नुसतीं लांबलचक कंटाळवाणीं परस्परविरोधी अशीं विश्वोत्पत्ति, मानसशास्त्र, नीतितत्त्वें व मोक्ष यांवर प्रवचनें नसून वर नमूद केलेल्या कथांपैकीं पुष्कळ सुरसकथा, कल्पित गोष्टी, संवाद व नीतितत्त्वें निवेदन केलेलीं आहेत. याप्रमाणें अनेक एकत्र केलेल्या गोष्टींची माला जरी शांतिपर्वांत दिसून येते तरी त्यांतहि काव्यरस व उच्च प्रकारचें ज्ञान हीं चांगलीं ग्रथित केलेलीं आढळतात. भारतीय तत्त्वज्ञान शिकण्यास हा अमूल्य ग्रंथ उपयुक्त आहे असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं.

शांतिपर्वाला जर तत्त्वज्ञानावरील एक लहानसा ग्रंथ म्हटलें तर अनुशासनपर्वाला धर्मग्रंथ म्हणण्यास हरकत नाहीं. अनुशासनपर्वांत मोठमोठ्या संपूर्ण अध्यायांतून मनुस्मृतीसारख्या धर्मशास्त्रीय ग्रंथांतून अगर इतर धर्मशास्त्रांतून घेतलेलीं धर्मतत्त्वें किंवा त्याच अर्थाचीं इतर धर्मतत्त्वें आढळतात. शेवटच्या अध्यायांतून पद्यात्मक भाग व नीतिपर सुभाषितें आढळतात.

महाभारताच्या तेराव्या अनुशासनपर्वांत व इतर धर्मशास्त्रांत फरक एवढाच कीं या पर्वामध्यें मधून मधून कथा व साध्या गोष्टी घातल्यामुळें हें पर्व तितकें रुक्ष वाटत नाहीं. शांतिपर्वाचा जरी महाकाव्याशीं विशेषसा संबंध नाहीं तरी अनुशासनपर्वापेक्षां खात्रीनें बरेच दिवस अगोदर हें पर्व महाकाव्यांत अंतर्भूत झालें असावें व नंतर अनुशासनपर्व महाभारताचें एक पर्व बनलें असावें

कारण अगदीं नवीन प्रकारची रचना त्यांत दिसून येते. अनुशासनपर्वांत जितकी ब्राह्मणांची प्रसंशा व त्यांचें चातुर्वर्ण्यांतील श्रेष्ठत्व व महत्त्व प्रस्थापित केलेलें आढळतें तितकें दुसऱ्या पर्वांत क्वचित् आढळेल. बहुतेक पर्वांमध्यें दानधर्मच प्रामुख्यानें वर्णिलेला आढळतो. दानधर्मामध्यें दान करण्याचे नियम, काल व पात्रता यासंबंधीं विवेचन आढळतें व ब्राह्मणांनांच फक्त जें कांहीं दिलें तेंच दान असें नेहमीं समजण्यांत येतें.

शांतिपर्व व अनुशासनपर्वाप्रमाणेंच तिसऱ्या, पांचव्या, सहाव्या, अकराव्या व चौदाव्या पर्वांमध्यें असे लहान एकेक दोनदोन नीतिपर, बोधपर अध्याय सांपडतात. वनपर्वामध्यें ( अ. २८–३३ ) द्रौपदी, युधिष्ठिर व भीम यांच्यामधील लांबलचक संवादांत द्रौपदीनें नीतितत्त्वांवर भाषण करतांना प्रल्हाद—बलि संवाद व बृहस्पतीची नीति वर्णन केली आहे. मार्कंडेयसमास्यापर्वामध्यें दोनशें पांचव्या अध्यायांत पतिव्रतेचें व पतिसेवेचें माहात्म्य,दोनशें आठव्या अध्यायामध्यें अहिंसा अथवा भूतमात्रावरील प्रेम, दोनशें दहाव्या अध्यायामध्यें ऐहिक संसाराचा परित्याग, मोक्ष, सांख्योपनिषदांतील तत्त्वें व मानवाचें अदृष्ट, तसेंच दोनशें अकराव्या अध्यायांत मातापितरांविषयीं कर्तव्य सांगितलें आहे.

उद्योगपर्वामध्यें तेहेतिसाव्या व चौतिसाव्या अध्यायांतून विदुरनीति वर्णिली आहे. त्यांत नीति व संसारज्ञान कथन केलें आहे. तसेंच एकेचाळीस ते शेहेचाळीस या अध्यायांमध्यें सनत्सुजाताचें तत्त्वज्ञान भरलेलें आहे. भीष्मपर्वामध्यें पंचवीस ते बेचाळीस या अध्यायांतून प्रसिद्ध भगवद्गीता विवेचिलेली आढळते व त्याचीच पुस्ती म्हणून आश्वमेधिकपर्वामध्यें अनुगीता जोडलेली आढळते. स्त्रीपर्वांतील विदुराचीं भाषणें नीतितत्त्वविवेचनपर आहेत.

**महाभारताचें परिशिष्ट, हरिवंश**—महाभारतांतील अठरा पर्वांची कल्पना येण्यास आतांपर्यंत केलेलें विवेचन पुरें आहे. भारतीय लोक हरिवंशाला पुराण समजतात व हरिवंशपुराण हा महाभारतांतील एक भागच आहे असें मानतात असें जरी आहे तरी हरिवंशाला अठरा पुराणांप्रमाणेंच हें एक आणखी एकोणविसावें पुराण आहे असें मात्र कोणी मानीत नाहींत. हरिवंशाला महाभारताचें परिशिष्ट किंवा खिल असें नांव देतात. हें परिशिष्ट सोळाहजार तिनशें चौऱ्याहत्तर श्लोकांचा एक ग्रंथ आहे. इलियड व ओडेसी हे दोन्ही ग्रंथ जरी एक केले तरी हरिवंशाइतके भरणार नाहींत, इतका हरिवंश हा ग्रंथ मोठा आहे. ग्रंथ जितका अवाढव्य आहे तितकें वाङ्मयदृष्ट्या त्याचें महत्त्व मात्र नाहीं. वास्तविक हरिवंश म्हणजे विशेष तऱ्हेचें काव्यहि नाहीं व कोणत्याहि एखाद्या विशिष्ट व्यक्तीची कृति नाहीं. विष्णूचें माहात्म्य वाढविणाऱ्या कथांचा, आख्यायिकांचा व स्तोत्रांचा हा एक संग्रह आहे. हरिवंश ही एकाचीच कृति नाहीं. एवढेंच नसून भविष्यपर्वांत तर असे पुष्कळ भाग आहेत कीं, ते मागाहून निरनिराळ्या व्यक्तींकडून निरनिराळ्या वेळीं लिहिले गेले आहेत. हरिवंश व महाभारत यांचा बाह्यात्कारी संबंध एवढाच कीं, ज्या वैशंपायनानें जनमेजयाला महाभारत सांगितलें तोच वैशंपायन हरिवंशांत निवेदन करणारा आहे. भारताच्या सुंदर कथा ऐकिल्यानंतर ह्या ग्रंथाच्या आरंभीं शौनक उग्रश्रव्याला विनंति करतो कीं, श्रीकृष्ण ज्या कुळांत जन्मला त्या कुळांतील वृष्णि व अंधक यांविषयीं माहिती सांग. तेव्हां उग्रश्रवस् म्हणाला कीं महाभारताचें श्रवण झाल्यानंतर जशी जनमेजयानें वैशंपायनाला विनंति केली तशीच तूंहि करतो आहेस, तस्मात् जें वैशंपायानानें जनमेजयाला कथन केलें तेंच मी तुला निवेदन करितों. म्हणून हरिवंशांतील सर्व कथा वैशंपायनाच्याच तोंडीं घातली आहे. याशिवाय या परिशिष्टाच्या प्रथमारंभीच्या कांहीं स्तुतिपर श्लोकांत व तसेंच शेवटीं दिलेल्या लांबलचक स्तोत्रांत महाभारत व हरिवंश यांची स्तुति केलेली आहे. ही स्तुति जरा जास्त झाली आहे. महाकाव्याच्या श्रवणाची फलश्रुति शेवटीं वर्णिली आहे. हाच काय तो महाभारताचा व हरिवंशाचा संबंध. अठरा पुराणांत ज्या कथा सांपडतात त्याच कथा हरिवंशांत आल्या आहेत, तेव्हां महाभारतांतून या कथा हरिवंशात घेतल्या आहेत असें म्हणणेंहि रास्त नाहीं. कारण महाभारतांतच खुद्द ब्राह्मणी कथा व आख्यायिका विपुल सांपडतात. त्याच कथा निरनिराळ्या तऱ्हेनें हरिवंश व इतर अठरा पुराणांत आढळतात.

हरिवंशांत तीन महापर्वें आहेत; पैकीं प्रथम पर्वाला हरिवंशपर्व म्हणतात. हरीचा वंश तो हरिवंश हें नांव सर्व परिशिष्टाला देण्यापेक्षां जर पहिल्याच भागाला किंवा पर्वाला दिलें असतें तर फार सयुक्तिक झालें असतें. यांत पुराणाप्रमाणेंच प्रथम विश्वोत्पत्तीची माहिती सांगून सर्व प्रकारच्या दंतकथा दिल्या आहेत. या

दंतकथांत ध्रुवाख्यान, दक्षप्रजापति व त्याच्या कथा, सुरासुरांचे पूर्वज वगैरे कथा आलेल्या आहेत व त्यांत विशेषतः यज्ञयागादि क्रिया व वेदांतील तत्त्वें अमान्य करणारा वेन व त्याचा मुलगा पृथु राजा यांची कथा वर्णिलेली आहे. पृथु हा मानवांचा पहिला राजा होता. इक्ष्वाकु व त्याचे वंशज ज्या कुळांत जन्मले त्या सूर्यवंशाच्या कथा पुष्कळ सांगितल्या आहेत. उदाहणार्थ विश्वामित्र व वसिष्ठ यांच्या कथाहि यांत आढळतात. तसेंच मूळ वंशाशीं कांहीं एक संबंध नसलेलें पितृकल्पवर्णन आढळतें. नंतर सोमवंशवर्णन आढळतें. सोमाचा पुत्र अत्रि. शतपथ ब्राह्मणांतील कथेप्रमाणेंच प्रख्यात सोमवंशी राजा पुरूरवा व उर्वशी यांचा प्रेमसंबंध यांत वर्णिलेला आहे. पुरूरव्याच्या कुलांत नहुष व ययाति जन्मले. ययातीचा पुत्र यदु. हाच यादवांचा पूर्वज. याच यादवांपैकीं वसुदेव होता व याच्या पोटीं विष्णूचा अवतार जो कृष्ण तो जन्मास आला. अशा रीतीनें मानव–अवतारी श्रीकृष्ण याच्या वंशाचें वर्णन केल्यानंतर भगवान् विष्णूची स्तुति केलेली श्लोकमालिका आढळते व या मालिकेंत श्रीकृष्णाचा एक तऱ्हेनें पूर्वेतिहास दिलेला आहे.

हरिवंशाचें दुसरें पर्व विष्णुपर्व होय. या पर्वांत भगवान् विष्णूचा जो मानव अवतार श्रीकृष्ण त्याच्याच कथा दिलेल्या आहेत. श्रीकृष्णजन्मवर्णन, श्रीकृष्णाची बाललीला, कृष्णाचीं शौर्याचीं कृत्यें व प्रेमविलास व कृष्ण आणि गवळी यांचें वर्णन सविस्तर दिलें आहे. इतर पुराणांतून कमी अधिक प्रमाणांत आढळणाऱ्या कथाहि यांत आहेत. व त्यामुळेंच हिंदुधर्मातील प्रत्येक मनुष्याला कृष्ण हें नांव अतिशय परिचयाचें झालें आहे. वैष्णव संप्रदायांतील तत्त्ववेत्ते हे श्रीकृष्णाला, भगवद्गीतेंत कथन केलेला भक्तिमार्ग शिकवण्याकरितां परमेश्वरानें धारण केलेला अवतार समजतात. हरिवंश व महाभारताखेरीज जीं पुराणें आहेत त्या पुरणांतील कथांमधून ज्या कृष्णाचें वर्णन आढळतें त्या श्रीकृष्णाला सर्वोत्तम परमेश्वर मानून हिंदुस्थानांतील लाखों लोक त्याची भक्ति करतात व त्याची पूजाअर्चा करतात. मनुष्याच्या पूर्णतत्त्वाचा पुतळा म्हणजे श्रीकृष्ण; श्रीकृष्णासारखे बनणें हेंच यांचें परमध्येय. वाङ्मयदृष्ट्या व ऐतिहासिकदृष्ट्या कृष्णकथा महत्त्वाच्या असल्यामुळें हरिवंशांतील दुसऱ्या पर्वाचें सार पुढें दिलें आहे.

मथुरा नगरींत कंस नांवाचा दुष्ट असुर राजा राज्य करीत होता. 'देवकीच्या आठव्या पुत्राच्या हातून तूं मारला जाशील' असें नारदानें कंसास सांगितलें. वसुदेवाची भार्या देवकी ही कंसाच्या बापाची बहीण म्हणजे त्याची आत्या होती. मृत्यु टाळण्याकरितां देवकीचीं सर्व मुलें मारण्याचा कंसानें निश्चय केला व देवकीला बंदिशाळेंत टाकून सक्त पहाऱ्यांत ठेविलें. जन्मताक्षणींच तिचीं सहा मुलें त्यानें मारिलीं. पुढें तिला सातवा गर्भ राहिला त्यावेळीं निद्रादेवी योगमायेनें तो गर्भ देवकीचे उदरांतून काढून वसुदेवाची दुसरी बायको जी रोहिणी तिच्या उदरांत नेऊन सोडला. पुढें हें सातवें अपत्य बलराम अथवा बलदेव या नांवानें प्रसिद्ध झालें. ज्या दिवशीं देवकीला आठवा गर्भ राहिला त्याच दिवशीं तिकडे नंन्दपत्नी जी यशोदा तिलाहि गर्भ राहिला. हा आठवा गर्भ श्रीकृष्ण जेव्हां जन्मास आला त्याच दिवशीं यशोदेनेंहि आपल्या कन्यागर्भास जन्म दिला; श्रीकृष्णाला कंसाच्या तावडींतून जिवंत ठेवण्याकरितां तो जन्मतांच वसुदेवानें त्यास यशोदेपुढें नेऊन ठेविलें व तिची कन्या देवकीपुढें बंदिशाळेंत आणून ठेविली. अदलाबदल केलेल्या लहान बालिकेला कंसानें ताडकन शीलेवर आपटली. पुढें कृष्ण हा गवळ्यांमध्येंच एक गवळी म्हणून वाढला. बलरामाला सुद्धां वसुदेवानें एका गवळ्याच्या घरीं नेऊन ठेविलें. अशा रीतीनें तीं दोन्हीं भावंडें गौळवाड्यांत एकत्र वाढलीं. कृष्ण लहान तान्हें मूल असतांनाच विलक्षण पराक्रम करूं लागला. एके दिवशीं यशोदेनें कृष्णास गाडीच्या खालीं निजविलें. वराच वेळ त्यास अन्नपाणी दिलें नाही तेव्हां त्यानें हातपाय झाडण्यास सुरवात केली व एका लाथेसरशीं त्यानें ती जड गाडी उलथून टाकिली. मोठ्या आनंदानें राम व कृष्ण शेतांमधून व अरण्यामधून हिंडूं लागले व भोळ्या गोपींना त्रास देऊं लागले. एकदां तर यशोदेनें त्याच्या कमरेस दोरी बांधून त्याला उखळाली बांधून टाकलें व रागानें म्हणाली "पळ आतां कसा पळतोस तें पाहतें." तेव्हां कृष्णानें उखळी ओढण्यास सुरवात केली. ती उखळी दोन विशाल वृक्षांच्या मध्यें सांपडली तेव्हां कृष्णानें ते दोनीही वृक्ष मूळासकट उपटून टाकले. यशोदा व गोप घाबऱ्या घाबऱ्या येऊन पाहतात तों श्रीकृष्ण त्यांस झाडांच्या फांद्यांमध्यें खेळतांना दिसला. त्यास कोणत्याहि तऱ्हेची इजा झाली नव्हती.

याप्रमाणें उभयतां कृष्णसंकर्षणांची बाल्यदशा परिपूर्ण होऊन गोकुळांतच ते सात वर्षांचे झाले. सात वर्षें झाल्यानंतर त्या मुलांना गौळवाड्याचा कंटाळा

आला. तेव्हां श्रीकृष्णानें आपल्या शरीरांतून हजारों लांडगे उत्पन्न केले, त्यांच्यापासून गोपालांनां फार भय प्राप्त झालें. तेव्हां गोपालांनीं तें वन सोडून वृंदावनांत जाण्याचा बेत केला. गोप वृंदावनांत रहावयास आल्यावर ते दोघे वसुदेवाचे सुस्वरूप पुत्र वनामध्यें आनंदानें संचार करूं लागले. वनांत गेला असतां कांहीं वेळ कृष्ण गायन करी, लहर लागली तर कर्णमधुर पर्णवाद्य वाजवीत वसे, कधीं अत्यंत गोड लागणारी वेणु वाजवूं लागे. एके वेळीं कृष्ण एकटाच यमुना नदीच्या तीरातीरानें हिंडत असतां एक उत्तम खोल डोह त्याच्या नजरेस पडला. यांतच महाभयंकर कालिया नामक सर्पराज आपल्या अनुयायांसह राहात होता; व यानेंच यमुना नदीचें पाणी दूषित करून टाकलें होतें व याच्याच भीतीनें तेथील प्रदेशांत कोणी फिरकत नसे. कालियाचें दमन करण्याकरितां श्रीकृष्णानें डोहांत उडी मारली. तेव्हां खवळून जाऊन तो सर्प जलांतून एकदम वर आला. त्या सर्पाला पांच मुखें असून त्याच्या उच्छ्वासांतून अग्नि निघत होता. त्यानें व इतर मोठमोठ्या सर्पांनीं आपल्या फणांच्या वेगेमध्यें कृष्णास आवळून टाकलें व तीक्ष्ण दातांनीं दंश केले. नंतर तें सर्पांचें वेष्टण ताडकन तोडून एकदम कालियाच्या मधल्या मोठ्या मस्तकावर श्रीकृष्णानें आरोहण केलें, अशा रीतीनें त्याचें पूर्ण दमन करून त्यास शरण येण्यास लावलें. पुढें तो सर्पराज कालिया आपल्या अनुयायांसह समुद्रांत रहावयास गेला.

नंतर गोवर्धनपर्वतावर गर्दभाच्या रूपानें धेनुक नांवाचा राक्षस राहात होता त्याचा श्रीकृष्णानें वध केला. पुढें प्रलंब राक्षसाचा वध कृष्णाचा भाऊ बलराम यानें केला. त्यानें कृष्ण आपणास आटपणार नाहीं म्हणून त्यास त्रास दिला नाहीं. नेहमींप्रमाणें पुढें गोपांनीं शरदृऋतूंत शक्रोत्सव करण्याचें ठरविलें. श्रीकृष्णानें शक्रोत्सव करण्याचें नाकारलें व म्हणाला, "आपण अरण्यांत वास्तव्य करणारे गोपाल आहोंत, गाईंच्या जीवावर नेहमीं आपण आपला निर्वाह करतों. त्यापक्षीं पर्वत, वनें व गाई हींच आपलीं दैवें होत. तेव्हां शक्रोत्सव करण्यापेक्षां, गोपहो, आपण पर्वताप्रीत्यर्थ उत्सव करण्यास सुरवात केली पाहिजे; कारण गोपाल गिरियज्ञ करतात." तेव्हां गोपालांनीं गिरियज्ञ केला. आपल्या प्रीत्यर्थ होणाऱ्या उत्सवामध्यें विघ्न आलें असें पाहातांच इंद्राला अत्यंत क्रोध आला व त्यानें पर्वतावर भयंकर वादळ उत्पन्न केलें. तेव्हां श्रीकृष्णानें एका हातावर पर्वत तोडून धरून त्याचें गोपालावर छत्र धरिलें व त्यांचें संरक्षण केलें. याप्रमाणें सात दिवस झाल्यानंतर इंद्रानें निरुपायास्तव वादळ थांबविलें व गोपालकृष्णानेंहि त्या अचलपर्वताची जागच्या जागीं स्थापना केली. मग इंद्रानें विनयानें श्रीकृष्ण हा विष्णूचाच अवतार आहे असें कबूल केलें. गोपांनीं कृष्णाची पूजा केली व त्याचीं स्तोत्रें गाइलीं. तेव्हां कृष्ण म्हणाला "मी आपला एक आप्त, साधा मनुष्य आहे. कालांतरानें माझ्या खऱ्या स्वरूपाची तुम्हांस ओळख होईल." कृष्ण गवळ्यांच्या पोरांमध्येंच गवळी म्हणून वाढला. त्यानें गोपालांमध्यें निरनिराळ्या तऱ्हेचे खेळ सुरू केले. वृषभांच्या झुंजा लावल्या व कुस्त्या करविल्या. शरदृऋतूंत सुंदरशा चांदण्या रात्रीं गोपकन्यांसह कृष्ण क्रीडा करी. कृष्णाशीं रममाण होण्यास उत्सुक झाल्यामुळें त्या त्याच्या भोंवतीं मंडलाकार उभें राहून त्याच्या मनोरम चरित्राचीं गाणीं म्हणत व तसेंच कृष्णाचें नृत्य, गीत, विलास, स्मित, व वीक्षित इत्यादिकांचें अनुकरण करीत त्या व्रजयोषिता यथेच्छ क्रीडा करीत होत्या.

वरील प्रकारें क्रीडेमध्यें कृष्णाची कालक्रमणा चालली असतां एके दिवशीं अरिष्ट नामक मदोन्मत्त राक्षस वृषभाचें रूप धारण करून व्रजामध्यें येऊन धडकला. तेव्हां कृष्णानें त्या बैलाचें उजवें शिंग उपटून काढून त्याचाच त्याला एक तडाखा लगावला. तो तडाखा बसतांच अरिष्टासुर मरण पावला.

कृष्णाच्या शूर कृत्यांची कीर्ति कंसाच्या कानीं जातांच त्याला अत्यंत उद्वेग उत्पन्न झाला. कृष्ण व बलराम यांनां त्यानें मथुरेस आणवलें व मल्लयुद्ध करण्यास सांगितलें. मथुरानगरींत कृष्ण आला नाहीं तोंच त्यानें अचाट कृत्यें करण्यास सुरवात केली. देवालाहि वांकवण्यास कठिण जाणारें धनुष्य त्यानें सहज वांकविलें व मधोमध मोडून त्याचे दोन तुकडे केले. त्याबरोबर एक भयंकर आवाज झाला. गवळ्याच्या पोरांचे प्राण घेण्याकरितां कंसानें अंगावर सोडलेल्या हत्तींचे दांत उपटून कृष्णानें त्यास ठार मारिलें. व तसेंच कुस्ती खेळण्याकरितां उभे राहिलेल्या दोन मल्लांचाहि त्यानें समाचार घेतला. तेव्हां रागानें कंस राजानें सर्व गोपालांनां आपल्या राज्याच्या बाहेर हांकलून देण्यास आज्ञा केली. कृष्णानें सिंहाप्रमाणें वेगानें उडी मारली व कंसाचे केस धरून त्यास सभास्थानाच्या मध्यभागीं आणिलें व त्यास ठार मारिलें.

कांहीं काल लोटल्यावर उभयतां रामकृष्ण अवंती नगरींत रहात असलेल्या सांदीपन नामक नांवाजलेल्या गुरूपाशीं धनुर्विद्या शिकण्याकरितां गेले. त्या गुरूचा दत्त नामक पुत्र समुद्रांत बुडून मरण पावला होता त्यास परत आणावें अशी गुरुदक्षिणा त्यानें कृष्णाजवळ मागितली. तेव्हां कृष्ण यमलोकीं गेला व त्यानें यमधर्माचा पराभव करून गुरुपुत्र परत आणून गुरूच्या घरीं पोंचविला.

कंसाच्या वधाचा सूड उगवण्याच्या हेतूनें कंसाचा सासरा जरासंध राजा यादवांनां जिंकण्याकरितां मोठें थोरलें चतुरंग सैन्य बरोबर घेऊन मथुरेंवर गेला. त्यानें मथुरेला वेढा देऊन वारंवार हल्ले चढविले पण कृष्णानें ते सर्व परतविले व त्याचा पराभव केला.

तशीच रुक्मिणीहरणाचीहि कथा सुरस आहे. एकदां विदर्भ देशच्या भीष्मक नांवाच्या राजानें राजकन्या रुक्मिणी ही शिशुपाल राजाला देण्याचें कबूल केलें व लग्न होणार इतक्यांत कृष्ण रामाला बरोबर घेऊन कुंडिनपुरांत आला व त्यानें नवऱ्यामुलीस पळविलें. हें कृत्य पाहून राजांनां राग आला व त्यांनीं कृष्णाचा पाठलाग आरंभिला; परंतु रामानें त्या सर्वांचा पराभव केला. नवऱ्यामुलीच्या भावानें म्हणजे रुक्मीनें कृष्णाला मारून आपली भगिनी रुक्मिणी परत आणल्याशिवाय नगरप्रवेश करणार नाहीं अशी शपथ घेतली. कृष्णाबरोबर त्याचें घनघोर युद्ध झालें व त्यांत त्याचा पराभव झाला. परंतु रुक्मिणीच्या विनंतीवरून कृष्णानें रुक्मीस जीवदान दिलें. आपली शपथ खोटी ठरेल म्हणून रुक्मीनें नवीन शहर वसविलें. नंतर द्वारकेमध्यें कृष्ण व रुक्मिणी यांचा लग्नसमारंभ झाला. तिला दहा पुत्र झाले. कृष्णानें आणखी सात बायका केल्या. व नंतर सोळा हजार स्त्रियांशीं लग्न केलें व त्यास हजारों पुत्रपौत्र झाले. रुक्मिणीचा पुत्र प्रद्युम्न याचें लग्न रुक्मीच्या कन्येशीं लागलें.

प्रद्युम्नाचा मुलगा अनिरुद्ध यानें रुक्मीच्या नातीशीं लग्न लाविलें. अनिरुद्धाच्या लग्नाच्या वेळीं अक्षद्यूत खेळत असतांना बलराम व रुक्मि यांच्यामध्यें तंटा उपस्थित झाला व त्या कलहांत रामानें रुक्मीला मारिलें. ही कथा निवेदन करतानां रामाचा अतुल पराक्रम वर्णिला आहे. नंतर नरकवधाची कथा सांगितली आहे. नरकासुर नामक एक राक्षस होता. एकदा त्या दैत्यानें अदिति—मातेचीं कुंडलें हरण करून नलीं; व देवांनां अगदीं त्रासून सोडिलें. तेव्हां इंद्राच्या विनंतीवरून श्रीकृष्णानें नरकासुराचा वध केला. पुढें इंद्र व कृष्ण यांचें युद्ध दिलेलें आहे. एकदां नारदानें स्वर्गातील पारिजात वृक्षाचीं पुष्पें श्रीकृष्णाला दिलीं. तीं त्यानें आपली पट्टराणी जी रुक्मिणी तिला दिलीं. परंतु कृष्णाची नेहमींची आवडती स्त्री जी सत्यभामा तिला हा आपल्या सवतीचा उत्कर्ष सहन झाला नाहीं. तेव्हां तिनें हट्ट करून "पारिजात वृक्ष स्वर्गामधून आणून देईन" असें अभिवचन कृष्णाकडून घेतलें. पारिजात न देण्याविषयीं इंद्राचा दृढ निश्चय पाहून कृष्णानें इंद्रास युद्ध करण्यास आव्हान केलें. तेव्हां इंद्राचें व कृष्णाचें घनघोर युद्ध जुंपलें. शेवटीं अदितिमातेनें दोघांची समजूत घालून युद्ध संपविलें. या लांबलचक भागानंतर एक बोधप्रद भाग दिला आहे. हा शृंगारिक भाग खरोखर कामशास्त्राचा आहे. नारदमुनि व सर्व कृष्णस्त्रिया यांच्या संवादांत एका पुण्यद व्रताचें वर्णन दिलें आहे. हें व्रतवर्णन, शंकराची भार्या जी उमा, तिच्या तोंडीं घातलें आहे. सभाग्य व सुंदर बनून भर्त्याची अधिक लाडकी होऊन त्याची मर्जी सुप्रसन्न करावयाची असेल तर हीं पुण्यद व्रतें करावीं. हीं व्रतें सद्गुणी भार्येच्या निष्ठेचीं द्योतक आहेत. या भागांत विवाहित स्त्रियांचीं कर्तव्यें दिलीं आहेत. पुढील भागांत कृष्णाचें असुरांबरोबर झालेलें युद्ध दिलें आहे. षट्पुरांमध्यें राहणाऱ्या राक्षसांनीं सन्मार्गस्थ व साधुप्रिय ब्रह्मदत्ताची कन्या चोरून नेली, तेव्हां कृष्णानें त्याच्या मदतीस जाऊन ती कन्या, दानवाधिपति निकुंभ यास ठार मारून, सोडविली अशी कथा आली आहे. नंतर शैवमतविषयक वर्णन आलें आहे. परंतु या अध्यायाचा कृष्णवर्णनाशीं कांहीं एक संबंध नाहीं. यांमध्यें शिवानें अंधकासुराचा वध केल्याची कथा आहे. पुढें कृष्णानें निकुंभासुराचा वध केला. एकदां सर्व यादव, बलराम व श्रीकृष्ण यांजबरोबर पिंडारक तीर्थावरील समुद्रयात्रेस गेले व त्या ठिकाणीं त्यांनीं एक महोत्सव केला. तो असा:—सोळा सहस्र स्त्रियांशीं कृष्ण क्रीडा करूं लागला. राम आपल्या एकट्या रेवती नामक स्त्रीसमागमेंच रममाण झाला. यादव—कुमारांनीं जलक्रीडा करण्याकरितां हजारों वेश्या बरोबर नेल्या होत्या. त्यांजबरोबर ते कुमार जलक्रीडा करूं लागले, वेश्या जलामध्यें गाऊं लागल्या व नाचूं लागल्या. मद्यपान व सुग्रास भोजन करून त्यांनीं महोत्सव साजरा केला. यादव क्रीडासक्त झाले असें पाहून निकुंभ दानव यानें भानुमती नामक भानुकन्येचें हरण केलें. कृष्णपुत्र प्रद्युम्नानें असुराचा

पाठलाग करून भानुमतीस परत आणिलें; व कृष्णानें निकुंभाचा वध केला. पुढील अध्यायांतून कृष्णाचा पुत्र प्रद्युम्न याचेंच वर्णन केलें आहे. वज्रनाभ असुराची कन्या प्रभावती व प्रद्युम्न यांचा विवाह वर्णिला आहे. नलदमयंती आख्यानांत जसे हंस नल व दमयंती यांजमधील प्रेमाचे निरोप पोहोंचवणारे दूत होते तसेच याहि प्रेमसंपादनांत हंसांनीं दूतांची कामगिरी केली. वज्रनाभाच्या राजसभेंत प्रद्युम्न नट म्हणून गेला व त्यानें बरोबर आपले स्नेही नट म्हणून नेले. त्यांनीं निरनिराळे खे करून असुरांनां मोहून टाकलें. व रात्रीच्या रात्रीं प्रद्युम्नानें प्रभावतीच्या समागमांत घालविल्या. शेवटीं प्रभावतीच्या प्रेमाची बातमी वज्रनाभास कळली व त्यानें प्रद्युम्नास अटकेंत टाकण्याचा प्रयत्न केला परंतु असुरांचा वध व वज्रनाभाचा पराजय करून प्रभावतीसह प्रद्युम्न द्वारकेस गेला. पुढें प्रद्युम्नहरण वर्णन आहे. कृष्णपुत्रास जन्मून सात दिवस पूर्ण झाले तोंच कालशंवरानें त्याचें हरण केलें. पुढें तो बालक मोठा झाला तेव्हां शंवराची बायको मायावती हिजला प्रद्युम्न आपला पति असावा अशी इच्छा उत्पन्न झाली; व तूं माझा पुत्र नसून रुक्मिणीचा पुत्र आहेस असें तिनें त्यास सांगितलें. शंवराबरोबर तुंबळ युद्ध करून प्रद्युम्नानें त्यास मारिलें; व मायावतीस घेऊन तो कृष्णाच्या नगरीस आला. त्या ठिकाणीं रुक्मिणीनें व कृष्णानें त्याचा गौरव केला. या कथेंत मध्येंच बलरामानें म्हटलेलें आन्हिक स्तोत्र दिलें आहे. या स्तोत्राचा मूळ कथेशीं संबंध नसून यांत नुसतीं देवादिकांचीं नांवें दिलीं आहेत. कृष्णमाहात्म्य कथा वर्णन केल्यानंतर दुसऱ्या पर्वाच्या शेवटच्या भागांत बाणयुद्ध दिलें आहे व प्रद्युम्नाचा मुलगा अनिरुद्ध व बाणासुराची कन्या उषा यांचा विवाह वर्णिला आहे. बाणासुर हा शिवभक्त असल्यामुळें शंकर त्याच्या मदतीस धांवून आले. तेव्हां विष्णूचा अवतार कृष्ण व शंकर यांचें घनघोर युद्ध जुंपलें. सर्व पृथ्वी थरथरा कांपूं लागली, तेव्हां ब्रह्मदेव मध्यें पडले व विष्णु व शंकर हे एकच आहेत असें सांगून त्यांनीं युद्ध संपविलें. यालाच जोडून दोन्ही देव एकच आहेत याबद्दल एक स्तोत्र लिहिलेलें आढळतें. अनिरुद्ध व उषा यांच्या द्वारावतींत झालेल्या लग्नसमारंभाच्या वर्णनानंतर या दुसऱ्या पर्वाचा शेवट होतो.

वरील हरिहरस्तोत्रावरून हरिवंश नुसतें काव्य नसून धर्मांतील निरनिराळ्या ग्रंथांतील तत्त्वांचें एकीकरण झाल्यामुळें हा एक धर्मग्रंथ बनला आहे असें स्पष्ट दिसून येतें.

कृष्णकाव्याचा अवशेष दुसऱ्या पर्वांत सांपडतो. कृष्णकाव्य खात्रीनें पूर्वीं अस्तित्वांत असलें पाहिजे. हरिवंशाच्या तिसऱ्या पर्वाचें नांव भविष्यपर्व. हें पुराणग्रंथांचा एक लहानसा संग्रह आहे. भविष्यपर्व म्हणजे पुढील काळाबद्दल लिहिलेला भाग. या भागांत पुढील युगांमध्यें घडणाऱ्या गोष्टी दिल्या आहेत. या पर्वांतील पहिल्या थोड्या अध्यायांनांच भविष्यपर्व हें नांव यथार्थ आहे. या अध्यायांत जनमेजयाच्या अश्वमेधकथेचें वर्णन दिलें आहे. राजसूय यज्ञ करण्याची इच्छा जनमेजयानें दर्शविली तेव्हां व्यासानें त्याला तुझा यज्ञ सफल होणार नाहीं असें अगोदरच सुचविलें. ईशभक्ति व धर्मपरायणता ज्या युगांत राहील असें कृतयुग संपल्यानंतर कलियुग लागेल व या युगांत ईश्वराचें अस्तित्व कोणी कबूल करणार नाहींत. भविष्यपर्व हा एक स्वतंत्र निराळा भाग असून यास महाकाव्य असेंहि म्हणतात. नंतर दोन तऱ्हांनीं उत्पत्तीचें वर्णन दिलें आहे. तिसऱ्या भागामध्यें प्रामुख्यानें विष्णूच्या वराह, नृसिंह व वामन अवतारांचें वर्णन आढळतें. हरिहर हे एकच आहेत असें दाखविण्याचा ज्याप्रमाणें दुसऱ्या पर्वाच्या शेवटीं प्रयत्न केलेला आहे तद्वतच या भागांत प्रयत्न केलेला आढळतो. मधून मधून विष्णूच्या तोंडीं शिवस्तोत्र घातलेलें आढळतें व शिवाच्या तोंडीं विष्णुस्तोत्र घातलेलें आहे. पुढील अध्यायांत कृष्णाचा पराक्रम वर्णिलेला आहे; त्यांत पौंड्र राजाचा वध केल्याचें वर्णन आहे. हरिवंशाच्या तिसऱ्या पर्वाच्या शेवटच्या भागांत हंसडिंभकोपाख्यान दिलें आहे, व त्यांत त्यांचा कृष्णानें वध केल्याचें वर्णन आलें आहे. आणखी पुढें एक मोठा अध्याय दिला आहे. त्यांत महाभारतश्रवणाचें पर्वशः फल, व वाचकास मिळणारें स्वर्गांतील फल दिलें आहे. प्रत्येक पर्व संपल्यानंतर व तसेंच समाप्तीच्या दिवशीं ऐकणारानें वाचकाला कोणकोणतीं दानें करावीं हें सांगितलें आहे. सर्व शास्त्रांमध्यें महाभारत अत्युत्तम, उत्कृष्ट व पवित्र शास्त्रग्रंथ आहे अशी भारताची स्तुति केली आहे. हे भरतकुलश्रेष्ठा, वेद, रामायण आणि पवित्र असें जें भारत या सर्वांमध्यें आरंभीं, मध्यें व शेवटीं श्रीविष्णूचें स्तोत्र आहे म्हणून हें एक विष्णुमाहात्म्य आहे. वास्तविक विष्णूच्या माहात्म्याचें वर्णन झाल्यानंतर ग्रंथ संपावयास पाहिजे पण पुढें त्रिपुरासुरवधाचें आख्यान [illegible] शिवाची स्तुति केलेली आहे. फिरून शेवटच्या [illegible] उपयोगी

श्रीविष्णूचीच स्तुति केली आहे. सरतेशेवटीं हरिवंशाचा थोडक्यांत वृत्तांतक्रम देऊन फलश्रुति व दानें सांगितलीं आहेत.

दुसऱ्या कित्येक मुख्य मुख्य पुराणांतील व हरिवंशांतील कांहीं भागाची वाङ्मयदृष्ट्या जर तुलना केली तर त्यांचें सादृश्य पाहून हरिवंश हें एक स्वतंत्र पुराण आहे असें वाटतें. इतर पुराणांबरोबर हरिवंशाचें वर्णन न करण्याचें कारण इतकेंच कीं हरिवंश महाभारताबरोबर लिहिल्यामुळें महाभारताचा इतिहास व काळ यांचा उल्लेख स्पष्टपणें लक्षांत येतो. केवळ, भारतीय लोक हरिवंशाला भारतांतील एक खिल समजतात म्हणून महाभारताबरोबर हरिवंशाचें वर्णन केलें असें समजूं नये. आतां महाभारताच्या इतिहासाकडे वळूं.

**महाभारताचा काळ व इतिहास**—आतांपर्यंत हस्तलिखित व छापील उपलब्ध असलेल्या प्रतींवरून महाभारताचें सूक्ष्म निरीक्षण केलें. आतां हा एवढा अवाढव्य ग्रंथ केव्हां व कसा लिहिला गेला या प्रश्नाचा विचार करूं.

वाचकाला या महाकाव्याची अनुक्रमणिका वाचतांना असंबद्धता दिसून येतेंच, व ही असंबद्धता खुद्द महाभारत वाचतांना तर फार दृष्टीस पडते. सांप्रत ज्या स्वरूपांत महाभारत उपलब्ध आहे, त्या स्वरूपावरून पांडवांची बाजू घेऊनच हा ग्रंथ लिहिला असावा असें वाटतें; कारण पांडव तेवढे अति शूर, अतुल पराक्रमी, उदार अंतःकरणाचे, सुपथगामी, व कौरव तितके विश्वासघातकी, खोडसाळ, व दुर्गुणी असे दाखविले आहेत. या असंबध्द काव्यांत कौरव पक्षांकडील सर्व वीर विश्वासघात व निमकहरामपणा केल्यामुळेंच युध्दामध्यें मारले गेले असें निवेदन केलें आहे. परंतु चमत्कार हा कीं वास्तविक कपट, फसवेगिरी कृष्णांतच दिसून येते व प्रत्येक कपटाच्या मुळाशीं कृष्णच सांपडतो. पांडवांचा पक्ष धरून त्यांचें गैरवर्तन छपविण्याचा प्रयत्न कृष्णच करतो. महाभारतांतील बऱ्याचशा भागांमध्यें व विशेषतः हरिवंशांत ह्याच कृष्णाची स्तुति केली आहे व यालाच भगवान् विष्णूचा अवतार व सद्गुणाचा पुतळा समजून याचेंच माहात्म्य वर्णिलें आहे.

या स्पष्ट दिसून येणाऱ्या असंबध्दतेबद्दल कोणतेंहि स्पष्टीकरण करतां येण्याजोगें नाहीं. कौरव व पांडव यांच्या महायुद्धामुळें हिंदुस्थानांतील वायव्येकडील प्रांतांत राज्यक्रांति झाली व या युद्धाच्या बाह्यतः ऐतिहासिक दिसणाऱ्या कथेवरून मूळ महाभारत काव्य लिहिलें असावें ही कल्पना गृहीत धरून प्रथम वीरश्रीचे पोवाडे दुर्योधन व कौरवांजवळील असलेल्या इतर स्तुतिपाठकांनीं रचिले असावेत व या चुलतभावंडांतील घनघोर युद्ध संपल्यानंतर कालांतरानें यशस्वी झालेल्या पांडवांचें राज्य व्यवस्थेशीर प्रस्थापित झाल्यानंतर हे सर्व पोवाडे नवीन राजघराण्याच्या पदरीं असलेल्या भाटांनीं गाण्यास सुरवात केली असली पाहिजे असें दिसतें.

मूळ पोवाडे अजीबात नाहींसे न करतां त्यांतच फेरफार करून कौरवांनां तुच्छ लेखून पांडवांनां रुचेल अशी स्तुति करून भाटांच्या तोंडीं आले असावेत असें वाटतें. महाभारतांतील काव्यजीवन जें महायुध्दाचें वर्णन तें कौरवांकडील भाट, धृतराष्ट्राचा सारथी संजय याच्या तोंडीं घातलें आहे. म्हणूनच युध्दामधील पहिल्या प्रसंगाच्या वर्णनांत कौरवांची बाजू उचललेली दिसते. महाभारतांतील प्रथम पर्वांतील कथेनुसार जनमेजयानें आरंभिलेल्या सर्पसत्रप्रसंगीं व्यासशिष्य वैशंपायन यानें भारत निवेदन केलें. हा जनमेजय राजा अर्जुनाच्या वंशांत जन्मला असल्यामुळें याला महाभारत सांगतांना कौरवांपेक्षा पांडवांचीच स्तुति जास्त केलेली आढळते यांत नवल नाहीं. कृष्ण ज्या यादवांच्या कुळांत जन्मला त्या कुळांतील लोक असंस्कृत पशुपाल होते असें ठिकठिकाणीं महाभारतांत वर्णिलेलें आढळतें, व कृष्णाचे प्रतिस्पर्धी वीर त्याचा शूद्र, गवळी म्हणून धिक्कार करीत असत व त्याची अवहेलना करीत असत. प्राचीन आर्ष काव्यांमध्यें कृष्णाला गोपलांचा मुख्य नायकच समजत होते, देव समजत नव्हते. हरिवंशांतील कृष्णकथा ज्या प्राचीन दंतकथांवरून लिहिल्या त्या प्राचीन कथांत कृष्णाचें वर्णन फक्त गोपालांतील एक शूर वीर असें केलें आहे. त्याला ईश्वर म्हटलेलें आढळत नाहीं. आतां असें मात्र शक्य आहे कीं अनेक कृष्ण झाले असावेत व त्या सर्व कृष्णांचा पुढें एकच कृष्ण बनवला गेला असावा. उदाहरणार्थ छांदोग्योनिषदांत एका देवकीपुत्र कृष्णाचा उल्लेख आढळतो. तसेंच अशी एक कल्पना आहे कीं महाकाव्यांतील कृष्ण व प्राचीन दंतकथांतील कृष्ण एकच असून तो एका विशिष्ट धर्मपंथाचा उत्पादक असावा व भगवद्गतेंतील पुराणभागांत त्यानें स्थापिलेलीं तत्त्वें दिलीं असावींत व नंतर त्याच्या पंथांतील लोकांनीं त्यास विष्णूचा अवतार बनवून त्याची पूजा अर्चा आरंभिली असावी. कोणत्याहि तऱ्हेनें

कल्पना केली तरी पांडवांचा सखा कृष्ण व हरिवंशांत विष्णूचा अवतार मानलेला श्रीकृष्ण भगवान् यांत महदंतर आहे. कृष्णाला देवत्व प्राप्त होण्यास व कौरव घराण्यांतून पांडव घराण्याकडे राजसत्ता जाण्यास बराच काळ लागला असला पाहिजे. महाभारतांतील युध्दवर्णनात्मक श्लोकांत दिसून येणारा राजकीय व धार्मिक विकास होण्यास बराच काळ लोटला असला पाहिजे. काव्याचें जीवन असलेले हे श्लोक एकाच कवीनें लिहिले असावेत हें असंभाव्य दिसतें. उदाहरणार्थ, पांडवांच्या विवाहकथेच्या प्रसंगींच्या आणि अर्जुनाच्या साहसी कृत्यांचा विचार करूं. विराटपर्वांतील गोग्रहणप्रसंगीं झालेल्या युध्दाचें वर्णन वाचतांना अर्जुनानें भीष्म व कौरवांकडील सर्व योध्दे एका क्षणांत पळवून लाविले असें वर्णिलेलें आढळतें. अठरा दिवस पर्यंत जे कौरव जिंकले गेले नाहींत व ज्यांनां जिंकावयास पांडवांनां वारंवार कपटाचा आश्रय करावा लागला ते कौरव निमिषार्धांत अर्जुनानें पळविले ही गोष्ट असंभाव्य आहे, विराटपर्व मागाहून जोडलें असावें यांत तिळमात्र शंका नाहीं. व पुढील पर्वांतील सुंदर युध्दवर्णनें वाचलीं तर या वर्णनानंतर विराटपर्व लिहिलें गेलें असावें असें वाटतें. या पर्वांमधून महाकाव्याचे प्राचीन काळीं लिहिलेले कांहीं भाग सांपडतात व यांत असंबद्धता पदोपदीं दिसते व ही असंबध्दता कवीच्या निष्काळजीपणामुळें उत्पन्न झाली असावी असें संभवत नाहीं व ही एकाच कवीची असंबध्द कृति असावी असेंहि म्हणणें योग्य नाहीं.

अकृत्रिम सुंदर वर्णनाशिवाय अठरा दिवस चालविलेल्या घनघोर युद्धाचें वर्णन वाचलें तर पुनरुक्ति फार आढळते व एकाच तऱ्हेचे कंटाळवाणे वर्णन केलेले अध्याय बरेच दिसून येतात.

वंशपरंपरेनें हातीं आलेलें व महाकाव्य म्हणून गणलेलें महाभारत ही खात्रीनें एका कवीची कृति नाहीं. महाभारताचें जीवन जें युध्दवर्णन तें सुध्दां प्राचीन महावीरकाव्य दिसत नाहीं; त्यांत फार भर पडलेली आहे. युद्धवर्णनांत निरनिराळ्या काव्यांची भर पडली आहे. प्राचीन दंतकथांतील निरनिराळीं वीरश्रीचीं गीतें व ब्राह्मणी कथा, लहानशा नैतिक तत्त्वापासून तों अगाध तत्त्वज्ञानावर लिहिलेलीं बोधप्रद काव्यें, निवृत्तिपर काव्यें, धर्मशास्त्र व तशींच अठरा पुराणें यांतून युद्धवर्णनांत बराच भाग घेतलेला आहे. ' महाभारत—ए क्रिटिसिझम ' या पुस्तकांत जुन्या मतांचे अभिमानी रा. चिंतामणराव वैद्य लिहितात कीं, कृष्ण व महाभारत कर्ता व्यास समकालीन होते. होमर मिल्टन व शेक्सपिअरपेक्षां फार उच्च दर्जाचे कवी व्यास होते.

महाभारतांत वर्णिलेल्या भारतीय युद्धाच्या वेळीं कृष्ण व व्यास या दोन्हीहि व्यक्ती अस्तित्वांत होत्या. हें युद्ध ख्रिस्तपूर्व ३१०१ वर्षाच्या सुमारास झालें असावें. प्रस्तुतचा महाभारत ग्रंथ पूर्वी फार लहान ग्रंथ होता व त्यांत मागाहून अतिशय भर पडली असावी व बरेच श्लोक मधून मधून घातले गेले असावेत. महाभारत जर एकाच ग्रंथकाराची कृति आहे असें मानलें तर या ग्रंथकारास महाकवि व भिकार कविता खरडणारा नवशिक्या, महर्षि व महामूर्ख, बुद्धिवान् लेखक व पोकळ पंडित असें एकसमयावच्छेदेंकरून म्हणावें लागेल व तसेच या अद्भुत व्यक्तीला धर्मशास्त्रांतील व तत्त्वज्ञानांतील परस्परांविरोधी मतें माहीत असलीं पाहिजेत असें म्हणावें लागेल.

महाभारतांतील निरनिराळ्या भागांतील भाषासरणी छंद, व मोडणी पाहिली तर त्यांत समरूपत्व बिलकूल आढळत नाहीं. साधारणपणें या लोकप्रिय महाकाव्याच्या भाषेला पौराणिक संस्कृत ही संज्ञा दिली तर चालेल. वास्तविक महाकाव्यांतील प्राचीन भाग जसे पुरातन भारतीय वेदांतील गद्यभागांतील भाषेप्रमाणेंच लिहिले आहेत तसे दुसरे भाग वेदभाषेसारखे लिहिलेले नाहींत. पाली भाषेची आठवण देणारे जसे कांहीं लोकप्रिय भाग आहेत तसेच अशिक्षित व साधारण दर्जाच्या पौराणिक लेखकांनीं लिहिलेले भाषादृष्ट्या गौण भागहि सांपडतात. भाषेची मोडणी पाहिली तर अलंकारांनीं भरलेल्या काव्यपद्धतीपेक्षां ती फार निराळी आहे. तथापि काव्यपद्धतीनुसार लिहिलेल्या भागांचीहि महाभारतांत कांहीं उणीव नाहीं. याशिवाय पुष्कळ भाग प्राचीन ब्राह्मणें व उपनिषदांतील इतिहासाच्या साध्या पध्दतीनुसार लिहिलेले आहेत व कांहीं भाग अव्यवस्थित पुराणभाषेनुसार लिहिलेले आढळतात.

महाभारतांतील बहुतेक श्लोक अनुष्टुप् छंदांत लिहिलले आहेत. प्राचीन व अर्वाचीन सुंदर अनुष्टुप् छंदाच्या पध्दती भारतांत आहेत.

महाभारतांत पुष्कळ गद्य भाग आहेत, या भागांत मात्रासाम्य व प्रास आहेत. कधीं कधीं तर गद्य पद्यात्मक बनतें. त्रिष्टुप् छंदांतील श्लोकहि महाभारतांत पुष्कळ आहेत. प्राचीन वदांतील त्रिष्टुप् छंदानुसार व

आर्वाचीन त्रिष्टुप् छंदाच्या लौकिक संस्कृतांतील पध्दती नुसार लिहिलेले श्लोक भारतांतील कांहीं भागांत सांपडतात.

या सर्व गोष्टींवरून महाभारत हें एकाच व्यक्तीनें एकाच काळीं लिहिलें असावें असें वाटत नाहीं. भारतांत निरनिराळ्या शतकांत लिहिले गेलेले प्राचीन व अर्वाचीन भाग आहेत. ग्रंथांतील मजकूर व लिहिण्याची पध्दति लक्षांत घेतली असतां कांहीं भाग वेदकालीन असावेत व कांहीं अलीकडील पुराणवाङ्मयपध्दतीनुसार लिहिलेले पुराणकालीन भाग असावेत.

पूर्वी कौरवांचें वर्णन केलेलें एक प्राचीन वीरकाव्य असावें व तेंच मूळ महाभारत असावें असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे.

पांडवांची महति व त्यांचें वर्चस्व दाखविण्याच्या बुध्दीनें भारताची पुनर्रचना झाली असावी व बौध्द लोकांनीं व ब्राह्मण लोकांनीं आपापला धर्म वाढविण्याच्या हेतूनें महाभारतांत वारंवार फेरबदल केला असला पाहिजे. हॉल्ट्झमनूच्या मतें महाभारताची पौराणिक पध्दतीनुसार सुधारून केलेली आवृत्ति इ. स. ९०० किंवा ११०० मध्यें झाली असावी. पुढें कांहीं शतकांनंतर सांप्रतचें महाभारताचें पूर्ण स्वरूप बनलें असावें. हें स्वरूप १५ व्या किंवा १६ व्या शतकांत प्राप्त झालें असावें हें म्हणणें चुकीचें आहे. कारण इ. स. ५०० मध्यें महाभारत ग्रंथ नुसतें एक काव्य म्हणून गणलें जात नसून भारत हा एक पवित्र धर्मग्रंथ मानला जात असे असें शिलालेखांवरून सिध्द झालें आहे व हें मत डॉ. रा. गो. भांडारकर व के. टी. तेलंग यांनीं अगोदरच प्रस्थापित केलें आहे. व हा ग्रंथ व सांप्रतचा उपलब्ध असलेला पूर्ण स्वरूपांतला महाभारत ग्रंथ एकच होय. कादंबरीग्रंथांत बाणकवीनें म्हटलें आहे कीं, विलास नांवाची राणी सणाच्या दिवशीं देवालयांत महाभारत श्रवण करण्यास गेली होती.

महाभारताचें जें श्रवण आजहि देवालयांतून चालू आहे तें केवळ मौजेखातर वाचलें जात नसून धार्मिक शिक्षण देण्याकरितां वाचलें जातें. कॅम्बोडियांतील शिलालेखावरूनहि हें स्पष्ट होतें कीं, इ. स. ६०० मध्यें महाभारताचें पारायण सार्वजनिक ठिकाणीं होत असे.

पांचव्या व सहाव्या शतकांतील जीं दानपत्रें आज उपलब्ध आहेत त्या पत्रांमध्यें महाभारतांतील अनुशासन पर्वांतील दानधर्मपर्वाचा धर्मग्रंथ म्हणून उल्लेख आहे. अशाच प्रकारच्या एका शिलालेखांत एक लक्ष श्लोक महाभारतांत आहेत असा उल्लेख आढळतो. हे एक लक्ष श्लोक बारावें व तेरावें पर्व व हरिवंशाचा कांहीं भाग वगळला असतां जवळ जवळ सुद्धां भरत नसून, बरीच तफावत पडते. महाभारतांत ९ व्या शतकांत तेरावें पर्व व हरिवंश अंतर्भूत केले गेले असले पाहिजेत व भारत हा एक धर्मग्रंथ म्हणून हिंदुस्थानाजवळील प्रदेशांत देवालयांतून वाचला जात होता असें जर मानलें तर हल्लींचें महाभारत ३ ऱ्या किंवा ४ थ्या शतकांत लिहिलेलें असलेंच पाहिजे यांत शंका नाहीं.

खुद्द महाभारतांत शंभर हजार म्हणजे एक लक्ष श्लोक आहेत असा उल्लेख आढळतो ( आदिपर्व अध्याय १ ला, श्लोक १०७; शांतिपर्व अ. ३४३, श्लोक ११ पहा. )

महाभारताच्या कलकत्त्याच्या प्रतींत अठरा पर्वांत एकंदर ९००९९ श्लोक आहेत. त्यांपैकीं १३९३९ शांतिपर्वांत व ७७५९ अनुशासनपर्वांत आढळतात. हरिवंश धरून एकंदर श्लोकसंख्या १०६४६६ भरते. भविष्यपुराण वगळलें तर १०११९४ श्लोक भरतात. ही संख्या एक लक्षाच्या जवळ जवळ आहे. महाभारताच्या निरनिराळ्या प्रतींत फार फरक दिसतो. एका प्रतींत नसलेले बरेचसे श्लोक दुसऱ्या प्रतींत समाविष्ट झालेले आहेत. श्लोकविस्तार न बदलतां महाभारतांतला मजकूर बदलणें शक्य आहे हें वरील विधानावरून दृष्टोत्पत्तीस येतें.

कदाचित बौद्ध धर्माचा प्रसार झाल्यानंतर भारतास हें स्वरूप आलें असावें. कारण या ग्रंथांत अलेक्झांडरच्या हिंदुस्थानवरच्या स्वारीचा उल्लेख यवनांची स्वारी म्हणून केलेला आढळतो व ग्रीक अयोनियनांचाहि वारंवार उल्लेख आढळतो. तसेंच दगडांच्या इमारतींचाहि उल्लेख आला आहे. ग्रीक लोकांची ओळख होण्यापूर्वी हिंदुस्थानांत लांकडी इमारती होत्या. तेव्हां महाभारताला हल्लींचें स्वरूप खिस्तपूर्व ४०० वर्षांपासून खिस्तोत्तर ४०० वर्षांपर्यंत प्राप्त झालें असावें.

महाभारताची पुनरावृत्ति होणें किंवा एखादें पर्व ४ थ्या शतकानंतर त्यांत अंतर्भूत होणें, हें संभवत नाहीं. वारंवार संस्करणें झालें आहे व तसें करणें आवश्यक होतें हें म्हणणें देखील बरोबर नाहीं. हल्लीं ज्याप्रमाणें नवीन आवृत्ति काढणारा आपल्या मताप्रमाणें मूळ ग्रंथांत फेरफार करून किंवा कमीजास्त करून

काढतो तसाच प्रकार पूर्वी घडला असावा. शतकानुशतकें वैदिक ऋचा तोंडपाठ करीत गेल्या असल्यामुळें ग्रंथ लिहिणारांनीं आपल्या अकलेनुसार महाभारतांतील प्रसंग खुलविण्याकरितां त्यांत वेदांतील ऋचा घुसडल्या असाव्यात व वाचकवर्गावर परिणामकारक असा ग्रंथ होण्यास बरेच प्रसंग कमी किंवा जास्त केले असावेत असें वाटतें.

पोवाडयांवरून संघटित महाकाव्य बनतांना प्रथम विलक्षण फेरफार झाला असला पाहिजे. व या महाकाव्यांत बऱ्याच गोष्टींचा संग्रह असल्यामुळें प्रत्येक मनुष्यास आपल्या आवडीचा भाग महाकाव्यांत सांपडतो. याचें कारण एवढेंच कीं, प्राचीन पोवाडे निरनिराळ्या देशांतील अभिरुचीप्रमाणें व कालानुसार एका प्रदेशांतील भाटाकडून दुसऱ्या प्रदेशांतील भाटाकडे गेले असतांना बदलले गेले असावेत. मागें म्हटल्याप्रमाणेंच कौरव पक्षाकडील भाटांकडून पांडवांच्या भाटाकडे हे पोवाडे गेलेले असावेत. ज्या ठिकाणीं विष्णूची पूजा करतात त्या ठिकाणाहून शिवपूजा करतात अशा प्रदेशांत या काव्यांचा प्रसार झाला असला पाहिजे व तशीच कृष्णकालाची छटा भारतांत सांपडते. इतर देशांप्रमाणें हिंदुस्थानांतहि असा एखादा काळ आला असला पाहिजे कीं, ज्या काळीं नवीन काव्यें करणारे कवी लोपत असून पूर्वीचीं काव्येंच नुसतीं तोंडपाठ करणारे भाट राहिले असावेत. लढाईवर सूत म्हणून जाणारे भाट वीरकाळानंतर लोपले असावेत. हे भाट लढाईवर जाऊन आल्यानंतर लढाईतील वीरश्रीचें वर्णन एखाद्या यज्ञप्रसंगीं करीत असत.

या भाटांचे पूर्वज मध्यम प्रतीच्या सुशिक्षित वर्गापैकीं होते. या लोकांनींच वंशपरंपरेनें पुराणें पाठ केलीं असावींत. हे भाट धड ब्राह्मणहि नसावेत व धड क्षत्रियहि नसावेत. धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें सूत हे ब्राह्मण नवरा व क्षत्रिय बायको किंवा क्षत्रिय नवरा व ब्राह्मण बायको यांजपासून झालेली मिश्र संततीच असेल असें म्हणतां येत नाहीं. प्रस्तुत महाभारतांत हाच चमत्कार आहे कीं, ह्या काव्यास धड वीरकाव्यहि म्हणतां येत नाहीं व धर्मपर काव्यहि म्हणतां येत नाहीं. तसेंच हें महाकाव्यहि नाहीं व ज्याला पुराण म्हणतात तेंहि नाहीं.

शतकानुशतकेंपर्यंत महाभारताचा तोंडीं पाठ झाल्यानंतर महाभारत लिहिलेला ग्रंथ तयार झाला, व नंतर त्यास पूर्ण स्वरूप प्राप्त झालें असावें. हें पुराण लिहिण्यांत ब्राह्मण व पंडित लोकच विशेषतः होते. मजकूर व श्लोकसंख्या या दृष्टीनें जर महाभारत पूर्वीच्या महाभारतापासून विशेष भिन्न नाहीं असें म्हटलें तर चवथ्या शतकापूर्वीचें भारत व हल्लीचें भारत यांत साधारणपणें विशेष भिन्नत्व नाहीं असें म्हटलें असतां चालेल.

एखाद्या श्लोकाचीच काय पण दुर्गास्तवनासारख्या स्तोत्रांची सुद्धां ज्या महाभारतांत भर अगदीं अलीकडे पडली त्या पूर्वी भारताला तो संपूर्ण ग्रंथ नव्हता असेंच म्हणावें लगेल.

महाभारताचा उल्लेख करतांना विशेषतः कलकत्ता प्रत व मुंबईप्रत या दोन प्रतींचाच नामनिर्देश होतो. (१८३४–१८३९), कलकत्ताप्रतींत हरिवंशाचा समावेश केला आहे. व या ग्रंथाचे चार भाग केले आहेत. मुंबई प्रतींत नीळकंठाची टिका आहे; १८६२ सालानंतर मुंबई प्रतीच्या बऱ्याच आवृत्त्या निघाल्या आहेत. या प्रतींत हरिवंश नाहीं. भाषाशास्त्रदृष्टया दोन्हीहि प्रती बरोबर किंवा बिनचूक म्हणतां येत नाहींत.

दक्षिणात्य बहुकोशाधारानें लिहिलेली दक्षिण प्रत व उत्तर हिंदुस्थानांतील हस्तलिहित प्रतीवरून तयार केलेली उत्तरप्रत यांमध्यें बराच फरक आहे. एका प्रतींत नसलेले असे पुष्कळ श्लोक व कधीं कधीं तर मोठमोठाले अध्याय दुसऱ्या प्रतींत सांपडतात. श्लोकांचा अनुक्रमहि दोन्ही प्रतींत निरनिराळा आहे. हा लेख लिहितांना उत्तरेकडील प्रतच आधारभूत घेतलेली आहे.

यावरून असें स्पष्ट दिसतें कीं महाभारतांतील प्रत्येक भागाचा काळ, नव्हे प्रत्येक श्लोकाचा काळ स्वतंत्र रीतीनें ठरविला पाहिजे. "हें तर अगोदरच महाभारतांत लिहिलें आहे." असें म्हणणें न्यायाचें नाहीं व कालक्रम लक्षांत घेतां वरील म्हणण्यांत तर बिलकुल अर्थ नाहीं. महाभारताचा कोणताहि भाग अमुक काळांत लिहिला असावा असें म्हणतां येत नाहीं. कारण ज्याला आपण प्राचीन भाग म्हणतों त्यांत अर्वाचीन कथा व अर्वाचीन म्हणतों त्यांत प्राचीन कथा घातलेल्या आहेत. उदाहरणार्थ महाभारताचें प्रथम पर्व पुरातन कथांनीं भरलेलें आहे व त्याचप्रमाणें प्राचीन दंतकथा व अर्वाचीन व प्राचीन वंशवर्णनें त्यांत आलीं आहेत तेव्हां या पर्वास अर्वाचीन म्हणणेंहि सयुक्तिक नाहीं. तसाच अगदीं अलीकडचा हरिवंश ग्रंथ पहा. त्यांत प्राचीन कथा व वेदकालीन श्लोक आढळतात. प्राचीन किंवा अर्वाचीन असें महाभारतांतील कोणत्याहि भागास

म्हणावयाचें असेल तर तें फार विचार करून व सावधगिरीनें म्हणावें लागेल. महाभारतांतील अमुक एक भाग प्राचीन किंवा अतिप्राचीन आहे असें म्हणणें याचा अर्थ काय हा फार बिकट प्रश्न आहे. आतां महाभारतांतील प्रारंभीं लिहिलेला भाग खिस्तपूर्व केव्हां लिहिला हें पाहूं.

खरी वस्तुस्थिति पाहतां अखिल वैदिक वाङ्मयामध्यें महाभारताचा उल्लेख नाहीं. ब्राह्मणें व उपनिषदें यांमध्यें आख्यान, इतिहासपुराण, व नाराशंसी गाथा यांचा उल्लेख आढळतो. कुरुक्षेत्रांत झालेल्या घनघोर युध्दाचा उल्लेख वेदांत नाहीं व हें ऐतिहासिक महायुध्द भारताचें तर जीवन होय. ब्राह्मणामध्यें कुरुक्षेत्राचा उल्लेख आहे व या क्षेत्रांत मानव व देव यानीं मोठमोठाले यज्ञ व उत्सव केल्याचें वर्णन आहे. तेव्हां महायुध्द जर अगोदर झालें असतें तर यांत खात्रीनें त्याचा उल्लेख आला असता. परीक्षितीचा पुत्र जनमेजय व दुष्यंत आणि शकुंतला यांचा पुत्र भरत या दोघांचा उल्लेख ब्राह्मणांत आहे हें मात्र खरें. अथर्ववेदाच्या कुंतापसूक्तामध्यें परीक्षित राजाची स्तुति केलेली आहे व त्यांतच ह्या राजाच्या अमदानींत कुरुक्षेत्राची भरभराट झाली व तेथें शांतता नांदली असें वर्णिलें आहे. यजुर्वेदांत कुरु व पांचाल किंवा कुरु यांचा वारंवार उल्लेख आला आहे. कुरुपांचालांच्या यज्ञमहोत्सवांत ( काठक १०-९ ) विचित्रवीर्याचा पुत्र धृतराष्ट्र याची कथा दिली आहे. वेदांमध्यें कोणत्याहि ठिकाणीं पंडु व त्याचे पुत्र पांडव यांचीं नांवें आढळत नाहींत. तसेंच वेदांमध्यें दुर्योधन, दुःशासन, कर्ण वगैरे नांवें सांपडत नाहींत. ब्राह्मणांत अर्जुन नांव आढळतें पण हें देवेंद्राचें दुसरें नांव आहे. वेदांग वाङ्मयांतील सूत्रग्रंथांत आश्वलायनगृह्यसूत्रांत, सांख्यायन-श्रौत सूत्रांत व पाणिनीच्या व्याकरणसूत्रांत महाभारत महाकाव्याचा उल्लेख आढळतो.

आश्वलायन-गृह्य-सूत्रांत ( ३.९ ) फक्त "भारत" व "महाभारत" अशा संज्ञा आढळतात. परंतु त्यांपासून कांहीं निष्कर्ष काढतां येत नाहीं, लघुभारत व महाभारत हीं सूत्ररचनाकालीं अस्तित्वांत असावीं असें सूत्रांतील मजकुरावरून दिसतें. सांख्यायन सूत्रांत महायुद्धाचें वर्णन आढळतें. कुरुक्षेत्रांत झालेल्या या युद्धांत कौरवांचा पराजय झाल्याचें प्रथम लिहिलेलें आढळतें. पाणिनीला नुसतें महाभारताचें नांवच माहीत होतें असें नाहीं तर मुख्य योध्दयांचीं नांवेंहि त्यास माहीत होतीं. यावरून महाभारतांतील मजकूर व श्लोकसंख्या याबद्दल कोणत्याच तऱ्हेचा निकाल पाणिनीच्या सूत्रावरून देतां येत नाहीं.

आतां महाभारताविषयीं बौध्द वाङ्मय काय लिहितें हें पाहूं. बौध्द तिपिटक ग्रंथांत महाभारताचा उल्लेख नाहीं. उलटपक्षीं तिपिटकांतील प्राचीन भागांत ब्राह्मणांतील आख्यानांच्या पध्दतीनुसार लिहिलेलीं काव्यें आढळतात. आख्यानपध्दति ही महाकाव्याची पहिली पायरी असावी. तिपिटकांतील पद्यात्मक गाथांत कृष्णकथेचा उल्लेख आहे पण हरिवंश व महाभारतांतील मौसल पर्वाचा उल्लेख नाहीं. जातकांत पांडव, महाभारतांतील अर्जुनाचें नेहमीचें नांव धनंजय, युधिट्ठिल ( युधिष्ठिराचें पाली भाषेंतील नांव ), धतरट्ठ (धृतराष्ट्राचें पाली नांव), विधुर अथवा विधूर ( महाभारतांतील विदुर ) हीं नांवें आहेत. द्रौपदीस्वयंवर व तिचे पांच पती यांची कथा जातकांत आहे परंतु तिचा महाभारतकथेशीं संबंध दिसत नाहीं. कारण पांडव हें नांव जातकांत एका अश्वाचें आहे. धृतराष्ट्र हें एका हंसाचें नांव आहे.

धनंजय व युधिष्ठिर हे मात्र इंद्रप्रस्थाचे राजे होते असें जातकांत लिहिलें आहे. धनंजय अथवा युधिष्ठिर याच्या दरबारीं विदुर नांवाचा एक धूर्त मंत्रि होता. महाभारतांतील सुंदर स्त्री द्रौपदी जातकांत कामी स्त्री म्हणून वर्णिली आहे. व द्रौपदीचे पांच नवरे असतांना सुध्दां कामवासना तृप्त न झाल्यामुळें द्रौपदीनें एका कुब्ज्याबरोबर समागम केला असें वर्णिलें आहे.

वरील विवेचनावरून असें स्पष्ट होतें कीं, महाभारत काव्य वेदापूर्वी अस्तित्वांत नसावें "महाभारत" किंवा "भारत" नांवाचें काव्य ज्यामध्यें कुरुक्षेत्रांत झालेलें कौरव-पांडवीय महायुध्दाचें वर्णन आहे तें काव्य वेदापूर्वी लिहिलें नसावें. परंतु ज्याअर्थी या काव्याचा उल्लेख सांख्यायनसूत्रांत, आश्वलायनसूत्रांत व पाणीनीसूत्रांत आला आहे त्याअर्थी हें काव्य खिस्तपूर्व निदान चौथ्या शतकांत अस्तित्वांत असावें. हिंदुस्थानच्या पूर्वेकडील भागांत म्हणजे ज्या भागांत बौध्द वाङ्मयाचा प्रसार झाला त्या भागांत पूर्वी महाभारताचें नांव माहीत नसावें असें दिसतें कारण बौध्दग्रंथामध्यें या काव्याचा उल्लेख विशेषसा नाहीं. खिस्तपूर्व ३०० किंवा ४०० वर्षांपूर्वी हें काव्य अस्तित्वांत आलें असावें.

सांप्रत उपलब्ध असलेल्या महाभारतांतील कांहीं भाग वेदकालीन आहेत व विशेषतः बोधप्रद भाग सामान्य लोकप्रिय वाङ्मयांतून घेतले आहेत व याच सामान्य वाङ्मयांतून बौध्द व जैन ग्रंथांत बोधप्रद भाग घेतले असावेत.

महाभारतांतील नुसत्या कथाच नव्हे तर अगणित राजांचीं नांवें व वंशावळी हीं जरी ऐतिहासिक कालांतील वाटलीं तरी तीं सर्व भारतीय इतिहासांतीलच आहेत असें म्हणतां येणार नाहीं. भारतीय ऐतिहासिक कालचा खरा प्रारंभ बिंबिसार व अजातशत्रु यांच्यापासून होतो; कारण हे राजे बुद्धाच्या वेळचे आहेत. नंद व शैशुनाग घराण्यांतील राजांसंबंधीं महाभारतांतील कथा ऐतिहासिक आहेत असें कदाचित् म्हणतां येईल. हिंदुस्थानच्या विश्वसनीय इतिहासाचा प्रारंभ मौर्य घराण्याचा मूळपुरुष चंद्रगुप्तराजा यापासून होतो. पण यासारख्या ऐतिहासिक व्यक्तींचीं नांवें महाभारतांत नाहींत. तथापि कथा व योद्धयांचीं वर्णनें प्राचीन इतिहासपूर्वकालीन पद्धतीनुसार असल्यामुळें हा ग्रंथ फार प्राचीन आहे यांत शंका नाहीं.

महाभारताच्या कालासंबंधींच्या पुराव्यांचा पुढील-प्रमाणें सारांश काढतां येईल:–(१)भारतांतील दंतकथा, पौराणिक कथा व कांहीं स्तोत्रें वेदकालीन आहेत. (२) वेदकालांत भारत किंवा महाभारत नांवाचा ग्रंथ अस्तित्वांत नव्हता. (३) बौद्ध व जैन लोकांनीं ख्रिस्तपूर्व ६००सालानंतर निवृत्तिपर काव्यें लिहिलीं. याच निवृत्तिपर काव्यनुसार लिहिलेलीं काव्यें, नीतिविषयक कथा व वचनें महाभारतांत अढळतात. (४) ख्रिस्तपूर्व चौथ्या ते रुहाव्या शतकांत जर भारत होतें म्हणावें तर या ग्रंथाचा परिचय तत्कालीन बौद्ध लोकांनां झालेला दिसत नाहीं. (५) ख्रिस्तपूर्व ४ थ्या शतकांत महाभारतकाव्य अस्तित्वांत होतें याजबद्दल पुरावा सांपडत नाहीं. (६) आज सुसंघटित स्थितींत दिसणारें महाभारतकाव्य ख्रिस्तपूर्व ४ थ्या शतकापासून तों इ. स. चौथ्या शतकापर्यंत हळू हळू लिहिलें गेलें असावें. (७) इ. स. ४ थ्या शतकांत महाभारताला विषय, विस्तार व गुणदोष या दृष्टींनीं पहातां आजचें स्वरूप प्राप्त झालें होतें असें एकंदरींत म्हणतां येईल. (८) पुढें कांहीं शतकेंपर्यंत मधून मधून थोडी भर पडत गली असावी. (९) महाभारत या सर्व ग्रंथाचा अमुक एक विशिष्ट रचनाकाल आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण प्रत्येक भागाचा काळ स्वतंत्र रीतीनें ठरवावा लागतो.

भारतीयुद्ध केव्हां झालें याचा नक्की काल निश्चित करण्याचा प्रयत्न आजपर्यंत अनेक पंडितांनीं केला आहे. परंतु निरनिराळ्या पंडितांत एकवाक्यता अद्यापपर्यंत झाली नाहीं. तसेंच या पंडितांनीं पुढें केलेलीं प्रमाणें देखील अनेक ठिकाणीं परस्परविरुद्ध व विसंगत आढळून येतात व त्यामुळें या सर्वांची संगति कशी लावावी हा प्रत्येक अभ्यासकापुढें प्रश्न येऊन उभा राहतो व प्रत्येकजण आपल्या मताप्रमाणें त्या विधानाची संगति लावण्याचा प्रयत्न करतो पण हाच प्रयत्न दुसऱ्या कांहीं पंडितांस आक्षेपार्ह व चुकीचा वाटतो. यामुळें हा प्रश्न अद्याप अनिश्चित स्थितींतच राहिला आहे व तो तसाच पुढेंहि राहणार यांत शंका नाहीं. तथापि आतांपर्यंत जे प्रयत्न झाले त्यांचा थोडक्यांत गोषवारा ज्ञानकोशामध्यें (वि. ११) कुरुयुद्ध या लेखांत दिलाच आहे व तेथें निरनिराळ्या पंडितांनीं अंगिकारिलेल्या निरनिराळ्या पद्धतींचीहि तुलना केली आहे (कुरुयुद्ध पहा).

भारतीय युद्धकालाविषयीं आतांपर्यंत जीं निरनिराळीं मतें पुढें आलीं आहेत तीं येथें नमूद करून ठेवतों:—(१) विसाजीपंत लेले; शा. शकपूर्व ५३०६. (२) जनार्दन बाळाजी मोडक; शा.श.पू. ५०७८. (३)चिंतामणराव वैद्यप्रभृति कलियुगाची प्राचीन परंपरा ग्राह्य मानणारे; शा. श. पू. ३१७९. (४) वराहमिहिर, राजतरंगिणीकार, काश्मिरी पंडित; शा. श. पू. २५२६. (५) लो. बळवंतरावजी टिळक आणि कित्येक पाश्चात्य ग्रंथकार; शा. श. पू. १५७८. (६) रमेशचंद्र दत्तप्रभृति इतिहासकार; शा. श. पू. १४७८. (७) पुराणनिरीक्षणकार त्र्यं. गु. काळे; शा. श. पू. १३४१. (८) नागपूरचे केशवराव दफ्तरी; शा. श. पू. १२७५. (९) मद्रासचे संशोधक वेंकटेश्वर अय्यर; शा. श. पू. १२७२. (१०) केसरीचे उपसंपादक ज. स. करंदीकर; शा. श. पू. २०१४.

याप्रमाणें आतांपर्यंत निरनिराळे काळ निरनिराळ्या पंडितांनीं पुढें मांडले आहेत. सध्यांच्या स्थितींत या बाबतींत निश्चयात्मक मत देणें अशक्य आहे. तेव्हां महाभारतकालनिर्णयाचा प्रश्न येथेंच सोडून आपण दुसरें महत्त्वाचें जें आर्षकाव्य रामायण त्याच्याकडे वळूं.

## रामायण.

रामायण–हें प्रसिद्ध लोकप्रिय काव्य असून आदिकाव्यहि आहे. रामायण हें काव्य महाभारताहून पुष्कळ बाबतींत भिन्न आहे. विशेषतः हें काव्य महाभारतापेक्षां पुष्कळ लहान असून त्यांत एकसूत्रीपणा जास्त आढळतो. महाभारत हें काव्य आज आपणांस जसें उपलब्ध आहे त्यावरून तें मूळचेंच तसें लिहिलेलें असावें किंवा काय ह्याची शंका उत्पन्न होते. परंतु रामायण ह्या वीररसप्रधान काव्यांत अथपासून इतिपर्यंत एकसूत्रीपणा कायम राखलेला दिसतो. शिवाय स्थानिक

दंतकथांवरून व्यास या कदाचित अगदीं काल्पनिक अशा ऋषींनें वेद व पुराणें रचिलीं व महाभारतहि लिहिलें अथवा संपादन केलें असें दिसून येतें, व त्याच दंतकथा वाल्मिकी यानें रामायण रचिलें असें सांगतात त्यावरून या नांवाचा कोणी महान कवि होऊन गेला व त्यानें भाटांच्या तोंडीं असलेल्या इकडच्या तिकडच्या अनेक पद्यांनां एका काव्यांत सुसंगतवार बद्ध केलें याबद्दल शंका घेण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.

रामायणाला भारतीय जसे "आदिकाव्य" अशी संज्ञा देतात तसेंच वाल्मीकीसहि "आदिकवि" ह्या नांवानें संबोधितात. वस्तुस्थितीहि पण अशी आहे कीं, रामायण हें आदिकाव्यांत पहिलेंच काव्य गणलें जात असून वाल्मीकीहि पुढें अनुकरणीय असा कवि होऊन गेला. कारण पुढील सर्व कवींची रामायणाच्या पद्धतीवरच काव्यें करण्याची प्रवृत्ति दिसून येते. भारतवर्षांत ज्यास 'काव्य' असें म्हणतात त्याचें मुख्य अंग म्हटलें म्हणजे काव्यांत ग्रथित केलेल्या मुख्य गोष्टींपेक्षां त्याच्या बाह्यांगाला व रचनेलाच जास्त महत्त्व देणें हें होय. शिवाय अशा काव्यांतून श्लेषोपमारूपकादि अलंकारांचा पुष्कळ ठिकाणीं, व कित्येक भागांत अतिशयच उपयोग केलेला असतो. ह्या काव्यांत उपमावर उपमा आढळतात व वर्णनांतून व विशेषतः निसर्गाच्या वर्णनांतून नाना ठिकाणीं दृष्टांत आणि उदाहरणें दिलेलीं दृष्टोत्पत्तीस येतात. प्राचीन काव्याचें हें मुख्य स्वरूप प्रथमतः रामायणांतच दिसून येतें. महाभारतांत पौराणिक काव्य व महाकाव्य ह्यांचें मिश्रण आढळून येतें परंतु रामायण हें महाकाव्य आणि आदिकाव्य यांतील मध्यमपक्ष म्हणून समजण्यास हरकत नाहीं.

महाभारताप्रमाणेंच रामायणहि खरेंखुरें लोकप्रिय महाकाव्य आहे. कारण महाभारताप्रमाणेंच सबंध भारतवर्षाच्या मालकीची ही संपत्ति आहे. जगांतील दुसरें एखादें महाकाव्य या बाबतींत त्याची स्पर्धा करूं शकणार नाहीं. आज कित्येक शतकें ह्या काव्याचा सबंध राष्ट्राच्या काव्य आणि विचारशक्तीवर मोठा पगडा बसलेला आहे. ह्या काव्याच्या प्रस्तावनेंत (ही प्रस्तावना मागून जोडलेली दिसते) असें सांगितलें आहे कीं प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें वाल्मीकीस बोलावून रामाच्या चरित्राचें काव्यरूपवर्णन करण्यास सांगितलें व वाल्मीकीस असें आश्वासन दिलें कीं,

"यावत् स्थास्यंति गिरयः सरितश्च महीतले।
तावद् रामायणकथा लोकेषु प्रचरिष्यति॥

"जोंपर्यंत पृथ्वीवर पर्वत व नद्या आहेत, तोंपर्यंत या जगांत रामायणकथा जिवंत राहील."

हें ब्रह्मदेवाचें वचन आजपर्यंत तरी खरें ठरलें असून दोन हजार वर्षांपेक्षां अधिक कालपर्यंत हिंदुस्थानांतील सर्व दर्जाच्या व वर्णाच्या लोकांत रामायण ह्या काव्याची जागरूकता स्पष्ट दिसत आहे. ह्या महाकाव्यांतील प्रसंग व त्यांतील निरनिराळ्या व्यक्ती ह्यांचें ज्ञान राजेरजवाडे, सरदार, व्यापारी, वाणी, उदमी, शेतकरी, मजूर, बायका मुलें ह्या सर्वांनांच चांगलें असतें. रामाचीं महत्कृत्यें व त्याचीं प्रबुद्ध वचनें वाचून पुरुषांच्या अंतःकरणांतील उदात्त मनोवृत्ती जागृत होतात. सीतेची निस्सीम पतिनिष्ठा या स्त्रियांच्या उच्चतम सद्गुणाचें वर्णन ऐकून सर्व स्त्रीजातीच्या मनांत सीतेविषयीं आदरयुक्त प्रेमभाव उत्पन्न होतो. थोरांपासून लहानांपर्यंत सर्वांनां दयावत्सल हनुमानाच्या अचाट कृत्यांचें कौतुक वाटतें. माणसाला खाऊन टाकणाऱ्या अमानुष शक्तीच्या राक्षसांच्या भयानक गोष्टी ऐकून सर्वांचीं मनें सारखीं तल्लीन होऊन जातात. रोजच्या व्यवहारांतील रामायणावरून घेतलेल्या म्हणी व शब्दालंकार हीं रामायणांतील कथांच्या सर्वविश्रुततेची साक्ष पटवितात. लोकांच्या मनावर धार्मिक व नैतिक तत्त्वें ठसविण्याकरितां सर्व संप्रदायांचे धर्मगुरू व धर्माध्यापक नेहमीं रामायणाचे दाखले देतात. शिवाय कालिदास भवभूती वगैरे सर्व मोठमोठ्या कवींनीं सुद्धां रामायणांतील विविध कथाभाग घेऊन त्यांस नवीन स्वरूप दिलें आहे. या दृष्टीनें देशी भाषांतील वाङ्मय तपासून पाहतांहि बाराव्या शतकांत ह्या महाकाव्याचें तामीळ भाषेंत रूपांतर झालेलें आढळून येतें. त्यानंतर लवकरच हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत सर्व प्रचलित देशी भाषांमध्यें या महाकाव्याचीं भाषांतरें व रूपांतरें झालीं. तुलसीदासानें 'रामचरित-मानस' नांवाचें हिंदी भाषेंत लिहिलेलें (इ. स. १६३१ च्या सुमारास) धार्मिक आणि तत्त्वज्ञानप्रचुर काव्य रामायणाच्या आधारेंच रचिलें आहे. हा तुलसीदासाचा ग्रंथ लाखों हिंदू लोक वेदाप्रमाणें फार पूज्य मानितात. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांतले लोक पिढ्यानुपिढ्या रामकथा ही असल्या रूपांतरग्रंथांच्या द्वारेंच वाचीत आले आहेत. आज सुद्धां कांहीं श्रीमंत लोकांच्या घरीं रोज रामायणाचें पुराण असतें. लहानमोठ्या गांवांतून धार्मिकोत्सवप्रसंगीं हरिवंशांत वर्णन केलेल्या रामकथेवरचे नाट्यप्रयोग पाहण्यास सांपडतात.

उत्तरहिंदुस्थानांत लाहोर वगैरे ठिकाणीं दसऱ्याच्या उत्सवानिमित्त दर वर्षी "रामलीला" नांवाचे नाट्यप्रयोग होतात. या प्रयोगांनां फार गर्दी जमते व ते फार लोकप्रिय झालेले आहेत. हिंदुस्थानच्या सर्व भागांत प्रचलित असलेल्या ग्रामदेवता,हनुमानाची पूजा करण्याचा संप्रदाय व सामान्य वानरपूजासंप्रदाय हे रामायणकालापासून अस्तित्वांत आले किंवा रामायणांत वर्णिलेली वानरांची महत्त्वाची कामगिरी ही रामायणपूर्वकालीन वानरोपासनेचा अवशेष म्हणून प्रथित झाली असावी कीं काय ह्यासंबंधीं कांहींच निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. शिवाय पुष्कळ ठिकाणीं देवळांतून शेकडों वानरें आढळतात व त्यांनां मोठ्या भक्तीनें व प्रेमानें वागवितात. रामाचें निवासस्थान जी अयोध्या नगरी तेथें तर ही गोष्ट प्रामुख्यानें दृष्टोत्पत्तीस येते.

रामायणाचा नायक राम हा श्री विष्णूचा अवतार होता असें पुढील काळांत लोक समजूं लागले व त्याची देवाचा अंश म्हणून पूजा करूं लागले असें वाटतें. तेव्हां अशा देवस्वरूपी पुरुषाचें—रामाचें—चरित्र ज्यांत वर्णिलें आहे अशा महाकाव्याला लोक पवित्र मानूं लागले ह्यांत नवल नाहीं. रामायणाच्या पहिल्या सर्गांतच म्हटलें आहे कीं ( हें निःसंशय वाल्मीकिनें लिहिलेलें नसावें—)

**इदं पवित्रं पापघ्नं पुण्यं वेदैश्च संमितम् । यःपठेद्रामचरितं सर्वं पापैः प्रमुच्यते ॥९८॥एतदाख्यानमायुष्यं पठन्रामायणं नरः। सपुत्रपौत्रः सगणः प्रेत्य स्वर्गे महीयते ॥ ९९ ॥ पठन् द्विजो वागृषभत्वमीयात् स्यात्क्षत्रियो भूमिपतित्वमीयात् । वणिग्जनः पण्यफलत्वमीयाज्जनश्च शूद्रोऽपि महत्त्वमीयात् ॥ १०० ॥ (सर्ग १, श्लोक ९८,९९,१००).**

"जो या वेदतुल्य, पवित्र आणि पापघ्न रामचरिताचें पठण करतो तो सर्व पापांपासून मुक्त होतो जो मनुष्य या आयुष्यदायी आख्यानाचें, रामायणाचें, पठण करतो तो मेल्यानंतर, स्वर्गीं आपल्या मुलांनातवांसह व परिवारासह सुख पावतो. जो ब्राह्मण याचें पठण करतो तो चांगला वक्ता होतो, राजा भूमिपति होतो, वैश्याला आपल्या मालाची चांगली प्राप्ति होते व शूद्रालाहि मोठेपणा येतो."

तसेंच काश्मीरचा राजा दामोदर ह्याला कांहीं शाप मिळाल्यामुळें तो सर्पाच्या जन्माला गेला व फक्त एक दिवसांत सर्व रामायण श्रवण केल्यावर त्याची मुक्तता झाली; ( राजतरंगिणी १. १६६ ) ही कथा देखील मोठी सूचक आहे.

महाभारताप्रमाणेंच रामायण अतिशय लोकप्रिय झालेलें आहे, ह्या गोष्टीवरूनच असें अनुमान निघतें कीं, आज उपलब्ध असलेलें काव्य मूळचें होतें तसेंच नसून त्यांत पुष्कळ फेरफार झालेले आहेत व पुष्कळ नव्या गोष्टी घालून त्याचा व्याप वाढविला आहे. आज उपलब्ध असलेल्या ग्रंथाचे सात भाग ( कांडें ) असून प्रत्येक कांडांत बरेचसे सर्ग आहेत. त्यांत एकंदर श्लोकसंख्या सरासरी २४००० आहे. ह्यांपैकीं जुने कोणते, नवे कोणते, त्याचप्रमाणें खरे कोणते व प्रक्षिप्त कोणते, हें रामायणकथेचा आशय कळल्याशिवाय समजणार नाहीं.

रामायणकथा.—पहिल्या भागास बालकांड अशी संज्ञा असून ह्यांत या महाकाव्याची उत्पत्ति व रामाचें बालपण हीं वर्णिलेलीं आहेत. परंतु महाभारताप्रमाणेंच ह्या कांडांत ठिकठिकाणीं मूळकथाभागांत ब्राह्मणी दंतकथा व पौराणिक गोष्टी मधून मधून आढळून येतात. आणि ह्यांतील कांहीं कथा तर महाभारतांत आलेल्यांपैकींच आहेत. उदाहरणार्थ भारतांत वर्णिलेली ऋष्यशृंगाची कथा ह्यांतहि आढळते. जेथें जेथें वसिष्ठ आणि विश्वामित्र ह्यांचा संबंध येतो तेथें तेथें प्राचीन कालापासून चालत आलेल्या ह्या ऋषीसंबंधींच्या दंतकथांचाहि उल्लेख केलेला आहे. उदा. विश्वामित्रानें ब्राह्मण होण्याकरितां केलेली तपश्चर्या व रंभा,मेनका ह्या अप्सरांनीं त्याला भुरळ घालून केलेला तपोभंग (रामायण १. ५१—६५). विश्वामित्रासंबंधींच्या कथाभागांत प्राचीन शुनःशेपकथाहि येते. (१. ६२) त्याचप्रमाणें विष्णूचा वामन अवतार, संग्रामदेवता कुमार अथवा कार्तिकेय ह्याची जन्मकथा, सगर आणि त्याचे ६० हजार पुत्र, गंगावतरण (१. ३८—४४), देवदानवांनीं केलेलें समुद्रमंथन ह्याविषयींच्या कथाहि याच बालकांडांत आहेत. प्रस्तावनेंत रामायणोत्पत्तीसंबंधीं सांगितलेली सुंदर कथा विशेष महत्त्वाची आहे. एकदां वाल्मीकि ऋषि हा नदीच्या तीरावर वनांतून फिरत असतां त्यानें एक क्रौंच पक्ष्याचें जोडपें पाहिलें. हे पक्षी सुंदर गायन करीत असून स्वच्छंदानें विहार करीत होते. अकस्मात कोणी एका दुष्ट पारध्यानें ह्या जोडप्यापैकीं नरास बाणानें मारिलें. ह्यावेळीं तो पक्षी विव्हळत जमिनीवर पडला व गडबडा लोळूं लागला आणि त्याची स्त्री (मादी) केविलवाण्या स्वरानें शोक करूं लागली. तेव्हां वाल्मीकीला कळवळा येऊन सहजगत्या त्याच्या मुखांतून व्याधाला शापपर असे पुढील शब्द बाहेर पडले:—

"मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः
यत्क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितम्॥"

वाल्मीकीच्या मुखावाटे सहजगत्या जे उद्गार निघाले ते छंदोबद्ध असल्यामुळें ब्रह्मदेवानें त्याच वृत्तांत रामाची कथा वर्णन करण्यास वाल्मीकीला आज्ञा केली.

रामाच्या बालपणाविषयीं पहिल्या कांडांत पुढील कथा लिहिलेली आहे. गंगानदीच्या उत्तरेस कोसल देशांत अयोध्यानगरींत दशरथ नांवाचा महापराक्रमी व बुद्धिमान राजा राज्य करीत होता. तो निपुत्रिक असल्यामुळें त्यानें अश्वमेध करण्याचें ठरविलें. ह्या यज्ञांत मुख्य ऋत्विजाचें (अध्वर्यूचें) काम ऋष्यशृंग ऋषीकडे देण्यांत आलें होतें. ऋष्यशृंगानें एक विशेष बलवती अशी आहुति दिली; हिच्या ठिकाणीं पुत्रोत्पत्तीचें अलौकिक सामर्थ्य होतें ह्याच वेळीं रावण नांवाचा दैत्य फार उन्मत्त झाला होता व त्याच्यापासून स्वर्गातील देवांनाहि पीडा होऊं लागली. मृत्युलोकीं अवतार घेऊन रावणाचा नाश करावा, अशी सर्व देवांनीं विष्णूकडे जाऊन प्रार्थना केली. तेव्हां विष्णूनें ह्यांच्या विनंतीला मान देऊन पृथ्वीवर दशरथाच्या पोटीं जन्म घेण्याचा निश्चय केला. अशा रीतीनें, अश्वमेधाची समाप्ति झाल्यावर दशरथ राजाच्या तीन स्त्रियांनां मिळून जे चार पुत्र झाले त्यांपैकीं कौसल्येच्या पोटीं विष्णूनें अवतार घेतला; हाच राम होय. कैकेयीपासून भरत व सुमित्रेपासून लक्ष्मण आणि शत्रुघ्न असे चार पुत्र झाले. ह्या चौघां राजपुत्रांपैकीं राम सर्वांत वडील असून राजाचा फार आवडता होता. बाळपणापासून लक्ष्मणाचें त्याच्या वडील भावावर निस्सीम प्रेम होतें. रामाच्या मनांत कोणतीहि इच्छा उत्पन्न होवो ती लक्ष्मणाच्या लक्षांत येण्याचा अवकाश, तोंच ती तो परिपूर्ण करीत असे व ह्यामुळें राम लक्ष्मण ह्यांतील भिन्नभावहि दिसत नसे.

हे राजपुत्र मोठे झाल्यावर विश्वामित्र ऋषि एकदां दशरथाच्या दरबारांत आला. तेव्हां यज्ञविध्वंसक दैत्यांचा नाश करण्याकरितां विश्वामित्रानें मागणी केल्यावरून राजाज्ञेनें राम आणि लक्ष्मण हे विश्वामित्राबरोबर निघून गेले व त्यांनीं ऋषीपासून अस्त्रें मिळविलीं. राक्षसांचा नाश करून विदेह देशाचा राजा जनक याच्या दरबारीं जेव्हां हे राजपुत्र गेले तेव्हां विश्वामित्रहि त्यांच्याबरोबर होता. जनकाला सीता नांवाची एक मुलगी होती. ही सीता मृत्युलोकावरील एखादी सामान्य मुलगी नसून शेत नांगरीत असतां ही पृथ्वीच्या पोटांतून बाहेर पडली व राजास सांपडली म्हणूनच हिचें "सीता" असें नांव ठेविलें होतें. जनक राजानें तिला आपल्या मुलीप्रमाणें वाढविलें होतें. या जनकराजाजवळ एक विलक्षण प्रचंड धनुष्य असून जो हें धनुष्य वांकवील त्याला सीता देण्याचें राजानें जाहीर केलें होतें. पुष्कळ राजपुत्रांनीं प्रयत्न करून पाहिले पण व्यर्थ. नंतर रामानें येऊन हें धनुष्य वांकविल्याबरोबर तें कडकन मोडून त्याचे दोन तुकडे झाले. राजा जनकास फार आनंद झाला व रामाबरोबर आपल्या मुलीचें लग्न करण्याचें त्यानें ठरविलें. दशरथराजासहि आमंत्रण पाठवून आणविलें व राम आणि सीता ह्यांचा विवाह मोठ्या समारंभानें साजरा करण्यांत आला. पुढें पुष्कळ दिवसपर्यंत राम सीता हीं दोघें सुखानें राहिलीं.

कथानकाचें खरें गहन स्वरूप दुसऱ्या कांडापासून दिसून येतें. ह्यांत अयोध्येच्या दरबारांत घडलेल्या गोष्टींचें वर्णन आहे म्हणून ह्यास अयोध्याकांड असें म्हणतात.

राजा दशरथानें आपलें म्हातारपण झालें आहे असें पाहून रामाला यौवराज्याभिषेक करविण्याचें ठरविलें व कुलगुरु वसिष्ठ ह्याच्याकडून अभिषेकाची सर्व तयारी करविली. कैकेयीची कुब्जा दासी मंथरा हिनें हें सर्व पाहून आपल्या यजमानिणीच्या पुत्रास-भरतास-युवराजपद मिळावें असें राजापासून वचन घेण्यास कैकेयीस चिथविलें. राजानें पूर्वी तिला दोन वर देऊं केले होते ते अद्याप तिनें मागितले नव्हते. ह्यावेळीं तिनें राजाला अशी विनंति केली कीं "रामास चौदा वर्षें वनवासास धाडावें व भरतास यौवराज्यपदीं अभिषेक करावा." हे वर कैकेयीनें मागतांच राजा अगदीं हताश झाला, परंतु रामाच्या कानीं ही वार्ता जातांच, आपल्या बापास वचनभंगाचें पातक लागूं नये म्हणून, त्यानें तत्क्षणींच वनवासास जाण्याची तयारी केली. रामाची आई कौसल्या व भाऊ लक्ष्मण ह्यांनीं त्यास ह्या निश्चयापासून परावृत्त करण्याची पुष्कळ खटपट केली पण व्यर्थ. पित्यानें आपलें वचन पाळावें म्हणून त्यास मदत करणें हें माझें पहिलें कर्तव्य आहे असें रामानें यावेळीं निक्षून सांगितलें. लागलीच चौदा वर्षें वनवासास जाण्याचा आपला निश्चय झाला आहे असें त्यानें सीतेसहि कळविलें. भरताशीं स्नेहभावानें राहून दशरथराजाजवळ शुद्ध आचरण राखून समाधानानें राहावें व आपल्या मातापितरांची एकनिष्ठपणें सेवा करावी असा रामानें सीतेस उपदेश केला. परंतु विवाहित स्त्रियांच्या कर्तव्याविषयीं सविस्तरपणें सांगून "कांहीं झालें तरी मीहि आपल्याबरोबर

वनांत येणारच" असें सीतेनें उत्तर दिलें ( २.२७ ). ("न पिता नात्मजो नात्मा न माता न सखीजनः। इह प्रेत्य च नारीणां पतिरेको गतिः सदा।" (२.२७,६).... अनन्यभावामनुरक्तचेतसं त्वया वियुक्तां मरणाय निश्चिताम्। नयस्व मां साधु कुरुष्व याचनां नातो मयाते गुरुता भविष्यति ॥ ( २.२७, २३ ).

सीतेला आपल्या निश्चयापासून परावृत्त करण्याकरितां रामानें वनवासांतील भयसंकटांचें वर्णन केलें. परंतु सीतेनें आपला निश्चय कायम राखिला. ज्याप्रमाणें सत्यवानाच्या पाठोपाठ सावित्री गेली त्याचप्रमाणें सीताहि रामाच्या पाठीस लागली. शेवटीं रामानें तिला बरोबर नेण्याचें कबूल केलें अर्थात रामाचा जिवलग भाऊ लक्ष्मण हाहि त्याच्या मागोमाग वनांत गेल्याशिवाय राहिला नाहीं. अशा रीतीनें वल्कलवस्त्रें परिधान करून रामलक्ष्मण आणि सीता अरण्यांत गेलीं, तेव्हां अयोध्येंतील सर्व लोकांनां फार हळहळ वाटली. आपला पुत्र वनांत गेला म्हणून राजा दशरथाला जो अतोनात शोक झाला तो त्यास आवरेना. राम वनांत गेल्यानंतर कांहीं दिवसांनीं एके दिवशीं राजा मध्यरात्रीच्या सुमारास खडबडून जागा झाला व तरुणपणीं घडलेल्या अपराधाचें त्यास स्मरण झालें. एकेवेळीं मृगया करीत असतां आपल्या हातून ऋषिकुमाराचा कसा चुकून वध झाला व त्याच्या वृद्ध आंधळ्या पित्यानें "पुत्रवियोग होऊन शोकांतच तुला मरण येईल" असा शाप आपणास दिल्याचें वृत्त त्यानें कौसल्येस सांगितलें; व पुढें लवकरच रामराम करीत त्याचा अंत झाला.

राजा दशरथाचें प्राणोत्क्रमण झालें त्यावेळीं भरत राजगृहीं (आजोळीं) होता त्यास कैकेयीनें व मंत्रिमंडळानें राजपदावर आरूढ होण्याकरितां बोलावणें पाठविलें. परंतु भरतानें त्या बोलावण्याकडे लक्ष दिलें नाहीं व "राज्यलक्ष्मीचा स्वामी राम आहे" असें सांगून त्याला परत आणण्याविषयीं निश्चय केला व मोठ्या परिवारासह तो रामास परत आणण्याकरितां निघाला. ह्यावेळीं राम चित्रकूटावर वास करीत असून सीतेला सृष्टिसौंदर्य दाखवीत होता [ यावेळीं रामानें चित्रकूटाचें केलेलें वर्णन फार सुंदर असून ( २.९४ ) अशा प्रकारचीं निसर्गवर्णनें रामायणांत अनेक ठिकाणीं आढळतात ] इतक्यांत सर्व वातावरण धूलिमय झालेलें त्यांनीं पाहिलें व सैन्याची गर्जनाहि त्यांच्या कानावर आली. लक्ष्मणानें झाडावर चढून भरताचें सैन्य जवळ येतांना पाहिलें. कोणी तरी शत्रु येत असावा असें वाटल्यावरून तो क्रोधानें संतप्त होऊन युद्धाकरितां सज्ज झाला. परंतु लागलीच आपली सेना तशीच मागें थोपवून भरताला एकटाच येतांना त्यानें पाहिलें. भरतानें रामाजवळ येऊन त्याला साष्टांग नमस्कार केला व दोघे भाऊ एकमेकांस भेटले. भरतानें डोळ्यांत अश्रू आणून कैकेयीची व आपली स्वतःची निर्भत्सना केली व रामास दशरथनिधनाची वार्ता सांगून, अयोध्येस परत येऊन राज्यारूढ होण्याची विनंति केली. "माझ्या स्थितीबद्दल तुला किंवा तुझ्या मातेलाहि दूषण देतां येणार नाहीं व वडिलांची आज्ञा मरणानंतरहि मला पूज्य मानिली पाहिजे" असें सांगून चौदा वर्षें वनवासांत राहण्याच्या निश्चयापासून आपण कधींहि ढळणार नाहीं असें रामानें सांगितलें. भरतानें आपल्यावरचें पित्याचें छत्र नाहींसें झाल्याची पुन्हां पुन्हां रामाला आठवण देऊन परत चलण्याविषयीं विनविलें तरी पण कांहीं एक उपयोग झाला नाहीं. पित्याच्या मृत्यूनें रामाला फार शोक झाला व त्यानें लगेच आपल्या पित्याची उत्तरक्रिया वगैरे केली; परंतु तो आपल्या निश्चयापासून ढळला नाहीं; जगाच्या राहटीविषयीं, तसेंच मृत्यूच्या अपरिहार्यत्वाविषयीं पुष्कळ गोष्टी त्यानें भरतास सांगून आतां नुसता शोक करणें व्यर्थ आहे असें समजाविलें. यावेळीं रामानें केलेला उपदेश फार मननीय आहे.

"यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महार्णवे।
समेत्य तु व्यपेयातां कालमासाद्य कंच न ॥
एवं भार्याश्च पुत्राश्च ज्ञातयश्च वसूनि च।
समेत्य व्यवधावंति ध्रुवोह्येषां विनाभवः ॥
× × × ×
स जीर्णं मानुषं देहं परित्यज्य पिता हि नः ॥
दैवीमृद्धिमनुप्राप्तो ब्रह्मलोकविहारिणीम् ॥"
( २. १०५ ).

अशा तऱ्हेचीं वचनें महाभारतांत, पुराणांतून विष्णुस्मृति ( २०.३३ ), न्यायविषयक वाङ्मयांत, भर्तृहरीच्या काव्यांत वगैरे ठिकाणीं जशींच्या तशीं सांपडतात. बौद्धांच्या दशरथजातकाचा 'रामाचें सांत्वनपर भाषण' हाच मुख्य विषय आहे. भरताखेरीज मंत्रिमंडळानेंहि रामाला राज्यावर बसण्याकरितां विनंति केली. ह्यांच्यापैकीं जाबाली नांवाचा एक शून्यवादी ब्राह्मण होता त्यानें रामाच्या मनांतील नीतिमत्तेच्या कल्पना काढून टाकण्याचा प्रयत्न केला. "प्रत्येकानें आपापल्या जीविताकडे पहावें, आई, बाप; ह्यांच्याविषयीं विचार

करण्यांत अर्थ नाहीं, मरणाबरोबर सर्व गोष्टींचा लय होतो, इहलोकापेक्षां आणखी कांहीं आहे ह्या पोटार्थी भटभिक्षुकांच्या वायफळ वल्गना आहेत.

"यदि भुक्तमिहान्येन देहमन्यस्य गच्छति ।
दद्यात्प्रवसतां श्राद्धं न तत्पथ्यशनं भवेत् ॥
दानसंवननाह्येते ग्रंथा मेधाविभिः कृताः"

म्हणून नीट विचार करून तूं राज्यसूत्रें हातीं घे" असें त्यानें रामास सांगितलें. ह्या नास्तिक तत्त्वांचा रामानें मोठ्या कडक शब्दांत धिक्कार केला.

"यथाहि चोरः स तथा हि बुद्धस्तथागतं नास्तिकमत्र विद्धि । तस्माद्धि यः शक्यतमः प्रजानां स नास्तिके नाभिमुखो बुधः स्यात् ॥"

वसिष्ठाकडून आलेले ऋषीहि त्याचें मन वळवूं शकले नाहींत. सरते शेवटीं रामाच्या नांवानें राज्यकारभार चालविण्यास भरतास संमति द्यावी लागली. रामानें राजचिन्ह म्हणून आपल्या पादुका भरतास दिल्या. भरतानें अयोध्येस परत जाऊन सिंहासनावर रामाच्या पादुका स्थापन केल्या, व आपण रामाचा प्रतिनिधि ह्या नात्यानें राज्यकारभार चालविण्यास नंदिग्रामी राहिला.

तिसऱ्या कांडांत वनवासवर्णन असून ह्यास अरण्यकांड अशी संज्ञा आहे. ह्या भागापासून तों काव्याच्या अखेरपर्यंत जगांतील खऱ्याखुऱ्या गोष्टी सोडून विचित्र काल्पनिक गोष्टी काव्यांत अंतर्भूत झालेल्या आढळून येतात. बालकांडांत राजदरबारची सर्वसाधारण माहिती आली असून त्याची सुरवात एका राजकारस्थानापासून झाली आहे. अशाच तऱ्हेचीं कारस्थानें कित्येक प्रसंगीं हिंदी राजांच्या दरबारीं होत असतात, हें आपणांस माहीत आहेच. तेव्हां त्यांत असंभवनीय कांहीं नाहीं. फक्त विशेष म्हणजे राम व भरत ह्यांमधील कल्पनातीत बंधुप्रेम दाखविलें आहे एवढेंच.

उलटपक्षीं तिसऱ्या कांडापासून मात्र काल्पनिक अक्राळविक्राळ राक्षसांशीं रामानें केलेलीं युद्धें व त्याचे इतर पराक्रम या गोष्टींनां सुरुवात होते.

रामलक्ष्मण व सीता हीं पुष्कळ काळपर्यंत वनांत राहिल्यानंतर. तेथील वनवासी ऋषींनीं राक्षसापासून आपलें रक्षण व्हावें म्हणून रामास विनंति केली. रामानें या ऋषिगणाला तसें करण्याचें आश्वासन दिलें व तेव्हांपासून रामाचीं राक्षसादिकांबरोबर युद्धें होऊं लागलीं. प्रथमतः मनुष्याहारी विराध ह्याचा रामानें वध केला. ह्यानंतर रावणभगिनी शूर्पणखेशीं त्याची गांठ पडली. ह्या राक्षसिणीनें रामाबद्दल प्रेमाचा आविर्भाव आणून ती त्याच्याशीं प्रेमालाप करूं लागली. "माझा भाऊ लक्ष्मण असपत्नीक आहे तर तुला त्याच्याबरोबर विवाह करावयाच। असेल तर कर" असें रामानें विनोदानें सुचविलें. परंतु लक्ष्मणानेंहि "मी दास आहे, तेव्हां माझी पत्नी होण्यांत अर्थ नाहीं, तर रामपत्नी हो" असें म्हणून झिडकारून लाविलें. शूर्पणखेला सपत्नी सीतेविषयीं संताप चढला व ती सीतेला खाऊन टाकण्याच्या बेतांत होती इतक्यांत लक्ष्मणानें तिचे कान व नाक कापून टाकिलीं. तेव्हां ती आपला भाऊ जो खर ह्याच्याकडे रडत रडत गेली. प्रथम चौदा व नंतर चौदा हजार राक्षस बरोबर घेऊन खर रामावर चालून आला परंतु रामानें त्यासर्वांचा पराभव केला. तेव्हां समुद्राच्या पलीकडे लंका ह्या नांवाची भूमि होती तेथें राज्य करीत असलेला आपला भाऊ जो दशमुखी रावण त्याजकडे जाऊन शूर्पणखेनें रामाचा सूड उगविण्याविषयीं त्याला प्रोत्साहन दिलें. ह्याच वेळीं सीतेच्या अप्रतिम सौंदर्याचें वर्णन करून तिला आपल्या कबज्यांत आणून आपली राणी करून घ्यावी असेंहि तिनें रावणाला प्रोत्साहन दिलें. पुढें रावण आपल्या सुवर्णरथांत बसून आकाशमार्गानें निघाला. रावणाचा स्नेही मारिच हा तपश्चर्या करीत होता त्याची भेट घेऊन त्याच्या मदतीनें सीतेला रामलक्ष्मणापासून वेगळी करून रावणानें आकाशमार्गानें तिला पळविलें.

आपल्याला कोणीं साहाय्य करावें म्हणून सीता वाटेंत मोठ्यानें आक्रोश करूं लागली. ह्यावेळीं दशरथाचा जुना स्नेही जटायु नांवाचा गृध्र धावून आला व त्यानें रावणाच्या रथाचे तुकडे केले, परंतु शेवटीं रावणानें त्याचा पराभव केला व तो सीतेला पुन्हां घेऊन चालता झाला. यावेळचें वर्णन कवीनें फारच सुंदर केलेलें आढळेल. रावण सीतेला आकाशमार्गानें घेऊन जात असतां तिच्या केशांतील फुलें व तिच्या पायांतील रत्नजडित नुपुरें हीं जमिनीवर गळून पडलीं. झाडांतून सूं सूं करीत वाहणारा वायू जणूं काय तिला "भिऊं नकोस" म्हणून म्हणत होता. आपल्या मैत्रिणीचें दुःख पाहून शोकाकुल झालेल्या कमलिनींनींहि माना टाकल्या. व्याघ्रसिंहादि वन्यपशूहि क्रोधानें संतप्त होऊन सीतेच्या मागून धावूं लागले. पर्वत, गगनचुंबित शिखररूप हात वर करून सीतेकरितां शोक करूं लागले व गिरिगुहांतून वहाणारे प्रवाहरूप अश्रू ढाळूं लागले. सीतेला राक्षसानें चोरून नेतांना पाहून गगनमध्यवर्ती सूर्याचे किरण कृष्णस्वरूप दिसूं लागून सूर्यमंडळ निस्तेज झालें. अशा रीतीनें

सूर्याला सुद्धां फार वाईट वाटलें (३. ५२, ३४–३९). परंतु रावण सीतेला समुद्र ओलांडून लंकेला घेऊन गेला व त्यानें तिला आपल्या अंतःपुरांत नेऊन ठेविलें. रावणानें तिला आपला राजवाडा आणि सर्व वैभव दाखविलें व आपल्या अलोट संपत्तीचें वर्णन करून आपल्या राज्यांतील चित्रविचित्र सौंदर्याची तिला कल्पना करून दिली. तिनें आपल्याशीं लग्न करावें म्हणून लाडीगोडी करून तिचें मन वळविण्याचा त्यानें प्रयत्न केला. परंतु "रामासंबंधींच्या एकनिष्ठतेपासून आपण कधींहि परावृत्त होणार नाहीं व आपल्या अंगाला तुझा स्पर्शहि होऊं देणार नाहीं." असें सीतेनें क्रोधयुक्त वाणीनें त्याला उत्तर दिलें. "बारा महिन्याच्या आंत जर तूं माझ्या मनाप्रमाणें करण्याला तयार होणार नाहींस तर तुझे तुकडे तुकडे करून शिजवून खाऊन टाकीन" असा रावणानें तिला धाक घातला. नंतर त्यानें तिला अशोकवनांत ठेवून तिच्यावर राक्षसिणींचा सक्त पहारा ठेविला.

इकडे सीतेला रावणानें पर्णकुटींतून नेल्यानंतर रामलक्ष्मण परत आले व घरांत कोणी नाहीं असें पाहून चकित झाले. त्यांनीं सीतेचा वनांत सर्वत्र शोध केला, पण व्यर्थ. तेव्हां राम शोकानें व्याकुळ होऊन रडूं लागला व झाडें, पर्वत व नद्या ह्यांनां सीतेची माहिती विचारूं लागला पण कोणीहि त्याच्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं. शेवटीं सीतेच्या केशांतून गळलेलीं फुलें व पायांतून पडलेले अलंकार त्यांनां सांपडले. तसेंच रावणाच्या रथाचे तुकडे व छिन्नविच्छिन्न झालेले शस्त्रांचे तुकडे वगैरे युद्धचिन्हेंहि त्यांनां दिसलीं. राक्षसांनीं सीतेला मारून टाकिलें असें रामास पक्कें वाटून त्याला भयंकर क्रोध आला व सर्व जगताचा नायनाट करण्याचा त्यानें निश्चय केला. "वातावरण शरमय करून वायूला अडवून धरीन; सूर्यकिरणांचा नायनाट करून सर्व पृथ्वीवर अंधःकार पसरवीन, पर्वतांचीं शिखरें उपटून फेकीन व सर्व जलाशय शुष्क करून सोडीन, महासागराला नाहींसा करून वृक्षनिर्मूलन करीन; एवढेंच नव्हे तर माझी सीता मला परत दिली नाहीं तर प्रत्यक्ष देवांचा सुद्धां नाश करून टाकीन" असें तो म्हणूं लागला. (३.६४) तेव्हां लक्ष्मणानें मोठ्या प्रयत्नानें आपल्या भावाचें शांतवन केलें व पुन्हां शोध करण्याकरितां त्याचें मन वळविलें. नंतर रक्तबंबाळ झालेल्या व मरणोन्मुख होऊन पडलेल्या जटायूचा व त्यांची गांठ पडली. मरणोन्मुख झालेल्या जटायूनें त्यांनां घडलेला वृत्तांत सांगण्यास आरंभ केला परंतु सर्व हकीकत सांगण्यापूर्वींच त्याचा प्राणांत झाला. पुढें दक्षिणेकडे जातां जातां त्यांची कबंध नांवाच्या राक्षसाशीं गांठ पडली. ह्याला डोकें नसून हा मोठ्यानें आक्रोश करीत होता. त्याला रामानें शापमुक्त केलें. हा उपकार स्मरून वानराधिपति सुग्रीव ह्याच्याशीं सख्य केल्यास सीताप्राप्तीच्या कामास त्याचा उपयोग होईल असें कबंधानें रामास सांगितलें.

चौथ्या कांडाला किष्किंधाकांड अशी संज्ञा असून सीतेला परत आणण्याकरितां रामानें वानरांशीं सख्य केलें याचें त्यांत वर्णन आहे. रामलक्ष्मण जेव्हां पंपासरोवराजवळ येऊन पोहोंचले; तेव्हां पंपासरोवर पाहून रामाचें मन जास्तच उद्विग्न झालें. त्यावेळच्या वसंतऋतूचें विरहवर्धक सृष्टिसौंदर्य पाहून त्याला आपल्या प्रियपत्नीची स्मृती झाली. यावेळचें वर्णन प्रेमीजनांच्या वसंतकालाचें असून पुढील कालिदासादिकांच्या काव्यवाङ्मयांतून याचा पडसाद निघतांना दिसेल.

" संतापयति सौमित्रे क्रूरश्चैत्रवनानिलः ।
अमी मयूराः शोभन्ते प्रनृत्यन्तस्ततस्ततः ॥
× × × × ×
शिखिनी मन्मथार्तैषा भर्तारं गिरिसानुनि ।
तामेव मनसा रामां मयूरोऽप्यनु धावति ॥
× × × × ×
अमी लक्ष्मण दृश्यन्ते चूताः कुसुमशालिनः ।
विभ्रमोत्सिक्तमनसः साङ्गरागा नरा इव॥"(३.१).

येथें रामलक्ष्मणाची वानराधिपति सुग्रीवाशीं भेट झाली. "वाली नांवाच्या माझ्या भावानें माझें राज्य हरण करून माझी बायको पळविली व मला राज्यांतून हांकून लाविलें," असें त्यानें रामलक्ष्मणांस सांगितलें. लवकरच राम आणि सुग्रीव ह्यांचा दृढ स्नेह जमला. वालीशीं लढण्यास सुग्रीवाला मदत करण्याचें रामानें वचन दिलें व उलट सीतेला परत आणण्यास रामाला मदत करण्याचें सुग्रीवानें कबूल केलें. वाली किष्किंधानगरींत रहात असे तेथेंच ह्या दोघां वानरबंधूंचें युद्ध झालें. रामानें सुग्रीवास मदत करून वालीला मारिलें व सुग्रीवाला राज्याभिषेक करून वालीचा मुलगा अंगद ह्यास युवराजपदावर बसविलें.

सुग्रीवाच्या मंत्रिमंडळांत वायुपुत्र हनुमान हा सर्वांत शहाणा आणि चतुर होता. सुग्रीवाचा ह्याच्यावर पूर्ण विश्वास असल्यामुळें सीतेला शोधून आणण्याची कामगिरी सुग्रीवानें ह्याच्याकडेच सोंपविली. अंगदाच्या आधिपत्याखालीं प्रचंड वानरसेना घेऊन हा चतुर हनुमान

दक्षिणेकडे निघाला. पुष्कळ हालअपेष्टा भोगल्यावर त्याला जटायूचा भाऊ संपाति नांवाचा गृध्र भेटला. "मी एकदां आपल्या भावाबरोबर स्पर्धा करून सूर्यमंडळापर्यंत उडत गेल्यामुळें माझे पंख भाजून मला विंध्याद्रि पर्वतावर निरुपायास्तव स्वस्थ बसून रहावें लागलें आहे. या ठिकाणीं बसून सीतेला चोरून नेतांना रावणाला मी पाहिलें" असें संपातीनें सांगितलें. नंतर लंकेच्या खाणाखुणा त्यानें सांगितल्यावर वानर समुद्रांत उतरले. परंतु प्रचंड लाटांनीं उचंबळत असलेल्या महासागराला अंत नाहीं असें पाहून त्याच्या पलीकडे जाण्याविषयीं ते निराश झाले. परंतु अंगदानें त्यांनां निराश न होण्याबद्दल उपदेश केला.

" न विषादे मनःकार्यं विषादो दोषवत्तरः ।
विषादो हन्ति पुरुषं बालं क्रुद्ध इवोरगः॥"४.६४,९

नंतर त्या सर्वांनीं एकत्र जमून सर्वांत जास्त उड्डाण कोण करूं शकतो हें पाहिलें त्यांत हनुमानाइतकी प्रचंड उडी घेणारा कोणी नाहीं असें आढळलें. तेव्हां हनुमान महेंद्र पर्वतावर चढला आणि समुद्रापलीकडे उडून जाण्यास तयार झाला.

पांचव्या सुंदरकांडांत लंकाद्वीप, त्यांतील राजधानी, रावणाचा राजवाडा व अंतर्गृह ह्यांचें वर्णन असून हनुमानानें सीतेला तिच्या प्रिय रामाचा निरोप जाऊन सांगितला व शत्रूच्या बळाची परीक्षा कशी केली ह्याचेंहि वर्णन आहे. ह्या भागाच्या अप्रतिम काव्यसौंदर्यामुळें म्हणा किंवा ह्यांत अलौकिक गोष्टींचें इतर कोणत्याहि भागापेक्षां जास्त वर्णन आलें आहे म्हणून म्हणा, ह्याला "सुंदरकांड" अशी संज्ञा दिली असावी असें दिसतें. रामायणाचा उत्तरभाग काव्यसौंदर्यानें रम्य आहेच परंतु विशेषतः हा पांचवा भाग तर फारच सुंदर आहे. काव्याची रम्यता म्हणजेच त्यांतील खरें सौंदर्य हें भारतीयांचें मत येथें स्पष्ट दिसून येतें.

महेंद्रपर्वताला मुळापासून हालवून सर्व प्राणिमात्रांनां थरारून सोडणारी अशी प्रचंड उडी घेऊन हनुमानानें समुद्रावरून आकाशमार्गानें उड्डाण केलें. तो चार दिवस सारखा उडत होता त्याला वाटेंत पुष्कळ अडथळे आले पण त्यानें त्यांस न जुमानतां पुष्कळ चमत्कारहि केले. अशा रीतीनें शेवटीं तो लंकेला जाऊन पोहोंचला. एका पर्वतशिखरावर बसून त्यानें रावणाची अभेद्य नगरी पाहिली. माशीएवढें लहान स्वरूप धारण करून सूर्यास्तसमयीं तो नगरांत शिरला. त्यानें सर्व नगरी, रावणाचा राजवाडा व रावणाचें सुप्रसिद्ध पुष्पक नांवाचें विमान पाहिलें. ह्याच विमानांतून रावण आकाशांत संचार करीत असे. हनुमान रावणाच्या अंतर्गृहांत शिरला व महाराजा रावण आपल्या सुंदर स्त्रियांच्या परिवारांत, विलासांत दंग झालेला त्यानें पाहिला. येथील (५.९.११) अंतःपुरांतील रात्रीच्या रमणीय देखाव्याचें वर्णन फारच सुंदर असून, बुद्धचरित्रांतील सिद्धार्थराज आपल्या स्त्रियांसह विलास करीत असतां मध्यरात्रीं अकस्मात जागा होऊन त्याला विषयोपभोगाचा वीट आला आहे असें जें वर्णन आहे त्याच्या सारखेंच हेंहि वर्णन आहे. ह्यांतील वस्तुस्थितिदर्शक वर्णनाच्या साम्यावरून बुद्धचरित्रांतील अश्वघोषाच्या वर्णनाची ही प्रतिमा आहे असा जो समज आहे त्याला दुजोरा मिळतो, ही महत्त्वाची गोष्ट आहे. ई. बी. कॉवेल ह्यानें आपल्या बुद्धचरित्राच्या प्रस्तावनेंत उल्लेख केल्याप्रमाणें बुद्धचरित्राचें हें मुख्य अंग आहे, परंतु रामायणाच्या बाबतींत मात्र हें अनवश्यक असें अलंकारिक वर्णन आहे. अर्थात हें वर्णन खुद्द वाल्मीकीच्या हातचें नाहीं व वाल्मीकीच्या धर्तीवर रचना करून रामायणाला विस्तृत करण्याचा दुसऱ्या कोणी तरी हा प्रयत्न केलेला दिसतो].

पुष्कळ ठिकाणीं निरर्थक शोध केल्यावर शेवटीं त्याला अशोकवनांत शोकानें कृश झालेली सीता आढळली. मी श्रीरामाचा स्नेही असून त्याच्याकडून आलों आहे असें त्यानें सीतेला सांगितलें. "राम जर मला सोडविण्याला येणार नाहीं तर दोन महिन्यांनीं रावणानें मला खाऊन टाकण्याचा धाक घातला आहे त्यामुळें मला मृत्युमुखीं पडावें लागेल." असें सीता म्हणाली तेव्हां "राम तुझी सुटका करण्याकरितां खात्रीनें येणार आहे, असें हनुमानानें तिला आश्वासन दिलें [ ह्या ठिकाणीं हनुमानाचें मुख्य काम संपलें. पुढें (सर्ग ४१–५५) वर्णन केलेल्या अशोकवनविध्वंस, राक्षसांबरोबर युद्ध, रावणापुढें झालेला न्याय व लंकादहन, इत्यादि कथा नंतर घातलेल्या दिसतात ]. नंतर हनुमानानें रामाकडे जाऊन सीतेला शोधून काढल्याविषयीं सर्व वृत्तांत त्याला सांगितला व त्याला तिचा निरोप कळविला.

सहाव्या कांडांत रामरावणांचें युद्ध वर्णिलें असल्यामुळें ह्यास "युद्धकांड" अशी संज्ञा आहे, व हा भाग सर्वांत मोठा आहे.

आपल्या निरोपाचें काम यशस्वी रीतीनें केल्याबद्दल रामानें हनुमानाची प्रशंसा करून त्यास आलिंगन दिलें.

हनुमानानें समुद्राच्या पलीकडे सर्व सैन्यासह जाण्यासंबंधीं आपली निराशा व्यक्त केली व सुग्रीवानें लंकेपर्यंत सेतु बांधावा असें सुचविलें.

नंतर रामानें सैन्य घेऊन निघण्याची आज्ञा दिली व ती प्रचंड वानरसेना दक्षिण दिशेकडे समुद्रतीरी जाण्यास निघाली.

ही प्रचंड वानरसेना आपल्याकडे येत आहे असें पाहून रावणानें आपले महा पराक्रमी राक्षस मंत्री बोलाविले. सर्व राक्षसमंत्र्यांनीं व रावणाच्या बंधुवर्गानीहि याला लढाई करण्यासंबंधीं अनुमोदन दिलें परंतु रावणाचा भाऊ बिभीषण ह्यानें सर्व दुश्चिन्हें त्याच्या नजरेस आणून सीतेला परत देण्याचा उपदेश केला. तेव्हां रावणाला फार क्रोध येऊन "तुझ्या मनांत मजविषयीं द्वेष असून तूं माझें अहित चिंतितोस" असा बिभीषणावर आरोप ठेविला व "राजांचे आणि वीरांचे कट्टे शत्रू म्हणजे त्यांचे आप्त वर्गच होत" असें म्हटलें. या भाषणानें बिभीषणाला फार वाईट वाटलें व चार राक्षस बरोबर घेऊन आणि समुद्रापलीकडे जाऊन त्यानें रामाशीं स्नेह जमविला. बिभीषणाच्या सल्ल्यावरून रामानें समुद्र तरून जाण्यास मदत करावी म्हणून सागरदेवतेची प्रार्थना केली. सागरानें स्वर्गीय शिल्पकार विश्वकर्म्याचा पुत्र नल ह्यास बोलावून त्यास समुद्रावर सेतु बांधण्याची आज्ञा केली. रामाच्या आज्ञेवरून वानरगणांनीं झाडें व दगड आणिले आणि लवकरच समुद्रावर सेतु बांधला व ती सर्व प्रचंड वानरसेना त्या सेतूवरून लंकेला जाऊन पोहोंचली.

अशा रीतीनें रावणाच्या नगरीभोंवतीं वानरसेनेचा गराडा पडला. रावणानेंहि शत्रूवर हल्ला चढविण्यास आज्ञा केली. दोन्ही पक्षांमधील योद्ध्यांचीं पुष्कळशीं द्वंद्वयुद्धें होऊन तुमुल युद्ध झालें. रामाच्या पक्षांतील पराक्रमी योद्धे लक्ष्मण, हनुमान, अंगद आणि जांबवंत हे असून रावणाच्या पक्षांत त्याचा मुलगा इंद्रजित हा मोठा वीर होता. इंद्रजिताला सर्व इंद्रजालविद्या माहीत असून त्यास पाहिजे तेव्हां अदृश्य होतां येत असे.

इंद्रजितानें एकदा रामाला व लक्ष्मणाला लढाईत भयंकर दुखापत केली. परंतु जांबवंताच्या सूचनेवरून त्यानें सांगितलेल्या व्रण भरून काढणाऱ्या वनस्पती द्रोणपर्वतावरून आणण्यासाठीं हनुमान रात्रीच्यारात्रीं गेला. ह्या वनस्पती अदृश्य असल्यामुळें हनुमानानें त्या पर्वताचें शिखरच्या शिखरच उचलून रणभूमीवर आणिलें व त्या वनस्पतीच्या वासामुळें रामलक्ष्मणासह जखमी झालेले सर्व वीर पुन्हां चांगले झाले. नंतर हनुमानानें हा पर्वत पुन्हां जागच्याजागीं नेऊन ठेविला. दुसरे एके वेळीं इंद्रजितानें आपल्या मायाशक्तीनें सीतेची प्रतिमा तयार करून हनुमान, लक्ष्मण आणि इतर वानर वीर ह्यांच्या समोर तिचा छळ, विटंबना व शिरच्छेद करण्याच्या हेतूनें तिला आपल्या रथावर घालून नगराबाहेर आणिलें. हनुमान एकदम भयभीत झाला व सीतेचा नाश केल्याबद्दल त्यानें रामाजवळ येऊन सांगितलें. रामाला मूर्च्छा आली, लक्ष्मण शोक करूं लागला व शापयुक्त वाणीनें सद्गुणांची पारख नसणाऱ्या दैवाला दोष देऊं लागला (६. ८३, १४ पासून पुढें). परंतु ही सर्व इंद्रजिताची माया आहे असें बिभीषणानें सांगितल्यावर त्याची खात्री पटली. शेवटीं मोठें भीषण द्वंद्वयुद्ध होऊन लक्ष्मणानें इंद्रजिताला मारिलें. आपल्या मुलाचा वध झाला असें पाहून रावणाला फार क्रोध आला व तो स्वतः समरांगणावर आला. रामाचें व रावणाचें मोठें युद्ध झालें. हें युद्ध अहोरात्र चालू होतें. देव रामाच्या साहाय्यार्थ धांवून आले व विशेषतः इंद्र आपलीं आयुधें व विमान घेऊन आला. परंतु जितक्या वेळां म्हणून रामानें रावणाचा शिरच्छेद केला तितक्या वेळां पुन्हां पुन्हां त्याच्या देहावर नवीन शिरें उत्पन्न होऊं लागलीं. शेवटीं प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या एका शस्त्रानें रामानें रावणाचें हृदय फाडून टाकलें तेव्हां वानरसेनेंत हर्षाची उकळी फुटली व राक्षस सैरावैरा धांवूं लागले.

नंतर रावणाचा अंत्यविधि झाला व बिभीषणाला रामानें लंकेच्या सिंहासनावर बसविलें. इतकें झाल्यानंतर रामानें सीतेला बोलावणें पाठविलें व विजयाची आनंदाची वार्ता कळविली. परंतु सीता आल्यावर राक्षसांच्या व वानरांच्या समोर राम तिचा स्वीकार करीना. त्यानें तिला असें सांगितलें कीं, "मला जो अपमान सोसावा लागला त्याबद्दल सूड उगविण्याकारितांच एवढें केलें आहे; मला इतःपर तुझ्याशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं. जी स्त्री दुसऱ्याच्या मांडीवर बसली व जिच्याकडे दुसऱ्यानें कामवासनायुक्त नजरेनें पाहिलें तिचा "बायको" म्हणून मी पुन्हां अंगिकार करणार नाहीं."

रामाच्या ह्या अनाठायी संशयाबद्दल सीतेनें कडक टीका करून लक्ष्मणाला चिता रचण्यास सांगितलें. याला रामानें अनुमोदन मिळाल्यावर चिता रचून पेटविण्यांत

आली. सीतेनें आपल्या पवित्राचरणाची साक्ष म्हणून अग्निदेवतेला आव्हान करून चितेंत उडी घेतली. नंतर सीतेला जशीच्या तशीच घेऊन प्रत्यक्ष अग्नि त्या चितेंतून प्रगट झाला व सीता रामाला अर्पण करून मोठ्या गांभीर्ययुक्त वाणीनें त्यानें रामाला आश्वासन दिलें कीं, पातिव्रत्यापासून सीता कधींहि भ्रष्ट झाली नाहीं व राक्षसांच्या राजवाड्यांत राहून सुद्धां तिचें आचरण शुद्ध व पवित्र होतें. नंतर राम म्हणाला कीं, स्वतः मला सीतेच्या शुद्ध आचरणाबद्दल काडीइतकीहि शंका नव्हती परंतु लौकिकदृष्ट्या तिची पवित्रता सिद्ध होणें अवश्य होतें.

यानंतर हनुमान व वानरसेना इत्यादि परिवारासह राम अयोध्येला परत गेला व तेथें भरत, शत्रुघ्न व राजमाता यांनीं त्याचा मोठा आदरसत्कार केला. रामाचा अयोध्येंत पुन्हां प्रवेश होतांच सर्व नागरिकांनां मोठा आनंद झाला. रामाचें राज्यारोहण झालें. व त्यानें आपल्या प्रजेच्या कल्याणाकडे लक्ष देऊन सुखासमाधानानें राज्य केलें.

या ठिकाणींच खरोखर रामकथा समाप्त होते व मूळ काव्याचीहि सहाव्या कांडाच्या शेवटींच समाप्ति होते. व सातवें कांड मागून पुरवणीदाखल जोडलें गेलें आहे ह्याविषयीं कांहींच शंका रहात नाहीं. सातव्या भागाला उत्तरकांड असें नांव आहे व पुराणें आणि महाभारताप्रमाणेंच रामायणाशीं ज्यांचा कांहीं संबंध नाहीं अशा अनेक गोष्टी व कथा यांचा ह्यांत समावेश होतो. पहिल्या ३४ सर्गांत राक्षसांची उत्पत्ति व रावण आणि इंद्र ह्यांच्या युद्धाचें वर्णन आहे व ह्यानंतर (सर्ग ३९ पासून पुढें) हनुमानाचें बाळपण वर्णन केलें आहे.

या कांडाचा सुमारें एकतृतीयांश भाग फक्त राम आणि सीता यांच्या कथेनें व्यापला आहे. ही कथा पुढें लिहिल्याप्रमाणें आहे.

सीतेला रावणानें चोरून नेलें त्यावेळीं ती त्याच्या अंकावर आरूढ झाली होती असें असतांहि आपण पुन्हां तिचा स्वीकार केल्याबद्दल लोक आपणास नांवें ठेवतात असें एकदां रामाच्या कानीं आलें व ह्यामुळें राज्यांतील स्त्रियांच्या मनावर वाईट परिणाम होण्याचा संभव आहे असें त्याला भय वाटलें. तेव्हां अत्यंत पवित्र व अनुकरणीय अशा रामाला फार वाईट वाटलें. आपणच लोकांनां वाईट उदाहरण घालून देत आहों अशा तऱ्हेचा लोकांनीं केलेला आरोप त्याला सहन न होऊन यानें लक्ष्मणास सीतेला हद्दपार करण्यास सांगितलें तेव्हां मोठ्या दुःखानें लक्ष्मणानें तिला आपल्या रथांत घालून गंगेच्या पलीकडल्या तीरावर नेलें आणि रामानें जनापवादावरून तुझा त्याग केला आहे असें तिला कळविलें. सीतेनें मोठ्या दुःखानें परंतु विधिवशात् ज्या गोष्टी होतील त्या निमूटपणें सोसणें भाग आहे असें जाणून रामाला प्रेमपूर्ण निरोप पाठविला. कांहीं काळानें तेथें शोक करीत असलेली सीता तेथील आश्रमकुमारांनां दिसली व त्यांनीं तिला वाल्मीकि ऋषीच्या आश्रमांत नेलें. वाल्मीकीनें तिला आश्रमनिवासी स्त्रियांच्या स्वाधीन केलें. तेथें कांहीं दिवसांनीं तिला कुश आणि लव असे दोन जुळे मुलगे झाले.

या गोष्टीला पुष्कळ वर्षें लोटलीं. हे रामाचे मुलगे मोठाले होऊन कविश्रेष्ठ वाल्मीकि ऋषींचे शिष्य झाले. एकदां रामानें एक मोठा अश्वमेध करण्याचें योजिलें. ह्या यज्ञाकरितां वाल्मीकि आपल्या शिष्यांस बरोबर घेऊन गेला. यज्ञमंडपांत ह्या दोन शिष्यांनां वाल्मीकीनें आपण रचिलेलें रामायण म्हणून दाखविण्यास सांगितलें. त्यांच्या त्या सुस्वर गायनानें सर्व सभा थक्क होऊन गेली. वीणेवर सुस्वर आवाजांत काव्य म्हणणारीं हीं दोन मुलें कुश आणि लव हे सीतेचे मुलगे होत असें रामाला लागलींच कळून आलें. नंतर त्यानें वाल्मीकीकडे निरोप पाठवून सीतेनें यज्ञमंडपांत जमलेल्या लोकांसमोर आपल्या पवित्रतेची शपथ घ्यावी अशी व्यवस्था करण्याची विनवणी केली. दुसऱ्या दिवशीं वाल्मीकीनें सीतेला यज्ञमंडपांत आणिलें आणि ती शुद्ध व पवित्राचरणी असून कुश आणि लव हे तिचे व रामाचेच मुलगे आहेत असें गंभीर वाणीनें सांगितलें. "जरी वाल्मीकिच्या शब्दांनीं माझें समाधान झालें आहे तरीपण सीतेनें शपथ घेऊन आपली शुद्धि करून घ्यावी अशी माझी इच्छा आहे" असें यावर रामानें म्हटलें. सर्व देव ह्यावेळीं स्वर्गातून अवतीर्ण झाले. सीता खालीं पहात उभी होती ती हात जोडून म्हणाली:—

"यथाहं राघवादन्यं मनसाऽपि न चिन्तये ।
तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति ॥
मनसा कर्मणा वाचा यथा रामं समर्चये ।
तथा मे माधवी देवी विवरं दातु मर्हति ॥
यथैतत्सत्यमुक्तं मे वेद्मि रामात्परं न च ।
तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति ॥"

म्हणजे जर मी रामाविषयीं पातिव्रत्य राखलें असेल तर पृथ्वी देवीनें मला आपल्या पोटांत घ्यावें. हें तिचें भाषण संपतें न संपतें तोंच भूमि दुभंग होऊन शेषानें

डोक्यावर धारण केलेलें एक दिव्य सिंहासन वर निघालें. त्यावर बसलेल्या पृथ्वी मातेनें सीतेला आलिंगन दिलें व तिच्यासह ती अंतर्धान पावली. नंतर सीता परत मिळविण्यासाठीं रामानें पृथ्वीची पुष्कळ प्रार्थना केली पण व्यर्थ! शेवटीं ब्रह्मदेवानें प्रकट होऊन सीता पुन्हां स्वर्गांत भेटेल असें सांगून रामाचें शांतवन केलें. नंतर लवकरच रामानें राज्यकारभार कुश व लव ह्यांच्याकडे सोंपवून तो स्वर्गास गेला व पुन्हां विष्णुस्वरूप झाला.

सातव्या कांडांतील मूळ कथानकांत अनेक ठिकाणीं पौराणिक गोष्टी व दन्तकथांचा समावेश झालेला आहे. ययाति व नहुष ह्यांची पूर्वी माहीत असलेली कथा (७.५८), इंद्रानें वृत्राला मारिलें ह्यामुळें त्यास ब्रह्महत्येचें पातक लागलें ती कथा (७.८४–८७), मित्र व वरुण ह्यांची आवडती अप्सरा उर्वशी व वसिष्ठ आणि अगस्त्य यांच्या जन्माची विचित्र कथा(सर्ग५६पासूनपुढें), इल नांवाचा राजा, ज्याच्या "इला" ह्या स्त्रीरूपापासून पुरूरव्याची प्राप्ति झाली ती कथा (सर्ग ८७–९०), आणि इतर असल्याच दुसऱ्या कांहीं कथा ह्या भागांत मधून मधून दृष्टीस पडतात. महाभारतांतील १३ व्या पर्वांतील व त्याबरोबरच बऱ्याचशा अतिशयोक्तीच्या पण खऱ्या ब्राह्मणी कथा या कांडांत चांगल्या गोंविल्या आहेत. उदाहरणार्थ, शंबूक ऋषीची कथा; शंबूक हा शूद्र असून त्यानें तपश्चर्या केली म्हणून रामानें त्याचें शिर कापलें तेव्हां देवांनीं रामाची प्रशंसा केली; कारण शूद्रानें तपाचरण करूं नये असें धर्म सांगतो! तसेंच, एका देवानें आपल्या पूर्वीच्या अवतारांत तपश्चर्या केली पण ब्राह्मणांनां दान दिलें नाहीं. तेव्हां त्याला आपलें स्वतःचें मांस खावें लागलें ही कथा (सर्ग ७३–८१). हें कांड अथपासून इतिपर्यंत सर्वांत मागाहून रचलेल्या महाभारतांतील शेवटच्या भागासारखेंच आहे.

**रामायणांतील खरा (मूळचा) व खोटा (प्रक्षिप्त) भाग.**—रामायणांतील सबंध सातवें कांड मूळ ग्रंथाला मागाहून जोडलेलें आहे ह्यांत मुळींच शंका नाहीं. आणि सबंध पहिलें कांड सुद्धां मूळचें वाल्मीकीच्या हातचें लिहिलेलें नाहीं असेंहि बहुमतानें मान्य झालें आहे. ह्या कांडांत पुष्कळशीं परस्परविरोधी विधानें सांपडतात एवढेंच नव्हे तर भाषा व रचना ह्या दृष्टीनें सुद्धां दोन ते सहा कांडांपेक्षां हा भाग कमी दर्जाचा आहे. शिवाय ह्या काव्यांतील मूळ लिहिलेल्या भागांत (कांड २–६) पहिल्या कांडांत वर्णिलेल्या गोष्टींचा कोठेंहि संबंध आलेला आढळत नाहीं. उलट पहिल्या कांडांत वर्णिलेल्या कांहीं गोष्टी तर पुढील कांडांत दिलेल्या विधानांविरुद्ध भासतात. उदाहरणार्थ, लक्ष्मणाचा विवाह झाला असें पहिल्या कांडांत सांगितलें असून शूर्पणखेला लक्ष्मण अविवाहित आहे असें राम सांगतो.

राम हा विष्णूचा अवतार असून दैवी पुरुष होता ही कल्पना फक्त पहिल्या व सातव्या कांडांत दिसून येते. मागाहून जोडलेले कांहीं किरकोळ अवताराविषयक उल्लेख वगळले तर दुसऱ्या कांडापासून साहाव्या कांडापर्यंत राम हा मृत्युलोकांतीलच एक वीरपुरुष होता असें दाखविलें आहे व मूळ लिहिलेल्या गेलेल्या यांतील भागांत विष्णू–अवतारी राम कोठेंहि उल्लेखिला नाहीं. या महाकाव्याच्या मूळच्या भागांत ज्या ठिकाणीं पुराणकथांचा अंतर्भाव आहे त्याठिकाणीं तर वेदांतल्या प्रमाणेंच विष्णूच्या ऐवजीं इंद्र हा मुख्य देव समजला गेलेला स्पष्ट दिसतो.

वर सांगितल्याप्रमाणें पहिल्या आणि सातव्या कांडांत मुख्य कथानक थांबवून पुराणें आणि महाभारतांतल्या प्रमाणें ठिकठिकाणीं पुष्कळशा ब्राह्मणी कथा घातल्या आहेत. ह्या कांडांतून ज्या नव्या गोष्टी व पुरवणीमजकूर घातलेला आहे तो अगदीं निराळ्या स्वरूपाचा आहे. मूळ कवीच्या अतिशय सुरस व लोकप्रिय लिखाणांत आपली भर घालून हा नवा मजकूर तयार केला आहे. उत्तरकांडांत वर्णन केलेल्या कुशलवासारख्या फिरत्या भाट गायकगणांच्या पिढ्यानुपिढ्यांत कित्येक शतकें पर्यंत रामायण तोंडीच चालत आलें अशी आपणांस कल्पना केली पाहिजे. तेव्हां असल्या गायकनटवर्गांनां हें महाकाव्य आपल्याच मालकीचें आहे असें वाटत असल्यामुळें त्यामध्यें काय वाटेल तो बदल करण्याची त्यांनां जणू काय मुभा असे. दशरथ, कौसल्या किंवा सीता ह्यांच्या विलापांनीं श्रोतृवृंदाचीं मनें सद्गदित झालीं असें त्यांनां आढळून येतांच, त्या विशिष्ट काव्यभागाच्या जास्त विस्तारासाठीं ते मूळ काव्यांत स्वतः रचलेल्या आणखी कविता दडपून देत. लोकसमुदायांतील कांहीं पराक्रमी शूर मंडळीला एखाद्या युद्धप्रसंगाचें वर्णन विशेष आवडलें असें दिसून आल्यास ते आणखी कांहीं काव्यगत वीरांचीं द्वंद्वयुद्धें करवीत व दहावीस हजार राक्षसांचा किंवा वानरांचा वध केलेला दाखवीत किंवा ज्या एखाद्या शूर कृत्याचें वर्णन अगोदरच येऊन

गेलें असेल त्यांतच कांहीं फेरफार करून तें पुन्हां म्हणून दाखवीत. जर वानरादिकांच्या हास्यरसपरिपूर्ण चेष्टादिकांनीं श्रोतृसमुदायाचें मनोरंजन होतें असें त्यांस दिसलें तर ते असलेच प्रसंग निवडून काढीत किंवा मुळांत असतील त्यांत आणखी प्रसंगांची भर घालीत.

जर श्रोतृवृंदांत विद्वान् ब्राह्मणवर्गच असेल तर ते कांहीं नीतिबोधक कविता घालून किंवा दुसरीकडून घेतलेलीं कांहीं सूत्रें त्यांत दडपून त्याची बोधप्रदता प्रगट करून पंडितांचीं मनें प्रसन्न करीत. मूळ काव्यांतील लोकप्रिय निसर्गवर्णनेंहि कांहीं महत्त्वाकांक्षी असंबद्ध काव्यकारांनीं, त्यांनां दरबारी अलंकारिक काव्याचें स्वरूप देऊन वाढविलीं आहेत (काव्यांतील श्लोकांचा छंद सोपा असल्यामुळें त्याची वाढ करणें सोपें झालें खरें परंतु त्यामुळें मूळ काव्य अबाधित राहणेंहि कठीण झालें. आपल्या कनवटींतून श्लोक काढणें म्हणजे हिंदुस्थानांतील एखाद्या साधारण संस्कृत जाणणाऱ्याला तर मुळीच कठीण नाहीं). महाभारताप्रमाणेंच रामायण जेव्हां लिहिलें गेलें त्याच वेळीं त्याला कांहीं कमजास्त शाश्वत स्वरूप प्राप्त झालें. धर्माच्या दृष्टीनें रामायण वाचणें किंवा ऐकणें म्हणजे पुण्य होय आणि जो तें लिहून काढील त्यास मोक्षाची प्राप्ति झालीच पाहिजे असा लोकांचा समज होऊन हा ग्रंथ जेव्हां लोकप्रिय व प्रसिद्ध झाला, त्यावेळीं तो लिहिला गेला असला पाहिजे.

**आयुष्यमारोग्यकरं यशस्यं सौभ्रातृकं बुद्धिकरं शुभं च।**
**श्रोतव्यमेतन्नियमेन सद्भिराख्यानमोजस्करमृद्धिकामैः १२२**
**(युद्धकांड, सर्ग १२८).**

अशा तऱ्हेच्या ह्या भव्य व हितकर काव्याचें जो जास्त लेखन करील त्यास खात्रीनें मोक्षची प्राप्ति होणारच अशी सांगणी. ह्यामुळें ज्यांनीं हें काव्य संगृहित करून संपादन केलें त्यांनीं आपल्याला परपरनें जें काय उपलब्ध झालें त्याची चिकित्सक बुद्धीनें छाननी करण्याचें काम आपलें नव्हे असें समजून खरा आणि खोटा भाग न निवडतां रामायण ह्या नांवाखालीं त्यांनां जें सांपडलें त्याचा सर्व त्यांनीं मोठ्या हौसेनें संपादनार्थ स्वीकार केला.

रामायण लिहिलें गेल्यावरच त्याला कांहीं कमजास्त शाश्वत स्वरूप आलें असें जें वर म्हटलें त्याचें कारण एवढेंच कीं जे जे रामायणाचे हस्तलिखित ग्रंथ आपणापर्यंत परंपरागत चालत आले आहेत त्या परस्परांत पुष्कळ भेद आहे. हिंदुस्थानांतल्या निरनिराळ्या भागांत परंपरागत चालत आलेल्या प्रतींमध्यें साधारणतः निदान तीन प्रती अगदीं निरनिराळ्या अशा आढळतात. या प्रती केवळ कांहीं पाठांच्या बाबतींत किंवा कांहीं उताऱ्यांच्या बाबतींतच भिन्न आहेत असें नसून प्रत्येकींत कांहीं श्लोक, लांबलचक उतारे, एवढेंच नव्हे तर सबंध सर्गहि असे आहेत कीं ते दुसरीकडे आढळत नाहींत. शिवाय एकींत श्लोक ज्या अनुक्रमानें दिलेले आहेत त्याच अनुक्रमानें दुसरींत सांपडत नाहींत. मुंबईत पुष्कळ वेळां छापली गेलेली (के. पी. परब यांची निर्णयसागर छापखान्यांत छापलेली १९०२ सालची आवृत्ती दुसरी) जी प्रत आहे तिचाच सर्वत्र प्रसार असून उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांत जास्त प्रसार आहे. हींच सर्वांत जुनी आहे. दुसरी प्रत बंगाली. यूरोपांत ज्या संपूर्ण रामायणाचा प्रचार आहे ती जी. गोरेसिओनें संपादिलेली (टुरिन १८४३-६७) बंगाली प्रत आहे. पंडित रसिकलाल भट्टाचार्यानें 'पंडित' मासिकांत (पु. २८-३४) सबंध बंगाली प्रत सटीक छापून प्रसिद्ध केली होती. तिसरी प्रत वायव्य हिंदुस्थानी होय. हिलाच पश्चिमहिंदुस्थानी किंवा काश्मिरी प्रत म्हणतात. ही प्रत हल्लीं लाहोर येथें छापिली गेली आहे. या सर्व प्रतींतून जे बरेच मोठे फरक दृष्टीस पडतात त्याचें कारण एकच व तें हें कीं, हें महाकाव्य बराच काळ केवळ तोंडी परंपरेनें चालत आलें होतें. श्लोकानुक्रमांतील विसंगतता ह्या गीतें गाऊन दाखविणाऱ्यांच्या स्मृतीचा दोष असावा. मूळ शब्दांत कालांतरानें फरक होणें अपरिहार्यच आहे आणि निरनिराळ्या प्रांतांतील गायकांनीं या काव्याला नव्या गोष्टींची जोड दिली अशीहि कल्पना करण्यास कांहीं हरकत नाहीं.

ह्या सर्व प्रतींतून सातहि कांडें आढळतात व सर्वांत मूळचा आणि प्रक्षिप्त भाग ह्यांचें सारखेंच मिश्रण आहे. तेव्हां कोणतीहि प्रत म्हणजे खरें मूळचें रामायण नव्हे. ह्यांतील एखाद्या प्रतींत अमुक एक कथाभाग नाहीं असें असेल तर त्या कथाभागाच्या खरेपणाबद्दल संशय दृढ होण्यास जागा राहाते. एकंदरींत महाभारतापेक्षां रामायणांत प्रक्षिप्त म्हणजे मागाहून लिहिलेले जे भाग आहेत ते शोधून काढणें सोपें आहे. याकोबीनें म्हटलें आहे कीं, "ज्याप्रमाणें आपल्या जुन्या व पूज्य अशा बऱ्याचशा देवालयांतून मूळ पायांत फेरफार न करतां प्रत्येक पिढीनें

जुन्याची डागडुजी करून व नवी जोड देऊन पुष्कळ मनोरे आणि खोल्या वाढविल्या आहेत, त्याप्रमाणें रामायणांतहि कवींनीं पिढ्यानुपिढ्या अशी कारागिरी केली आहे. परंतु ज्या मूलघटक–अंशांभोंवतीं ही रचना झाली आहे तो घटक–अगदीं बारीकसारीक बाबतींत जरी नाहीं तरी त्याच्या मुख्य स्वरूपांत–चौकस दृष्टीनें निरीक्षण करणाऱ्याला ओळखून काढणें अवघड नाहीं." (याकोबी रामायण पृ. ६०).

याकोबीनें आपल्या "रामायण" ह्या ग्रंथांत अशा रीतीनें जोड देऊन मूळ ग्रंथ वृद्धिंगत केलेल्या पुष्कळ गोष्टी सिद्ध करून दाखविल्या आहेत; त्यामुळें ह्या संबंधीं मुळींच संशय रहात नाहीं. मूळ काव्याचें पुन: नीट निरीक्षण करून सर्व पुन: मूळ स्वरूपांत मांडण्याचा प्रयत्न झाल्यास आज आपणांस उपलब्ध असलेल्या २४ हजार श्लोकांपैकीं फक्त एकचतुर्थांश भागच मूळ म्हणून खालीं उरेल, तथापि तसा प्रयत्न करूं नये असें नाहीं. भारतीय महाकाव्यांमध्यें प्रक्षिप्त कथांचें अवडंबर फार असूनहि तीं वाचतांना पुष्कळ वेळां आपणांस प्रशंसनीय वाटतात तरी पण पुष्कळ वेळां तीं आपणांस निराशहि करतात. काव्यसौंदर्याच्या दृष्टीनें भारतीय आणि ग्रीक महाकाव्यांची तुलना करतांना भारतीय काव्यें जर कनिष्ठ दर्जाचीं वाटलीं तर त्याचा दोष प्राचीन भारतीय कवींपेक्षां त्यांच्या मूळ ग्रंथांत फरक करणारांकडे येतो.

फ्रेडरिक रुकर्ट ह्यानें "बेडौल व प्रक्षोभक शब्दाडंबर" अशी रामायणावर टीका करून त्याला जीं नांवें ठेविलीं आहेत तीं खुद्द वाल्मीकीला लागणार नसून त्याच्या संप्रदायांतील प्रक्षेपक कवींनां लागतील. परंतु ग्रीक काव्यापेक्षां भारतीय काव्याचें सौंदर्य ह्या जर्मन कवीला दुसऱ्या बाबतींत अधिक आढळून त्यानें स्पष्ट म्हटलें आहे कीं, "होमरच्या ग्रंथांशीं तुलना करतां रामायणाची रचना तुम्हाला शब्दवडंबरयुक्त वाटेल परंतु इतके उच्च विचार व इतक्या गाढ मनोभावना तुम्हाला इलियड्मध्यें खचित दिसणार नाहींत."

रा मा य णा चा का ल.–रामायणांत मूळ लिहिलेला भाग कोणता व नवीन मागाहून प्रक्षेप केलेला भाग कोणता ह्या प्रश्नाशीं अत्यंत संलग्न असा दुसरा प्रश्न म्हणजे रामायण कोणत्या काळीं लिहिलें गेलें हा होय. केवळ अंदाज करण्यापलीकडे आपणांस ह्या बाबतींत दुसरा मार्ग नाहीं. हा प्रश्न सोडविण्यासाठीं दोन ते सहा कांडांत सांपडणाऱ्या मूळ काव्यरचनाकालापासून तो पहिलें आणि सातवें कांड जेव्हां मागाहून भरती केलें तोंपर्यंत किती काळ मध्यंतरीं लोटला ह्याची कांहीं तरी कल्पना आपणांस असणें हें पुष्कळ अंशीं महत्त्वाचें आहे. आपणांस रामायणकांडांतून मूळ राम हा केवळ एक मानवी वीर दिसतो हें आपण आतांपर्यंत पाहिलें व पहिल्या व सातव्या कांडांत व तसेंच इतर क्वचित् कांहीं ठिकाणीं तो विष्णूचा अवतार म्हणून दिसतो. पण या महाकाव्यानेंच रामराजाला एक राष्ट्रीयवीर बनविलें. तेव्हां मानवीस्वरूपांतून ईश्वरीअंशी राष्ट्रवीरांत व तेथून सर्व विश्वाचा देव जो विष्णु त्याच्या अवतारांत रामाचें रूपांतर होण्यास बराच काळ लागला असला पाहिजे. दुसरी गोष्ट अशी कीं, पहिल्या आणि शेवटच्या कांडांत वाल्मिकि हा एक अरण्यवासी ऋषि असून रामाशीं तो समकालीन होता असें दिसतें. तेव्हां प्रक्षिप्त भाग रचणाऱ्यांनां वाल्मीकि हा एक काल्पनिक किंवा केवळ कथागत अशी व्यक्ति वाटत होती यांत संशय नाहीं. म्हणून मूळच्या व मागाहून जोडलेल्या भागांमध्यें बऱ्याच शतकांचा काळ लोटलेला दिसतो. तसेंच जातां जातां येथें एवढें मात्र अवश्य नमूद केलें पाहिजे कीं, महाभारतांत रामकथा आहे, एवढेंच नव्हे तर वाल्मीकीचें रामायण आहे, शिवाय महाभारतांत राम विष्णूचा अवतार समजला गेला असून वाल्मीकि हा पुरातन कालीन एक ऋषि होता असें सांगितलेलें आहे.

महाभारतांतील रामोपाख्यान म्हणजे बहुतेकअंशीं रामायणाची संक्षिप्त आवृत्ति होय. आणखी असें सुद्धां म्हणण्यास हरकत नाहीं कीं, ज्या रामायणाची ही संक्षिप्त आवृत्ति आहे तें अर्वाचीन स्वरूपाचें म्हणजे जवळजवळ आजच्या रामायणासारखें असावें. कारण रामोपाख्यान रचणाऱ्यानें रामाला पहिल्यापासूनच मानवस्वरूपी विष्णु म्हटलेलें आहे. हनुमानानें लंका जाळिली हा प्रक्षिप्त भागहि रामोपाख्यानकारानें उल्लेखिला आहे व सातव्या कांडांतील रावणाची कथाहि त्याला माहीत आहे. द्रौपदीहरणानंतर युधिष्ठिराचें शांतवन करण्यासाठीं ही रामकथा सांगितली गेली आहे.

यांठिकाणची द्रौपदी चोरून नेल्याची सर्व कथा म्हणजे रामायणांतील सीता चोरून नेल्याच्या कथेचीच निव्वळ प्रतिमा दिसते. रामायणांत सीताहरण हा काव्याचा मुख्य विषय तरी आहे, परंतु महाभारतांतील द्रौपदीहरणकथेचा मूळ कथानकाशीं तितका महत्त्वाचा

संबंध नाहीं. या दोन महाकाव्यांत दुसऱ्याहि चटकन ध्यानांत येण्यासारख्या सदृश गोष्टी पुष्कळ आहेत व त्यांत विशेषतः राम आणि अर्जुन ह्या योध्यांचें सादृश्य हें एक मोठें उदाहरण आहे. बारा ते चौदा वर्षें वनवास, धनुष्य वांकविणें, व कथेंतील नायकांनां देवांपासून दैवी अस्त्रांची प्राप्ति वगैरे बाबतींवरून एका काव्याचा दुसऱ्यावर कसा परिणाम होणें शक्य होतें तें दिसतें; पण हें सर्व सिद्ध करून दाखविणें शक्य नाहीं. तथापि रामायणानें महाभारतांतून म्हणण्यापेक्षां महाभारतानेंच रामायणांतून सदृश चित्रें घेतलीं हेंच जास्त शक्य दिसतें. महाभारतांतील पांडव किंवा भारतनायकांच्या कथा या माहीत असल्यासंबंधींचे रामायणांत कोठेंच पुरावे सांपडत नाहींत, परंतु उलटपक्षीं आपण आतांच वर दाखविलें आहे कीं, महाभारतकारांनां रामकथा माहीत होती एवढेंच नव्हे तर रामायणहि माहीत होतें. मी सत्यवानाशीं सावित्रीप्रमाणें (२ ३०, ६), किंवा नलराजाशीं दमयन्तीप्रमाणें (५. २४, १२), रामाशीं एकनिष्ठ राहीन असें सीतेनें म्हटलें यावरून कवीला महाभारतांतील सवित्रीकथा किंवा नलराजाची कथा माहीत असलीच पाहिजे असें सिद्ध होत नाहीं. असें हॉपकिन्स ह्यानें दि ग्रेट एपिक-ह्यांत (पान ७८ त) गृहित धरीलें आहे. हरिवंशांत रामायणाच्या नाट्यप्रयोगाविषयीं उल्लेख केलेला आहे. ह्यापेक्षांहि महत्त्वाचा एक मुद्दा असा आहे कीं महाभारतांत (७. १४३, ८९ कुंभकोण प्रत) वाल्मीकीनें गायलेला प्राचीन श्लोक

"अपिचायं पुरा गीतः श्लोको वाल्मीकिना भुवि"

म्हणून रामायणांतील एका श्लोकाचा उतारा दिलेला आढळतो.

"न हन्तव्याः स्त्रिय इति यत् ब्रवीषि प्लवंगम।
पीडाकरममित्राणां यच्च कर्तव्यमेव तत्॥"
(रामायण ६.८१,२८)

वसिष्ठ व इतर पुराणकालीन ऋषींबरोबरच महाभारतांत पुष्कळ ठिकाणीं "महातपस्वी" व पूज्य म्हणून वाल्मीकीचा उल्लेख सांपडतो. एके प्रसंगीं त्यानें युधिष्ठिराला असें सांगितलें आहे कीं, महापवित्र अशा ऋषिमंडळींत एकादां वादविवादप्रसंगीं माझी "ब्रह्मघाती" अशी निंदा करण्यांत आली; ह्यामुळें ब्रह्महत्येचा जो आरोप मजवर आला त्यापासून शिवाची भक्ती केल्यानेंच माझी शुद्धि झाली; ह्या सर्व गोष्टींवरून महाभारत संपूर्ण होण्यापूर्वींच रामायण हा पुरातन ग्रंथ म्हणून सर्वत्र समजला जात असे असें दिसतें. तेव्हां महाभारतांत जुन्या गोष्टींत नव्यांचें मिश्रण फारच झालेलें असून तें त्या काव्यांत सर्व भागांतून आढळतें, तसें रामायणांत फारसें नाहीं. त्यांत प्रक्षेपांस प्रथमच आळा घांतलेला दिसतो. म्हणून फक्त पहिल्या व सहाव्या कांडांत व इतरत्र थोड्या ठिकाणींच मात्र प्रक्षिप्त मजकूर सांपडेल. महाभारत आपणांस ज्या स्वरूपांत आज उपलब्ध आहे तें स्वरूप त्याला इ. स. चौथ्याशतकांत प्राप्त झालें असें म्हटलें तर रामायण हें त्या पूर्वींच एकदोन शतकें तरी संपूर्ण झालें असलें पाहिजे. चिनी आधारावरून आपणांस असें आढळून येतें कीं रामायण हें इ. स. चवथ्या व पांचव्या शतकांत पुष्कळ प्रसिद्धीस आलें असून लोकप्रियहि झालें होतें. यांत अगदींच फरक होणार नाहीं. असें मात्र नाहीं. तथापि ह्यावरून ह्या दोन महाकाव्यांपैकीं जुनें कोणतें हा प्रश्न सुटत नाहीं. रामायण आणि महाभारत ह्यांच्या इतिहासाविषयीं आतांपर्यंत आपण जें कांहीं पाहिलें त्यावरून एवढें मात्र दिसतें कीं, वरील प्रश्नांत फारसें तथ्य नाहीं. पण त्यापासून स्वाभाविकपणेंच जे तीन निराळे प्रश्न उद्भवतात ते असेः (१) आज आपणापुढें हीं जीं दोन काव्यें ज्या स्वरूपांत आहेत त्यांपैकीं जुनें कोणतें. (२) मूळच्या महाभारतकाव्यांत वीरकाव्यें उपदेशपर गीतें घालून आज दिसणारा प्रचंड संगृहित (महाभारत) ग्रंथ जेव्हां तयार केला, त्या कालावधीचें मूळचें वाल्मीकीचें रामायण काव्य नवी नवी भर पडून आजच्या स्वरूपाप्रत पावण्याला लागणाऱ्या कालावधीशीं काय प्रमाण पडतें. (३) कधीं काळीं एखादें महाभारत किंवा रामायणकाव्य अस्तित्वांत होतें काय? ह्यांपैकीं पहिल्या प्रश्नाचें आपणांस असें उत्तर देतां येईल कीं, आजचें रामायण हें आजच्या महाभारतापेक्षां जुनें आहे. दुसऱ्या प्रश्नासंबंधीं इतकेंच म्हणतां येईल कीं रामायणाचा विस्तार अल्प असल्यानें, महाभारतापेक्षां त्याची संपूर्ण वाढ होण्यास कमी काळ लागला असावा. रामायणास मागाहून जोडलेल्या दोन्ही कांडांचें महाभारताच्या पर्वांशा पुष्कळसें साम्य असून दोन्हींतहि त्याच त्याच दंतकथा व पौराणिक गोष्टी आढळतात असें आपण मागें पाहिलेंच आहे. परंतु या सारख्याच कथा दोन्ही काव्यांत इतक्या बदलून घेतलेल्या आहेत कीं, त्या एका काव्यामधून दुसऱ्या काव्यांत घेतल्या असतील असें वाटत नाहीं तर त्या ऋषिमंडळांत तोंडीं परंपरेनें चालत आलेल्या एकाच इतिहासवाङ्मयांतून उद्भवत झालेल्या असाव्यात. तेव्हां हें कथासादृश्य

स्वाभाविक दिसणार. शिवाय रामायण आणि महाभारत ह्यांतील भागांतून पुष्कळशीं सारखींच वाक्यें, श्लोकार्ध व प्रचारांतील म्हणी सांपडतात [इ. डब्ल्यू. हॉपकिन्स ह्यानें अमेरिकन जर्नल ऑफ फिलॉसफी ( अमेरिकेंतील तत्त्वज्ञानमासिक ) ह्यांतील भाग १९ पान १३८, आणि भाग २२, पान २२ ह्यांत व दि ग्रेट एपिक ऑफ इंडिया (भारतीय महाकाव्य) ह्या त्याच्या ग्रंथांत हें सिद्ध करून दाखविलें आहे]. भाषा, लेखनपद्धति आणि वृत्तें ह्यांतहि दोन्ही ग्रंथांत पुष्कळच साम्य आढळून येतें. ह्या गोष्टींवरून महाभारताची संपूर्ण वाढ होण्यास जो बराच काळ लागला त्याच्या आंतच रामायण रचिलें गेलें असें अनुमान काढतां येतें.

तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर केवळ अनुमानानें देतां येईल. कृष्णावतारापूर्वी रामावतार झाला असा विष्णूच्या अवतारांचा अनुक्रम भारतीयांच्या मनांत ठाम झाल्यामुळें महाभारतापूर्वी रामायण रचलें गेलें असें कोणीहि भाविक हिंदु सांगणारच. पुराणांतून सुद्धां असें सांगितलेलें आढळतें कीं, राम कृतयुगांत तर कृष्ण द्वापारयुगांत होऊन गेला. पण या गोष्टींनां मुळींच महत्त्व देतां येत नाहीं. कारण मूळ जुन्या रामायणांतच राम हा अवतारी पुरुष दिसत नाहीं हें आपण वर पाहिलेंच. तथापि पाणिनीनें, पतंजलीनें किंवा खिस्तपूर्व खोदीव लेखांतून रामाचा मुळींच उल्लेख केलेला नाहीं. उलट वासुदेव ( कृष्ण ), अर्जुन आणि युधिष्ठिर यांचे मात्र उल्लेख पाणिनीच्या व्याकरणांत सांपडतात. शिवाय असेंहि संभवनीय दिसतें कीं, कृष्णभक्तिपंथांतून अवतार-सिद्धांताची कल्पना निघून पुढील काळांत ती रामालाहि लावली गेली असावी. महाभारतांत सतीची चाल दिसते पण रामायणांत कोणी सती गेल्याचें आढळत नाहीं. तेव्हां या दोहोंमध्यें रामायणच जुनें असें याकोबी, श्लेगेल, वगैरे कांहीं थोडे पंडित मानतात. पण यासंबंधीं असें म्हणतां येईल कीं, जुन्या मूळच्या भारताच्या भागांतून जुन्या रामायणभागांतल्याप्रमाणेंच सतीचें अस्तित्व नाहीं. उलट रामायणाच्या प्रक्षिप्त भागांतून महा-भारतांतल्याप्रमाणेंच सतीसंबंधीं उल्लेख दृष्टीस पडतात. याकोबी हा रामायणच जुनें आहे असें ठाम समजतो व वाल्मीकीच्या काव्यकलेच्या अभावामुळें केवळ महा-भारताला महाकाव्याचें स्वरूप आलें असें तो गृहीत धरतो. पण विंटर्निट्झला हें ठाम विधान पुरेशा पुराव्याच्या अभावीं पसंत नाहीं; शिवाय त्याच्या मतें कांहीं गोष्टी याकोबीच्या विधानाला बाधक आहेत. पुष्कळशा बाबतींत महाभारताशीं ताडून पहातां रामायणांत महाकाव्य रचना जास्त प्रगत झालेले आढळते. उलट महाभारतांत गद्य सूत्रांतून शाहिरी वाङ्मयाचा अवशेष स्पष्ट नजरेस पडतो. उदा. ‘युधिष्ठिरउवाच’, ‘कुंतीउवाच’, असें सांगून निरनिराळ्या पात्रांचीं भाषणें पुढें दिलेलीं असतात. परंतु रामायणांत संभाषणें करणाऱ्या व्यक्तींची ओळख सर-सकट श्लोकांतूनच केलेली आढळेल. शिवाय महा-भारतांत स्वतंत्र गद्यगोष्टी व त्यांतील पद्यमय संभा-षणें अद्याप सांपडतात. पुरातन कथास्वरूप कायम राख-ण्यासाठीं पुराणांतील व्यक्तिपरिचयाचीं गद्यसूत्रें (मूळचीं) कायम ठेवीत असत. दरबारी महाकाव्यरचनेंतील विशिष्ट गुण रामायणांत किती तरी दृष्टोत्पत्तीस येतात हें मागें दाखविलें आहे. ह्यांपैकीं जुनें कोणतें व नवीन भरती झालेलें कोणतें हें सांगणें कठिण आहे. परंतु ह्या विशेष गुणामुळेंच रामायणाची महाभारताशीं बरींच भिन्नता व कालीदासाच्या काव्याशीं बरेंच साम्य दृष्टोत्पत्तीस येतें. व यामुळेंच रामायण फार प्राचीन-काळीं लिहिलें गेलें असावें असें गृहीत धरण्यास मन कचरतें असें विंटर्निट्झ म्हणतो. आणखी एका दुसऱ्या गोष्टीवरून महाभारत हें रामायणापेक्षां पुरातन असावें अशी कल्पना होते. महाभारतांत सर्वत्र—निदान पांडव-कथा व कुरुयुद्ध ज्या ठिकाणीं वर्णिलें आहे त्या गाभ्यांत तरी अथपासून इतिपर्यंत असंस्कृत चालीरीती आणि स्वाभाविक वीरश्री रामायणातल्यापेक्षां जास्त आढळून येते. महाभारतांतील युद्धप्रसंग रामायणांतल्या त्या प्रसंगाहून निराळ्याच स्वरूपाचे वाटतात. महा-भारतांतील युद्धाचे प्रसंग वाचतांना असें वाटतें कीं, स्वतः कवि हा कणखर लढवय्या जातीचा असून त्यानें स्वतः घनघोर संग्राम पाहिलेले असावेत. परंतु रामायणांतील लढायांचें वर्णन वाचतांना मात्र कवि हा निव्वळ युद्धाचीं वर्णनें देत असून त्याला हीं वर्णनें केवळ ऐकूनच माहीत असावींत असें वाटतें. महाभारतांतील अर्जुन व कर्ण, आणि भीम व दुर्योधन ह्यांच्या युद्धांचें वर्णन वाचतांना परस्परांत परस्परांविषयीं जो द्वेष किंवा भयंकर क्रोध दिसून येतो तितका राम आणि रावण किंवा लक्ष्मण आणि इंद्रजित ह्यांच्यांत मुळींच दिसून येत नाहीं. रामायणांतील सीतेला ज्या-वेळीं रावणानें चोरून नेलें किंवा तिचें हरण करून

तिचा छळ केला, किंवा ज्यावेळीं रामानें तिचा स्वीकार करण्याचें नाकारिलें तेव्हां तिनें जो शोक केला किंवा दोष दिला त्यांत एक प्रकारचा विनय आणि शांतपणा दिसून येतो, व तिच्या भाषणांत महाभारतांतील द्रौपदीप्रमाणें उच्छृंखळ मनोविकार यत्किंचितूहि दृष्टोत्पत्तीस येत नाहींत. कुंती आणि गांधारी ह्या वीरकुलांतील खऱ्याखुऱ्या वीरमाता वाटतात परंतु रामायणांतील कौसल्या आणि कैकेयी ह्या प्राचीन अभिजात नाट्यांतील ठराविक सांचांच्या राण्या वाटतात. ह्यावरून असें दिसतें कीं महाभारत हें पूर्वकालीन असंस्कृत आणि धाडशी लोकांच्या वेळचें असून रामायण हें जास्त सुधारलेल्या कालांतील असावें. या दोन महाकाव्यांतील ह्या बारीक भेदाचें स्पष्टीकरण करण्यासाठीं आपणांस असें गृहीत धरिलें पाहिजे कीं, महाभारतांत पश्चिम हिंदुस्थानांतील असंस्कृत राहणी दृष्टोत्पत्तीस येत असून रामायणांत पूर्व हिंदुस्थानांतील संस्कृति आणि सुधारणा दिसून येते. आणि हीं दोन्ही काव्यें निरनिराळ्या काळचीं नसून फक्त हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत रचिलीं गेलेलीं असावीं. परंतु अशा दृष्टीनें विचार केला तरी वाल्मीकीच्या काव्याचा परिणाम होऊनच महाभारताला महाकाव्याचें स्वरूप आलें असें याकोबीप्रमाणें म्हणतां येणार नाहीं. रामायण हें हिंदुस्थानच्या पूर्व भागाचें व महाभारत पश्चिम भागाचें होय ह्यांत मुळींच शंका नाहीं. महाभारतांत विशेषतः पश्चिम प्रांतांतले लोक दाखविले असून रामायणांतील मुख्य गोष्टी, ज्या भागांत वाल्मीकि रहात असे असें म्हणतात (किंवा बहुधां खरोखरीच रहात होता) त्या कोसल नांवाच्या देशांत घडलेल्या आहेत. पण या हिंदुस्थानच्या पूर्व भागांत बौद्धधर्माचा उगम झाला व मगध आणि त्याच्या जवळील कोसल देशांत त्याचा प्रथमतः प्रसार झाला. ह्यामुळेंच रामायण आणि बौद्धधर्म ह्यांचा परस्पर संबंध काय असावा ह्या प्रश्नाला एवढें महत्त्व आहे.

अगदीं जुन्या अशा बौद्ध वाङ्मयांत आपणांस "आख्यान" नांवाच्या काव्यप्रकाराचीं पुष्कळशीं उदाहरणें आढळतात. हीं आख्यानें म्हणजेच महाकाव्याची प्राथमिक अवस्था होय. ऱ्हीस डेव्हिड्स ह्यानें ह्या गोष्टीवरून असें अनुमान काढलें आहे कीं, हीं बौद्ध आख्यानें ज्यावेळीं प्रचलित झालीं त्यावेळीं रामायण महाकाव्य म्हणून अस्तित्वांतच नसावें. पण ह्यावर असा आक्षेप घेतां येईल कीं हें आख्यानकाव्य ज्यावेळीं अस्तित्वांत होतें त्यावेळींच तत्संभूत महाकाव्यकृतीहि अस्तित्वांत असेल. आज अर्वाचीन वाङ्मयांतहि महाकाव्य आणि आख्यानकाव्य हीं शेजारीं शेजारीं आढळून येतातच. तथापि, प्राचीन बौद्ध वाङ्मयांत बुद्ध-आख्यानांशिवाय आपणाला कांहींहि आढळत नाहीं हें लक्षांत घेण्याजोगें आहे. एका बौद्ध महाकाव्याचा उदय पुढें फार शतकांनीं झाला. यापेक्षांहि महत्त्वाची गोष्ट म्हणजे तिपिटकांत दशरथजातक आहे. भरत जेव्हां दशरथाच्या मृत्यूची बातमी रामाकडे घेऊन येतो तेव्हां राम सीतेला आणि लक्ष्मणाला पाण्यांत उतरून पित्यास तिलांजली द्यावयास सांगतो. या ठिकाणीं राम आणि भरत यांमध्यें संवाद होतो. भरत रामाला विचारतो कीं, बापाच्या मृत्यूबद्दल तुला दुःख झाल्याचें कसें दिसत नाहीं (रामायणांत राम पित्याबद्दल बराच शोक करतांना दिसतो; तेव्हां या प्रसंगाला जातकगाथांत बौद्ध संप्रदायी वळण दिलेलें उघड दिसतें); तेव्हां राम, मनुष्य मरणाधीन असल्यामुळें मृताबद्दल, दुःख करण्यांत अर्थ नाहीं अशा तऱ्हेची भरताची समजूत घालतो. दशरथजातकांत रामायणाचा एवढाच कथाभाग आहे. या जातकाच्या जुन्या बारा गाथांपैकीं फक्त एकच आपल्या रामायणांत दिसून येते. या गोष्टीवरून असें सिद्ध होतें कीं, एखाद्या जुन्या आख्यानाच्या आधारें जातक रचलें आहे, रामायणावरून त्या गाथा तयार झालेल्या नाहींत. याच जातकांत सामजातकहि आहे. रामायणांत दशरथ ज्या श्रवण ऋषिकुमाराची गोष्ट सांगतो (रामायण २. ६३ पासून पुढें) त्या गोष्टीचें प्राचीन स्वरूप बहुधां या सामजातकांत आहेसें वाटतें. इतर कांहीं थोड्या जातकांतून रामायणाची आठवण करून देणारे उतारे सांपडतीलहि. पण त्यांतील कोणताहि भाग रामायणाशीं तंतोतंत जुळत नाहीं. ज्यांत राक्षसांच्या व चित्रविचित्र प्राण्यांच्या भरपूर कथा आहेत त्या सबंध जातकवाङ्मयांत कोठेंहि राक्षस, रावण, किंवा हनुमान किंवा कपिसेना यांविषयीं एक शब्दहि सांपडूं नये हें मोठें आश्चर्य आहे. तेव्हां या सर्व गोष्टींवरून असें संभवनीय दिसतें कीं ज्या काळीं तिपिटकें अस्तित्वांत आलीं (खिस्तपूर्व तिसरें किंवा चवथें शतक) त्यावेळीं रामासंबंधीं आख्यानें प्रचारांत होतीं पण एखादें राममहाकाव्य असें मुळींच नव्हतें. दुसरा प्रकार असा आहे कीं, रामायणांत कोठेंहि बौद्धधर्मासंबंधीं उल्लेख आहे कीं काय? ह्या प्रश्नास साफ नकारार्थी उत्तर देण्यास कांहीं हरकत दिसत

नाहीं. कारण फक्त ज्या एकाच ठिकाणीं बुद्धाचा नामनिर्देश आला आहे.

" यथा हि चोरः स तथाहि बुद्धस्तथागतं
नास्तिक मत्र विद्धि ॥"

तो भाग निःसंशय प्रक्षिप्त आहे. तथापि कदाचित अगदीं दूरचा कां होईना बौद्ध धर्मासंबंधीं उल्लेख रामायणांत आला आहे. वेबरचा मात्र असा समज झाला होता कीं प्राचीन धार्मिक रामराजासंबंधीं जी बौद्ध कथा प्रचलित होती तीच या रामायणकाव्याला आधारभूत झाली. बौद्धधर्मातल्या शांत स्वभावाचा आदर्श म्हणून रामाची या पौराणिक (बौद्ध) कथेंत स्थिर स्वभावाच्या वर्णनद्वारें बुद्धधर्मीय स्तुति केली आहे. वास्तविक वेबरच्या म्हणण्याप्रमाणें ही गोष्ट दिसत नाहीं. परंतु रामाचा अत्यंत गरीब स्वभाव, त्याचा सौम्यपणा व शांत वृत्ति यांची उपपत्ति लावण्यासाठीं बौद्धमतप्रभावाचा आधार घेतां येईल. निदान अशी तरी कल्पना होते कीं, बौद्धधर्मीय नसूनहि बौद्धधर्माचें मोठें प्राबल्य असलेल्या प्रदेशांत राहिल्यामुळें कवीनें नकळत आपला काव्यनायक शाक्यमुनीप्रमाणें बनविला, कारण नायकाचें राक्षसांशीं लढतांना अलौकिक शौर्य दाखविलें आहे तरी तो योद्धा म्हणून आपणाला वाटत नसून एखादा मुनि भासतो. यावरून असें दिसतें कीं, ख्रिस्तपूर्व ४ थ्या आणि ३ ऱ्या शतकांतील बौध्दग्रंथकारांनां रामायणाची त्यावेळपावेतों माहिती नव्हती; पण रामायणकाव्याकरितां वाल्मीकीनें उपयोजिलेलीं आख्यानें माहीत होतीं. तसेंच रामायणावर बौध्दधर्माची अप्रत्यक्षपणें कां होईना पण छाप पडलेली दिसते म्हणून आपल्याला असा पक्ष घेतां येईल कीं, ज्यावेळीं रामायण अस्तित्वांत आलें त्यावेळीं पूर्व हिंदुस्थानांत बौध्दधर्माचा पूर्वींच प्रसार झाला होता व बौध्द स्मृती तयार होत होत्या. असें गृहीत धरलें म्हणजे पाली भाषेंतील बौध्दकाव्यापेक्षां रामायणांतील वृत्त ( श्लोक ) प्रगतीच्या पुढील पायरीवरचें जें आढळून येतें व महाभारतांतील मागाहून जोडलेल्या भागाच्या वृत्ताबरहुकूम जें दिसतें त्याचा उलगडा होतो..

बौद्धकालापूर्वी या महाकाव्याचा उदय झाला असणें संभवनीय आहे असें याकोबीला त्याच्या भाषेवरून वाटतें. या महाकाव्याची भाषा म्हणजे लौकिक संस्कृत भाषा होय.

ख्रिस्तपूर्व २०० च्या सुमारास अशोक राजानें आपल्या प्रजेला उद्देशून लिहिलेले अंकित लेख संस्कृतांत नसून पालीसारख्या अन्य देश्यभाषांतून आहेत. ख्रिस्तपूर्व पांचव्या व सहाव्या शतकांत बुध्दानें सुद्धां आपल्या धर्माचा प्रसार संस्कृत भाषेच्याद्वारें न करितां त्यावेळच्या लोकांत जी भाषा प्रचलित होती त्या भाषेंतून केला आहे. याकोबीच्या मतें लौकिक महाकाव्यें हीं जुन्या मृतभाषेंत न लिहितां प्रचलित लौकिक भाषेंत लिहिलीं पाहिजेत, तेव्हां ज्याअर्थीं अशोकाच्या वेळीं व बुध्दाच्या वेळीं सुध्दां संस्कृत ही लोकांची (प्रचलित) भाषा नव्हती, त्याअर्थीं हीं लौकिक काव्यें (मूळच्या स्वरूपांतली) ज्यावेळीं संस्कृत ही प्रचलित भाषा होती त्यावेळींच म्हणजे बुध्दकाळाच्या पूर्वीं रचिलेलीं असलीं पाहिजेत. उलटपक्षीं असेंहि म्हणतां येईल कीं लोकांत दुसऱ्या भाषा प्रचारांत असून संस्कृत भाषा ही हिंदुस्थानांत वाङ्मयीन भाषा म्हणून सदांसर्वदां जिवंत आहे. पुष्कळ ठिकाणीं ती बोलण्यांत वापरीत नसले तरी ती सर्वांनां समजते. ज्यावेळीं बौध्द व जैन धर्मी साधू लोकप्रचारांतील देश्यभाषांतून ग्रंथरचना व धर्मोपदेश करीत असत त्यावेळीं संस्कृत भाषेंतूनहि महाकाव्यें रचिलीं जात असून लोक तीं ऐकत असत, ह्या गोष्टीचें नवल वाटण्याचें कारण नाहीं. आंज मितीसि सुध्दां हिंदुस्थानांतील एकाच प्रांतांत दोहोंपेक्षां अधिक भाषा एकाच वेळीं प्रचारांत असल्याचें पुष्कळ ठिकाणीं आढळून येतें. उत्तरहिंदुस्थानांतील बहुतेक भागांत आज संस्कृतशिवाय अशी एक अर्वाचीन वाङ्मयीन भाषा असते कीं, जी व्यवहारांत सामान्यतः रूढ असलेल्या भाषेहून अगदीं भिन्न असते. म्हणून महाभारतांतील किंवा रामायणांतील कांहीं श्लोक आपणांस बौध्द किंवा जैन ग्रंथांतून, पालींत किंवा संस्कृतांत कोठें कोठें आढळल्यास असें सिध्द होत नाहीं कीं, ते संस्कृत श्लोक लौकिक भाषांतून भाषांतर करून घेतलेले आहेत. कांहीं विद्वानांच्या मताप्रमाणें सर्व महाकाव्यें प्रथम प्रचारांत असलेल्या भाषांत लिहिलीं गेलीं असून कालांतरानें तीं सर्व संस्कृतांत भाषांतरिलीं गेलीं; पण ह्या म्हणण्यांतहि फारसें तथ्य नाहीं.

मूळ ग्रंथ कोठचा, काय वगैरे सांगितल्याशिवाय असें संस्कृतांत भाषांतर झालें असेल ह्याचीच शंका आहे. इतर मुद्दे देऊन याकोबीनें हें अनुमान कसें त्याज्य आहे तें स्पष्ट करून दाखविलें आहे. लौकिक काव्य हें लोकांच्या भाषेमध्येंच गाइलें पाहिजे ह्या मताच्या विरुद्ध प्रतिपक्ष करतांना याकोबी ह्यानें, "श्रोत्यांची

भाषा पुष्कळशी निराळी असून सुद्धां इलिअड आणि ओडिसी हीं महाकाव्यें होमेरिक भाषेंत लिहिलीं आहेत" असा दाखला दिला आहे व "राष्ट्र" ह्या शब्दाचा अर्थ जो आपण करतों तशा अर्थाची कल्पना हिंदुस्थानांत कधींहि नव्हती असें ठांसून सांगितलें आहे. परंतु हीं त्याचीं विधानें त्याचेंच रामायणाविषयींचें-तें संस्कृत भाषा 'लौकिक भाषा' असतांना तयार झालें असलें पाहिजे व म्हणून बुद्धकालापूर्वीचें आहे-मत खोडून काढतात [ महाकाव्यांचा काल ठरविण्याच्या प्रश्नासंबंधीं विचार करतांना संस्कृत ही भाषा होती किंवा काय व व असल्यास ती किती प्रमाणांत, ह्या प्रश्नावर अलीकडे बराच उहापोह झाला आहे. ही गोष्ट खरी आहे कीं, ख्रिस्तपूर्व सुमारें ३०० वर्षांचे सर्व शिलालेख प्रचलित भाषेंत लिहिले गेले आहेत व जे कांहीं शिलालेख ख्रिस्ती शकांत लिहिले गेले ते संस्कृतांत लिहिले आहेत ( फ्रँक-पाली उंड संस्कृत, स्ट्रासबुर्ग १९०२; आणि ऱ्हीस डेव्हिड्स-बुद्धिस्ट इंडिया, पृ. १४८ पासून पुढें ). तथापि या ख्रिस्तपूर्व शिलालेखांवरून एवढेंच सिद्ध होतें कीं त्यावेळीं संस्कृत ही राजभाषा झाली नव्हती. ती वाङ्मयीन भाषा नव्हती असें कांहीं यावरून सिद्ध होत नाहीं. डॉ. भांडारकर यांनीं असें दाखवून दिलें आहे कीं, (जे. बी. आर. ए. एस्. १६. १६८ व ३२७ च्यापुढें), पाणिनि, कात्यायन व पंतजली या वैय्याकरणांच्या काळीं संस्कृत ही मृतभाषा नव्हती. आणखी पुराव्याकरितां रॅपसन व थॉमस ( जे. आर. ए. एस्. १९०४, पृ. ४३९, ४६०, ७४७)यांचे लेख पहा ऱ्हीस डेव्हिड्स ( कित्ता ४९७ ), ग्रीयरसन ( ४७१ ) व फ्लीट ( ४८१ ) ह्यांच्या आक्षेपावरून, संस्कृत ही कांहीं अंशीं बोलण्यांत प्रचलित असून कांहीं अंशीं समजतहि असे व तिचा उपयोग लेखनाची भाषा म्हणून केला जात असे ह्या विधानाच्या विरुद्ध असें कांहींच सिद्ध होत नाहीं. ए. बी. कीथ आणि ग्रीयरसन ( जे. आर. ए. एस्. ) ह्यांच्याशी तुलना करून पहा. अमेरिकन ओरिएंटल सोसायटीच्या ( पुस्तक २९, १९०४, ८९ ) जर्नलमध्यें टी. मिचेल्सन ह्यानें रामायणांतील भाषेंतल्या पुराणपद्धतीविषयीं लिहिलें आहे. सूत हे नाटकांत फक्त संस्कृत भाषेंतच बोलत ह्यावरून सूतकविता म्हणजे महाकाव्यें संस्कृतात रचिलीं गेलीं असेंच दिसतें.

ख्रिस्ती शकाच्या आरंभींच्या शतकांतून बौद्ध ग्रंथकार सुद्धां संस्कृतचा उपयोग करीत. बौद्ध ग्रंथांपैकीं पुष्कळ जुना असा, अश्वघोष ह्यानें लिहिलेला "बुद्धचरित्र" नांवाचा ग्रंथ संस्कृत काव्य असून तें वाल्मीकीच्या काव्यपद्धतीला अनुसरून लिहिलेलें आहे. उलटपक्षीं रामायणास मागाहून जोडलेल्या भागांत एक प्रसंग ( रावणाच्या अंतःपुरांतील वर्णन ) दिलेला आहे तो बुद्धचरित्रांतील तशाच एका प्रसंगाची प्रतिमा आहे. ज्या अर्थीं अश्वघोष व कानिष्क ( याच्या काळाविषयीं फार मतभेद आहे ) हे समकालीन होते त्या अर्थीं असें अनुमान काढावयास हरकत नाहीं कीं इ. सनाच्या२ऱ्या शतकाच्या आरंभीं रामायण हें उत्तम नमुनेदार काव्य म्हणून गणलें जात असे. परंतु ह्यावेळीं त्यांत प्रक्षिप्त भागाची भर पडण्याचें बंद झालें होतें असें मात्र नाहीं. दुसऱ्या शतकाच्या अखेरीस मात्र हें काव्य पूर्णतेस पोंचलें असलें पाहिजे, असें महाभारत व रामायण ह्यांच्या मागें दाखविलेल्या परस्परसंबंधांवरून दिसतें.

इसवी सन २ ऱ्या शतकाच्या अखेरीस ( कदाचित ) लिहिलेल्या कुमार लाटाच्या 'कल्पनामंडिटीकें' त रामायणाच्या जाहीर पुराणाचा उल्लेख केला आहे. इ. स. ३ ऱ्या शतकांतल्या बौद्धकथांच्या चिनी भाषांतरांतून रामकथा बौद्धधर्मीय वळण देऊन सांगितलेली आहे. चिनी बौद्धग्रंथांवरून आपणाला असें आढळून येतें कीं, बौद्ध तत्त्वज्ञानी वसुबंधु याच्या काळीं ( इसवी सन ४ थें शतक ) हिंदुस्थानांत बौद्ध लोकांत रामायण हें काव्य बरेंच सुप्रसिद्ध व लोकप्रिय होऊन राहिलें होतें. याच्या बऱ्याच पूर्वीं म्हणजे इ. स. पहिल्या शतकाच्या उत्तराधार्त विमलसूरि या जैन यतीनें रामाख्यान प्राकृतांत पौमचारया ( पद्मचरित ) या नांवाच्या ग्रंथांत समाविष्ट केलें पण त्या कथेला त्यानें अगदीं जैनधर्मीय वळण दिलेलें आहे. या पौमचरियाच्या अनुरोधानें पुढील काळांतील जैनांच्या रामकथा तयार झाल्या आहेत ( उदा. गुणाढ्याच्या उत्तर पुराणांतील ६८ वें पर्व व हेमचंद्राच्या षष्ठिशलाकापुरुष चरित्रांतील ७ वें पर्व ). रामायणाच्या बंगाली प्रतीवरहि जैन रामायणाचा परिणाम झालेला आढळतो ( सेन-बंगाली रामायणाज, पृ. २१ पासून पुढें ).असो, पुढें इ. स. ६०० च्या सुमारास कांबोजसारख्या अगदीं दूरच्या देशांतहि हिंदुधर्मांतील एक पवित्र ग्रंथ म्हणून रामायणाची कीर्ति झाली होती. कारण तेथील एका शिलालेखांत, कोणी सोमशर्मन् नांवाच्या व्यक्तीनें 'रामायण, पुराण, व संपूर्ण भारत' एका देवस्थानाला दिल्याचा उल्लेख सांपडतो (बार्थ इन्स्क. संस्क्रीज डु कांबोज, पृ.२९पासून पुढें).

ह्या जुन्या महाकाव्याच्या नमुन्यावर अश्वघोषानें आपलें काव्य लिहिलें त्याअर्थीं अश्वघोषाच्या पुष्कळ अगोदर हें काव्य रचिलें गेलें हें ध्यानांत घेतल्यावर मूळच्या जुन्या म्हणजे खऱ्या रामायणांत ग्रीक लोकांची ओळख किंवा त्यांचें वर्चस्व यांचा मागमूसहि कां सांपडत नाहीं याचा उलगडा होतो. ज्या दोन ठिकाणीं यवनांचा ( आयोनिअन ग्रीक ) नामनिर्देश आलेला आहे ते भाग नंतर जोडलेले म्हणून सिद्ध झालें आहे. तेव्हां वेबरच्या मतास अनुसरून होमरच्या काव्याचा वाल्मीकीच्या काव्यावर कांहीं परिणाम झाला असेल अशी कल्पनाहि करणें शक्य नाहीं. हेलेन आणि सीता ह्यांचें हरण किंवा लंका आणि ट्रॉय ह्यांवरील युद्धाची मोहीम ह्यांत काडीइतकेंहि साम्य नाहीं. तसेंच राम आणि युलिसस या दोघांच्या धनुर्भंगांतहि साम्य असेल तर तें फारच दूरचें आहे. रामायणावर वेबरची सविस्तर टीका 'हिंदुस्थान आणि जग' या विभागांत ( पृ. ३०९ पासून पुढें ) दिलीं आहे. वेबरला लासेन आणि तेलंग यांनीं दिलेलीं उत्तरेंहि त्याच स्थळीं सांपडतील.

महाकाव्य म्हणून रामायणाचा वेदांशीं संबंध येत नाहीं व वैदिक वाङ्मयाचा रामकथेशीं सुद्धां फारच थोडा संबंध आहे. उपनिषदांत सांगितलेला विदेहाधिपति जनक व सीतेचा पिता जनक या दोन्ही व्यक्ती एकच आहेत कीं काय हाहि एक प्रश्नच आहे. जुन्या उपनिषदांत रामाचें नांव कोठें आढळत नाहीं. रामपूर्वतापनीयउपनिषद् व रामोत्तरतापनीय उपनिषद् हीं नंतर रचिलीं गेलीं असून नुसती नांवाचींच उपनिषदें आहेत. ह्यांत मात्र राम म्हणजे विष्णूचा अवतार असें वर्णन आहे. वेबर ह्यानें रामायण व यजुर्वेद ह्यांचा कांहीं बारीक सारीक संबंध दाखविला आहे. काव्यनायिका सीता ही बहुधा फारच जुन्या रामकथेंतील दिसते. सीता ह्या नांवाचा अर्थ शेतांतील नांगरानें पडलेला तास किंवा खांच(नांगरट असेंहि म्हणतात)असा असून ती पृथ्वींतूनच उत्पन्न झाली व शेवटीं पृथ्वींतच अंतर्धान पावली. सीता पृथ्वीच्या पोटांत गडप झाल्याचा उल्लेख प्रक्षिप्त म्हणून ठरलेल्या सातव्या कांडांत केलेला आहे तरी ती गोष्ट फार जुनी असावी. सीता ही कृषिदेवता म्हणून ऋग्वेदांतहि दृष्टीस पडते ( ४. ५७, ६ ). गृह्यसूत्रांतील वाक्यांतून "कमलशीर्षा", "भास्वद्गात्री" व "कृष्णलोचना" वगैरे वगैरे विशेषणांनीं सीता अगदीं सजीव, सचेतन अशी रंगविली आहे. परंतु वेदांत क्षेत्रदेवता म्हणून जी सीता दाखविलेली आहे तिच्यांत व रामकथेंतील सीतेंत महदंतर आहे असें जें वेबर ह्यानें म्हटलें आहे तें बहुतेक बरोबर दिसतें. शिवाय वेदकालींहि रामसीतागीतें प्रचारांत होतीं असें म्हणण्यास कसलाहि आधार नाहीं. याकोबीच्या म्हणण्याप्रमाणें राम आणि रावण ह्यांचें युद्ध म्हणजे इंद्र आणि वृत्र ह्यांचेंच प्राचीन पुराणांत वर्णिलेलें युद्ध होय असें समजलें तरी वेद आणि महाकाव्य ह्यांतील अंतर जसेंच्या तसेंच अबाधित राहतें. रामायणाचा काल ठरविण्यासंबंधीं आपण आतांपर्यंत जे पुरावे पाहिले त्यांचा गोषवारा असा:-( १ ) कांड २ ते ६ एवढेंच खरें मूळचें रामायण व आज उपलब्ध असलेल्या रामायणांतील मागाहून जोडलेले भाग (विशेषत: कांड १ आणि ७ ) या दोहोंत बराच कालावधि आढळतो. (२) महाभारताला आजचें स्वरूप प्राप्त होण्यापूर्वीच प्रक्षिप्त भागांसुद्धां सर्व रामायण प्राचीन प्रसिद्ध ग्रंथ या लौकिकास पोंचलें होतें. (३) इ. स. दुसऱ्या शतकाच्या निदान शेवटीं शेवटीं तरी रामायण आजच्या स्वरूपाप्रत (विस्तार व मजकूर या बाबतींत) कदाचित पोंचलें असावें.(४) परंतु महाभारतांतील अतिशय प्राचीन असा मुख्य कथाभाग हा प्राचीन रामायणापेक्षांहि कदाचित जुना असावा. (५) वेदांत रामायण महाकाव्याचा मागमूसहि नाहीं परंतु रामकथेचे कांहीं बरेच अस्पष्ट असे अवशेष सांपडतात. (६) जुन्या बौद्ध तिपिटक ग्रंथांतून तेव्हां रामायण माहीत असल्याचे पुरावे कोठें आढळत नाहींत पण ज्या आख्यानांतून रामकथा आहे अशा कांहीं आख्यानांचे अवशेष मात्र सांपडतात. (७) रामायणांत बौद्ध धर्मासंबंधीं स्पष्ट उल्लेख कोठेंहि नाहीं परंतु रामाच्या स्वभावावर पूर्वीच्या बौद्ध मतांचा कांहीं संस्कार झालेला दिसतो. (८) रामायणावर ग्रीक लोकांचे संस्कार झाल्याचें दिसत नाहीं व मूळ रामायणावरूनहि त्याकाळीं ग्रीक लोकांसंबंधीं कांहीं माहिती असावा असेंहि दिसत नाहीं. (९) वाल्मीकीनें प्राचीन आख्यानांवरून इसवी सनापूर्वी तिसऱ्या शतकांत रामायण रचिलें असावें हें संभवनीय वाटतें.

[संदर्भग्रंथ–(१)मूळ रा मा य ण (अ)–जी. गोरेसिओ संपादित बंगाली प्रत, टुरिन १८४३–६७; कलकत्ता-१८५९–६०; ( आ ) मुंबईप्रत, तीन भाष्यांसहित तीन खंडांत, मुंबई १८९५; के. पी. परब संपादित मुंबई (१९०२); (इ)पश्चिम हिंदुस्थानी प्रत ( ही अद्याप छापलेली नाहीं).

(२) भाषांतरें व रूपांतरें, मराठी:—श्रीधरस्वामींचा रामविजय ग्रंथ फार लोकप्रिय व प्रख्यात आहे, एकनाथानें भावार्थरामायण लिहिलेलें आहे, मुक्तेश्वराचेंहि रामायण काव्य आहे, मोरोपंत कवीनेंहि रामायण रूपांतरिलें आहे. आज संस्कृत रामायणाचीं भाषांतरें आहेत त्यांपैकीं चिपळूणकर आणि मंडळीनें दोन भागांत प्रसिद्ध केलेलें व का. वा. लेले यांनींहि दोन भागांत १९०४ सालीं केलेलें हीं चांगलीं आहेत. निर्णयसागरनें छापलेलें वाल्मिकीरामकथामहोदय व रामायणकथा देणारे इतर ग्रंथहि आहेत. रामायणावर स्फुट गद्यपद्य मराठी लिखाण बरेंच आहे, त्याची सविस्तर यादी महाराष्ट्रीय वाङ्मयसूचींत (पृ. १४०–१४१, व ३४०–४१) दिलेली आहे.

इंग्रजी:—ग्रिफिथचें छंदोबद्ध. भाषांतर, बनारस, १८७४; एम्. एन्. दत्त—७ विभाग, गद्यमय, कलकत्ता १८९२–९४; रोमेशदत्त—रामायण, दि एपिक ऑफ राम रेंडर्ड इंटु इंग्लिश व्हर्स (संक्षिप्त भाषांतर) लंडन, १९००.

इटालियन:—जी. गोरेसिओकृत, ९ विभाग, पॅरिस १८४७–५८

फ्रेंच:—एच्. फौशकृत, ९ विभाग, पॅरिस १८९४–९८ (हें भाषांतर रद्दी आहे); ए. रौसेलकृत, ३ विभाग, पॅरिस १९०३–०९.

जर्मन:—एफ्. रुकर्टकृत अति संक्षिप्त व छंदोबद्ध, फ्रँकफोर्ट १८९८ (संपूर्ण भाषांतर उपलब्ध नाहीं; कांहीं कांहीं कांडांचीं भाषांतरें आहेत).

(३) रामायणांतील विषयांवर:—ए. वेबर—उबेर डास रामायण; एच्. याकोबी—डास रामायण; लुड्विग-उबेर डास रामायण, प्राग १८९४; ए. बामगार्टनेर—डास रामायण इत्यादि; फ्रीबुर्ग १८९४; जे. सी. ओमन—दि ग्रेट इंडियन एपिक्स; चिं. वि. वैद्य—दि रिडल ऑफ दि रामायण; हॉपकिन्स—दि ग्रेट एपिक ऑफ इंडिया; विंटरनित्झ—दि हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर (जर्मन).

पुराणें.—रामायणानंतर पुराणवाङ्मय नजरेंत येतें, ज्ञानकोशांत पुराणांची माहिती बरीच दिलेली असल्यानें येथें पुनरुक्ति करण्याचें कारण दिसत नाहीं. पुराणांच्या महत्त्वासंबंधीं सामान्य विवेचन सूतसंस्कृति (विभाग ३) या प्रकरणांत केलें आहे. अठरा पुराणें व उपपुराणें यांची यादी 'अठरा पुराणें' या लेखांत देऊन पुराणवाङ्मयाची सामान्य चर्चा 'पुराणें' या लेखांत केली आहे. त्या ठिकाणीं पुराण शब्दाची उपपत्ति व त्यांत येणाऱ्या वाङ्मयाचा समावेश, पुराणांतील वंशावळी व इतर माहिती यांची सत्यासत्यता, पुराणांची रचना व काल या विषयांवर विवेचन सांपडेल. याखेरीज प्रत्येक पुराणावर स्वतंत्र लेख ज्ञानकोशांत ठिकठिकाणीं घातलेले आहेत. उदा. अग्निपुराण, मार्कंडेय पुराण, गरुडपुराण इत्यादि. भारतीय संस्कृतीच्या घटनेंत या पुराणांनीं मोठा भाग घेतलेला आहे. विशेषत: हिंदुधर्माची सर्व आबालवृद्धांनां गोष्टिरूपानें शिकवण या पुराणांनीं दिलेली आहे व तिचा परिणाम अगदीं शाश्वत आहे. श्रुतिस्मृतीपेक्षां पुराणांचा लोकांच्या मनावर जास्त पगडा आहे. ऐहिक पापांपासून तात्काळ मुक्त होण्याकरितां त्यांनीं तीर्थक्षेत्रांची योजना करून ठेवलेली आहे आणि अनेक निरनिराळ्या तीर्थांचीं वर्णनें आणि त्यांचो महति सांगितली आहे. प्रपंचांत राहूनहि मोक्ष कसा मिळवितां येतो याचें सोपपत्तिक ज्ञान हीं पुराणें लोकांनां करून देत असल्यानें ती साहजिक अत्यंत लोकप्रिय झालीं व संन्यासप्रवण बौद्धधर्माचा त्यांनां वीट येऊं लागला. सामान्य लोकांत हिंदुधर्माबद्दल श्रद्धा व आवड उत्पन्न करण्याचें मोठें कार्य या पुराणवाङ्मयानें केलेलें आढळून येईल.

या पुराणांतून वर्णाश्रमधर्म, आचार व व्यवहार, धार्मिक संस्कार व विधी, प्रायश्चित्तें, दानें, देवप्रतिष्ठा, देवशिल्पकर्म वगैरे अनेक ज्ञान सांठविलेलें आहे. यावरून अग्निपुराणासारख्या पुराणग्रंथाला ज्ञानकोश कां म्हणतात हें कळून येईल. धर्माप्रमाणें काम, अर्थ व मोक्ष यांच्या सिद्धीकरितां यांत उपाय सांगितलेले आहेत.

सुवासिनी स्त्रियांचा पातिव्रत्यधर्म व विधवांचा संन्यासधर्म एवढेंच नव्हे तर विश्वयोषितांचा आचारधर्महि यांत प्रतिपादिला आहे, व हा विषय 'काम' या सदराखालीं येईल. अर्थ म्हणजे संपत्ति व ती कशी मिळवावी याचें कोठें विवेचन नसून या सदरांत कांहींसा राजधर्म घातलेला आढळतो कारण अर्थशास्त्र (पहा) हा विषयच शासनशास्त्रासारखा गणला गेला आहे. मोक्ष हा भक्ति व योग या दोन मार्गांनीं मिळत असतो, तेव्हां या दोन मार्गांचें स्पष्टीकरण व पुरस्कार पुराणांतून केला जाणें साहजिक आहे. वायु, ब्रह्म, विष्णु व लिंग या पुराणांतून ज्ञानयोगमार्ग समजावून दिला आहे तर मत्स्य पुराणांत कर्मयोग सांगितला आहे. भक्तिमार्गांत शिव व विष्णु यांची भक्ति विशेष दिसून येते. कांहीं पुराणें शिवभक्तिपर तर कांहीं विष्णुभक्तिपर आहेत. तथापि विष्णुभक्तीचा पुरस्कार करणारीं पुराणेंच जास्त आहेत

('भक्तिमार्ग' पहा), असें आढळून येईल. देवीभागवंत हें शक्ती उपासनापर आहे.

अ भि जा त वा ङ्म य.—संस्कृत पुराणवाङ्मयानंतर काव्यवाङ्मय आपल्या दृष्टिपथांत येतें.

काव्यः—भारतीय काव्याचें स्वतंत्र विवेचन 'काव्य' या लेखांत (वि. १०–११) केलेंच आहे. तेव्हां त्या विषयीं येथें निराळें लिहिण्याचें कारण नाहीं. काव्याचा उदय व उत्कर्ष इ. स. ९ व्या शतकापासून १२ व्या शतकापर्यंत झाला. संकृत काव्य पूर्ण नियमबद्ध आहे. पुराणांतील विषय घेऊन, प्रेम, शृंगार व नीति यांच्या मिश्रणांत तें रंगविलें जातें. रघुवंश, कुमारसंभव, भट्टीकाव्य, किरातार्जुनीय, शिशुपालवध व नैषधचरित हीं प्रमुख काव्यें आहेत. दंडीकृत काव्यादर्श, वामनकृत काव्यालंकारवृत्ति, रुद्रटाचा काव्यालंकार, धनंजयाचा दशरूप, मम्मटाचा काव्यप्रकाश व विश्वनाथाचें साहित्य दर्पण हे काव्यशास्त्रावरील महत्त्वाचे ग्रंथ होत. यानंतर कथा व नाटयवाङ्मय अवलोकूं.

कथाः—काव्यवाङ्मय निराळें असें फारसें नाहीं. काव्य व नाटय यांतून त्याचा अंतर्भाव झालेला दिसेल. तथापि 'कादंबरी' या लेखांत कांहीं स्वतंत्र भारतीय कथावाङ्मयाचा इतिहास दिला आहे. दशकुमारचरित कथासरित्सागर, पंचतंत्र हीं या वर्गांतील ठळक उदाहरणें आहेत.

नाटयः—भारतीय नाटयवाङ्मय अफाट आहे. त्याचा मोठा आढावा 'नाट्यशास्त्र' या लेखांत घेतला आहे. कालिदास, भवभूति' शूद्रक, हर्ष, भास, विशाखदत्त, भट्टनारायण, राजशेखर, क्षेमीश्वर, कृष्णमिश्र, इत्यादि कवींच्या नाटकांची चर्चा येथें केली आहे.

छंदसंगीतः—छंदःशास्त्र हें अतिशय प्राचीन असून त्याचा वेदकालीन व तदनंतरचा इतिहास विज्ञानेतिहास विभागांत एका स्वतंत्र प्रकरणांत दिला आहे. या छंदःशास्त्राबरोबरच संगीताचा कसकसा विकास होत गेला हें त्याच प्रकरणांत दाखविलें आहे. शिवाय राग व ताल, वाद्यें, वृंदसंगीत, संगीतशास्त्र या लेखांच्या द्वारें भारतीय संगीताचा उहापोह व मांडणी केली आहे. पिंगलकृत छंदःसूत्र हा ग्रंथ छंदःशास्त्रांत प्रमाणभूत मानला जातो.

व्याकरणः—भाषाशास्त्राचा अति महत्त्वाचा हा भाग असून त्याचें सविस्तर विवेचन पूर्वीच प्रस्तावनाखंडांत (विज्ञानेतिहास, प्र. ६) केलेलें आहे. यास्काच्या निरुक्तांत पाणिनीच्या अगोदरच्या व्याकरणाविषयीं महत्त्वाची माहिती आहे. पाणिनीचें व्याकरण तर बहुमोल आहे. याच्या साहाय्यानें नागोजीभट्टानें परिभाषेंदुशेखर ग्रंथ लिहिला. वार्तिक, कारिका, महाभाष्य कौमुदी वगैरे व्याकरणग्रंथ प्रसिद्ध आहेत.

ज्यो ति ष.—विज्ञानेतिहास, प्र. ८ पहा. सूर्यसिद्धांत, बृहत्संहिता, बृहज्जातक, करण, सिद्धांतशिरोमणी हे ग्रंथ महत्त्वाचे आहेत.

वैद्यकः—विज्ञानेतिहास प्र. ९ पहा चरकसंहिता, सुश्रुतसंहिता व अष्टांगहृदय हे प्राचीन वैद्यक ग्रंथ होत. विज्ञानेतिहासांत ज्योतिष व वैद्यक या अति उपयुक्त व महत्त्वाच्या शास्त्रांत भारतीयांनीं काय प्रगति केली होती व आपलें ज्ञानकसें लेखनिविष्ट केलें होतें याची साग्र माहिती दिलेली आहे.

कोशः—प्राचीन भारतीयांनीं संदर्भग्रंथ म्हणून कोशहि तयार केले होते. ते कोणकोणते होते याची नोंद 'कोश' या लेखांत केली आहे. अमरकोश, अनेकार्थसमुच्चय, अभिधानरत्नमाला, वैजंयती, विश्वप्रकाश, मंखकोश, अभिधानाचिंतामणी, अनेकार्थसंग्रह, देशीनाममाला या कोशांचीं नांवें प्रमुख म्हणून सांगतां येतील.

अर्थशास्त्रः—यावर एक मोठा लेख, कौटिलीयाचें अर्थशास्त्रपरीक्षण करून तत्संबद्ध विषयावरचे भारतीयांचे प्रयत्न दाखवून देणारा ज्ञानकोशाच्या साहाय्यां व सातव्या विभागांत आला आहे. त्यापेक्षां जास्त अर्थशास्त्रावर विवेचन नको आहे. अर्थशास्त्र याचा अर्थ जवळ जवळ राजशासनशास्त्र असाच प्राचीन भारतीय करतात.

कलाः—या शास्त्राचें व्यापकत्व प्राचीनांनां पटलें होतें व म्हणूनच चौसष्ट (अनेक या अर्थी) कला असें म्हणण्याची वहिवाट पडली. परंतु कलेवर स्वतंत्र ग्रंथ दिसत नाहींत. शुक्रनीति, वात्स्यायनाचें कामसूत्र, भागवत पुराण यांसारख्या ग्रंथांतून विविधकला विवेचिलेल्या आढळतात ('कला' पहा).

शिल्पः—शिल्पावर वेदकालीन ग्रंथ नाहींत. शुल्बसूत्रांतून याज्ञिक चितींची रचना वर्णिली आहे. दक्षिण हिंदुस्थानांत मूर्तिशिल्पाचा जो प्राचीन प्रकार आहे तो अगस्त्यापासूनचा आहे. अगस्तीय सकलाधिकार, मयमत वगैरे ग्रंथांबद्दलचा उल्लेख शिल्पकला व वास्तुसौंदर्यशास्त्र या लेखांतून सांपडेल. त्याच ठिकाणीं प्राचीन शिल्पपद्धतींचें विवेचन केलेलें आहे. कौटिलीय अर्थशास्त्र

व तशाच इतर ग्रंथांतून शिल्पाचें विवरण केलेलें आढळतें. वराहमिहिराच्या बृहत्संहितेंत गृहशिल्पावर एक अध्याय आहे. 'गणितसारसंग्रह' या नवव्या शतकांत महावीर नांवाच्या जैनानें लिहिलेल्या ग्रंथांत बांधकामाला लागणारें गणित दिलें आहे. अग्निपुराणादि बहुतेक पुराणांतून गृहशिल्पाचें विवेचन अढळतें.

धर्मशास्त्र:—या संज्ञेचा अर्थ पुष्कळवेळां कायदेवाङ्मय असा करण्यांत येत असला तरी धर्म या नांवांत कायद्याखेरीज धर्म, नीति व आचार यांसारखे जास्त विषय येतात. अगदीं प्राचीन धर्मग्रंथ म्हणजे धर्मसूत्रें होत. हीं सूत्रें वेदांगकल्पांतील असून ऐहिक आचार व शिक्षण यांवरचे व्यावहारिक ग्रंथ म्हणून ते रचले गेले होते, कायदेग्रंथ नव्हते. या सूत्रांचा समावेश वैदिक वाङ्मयांत होतो. या सूत्रांपैकीं सर्वांत उत्तम संरक्षिलें गेलिलें सूत्र म्हणजे 'आपस्तंबीय धर्मसूत्र' होय. हें कृष्ण यजुर्वेदशाखेचें असून खिस्तपूर्व ४ थ्या किंवा ५ व्या शतकाहून मागें त्याचा रचानाकाळ नेतां येत नाहीं. 'बौधायन-धर्मसूत्र' हाहि एका मोठ्या सूत्रग्रंथाचा भाग आहे; पण आपस्तंबीय धर्मसूत्राप्रमाणें मूळ स्वरूपांत तें उपलब्ध नाहीं, त्यांत मागाहून नवी नवी भर पडत गेली आहे. आज उपलब्ध असणाऱ्या सर्व धर्मसूत्रांत बहुधां सर्वांत प्राचीन असें धर्मसूत्र गौतमाचें धर्मशास्त्र असावें. सामवेदाच्या राणायणीय शाखेचें तें आहे. याचा कर्ता जो गौतम त्याला बौधायन आणि वसिष्ठ हे दोघेहि प्रमाण मानतात. 'वसिष्ठधर्मशास्त्र' त्रुटित व बरेंच प्रक्षिप्त दिसतें.

या वर उल्लेखिलेल्या सर्व ग्रंथांहून 'वैष्णवधर्मशास्त्र' फार मोठें आहे. विष्णु आणि भूदेवी यांच्या संवादरूपांत हा ग्रंथ असून, याचा कर्ता प्रसिद्ध नसून हा ग्रंथ अपौरुषेय आहे असें भाविकांकडून मानण्यांत येतें. आज आपल्याला उपलब्ध असणारा हा वैष्णवी ग्रंथ इ. स. ३ ऱ्या शतकापूर्वीचा नसावा. कृष्णयजुर्वेदाच्या काठक शाखेंतील एका प्राचीन धर्मसूत्राच्या आधारें हा लिहिलेला असून याच्यांतील कांहीं भाग तर फार प्राचीन आहेत.

हारीताचें धर्मसूत्र कृष्णयजुर्वेदाच्या मैत्रायणी शाखेचें आहे. आपस्तंब आणि बौधायन यांनीं त्याचा उपयोग केलेला आढळून येईल. याचे ३० अध्याय असून त्यांतील सूत्रें एक अनुष्टुप् तर दुसरा त्रिष्टुप् छंद अशीं एक सोडून एक रचिलीं आहेत. वैखानस धर्मसूत्रांतील तीन प्रश्नांत वर्णाश्रम आणि विशेषतः वानप्रस्थाश्रम यांचा उहापोह केलेला आढळतो. उशनस्-स्मृति हा सूत्रें आणि श्लोक यांत लिहिलेला ग्रंथ अद्याप प्रसिद्ध झालेला नाहीं. शंखलिखित-धर्मसूत्र वाजसनेयी शाखेचें असून पैठीनस स्मृति अथर्ववेदाची आहे.

या सूत्रांचा नक्की काल ठरविणें कठिण व अशक्य आहे. तथापि प्राचीन धर्मसूत्रें खिस्तपूर्व ८ तें ३ ऱ्या शतकांतील असावींत. त्यांचा प्रतिपादनविषय ऐहिक कायदेनियमांपेक्षां धार्मिक कर्तव्यें हा दिसतो. उदा. आपस्तंबीय धर्मसूत्राचा अजमासें १/७ भागच फक्त निव्वळ व्यवहारासंबंधीचा आहे. हीं धर्मसूत्रें पुढील छंदोबद्ध धर्मशास्त्रें किंवा स्मृती यांची पूर्वतयारी म्हणतां येईल. जुन्या वैदिक पंथांचें जेव्हां संप्रदायांत किंवा धंदेवाईक संस्थांत रूपांतर झालें तेव्हांच छंदोबद्ध धर्मशास्त्रें किंवा स्मृती निर्माण झाल्या, व त्या आपल्या लहानशा अनुयायी मंडळाकरितांच केवळ नसून सर्व आर्य जनतेला ऐहिक व पारलौकिक शिक्षण देणाऱ्या अशा बनल्या. व त्यामुळेंच त्या अधिक सविस्तर व व्यापक विषयांच्या दिसतात. पुढें पुढें जेव्हां प्रत्यक्ष कायदा लागूं लागला तेव्हां सूत्ररचना जाऊन श्लोकरचना अंमलांत आली. श्रुति, स्मृति, पुराणें, शिष्टाचार व देशजातिकुलधर्म यांतून आधारवचनें त्यांत उध्दृत करण्यांत येऊं लागलीं. हीं धर्मशास्त्रें मुख्यत्वें ब्राह्मणांकरितां तयार केलेलीं असलीं तरी त्यांचा आधार सर्व जातींकरितां घेतात. या सर्वांत मनुस्मृति (पहा) किंवा मानवधर्मशास्त्र हें अतिशय लोकप्रिय आहे. हें खिस्तपूर्व २ रें शतक ते इ. स. २ रें शतक या दरम्यान केव्हां तरी तयार झालें असावें. याच्या एकचतुर्थांशापेक्षां जास्त भाग कायद्यावरचा आहे. यावरच बऱ्याच टीका आहेत, पण त्या सर्व इ. स. ९ व्या शतकापुढील आहेत.

या मनुस्मृतीचा परिणाम ब्रह्मदेशांतील बौध्द कायदेग्रंथांवर झालेला दिसतो; कारण तेथील धर्मग्रंथांना सामान्यतः "मनु-धम्म-सत्तहम्" असें संबोधण्यांत येतें. यांपैकीं अति महत्वाचा ग्रंथ म्हणजे वगरु (१२८१-१३०६) राजाचा होय. सयाम आणि जावा या देशांतहि असाच परिणाम घडलेला आढळून येतो (विभाग पहिला पृ. २१५ पहा) नारदऋषीनें मनुस्मृतीच्या अगदीं जुन्या व अतिसविस्तर अशा प्रतीवरून तयार केलेल्या ग्रंथाचा नववा अध्याय (कायद्यासंबंधीचा) म्हणजेच 'नारदस्मृति' असें मानतात. ही मनुस्मृतीची

जुनी प्रत भृगूच्या प्रतीपेक्षां जुनी नसली पाहिजे. यांतील कायद्यासंबंधीं विवेचन मनुस्मृतीपेक्षां जास्त सरस आहे. मनुस्मृतींतील कायद्याच्या १८ शाखांवर यांत १३२ पोटशाखा आहेत; उदा. गुलामागिरीचे १५ प्रकार, पोटभरण्याचे २१ मार्ग, साक्षीदारांचे ११ वर्ग इत्यादि.

'बृहस्पतिस्मृति'–ही संपूर्ण उपलब्ध नाहीं. ही मनुस्मृतीशीं जास्त संबद्ध दिसते. कारण मनूचेच सिद्धांत घेऊन बृहस्पति त्यांत भर घालतो व भाष्यहि करतो. सतीचा पुरस्कार प्रथम बृहस्पतीनें केलेला आढळतो. परंतु नारद आणि बृहस्पति यांच्या स्मृती याज्ञवल्क्याच्या स्मृतीनंतरच्या आहेत. काल, महत्त्व, आणि प्रामाण्य या दृष्टीनीं विचार केल्यास याज्ञवल्क्यस्मृति (पहा) मनुस्मृतीच्या खालोखाल येते. हिचा काल इ. स ३ ऱ्या किंवा चवथ्या शतकाच्या मागें नेतां येत नाहीं. या स्मृतीवर मिताक्षरादि अनेक टीका आहेत.

यांखेरीज आणखी अर्वाचीन स्मृती लिहिल्या गेल्या आहेत, पण त्यांपेक्षां जास्त महत्त्वाचे ग्रंथ 'धर्मनिबंध' होत. या निबंधांना सुरुवात ११ व्या शतकाच्या सुमारास झाली, व ते आजतागाईत लिहिण्याचें काम चालू आहे. हे ग्रंथ राजाज्ञेवरून कोणी मंत्री, न्यायाधीश यासारखे अधिकारी पुरुष लिहीत. 'स्मृतिकल्पतरु' हा एक प्राचीन धर्मनिबंध आहे. राजा गोविंदचंद्र ( हा बहुधां कनोजचा गोविंदचंद्रच ११०९–११४३ असावा )याचा मंत्री लक्ष्मीधर यानें हा रचिला. इ. स. १२ व्या शतकांतील बंगालचा लक्ष्मणसेन याचा मुख्य न्यायाधीश जो हलायुध त्यानें 'ब्राह्मणसर्वस्व' रचिला. देवण्णाभट्टाची 'स्मृतिचंद्रिका' महत्त्वाची आहे ( काल बहुधां इ. स. १२०० ). हेमाद्रीनें इ. स. १२६०–१३०९ या अवधींत 'चतुर्वर्ग–चिंतामणी' नांवाचा ५ खंडांचा मोठा ग्रंथ लिहिला. व्रत, दान, तीर्थ, मोक्ष आणि परिशेष असे याचे पांच खंड आहेत. 'स्मृतिरत्नाकर' आणि 'कृत्यचिंतामणी' हे चंडेश्वराचे ग्रंथ आहेत. चंडेश्वर १४ व्या शतकांतील हरसिंहदेवाचा मंत्री होता.

कांहीं ग्रंथांत निव्वळ व्यवहार सांगितला आहे. उदाहरणार्थ जीमूतवाहनाचा 'धर्मरत्न'( १५ वें शतक). 'दायभाग' हा याचा एक भाग असून बंगालमध्यें याला कायद्याच्या दृष्टीनें प्रमाणभूत मानतात. १६ व्या शतकांत रघुनंदनानें 'स्मृतितत्त्व' लिहिलं. त्यांतील वारसा आणि दिव्यें यावरील प्रकरणें महत्त्वाचीं आहेत. सतराव्या शतकांत नीलकंठानें 'भगवंत–भास्कर' त्याचा चुलतभाऊ कमलाकर यानें 'निर्णयसिंधु' ( १६११ ) लिहिला. मित्रमिश्राचा 'वीरमित्रोदय' ग्रंथ ज्ञानकोशस्वरूपी आहे; त्यांत कायद्याखेरीज ज्योतिष, वैद्यक, भक्ति, मोक्ष इत्यादि विषय आहेत. १८ व्या शतकांत ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या सांगण्यावरून पंडितांनीं बरेच धर्मनिबंध रचिले असें आढळतें.

तत्त्वज्ञान.—भारतीय तत्त्वज्ञानाचा उगम वेदांत दिसून येतो. त्याचा विकास उपनिषदांत झालेला आहे. तत्त्वज्ञानाच्या परस्परभिन्न अशा नऊ शाखा आहेत. त्यांपैकीं कांहीं खिस्तपूर्व ६ व्या शतकांत पडल्या. षड्दर्शनें या सहा शाखा—न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा—असून या प्रत्येकीवर ज्ञानकोशांत स्वतंत्र विवेचन आहेच. ईश्वर–कृष्णाची 'सांख्यकारिका' हा सांख्यमताचा अगदीं प्राचीन ग्रंथ होय. याचें चिनी भाषेंत इ. स. ५५७–५८३ त भाषांतर झालेलें आहे. इ. स. ७०० च्या सुमारास गौडपादानें व इ. स. ११०० नंतर वाचस्पतीनें यावर टीका लिहिल्या. 'सांख्यसूत्रें' इ. स. १४०० च्या सुमाराचीं दिसतात. तथापि यांचा कर्ता कपिल म्हणून म्हटलें आहे. यावरील अनिरुद्धाची टीका पुढील शतकांतली आहे. याच उत्तरार्धांत विज्ञानानें 'सांख्यप्रवचनभाष्य' लिहिलें.

सांख्यमताला मानसिक तपाची जोड देणाऱ्या योगशास्त्रांतील पहिला ग्रंथ पतंजलीचें 'योगसूत्र' होय. हा ग्रंथ खिस्तपूर्व २ ऱ्या शतकांतला समजतात. यावर व्यासाचें भाष्य इ. स. ७०० च्या सुमारास झालें.

पूर्वमीमांसेचा जनक जो जैमिनि यानें प्रख्यात 'कर्ममीमांसासूत्र' ग्रंथ स्वमतप्रतिपादनार्थ लिहिला. यावर सर्वांत जुनी टीका शबरस्वामीची ('भाष्य') होय. या भाष्यावर कुमारिलानें इ. स. ७०० च्या सुमारास 'तंत्रवार्तिक' व श्लोकवार्तिक' या टीका लिहिल्या. माधवाचार्यानेंहि 'जैमिनीय न्यायमालाविस्तर' ही टीका लिहिली. उत्तरमीमांसा किंवा वेदांतसिद्धांताचा आधाररूप ग्रंथ म्हणजे बादरायणकृत 'ब्रह्मसूत्र'. शंकराचार्यानें यावर लिहिलेलें भाष्य प्रसिद्ध आहे. सदानंदयोगींद्रानें शांकरभाष्याच्या आधारें 'वेदांतसार' ग्रंथ लिहिला. तथापि शंकराचार्यानंतर ब्रह्मसूत्रांवर जीं भाष्यें झालीं त्यांत रामानुज भाष्य अत्यंत महत्त्वाचें आहे.

वैशेषिक दर्शनाचा कर्ता कणाद असून त्या दर्शनाचा रचनाकाल इ. स. २०० ते ४०० या दरम्यान असावा.

वात्स्यायनभाष्य, विश्वनाथवृत्ति, तर्कभाषा, तर्कसंग्रह, सप्तपदार्थी यांसारखे टीकारूप ग्रंथ या दर्शनावर आहेत.

न्यायदर्शनाचा आधारग्रंथ गौतमाचें 'न्यायसूत्र' होय. हा ग्रंथ ख्रिस्तपूर्व १५० च्या सुमारास रचिला गेला असावा. वैशेषिक आणि न्याय यांचा परस्परसंबंध असल्यामुळें या दोहोंचा एकत्र विचार करणारे जे ग्रंथ झाले त्यांत उदयनाचार्याचा 'कुसुमांजलि' ( इ. स. १२०० ) हा ग्रंथ येतो.

तसेंच सांख्य, योग व वेदांत या तिहींनां एकत्र करणारें कांहीं वाङ्मय आहे. त्यांतील पहिला ग्रंथ श्वेताश्वतरोपनिषद् होय. भगवद्गीता हाहि असाच ग्रंथ आहे.

यानंतर बौद्ध, जैन आणि चार्वाक दर्शनें येतात. या दर्शनांसंबंधीं विवेचन माधवाचार्याच्या 'सर्वदर्शनसंग्रह' या ग्रंथांतच प्रथम केलेलें आढळून येतें. सर्वदर्शनसंग्रहांत सोळा दर्शनांची उत्कृष्ट माहिती कर्त्यानें आपणाला करून दिलेली आहे.

सांप्रदायिक वाङ्मये.—या वाङ्मयांत बौद्ध व जैन वाङ्मयाचा मुख्यत्वेंकरून समावेश होतो. बौद्धांचे मुख्य धर्मग्रंथ जे त्रिपिटिक ( सूत्र-विनय-अभिधर्म ) त्यांतील विषयांचें सविस्तर विवेचन 'बुद्धोत्तर जग' या विभागांत ( प्रकरण ११ वें ) केलेंच आहे. पालींतील स्थविरवाङ्मय, हनियान आणि महायान वाङ्मय, व शाक्त बौद्ध वाङ्मय हीं तिपिटकानंतर येतील. बौद्ध वाङ्मय हे पाली, संस्कृत व मिश्रसंस्कृत या भाषांतून आढळतें. एकंदर बौद्ध ग्रंथांची यादी वरील प्रकरणाच्या शेवटीं जोडलेली आहे. तसेंच प्राचीन व श्वेतांबर-दिगंबरपंथीय जैनवाङ्मासंबंधीं माहिती 'बुद्धपूर्व जग' या विभागाच्या पुरवणींत व 'जैनसंप्रदाय' या लेखांत करून दिलेली आहे. हें वाङ्मय बहुंशीं ज्या प्राकृत भाषांतून आहे त्या भाषांवर ज्ञानकोशांत स्वतंत्र लेख घातले आहेत. शिवाय 'प्राकृत' लेख पहा. इतर सांप्रदायिक वाङ्मय त्या त्या संप्रदायनामाखालीं आढळेल;उदाहरणार्थ वैष्णवसंप्रदाय,शैवसंप्रदाय इत्यादि.

स्मार्त लोक वेदग्रथांनां मानून शिवाय ज्या विशिष्ट धर्मग्रंथांचा उपयोग करतात त्यांची यादी पुढें दिली आहे:—(१) बौधायन गृह्यसूत्र परिशिष्टें. (२) अथर्वांगिरस् उपनि.(३)गरुडपुराण. (४) कृष्णमिश्र (१०६५) कृत प्रबोधचंद्रोदय. (५) योगवासिष्ठ, रामायण. (६) हेमाद्रि-चतुर्वर्गचिंतामणि. (७)वीरेश्वर(१४ वें शतक)—वीरेश्वरपद्धति. (८) रघुनंदन (१५०० )—अष्टविंशतितत्त्व. (९) मुकुंदराज-विवेकसिंधु(मराठी). (१०) मधुसूदनसरस्वती-प्रस्थानभेद.(११) अलवंतर माधवपट्टर-ज्ञान-वसिष्ठम्( तामिळ). (१२) अनंतदेव-स्मृतिकौस्तुभ.

वैष्णव वाङ्मयांत ( १ ) भागवत वाङ्मय--भागवतपंथी, भक्तिपंथी, मध्वपंथी, राधापंथी, विष्णुस्वामीपंथी, निंबार्कपंथी, चैतन्यपंथी, वल्लभपंथी, राधावल्लभपंथी, हरिदासीपंथी, स्वामिनारायणपंथी, राधाकृष्णपंथी, ( २ ) पांचरात्र वाङ्मय--श्रीवैष्णवपंथी, मानभावपंथी, नरसिंहपंथी, रामपंथी, (३) सुधारक वाङ्मय-कबीरपंथी, शीखपंथी, दादूपंथी, लालदासीपंथी, सत्नामीपंथी, चरणदासीपंथी, असे वर्ग पडतील. शिवाय पुरुषसूक्त, महानारायणोपनिषद्, महाभारत, रामायण, भगवद्गीता हें सर्वसामान्य वाङ्मय आहेच.

शैववाङ्मयांत (१)संस्कृत व देशी भाषांतील पोथ्या-पुराणें. (२)पाशुपत शैवपंथी-लकुलीश पाशुपतें, कापालिकपंथी, गोरक्षनाथी, ( ३ ) आगमी शैवपंथी-शैव आगमें, शैवसिद्धांत, ( संस्कृत व तामिळ संप्रदायी ), कांश्मिरी शैवपंथी, वीरशैवपंथी, सित्तरपंथी, हे प्रकार आहेत.

ब्रह्मपंथांत मार्कंडेय व पद्मपुराणें येतील. शाक्तपंथीवाङ्मयांत ( १ ) महाभारत, हरिवंश, चंडीमाहात्म्य, चंडिकाशतक यासारखे प्राचीन ग्रंथभाग; ( २ ) तंत्रें; ( ३ ) शाक्तउपनिषदें; ( ४ ) बंगालमध्यें १५ व्या शतकानंतर लिहिलेलीं तंत्रें; (५) दाक्षिणाचारीवाङ्मय; ( ६ ) देशी भाषांतील शाक्तवाङ्मय.

सौरवाङ्मयांत पुढील ग्रंथ येतील:—गायत्रीमंत्र; वेदांतील सौरसूक्तें; महाभारतांतील अध्याय; रामायण ( आदित्य हृदय ); मार्कंडेयपुराण; भविष्यपुराण; बृहत्संहिता; सूर्यशतक (मयूराचें, वें शतक ); सौरसंहिता; सांब उपपुराण; सूर्यउपनिषद्; ब्रह्मपुराण इत्यादि.

गाणपत्यवाङ्मयांत वरदतापनीय उपनिषद्, गणपति-उपनिषद, अग्निपुराण, गरुडपुराण, गणेशउपपुराण, मुद्गलउपपुराण हीं येतात.

वरील त्रोटक विवेचनावरूनहि सांप्रदायिक वाङ्मय कितीं मोठें आहे याची कल्पना येईल. आतांपर्यंत प्राचीन भारतीय वाङ्मयाचें स्थूल अवलोकन केलें. यानंतर भारताच्या भौगोलिक परिस्थितीसंबंधानें विचार करूं.

## प्रकरण २ रें.

### भरतखंड वर्णन.

भरतखंडाचें वर्णन अनेक प्रकारें अभ्यास पाहिजे. ते प्रकार असेः—(१) ऐतिहासिक, (२) सांस्कृतिक, (३) नैसर्गिक, (४) ब्रिटिश शासनसत्तात्मक उर्फ सांप्रतचें, (५) भावी उर्फ राष्ट्रीय शासनसत्तात्मक.

ऐतिहासिक—हिंदुस्थान हें पृथ्वीवरील चीन, असुरिया, बाबिलोनिया, पॅलेस्टाईन, ईजिप्त, वगैरे पांच-सहा अत्यंत प्राचीन राष्ट्रांपैकीं एक आहे. त्याचा ऐतिहासिक काळ अद्याप निश्चित झाला नाहीं, कारण प्राचीन शहरें, इमारती, इतर वस्तू, खोदलेख वगैरेंचें संशोधन कांहीं झालें असलें तरी अद्याप बरेंच व्हावयास पाहिजे आहे. हिंदुस्थानच्या नैसर्गिक मर्यादा प्राचीन व अर्वाचीन सारख्याच आहेत. पण प्राचीन कालांतलें जें वाङ्मय आज उपलब्ध आहे त्याच्या कर्त्यांना हिंदुस्थानची भौगोलिक माहिती कितपत होती हें पहावयाचें आहे. ख्रिस्तपूर्व निदान चार हजार वर्षांपासून अलीकडल्या निरनिराळ्या काळांतील मर्यादा समजण्यास वाङ्मयात्मक पुरावा बराच आहे. या पुराव्यावरून हिंदुस्थानाचें प्राचीन भूवर्णन पुढील कालांत विभागलें आहे: वेदकाल, महाभारतकाल, शिकंदरकाल, अशोककाल, कनिष्ककाल, गुप्तकाल, हूणकाल, हर्षकाल, चोलकाल, चव्हाणकाल, यादवकाल, विद्यारण्यकाल.

वे द का ल.—वेदकालापूर्वीहि हिंदुस्थानांत आर्य व द्रविड या कांहींशा सुसंस्कृत लोकांची वस्ती होती. पण वेदकालापूर्वीचें सदरहू लोकांचें वाङ्मय आज उपलब्ध नाहीं. रामायणांत वर्णन केलेलें रामरावणयुद्ध कदाचित वेदकालापूर्वीचें असेल, व स्वतः रामानें अयोध्येपासून सीलोनपर्यंत सर्व हिंदुस्थानचा प्रवास केला असेल. तथापि ही वीरकथा कितीहि प्राचीन असली तरी आजच्या उपलब्ध रामायणग्रंथांतलें वर्णन हें वेदपूर्वकालीन भरतखंडाचें वर्णन म्हणून मान्य करतां येणार नाहीं. कारण महाभारताप्रमाणें रामायण हा ग्रंथ निरनिराळीं संस्करणें होऊन वेदग्रंथांनंतर बराच उत्तरकालीं पूर्ण तयार झालेला आहे. वेदग्रंथांचें—विशेषतः ऋग्वेदसंहितेचें—तसें नाहीं. त्यांतील बहुतेक सूक्तें दाशराज्ञ युद्धानंतर लवकरच तयार झालेलीं मूळ स्वरूपांतच आज उपलब्ध आहेत व ही गोष्ट सूक्तांच्या भाषेवरूनहि ग्राह्य करण्यासारखी आहे.

वेदकालीन हिंदुस्थानचें भौगोलिक ज्ञान देणारें स्वतंत्र वर्णन वेदग्रंथांत अर्थातच नाहीं, पण वर्णनानुधोरानें देश, गांवें, नद्या, पर्वत यांचे उल्लेख जे सांपडतात त्यांची यादी पुढें दिली आहे.

देशांचीं नांवें ऋग्वेदांत १४, अथर्ववेदांत १५ व संहितेतर वैदिक वाङ्मयांत २१ (विभाग ३, पान २०७ पहा) आणि जातीकुलवंश उर्फ राष्ट्रनामें सुमारें २०० (वि. ३, पा. ३६३) आलीं आहेत, पण त्या सगळ्यांचा मेळ भारतकालीन किंवा प्रचलित देशनामांशीं लावतां येत नाहीं. गंधारि किंवा गंधार किंवा गांधार हें देशमान ऋग्वेदापासून रूढ असून हाच हल्लींचा वायव्यसरहद्दप्रांत होय. सिंधु हें नांवहि ऋग्वेदादि सर्व प्राचीन ग्रंथांत आहे. पंचनद हें संहितेतर वैदिक वाङ्मयांत येतें. सिंधु व पंचनद मिळून हल्लींचे पंजाब व सिंध हे प्रांत दर्शविले जातात. याच मोठ्या प्रदेशाला नीच्य असें वैदिक नांव असून त्यांत बाल्हिक, दस्यु, तुर्वश, अनु, भरत, यदु, केकय, वगैरे वंश उर्फ राष्ट्रें रहात होतीं. त्याच्याच जरा दक्षिणेला सरस्वतीवत् नांवाचा ऋग्वेदोल्लिखित देश असून सरस्वती नदी या प्रदेशांतून वाहात असल्यामुळें यास हें नांव पडलेलें दिसतें. मरु देशनाम संहितेतर वाङ्मयांत आहे व हाच हल्लींचा राजपुताना व मारवाड मिळून होणारा वालुकायम प्रदेश होय. पंचनद देशाच्या पूर्वेकडे कुरुक्षेत्र व कोसल हे देश म्हणजे हल्लींचा दिल्लीप्रांत व संयुक्तप्रांत हे होत. हल्लींच्या संयुक्त प्रांतांतील गंगा—यमुना या नद्यांमधील व त्यांच्या दक्षिणेकडील मोठ्या प्रदेशाला 'मध्यदेश' हें नांव असून या देशाच्याच कांहीं भागांत 'मद्र' नांवाचें राष्ट्र होतें. कोसल देशाच्या पलीकडे पूर्वेस विदेह म्हणजे हल्लींचें भूतानसंस्थान, मगध म्हणजे हल्लींचा बिहार व ओरिसा व त्याच्या पलीकडे वंग म्हणजे हल्लींचा बंगाल याप्रमाणें देश होते. 'कीकट' हें देशमान ऋग्वेदांत आहे व मगध देशाच्याच कांहीं भागाला हें नांव होतें. दक्षिणेकडील देशांचीं फक्त दोनच नांवें वैदिक वाङ्मयांत आढळतात, तीं दक्षिणापथ व विदर्भ हीं होत, दक्षिणापथ यानें सर्व दक्षिण हिंदुस्थानचा निर्देश होत असे. 'दक्षिणापदा' असा शब्द ऋग्वेदांत आहे व त्याचा अर्थ हद्दपार केलेला मनुष्य (परावृज्) जिकडे हांकलून दिला जातो तो देश असा असावा. विदर्भ म्हणजे

हल्लींचा वऱ्हाड देश होय. ऐतरेय ब्राह्मणांत राज्याभिषेकप्रकरणांत जें आर्यावर्ताचें वर्णन आहे (८. १४) व तैत्तिरीय ब्राह्मणांत जी देवांची यज्ञभूमि म्हणून वर्णन केली आहे (१. ८) यावरून वेदकालीन आर्यांस फक्त विंध्योत्तर भरतखंड परिचित असून दक्षिणदेश त्यांस आपल्या संस्कृतीच्या बाहेरचा वाटत असे एवढेंच नव्हे तर कीकट देशांतील लोकांस इंद्राची पूजा न करणारे व नीच असे मानलें आहे व व्रात्याचीं फक्त वस्त्रें मगधांस देत यावरून बहारओरिसा हा भागहि तत्कालीन वैदिक संस्कृतीच्या बाहेरचा समजला जात असावा.

महाभारतकाल.–पुराणांतून वर्तमान वराहकल्पाच्या आरंभीं नारायणानें ब्रह्मरूप धारण करून सृष्टिरचना पूर्वकल्पाप्रमाणें केली, असे उल्लेख आढळतात. त्यांत पृथ्वीचे द्वीपसंज्ञक सात भाग केले.–

भुवि भागं ततः कृत्वा सप्तद्वीपान् यथा तथा।
भूराद्यांश्चतुरो लोकान् पूर्ववत् समकल्पयत्॥

(विष्णुपुराण, अंश १, अध्याय ४, श्लोक ४९.)

या द्वीपांचीं नांवें वगैरेहि सांगितलीं असतात.

जंबुप्लक्षाह्वयौ द्वीपो शाल्मलिश्चापरो द्विज।
कुशः क्रौंचस्तथा शाकः पुष्करश्चैव सप्तमः॥४॥
एते द्वीपाः समुद्रैस्तु सप्त सप्तभिरावृतः।
लवणेक्षु सुरासर्पिर्दधिदुग्धजलैः समं॥५॥

(विष्णु. अंश २, अ. २).

जंबु, प्लक्ष, शाल्मली, कुश, क्रौंच, शाक व पुष्कर हे सात द्वीप होत. ह्या प्रत्येकास एकेका समुद्राचें आवरण आहे. असे लवण, इक्षुरस, सुरा, सर्पि (तूप), दधि, दुग्ध व जल यांचे सात समुद्र आहेत.

जंबु–द्वीपाच्या मध्यभागीं मेरूपर्वत आहे व भोंवतीं क्षारसमुद्र आहे. हिमवत्, हेमकूट, निषध, नीलश्वेत, शृंगवान्, माल्यवान्, आणि गंधमादन हे दुसरे पर्वत आहेत. त्यांच्या योगानें जंबूद्वीपाचे नऊ विभाग झाले आहेत. त्या प्रत्येकास वर्ष म्हणतात. त्यांचीं नावें.— भारतवर्ष, किंपुरुषवर्ष, हरिवर्ष, इलावृत, रम्यक, हिरण्मय, उत्तरकुरु, भद्राश्व व केतुमाल. यांत भारतवर्ष हें सर्वांच्या दक्षिणेस आहे. त्याच्या उत्तरेस हिमालय पर्वत आहे. भारतवर्षास अजनाभ असेंहि नांव आहे.

भारतवर्षाचे नऊ विभाग आहेत. त्यांस खंडें म्हणतात. त्यांचीं नांवें.–इंद्रद्वीप, कसेरु ताम्रपर्ण, गभस्तिमान, नागद्वीप, सौम्य, गंधर्व, वारुण व कुमारिका.

अशा तऱ्हेचें पुराणांतील वर्णन बरेचसें कल्पनामिश्र असल्यामुळें प्रचलित वर्णनाशीं त्याची संगति लावणें फारसें उपयुक्त होत नाहीं, पण महाभारतरामायणांतील वर्णन अधिक सुसंगत दिसतें.

महाभारतांत ज्या राष्ट्रांचा उल्लेख केला आहे त्यांची लांबलचक यादी 'बुद्धोत्तर जग' या विभागांत (पृ. १९–२१) दिलेली आहे. त्याच्याच पुढें बृहत्संहितेंतील देशनामें दिलेलीं आहेत.

महाभारतकालाची पुढील भौगोलिक माहिती रा. चिं. वि. वैद्य यांच्या 'श्रीमन्महाभारत–उपसंहार' यांतून सारांशरूपानें घेतलेली आहे. महाभारतकाळीं सर्व देशांची संपूर्ण माहिती असली पाहिजे असें महाभारतावरून दिसतें. पाणिनीच्या काळीं दक्षिणेंतील देशांची माहिती विशेष नव्हती असा कित्येकांनीं तर्क केलेला आहे तो संभवनीय दिसतो. पाणिनीचा काळ ख्रिस्तपूर्व ८००–९०० मानण्यास हरकत नाहीं. या काळानंतर बुद्धाच्या काळापर्यंत दक्षिणेस थेट कन्याकुमारीपर्यंत भारतीय आर्यांचा प्रसार झाला होता. त्यांचीं राज्येंहि स्थापित झालीं होतीं. विशेषतः चंद्रवंशी आर्य भोज व यादव यांनीं दक्षिणेस वसती केली. त्यावेळीं दक्षिणेमध्यें वैदिक धर्म पूर्णपणें प्रस्थापित झाला होता. बौद्धधर्माच्या पूर्वीं वैदिक धर्माचा दक्षिणेंत पूर्ण अंमल बसला होता, ही गोष्ट निर्विवाद आहे. प्रो. ऱ्हीस डेव्हिड्स यानें आपलें असें मत लिहून ठेविलें आहे कीं, "दक्षिण देशांत सिलोनपर्यंत आर्यांचा प्रसार ख्रिस्तपूर्व २०० पर्यंत झाला नव्हता. कारण, निकाय ह्या बौद्ध ग्रंथांत विंध्याच्या दक्षिणेकडच्या कोणत्याहि लोकांचें नांव नाहीं. निकाय ग्रंथांत दक्षिणेकडील देशांचीं नांवें आलीं नाहींत यावरून दक्षिणेकडील देश माहीत नव्हते ही विचारसरणी मुळींच चुकीची आहे. उल्लेखाचा अभाव हें प्रमाण मोहक असलें तरी अगदीं लंगडें आहे. ज्या ग्रंथांत उल्लेख नाहीं त्या ग्रंथांत उल्लेख आलाच पाहिजे असा जोंपर्यंत निश्चय नाहीं तोंपर्यंत या प्रमाणास कांहींच किंमत नाहीं. बौद्धांचे निकाय किंवा विनय हे ग्रंथ धार्मिकग्रंथ आहेत. हे इतिहासाचे किंवा भूगोलाचे ग्रंथ नाहींत यामुळें या ग्रंथांत उल्लेख नसणें हा कोणताच सिद्धांत काढण्यास प्रमाणभूत आधार होऊं शकत नाहीं. पण अलेक्झांडरच्या पूर्वींपासून दक्षिणची माहिती भारतीय आर्यांस होती याचा अस्तिपक्षीं पुरावा सबळ असल्याचें आपण पूर्वीच पाहिलें आहे. कारण अलेक्झांडरबरोबर आलेले इरॅटॉस्थनीस वगैरे भूगोल–ग्रंथकार असें लिहून ठेवतात कीं, हिंदुस्थानची कच्ची

माहिती लांबीरुंदीच्या परिमाणासह अलेक्झांडरला पंजाबांत मिळाली होती. ती माहिती इरॅटॉस्थनीसनें आपल्या ग्रंथांत लिहून ठेविली आहे. कन्याकुमारीपासून सिंधुनदाच्या मुखापर्यंत लांबी त्यानें जी दिली आहे, ती हल्लींच्या प्रत्यक्ष स्थितीशीं बहुतेक तंतोतंत जुळते, हें पाहून जनरल कनिंगहॅम यास मोठें आश्चर्य वाटलें व सिकंदरकाळींहि भारतीय लोकांस आपल्या देशाच्या आकाराची व लांबीरुंदीची संपूर्ण माहिती होती असें त्यानें लिहून ठेविलें आहे. म्हणजे पाणिनीनंतर शिकंदराच्या पूर्वीं दक्षिणेंत आर्यांचा प्रसार होऊन पांड्य वगैरे आर्य राज्यें दक्षिणेंत स्थापित झालीं होतीं. महाभारताच्या भीष्मपर्वांतील भारतवर्षाच्या वर्णनांत हिंदुस्थानांतील कन्याकुमारीपर्यंतचीं सर्व राज्यें दिलेलीं असून हा भाग भूगोलवर्णनाचाच आहे. या महाभारतांतील (भीष्मपर्व आध्याय ९) भरतखंडाच्या वर्णनांत. संपूर्ण देशांतील नद्या, पर्वत व देश यांची यादी दिली आहे.

हिंदुस्थानांतील लोक अथवा राज्यें:—एकंदर १९६ देश भरतखंडांत, म्हणून सांगितले आहेत. दक्षिणहिंदुस्थानांत ५० देश सांगितले आहेत, व उत्तरेकडील म्लेच्छ याशिवाय २६ सांगितलेले आहेत.

पूर्वेकडील देश:—(१) वरील यादींत कुरुपांचालाची गणना पूर्वेकडील देशांत केली आहे. याची राजधानी हस्तिनापूर ही होती. ती गंगेच्या पश्चिम किनाऱ्यावर होती. यांच्या पूर्वेस पांचालांचें राज्य होतें. या देशाचा अर्धा भाग द्रोणानें जिंकून कौरवांच्या राज्यांत सामील केला, असें आदिपर्वांत वर्णन आहे. पांचालदेश गंगेच्या उत्तरेस व दक्षिणेस यमुनेपर्यंत होता. (२) यानंतर पूर्वेकडे दुसरें राज्य कोसल होतें. याचेंहि दोन भाग (उत्तरकोसल व दक्षिणकोसल असे) होते उत्तरकोसल गंगेच्या उत्तरेस व दक्षिणकोसल दक्षिणेस, विंध्य पर्वतापर्यंत होता. अयोध्या नष्ट झाल्यावर उत्तरकोसलाची राजधानी श्रावस्ती होती व दक्षिण कोसलाची राजधानी विंध्यपर्वतांत कुसावती ही होती. (३) याच्या पूर्वेस मिथिलराज्य होतें. त्याची पश्चिम सरहद्द सदानीरा ही नदी होती. मिथिल देश गंगेपर्यंत नव्हता. (४) गंगेच्या किनाऱ्यावर काशीचें राज्य होतें. (५) काशीच्या दक्षिणेस मगधांचें राज्य फारच सुपीक व माणसांनीं गजबजलेलें होतें. या मगधांची राजधानी पाटलीपुत्र नसून राजगृह अथवा गिरिव्रज ही होती. याच्या भोंवताली पांच टेंकड्या आहेत. त्यांजवरील जुन्यापुराण्या इमारतींवरून अजूनहि त्या ओळखूं येतात. येथें आर्य देशांची मर्यादा संपली. (६) याच्या पूर्वेस म्हणजे हल्लींच्या बंगालप्रांतांत मिश्र आर्य होते असें स्पष्ट दिसतें. हे देश अंग, वंग, कलिंग या नांवांनीं प्रसिद्ध आहेत. या देशांत गेल्यानें ब्राह्मण पतित होतो असें मानलें जात होतें. अंग, वंग, कलिंग या देशांचीं नावें चंपारण, मुर्शिदाबाद व कटक अशीं मानतां येतील. पौंड्र आणि सुह्म हे दोन्ही देश महाभारतांतील यादींत सांपडत नाहींत हें आश्चर्यकारक आहे. कदाचित् महाभारतकालीं हे देश भरतखंडाच्या बाहेरचे मानले जात असावे. याशिवाय पूर्वेकडचे देश आणखी सांगितलेले आहेत, ते ताम्रलिप्तक व ओड्र हे होत. ताम्रलिप्ति हें शहर कलकत्त्याजवळ होतें व तें तामलक या नांवानें ग्रीक लोकांस माहीत होतें. ओड्र म्हणजे हल्लींचें ओरिसा होय. उत्कल हेहि लोक ओरिसाजवळच वसत होते व हल्लीं पंचगौड ब्राह्मणांत उत्कल ब्राह्मणांची एक जात आहे, त्याजवरून उत्कल लोकांचें अस्तित्व बंगाल्याकडे अजूनहि दृष्टोत्पत्तीस येतें. प्राग्ज्योतिष यांचा राजा भगदत्त हा भारतीयुद्धांत होता. प्राग्ज्योतिष देश म्हणजे हल्लींचा आसाम होय.

दक्षिणेकडील देश:—(१) कुरुक्षेत्राहून दक्षिणेकडे चालले असतां आपणांस प्रथम शूरसेन देश लागतो. याची राजधानी मथुरा यमुनेच्या किनाऱ्यावर असलेली प्रसिद्ध आहे. (२) त्याच्या पश्चिमेस मत्स्यदेश हा होता. मत्स्यदेश जयपूरच्या किंवा अलवारच्या उत्तरेस होता. याची राजधानी कोठें होती हें सांगतां येत नाहीं. यावरून दशार्णदेश यकृल्लोमदेश हे येथेंच जवळ पास असावेत, असें दिसतें. (३) यानंतर कुंतीभोजांचा देश चर्मण्वती नदीकांठीं होता, तो हल्लींच्या ग्वाल्हेर प्रांतांतला होय. (४) नंतर निषधदेश हा आपल्या लक्षांत येतो. हा निषध देश म्हणजे नलराजाचा देश होय. हा देश हल्लीं नरवरप्रांत जो शिंदेसरकारच्या ताब्यांत आहे तो होय, असें मानलें जातें. निषधापासून दक्षिणेकडे जो रस्ता दाखविला आहे, तो अवंती व ऋक्षवान्पर्वत यांना ओलांडून विंध्यमहाशैल व पयोष्णी नदीपर्यंत असा दाखविला आहे. ऋक्षवान्पर्वत राजपुतान्यांत असून त्याच्या शाखा निषध देशाच्या दक्षिणेस बऱ्याच गेलेल्या आहेत. (५) त्या शाखा ओलांडल्यावर अवंतीदेश लागतो. अवंती देश म्हणजे हल्लींचा माळवा होय. अवंतीदेश ओलांडल्यानंतर विंध्यपर्वत येतो. व विंध्याच्या पलीकडे नर्मदानदी आहे. पण येथें नर्मदा

नदी हें नांव सांगितलें नसून पयोष्णी हें सांगितलें आहे व तें विदर्भाच्या जवळची म्हणून सांगितलें असावें. अवंती म्हणजे माळवा व उज्जयिनी, याबद्दल मुळींच शंका नाहीं (६) परंतु विदर्भ हा देश कोणता याजबद्दल शंका आहे किंवा मतभेद आहे. हल्लींचें वऱ्हाड म्हणजे विदर्भ होय, असें कित्येक मानतात. या विदर्भाची राजधानी भोजकट म्हणून मानलेली आहे व यांतील नदी पयोष्णी मानलेली आहे. भोजकट, पयोष्णी व विदर्भ हीं तिन्ही ठिकाणें विंध्याच्या पश्चिमेस व नर्मदेच्या उत्तरेस मानलीं जातात. (७) परंतु महाराष्ट्राचें नांव सबंध महाभारतांत कोठेंच नाहीं, यावरून महाराष्ट्राचा जन्म त्यावेळेस नव्हता असें मात्र मानतां येत नाहीं. परंतु महाराष्ट्रास अद्याप मोठें स्वरूप आलें नव्हतें; त्याचे लहान लहान भाग त्यावेळीं होते. या भागांचीं नावें महाभारतांत देशांच्या यादींत आलीं आहेत. तीं नावें म्हणजे रूपवाहित, अश्मक, पांडुराष्ट्र, गोपराष्ट्र व मल्लराष्ट्र हीं होत. वरील राष्ट्रांपैकीं पांडुराष्ट्र, गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र या तीन राष्ट्रांचें मिळून महाराष्ट्र पुढें बनलें यांत मुळींच शंका नाहीं. भोजांचे जसे महाभोज झाले तसे राष्ट्रांचे महाराष्ट्रिक झाले. अश्मक हा देश देवगिरीच्या भोंवतालच्या प्रदेशालाच धरून होता असें पुढील अनेक लेखांवरून सिद्ध झालें आहे. तात्पर्य, महाराष्ट्रांतील लोकांपैकीं अश्मक हे एक मुख्य होते. गोपराष्ट्र हा नाशिकच्या भोंवतालचा प्रदेश होय असें कित्येक ताम्रपटांतील लेखांवरून सिद्ध झालेलें आहे. पांडुराष्ट्रहि त्याच्याच जवळ असावें. मल्लराष्ट्रहि महाराष्ट्राचा एक भाग असावा. या चारपांच लोकांचें एक राष्ट्र बनून तें महाराष्ट्र या नांवानें प्रसिद्धीस आलें. (८) आतां गुजराथी लोक व गुजराथ देश यांचा विचार करूं. यांचें नांव या यादींत मुळींच नाहीं. यावरून गुर्जरलोक गुजराथेंत महाभरताकाळापर्यंत आले नव्हते असें मानावें लागतें. हल्लींच्या गुर्जर देशांतील जे देश या यादींत दिसतात, ते आनर्त व सुराष्ट्र एवढेच दिसतात. कारण सुराष्ट्र हें नांव महाभारतांत अनेक ठिकाणीं आलेलें आहे. वनपर्वांतील धौम्यानें सांगितलेल्या तीर्थयात्रेंत सुराष्ट्र देशांत समुद्रकिनाऱ्यावर प्रभासतीर्थ असल्याचा उल्लेख आहे [दाक्षिणात्य प्रतभारत वन. अध्याय ८७ श्लोक १८-२०]. यावरून सुराष्ट्र म्हणजे काठेवाडच होय. आनर्त देश कोणता याच्याविषयीं थोडासा मतभेद होईल. परंतु आनर्त म्हणजे हल्लींचा गुजराथ देश होय. कारण धौम्यऋषीनें सांगितलेल्या तीर्थांच्या वर्णनांत पश्चिमेकडील आनर्त देशांत पश्चिमवाहिनी नर्मदानदी सांगितलेली आहे [वनपर्व अ. ८९ श्लोक २]. तेव्हां हल्लींच्या गुजराथेंतील मुख्य देश आनर्त व सुराष्ट्र हे त्यावेळचे प्रसिद्ध देश होत. नर्मदेपर्यंत समुद्रकिनाऱ्यानें आर्यांची वस्ती झाली होती इतकेंच नव्हे तर महाभारतकालीं ती नर्मदेच्या दाक्षिणेस हल्लींच्या ठाणें प्रांतापर्यंत झाली होती. या बाजूचे दोन देश महाभारतांत देशांच्या यादींत परिगणित केले आहेत. परान्त व अपरान्त हे ते दोन देश होत. (९) अपरांताचें नांव महाभारताच्या अलीकडच्या अनेक प्रतींत येतें. अपरांत म्हणजे उत्तरकोंकण होय, असें या अनेक ग्रंथांवरून दिसतें, अपरांतांतील मुख्य शहर प्राचीनकाळीं शूर्पारक हें होतें, त्यास हल्लीं सोपारें असें म्हणतात. परशुरामाच्या वस्तीचें ठिकाण पूर्वेस महेंद्र पर्वतावर होतें व तेथें वैतरणी नदी व भूमीची वेदी होती असें वर्णन मात्र तीर्थयात्रेंत आलेलें आहे. परंतु परशुरामाला अन्य ठिकाण पश्चिम किनाऱ्यावर याच वेळेपूर्वीं दिलेलें होतें, असें या वरील वर्णनावरून दिसतें. अजूनहि या ठिकाणीं म्हणजे सोपाऱ्याच्या पूर्वेस डोंगरांमध्यें वैतरणी नदी व परशुरामाची वेदी (वज्रेश्वरीजवळ) लोक दाखवितात. तात्पर्य, शूर्पारकक्षेत्र फार जुनें असून तें अपरांतांत मुख्य होतें. अपरांत म्हणजे ठाणें जिल्हा यांत बिलकुल शंका नाहीं. आणि याच दृष्टीनें परांत म्हणजे हल्लींचा सुरत जिल्हा मानला पाहिजे. यावरून ठाणें जिल्ह्याच्या जंगलामध्यें त्यावेळीं हत्ती पुष्कळ असून त्यांची ख्याति लढाईच्या कामांत असे असें दिसतें. हल्लींहि कानडा जिल्ह्यांतील व म्हैसूरच्या जंगलांत हत्ती सांपडतात. परशुरामाचें क्षेत्र व परशुरामाकरितां समुद्रानें दिलेली जागा हल्लीं शूर्पारक ही न मानतां दाक्षिणेस कोंकणांत चिपळूण येथें व चिपळूणच्या भोंवतालीं मानितात. व परशुरामाचें मंदिरहि डोंगरांत चिपळूणाजवळ आहे. यामुळें दक्षिणकोंकण हें परशुरामाचें क्षेत्र मानलें जातें. पण महाभारतांत शूर्पारकभूमीला परशुरामक्षेत्र मानलें आहे. महाभारतकालीं कोंकणामध्यें आर्यांची वस्ती झालेली नव्हती. उत्तरेंकडून शूर्पारक देशांतून दाक्षिणेकडे कोंकणांत आर्यांची वस्ती पसरत गेली, त्यावेळीं आर्यांनीं परशुरामाचें स्थान शूर्पारक येथून हालवून दक्षिण कोंकणांत नेलें. यामुळें हल्लीं शूर्पारक येथें परशुरामाचें क्षेत्र राहिलें नाहीं. हल्लींचें सोपारा हें क्षेत्र असून तें वसईजवळ आहे. म्हणजे वसईकडून चिपळुणाकडे ख्रिस्तपूर्व ३०० नंतर ब्राह्मणांची वस्ती होत गेली. चमत्कार असा आहे कीं, यानंतर मुसुलमानांच्या व पोर्तुगीज लोकांच्या त्रासामुळें या देशांत ब्राह्मणवस्ती मुळींच राहिली नाहीं. ती पुढें मराठयांच्या अमलांत दक्षिण

कोंकणांतून पुन्हां उत्तर कोंकणांत आली. इतिहासांत हें परावर्तन लक्षांत ठेवण्यासारखें आहे. असो. दक्षिणेकडचे जे देश सांगितले आहेत, त्यांत कोंकण व मावळ हे देश आपल्या ओळखीचे आहेत. मालव म्हणजे घाटमाथ्यावरील मावळे हे लोक असावेत.

दक्षिणेंतील आणखी प्रसिद्ध लोक म्हटले म्हणजे चोल, द्रविड, पांड्य, केरल व माहिषक हे होत. यांचीं नांवें अनुक्रमानें पूर्व–पश्चिम–किनाऱ्यानें वर सांगितल्याप्रमाणें अजूनहि प्रसिद्ध आहेत. चोल म्हणजे मद्रास; चोलमंडल म्हणजे हल्लींचें कारोमांडेल; त्याच्या दक्षिणेस तंजावर हें द्रविड होय; पांड्य म्हणजे हल्लींचें तिनेवेल्ली; केरळ म्हणजे त्रावणकोर; माहिष म्हणजे म्हैसूर; इतकीं नांवें आपणांस निश्चयानें ठरवितां येतात. वनवासी हेंहि नांव अजून प्रसिद्ध आहे. हा देश म्हैसूराच्या उत्तरेस आहे. वनवासी ब्राह्मण अजूनहि माहीत आहेत.

पश्चिमेकडीलदेश.—पश्चिमेकडील देशांच्या यादींत सिंधु, सौवीर, कच्छ हे देश आहेत. सिंधु म्हणजे हल्लींचा सिंधप्रांत, सौवीर ह्याच्या व काठेवाडाच्या दरम्यानचा प्रांत हा समुद्रकिनाऱ्याला लागून आहे. यांतच हल्लींचें कराची बंदर असावें. कच्छ देश हल्लींचा कच्छ प्रसिद्धच आहे. यास अनूप असेंहि नांव दिलेलें आहे. सिंधु, सौवीर आणि कच्छ यांच्या उत्तरेस गांधार हा देश सिंधूच्या पलीकडे असलेला प्रसिद्ध आहे. याची हल्लींची राजधानी पेशावर ही होय. पेशावर अथवा पुरुषपुर याचें नांव महाभारतांत आलेलें नाहीं. परंतु गांधाराचें नांव वारंवार येतें. गांधाराच्या उत्तरेस व सिंधूच्या पलीकडील काश्मीर देश हाहि प्रसिद्ध आहे.

आतां, यांच्या अलीकडे कुरुक्षेत्रांच्या पश्चिमेस मरु म्हणजे मारवाड व पंजाब हे दोन हल्लींचे मोठमोठाले प्रांत आहेत. मद्रदेशामध्यें शाकल नगरास जाऊन नकुलानें आपल्या मामास म्हणजे शल्यास वश करून घेतलें. महाभारतकाळीं शाकलनगर हें प्रसिद्ध होतें असें यावरून दिसतें. या नगरीचा उल्लेख ग्रीक लोकांनींहि केला आहे. या नगरांत पुढें मोठमोठाल्या यवन राजांनीं व कनिष्कादिकांनीं राज्य केल्याचा इतिहासांत दाखला आहे. पंजाबांतील शाल्व व केकय हे आणखी लोक महाभारतांत वारंवार उल्लेखित होतात व तक्षशिला नगरीचाहि उल्लेख वारंवार येतो. परंतु यांचें नांव भीष्मपर्वातील देशांच्या यादींत दिसत नाहीं. बाल्हिकांचें नांव महाभारतांत वारंवार येतें. तसेंच क्षुद्रकांचें नांवहि वारंवार येतें.

उत्तरेकडीलदेश.—कुविंद, आनर्त, तालकूट इत्यादि देशांचें वर्णन झाल्यावर शाकलद्वीप वगैरे सप्तद्वीपांतील राजांशीं सहदेवाचें युद्ध झाल्याचें वर्णन आहे. भगदत्त प्राग्ज्योतिष येथील राजा त्यानें जिंकिला असें येथें वर्णन आहे. अंतर्गिरि व बहिर्गिरि वगैरे लोकांस त्यानें जिंकिलें. नंतर त्रिगर्त, दार्व, कोंकण, कांबोज, दरद वगैरे लोकांस त्यानें जिंकिलें. कांबोज व दरद हे अफगाणिस्तानांत व पश्चिम तिबेटांत राहणारे लोक आहेत.

बुद्धकालीं हिंदुस्थानचे राजकीय विभाग कोणते होते त्याची माहिती 'बुद्धोत्तर जग' विभागांत (पृ.१७६ – १७८) सांपडेल तिची येथें पुनरुक्ति करीत नाहीं.

शिकंदरकालीन हिंदुस्थान (ख्रिस्तपूर्व ३ रें –४थें शतक)- अलेक्झांडरच्या कालापूर्वी नर्मदानदीच्या वरील बाजूस हिमालयापर्यंतच्या प्रदेशांत अनेक स्वतंत्र राज्यें होतीं. कांहीं राजसत्ताक तर कांहीं जातिसत्ताक किंवा प्रजासत्ताक होतीं. सम्राट् किंवा या सर्व राज्यांनां कक्षेंत ठेवणारा असा सार्वभौम राजा कोणीहि नव्हता. ख्रिस्तपूर्व ४ थ्या किंवा ५ व्या शतकापूर्वी गांधार देशापासून अवन्तीपर्यंत पुढील १६ राष्ट्रें होतीं असें बौद्ध ग्रंथांवरून दिसतें; अंग, मगध, काशी, कोसल, वज्जी, मल्ल, चेदी, वंश, कुरु, पंचाल, मच्छ, शूरसेन, असक्क, अवन्ती, गंधार आणि कंबोज. या राष्ट्रांचें वर्णन 'बुद्धोत्तर जग' विभागांत (पृ. १७६-१७७) केलेंच आहे. अयोध्या, वाराणशी, चंपा, कांपिल्ल, कौशांबी, मथुरा, मिथिला, राजगृह, रोरुक, सागल, साकेत, उज्जयिनी, व वैशाली हीं त्यावेळीं भरभराटीचीं शहरें होतीं. अलेक्झांडरच्या काळीं सिंधुनदी ही इराणी साम्राज्य आणि हिंदुस्थान यांच्यामधील सरहद्द होती. व पंजाब आणि सिंध या भागांत बरींच देशी संस्थानें नांदत होतीं. तेव्हां पंजाबांतील नद्यांचे प्रवाहमार्ग आतांपेक्षां अगदीं निराळे असे असून आज जे तिकडील प्रदेश नापीक दिसतात ते पूर्वी सुपीक होते. अलेक्झांडरनें बहुतेक ओहिंद (अटकपासून १६ मैलांवर) याठिकाणीं सिंधु ओलांडिली. आजच्या रावळपिंडीच्या वायव्येस असणारें ताक्षशिला शहर अलेक्झांडर येण्यापूर्वीच पडलें. हायडॅस्पीझ (झेलम) आणि अकेसिनीझ (चंद्रभागा–चिनाब) यांमधील प्रदेशावरचा राजा पोरस याचा अलेक्झांडरनें पराभव केला व त्याला आपला मांडलिक केला. यानंतर अलेक्झांडर परत फिरला.

जातांना त्यानें सिंधूच्या पूर्व आणि पश्चिम शाखांचें संशोधन केलें. या अलेक्झांडरच्या प्रवासाचें वर्णन ज्ञा. को. वि. ४ पृ. ६४–७३ या स्थळीं सांपडेल.

अलेक्झांडरला इकडील हिंदूंनीं हिंदुस्थानविषयीं चांगली माहिती दिल्याचें ग्रीक ग्रंथांवरून दिसून येतें. हिंदुस्थानचा आकार विषमसमचतुर्भुज (ऱ्हॉम्बॉईड) सारखा असून त्याच्या पश्चिमेस सिंधुनद, उत्तरेस हिमालय आणि पूर्वेस आणि दक्षिणेस समुद्र आहे; पश्चिमबाजू सर्वांत लहान असल्याचें लिहिलें आहे. सिंधूपासून पालिब्रोथापर्यंतचें अंतर १० हजार स्टेडिआ (११४९ इंग्लिश मैल) तेथून गंगामुखापर्यंत ६ हजार स्टेडिआ (६८९ मैल); गंगामुखापासून कन्याकुमारीपर्यंत १६ हजार स्टेडिआ (१८३८ मैल) आणि तेथून सिंधुमुखापर्यंत १९००० स्टेडिआ (२१८३ मैल). याप्रमाणें ग्रीकांनीं अंतरें सांगितलीं आहेत. हीं साधारणतः हल्लींच्या अंतरांशीं जुळतात. तथापि अलेक्झांडर व त्यावेळचे ग्रीक हे पंजाब व सिंध या दोनच प्रांतांत फिरले असल्यानें त्यांनां इतर हिंदुस्थानची विशेष माहिती नव्हती. ग्रीक ग्रंथकारांनीं अलेक्झांडरच्या स्वारीचें वर्णन करतांना जीं राज्यें, शहरें, किंवा इतर भूप्रदेश उल्लेखिले आहेत त्यांचा थोडक्यांत गोषवारा देऊन पुढील काळाच्या भूगोलाकडे वळूं.

अलेक्झांडरनंतरचे सर्व ग्रीक ग्रंथकार देखील सिंधु ही हिंदुस्थानची पश्चिम सीमा मानीत नाहींत. पूर्व एरिआना म्हणजे सांप्रतच्या अफगाणिस्तानचा बराच भाग ते हिंदुस्थानांतच धरतात. शिकंदरच्या इतिहासकारांनीं काबूल हें नांव मुळींच उल्लेखलें नाहीं. काबूल हें नांव प्रथम टॉलेमीच्या भूगोलांत आढळतें. अलेक्झांडरनें हिंदुकुश पर्वताच्या पायथ्याजवळ अलेक्झांड्रिया शहर बसविलें. तें कोठें होतें याविषयीं अद्याप वाद आहे.

शिकंदराच्या इतिहासकारांनीं गांधार देशाचा उल्लेख केला नाहीं. पुष्कलावती ही शिकंदराच्या वेळींहि गांधार देशाची राजधानी होती. शिकंदरनें ही पुष्कलावती घेतल्यावर दुसरीं लहान लहान शहरें घेऊन तो एमबोलिम (ओहिंद) येथें आला. त्यानें ॲर्नास नामक किल्ला घेतला असें वर्णन आहे पण तो कोणता याविषयीं वाद आहे.

तक्षशिलेचें वैभव आणि विस्तार याविषयीं सर्व ग्रीक ग्रंथकारांनीं पुष्कळ वर्णन केलें आहे. एरियन लिहितो कीं, तें सिंधु व बेहात यांच्यामध्यें सर्वांहून मोठें, जास्त वस्तीचें, आणि संपत्तिमान शहर होतें. स्ट्राबो म्हणतो कीं, याच्या आसपासचा प्रदेश दाट वस्तीचा व सुपीक होता. सांप्रतचें शेडा शहर झेलमच्या डाव्या किनाऱ्यावर आहे. शिकंदराच्या वेळच्या सोफिटी राजाचा प्रांत कोणता याविषयीं सर्व ग्रीक ग्रंथकारांचें ऐकमत्य नाहीं स्ट्राबोनें 'त्याच्या प्रांतांत मिठाचा डोंगर आहे, त्यांतून सर्व हिंदुस्थानास पुरण्याजोगें मीठ निघतें' असें लिहिलें आहे. ह्या राजाच्या पुष्कळ कथा ग्रीकांनीं लिहिल्या आहेत. तो फार सुंदर व सहा फूट उंच होता. त्याची प्रजाहि फार सुंदर होती. कुरूप संततीस तो मारून टाकीत असे. त्यानें शिकंदरास एक कुत्रा दिला होता; तो सिंह, हत्ती यांबरोबर लढत असे. जलालपूर येथें शिकंदराची छावणी होती; व पोरसची छावणी त्याच्या समोर नदीच्या दुसऱ्या तीरीं निकोई येथें म्हणजे सांप्रतच्या मांग गांवाजवळ होती. छावणीपासून नदीच्या कडेनें सुमारें १० मैल जाऊन शिकंदर झेलम नदी उतरला, व पोरसच्या छावणीच्या बाजूस आला. तेथें लढाई झाली. शिकंदरचा घोडा बुकेफाला हा लढाईंत मोठी जखम होऊन मेला. त्याच्या स्मरणार्थ त्याच्या नांवानें बुकेफाला हें शहर बसविलें. तेंच सांप्रतचें जलालपूर असावें. शिकंदराचें संगल, बौद्धांचें सागल, व भारतांतील शाकल हीं एकच होत.

शिकंदरानें संगलवर हल्ला केला तेव्हांचें जें वर्णन आहे तें हल्लीं संगल म्हणून जी टेंकडी रावी नदीच्या पश्चिमेस आहे, तिच्याशीं बरोबर जुळतें. रावीच्या उजव्या तीरावर एकीकडच्या एका उंचवटयावर कमालिया हें जुनें शहर आहे. शिकंदरानें माली लोकांचें शहर अगदीं प्रथम घेतलें तें हें असावें. या कोट कमालियाच्या आग्नेयपूर्व दिशेस १६ मैलांवर हरपा आहे. अलेक्झांडर कोट कमालिया घेत असतां त्यानें आपला एक सरदार पुढें पाठविला. त्यानें एक शहर घेतलें तें हें असावें. अजुधान किंवा पाकपतन सतलजच्या जुन्या पात्रावर व हल्लींच्या प्रवाहापासून १० मैलांवर, डेलापुरच्या नैर्ऋत्येस २८ मैलांवर आहे. ग्रीक ग्रंथकारांनीं उल्लेखिलेले सुराकसी किंवा सुद्रीक लोक येथलेच असावे. यांचा देश व सुद्रीक लोकांचा देश, व बियास नदीच्या पूर्व तीरावरील उंच प्रदेश येथपर्यंत शिकंदराच्या स्वारीची हद्द प्लीनीनें सांगितली आहे. शिकंदरानें माली लोकांच्या स्वारींत जें तिसरें शहर घेतलें व जें ब्राह्मणांचें होतें व ज्यांतील लोकांनीं फार पराक्रम केला असें लिहिलें आहे तें अतारी असावें. शिकंदर या शहराभोंवतीं दोहोंतून फिरला असें वर्णन आहे, आणि

अतारीच्या किल्ल्याभोंवतीं खंदक आहे त्यावरून हें संभवतें. शिकंदरनें घेतलेलें माली लोकांचें मुख्य शहर, मुलतान हें फार बळकट होतें, व तें त्या प्रांताची राजधानी होतें हें सर्व वर्णन मुलतानशीं जुळतें.

शिकंदराच्या स्वारींत वरील सिंधमधील पुढील शहरें आलीं आहेत:—शिकंदराच्या वेळीं सिंदोमान आणि हरमाटेलिया नांवाचें एक ब्राह्मणांचें शहर अशीं दोनच डायोडोरसनें लिहिलीं आहेत. सिंदोमान किंवा सेहवान-अश्विकानस या शहरापासून शिकंदर यानें आपलें सैन्य सांबूस याजवर नेलें. तो हिंदुस्थानांतील डोंगरी लोकांचा मुख्य आहे असें शिकंदरास वाटलें होतें. त्यानें आपली राजधानी सिंदोमान ही सोडिली ती त्याच्या नातलगांनीं शिकंदरास दिली असें एरियन म्हणतो. ब्राह्मण किंवा ब्राह्मणाबाद—हेंच मोडकें शहर शिकंदराच्या इतिहासकारांनीं वर्णिलेलें ब्राह्मणांचें शहर असावें. म्यूझिकानसचें राज्य सर्व हिंदुस्थानांत संपत्तिमान् असें शिकंदरानें जें ऐकलें त्याच्याशीं हें जुळतें. शिकंदराच्या वेळीं लारमध्यें प्रसिद्ध असें पटल हें एकच शहर होतें. शिकंदराच्या इतिहासकारांनीं लिहिलेलें पट्टल—जें सिंधुमुखाच्या शिरोभागीं होतें असें म्हणतात—तें हैदराबाद होय. शिकंदर आणि निआर्कस ह्यांच्या वेळीं जींतून गलबतें चालत असत व ते जींतून गेले अशी जी सिंधूची अगदीं पश्चिमेची शाखा ती सांप्रतचें घाराचें उत्तरचें पाल होय. शिकंदरच्या वेळच्या दिलेल्या अंतरावरून कराची हें आराबीच्या पूर्वहद्दीवर असावें. शिकंदर ओरिटी प्रांतांत आल्यावर आंतल्या भागीं गेला, तेव्हां त्यास रामबाकिया शहर लागलें तेंच याचें मुख्य शहर होतें. तेथें वसाहत केली असतां तें संपत्तिमान् होईल असें वाटल्यावरून त्यानें ती कामगिरी एका सरदारास सांगितली. रामबाग हें एरियनचें रामबाकिया होय; इतक्या अंतरावरच्या हिंदुस्थानच्या एका टोंकास रामबाग हें नांव शिकंदरच्या वेळीं आढळतें, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

अशोककाल (ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांतील हिंदुस्थान).—अलेक्झांडरनंतर हिंदुस्थानावर ग्रीकांचा फारसा ताबा राहिला नाहीं. ग्रीकांपासून हिंदुस्थान सोडविण्यांत प्रमुख राजा चंद्रगुप्त होता (ख्रि.पू.३०५). हाच मगधाच्या मौर्य घराण्याचा संस्थापक होय. त्याला हिंदुस्थानाचा पहिला सम्राट् असें अन्वर्थक नांव देतां येईल. कारण त्याचें साम्राज्य बंगालच्या उपसागरापासून अरबी समुद्रापर्यंत पसरलें होतें. हिंदुकुश पर्वत प्रथमच हिंदु साम्राज्याचा सरहद्द बनून राहिला. त्याची राजधानी पाटलीपुत्र (पाटणा) होती. याचा नातू अशोक (ख्रिस्तपूर्व २७२—२३२) यानें तर अफगाणिस्तान, बलुचिस्तान व सिंध हीं आपल्या साम्राज्यांत समाविष्ट केलीं. उत्तरेस श्रीनगर व नेपाळांतील ललित—पाटण मिळून हिमालयाच्या पायथ्यापर्यंत सरहद्द भिडविली. वंग (वंगाल), कलिंग व दख्खन हे त्याच्या सत्तेखालीं होते. आंध्र (कृष्णा आणि गोदावरी यांच्यामधील राज्य) हेंहि त्याचें मांडलिक असावें. चोल, पांड्य, सतीय व चेर हीं तामिळ राज्यें मात्र स्वतंत्र होतीं. अशोकाच्या साम्राज्याचा नकाशा ज्ञा. को. विभाग ४ (पृ. १११ समोर) यांत दिला आहे.

कनिष्ककाल (इ. स. २ रें शतक)—अशोकाच्या मृत्यूनंतर त्याचें साम्राज्य घटत जाऊन पुढें फक्त मगधावरच त्याच्या वंशजांचा ताबा चालू राहिला. आंध्र व कलिंग या राष्ट्रांनीं प्रथम स्वातंत्र्य मिळविलें. पुढें आंध्रराज्य फार वाढत गेलें. हिंदुस्थानचा द्वीपकल्पीय भाग अरबी समुद्रापासून बंगालच्या उपसागरापर्यंत बहुतेक त्याच्या सत्तेखालीं आला. याची राजधानी पैठण येथें असे. इ. स. २ ऱ्या शतकांत शकांनीं सिंध आणि सुराष्ट्र (काठेवाड) व्यापिलें. या परकीयांशिवाय यवन आणि पल्लव यांनीं पश्चिम हिंदुस्थान पादाक्रांत केला. पण आंध्रांनीं यांनां जिंकलें. मौर्य साम्राज्यानंतर वायव्यभागास कनिष्काचें साम्राज्य प्रबल झालें. पुरुषपूर (अर्वाचीन पेशावर) ही त्याची राजधानी होती. याखेरीज बाकीचा हिंदुस्थानचा भाग लहान लहान हिंदु राजांच्या अंमलाखालीं होता. कनिष्ककालीन हिंदुस्थानचा नकाशा 'बुद्धोत्तर जग' विभागांत (पृ. १११) दिला आहे.

गुप्तकाल (इ.स.४थें शतक)—तिसऱ्या शतकाच्या प्रारंभीं आंध्र आणि कुशान घराणीं नष्ट होऊन त्यांच्या मुलखांत लहान लहान राज्यें निर्माण झालीं. इ. स. ४ थ्या शतकाच्या मध्यांत गुप्त आणि पश्चिम सत्रप (शक) हीं दोन प्रबल साम्राज्यें उदयास आलेलीं दिसतात. रुद्रदाम सत्रप व समुद्रगुप्त हे समकालीन होते. समुद्रगुप्तानें आपलें राज्य हुगळीपासून यमुना आणि चंबळा नदीपर्यंत व हिमालयापासून नर्मदेपर्यंत वाढविलें. गंगेच्या बेचक्यांतील समतट, कामरूप (आसाम), आणि इतर लहान राज्यें त्याचीं मांडलिक होतीं. उत्तर राजपुतान्यांतील घराणीं त्याच्याच संरक्षणाखालीं आलीं होतीं.

दक्षिण हिंदुस्थानावरहि. समुद्रगुप्तानें मोहीम नेली होती पण त्याला अखंड विजय मिळवितां आला नाहीं. त्यानें पहिला हल्ला दक्षिण कोसल व महानदीचें खोरें यांवर केल्यानंतर ओरिसाचा जंगली मुलुख पादाक्रांत केला, गंजकमधील कोट्टर व महेंद्रगिरी हे डोंगरी किल्ले घेतले. पिष्टापुर (आधुनिक पिठापुरम्) जिंकलें, व वेंगीचा राजा, कांचीचा पल्लव राजा आणि पालखाचा (आजचें पालघाटचेरी)चा राजा यांना नामोहरम केलें. नंतर दख्खनच्या पश्चिम भागाकडून येऊन त्यानें देवराष्ट्र (हा मराठ्यांचा मुलुख असावा) व एरंडपल्ल (खानदेश) जिंकून घेतलें. अलहाबादच्या किल्ल्यांतील शिलालेखांत वरील समुद्रगुप्तासंबंधीं माहिती मिळते. पश्चिम सत्रपाचा मुलुख चवथ्या शतकाच्या अखेरीस गुप्तसाम्राज्यांत समाविष्ट झालेला दिसतो. गुप्तकालीन हिंदुस्थानचा नकाशा व त्यांतील समुद्रगुप्ताच्या स्वारीचा मार्ग 'बुद्धोत्तर जग' विभागांत (पृ. ३२१ च्या समोर) दिला आहे.

हूण काल ( सहावें शतक ).-पांचव्या शतकाच्या अखेरीस गुप्त साम्राज्याचा श्वेत हूणांनीं नाश केला. या श्वेतहूणांनीं काबूलचें कुशान राज्य मोडून ते हिंदुस्थानांत शिरले. ६ व्या शतकाच्या आरंभीं यांचा अधिपति मिहिरकुल होता. त्याची राजधानी पंजाबांत सकल येथें होती. माळव्यावरहि एक हूण राजा असून वल्लभी आणि इतर राष्ट्रें मिहिरकुलाच्या अंकित होतीं. इ.स. ५२८ च्या सुमारास मगधराजाच्या नेतृत्वाखालील हिंदु राजमंडळानें मिहिरकुलाचा पराभव केला. पुढें लवकरच श्वेतहूणांचें आशियांतील साम्राज्य मोडलें.

हर्ष काल ( सातवें शतक ).-श्वेतहूणांचा पाडाव झाल्यानंतर ७ व्या शतकाच्या आरंभापर्यंत हिंदुस्थानांत कोणतेंच वरिष्ठ साम्राज्य नव्हतें. पुढें ठाणेश्वराचा राजा हर्षवर्धन (६०६-६४८) यानें ३९ वर्षें झुंजून उत्तर हिंदुस्थानांत आपलें साम्राज्य प्रस्थापित केलें. इकडे दक्षिण हिंदुस्थानांत चालुक्यराजा २ रा पुलिकेशी हा प्रमुख होता. हर्ष राजा वारला तेव्हां त्याचा अधिकार, हिमालयापासून नर्मदेपर्यंतचा गंगेचा मैदानी मुलुख यावर चालत असून, कामरूप (आसाम), वल्लभी (काठेवाडांत) आणि नेपाळ यांचे राजे त्याचे मांडलिक होते. [हर्षाच्या राज्याचा नकाशा 'बुद्धपूर्वजग' विभागांत (पृ. ३२१ ) दिला आहे तो पहावा]. यावेळीं कलिंगांतील लोकवस्ती नाहींशी होत जाऊन त्याचा बहुतेक भाग जंगलमय बनला होता. सिंध हें स्वतंत्र राज्य असून त्यावर शूद्र राजे राज्य करीत होते. पंजाब व मुलतान हीं एकाच अंमलाखालीं होतीं.

सहाव्या शतकाच्या मध्यांत चालुक्य घराणें उदयास आलें. यानें दख्खनमधील द्रविड लोकांवर आपला अंमल गाजविण्यास सुरवात केली. याची राजधानी वातापी ( बदामी ) येथें होती. कृष्णा आणि गोदावरी यांमधील पल्लवांनां चालुक्यांनीं हुसकावून लाविलें पण कांचीच्या पल्लवांनीं स्वातंत्र्याकरितां मोठ्या चिकाटीनें बरेच दिवस युद्ध चालविलें होतें.

हर्षानंतर पुन्हां लहान लहान संस्थानांचा हिंदुस्थानांत बुजबुजाट झाला. तथापि ११ व्या शतकापर्यंत परकीय स्वाऱ्यांपासून (सिंधवरील अरबांची छोटी मोहीम सोडल्यावर) हिंदुस्थान अगदीं मुक्त होतें.

हर्षकालीन भारताची स्थिति व त्याचें भौगोलिक वर्णन ह्युएनत्संग या चिनी प्रवाशाच्या वृत्तावरून चांगलें कळतें. त्या प्रवाशानें उल्लेखिलेलीं सर्वच स्थळें निश्चित करतां येतात असें नाहीं पण सेंट-मार्टिन, कनिंगहॅम, व्हि. स्मिथ, ज्यूलिएन, वाटर्स वगैरे संशोधकांनीं ह्युएनत्संगाचा प्रवासमार्ग नक्की करून त्यावरचीं स्थळेंहि नोंदलेलीं आहेत [ह्युएनत्संगाचा प्रवासमार्ग 'हर्षकालीन हिंदुस्थान' या नकाशांत (ज्ञा. को. वि. ४. पृ. ३२१) दिला आहे].

ह्युएनत्संगनें हिंदुस्थानचे पांच भाग केले आहेत. त्यानें सांगितलेला या देशाचा एकंदर घेर वास्तविक घेराच्या दुप्पट आहे. ह्युएननें हिंदुस्थानांतील एकंदर ८० राज्यें उल्लेखिलीं आहेत. ह्युएनच्या वर्णनावरून उत्तर, पश्चिम, मध्य, पूर्व व दक्षिणाहिंदुस्थान यांची भौगोलिक स्थिति कशी होती याची थोडक्यांत माहिती पुढें देत आहों.

उत्तर हिंदुस्थानः-ह्युएनत्संगनें उत्तर हिंदुस्थान हा जो भाग केला आहे त्यांत स्थूलमानानें सांप्रतचा पंजाबप्रांत व सुमारें तितक्याच विस्ताराचा त्याच्या पश्चिमचा काबूलचा भाग येतो. या भागांत त्यानें कौफू ( आफगाणिस्तान ),काश्मीर आणि टाकी ( पंजाब ) असे मुख्य तीन विभाग सांगितले आहेत. पहिल्यांत १० व दुसऱ्यांत ६ आणि तिसऱ्यांत ३ राज्यें होतीं.

कौफू किंवा अफगाणिस्तानः-कापिसेन, कोकिनी ( काबूल ), अरकोशिआ ( गिजनी ), लंघन, नरहार (जलालाबाद), गांधार, उद्यान (स्वात), बोलर (बाल्टी) फालाना (बानू), आणि आपोशिन (अफगाणिस्तान).

काश्मीरः–काश्मीर, उरस, टाक्सिला (तक्षशिला), सिंघपुर (केटास), पुनच, राजपूर (राजुरी).

टाकी किंवा पंजाब–टाकि (उत्तर पंजाब), बुकेफाला (दिलावर), शारकोट.

पश्चिम हिंदुस्थान.—सिंध, गुर्जर आणि वल्लभी हीं तीन राज्यें त्यावेळीं पश्चिम हिंदुस्थानांत होतीं. पहिल्यांत सिंधु नदीचा सर्व प्रदेश (पंजाबपासून समुद्रापर्यंत) कच्छ बेटासुद्धां येतो. दुसऱ्यांत काठेवाड द्वापकल्प व त्याच्या शेजारचा कांहीं प्रदेश व तिसऱ्यांत पश्चिम राजपुताना आणि त्या जवळचें मोठें वाळवंट येतें. सिंधचे ४ विभाग होते. वरील सिंध भागाचा घेर ११६७ मैल असून त्यांत कच्छगंडावा प्रांताचा सर्व पश्चिमभाग असण्याचा संभव आहे.

मध्यसिंधचा घेर ४१७ मैल सांगितला आहे. यांत ब्राह्मण किंवा ब्राह्मणाबाद येतें. ह्युएनत्संग पिटाशिला किंवा पटल हें एकच शहर सांगतो. तो राजधानी कोटेश्वर एथून उत्तरेस ११७ मैलांवर पिटाशिलो येथें गेला. सिंधचा चवथा प्रांत कच्छ हा सिंधची राजधानी आलर हिच्या नैर्ऋत्येस २६७ मैलांवर असून याचें नांव ओरीन पोल्लो असें दिलें आहे. या प्रांताचा घेर ८३३ मैल. राजधानी कटसिशिफाटी. ह्याचा घेर ५मैल होता याशिवाय कोटेश्वर (देवस्थान) व ओरिटी हीं दोन स्थळें सांगितलीं आहेत.

गुर्जर.–पश्चिम हिंदुस्थानांतील दुसरें राज्य किचेलो किंवा गुर्जर हें ह्युएनत्संगनें वल्लभीच्या उत्तरेस ३०० मैल व उज्जनीच्या वायव्येस ४६७ मैल सांगितलें आहे. याची राजधानी पिचोमिलो म्हणजे बालमीर ही होती. या राज्याचा घेर ८३३ मैल होता. त्यांत हल्लींचीं विकानेर जेसलमीर, जोधपूर हीं संस्थानें येत असावीं. गुजराथ हें नांव ह्युएनत्संगच्या वेळीं पश्चिम राजपुतान्यास होतें. भडोच हें त्यावेळीं वल्लभीच्या ताब्यांत असावेंसें दिसतें. सुराष्ट्र राज्य वल्लभीच्या ताब्यांत होतें. त्याची राजधानी वल्लभीच्या पश्चिमेस ८३ मैल होती.

मध्य हिंदुस्थान.—मध्यहिंदुस्थान या भागांत सतलज पासून गंगेच्या मुखापर्यंत व हिमालयापासून नर्मदा व महानदी येथपर्यंत प्रदेश येत असे. बंगाल खेरीजकरून बाकी हिंदस्थानांतील सुपीक व भरभराटीच्या प्रांतांपैकीं बहुतेक प्रांत यांत येत असत. ह्युएनत्संगच्या वेळच्या ८० राज्यांपैकीं जीं ३७ राज्यें यांत होतीं, त्यांचीं नांवें. स्थानेश्वर, वैराट–मत्स्यदेश, श्रुघ्न, मंडावर, ब्रह्मपुर, अहिच्छत्र, पिलोपेण, संकिसा–संकास्या, मथुरा, कनोज, अयुटो–उत्पलारण्य, हयमुख, प्रयाग, कौशांबी, कुशपुर, विशाखा–साकेत, अयोध्या, श्रावस्ती, कपिला, कुशीनगर, वाराणशी, गजपतिपुर, वैशाली, व्रज, नेपाळ, मगध, हिरण्यपर्वत, चंपा, कांकजोल, पौंड्रवर्धन, जझोटी, महेश्वरपुर, उज्जनी, माळवा, खेडा, आनंदपुर, वचडारी–ईदर,

पूर्वेकडील हिंदुस्थान.–यांत आसाम, बंगाल, गंगेच्या मुखाजवळील प्रदेश, संभळपूर, ओरिसा आणि गंजम इतके हल्लींचे प्रांत येत असत. यांचे ह्युएननें ६ भाग सांगितले आहेत; कामरूप, समतट, ताम्रलिप्ति, किरणसुवर्ण, उड्र आणि गंजम. कामरूप (आसाम) प्रांताचा घेर १६६७ मैल होता समतटाची राजधानी कामरूपाच्या दक्षिणेस सुमारें २०० व ताम्रलिप्तीच्या पूर्वेस १५० मैल सांगितली आहे.

ताम्रलिप्तीचा घेर २५० मैल असून हा प्रांत समुद्रकिनाऱ्यावर होता व त्याची जमीन सखल व दमट होती. किरणसुवर्ण राज्याचा घेर सुमारें ७५० मैल होता उड्र–ओढिया–याला ह्युएनत्संगनें ओड म्हटलें आहे. राजधानी हल्लींच्या जाजपुर गांवीं होती. येथील लोकांची भाषा व उच्चार हीं मध्यहिंदुस्थानांतल्यापेक्षां निराळीं होतीं. उड्रच्या राजधानीहून नैर्ऋत्येस २०० मैलांवर गंजम (कोंग्युटो) असे. हें नांव कशाशीं जुळतें याचा पत्ता लागला नाहीं. हें गंजम असावें. गंजम मधील लिपि मध्यहिंदुस्थानांतल्यासारखी होती. परंतु भाषा व उच्चार हीं निराळीं होतीं.

दक्षिणहिंदुस्थान.–तापी आणि महानदी यांच्या दक्षिणेकडील सर्व भागास दक्षिण–हिंदुस्थान असें नांव होतें. यांत पुढील नऊ राज्यें होतीं: (१) कलिंग–ह्युएनच्या वेळीं राजमहेंद्री राजधानी असावी, (२) कोसल, (३) आंध्र–हें सांप्रतचें तैलंगण होय. (४) धनकक्कट या देशाचा घेर १००० मैल होता, (५) चोरिय किंवा जोरिय प्रांत लहान (४०० मैल घेराचा) होता, (६) द्रविड–ह्या प्रांताचा घेर १००० मैल होता; राजधानी कांचीपुर, (७) मलकूट–मधुरा, (८) कोंकण–या राज्याचा घेर ८३३ मैल लिहिला आहे, (९) महाराष्ट्र–महाराष्ट्राच्या राजधानीपासून भडोचचें अंतर १६७ मैल होतें; देशाचा घेर १००० मैल होता. राज्याच्या पूर्वसीमेवर एक मोठा बुद्धविहार होता. सिलोन हें सातव्या शतकांत सिंहलद्वीप या नांवानें प्रसिद्ध होतें. तेथून आलेले यात्रेकरू ह्युएन

यास कांची येथें भेटले होते. त्यांच्यापासून ह्युएनला सिलोनची माहिती मिळाली. ह्याचा घेर ११६७ मैल होता व उत्तर-दक्षिण लांबी २७१ मैल व रुंदी १३७ मैल होती.

चो ल का ल ( ११ वें शतक ).--दहाव्या शतकाच्या अंतीं व अकराव्या शतकाच्या आरंभीं पुन्हां हिंदुस्थानावर मुसुलमानांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या. इ. स. ९९२ च्या सुमारास सबक्तगीननें सिंधुनदीपर्यंतचा भाग आपल्या ताब्यांत ठेवला होता पण यापुढें गझनीच्या महमदानें लाहोरच्या २ ऱ्या जयपाळाचा पराभव करून ( १००१ ) हिंदुस्थानांत मुसुलमानांचें कायमचें ठाणें दिलें. यावेळीं हिंदुस्थानांत बरींच राज्यें होतीं पण महमदानें यांपैकीं बहुतेक महत्त्वाचीं राज्यें (उदाहणार्थ लाहोर, भटिया, मुल्तान, ग्वाल्हेर, माळवा, कालिंजर, कनौज, दिल्ली, अजमीर वगैरे) जिंकलीं होतीं. नगरकोट (हिमालय), सोमनाथ (गुजराथ), मथुरा, व ठाणेश्वर हीं हिंदुक्षेत्रें त्यानें लुटलीं. त्यावेळीं बुंदेलखंडाच्या दक्षिणेस हल्लीं ज्याला मध्यप्रांत म्हणतात तो मुलूख चेदि राज्यांत मोडत असे. दख्खनमध्यें चालुक्य घराणें ८ व्या शतकांत मोडकळीस आलें होतें. तें दहाव्या शतकांत पुन्हां सावरलें गेलें. त्याची राजधानी कल्याण येथें होती. अगदीं दक्षिणेस चोल राज्य फार उदयास आलें. राजराज चोलानें (९८५-१०११) पल्लवांचें जुनें साम्राज्य बुडवून टाकिलें. सिलोनपर्यंत त्यानें दिग्विजय केला. आजचा मद्रास इलाखा, सिलोन व म्हैसूरचा बहुतेक भाग त्याच्या साम्राज्यांत मोडत असे. त्याचा मुलगा राजेंद्रचोल यानें ओरिसा आणि बंगालपर्यंत साम्राज्य वाढवून संरक्षणाकरितां एक बलिष्ठ आरमारहि ठेविलें होतें. पांड्य राजघराणें हें चोलांचें मांडलिक असावें. यावेळीं होयसळ बल्लाळांनीं चोलांच्या जागीं आपलें राज्य स्थापिलें होतें. म्हैसूरचा पश्चिम भाग व मलबार हे यांच्या राज्यांत मोडत असत. त्यांची राजधानी द्वारसमुद्र किंवा आजचें हळेबिड येथें होता.

च व्हा ण का ल ( १२-१३ वें शतक ).--यावेळीं दिल्ली आणि अजमीर येथील राज्यें पृथ्वीराज चव्हाणाच्या अंकित होतीं; पण कनौजचे राठोड आणि गुजराथचे वाघेला त्याचे कट्टे शत्रु होते. यांनीं आपआपसांत भांडून महंमद घोरीला विजयाचा मार्ग सुलभ करून दिला. घोरीनें रजपुतांचीं राज्यें खालसा करून आपलें साम्राज्य बनविलें. कनोजच्या राठोडांनीं नंतर मारवाडचें राज्य स्थापिलें. घोरीच्या सुभेदारांनीं ग्वाल्हेर आणि अनहिलवाडा तसेंच कालिंजर घेऊन बंगाल आणि बिहार खालसा केले. सुमेर रजपुतांच्या ताब्यांत सिंध होतें तें अल्तमषनें बळकावलें; तसेंच माळवा जिंकला. दक्षिणेंत बल्लाळ अद्याप बलिष्ठ होते. १२ व्या शतकाच्या अखेरीस चालुक्यांचा ऱ्हास होऊन त्यांचा मुलूख बल्लाळ आणि यादव यांनीं वांटून घेतला. यावेळीं चोलांचा उत्कर्ष बंद पडून पांड्य घराणें स्वतंत्र होऊं पहात होतें. तेलंगणावर नरुपति घराणें होतें. त्याची राजधानी वारंगळ होती.

या द व का ल ( १४ वें शतक ).--या कालांत दक्षिणेंत देवगिरी येथें यादव राज्य करीत असतां उत्तरहिंदुस्थानांत राज्यक्रांति झाली. तेथील गुलाम घराणें जाऊन खिलजी घराणें अधिष्ठित झालें. अल्लाउद्दीन खिलजीनें दक्षिणेवर स्वारी करून रामदेवराव यादवापासून एलिचपुर घेतलें, तसेंच गुजराथ, काठेवाड त्यानें पादाक्रांत केले. कच्छ मात्र आपलें स्वातंत्र्य कसेंबसें टिकवून राहिलें होतें. चितोड, जालोर आणि सिवना हीं मुसुलमानांच्या हातीं पडलीं. एवढ्यानेंच थांबलें नाहीं. अल्लाउद्दीनचा सुभेदार मलिक काफर यानें दक्षिण-दिग्विजयाला आरंभ केला (१३०९-११). वारंगळचा राजा मुकाट्यानें त्याचा मांडलिक बनला. रामदेवरावाला पुन्हां एकदां पराभव स्वीकारावा लागला (१३०). बल्लाळांचें राज्य खालसा झालें. अशा रीतीनें महाराष्ट्र व कर्नाटक हीं मुसुलमानांचें स्वामित्व पत्करून राहिलीं. १३१८ मध्यें खिलजी घराण्याच्या शेवटच्या राजानें मलबार जिंकलें व यादवांचें राज्य अजीबात धुळीला मिळविलें. उत्तरेस काश्मीर, पूर्वेस ओरिसा, पश्चिमेस जुनागड आणि कच्छ व अगदीं दक्षिण टोंकाचा मुलूख हीं राष्ट्रें एकंदर हिंदुस्थानांत त्यावेळीं आपलें स्वातंत्र्य टिकवून राहिलीं होतीं.

वि द्या र ण्य का ल ( १४ वें शतक ).--या काळांत मुसुलमानांचा जोर कमी होऊन पुन्हां हिंदुराज्यें स्वतंत्र होत होतीं. स. १३४० त बंगाल आणि तेलंगण प्रांत स्वतंत्र झाला. सात वर्षांनीं दक्षिणेंत बहामनी राज्य स्थापन झालें. कृष्णा आणि तुंगभद्रा यांच्या दक्षिणेस विजयानगरचे राजे फार उत्कर्षास चढले होते. जोनपूर, गुजराथ, खानदेश आणि माळवा येथील राजांनीं मुसुलमानांचें स्वामित्व झुगारून दिलें होतें. या सर्व राष्ट्रांत बहामनी आणि विजयानगर हीं राष्ट्रें मोठीं व बलिष्ठ

होतीं. बहामनी राज्याची गोंडवनाच्या बाजूची सरहद्द वर्धा किंवा वैनगंगा यांच्या प्रवाहाच्या बाजूनें चालली होती. या राज्यांतील अगदीं उत्तरेकडचा प्रांत वऱ्हाड असून पश्चिमेस घाटापर्यंत राज्याचा विस्तार होता. मात्र कोंकणांतील ल्हान राजे स्वतंत्र होते. चौल आणि दाभोळ या मार्गांनीं परदेशांशीं दळणवळण चालत असे. कृष्णा आणि तुंगभद्रा यांमधील मैदान कोणाचें याब द्दल बहामनी आणि विजयानगरचें राज्य यांच्यांत तंटा होता. यांतील रायचूर आणि मुद्गल हे बळकट किल्ले कधीं एकाच्या तर कधीं दुसऱ्याच्या ताब्यांत असत. विजयानगरच्या साम्राज्यांत कृष्णा आणि तुंगभद्रा यांमधील ल्हान संस्थानें मोडत. गोंवा, धारवाड आणि त्या भोंवतालचा मुलूखहि त्याच्याच अंमलाखालीं होता. गोंडवनांतील जाती खेर्लाचा कोणी नरसिंह म्हणून होता त्याच्या सत्तेखालीं असत.

सिंधवर जाम घराणें राज्य करीत होतें. जाम राजे सुमेर रजपूत होते पण त्यांनीं १४ व्या शतकाच्या अखेरीस मुसुलमानी धर्म स्वीकारला. १४५० पर्यंत दिल्लीच्या सुलतानाला ते खंडणी देत असत. पण त्या सालीं त्यांनीं आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. उत्तर तापीचें खोरें स्वतंत्र गौळी घराण्याकडे होतें. काश्मीर जरी स्वतंत्र होतें तरी त्यावर अंमल करणारे राजे मुसुलमान होते. कच्छ, काठेवाड आणि ओरिसा यांवर स्वतंत्र हिंदु राज्यें होतीं. अशा रीतीनें हिंदुस्थानचे अनेक वेगवेगळाले तुकडे पडलेले असतांना तैमुरलंगानें त्यावर स्वारी केली व फारसा विरोध न येतां तो हिंदुस्थानचा बादशहा बनला. यापुढें हिंदुस्थान सर्व बाजूंनीं परतंत्र बनत चाललें. मराठ्यांचा कांहीं काळ अंमल सोडल्यास मुसुलमानी राजे व यूरोपियन लोक यांच्या सत्तेखालीं हिंदुस्थानचा बहुतेक सर्व मुलुख अव्याहत चालत आला आहे. या संबंधीचा इतिहास पुढील प्रकरणांत येइलच.

**सांस्कृतिक**—भरतखंडाची सांस्कृतिक मर्यादा बावयाची म्हणजे प्राचीन भारतीय व सांप्रतचे हिंदी लोक हिंदुस्थानखेरीज ज्या ज्या भूभागांत जाऊन राहिले त्या प्रदेशांची माहिती बावयाची. भारतीय संस्कृतीचा विस्तार होत असतां त्या संस्कृतीनें जेवढें क्षेत्र आक्रमण केलें त्या सर्व क्षेत्राचें स्थूल ज्ञान येथें देत आहों (सविस्तर माहिती ज्ञानकोश विभाग पहिला, पृष्ठें १०९ ते २९४ पहा). भारतबाह्य देशांवर झालेल्या सांस्कृतिक परिणामांचें वर्गीकरण तीन प्रकारें करतां येतें: (१) ब्राह्मणकालीन संस्कृति, (२) बौद्धकालीन संस्कृति, (३) अर्वाचीन संस्कृति.

ब्राह्मणकालीन संस्कृति.—प्राचीनकाळीं ब्राह्मणी संस्कृतीचा सीलोन, ब्रह्मदेश, अफगाणिस्तान, बलुचिस्तान, कुर्दिस्तान (इराण), ट्रान्सकाकेशिया व सैबेरिया, सोकोत्रा उर्फ सुखाधारद्वीप, सयाम, कांबोज, मलाया, फिलिपाईन बेटें, जावा बेट, सेलिबिस बेट, सुमात्रा, टांकीन, कोचीन—चीन वगैरे प्रदेशांत प्रसार झाला होता तेव्हां या कालाच्या भारतखंडाची सांस्कृतिक मर्यादा कांकेशसपासून जावा, बलीद्वीपापर्यंत होती असें स्थूल दृष्टीनें म्हणतां येईल.

बौद्धकालीन संस्कृति.—बौद्धधर्माचा प्रसार सीलोन, ब्रह्मदेश, जावा, कांबोज, कोचीन, चीन, सयाम, जपान, तिबेट, वगैरे देशांत इ. सनाच्या आरंभकालापासून १३ व्या शतकापर्यंत निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या प्रदेशांत झाला. यापैकीं कांहीं प्रदेशांत प्रथम ब्राह्मणी संस्कृति प्रस्थापित झालेली होती. यावरून बौद्ध संस्कृति प्रसाराच्या दृष्टीनें पूर्वीच्या ब्राह्मणी संस्कृतीच्या मर्यादेपेक्षांहि चीन वगैरेंचा अंतर्भाव होऊन भारतखंडाची सांस्कृतिक मर्यादा अधिक विस्तृत झाली होती.

आर्वाचीन संस्कृति.—अर्वाचीन काळांत हिंदूंचें परदेशगमन धर्म व संस्कृतिप्रसाराच्या उद्देशानें झालेलें नाहीं; तर मुख्य मजूर म्हणून उदरनिर्वाहाकरितां, शिक्षण संपादून उच्च धंदा व नोकरी मिळविण्याकरितां आणि अंदमान बेटांत तर गुन्हेगार म्हणून शिक्षा भोगण्याकरितां झालेलें आहे. अर्वाचीन परदेशगमन सीलोन, मॉरिशस, नाताळ, केनिया, फिजी, ब्रिटिश ग्वायाना, ट्रिनिदाद, ट्रान्सव्हाल, प्रिटोरिया, ऱ्होडेशिया, आफ्रिकेंतील पोर्तुगीज व जर्मन वसाहती, कानडा, युनायटेड स्टेटस, ऑस्ट्रेलिया, इंग्लंड वगैरे प्रदेशांत झालें आहे. अंदमानांत काळ्या पाण्याचे कैदी म्हणून हिंदी लोक आतांपर्यंत असत. पण आतां तेथील कैदखाना रद्द करून स्वतंत्र हिंदी वसाहत स्थापण्याचें ठरलें आहे. यावरून भरतखंडाच्या सांस्कृतिक दृष्टीनें मर्यादा आज फारच संकुचित असून पाश्चात्त्य संस्कृतीचा पगडा आज प्रत्यक्ष भरतखंडावरच बसत चालला आहे.

**नैसर्गिक**—आशिया खंडाच्या तीन ओबड धोबड आणि अव्यवस्थित आकाराच्या द्वीपकल्पांपैकीं हिंदुस्थान हें मध्य द्वीपकल्प आहे. आशिया खंडाच्या

मुख्य जमिनीपासून दक्षिणेकडे हें पसरलेलें असून साधारणपणें यूरोपखंडांतील इटलीसारखें भासतें. याचा आकार मोठ्या त्रिकोणासारखा म्हटला तर त्रिकोणाचा पाया हिमालयपर्वतावर बसेल आणि त्याचें टोंक समुद्रांत बरेंच लांब जाईल. याचा पश्चिमेकडील भाग अरबी समुद्रानें भिजला असून पूर्वेकडील मुख्य भाग बंगालच्या उपसागरानें भिजला आहे. हा देश ८° ते ३७° उत्तर अक्षांशापर्यंत पसरला आहे. म्हणजे भूमध्यप्रदेशांतील अतिशय उष्ण भागापासून समशीतोष्ण कटिबंधाच्या पार आंत हा देश गेलेला आहे. हिंदुस्थानची दक्षिण–उत्तर लांबी व पूर्व–पश्चिम रुंदी हीं अजमासे १९०० मैल आहेत. या प्रदेशाला ब्रिटिश सरकारनें ब्रह्मदेश जोडून दिला पण अगदीं जवळचें सिलोनचें बेट मात्र याच्यापासून तोडलें. अंदमान आणि निकोबार हे बंगालच्या उपसागरांतील दोन द्वीपसमूह, अरबी समुद्रांतील लखदीव हा एक द्वीपसमूह, तांबड्या समुद्राच्या मुखाजवळील एडनचें ठाणें, पेरिम आणि सोकोत्रा हीं सर्व हिंदुस्थान साम्राज्यांत राजकीय दृष्टीनें समाविष्ट होतात. पण इकडे हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील पोर्तुगीज आणि फ्रेंच वसाहतींमुळें ब्रिटिश हिंदुस्थानाचा मुलुख मधून मधून तुटल्यासारखा झालेला आहे.

स र ह द्दी.–हिंदुस्थान हें उत्तरेकडे आशियाखंडाला हिमालयपर्वतसमूहामुळें अगदीं बंद झाल्यासारखें आहे. नेपाळ आणि भूतान हीं स्वतंत्र संस्थानें, तसेंच त्या मागचें तिबेटचें मोठें पठार हीं याच हिमालय पर्वतांत वसलीं आहेत. हिंदुस्थानच्या वायव्य कोणांत काश्मीर संस्थान वसलेलें दिसतें. या वायव्यकोणापासून ( उत्तर अक्षांश ३९° आणि पूर्व रेखांश ७४° ) या पर्वताचा एक भाग खालीं आल्यामुळें अफगाणिस्तानापासून हिंदुस्थान अगदीं विभागलें गेलें आहे. सफेदकोह आणि सुलेमान हे पर्वत विभाजक बनले आहेत. तसेंच बलुचिस्तानहि याच पर्वताच्या लहान लहान श्रेणींमुळें अलग झालें आहे. आणखी दक्षिणेकडे गेल्यास हिंदुस्थान हें पश्चिम आणि नैर्ऋत्य दिशेस अरबी समुद्र आणि हिंदी महासागर यांनीं परिवेष्टिलेलें आढळतें. अगदीं दक्षिणेकडचें टोंक जें कन्याकुमारी ( उत्तर अक्षांश ४,° २०' पूर्व रेखांश ९८°, ३२') तेथून वर उत्तरेकडे गेलेली बंगालच्या उपसागराची लांबलचक समुद्ररेषा बहुतेक पूर्व भागाची सरहद्द बनली आहे. पण वायव्येप्रमाणें ईशान्येकडेहि हिंदुस्थानला जमिनीचीच सरहद्द लागली आहे. कारण ईशान्येकडे हिमालय पर्वतांनीं आग्नेयीकडे आपले हात पसरले असल्यामुळें पूर्व-बंगाल हा आसाम आणि ब्रह्मदेश यांपासून विभागला गेला आहे. इरावतीच्या मुखापसून पुन्हां आग्नेयीकडे डोंगराच्या रांगा ओळीनें खालीं आल्याकारणानें ब्रह्मदेशाचा तेनासेरीम प्रांत सयामपासून अलग राहिलेला आढळतो. ही सरहद्द रेषा तेनासेरीमच्या अगदीं टोंकाशीं व्हिक्टोरीया पॉईंट (उत्तर अक्षांश ९१° ६९, पूर्व रेखांश ९८°, ३२' ) पर्यंत खालीं गेली आहे.

वरील सरहद्दींत समाविष्ट झालेलें हिंदीसाम्राज्य उंचसखल जमीन, हवामान, देखावे यांच्या विविधतेमुळें अगदीं सर्व समृद्ध असें वाटतें. हा एक देश म्हणण्यापेक्षां खंड म्हणणें चांगलें. आकाशयानांतून या देशाकडे खालीं पाहिल्यास याचे अगदीं वेगवेगळाले तीन विभाग पडलेले दिसतील.

(१) हि मा ल य प र्व त स मू ह.–पहिला विभाग हिमालय पर्वत आणि त्यांच्या दक्षिणेकडे गेलेल्या श्रेणी होत. हा भाग जगांत सर्वांत उंच आहे. टॉलेमीनें हिमालयपर्वतांना एमोडस असें नांव दिलें होतें. यांचा आकार जंबीयासारखा असून पात्याचा भाग दक्षिणेकडे आहे. हीच हिंदुस्थानची १९०० मैलांची उत्तर सरहद्द होय. या सरहद्दीच्या ईशान्य कोणाशीं तिबेटची सानपो आणि आसामची ब्रह्मपुत्रा यांना जोडणारी दिहांग नदी श्रेणीच्या मध्यांतून वर उगवली आहे. समोरच्या बाजूस म्हणजे वायव्य कोणाशीं सिंधू ही हिमालयाला फोडून खालीं पंजाबांत उतरते. हा ओसाड पर्वतप्रदेश पुष्कळ ठिकाणीं माणसांना अगम्य असा असून आधुनिक लष्कराला तर कोठेंच वाट देत नाहीं. प्राचीन प्रसिद्ध व्यापारी मार्ग अद्याप आहेतच. त्या मार्गांनीं पंजाबचा माल १८००० फूट उंचीवरल्या पूर्वतुर्कस्तान आणि तिबेट या देशांत जातो. मुझतक, काराकोरम आणि चंचीनमो हे मार्ग सर्वांत जास्त प्रसिद्ध आहेत.

हिंदुस्थानच्या उत्तरेस आपली दुहेरी भिंत घालून हिमालयानें त्याचें संरक्षण केलें आहे. एवढेंच नसून पूर्व आणि पश्चिम टोंकापासूनहि दक्षिणेस श्रेणी पाठवून ईशान्य आणि वायव्य सरहद्द घालून मजबूत केली आहे. ईशान्येकडे या श्रेणींनां नागा आणि पटकोई पर्वत म्हणतात व ते आसामांतील सुधारलेला प्रदेश व उत्तर ब्रह्मदेशांतील रानटी जाती यांमध्यें भिंतीप्रमाणें

उभे आहेत. तिकडे वायव्य सरहद्दीवरील पर्वतश्रेणी सर्वत्र ब्रिटिश सरहद्द व्यापून समुद्रापर्यंत पोंचल्या आहेत. या श्रेणी दक्षिणेकडे जात असतांना त्यांच्या डोळ्यांत भरणाऱ्या भागांनां सफेद कोह, सुलेमान आणि हाला पर्वत अशीं नांवें पडलीं आहेत. पण ही पर्वताची अभेद्य भिंतहि कोंपऱ्यांत फोडलेली दिसत असून तींतून काबूल नदी हिंदुस्थानांत शिरते. जवळच खायबर मार्ग, त्याच्या दक्षिणेस कुर्रम मार्ग, डेराइस्माईलखानजवळ गोमल मार्ग, गोमल आणि कुर्रम यांमधील टोंची मार्ग, आणखी दक्षिणेकडे असलेला बोलन मार्ग हे हिंदुस्थान आणि अफगाणिस्तान यांमधील रस्ते होत. हिंदुस्थान आणि बलुचिस्तान यांमधील हाला, ब्राहुइ आणि पाब पर्वत कमी उंचीचे आहेत.

नद्यांचीं मैदानें.—हिंदुस्थानचा दुसरा नैसर्गिक विभाग म्हणजे हिमालयांतून निघणाऱ्या नद्या ज्यांतून वहातात तीं विस्तृत मैदानें होत. हीं मैदानें पूर्वेकडे बंगालच्या उपसागरापासून पश्चिमेकडे अफगाण सरहद्द आणि आरबी समुद्र येथपर्यंत पसरलीं आहेत. यांमध्यें अतिशय समृद्ध व अतिशय दाट लोकवस्तीचे प्रांत आहेत. या प्रदेशावर वायव्येकडून आणि ईशान्येकडून इतिहासपूर्वकालापासूनहि एकामागून एक हल्ले झालेले आहेत. परकीय लोक नदीमार्गांनीं पुढें पुढें येऊन आपल्या पूर्वी आलेल्या लोकांनां दक्षिणेकडे समुद्राच्या बाजूस लोटीत नेत. सुमारें १७ कोटी लोक या विभागांत राहात असून बंगाल, आसाम, संयुक्तप्रांत, पंजाब, सिंध, रजपूताना व इतर देशी संस्थानें यांत आहेत. यांतून तीन नदीसमूह वाहातात. पहिला हिमालयापलीकडील उथळ खळीसारख्या भागांत उगम पावून हिमालयाच्या पश्चिम श्रेणींतून पंजाब प्रांतावर सिंधू आणि सतलज नद्यांच्या रूपानें बाहेर पडतो. दुसरा समूह हिमालयाच्या दुहेरी भिंतीपलीकडे पहिल्या समूहाशेजारच्या उगमा शेजारींच उगम पावून पूर्वेकडे वळतो व हिमालयाच्या पूर्व टोंकाशीं हिंदुस्थानांत ब्रह्मपुत्रा या नांवानें अवतीर्ण होतो. या नद्या हिमालयाच्या उत्तरेच्या उतारावरील गाळ हिंदुस्थानांत वाहून आणतात. हिमालय पर्वताचा हा एक विशेष आहे कीं, तो आपल्या उत्तरेकडील उतरणीवरील व त्याचप्रमाणें दक्षिणेकडील उतरणीवरील पावसाचें पाणी हिंदुस्थानच्या मैदानांत पाठवून देतो. तिसऱ्या नदीसमूहाच्या योगानें दक्षिणेकडील उतरणीवरील गाळ व पाणी उत्तर हिंदुस्थानांत येऊन पडतें. हा समूह गंगा नदीला येऊन मिळतो. अशा रीतीनें हिमालयाच्या दक्षिण व उत्तर उतारावरील पाणी बंगालच्या मैदानांत येऊन पडतें.

उत्तरेकडील पठार.—हिंदुस्थानचा तिसरा नैसर्गिक विभाग म्हणजे तीन बाजू असलेलें पठार होय. हें पठार हिंदुस्थानचा दक्षिणार्ध किंवा द्वीपकल्पीय भाग व्यापून राहिलें आहे. पूर्वी ह्याला दक्षिण किंवा दख्खन म्हणत व त्यांत वऱ्हाड आणि मध्यप्रांत, मुंबई आणि मद्रास इलाखे, हैद्राबाद, म्हैसूर आणि इतर संस्थानी मुलूख येतो. पठाराचा उत्तरभाग विंध्य पर्वत म्हणतां येईल. विंध्य हा पर्वत अनेक निरनिराळ्या टेंकड्या मिळून झालेला आहे. यावर अबू आणि पारसनाथ हीं पश्चिम आणि पूर्व बाजूचीं शिखरें आहेत. १५०० तें ४००० फूट उंची पर्यंतच्या विंध्य पर्वताच्या निरनिराळ्या रांगा या उत्तरेकडील भिंतीप्रमाणें असून मध्य पठाराला त्यांचा चांगला आधार आहे. आंत जरी त्यांमधून रेल्वे आणि सडका गेलेल्या आहेत तरी प्राचीन काळीं दक्षिण हिंदुस्थान आणि उत्तर हिंदुस्थान यांच्यामधील पर्वत आणि जंगल मिळून झालेली मोठी आडकाठीच होती. यामुळेच सर्व हिंदुस्थान एकाच साम्राज्याखालीं आणण्यास कठीण पडत असे. मोठमोठीं जंगलें, डोंगरांच्या रांगा आणि शिखरें यांनीं व्याप्त असलीं तरी लागवडीखालीं असलेलीं खोरीं आणि रुंद व उंच मैदानें यांत आहेत.

घाट.—दक्षिणेकडील उंच त्रिकोणाच्या दोन बाजू म्हणजे पूर्व आणि पश्चिम हे दोन घाट होत. विंध्य पर्वताच्या पूर्व आणि पश्चिम टोंकापासून दक्षिणेकडे हे पसरत गेल्यानें हिंदुस्थानच्या पूर्व आणि पश्चिम किनाऱ्यावर आलेले आहेत. पूर्वघाट खडबडीत व कमीजास्त आंत-बाहेर आलेला असून घाटाचा पायथा आणि किनारा यांच्यामध्यें बरींच रुंद सपाट मैदानें आहेत. मद्रास इलाखा यांनीं व्याप्त आहे. पूर्व घाट, मुंबई इलाख्याची समुद्रावरची मोठी भिंतच वनल्यासारखी आहे. घाट आणि किनारा यांच्यामध्यें फारच अरुंद पट्टी आहे. पुष्कळ ठिकाणीं हे घाट भव्य कडे आणि पठारें यांनां युक्त असून समुद्र किनाऱ्यापासून वर जाण्याला हीं जिन्यासारखीं वाटतात. पूर्व घांटाची सरासरी उंची १५०० फूट असून पश्चिम घांटाची ३००० आहे. दक्षिणेकडे दोन्ही घांट मिळाले आहेत. घांट आणि विंध्य पर्वत यांनीं परिवेष्टिलेलें आंतील तिकोनी

पठार समुद्रसपाटीपासून १००० ते ३००० फूट उंच आहेत. हा भाग डोंगरांच्या रांगांनीं आणि शिखरांनीं व्याप्त आहे. निलगिरी हा सर्वांत प्रख्यात डोंगर असून त्यावर उटकमंड (उंची ७००० फूट) हें मद्रास सरकारचें हवा खाण्याचें ठिकाण आहे. सर्वांत उंच शिखर दक्षिणेकडील कोनांत असलेलें दोड्डबेट्टा (उंची ८७६० फूट). आहे.

वरील तिकोनी पठाराच्या उत्तर बाजूकडील गाळ व पाणी गंगेमध्यें जाऊन पडतें. विंध्य आणि सातपुडा पर्वताच्या दक्षिण उतरणीवरील पाणी नर्मदा आणि तापी या नद्या खंबायतच्या आखातांत नेऊन सोडतात. पण सुरतेपासून कन्याकुमारीपर्यंत कोणचीहि मोठी नदी आंतल्या पठारापासून पश्चिमकिनाऱ्याला वाहात जात नाहीं. म्हणजे मध्यपठार आणि हिंदीमहासागर यांचे पाणी एकवटूं न देणारा हा उंच अत्रुटित असा प्रतिबंध म्हणतां येईल. अशा स्थितींत पठारावरचें पाणी व गाळ पूर्वेकडेच वाहात जाणार. गोदावरी, कृष्णा आणि कावेरी या मद्रास इलाख्यांतील मोठ्या नद्या पश्चिम घाटांत उगम पावून पूर्वेकडे वाहात जाऊन बंगालच्या उपसागराला मिळतात.

वर वर्णिलेल्या हिंदुस्थानच्या तीन नैसर्गिक विभागांपैकीं पहिला विभाग जो हिमालय पर्वत तो ब्रिटिश हद्दीबाहेर असला तरी भारत आणि भारतीय यांचा इतिहास त्याच्याशीं फार संबद्ध आहे. उत्तर हिंदुस्थानांतील नद्यांचा मैदानांनीं युक्त असा दुसरा विभाग हा प्राचीन सर्व चळवळींचें क्षेत्र म्हणतां येईल. एकंदर हिंदुस्थानची सुधारणा आणि भवितव्यता याच क्षेत्राशीं निगडित आहे. तिसरा विभाग जें दक्षिणेंतील तिकोनी पठार तें वरील दोन्ही विभागांपासून अगदीं भिन्न असून त्याच्या प्रगतीचा इतिहासहि स्वतंत्र आहे. तसेंच हिमालयापलीकडे मोंगल मानववंशी जाती रहात असून उत्तर हिंदुस्थानांतील नद्यांच्या मैदानी प्रदेशांत अद्यापि शुद्ध आर्यवंशी लोक आहेत. तिकोनी पठारावर आर्य व दक्षिणेंतील द्रवीड यांच्या बऱ्याच झटापटी झालेल्या आहेत असें दिसून येईल.

ह वा मा न.–हिंदुस्थानचें हवामान एकाच प्रकारचें नाहीं. दक्षिणेकडून उत्तरेकडे जों जों जावें तों तों हवा कमी उष्ण होत जाते. तसेंच समुद्रापासून अंतर जसजसें वाढत जातें तसतसें हिवाळा व उन्हाळा यांतील फरक वाढत जातो. हवा तीन प्रकारची साधारणतः पुढील प्रांतांतून दृष्टीस पडते. (१) उष्ण व दमट–मद्रास इलाख्याचा दक्षिणभाग, ओरिसा, बंगाल व आसाम. (२) उष्ण व कोरडी–राजपुताना, पंजाब, संयुक्तप्रांत आणि सिंधचा उत्तरभाग. (३) मध्यम उष्ण व कोरडी–पंजाब, संयुक्तप्रांत कांहीं भाग, माळवा व महाराष्ट्र. मन्सून (पावसाळी) वाऱ्यामुळें हवामानाला कांहीं नियमितपणा आलेला आहे. उष्णतामान १२०° अंशापासून शून्यापर्यंतहि जातें. सर्वत्र हिंदुस्थानचें पावसाचें सरासरी मान ४९ इंच आहे. कोठें पाऊस २ इंच पडतो, तर कोठें ९०० इंच पडतो. निरनिराळ्या प्रांतांतील पावसाचें मान पुढीलप्रमाणें आहे.– सिंध व कच्छ १० इंच; पंजाब २२; राजपुताना २८; महाराष्ट्र, कर्नाटक ३०–३९; गुजराथ ३०–४९; मध्यहिंदुस्थान ४२; बहार ४४; ओरिसा ४७; मद्रास पूर्वकिनारा व मध्यप्रांत ५०; पूर्वबंगाल ४९; दक्षिणबंगाल ६६; कोंकण व मद्रासइलाख्याचा पश्चिम किनारा १००–१२९ इंच. सह्याद्रीवर ४०० इंचांपर्यंत व आसामांत ६०० इंचांपर्यंत देखील पाऊस पडतो. या हवामानासंबंधी माहिती ज्ञानकोशांत 'भूपृष्ठवर्णन' लेखांत (ज्ञा. को. १८ (भ) ५० पासून पुढें) दिलेली आहेच. भूस्तरशास्त्राच्या दृष्टीनें हिंदुस्थानचे तीन निरनिराळे विभाग पडतात. हिमालयीन, द्वीपकल्पीय आणि या दोहोंमधील गंगा-सिंधुमैदान. हिमालयाचा बराचसा भाग पुराणयुगापासून नवप्रभात (एओसीन) काळापर्यंत समुद्रांत बुडालेला असल्यामुळें त्यावर सामुद्रिक अवशेष सांपडतात. याच्या उलट द्वीपकल्पीय विभाग पर्मियत काळापासून तरी जमीनीचा होता असें दिसतें. गंगासिंधूचें मैदान वाऱ्यानें वाहून आणलेली वाळू आणि मळी यांनीं व्याप्त आहे. या मैदानाचें क्षेत्रफळ सुमारें ३००००० चौरस मैल आहे. या मैदानावरील मळीची भर भूस्तरशास्त्रांतील अर्वाचीन काळची आहे. भारतीय भूस्तरासंबंधीं विवेचन 'भूस्तरशास्त्र' (ज्ञानकोश १८ (भ १०७–०९) लेखांत केलेलेंच आहे, तेव्हां या ठिकाणीं पुन्हां द्विरुक्ति करीत नाहीं.

व न स्प ती.–हिंदुस्थान देश अवाढव्य आहे तरी वनस्पति दृष्ट्या त्याला इतर देशांप्रमाणें कांहीं वैशिष्ट्य नाहीं. याच्या वायव्य बाजूस इराण व भूमध्यक्षेत्राचा आग्नेय भाग यांतील वनस्पती, उत्तरेस सायबेरियांतील, पूर्वेस चीनमधील आणि आग्नेयीस मलायांतील वनस्पती कमी अधिक मिश्रण झालेल्या आढळून येतात. हिंदुस्थानांतील वनस्पतींचे साधारणतः चार स्वतंत्र वर्ग पाडतां येतील ते असे.–

(१) हिमालयावरील.—तिबेटच्या पठारांकडे जाणाऱ्या हिमालयाच्या उतरणीवर सायबेरियन समशीतोष्ण (टेंपरेट) वनस्पती उगवतात. उत्तर गोलार्धांतील सबंध समशीतोष्ण कटिबंधांत याच वनस्पती आहेत. हिमालयाच्या पश्चिम प्रदेशांत या वनस्पतिजातींशीं कोलंबाईन व हॅथॉर्न यांसारख्या यूरोपियन वनस्पतिजातींचें मिश्रण झालेलें आढळतें, पूर्वेकडे येत असतांना ही मिश्र जात कमी कमी होत जाऊन कुमाउनच्या पलीकडे मुळींच आढळत नाहीं. हिमालयाच्या पायथ्याशीं मलाया जातीच्या वनस्पतींचा एक अरुंद पट्टा दिसतो; तर त्याच्याच वर समशीतोष्ण वनस्पती अगदीं बहरली असून ती उत्तर चीनमधील वनस्पतिविस्तार म्हणून वटाते. हीच पश्चिमेकडे जातांना हळु हळु यूरोपियन जातींत शिरूं लागते. आसामांत अतिशय माजणारीं चिनी चहाचीं झाडें प्रसिद्धच आहेत. शंकाकार झाडें दोन्हीं भागांत सारखींच आहेत. चीर झाडें (पायनस लाँगिफोलिया) तर हिंदुकुशापर्यंत गेलीं आहेत. लीम किंवा काइल (पायनस एक्सेलसा) सिक्किम खेरीज सर्वत्र आढळतें. अफगाणिस्तान आणि वायव्य हिमालय या पर्वतांवर सारखें उगवणारें देवदार अॅटलांटिक व लेबानॉन सीडर झाडासारखें जवळजवळ आहे. पश्चिम हिमालयीन वनस्पती व यूरोपियन वनस्पती यांचा निकट संबंध दाखविणारी विशेष गोष्ट म्हणजे 'होम ओक' चें झाड होय. हें झाड म्हणजे मेडिटरेनियन क्षेत्रांतील विशिष्ट वनस्पति होय.

(२) वायव्येकडील.—पंजाब आणि सिंध या भागांतील वनस्पतींचा हा वर्ग आहे. या भागांतील हवा अगदीं कोरडी असून जमीन पाटबंधाऱ्याच्या पाण्याशिवाय लागवडीला योग्य नसते. या वनस्पतिवर्गांत जाती फारच कमी आहेत. पण हा वर्ग इराण, दक्षिण अरबस्तान, आणि ईजिप्त यांतील वनस्पतिसदृश आहे. करील (कॅपारिस अफिला), बाभूळ, पाप्युलस युफ्रेटिका, ('विलो'), साल्व्हाडोरा पर्सिका, बोर वगैरे सपाटीवरील जंगलांतून आढळणारीं झाडें या वर्गांतील विशेष जाती होत. यांतील कोरड्या वनस्पति आग्नेयीकडे जात जात पश्चिम द्वीपकल्पांतील वनस्पतींशीं मिश्रण पावतात. या प्रकारच्या संकर वनस्पती गंगेच्या उत्तर सपाटीवर व सर्वत्र देशाच्या कोरड्या भागांत आढळून येतील.

(३) आसाम आणि मलाया द्वीपकल्पांतील.—इमारती लांकूड, रबर, चहा, तमाखू, कोको, काफी वगैरे वनस्पती या वर्गांत मोडत असून नेहमीं दमट असणाऱ्या हवेंतील बहुतेक वनस्पती यांत मोडतात.

(४) पश्चिम हिंदुस्थानांतील.—या वर्गाचें वैशिष्ट्य सांगणें कठीण आहे. मागील दोन वर्गांच्या मध्यंतरीं हा वर्ग बहुंशी पडेल. आफ्रिकन उष्णकटिबंधांतील वनस्पती आणि या वर्गांतील वनस्पती यांत कांहीं साम्य आढळून आलें आहे. मेथी, नीळ या जातींचीं झाडें प्रातिवार्षिक असून तीं दर पावसाळ्यांत उगवतात. हिंदुस्थानांतल्याप्रमाणें आफ्रिकेंतहि या वनस्पती आहेत दोन्हीहि देशांत ताडीचीं झाडें फार कमी येतात. तथापि दक्षिण हिंदुस्थानांत खारका, नारळ, ताड हीं बरींच लागवडींत असतात. येथील जंगलें मलायन जातींपेक्षां जास्त रुक्ष आणि खुरटीं असतात. इमारती लांकडाच्या जातींपैकीं महत्त्वाच्या तूण, साल, भेंडा, चंदन, सागवान या जाती होत.

प्राणी, सस्तनप्राणी:—सिंह:—हिंदुस्थानांतील क्रूर व जंगली प्राण्यांपैकीं पहिला सिंह होय. हा काठेवाडांतील जंगलांत आज सांपडतो; पण याला आयाळ नसते. या जातीचा चांगला सिंह ९ ते ९॥ फूट लांब असतो.

वाघ:—वाघ हा संहारक प्राण्यांत अगदीं वरचा येईल. हिमालयाच्या उतरणीपासून तों सुंदरबनाच्या दलदलीपर्यंत सर्वत्र हा सांपडतो. लागवडीची वाढ व शिकार यामुळें वाघांची संख्या कमी कमी होत आहे. दक्षिण पठारावरच्या जंगलांतूनहि वाघ दृष्टीस पडतात. नाकापासून तों शेंपटीच्या टोंकापर्यंत वाघाची लांबी ९—१० फूट असते. हरिण, काळवीट, व रानडुक्कर हें त्याचें आवडतें भक्ष्य होय. ज्या ठिकाणीं हें मिळणार नाहीं त्या ठिकाणीं तो गुरांढोरांवर झडप घालतो. कांहीं वाघ माणसाच्या रक्ताला चटावलेले असतात. असे माणसें खाणारे वाघ कधीं कधीं एका वर्षांत ७५।८० माणसें मारतात. हत्तीवर बसून किंवा जंगलांत झाडावर 'मचान' बांधून तेथून वाघाची शिकार करण्यांत येत असते. मध्य हिंदुस्थानांत जमीनीवर उभे राहूनच वाघाला मारण्यांत येते तर आसामांत बोटींतून भाल्यानें त्याला जाया करतात. हिमालयावर पक्षी धरण्याच्या चिकट्यानें वाघाला गिरफदार करतात असें म्हणतात.

चित्ता:—हिंदुस्थानांत वाघापेक्षां चित्ता सर्व भागांत फारकरून अढळतो. तो वाघापेक्षां कमी क्रूर नसतो. याची ज्यास्तींत जास्त लांबी ७ फूट ६ इंच येईल. अगदीं दक्षिणेकडे एक काळी जात आढळते. दख्खनामध्यें ज्याला शिकवून हरणाची शिकार करण्यास तयार करतात तो

चित्ता अगदीं वेगळ्या जातीचा आहे. तो मांजराच्या कुळींतला नसून कुत्र्याच्या कुळींतला वाटतो. याची धांवण्याच्या कामीं चपलता दुसऱ्या कोणाहि स्तन प्राण्याला साधणार नाहीं. शिकारीवर पहिला हल्ला चुकल्यास हा परत हल्ला मुळींच करीत नाहीं तर धन्याकडे माघारा येतो. याखेरीज चित्त्याचे आणखी कांहीं प्रकार हिंदुस्थानांत आढळतात.

लांडगा-कोल्हाः—लांडगे उघड्या मैदानी भागांत बहुतेक आढळत असून जंगली प्रांतांतून फार क्वचित राहातात. त्यांचें आवडतें भक्ष्य म्हणजे शेळ्यामेंढ्या. कधीं कधीं ते माणसांवरहि हल्ला करतात. तिबेट व हिमालयावर पांढरे, तांबडे व काळे अशा लांडग्यांच्या तीन निरनिराळ्या जाती आढळतात. खोकड फार कमी असतात. पण कोल्हे सर्वत्र दिसतात; व रात्रीं भीतिदायक कोल्हेकुई करूं लागतात. युरोपियन लोक जे शिकारी कुत्रे पाळतात ते कोल्ह्याचीच शिकार करतात, खोकडाची नव्हे.

कुत्राः—सर्व दाट जंगलांतून रानटी कुत्रे आढळतात. यांचें वैशिष्ट्य म्हणजे हे टोळ्या करून शिकार करतात. एका टोळींत तीस चाळीस कुत्रे असतात एकदां का टोळीनें जनवराचा पाठलाग केला म्हणजे त्याचें आयुष्य संपलेंच म्हणून समजावें. ब्रह्मदेशांतील करेण डोंगरांत जंगली कुत्र्याची एक अगदीं निराळी जात आहे. मॉंग्रेलप्रमाणें पराया, दक्षिणेकडील पोलीगार, ग्रेहाऊंड व तिबेट–भूतानमधील मॅस्टिफ या आणखी हिंदुस्थानांतील कुत्र्याच्या जाती होत. लांडगा ज्या ठिकाणीं नसतो त्या ठिकाणीं तरस सांपडतें.

अस्वलः—खडकाळ भागांत व अरण्यांतून सर्वत्र काळें अस्वल सांपडतें. त्याच्या छातीवर घोड्याच्या नालाच्या आकाराची एक पांढरी खूण असते. त्याचें खाद्य म्हणजे मुंग्या, मध व फळें होत. त्याला त्रास दिला तर तो माणसांवरहि चांगला हल्ला करतो व तोंड ओरबाडून टाकतो. पंजाबपासून आसामपर्यंत हिमालयीन किंवा तिबेटी अस्वलें ( सनबेअर ) आढळतात. मलायन अस्वल ( वरील जातीचेंच ) खालच्या ब्रह्मदेशांत दिसून येईल.

हत्तीः—वायव्य भागाखेरीज सर्वत्र हत्ती सांपडतात. हिंदुस्थानांत हा प्राणी मैदानचा रहिवासी नसून डोंगरी रहिवासी वाटतो. डोंगरावर सुद्धां तो दरींत राहात नसून उंच कड्यावर व पठारांवर राहतो. हिंदुस्थानद्वीपकल्पांतून म्हणजे दक्षिण भागांतून त्याचें उच्चाटन होत आहेसें दिसतें. कारण तो कूर्ग, म्हैसूर आणि त्रावणकोर यांतील जुनाट अरण्यांतच फक्त आढळतो. हिमालयीन तराईंत तो अद्यापि टिकून आहे. आसाम ते ब्रह्मदेश या ब्रिटिश हिंदुस्थानच्या अति डोंगराळ भागांतूनच हल्लीं हत्तींचा मोठा पुरवठा होतो. गुंडा ( दंती ) व मकना ( बिदंती ) अशा हत्तीच्या दोन मुख्य जाती आहेत. हत्तीची जास्तींत जास्त उंची १२ फूट असते. हत्तीची शिकार करणें मोठें धोक्याचें असतें. आज हत्तीचा मक्ता सरकारकडे असून त्यांना विशिष्ट कारणांशिवाय मारण्याची बंदी आहे. 'हत्तींच्या संरक्षणाचा कायदा' म्हणून एक विशिष्ट कायदा आहे ( १८७९ चा ६ वा ). हत्ती कमी होत आहेत तथापि त्यांना फार मागणी असते. सरकारी वाहतूक व लांकडाचा व्यापार या कामीं त्यांचा मुख्य उपयोग असतो. शिवाय राजेरजवाडे डामडौलासाठीं हत्ती बाळगतात.

गेंडाः—गेंड्याच्या तीन जाती असतात. दोहोंमध्यें एक शिंग व एकांत दोन शिंगें असतात. एक शिंगी गेंडा बहुधा पहाण्यांत येतो. तो ब्रह्मपुत्रा दरींत सांपडतो. त्याची उंची ६ फुटांपर्यंत असून शिंग १४ इंचापावेतों वाढतें. या शिंगाला औषधी म्हणून लोक फार चाहतात. जावानी गेंडा सुंदरबनांत व ब्रह्मदेशांतहि आढळतो. यालाहि एकच शिंग असतें. द्विशृंगी सुमात्री गेंडा चितागांगच्या दक्षिणेस आढळतो.

रानडुकरः—लागवडींत असणाऱ्या प्रदेशांत राहून हा प्राणी शेतकऱ्यांना फार त्रास देतो. नेपाळ आणि सिक्किमच्या तराईंत कधीं कधीं टेंगू डुकरें आढळतात. त्यांची उंची फक्त १० इंच असून वजन १२ पौंडांपेक्षां जास्त असत नाहीं.

रानगाढवः—सिंध आणि कच्छमधील वाळवंटांत हा रहात असून, माणसाला भिऊन हा खूप जलद पळत असल्यानें याविषयीं विशेष कांहीं सांगतां येत नाहीं.

बकरी व शेळ्या मेंढ्याः—हिमालय पर्वताच्या भागांत यांच्या बऱ्याच विविध व रानटी जाती आढळतात कांहीं जाती (उदाहरणार्थ ओव्हिस अमॉन) तिबेटी आहेत, तर कांहीं लडख व सुलेमानपर्वत यांतील शेळ्यामेंढ्या सारख्या आहेत. यांपैकीं कांहीं समुद्रसपाटीपासून २००० फूट उंचीच्या खालीं कधींहि उतरत नाहींत. आल्प्स पर्वतावरच्या जातीसारखीहि एक जात हिमालयावर व अत्युच्च अशा दक्षिण हिंदुस्थानांतील पर्वतश्रेणींवर आढळते. शामाय मृगासारखी सरऊ नांवाची जात हिमालयापासून आसाम–ब्रह्मदेश पर्वतभागांत बरीच सांपडते.

काळवीट:—हा प्राणी माळरानांत विशेषत: मिठागरांच्या मैदानांत दिसतो. गुजराथ आणि ओरिसा यांतील किनाऱ्यांवरील भागांत एका नर काळविटाच्या सहवासांत ५० माद्या आहेत असे कळप आढळतात. मादीला शिंगें नसून तिचा रंग हरणासारखा फिक्का असतो. नराचा रंग अगदीं पिंगट काळसर असून पोटाच्या पांढऱ्या रंगामुळें तो उठून दिसतो. नराचीं निमुळतीं पिळदार शिंगें ३० इंचांपर्यंतहि लांब असतात. नीलगाय ही जातहि सर्वत्र आढळते; पण विशेषत: गुजराथ आणि उत्तर हिंदुस्थान या भागांत असते. हिंदु ही जात गाईप्रमाणेंच पवित्र मानतात. काळविटाच्या आणखीहि कांहीं जाती आहेत.

हरिण:—सांभर हा हरिणांचा राजा आहे. हा सर्वत्र अरण्यमय डोंगरांवर आढळतो. याचा रंग गर्द पिंगट असून याच्या मानेवर आयाळाप्रमाणें केंस असतात. याची उंची ५ फूट असून शिंगांच्या फांट्यांची लांबी ३ फुटांपर्यंत येते. याच्या खालोखाल उंचीला 'बाराशिंग' हरिण येईल. तें खालचा बंगाल व आसाम या भागांत फार सांपडतें. 'चिताळ' (ठिपक्याचें) हरिण सर्व प्राण्यांत अतिशय सुंदर असतें. हरणाच्या इतरहि आणखी जाती असतात. कस्तुरीमृग तिबेटांत आढळतो.

गवा:—हिंदुस्थानांत बैलांमध्यें कांहीं चांगल्या जाती आहेत. त्यांपैकीं गौर किंवा गवा ही जात पश्चिम घाटांत, मध्य हिंदुस्थानांत व आसाम आणि ब्रह्मदेश यांतील डोंगरी जंगलांतून आढळते. याची उंची कधीं कधीं २० हात (७ फूट)सुद्धां भरते. याचीं आंखूड व बांकदार शिंगें असून डोकें फार मोठें असतें. याचा रंग काफीसारखा तपकिरी असतो. वाघ किंवा हत्ती यांच्यापेक्षां हा कमी क्रूर नसतो.

टोणगा:—रानटोणगा (किंवा बैल) हा गांवांतील गुरांपेक्षां फक्त जास्त मोठा आणि क्रूर असतो इतकेंच. आसाम आणि ब्रह्मदेश यांत याचे नमुने सांपडतात.

उंदीर, घूस:—घूस आणि उंदीर यांचें कुल फार मोठें आहे. घूस ही कधीं कधीं २ फूट लांब असून घरांनां व झाडांनां फार उपद्रव देते. झाडावरचा उंदीर गमतीदार असून तो ताडाच्या किंवा बांबूच्या झाडांवर रहातो. शेतांतील उंदीर तर सबंध पीक फस्त करतात.

पक्षी:—इतर उष्ण प्रदेशांतल्याप्रमाणें हिंदुस्थानांत पक्ष्यांचे सुंदर व विविध प्रकार फारसे नाहींत. तथापि कांहीं चांगल्या व विचित्र जाती आहेतच. कांहीं पक्षी आपल्या निसर्गदत्त वस्त्रांतच फार खुलून दिसतात तर दुसरे कांहीं आकार, बल व क्रौर्य या योगांनीं भीतिप्रद वाटतात. पोपटाची जात सौंदर्याकरितां फार प्रसिद्ध आहे. हिंस्र पक्ष्यांत गिधाडें येतात. गरुडाच्या बऱ्याच जाती आहेत पण त्यांतील कोणतीहि यूरोपच्या सुवर्णगरुडाप्रमाणें नाहीं. बहिरी ससाणेहि बऱ्याच प्रकारचे दिसतात. बगळे वगैरे मासेखाऊ पक्ष्यांची त्यांच्या पंखांसाठीं शिकार करण्यांत येते. सर्वांत मैना ही फार लोकप्रिय दिसते. पाण्यांतले पक्षी तर असंख्य आहेत. मांसाकरितां मारल्या जाणाऱ्या पक्ष्यांमध्यें माळढोक पक्ष्याची (फ्लोरिकेन) एक जात असून तो बहुधां दुर्मिळ समजला जातो पण त्याचें मांस मात्र फार चवदार म्हणून चडतात. पाणलावे तर फार सांपडतात. पारवे, कबूतरें, बदकें यांचें मांस खाण्यासारखें असतें. मोर लहान असला तर त्याचें मांस खातात. कंकण पक्षी हिंदुस्थानांत तर नाहींच पण ब्रह्मदेशांत त्याची एक पांढरी जात आढळते.

उरोगामी:—या प्राण्यांत सापांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. हे सर्वत्र आढळतात. घरांत शिरतात व पुष्कळ मारलेहि जातात. पण विषारी साप कमी असतात; मात्र ते चावल्यावरोबर तात्काल जीव घेतात. नाग साप या कामीं प्रसिद्ध आहेत. कांहीं हिंदू यांची पूजा करतात. मगरी व सुसरी या वर्गांतच येतात. पण त्या नदींत व समुद्रांत असल्यानें फारशा त्रास देत नाहींत. विंचू तर अतिशय आढळतात.

मासे:—समुद्र, नद्या, तळीं, ओढे वगैरे सर्व पाण्यांतून मासे सांपडतात. गरीब लोकांचें तें मुख्य खाद्य आहे. तरी खारावलेले मासे इकडे फार क्वचित दृष्टीस पडतात. ब्रह्मदेश व मद्रास किनारा या बाजूस मासे खारावण्याचे धंदे विशेष चालतात. कांहीं नदींतील मासे पाटबंधारे, धरणें वगैरे अडचणींमुळें कमी होत चालले आहेत. हिंदुस्थानांतील माशांत रोही (वनस्पत्याहारी) मासा व मांजरी—मासा हे बरेंच दिसतात. महसीर मासा सर्वांत उत्तम असें मासे धरणाऱ्यांचें मत आहे. हा सर्व डोंगरी ओढ्यांत आढळतो. खाण्याला सर्वांत उत्तम, दुर्मिळ व महाग मासा म्हणजे हिलसा हा होय.

किडे:—किड्यांच्या जाती असंख्य आहेत. उन्हाळी आणि पावसाळी हवेंत पुष्कळसे घाणेरडे व त्रासदायक किडे सैरावैरां हिंडतात पण यांबरोबरच अति उत्कृष्ट रंगांचे सुंदर किडेहि पहाण्यास मिळतात. डांस, पिसा,

मुंग्या या तर विचारावयालाच नको. उपयुक्त किड्यांत मधमाशा, रेशमाचे किडे व लाखेचे किडे येतात. कधीं कधीं मोठी टोळधाड येऊन कोठेंहि हिरवें म्हणून राहूं देत नाहीं.

**ब्रिटिश सत्तात्मक सांप्रतचें भारतखंड**—राजकीयदृष्ट्या हिंदुस्थानचे हल्लीं मुख्य दोन भाग आहेत: एक ब्रिटिश मुलुख व दुसरा संस्थानी मुलुख. पैकीं ब्रिटिश मुलुखाच्या मर्यादा कशा बदलत गेल्या त्याचा इतिहास पुढीलप्रमाणें आहे. १७६५ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीचें रूपांतर व्यापारी कंपनींतून राज्यकारभार करणाऱ्या संस्थेंत झालें. १७७३च्या रेग्युलेटिंग ॲक्टनें मुंबई, मद्रास व बंगाल ह्या तीन प्रेसिडेन्सी निर्माण करण्यांत आल्या. १७७५ मध्यें बनारस जिल्हा आणि १८०१ मध्यें दिल्ली आग्रा, मथुरा व १८०३ मध्यें सांप्रतचा ओरिसा प्रांत बंगाल प्रेसिडेन्सींत सामील करण्यांत आला. १७९२ व १७९९ मध्यें म्हैसूरचा भाग, १७९९ मध्यें तंजावरचा मुलूख, १८०० मध्यें निजामानें दिलेला मुलूख व १८०१ मध्यें कर्नाटकच्या नबाबचा मुलूख मद्रास प्रेसिडेन्सींत सामील होऊन सांप्रतचा मद्रास इलाखा बहुतेक पूर्ण तयार झाला. १८०० ते १८०५ पर्यंत सुरत, भडोच व खेडा जिल्हे, १८१७ च्या सुमारास अहमदाबाद, १८१८ मध्यें बहुतेक महाराष्ट्र व मध्यप्रांतांतील कांहीं जिल्हे, आणि १८२७ पर्यंत उरलेला महाराष्ट्र व मध्यप्रांतांतील बाकीचे जिल्हे मुंबई इलाख्यांत सामील होऊन सिंधखेरीज सर्व मुंबई इलाखा तयार झाला.

अजमीर.—मारवाड शिंद्यापासून सन १८१८ त मिळाला व तो प्रांत राजपुतान्यांतील हिंदुस्थान सरकारच्या एजंटाच्या ताब्यांत दिला. पहिल्या ब्रह्मीयुद्धानंतर आसाम व आराकान बंगालला जोडले गेले. व तेनासेरीम एका स्वतंत्र कमिशनरच्या ताब्यांत दिला. स. १८३८ त कोल बंडानंतर छोटानागपूर नैर्ऋत्यसरहद्द—एजन्सीकडे दिला होता परंतु स. १८५४ त तो बंगालला जोडण्यांत आला. कुर्गप्रांत स. १८३४त म्हैसूर रेसिडेन्टाच्या ताब्यांत दिला. स. १८२९ ते ३५ पर्यंत शिलांगचा डोंगराळ मुलुख जिंकून बंगालला जोडण्यांत आला.

स. १८३६ त बिहारच्या पश्चिमेचा सर्व मुलुख बंगालपासून वेगळा करून त्यावर एक लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्यांत आला. स. १८३७त सातारा मुंबई इलाख्यास जोडलें. स. १८४३ त सिंधप्रांतहि मुंबई इलाख्यास जोडला गेला. स. १८५९ त पंजाब, दिल्ली वगैरे प्रांत मिळून एका लेफ्टनंट गव्हर्नरच्या ताब्यांत देण्यात आले. स. १८५४ मध्यें नागपूर प्रांतास त्यावेळच्या वाव्यप्रांतांतील २ जिल्हे जोडून एक स्वतंत्र प्रांत केला व त्यास मध्यप्रांत हें नांव ठेविलें. स. १८५४ त पोर्टब्लेअर, अंदमान आणि निकोबार अशीं तिन्ही मिळून एका अधिकाऱ्याच्या ताब्यांत दिलीं. स. १८५६ त अयोध्या हें चीफकमिशनरच्या ताब्यांत दिलें गेलें. दार्जिलिंग व जलपैगुरी हे भूतानपासून मिळविलेले प्रांत बंगालला जोडण्यांत आले. स. १८६१ त पंचमहाल जिल्हा मुंबई इलाख्यास जोडला. स. १८६९ त दक्षिण ब्रह्मदेश एका चीफकमिशनरच्या ताब्यांत दिला. त्याचप्रमाणें उत्तर ब्रह्मदेशाची व्यवस्था केली. व पुढें स. १८९२ त ते दोन्ही प्रांत एका लेफ्टनंट गव्हर्नरच्या हाताखालीं देण्यांत आले. स. १८८७ त बलुचिस्तानवर एक चीफकमिशनर नेमला.

स. १९०१ मध्यें पंजाब मधील वायव्येकडचा कांहीं मुलुख वेगळा करून त्यास वायव्यसरहद्दप्रांत असें नांव दिलें. सन १९०३ मध्यें वऱ्हाड मध्यप्रांतास जोडण्यांत आला. स. १९१८ त बिहार, छोटानागपूर व ओरिसा प्रांत एकत्र करून त्यांवर एक लेफ्टनंट गव्हर्नर नेमला. याच वर्षीं पंजाबपासून दिल्ली प्रांत वेगळा केला व तो वरिष्ठ सरकारच्या ताब्यांत दिला.

सन १९१९ चा सुधारणा कायदा.—या कायद्यानें एकंदर ब्रिटिश हिंदुस्थानचे १५ प्रांत करण्यांत आले असून त्यांपैकीं ९ मोठे (मेजर) प्रांत: (१) मद्रास, (२) मुंबई, (३) बंगाल, (४) संयुक्तप्रांत, (५) पंजाब, (६) बिहार ओरिसा, (७) मध्यप्रांत, (८) ब्रह्मदेश आणि (९) आसाम—आहेत. त्यांनां गव्हर्नरचे प्रांत म्हणतात; कारण त्यांपैकीं प्रत्येक प्रांताचा कारभार, गव्हर्नर एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर, दिवाण आणि कायदेकौन्सिल यांच्या मदतीनें चालवितो. बाकीचे ६ लहान (मायनर) प्रांत: (१) वायव्यसरहद्दप्रांत, (२) बलुचिस्तान, (३) कूर्ग, (४) अजमीरमेवाड, (५) अंदमान व (६) दिल्ली—आहेत व त्यांनां चीफ कमिशनरचे प्रांत म्हणतात, कारण त्या प्रत्येक प्रांताचा कारभार चीफ कमिशनर पाहतो. हे चीफ कमिशनर मध्यवर्ती सरकारचे एजंट असतात. या लहान प्रांतांच्या कारभारांत १९१९ च्या कायद्यानें कांहींएक फरक झालेला नाहीं.

**भावी उर्फ राष्ट्रीय शासनसत्तात्मक**—यासंबंधानें आजचे सरकारचे आणि खासगी मुत्सद्यांचे विचार येणेंप्रमाणें सांगतां येतील— यापुढें हिंदुस्थानच्या

प्रांतिक मर्यादा ठरवितांना तीन दृष्टी विशेष लक्षांत घेतल्या पाहिजेत त्या (१) नैसर्गिक, (२) सांस्कृतिक, व (३) शासनसत्ताक. यांमध्यें शासनसत्ताक दृष्टि हीच मुख्य दृष्टि होय. संपूर्ण स्वराज्य मिळाल्यावर हल्लीं ब्रिटिश राज्यकारभाराकरितां ब्रिटिश मुत्सद्यांनीं ज्या प्रांतिक मर्यादा ठरविल्या आहेत त्या गैर-सोयींच्या असल्यामुळें बदलल्या पाहिजेत ही गोष्ट राष्ट्रीय दृष्टीच्या सर्व लोकांनां पटलेली आहे, व हीच गोष्ट राष्ट्रीसभेलाहि मान्य असून राष्ट्रीयसभेनें स्वतःच्या कारभाराकरितां भाषावर प्रांतरचनेचें तत्त्व स्वीकारून हिंदुस्थानचे (संस्थानें धरून) सुमारें पंधरा निरनिराळे प्रांत पाडले आहेत ते–(१) महाराष्ट्र (मराठी भाषा); (२)गुजराथ (गुजराथी); (३) सिंध (सिंधी); (४) पंजाब व वायव्यसरहद्द प्रांत (पंजाबी); (५) दिल्ली, अजमीर, मेवाड व ब्रिटिश राजपुताना (हिंदुस्थानी); (६) संयुक्त प्रांत (हिंदुस्थानी); (७) मध्यप्रांत (हिंदुस्थानी); (८) वऱ्हाड–मध्यप्रांत (मराठी); (९) विहार (हिंदुस्थानी); (१०)ओरिसा, बंगाल, आंध्र, व मध्यप्रांत यांतील उडिया भाषा असलेले प्रदेश (उडिया); (११) बंगाल व आसाम (बंगाली); १२) ब्रह्मदेश (ब्रह्मी); (१३) मद्रास (तामिळ); (१४) आंध्र (तेलगू); आणि (१६) कर्नाटक (कानडी).

कॉंग्रेसच्या सदरहू प्रांतविभागणींत तत्त्वतः अंगिकार-लेलें विभागणीचें मूलभूत तत्त्व पूर्णपणें पाळलेलें दिसत नाहीं. एक विशिष्ट भाषा ज्या प्रदेशांत चालते तो सर्व प्रदेश मिळून एकच प्रांत बनविला नाहीं. मराठी भाषेचे दोन प्रांत आणि हिंदुस्थानी भाषेचे तर चार प्रांत केले आहेत. वास्तविक महाराष्ट्र, वऱ्हाड व मराठी मध्यप्रांत मिळून मराठी भाषेचा एकच प्रांत आणि मध्यप्रांत, संयुक्तप्रांत, विहार, दिल्ली वगैरे मिळून हिंदुस्थानी भाषेचा एकच प्रांत बनविला पाहिजे असें पुष्कळांस वाटत आहे.

भाषावार प्रांतरचनेंतली दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे ती ती विशिष्ट भाषा असलेलीं संस्थानें त्या त्या भाषेच्या विशिष्ट प्रांतांच्या ताब्याखालीं देणें ही होय. आज संस्थानें वरिष्ठ किंवा प्रांतिक कोणत्याहि कायदेमंडळाला जबाबदार नसून ब्रिटिश सार्वभौम सत्तेचे स्वतंत्र मांड-लिक म्हणून संस्थानिक गणले जात आहेत. चारदोन लाखांच्या संस्थानिकालाहि नियंत्रण घालण्याचा किंवा त्या संस्थानांतील प्रजेचीं गाऱ्हाणीं कायदेमंडळांपुढें चर्चेला घेण्याचा अधिकार वरिष्ठ कायदेमंडळाला (लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व स्टेट कौन्सिल) नाहीं. ही स्थिति मुळींच योग्य किंवा समाधानकारक नाहीं. दुय्यम व कनिष्ठ दर्जाचीं सर्व संस्थानें त्या त्या भाषेच्या प्रांताच्या कायदेमंडळाला जबाबदार असलीं पाहिजेत व या अर्थानें तीं त्या त्या भाषेच्या प्रांतांत समाविष्ट झालीं पाहिजेत. म्हैसूर, हैद्राबाद, वडोदें, ग्वालेर, इंदूर वगैरे पहिल्या प्रतीचीं संस्थानें स्वतंत्र प्रांत समजून तीं वरिष्ठ कायदेमंडळाला जबाबदार असलीं पाहिजेत, व या अर्थानें तीं एकेक प्रांत म्हणून मानलीं गेलीं पाहिजेत.

प्रांतविभागणीच्या वेळीं तिसरी सांस्कृतिक दृष्टीहि ठेवणें जरूर आहे. भारतीय संस्कृति मूळ एक असली तरी तिला कांहीं अंशीं प्रांतिक स्वरूपहि प्राप्त झालें आहे. उदाहरणार्थ, मराठी, गुजराथी, सिंधी, हिंदुस्थानी, बंगाली, ब्रह्मी, मद्रासी, कानडी वगैरे सर्व लोक कमजास्त प्रमाणानें मूळ एकाच भारतीय संस्कृतीचे असले तरी त्यांच्यामध्यें धार्मिक विधी, पोषाख, वगैरे बाबतींत किंवा रीतिरिवाजाच्या बाबतींत बरेच स्थानिक भेद आहेत. म्हणून क्वचित भाषा भिन्न असल्या तरी पोटसंस्कृति एकच आहे अशा सर्व लोकांचा एकच राजकीय विभाग उर्फ प्रांत केल्यास प्रांतिक कौन्सिलांनां धार्मिक, सामाजिक वगैरे स्वरूपाचे जे कायदे करावे लागतात त्यांच्या दृष्टीनें अधिक सोयीचें होईल. म्हणून राज्यकारभाराकरितां प्रांत पाडण ते भाषावार पाडण्यापेक्षांहि पोटसंस्कृतिवार पाडणें जास्त सोयीचें होईल.

देशसंरक्षणाच्या दृष्टीनें पुढें मागें एक तत्त्व मोडलें जाण्याचा संभव आहे आणि तें म्हटलें म्हणजे प्रांतिक फौज व राष्ट्रीय फौज असे फौजेंत दोन वर्ग असणें. प्रांतिक फौज स्थानिक सरकारास जबाबदार असावी व राष्ट्रीय फौज व्हॉईसरायांस जबाबदार असावी. फौजेचा उद्देश जनतेचें दमन करण्याचा नसावा.

राज्यकारभाराकरितां प्रांतविभागणी करतांना आणखी एक गोष्ट विचारांत घेतली पाहिजे ती गोष्ट म्हणजे पर-देशांतील हिंदी वसाहतींचा तावा ही होय. जसें आज-पर्यंत एडन हें राजकीय सोयीच्या दृष्टीनें मुंबई सरका-रच्या ताब्यांत देण्यांत आलें होतें त्याप्रमाणें पुढेंहि विशिष्ट राष्ट्रीय दृष्टि ठेवून एकंदर हिंदी वसाहतींची विभागणी करून निरनिराळ्या प्रांतांच्या ताब्यांत वसाहती वांटून दिल्या पाहिजेत. पूर्वेकडील बौद्धसंस्कृतिप्रचुर वसा-हतींची व्यवस्था ब्रह्मदेशाच्या प्रांतिक कायदेमंडळाकडे

देणें सोयीचें होईल. तथापि पश्चिमआशिया, पूर्व आणि दक्षिण आफ्रिका, इंग्लंड, युनायटेड स्टेट्स वगैरे देशांत ज्या वसाहती आहेत तेथें हिंदुस्थानांतील बहुतेक सर्वच प्रांतांतील लोक आढळतात. म्हणून असल्या वसाहतींची व्यवस्था वरिष्ठ कायदेमंडळांत एक स्वतंत्र वसाहतखातें उत्पन्न करून त्याच्याकडे द्यावी लागेल.

---

## प्रकरण ३ रें.

## हिंदुस्थानचा इतिहास.

**सामान्य विवेचन**–हिंदुस्थानचा इतिहास या नांवाखालीं यापुढें जो इतिहास देण्यांत येत आहे तो बहुंशीं खास हिंदुस्थानदेशाचा आहे; म्हणजे त्यांत ब्रह्मदेश, ब्रिटिश बलुचिस्तान, अफगाणिस्तान, सीलोन इत्यादि प्रांतांचा इतिहास नाहीं. कारण, त्यांचा समावेश खास हिंदुस्थानांत आगेमागें झालेला आहे; त्यामुळें या ठिकाणीं त्यांचा इतिहास मुख्य इतिहासविषयाला जेवढा जरूर तेवढाच दिला आहे.

**इतिहासाचीं भौगोलिक कारणें**–हिंदुस्थानच्या इतिहासास आजे तसें स्वरूप येण्यास कांहीं भौगोलिक कारणें आहेत त्यांच्याकडे दृष्टि फेंकली पाहिजे. तो फेंकतांना उत्तर हिंदुस्थान व दक्षिण यांचे इतिहास व त्यांची भौगोलिक स्थिति यांची परस्पर संगति लक्षांत घेतली पाहिजे, आणि त्याप्रमाणें हिंदुस्थानीय इतिहासाचीं वैशिष्ट्यें लक्षांत घेतलीं पाहिजेत. त्या वैशिष्ट्यांत हिंदुस्थानचा तुटकपणा विचारास घेतला पाहिजे.

हिंदुस्थानचे साधारण तीन ठोकळ भाग पडतात. एक सिंधु–गंगथडीचा हिमालय व विन्ध्य यांमधील आर्यावर्त, दुसरा नर्मदा–कृष्णा यांमधील दक्षिणदेश आणि तिसरा त्याच्या पलीकडील दक्षिणापथ देश. आर्यावर्तालाच पुढें हिंदुस्थान म्हणूं लागले आणि दंडकारण्य धरून दक्षिणापथ या जुन्या प्रदेशाला थोड्याबहुत फरकानें दक्षिण व कर्नाटक हीं नांवें मिळालीं. आर्यांचा प्रवेश दक्षिणापथांत होण्यापूर्वी त्यांची वसति बरींच शतकें उत्तरेकडे म्हणज आर्यावर्तांत असल्यानें त्या प्रांताचा इतिहास दक्षिणच्या इतिहासापेक्षां जास्त जुना आहे. पुढेंहि त्या प्रांतांत बाह्यांच्या स्वाऱ्या होऊन त्यांचीं राज्यें स्थापन झाल्यामें त्या प्रांतास दक्षिणेपेक्षां जास्त महत्त्व आलें व त्यामुळें एका अर्थानें उत्तर हिंदुस्थानचा इतिहास म्हणजे सर्व हिंदुस्थानचा इतिहास होय अशी समजूत पसरली.

परकीय किंवा बाह्यांच्या स्वाऱ्या फार प्राचीनकाळापासून हिंदुस्थानावर होत आल्या. याला कारण तिकडील पंजाब, अंतर्वेदी व संयुक्तप्रांत यांसारखे सुपीक व सपाट आणि मोठमोठ्या नद्यांनीं सजल असलेले प्रदेश होत. खैबर किंवा बोलन घाटांतून एकदां आंत घुसलें, व सिंधु आणि पंजाबांतील चार मोठया नद्या ओलांडण्याची व्यवस्था केली कीं, परकीय शत्रूची दौड थेट हस्तिनापुरापर्यंत येऊन थकडे. त्यापुढें गंगायमुनांचे उतार ताब्यांत घेतल्यास, त्याची स्वारी पाटलीपुत्राच्या तटापर्यंत बिनधोक जाण्यास हरकत पडत नसे. हरकत यावयाची ती या प्रांतांत स्थाईक झालेल्या राजेरजवाड्यांची. त्यांचा अडथळा हे बाह्य शत्रू आपल्या वकुबाप्रमाणें साम-दाम-दंड-भेद या साधनचतुष्टयाच्या जोरावर दूर करीत. ही पद्धत प्राचीन आर्यांपासून अर्वाचीन मुसुलमानांपर्यंत सर्वांनींच थोडया फार फरकानें अंमलांत आणली. आर्यावर्ताप्रमाणें दक्षिणापथ मात्र बाह्यांकडून सहजासहजीं जिंकला गेला नाहीं व जात नाहीं. कारण, भौगोलिकदृष्टया हा देश पर्वत–नद्या आदिकरून अनेक अडचणींनीं युक्त आहे. ज्याला हिंदुस्थानांत साम्राज्य स्थापावयाचें असेल, त्यानें प्रथम उत्तर हिंदुस्थान हाताखालीं घालावें व मग दक्षिणेंत प्रवेश करावा. उत्तरेकडील सम्राटांचीं राज्यें दक्षिणेंत पसरलीं व टिकलीं परंतु दक्षिणेंतील सम्राटांचीं साम्राज्यें उत्तरेकडे फार काल टिकाव धरूं शकलीं नाहींत. उदाहरणार्थ पांडव, अशोक, अकबर, इंग्रज, वगैरे; याच्या उलट भोज, पाण्डय, बहामनी, विजयानगर, मराठे वगैरे. डुप्ले यानें दक्षिणेंत या कार्यास प्रारंभ केला म्हणून तो फसला व इंग्रजांनीं कलकत्त्यास केला म्हणून तो सिद्धीस गेला असें व्हिन्सेंट स्मिथ याचें मत आहे.

हिंदुस्थानाच्या तिन्ही बाजूस उंच उंच पर्वतश्रेणी व चवथ्या बाजूस महासागर असल्यानें आणि चरितार्थास अत्यंतावश्य लागणारी साधनसंपत्ति देशांतच उपलब्ध असल्यानें देश्य लोकांना परदेशांशीं संबंध ठेवण्याची विशेष आवश्यकता भासत नसे व त्यामुळेंच प्रथम प्रथम बाह्यांनाहि या देशाची फारशी माहिती नसे. त्याकाळीं मोठमोठ्या नद्यांच्या थडींचा प्रांत सुपीक होता व भूमीस खनिज संपत्तीहि मुबलक होती. उत्तरेकडील या नद्यांचे प्रवाह नेहमीं बदलत असत. सतलजचा

जुना प्रवाह सांप्रतच्या प्रवाहापासून जवळ जवळ ८९ मैलांवर असलेला आढळतो. अलेक्झांडरच्या वेळीं सिंधूचें पात्र नक्की कोठें होतें, तें आज कोणासच सांगतां येत नाहीं. अर्थातच श्रुतिस्मृतिकालीन नद्यांचें स्थान स्पष्टपणें ठरविणें आज पुष्कळ कठीण झालें आहे. फार काय परंतु बाराव्या, तेराव्या शतकांतील मुसुलमानी अंमलांत या नद्यांचीं जीं पात्रें होतीं, तीं सुद्धां आज राहिलीं नाहींत; पण ही स्थिति बहुश: उत्तर हिंदुस्थानांतील नद्यांची आहे; कारण, तो प्रदेश बहुतेक सपाट आहे. दक्षिणेंत अशी परिस्थिति फारशी आढळत नाहीं; कारण, या भागांत उंचसखलपणा जास्त आहे. वरील कारणांमुळेंच उत्तर हिंदुस्थानांत अत्यंत प्राचीन किंवा मध्यकालीन अनेक मोठमोठ्या नदीकांठच्या शहरांच्या जागा बदललेल्या आहेत.

प्राचीन कालच्या राजधान्या बहुधां अशा मोठमोठ्या नद्यांच्या कांठीं, किंबहुना दोन नद्यांच्या संगमावर वसविल्या जात; त्यामुळें त्यांनां सहजच सुरक्षितता लाभे. अशा राजधान्या पुष्कळ होत्या. उदाहरणार्थ प्रयाग; मध्यकालीन उदाहरण म्हणजे पाटलीपुत्राचें—ही राजधानी शोण व गंगा यांच्या संगमावर होती त्यामुळें ती शत्रूस बरीच अगम्य होती (सांप्रत शोणचा प्रवाह पाटण्याहून १।७ कोस मागें पश्चिमेस हटला असून तेथें त्याचा गंगेशीं संगम झाला आहे). नद्यांप्रमाणें समुद्रकिनाऱ्यांतहि वेळोवेळीं बदल होत जातो. त्यामुळें पूर्वींचीं बंदरें आतां देशाच्या पोटांतील गांवें झालीं आहेत. तर कांहीं त्यावेळचीं आंतलीं गांवें आज बंदरें बनलीं आहेत! ग्रीक प्रवाशांनीं वर्णिलेलीं दाक्षिणेकडील अत्यंत श्रीमान बंदरें कोरकई व कायल हीं आज किनाऱ्यापासून (तिनेवेल्ली भागांत) बऱ्याच मैलांवर आंतल्या प्रांतांत आलीं आहेत; एवढेंच नव्हे तर तीं, आज वाळूंत गडपहि होऊन गेलीं आहेत.

या मोठमोठ्या नद्या, पर्वत, अरण्यें, घांट व किल्ले यांचा संरक्षणदृष्ट्या उपयोग परवांपरवांपर्यंत हिंदुस्थानास फार होत असे. या अडचणीचा परिहार केल्याशिवाय कोणांसहि आपलें साम्राज्य टिकवितां येत नसे. पण, आगगाड्या व विमानें यांचा शोध लागून सांप्रत त्यांचा विशेष प्रसार झाल्यानें, यांचें लष्करी दृष्ट्या महत्त्व पार नाहींसें झालें. ज्या अशीरगडास 'दख्खनची वेस' म्हणत व जो फितुरीशिवाय कोणाहि राजाला घेतां आला नाहीं, त्या किल्ल्यावर आज एकहि शिपाई दिसत नाहीं; त्याच्या पायथ्याखालून आज इंग्रज सरकारच्या लष्करानें भरलेल्या अनेक आगगाड्या बिनधोक जातात! आणि जो बोरघांट चढावयास एकेकाळीं (१७८१) इंग्रजांनां १०।१२ दिवस लागले, तो आज तासांत ओलांडतां येतो! याच न्यायानें वायव्येकडील खैबर व बोलन घाटांचेंहि महत्त्व बरेंच कमी झालें आहे. कारण १९२५ सालीं खैबरघांटांत ब्रिटिश रेल्वे सुरू झाली. आज, ज्याला हिंदुस्थान सुरक्षितपणें ताब्यांत ठेवावयाचें असेल त्याला आरमार व आकाशयान यांच्यांच जोरावर तें ठेवतां येईल.

आपल्या हिंदुस्थानांत विविधता ही अनेक प्रकारांनीं पसरलेली आढळते. हवेंत अत्युष्ण, उष्ण, थंड व अतिथंड असे प्रकार आहेत; म्हणजे एका दृष्टीनें जगांतील सर्व प्रकारची हवा येथें आहे. त्यामुळें त्या त्या हवामानांत उत्पन्न होणारे पदार्थ, जगणारे पशुपक्षी, वाढणारीं फुलफळें, पिकणारीं धनधान्यें व फोंफावणाऱ्या वृक्षलता इत्यादि अनेक चमत्कार या देशांत दृष्टीस पडतात. जमीनींत सुद्धां अनेक प्रकारच्या धातू व जडजवाहीर आढळतें. या सर्व कारणांमुळेंच एके काळीं या देशास सुवर्णभूमि हें अन्वर्थक नांव प्राप्त झालें होतें. निरनिराळ्या मानववंशांचा तर हिंदुस्थान हा एक अजबखानाच होय. येथें अत्यंत रानटी माणसापासून, उच्च ज्ञान होऊन पराकोटीस गेलेल्या जीवन्मुक्त तत्त्वज्ञांपर्यंत सर्व तऱ्हेचीं माणसें दृष्टीस पडतात. हा देश म्हणजे एक खंडच असल्यानें त्यांत नानाविध जातींप्रमाणें, पूर्वीं अनेकविध राज्येंहि असत; पुराणांतून असल्या छोट्या राज्यांची संख्या पुष्कळ दिसून येते. तीच परंपरा अद्यापपर्यंत चालू आहे. मेग्यास्थेनीसनें (खिस्तपूर्व ४ थें शतक) ११८ राज्यें होतीं असें म्हटलें आहे, तर आज लहानमोठ्या एकंदर संस्थानांची संख्या ७०० आहे! यांचें परस्पर भांडण हेंच बाह्यांनां हिंदुस्थानांत प्रवेश करण्याचें आतांपर्यंतचें एक सुलभ साधन होऊन बसलें आहे.

याप्रमाणें हा देश खंडवजा असल्यानें त्याचा साग्र इतिहास एकस्यूत असा देणें हें कठिण काम आहे. सर्व हिंदुस्थान जेव्हां एकाच साम्राज्यांत अंतर्भूत होतो तेव्हां त्याचा एकस्यूत इतिहास लिहितां येतो व त्याचीं साधनेंहि उपलब्ध होतात. असे प्रसंग अशोक, समुद्रगुप्त, हर्षवर्धन, अकबर, औरंगझेब, देवगिरीकर यादव, विजयानगरकर, श्री. नानासाहेब पेशवे व सांप्रतचे इंग्रजसरकार यांच्या कारकिर्दीत आले आहेत. यांपैकीं कांहींचें

साम्राज्य कदाचित जास्त असेल व कांहींचें त्या मानानें कमी असेलहि; मात्र, वर म्हटल्याप्रमाणें या काळांतील हिंदुस्थानचीं ऐतिहासिक साधनें इतर काळांतील साधनांपेक्षां पुष्कळ आढळतात.

हिंदुस्थानांत जरी नाना मतें, नाना पंथ, नाना जाती, नाना प्रांत असले (म्हणजे इतकें विविधत्व असलें), तरी एकत्वांत समावेश करण्याची कला, आवड किंवा इच्छा हिंदुस्थानांत पूर्वीपासून आजतागाईत आढळून येते. साम्राज्याची व सम्राटची कल्पना वेदकालापासून आहे. चातुर्वर्ण्यांत अनेक जातींनां स्थान मिळालें आहे. हिंदूंची ही चातुर्वर्ण्यसंस्था जगांत इतरत्र कोठेंहि नाहीं. या संस्थेमुळें हिंदूंनीं मुसुलमानांच्या धार्मिक जुलुमापासून आपली संस्कृति कायम राखली असें पाश्चात्त्य विद्वानांचेंहि म्हणणें आहे. वेद, ब्राह्मण, गाय, विष्णु, शिव, तीर्थक्षेत्रें, रामायणभारत, साधुसंत इत्यादिकांबद्दल सामान्यतः हिंदूंची पूज्यबुद्धि असते. याप्रमाणें हिंदुधर्मानें अफाट हिंदुस्थानास एवजीव करण्याचा प्रयत्न पूर्वीचा केलेला आहे. चातुर्वर्ण्यसंस्थेपासून हिंदुस्थानास फायदे झाले कां तोटे झाले हा प्रश्न अलाहिदा आहे, म्हणून त्याबद्दल येथें विवेचन करण्याची जरूरी नाहीं. हा सनातन ब्राह्मणीधर्म जसा उत्तरेंत पूर्णपणें पसरला तसा दक्षिणेंत पसरला नाहीं. कारण, तेथें आर्यसंस्कृतीच्या पूर्वीपासूनची द्राविड संस्कृति नांदत होती. या द्राविडवंशोद्भवांनीं आर्यसंस्कृति जरी ग्रहण केली तरी आपली मूळची संस्कृति कायमची टाकली नाहीं. ह्यामुळें, अद्यापि, दक्षिण हिंदुस्थानांत या दोन्ही संस्कृतींचें मनोरंजक मिश्रण दृष्टीस पडतें. या द्रविडी लोकांच्या कांहीं धार्मिक समजुती व चालीरीती अजून द्राविडसंस्कृतींत आढळतात. या संस्कृतीच्या माहितीचीं साधनें अत्यंत अल्प असल्यानें, आर्यसंस्कृतीपेक्षां ती जुनी असतांहि, तिचा प्राचीन इतिहास लिहिला जात नाहीं.

हिंदुस्थानांत प्रातिनिधिक राज्यसंस्थेची आवड प्राचीन काळीं फारशी नव्हती गणराज्यें, स्वराज्यें, वैराज्यें. इत्यादि कांहीं प्रकार त्याकाळीं होते. राजे कधीं लोकांच्या पसंतीस आल्यास मग सिंहासनावर बसत. पण ही रीत मध्ययुगापर्यंतच दिसते. पुढें राजा हें पद वंशपरंपरायुक्त झालें, मात्र त्याच्या अधिकारास मंत्रीसभेचें कांहीं आकलन असे. मुसुलमानांच्या आगमनापासून तर राजा ही व्यक्ति एकतंत्री बनली; तरी पण जुलमी हिंदु राजे अत्यंत विरळा होत अशी पाश्चात्त्य स्मिथसारखा इतिहासकारहि कबूली देतो. फार प्राचीन काळापासून येथें ग्रामपंचायती सर्वत्र प्रचारांत असल्यामुळें राज्ययंत्राशीं प्रजेचा संबंध फार थोडा येई. या ग्रामपंचायती तेव्हांपासून इंग्रजी अंमल सुरू होईपर्यंत चांगल्या तऱ्हेनें चालल्या होत्या. इंग्रजी अंमलांतच त्या नाहींशा झाल्या; हल्लीं सरकार त्यांच्याबद्दल नुक्ताच विचार करूं लागलें आहे. [ स्मिथ--अर्लि हिस्टरी ऑफ इंडिया; ऑक्सफर्ड हि. इं; पॅटर्सन-जिआग्रफी ऑफ इंडिया; राधाकुमुद मुकर्जी-फंडामेंटल युनिटि ऑफ इंडिया; कौटिल्य-अर्थशास्त्र ].

**साधनसामुग्री**--हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास राजवंशावळींवरून समजण्यास साधारण ख्रिस्तपूर्व ६५० पासून प्रारंभ होतो. कोणत्याहि देशाचा इतिहास बनविण्यास वंशावळीचा फार उपयोग होतो. ग्रीस देशाचा प्राचीन इतिहास असल्याच वंशावळींवरून बनलेला आहे. हिंदुस्थानांत असल्या प्राचीन वंशावळी उपलब्ध असून, त्यांनां पुष्टी देणारी संदर्भात्मक साधनसामुग्रीहि पुष्कळ आढळते. ही सामुग्री संस्कृत, पाली, तामिळ या भाषांत खच्चून भरलेली असून, आतांपर्यंत तिच्यांतील थोडासा भाग हिंदी, यूरोपियन व अमेरिकन विद्वानांनीं उजेडांत आणला आहे.

ख्रिस्तपूर्व ६५० पासून ख्रिस्तपूर्व ३२५ पर्यंत म्हणजे अलेक्झांडरच्या मोहिमेपर्यंत, हिंदुस्थानची जी ऐतिहासिक माहिती मिळते, ती साधारण त्रोटकच मिळते. तसेंच निरनिराळ्या राजकालांबद्दलहि आपल्याला नक्की बोलतां येत नाहीं. त्यावेळचे कांहीं काल(शक) आढळतात; पण ते नक्की केव्हां सुरू झाले याबद्दल अद्यापि विद्वानांत वादविवाद चालू आहेत व पुढेंहि (एखाद्या निश्चित गमकाखेरीज ) ते मिटतील असें वाटत नाहीं. उदाहरणार्थ कलिवर्ष, नंदकाल, युधिष्ठिरवर्ष इत्यादि. गुप्तकालाबद्दल सुद्धां अशाच स्थिति होती. परंतु, फ्लीट यानें त्याची निश्चिति अलीकडे ठरविली आहे. त्याच्या मतें गुप्तशक हा इ. स. ३१९-२० या वर्षीं सुरू झाला (ज्ञानकोश विभाग, ५.पृ. ११२). या निश्चितीमुळें मात्र गुप्तकाळाच्या मागच्या अनेक प्रसंगांचे काल ठरविण्यास मदत झाली. बाह्यांचे (कुशान, शक इ.) शिलालेख आपल्या देशांत बरेच आढळतात; त्यांत नुसतीं वर्षें दिलेलीं असतात, पण त्यांवरून अमुक एका शकाचा काल स्वच्छ होत नाहीं. हिंदुस्थानांत एकंदर निरनिराळे ३० शक चालू होते. कनिंगह्यामनें ही संख्या

२७ दिली आहे (बुक ऑफ इं. ईराज). सारांश, या कालविषयक अनिश्चितमुळें हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाचें बरेंच नुकसान झालें आहे.

कालैक्यसंशोधनाच्या युक्तीनें हा प्रश्न थोडा फार सोडविला जातो. उदाहरणार्थ, अलेक्झांडरच्या वेळीं चंद्रगुप्त मौर्य झाला; समुद्रगुप्ताचा समकालीन मेघवर्ण हा सीलोनचा राजा होता; इत्यादि. हिंदुस्थानचा इतिहास लिहितांना परकीय लोकांनीं लिहिलेले हिंदुस्थानविषयक ग्रंथ लक्ष्यांत घेणें जरूर आहे. चिनी, सिलोनी, ग्रीक, अरबी व मुसुलमानी ग्रंथकारांनीं आपापल्या ग्रंथांत कालांचा उल्लेख केलेला असतो. मात्र, त्यांची परस्परांशीं व हिंदुस्थानांतील तत्कालीन चालू शकांशीं एकवाक्यता करण्याचें अवघड काम करावें लागतें; ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून मग त्यांचा उपयोग करावा.

हिंदुस्थानच्या ऐतिहासिक साधनसामुग्रीचे ठोकळ भाग पुढीलप्रमाणें करितां येतील. (१) शिलालेख, ताम्रपटादि अंकित लेख. (२) नाणीं, पदकें, मुद्रा. (३) पुराणवस्त्वावशेष. (४) पुराणें, दंतकथा. (५) ऐतिहासिक लिखाण, व (६) तत्कालीन परकीय लोकांनीं लिहून ठेवलेले वृत्तांत. शिलालेखांतील अत्यंत प्राचीन शिलालेख खिस्तपूर्व ३ ऱ्या शतकापासूनचेच आढळतात. त्यांत महत्त्वाचे असे अशोकाचे शिलालेख होत. ते त्यानें कोरलेल्या धर्मविषयक आज्ञा होत. अजमेर व धार येथें ज्यांवर नाटकांतील कांहीं प्रसंग कोरलेले आहेत अशा लेखशिला आहेत; तर चितोडास वास्तुशास्त्रावरील एक टीका एका शिलेवर खोदली आहे; आणि पुदुकोट्टाई संस्थानांत एका शिलेवर वीणा कशी वाजवावयाची यासंबंधीं कांहीं सूचना व खुणा आढळऱ्या आहेत; धातूंच्या पत्र्यावरचे लेख ( विशेषतः ताम्रपट ) बहुधा दानविषयक असतात. त्यांत सर्वांत प्राचीन ( खिस्तपूर्व अजमासें २०० ) असा सोहगौर ताम्रपट असून, तो सरकारी धन्यागाराविषयक आहे. हिंदुस्थानांत हीं ( शिलालेख—ताम्रपत्रें ) साधनें हजारों आहेत. नाणकशास्त्राचा आभ्यास करण्यास विशेष ज्ञान लागतें. नाण्यामुळें कालाचा बोध फार स्पष्ट रीतीनें होतो. इंडो-ग्रीक व इंडो-पार्थियन या राजवंशांचा इतिहास नाण्यांमुळेंच उजेडांत आला, व भीतरी येथें सांपडलेल्या चांदीच्या मोठ्या मुद्रेवरून दुसऱ्या कुमारगुप्ताची माहिती मिळाली. पुराणवस्त्वावशेषशास्त्रांत निरनिराळ्या काळांतील वास्तू आणि स्थापत्यशास्त्र यांचीच माहिती बहुधा असते. वेगवेगळ्या अवशेषांवरून अमका राजवंश अमक्याच्या नंतर किंवा पूर्वी झाला हें सांगतां येतें. तक्षशिला शहर उकरून काढल्यानें कुशान राजवंशाचें कोडें बरेंचसें सुटलें. स्तूप, राजवाडे, देवळें, खाजगी घरें, सांडपाण्याच्या मोऱ्या इत्यादि अवशेषांवरून तत्कालीन परिस्थितीवर बराच उजेड पडतो. तसेंच मूर्ती, भित्तीलिपचित्रें, कोरलेलीं चित्रें, लेणीं वगैरेंच्या अभ्यासानें हिंदी ललितकलेंतील अनेक अंगांची माहिती मिळते आणि जुन्या दंतकथा व पुराणें यांतून आलेले एतद्विषयक उल्लेख ताडून पहातां येतात. आपला धार्मिक इतिहास खराखुरा जाणावयाचा असल्यास वरील गोष्टींचा अभ्यास ( धार्मिक ग्रंथांच्या जोडीला ) अवश्य आहे. जेथें इतर कांहींच साधनें नाहींत तेथें दंतकथांचा उपयोग होतो. पुराणांतून व व्याकरणग्रंथांतून ( फार थोड्या ) अशा अत्यंत प्राचीन दंतकथा सांठविलेल्या असतात. सर्वच पुराणें म्हणजे निव्वळ दंतकथा होत असें नाहीं, तरी पण त्यांत आलेला इतिहास बऱ्याच काळजीनें निवडून घ्यावा लागतो. पुराणांप्रमाणेंच निरनिराळ्या वंशावळी( राजावलींचीं बाडें )पासूनहि ऐतिहासिक माहिती थोडीशी निघते. आपल्याकडे इतिहास लिहून ठेवण्याची पद्धत नव्हती असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे, तें बरोबर नाहीं. बहुतेक राज्यांत राजाचें एक वंशपरंपरा भाटा( बंदी )चें घराणें असे व त्याच्याजवळ त्या राजवंशाची वंशावळी व महत्त्वाच्या गोष्टींचें टांचण असे. नामांकित कवी किंवा भाट या वंशावळींवरून त्या राजवंशाचा इतिहास लिहीत. स्वतःच्या आश्रयदात्या राजवंशाप्रमाणेंच त्या देशावर आलेल्या अनेक राजवंशांचा किंवा व्यक्तिशः एकाद्या राजाचा इतिहास हे बंदीजन लिहीत असत व केव्हां केव्हां तर त्या इतिहासांत पुढें वेळोवेळीं भरहि पडत असे. असलीं प्रमुख उदाहरणें म्हणजे पृथ्वीराजरासा, राजतरंगिणी, हर्षचरित, व्याश्रय वगैरे होत. ही परिस्थिति मुसुलमान इकडे येण्यापूर्वीं कायम होती. त्यांचा प्रवेश इकडे झाल्यावर त्यांनीं हे (व इतर अनेक) ग्रंथसंग्रह जाळून टाकले. तत्कालीन मुसुलमानांनां प्राचीन ग्रंथसंग्रह जाळण्याची विशेष वाईट खोड होती हें प्रसिद्धच आहे. प्राचीन परकीय इतिहासकारांपैकीं हिरोडोटस-टेसिअस ( खिस्तपूर्व ५ वें शतक ) या ग्रीक इतिहासकारांनीं व मेग्यास्थेनीसनेंहि हिंदुस्थानची त्यावेळची त्रुटित माहिती दिली आहे. मात्र उलट अलेक्झांडरची माहिती कोणीहि ग्रंथकारानें स्पष्टपणें कोठेंहि दिलेली आढळत

नाहीं. इ. स. ४०० ते ७०० या दरम्यान अनेक (६३) चिनी प्रवाशी आपल्या देशांत यात्रेसाठीं व बौद्धधर्माच्या अभ्यासासाठीं येऊन गेले; त्यांनीं सुद्धां बरीच माहिती लिहून ठेविली आहे. फाहिआन हा पहिला प्रवासी होता (३९९-४१४), त्यानें चंद्रगुप्त विक्रमादित्याची हकीकत दिली आहे. ह्युएनत्संग (युअन च्वंग) यानें ७ व्या शतकांत इकडे येऊन हर्षवर्धनाची हकीकत व इतर अनेकविध उपयुक्त माहिती लिहिली आहे. मुसुलमानी इतिहासकारांत इतिहासलेखनाची दृष्टि ज्याला होती असा अल्बेरूणी हा एक होय. तो स्वतः विद्वान असून त्यानें संस्कृत भाषेचा अभ्यास करून तहकीक-ई-हिंद (हिंदुस्थानची माहिती) हा ग्रंथ लिहिला. हा अकराव्या शतकांत महमूद गझनीकर याच्याबरोबर इकडे आला होता. ऐने-इ-अकबरी, फेरिस्ता (यांचाच आधार एलफिन्स्टनच्या हिंदुस्थानच्या इतिहासास आहे), इलियट व डॅासन यांनीं प्रसिद्ध केलेल्या निरनिराळ्या फारशी बखरी, तबकात-इ-नासीरी वगैरे परकीय भाषेंतील इतिहासग्रंथांत हिंदुस्थानची माहिती पुष्कळच आढळते. मात्र ही माहिती मुसुलमानांचा प्रवेश झाल्यानंतरची आहे; व तीहि बहुतेक त्यांनींच लिहून ठेवलेली आहे. तींत ठळक दोष म्हणजे स्वजातिगौरव व हिंदुजातींविषयीं व व्यक्तींविषयीं बराचसा विपर्यस्त मजकूर देणें हा होय. त्यामुळें असल्या ग्रंथांतील माहिती काळजीपूर्वक तपासून घेतली पाहिजे. पंधराव्या शतकापासून यूरोपियन प्रवासी इकडे येऊं लागले, त्यामुळें त्यांच्याहि प्रवासवृत्तांत हिंदुस्थानची माहिती आढळते. महाराष्ट्रांतील प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकारांच्या आणि बखरकारांच्या लेखांत विशेषतः महाराष्ट्राचा इतिहास आढळतो. मोंगलदरबारांत आलेल्या जेसुइट पाद्र्यांनीं मिळविलेली माहिती बरीच उपयोगाची होईल. पोर्तुगीज, फ्रेंच, डच व इंग्लिश यांच्या व्यापारी कंपन्या येथें असल्यानें त्यांच्या सरकारी दप्तरखान्यांत तत्कालीन माहिती पुष्कळ आढळेल. मराठी साम्राज्याचें (रायगड व सातारा येथील) दप्तर बहुतेक नामशेष होऊन जें (पेशव्यांचें) थोडेंफार उरलें आहे (पुनादप्तर) त्यांत ऐतिहासिक माहिती फार थोडी आहे असें कै. पारसनीस यांचें म्हणणें होतें. त्याखेरीज मराठी साम्राज्यांतील जीं कांहीं संस्थानें आज जीव धरून आहेत, त्यांच्या दप्तरखान्यांत तत्कालीन ऐतिहासिक माहिती सांपडण्याचा पुष्कळसा संभव आहे तर इतिहासंशोधकांनीं इकडे लक्ष पुरवावें.

[ कनिंगह्याम-बुक ऑफ इंडियन ईराज; माबेल डफ-क्रॉनॉलॉजी ऑफ इंडिया; बर्जेस-क्रॉनॉलॉजी ऑफ मॉडर्न इंडिया; एपि. इंडिका १२. २२६; आर्किऑलॉजिकल सर्व्हे रिपोर्टस; आय्यंगार-एन्शन्ट इंडिया ].

**प्राचीन हिंदुस्थान**-(ख्रिस्तपूर्व १०००० ते ९००) हिंदुस्थानांत मनुष्याची अत्यंत प्राचीन वसति केव्हां झाली, हें अद्यापि नक्की समजलें नाहीं. ईजिप्त व बाबिलोनिया या देशांची मनुष्योत्पत्तीची धार्मिक कल्पना ख्रिस्तपूर्व ७ ते ९ हजार वर्षांची आहे. आपल्याकडे चतुर्युगें, अठरा मन्वंतरें व ७२० कल्पें ही प्राचीन कल्पना आहे. परंतु या युगांच्या व मन्वंतरांच्या वर्षांची स्पष्ट फोड होत नाहीं. मनुष्यांचीं व देवांचीं वर्षें असा भेद पुराणांत केलेला आढळतो. पण त्यानें सरळ संगति लागत नाहीं. म्हणूनच सृष्टि ही अनादि आहे अशीहि हिंदु समजूत आहे. १ कोटी २० लक्ष मानववर्षांचा १ कल्प होतो. सांप्रत आपण ७ व्या मन्वंतरांतील २७ महायुगें टाकून २८ व्याच्या कलियुगाच्या ५०२६ व्या वर्षांत आहों.

अर्वाचीन शोधावरून येवढेंच सांगतां येतें कीं, अत्यंत प्राचीनतम काळांत हिंदुस्थानांत मनुष्यवसति होती. अश्म (अश्मायुध) युगांतील या प्राचीनतम हिंदी माणसाच्या काष्ठ, दगड व अस्थिमय उपकरणांपैकीं कांहीं दगडी उपकरणें तेवढीं मधून मधून (विशेषतः पूर्वकिनाऱ्याकडे) सांपडतात. चिंगलपट जिल्ह्यांत दख्खनमधील त्या अश्मायुधकालीन माणसाचा शोध प्रामुख्यानें लागतो. यांचीं उपकरणें दगडांच्या पूर्वी गारांचीं होतीं व धार्मिक विधीस लागणारीं उपकरणें अगदीं प्राचीन अशी कल्पना केल्यास असें दाखवितां येईल कीं, त्याच्याहि पूर्वी हाडांचीं होतीं. तै. ब्रा. वरून दिसतें कीं, यज्ञासाठीं दर्भ कापण्यास प्राचीन काळीं घोड्याच्या बरगडीचें हाड वापरीत असत. अस्थींपूर्वी काठी हें माणसाचें मूळ हत्यार असावें असें समजतात. सत्याषाढ श्रौ. सूत्रांत असें म्हटलें आहे कीं, महावेदीजवळील चात्वाल नांवाचा खड्डा कळकाच्या काठीनें (अभ्रीनें) खणावा. या मानवसमाजाच्याहि आधीं दुसरा एक प्राचीन मानवसमाज हिंदुस्थानांत होता, पण त्याचा आतां मुळींच मागमूस लागत नाहीं. वरील गारांचीं उपकरणें वापरणाऱ्या मनुष्यसमाजांत सुधारणा होऊन त्यांनीं आपल्या या दगडी उपकरणांत जास्त सुधारणा केल्या. पहिलीं उपकरणें ओबडधोबड होतीं तर या वेळचीं उपकरणें घांसून आकार दिलेलीं,

छिद्रें पाडलेलीं व चकचकीत केलेलीं होतीं. हीं उपकरणें पहिल्या उपकरणांपेक्षां पुष्कळ जास्त प्रमाणांत (बल्लारी जिल्ह्याकडे) आढळतात. हीं वापरणारे लोक सर्व तऱ्हेचीं मातीचीं भांडीं (प्रथम हातीव व नंतर कुंभाराच्या चाकावरील कांतीव) वापरीत, जनावरें पाळीत व जमीन राबीत; सारांश, गारांचीं उपकरणें वापरणाऱ्या लोकांपेक्षां यांच्यांत बरीच सुधारणा झाली होती. पहिल्या समाजास पूर्व अश्मायुधकालीनसमाज व दुसऱ्यास नवअश्मायुधकालीन समाज म्हणतात. पहिल्या समाजांतील लोक आपलीं प्रेतें तशींच टाकून देत, तर दुसऱ्या समाजांतील लोक, थडगीं बांधून त्यांत तीं (उत्तर–दक्षिण) पुरीत. अद्यापि, ही उत्तर–दक्षिण पुरण्याची अथवा जाळण्याची चाल आपल्यांत शिल्लक आहे. संयुक्तप्रांतांत मिर्झापूर जिल्ह्यांत असें एक थडगें आढळलें आहे. दाक्षिणेंत जीं थडगीं आढळतात, त्यांत लोखंडी उपकरणें सांपडतात; त्यामुळें तीं (आयस–उर्फ) लोहयुगकालीन असावींत असें म्हणतात. तिनेवेल्ली जिल्ह्यांत तर(ताम्रपर्णी नदीच्या कांठीं) हीं प्राचीन स्मशानें पुष्कळ आढळलीं असून, त्यांतील एक ११४ एकर विस्ताराचें आहे. येथल्या थडग्यांत मातीचे मोठमोठे रांजण सांपडले आहेत. प्रेत जाळण्याची चाल (ब्राह्मणी) श्रौतस्मार्त धर्मानें सुरू केली.

निरनिराळ्या धातूंचीं उपकरणें आणि हत्यारें उपयोगांत आणण्यापूर्वीं सोन्याचा शोध माणसास लागला. हा शोध अश्मायुधकाळाच्या नंतर थोडयाच दिवसांत लागला. या काळीं पूर्वकिनाऱ्यावर वसाहत करून मोत्यें काढण्याचा धंदा आणि व्यापार करण्यास त्या लोकांनीं सुरवात केली होती. या वेळच्या कांहीं सोन्याच्या खाणी निजामच्या राज्यांत मस्की येथें आढळल्या आहेत. या खाणी अशोकाच्या (खिस्तपूर्व २४०) काळापर्यंत चालू होत्या असें दिसतें; त्या गांवीं त्याचा एक शिलालेखहि आहे. अशा प्राचीनतर वसाहती हिंदुस्थानांत इतरत्र सांपडण्याचा संभव आहे (स्मिथ–अ. हि. ३.४). यापुढें दक्षिणेंत आयसयुग सुरू झालें. या वेळचीं हत्यारें व उपकरणें लोखंडी आहेत. उत्तर हिंदुस्थानांत मात्र दगडाच्या मागून लोखंडाऐवजीं तांबें उपयोगांत आलेलें आढळतें. मध्यप्रांत, छोटानागपूर, कानपूर, वगैरे ठिकाणीं आढळलेलीं हीं तांब्याचीं शस्त्रें व वस्तू आयर्लंडांत आढळलेल्या तसल्याच वस्तूंसारख्या आहेत असें म्हणतात. यांच्याबरोबरच चांदीच्याहि वस्तू आढळल्या आहेत. ऋग्वेदरचनाकालीं तांब्याचीं उपकरणें होतीं, व अथर्ववेदरचनाकालीं लोखंडाचा शोध लागला होता अशी समजूत कित्येक लेखकांनीं व्यक्त केली आहे ती आम्हांस बरोबर वाटत नाहीं. तर लोखंडी किल्ल्यांची उपमा देणाऱ्या वैदिक लोकांनां लोखंड पूर्ण परिचयाचें असलें पाहिजे. खिस्तपूर्व ९०० च्या सुमारास कारण लोखंडाचा सर्रास उपयोग होत असे, असें मात्र सर्वच कबूल करतात.

**वेदपूर्व संस्कृतीचे अवशेष व त्या संस्कृतीचें स्वरूप**

नुकतेंच पंजाबांत हाराप्पा व सिंध प्रांतांत मोहेनजोदरो येथें पुराणवस्त्वावशेष खोदण्याचें काम सुरू झालें असून आतांपर्यंत आढळलेल्या अवशेषांत सोनें व तांबें या धातू सांपडल्या आहेत. त्याखेरीज येथें अनेक प्रकारच्या वस्तू सांपडल्या आहेत. मातीचे लहानमोठे रांजण, शाडूसारख्या पांढऱ्या मातीवर उमटविलेले बैलांचे व शिक्क्यांचे ठसे, गळ्यांतील पोंवळ्याचे व निरनिराळ्या मूल्यवान दगडांचे हार, सोन्याचीं कर्णभूषणें व निरनिराळे अलंकार, मातीचे लहानमोठे बैल, हार ज्यांत ओंवले गेले होते असे सुताचे दोरे इ. इ. वस्तू त्यांत मुख्य आहे. याशिवाय त्यावेळचीं विटकरी घरें, त्यांत केलेल्या सर्व सोई, सांडपाण्याच्या मोऱ्या, रस्ते, विहिरी, शस्त्रें वगैरे गोष्टींहि तेथें आढळल्या आहेत. हें सबंध शहर अजून(१९२६) खोदण्याचें काम चालूच आहे. तज्ज्ञांचें मत असें आहे कीं; आजपर्यंत जगांत जेवढीं जुनीं शहरें खोदून काढलीं आहेत त्या सर्वांत हें प्राचीनतम असून आर्यांचा प्रवेश हिंदुस्थानांत होण्याच्या पूर्वींचें म्हणजे द्राविडसंस्कृतीच्या वेळचें म्हणजे खिस्तपूर्व ७/८ हजार वर्षांमागचें(सुमेरियनकालीन)असावें. कांहींच्या मतें असुर व सुमेर यांच्या संस्कृतींच्याहि पूर्वींची ही संस्कृति असावी. शिक्क्यांतील अक्षरें व लिपी अद्यापि (१९२६) कोणास लागली नाहीं. सारांश उत्तर हिंदुस्थानांत ८००० वर्षांपूर्वींच सोनें व तांबें यांचीं उपकरणीं व रत्नांचे सुंदर अलंकार होत असत हें स्पष्ट ठरतें; म्हणजे त्यापूर्वी ९०० वर्षें तरी निदान या धातूंचा शोध तेथील रहिवाशांनां लागला होता असें समजण्यास हरकत नाहीं. तसेंच कुंभारकाम, नगररचना वगैरे कामें त्यावेळीं प्रचारांत होतीं असें सिद्ध होतें. एकंदरींत या गांवाच्या खननामुळें प्राचीनतम हिंदुस्थानच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाचा शोध लागेल; असो. दक्खनमध्यें मात्र लोखंडाचा शोध बराच मागून लागला असावा. यूरोपमध्यें अश्म व लोह या दोन युगांमध्यें एक ब्रॉंझयुग मानतात; तसें उत्तर हिंदुस्थानाच्या ऐतिहासिक कालखंडास मानीत नाहींत; कारण, ब्रॉंझ ही धातु उत्तर

हिंदुस्थानांत त्यावेळीं करीत नसत. मात्र करण्याचा प्रयत्न झाला होता असें या धातूचीं आतांपर्यंत जीं ४।५ च उपकरणें आढळलीं त्यावरून वाटतें. तिनेवेल्लीकडील प्राचीन थडग्यांत मात्र ब्राँझचीं पुष्कळशीं घरगुती भांडीं व वस्तू आढळतात, पण हत्यारें आढळत नाहींत.

हिंदुस्थानाचे जे अगदीं सामान्यत: दोन भाग पडतात ते उत्तरहिंदुस्थान व दख्खन हे होत. पैकीं दख्खनमधील पर्वत व भूमि ही उत्तरेकडील भूमीपेक्षां लाखों वर्षांच्या पूर्वींच वसतीला योग्य अशी झाली होती. उत्तरेकडील हिमाविन्ध्य या भागांत त्या काळीं समुद्र होता. तो नाहींसा होऊन तेथें वसतीला योग्य अशी जमीन तयार होण्यास दख्खनपेक्षां फार काळ लागला. या दोन्ही भागांचें परस्पर दळणवळण अनेक अडचणींमुळें त्या प्राचीनतम काळीं होण्यास सवड नव्हती. त्यामुळें तेथील निरनिराळ्या दोन्ही मानवी समाजांची परस्परांस फारशी ओळख नव्हती व त्यांचे व्यवहार स्वतंत्र चालत होते असें दिसतें. एकंदरींत हिंदुस्थानांत सर्वांत प्रथम मनुष्यवसति कोठें झाली असेल तर ती दख्खनमध्यें झाली असावी असा विद्वानांचा तर्क आहे. अद्यापीहि मूळचे निरनिराळे रानटी लोक जितके दख्खनमधील पहाडी प्रदेशांत सांपडतात, तितके उत्तरहिंदुस्थानांत सांपडत नाहींत. कांहीं विद्वानांच्या मतें उत्तरहिंदुस्थानांतील अरवली व मिठाचे डोंगर या पर्वतश्रेणी दख्खनमधील सह्याद्री, निलगिरी वगैरे पर्वतश्रेणींच्या इतपतच प्राचीन आहेत, व म्हणून तेथें सुद्धां दख्खनमधील प्राचीनतम वसतीबरोबरच वसति झाली होती असें त्यांचें म्हणणें आहे. या सर्व गोष्टी प्रागैतिहासिककालीन आहेत. या उत्तर-दक्षिण मनुष्यसमाजाचा परस्परसंबंध घडवून आणणारी पहिली व्यक्ति आपल्या पुराणकारांच्यामतें अगस्त्यऋषि ही होय. हा वैदिक ऋषि असून तो काशी सोडून दख्खनमध्यें उतरला होता.

उत्तरहिंदुस्थानांत अथवा दख्खनमध्यें अत्यंत प्राचीनतम जे लोक रहात होते ते कोणत्या जातीचे व कसल्या बांध्याचे होते, हें कोणासहि नक्की सांगतां येणें अशक्य आहे. पुढें पुढें तर आर्यन् व द्रविड हे दोन भिन्न मानवसमाज परस्परांत मिसळून गेले. तरी पण आजहि त्यांत दोन ठोकळ भेद दृष्टीस पडतात. गोऱ्या रंगाचे, लांब डोक्याचे, उंच, सदृढ, सुंदर व लांब नाकाचे असे लोक उत्तरहिंदुस्थानांत जास्त असून ते आर्यन्वंशीय आहेत. उलट काळ्या रंगाचे, ठेंगणे, साधारण रूपाचे, चपट्या नाकाचे व बसकट डोक्याचे असे लोक दख्खनमध्यें जास्त असून ते द्रविडवंशाचे अथवा आर्य-द्रविड मिश्र रक्ताचे आहेत. यांच्या खेरीज जे रानटी लोक आहेत, ते प्राचीनतम अश्मायुधकालीन लोकांचे वंशज असावे असें दिसतें. हिमालयाच्या पायथ्याच्या प्रदेशांत तिबेटी व मंगोलियन वळणाचे ( गुरखे, ब्रह्मीलोक वगैरे ) कांहीं लोक आहेत. महाभारतकालीं आजच्यापेक्षां तिबेट व हिंदुस्थान यांचा संबंध जास्त येत असावा. सोमवंशी आर्यांची ( पांडवांची ) टोळी त्या भागांतूनच हिंदुस्थानांत घुसली असें रा. चिंतामणराव वैद्य यांचें मत आहे. द्रौपदीनें पांच पांडवांशीं लग्न लाविलें होतें. ही एका स्त्रीनें अनेक भावांशीं लग्न लावण्याची चाल अद्यापि तिबेट व हिमालयाच्या पायथ्याकडील प्रदेश यांत चालू आहे. ही वैदिक आर्यांच्या चालीशीं अगदी विरुद्ध आहे. सीलोनमध्यें ही चाल १८५९ पर्यंत होती.

आर्यलोक हे अगदीं प्रथम उत्तरध्रुवप्रदेशांत रहात होते. तो प्रदेश त्यांचें मूलगृह होय. मनुष्यप्राणी हा चतुर्थयुगांत म्हणजे हिमोत्तर कालापूर्वीं म्हणजे २४०००० वर्षांपूर्वीं पृथ्वीवर उत्पन्न झाला. व त्याचेंहि मूलस्थान हाच प्रदेश होता असें कित्येक म्हणतात. वेदांतील अत्यंत प्राचीनतम उल्लेखांवरून लो. टिळकांनीं आर्यांचें मूलगृह उत्तरध्रुवप्रदेश ठरविलें आहे. आपल्याकडे मनूची प्रलयविषयक कथा प्रसिद्ध आहे (शत. ब्राम्हण). शेवटचा हिमकाल ( प्रलय ) खिस्तपूर्व ८००० वर्षांपूर्वीं झाला. त्याच्या अगोदर आर्यन् लोक उत्तरध्रुवप्रदेशांत रहात होते. प्रलयानंतर हे लोक मध्यआशियांत दक्षिणेकडे उतरले उत्तरध्रुवप्रदेशांत ऋग्वेदांतील अत्यंत प्राचीनतम ऋचा निर्माण झाल्या असाव्यात, असें टिळकांचें मत आहे. हें मत आम्हांस मान्य नाहीं कां कीं ऋग्वेदांतील प्रत्येक ऋचेवर दाशराज्ञ युद्धानंतरच्या कालाची छाया पडली आहे. उत्तरध्रुवप्रदेशीं वसति होती त्या काळांत ज्या कल्पना तयार झाल्या त्यांचा उत्तरकालच्या वाङ्मयांत या शिल्लक असतील एवढेंच टिळकांच्या लेखांवरून सिद्ध होईल. मध्यआशियांत आर्य हे खिस्तपूर्व ६०००-५०००च्या सुमारास स्थायिक झालेले होते. या आर्यांनीं प्रलयपूर्वकालीन आपली सुधारणा व धर्म मध्यआशियांतील स्थानांतहि राखून ठेवला होता. येथें भारतीय आर्य व इराणी आर्य एकत्र रहात होते. यावेळीं सूत काढणें, कापड विणणें, धातूकाम, नावा

बांधणें, रथ, गाड्या करणें इत्यादि कला, शहरें, त्यांत रहाण्याची रीत, क्रयविक्रय व्यवहार, कृषि इत्यादि गोष्टींची माहिती या आर्यांनां चांगली होती. विवाहादि धार्मिक व सामाजिक संस्था त्यांच्यांत असून मालमत्तेचे नियमहि ठरविलेले होते. तांब्यांचें व पितळेचे नाणेंहि त्यांनां माहीत होतें. सारांश आर्यधर्म व यज्ञ पद्धति ही हिमप्रलयोत्तरकालीन असून प्राचीनतम वैदिक धर्म व विधि हे हिमप्रलयपूर्वकालीन होते. पुढें हे आर्य लोक मध्यआशियांतून निघून हिंदुस्थानच्या वायव्येकडून पंजाबांत हळू हळू घुसले. पुढें ते तेथून गंगेपर्यंत व इकडे सिंधूनदापर्यंत पसरले. अशा तऱ्हेची आर्यन् लोकांच्या प्रवेशांची मांडणी झाली आहे. आर्यन् लोकांच्या हिंदुस्थानांतील प्रवेशाचा कालहि नक्की ठरत नाहीं. पाश्चात्य विद्वान हा काळ जितका जवळ आणवेल तितका आणतात व पौर्वात्य विद्वान तो जास्तींत जास्त लांबवितात. पहिल्यांचें म्हणणें ख्रि. पू. २४०० ते १५०० पर्यंतचा तो काळ होय; तर दुसऱ्यांनीं हा काळ ख्रि. पू. ५००० ते ३००० पर्यंत धरला आहे. लो. टिळकांच्या मृगशीर्ष--संपाताच्या मतावरून हा काल ख्रि. पू. ४००० च्या अलीकडे ओढतां येत नाहीं, असें म्हटलें आहे. आमच्या मतें वेदवाङ्मयाच्या उद्भवापूर्वींच आर्यन् लोकांची, व शकमगादींची वस्ती हिंदुस्थानांत झाली होती आणि सर्व उत्तर--हिंदस्थान आर्यन् लोकांनीं व्यापल्यानंतर वैदिक संस्कृतीचे लोक देशांत आले व त्यांनीं देश्य आर्यन् लोकांच्या संस्कृतीस नवसंस्कार दिला व नंतर हळू हळू आपली नवसंस्कृति हिमालयापासून रामेश्वरापर्यंत पसरविली. ही संस्कृति तेव्हांपासून हिंदुस्थानांतील हिंदूलोकांच्या इतकी हाडीमासीं खिळली आहे कीं, परकीयांचे विशेषत. मुसुलमानांसारख्या धर्मवेड्या लोकांचे हल्ले झाले तरी तिला अद्याप विशेषसा धक्का बसला नाहीं. आर्यांच्यानंतर हिंदुस्थानांत अनेक शतकांनीं यवन, शक, म्लेंच्छ वगैरे लोक आले. मात्र यांपैकीं प्रथम सुरुवात कधीं व कोणीं केली हें अनिश्चित आहे. दरायसच्या स्वारीचा उल्लेख आहेच त्यानंतर अलेक्झांडरची स्वारी ख्रि. पू. ३२६ त झाली; त्यानंतर बॅक्ट्रियनसत्ता वायव्येकडील प्रांतांत ख्रि. पू. २४६ च्या सुमारास कांहीं काळ होती; त्यापुढें शक आले (ख्रि. पू. २ रें शतक). मोंगलवंशीय व तुर्कवंशीय अशा सर्वच परकीयांनां आपल्या ग्रंथांतून शक हें नांव दिलेलें आढळतें. या शकांनीं पंजाब, मथुरा व काठेवाड या भागांत लहान लहान राज्यें स्थापिलीं. यांच्या मागून मध्यआशियांतील भटके यूएची हे हिंदुस्थानांत आले. त्यांच्यांतील कुशान या टोळीनें थोडेसें मोठें राज्य स्थापन केलें. कांहीं विद्वानांच्या मतें कुशान हे तुर्कस्तानचे होते. पाश्चात्य विद्वानांनीं असा एक तर्क बसविला आहे कीं, या परकीय शक--यूएची वगैरे लोकांच्या रक्ताची भेसळ उत्तर हिंदुस्थानांतील आर्यरक्तांत झाली व सांप्रतचे रजपूतलोक हे असल्याच मिश्रणाचे असावेत. इ. स. ५ व्या व ६ व्या शतकांत मध्यआशियांतून रानटी हूण लोकांची टोळधाड इराण व हिंदुस्थान या देशांवर आली. यूरोपांत जे हूण (हन्) गेले, त्यापेक्षां हिंदुस्थानांत आलेले हे हूण जास्त सुधारलेले व रंगानें उजळ असल्यानें त्यांनां श्वेतहूण म्हणतात. व्हिन्सेन्ट स्मिथ म्हणतो कीं, पुष्कळ रजपूत जाती किंवा घराणीं, तसेंच जाट, गुजर व आणखीहि कांहीं जाती या, ह्या हूण किंवा त्यावेळीं आलेल्या तत्सदृश भटक्या जातींपासून निर्माण झालेल्या आहेत (अर्ली. हि. इं. ९). या मताचा अनुवाद कांहीं पौर्वात्य विद्वानांनींहि (रा. दे. रा. भांडारकर) केला आहे. रा. चिंतामणराव वैद्य हे याच्या विरुद्ध असून, यांच्यामतें हिंदुस्थानांतील रजपूत, जाट, गुजर वगैरे जाती या मूळच्या आर्यक्षत्रिय जातीच आहेत (म. यु. भा. १). या हूणानंतर बऱ्याच काळानें मुसुलमान लोक हिंदुस्थानांत घुसले. त्यांपैकीं अरबांनीं आठव्या शतकांत प्रारंभ केल्यानंतर मागून आशियांतील निरनिराळ्या वंशांच्या मुसुलमानांनीं मधून मधून हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या. या मुसुलमानांत मोंगल, अरब, इराणी, तुर्क, अफगाण इत्यादि अनेक रक्तांचें मिश्रण होतें. या मिश्रणाचे मुसुलमान सांप्रत दख्खनपेक्षां उत्तरहिंदुस्थानांत अतिशय आहेत. अरबांची छाप सिंधप्रांतांत विशेष पडल्याचें दिसतें. महमूद गझनीकराच्या वेळीं पंजाबांत व मुहम्मद घोरकराच्या वेळीं संयुक्तप्रांतापर्यंत मुसुलमानांची आवक वाढत होती. तिला १३४०--१५२६ पर्यंत उतरती कळा लागून, ती पुन्हां बाबरच्या आगमनापासून वाढली; पण, ती पहिल्या वेळेइतकी नसून आतां देशांतल्या हिंदूंनांच मुसुलमान करून ती वाढविण्यांत येऊं लागली. शक, हूण यासारखे हे मुसुलमान लोक हिंदूंच्या चातुर्वर्ण्यांत दाखल झाले नाहींत, तर उलट हिंदूंनांच आपल्यांत ओढूं लागले; याचें कारण ते आपल्या संस्कृतीस हिंदूसंस्कृतीपेक्षां उच्च समजत असत. तसेंच उलट हिंदूंनींहि बाह्यम्लेच्छांनां चातुर्वर्ण्यांत दाखल करून घेण्याची रीत बंद करून आपल्या जाती

लखोटबंद केल्या व मुसुलमान झालेल्या लोकांनां शुद्ध करून पुन्हां हिंदुधर्मांत आणण्याचें दार बंद करून टाकलें. यामुळें साहजिक धर्मांतरित मुसुलमानांची संख्या वाढत चालली. शकहूणांनां वास्तविक धर्म असा कांहीं नव्हताच, म्हणून त्यांनां हिंदूधर्मानें प्रलोभन दाखवून आपल्या पंखाखालीं ओढलें; तसें मुसुलमानांचें नव्हतें. त्यांनां त्यांच्या समजुतीनें उत्कृष्ट असा एक धर्म होता व त्याचा प्रसार करण्यासाठीं त्या धर्मानें त्यांनां आज्ञा दिली होती आणि ती पाळल्यास स्वर्गांतील मोठमोठीं सुखें प्राप्त होतील असें आमीष त्यांनां दाखविलें होतें. असो. पंधराव्या शतकानंतर पोर्तुगीज, फ्रेंच इंग्रज वगैरे यूरोपियन लोकांचा कोंकण, मुंबई व हिमालयाच्या उतरणीवरील प्रदेश या भागांतील हिंदी लोकांशीं संबंध येऊन मिश्रप्रजा उत्पन्न होऊं लागली, तीच अँग्लोइंडियन नांवानें प्रसिद्ध आहे. पारशी, इस्रायली व आर्मेनियन या जाती हिंदुस्थानांत फार थोडया आहेत व त्यांनीं आपल्या जाती अद्यापि लखोटबंद ठेवण्याचा प्रयत्न चालविला आहे.

**भाषा**--हिंदुस्थानांत अनेक भाषा प्रचलित असून, त्यांपैकीं हिंदी, बंगाली, मराठी, गुजराती या मुख्य भाषा व माळवी, सिंधी, पंजाबी, गौडी, बहारी वगैरे गौण भाषा, मूळच्या प्राकृतभाषांपासून झालेल्या आहेत व मुख्य तीन (मागधी, शौरसेनी व महाराष्ट्रीय) प्राकृत भाषा तर संस्कृतभाषेपासून उत्पन्न झाल्या आहेत. दख्खनमधील मूळच्या द्राविडभाषेपासून तामीळ, तेलगु, मलयालम्, कानडी व तुळु वगैरे हल्लीं प्रचलित असलेल्या भाषा निघाल्या. तामीळ–तेलगू वाङ्मय पुष्कळ असून, त्यांत तामीळ भाषा या सर्व द्राविडी उपभाषेंत मुख्य व जुनी आहे. आर्यन् भाषांपेक्षां द्राविडभाषांचें स्वरूप व व्याकरण अगदीं स्वतंत्र आहे; त्यामुळें, अत्यंत जुनें (ख्रि. श. च्या प्रारंभकालाच्या सुमारचें) तामीळ वाङ्मय संस्कृत वाङ्मयापेक्षां अगदीं निराळ्या धर्तीचें आहे. तामीळ देशांचें प्राचीन नांव द्रविडदेश होतें म्हणून द्राविड या विशेषणाऐवजीं तामीळ हा शब्द रूढ झाला असावा. याखेरीज मुंड, मोनख्मेर व तिबेटी–चिनी या भाषावंशांतील कांहीं उपभाषा हिंदुस्थानांत चालतात; पण त्यांचें महत्त्व फारसें दिसत नाहीं व त्यांत वाङ्मयहि विशेषसें नाहीं.

आर्यलोक पंजाब–पंचनद–देशांत (अथवा सप्तसिंधु देशांत) पुष्कळ काळ राहिल्यानंतर हळू हळू ते पूर्वेकडे व दक्षिणेकडे वळले (ख्रिस्तपूर्व ३०००–१४००). पूर्वेकडील टोळी गंगायमुना, अंतर्वेदी, मिथिला, तिरहूत वगैरे भागांत काशीप्रयागपर्यंत पसरेली व दक्षिणेकडील टोळी सिंधूनदाच्या कांठाकांठानें पसरली. सरस्वती–दृषद्वती–कांठचा प्रदेश, ब्रह्मावर्त, ब्रह्मर्षिदेश, कुरुक्षेत्र, मत्स्य, पांचाल, शूरसेन व मथुरा वगैरे देश यापुढें हळू हळू निर्माण होऊन तेथें आर्यांनीं आपली वसाहत व राज्यें स्थापिलीं. यानंतर आर्यांच्या वसाहती सावकाश होत होत मनुस्मृतीच्या कालीं (डॉ. केतकर–इ. स. २२७) हिमविन्ध्य या मधल्या प्रदेशाला आर्यावर्त हें नांव मिळालें. या काळांत आर्यांनीं ज्या एतद्देशीय मूळच्या भौम लोकांस जिंकलें त्यांनां त्यांनीं 'दस्यु' हें नांव दिलें. आजच्या रानटी जाती, या दस्यूंचेच वंशज होत. अगस्त्यानें दख्खनमध्यें केव्हां प्रवेश केला तें समजत नाहीं, पण ख्रिस्तपूर्व अनेक शतकांच्या आधीं ही गोष्ट घडली होती. त्याच्यानंतर उपाध्याय व तपस्वी ब्राह्मणवर्गानें हें वसाहतकर्म पूर्वकिनाऱ्यानें धीरें धीरें चालविलें होतें असें दिसतें.

या वसाहतीकरणाच्या काळीं दख्खनमध्यें आंध्र, चेर, चोल, पाण्डय इत्यादि द्रविडजातीचे व संस्कृतीचे सुधारलेले लोकसमाज व राज्यें अस्तित्वांत होतीं. यांची द्राविडसंस्कृति ही आर्यसंस्कृतीपेक्षां अत्यंत भिन्न होती. त्यांच्यांत चातुर्वर्ण्यासारखी कल्पना नव्हती, व भूतपिशाच्यादि निसर्गपूजा सुरू होती. आर्यांनीं या भूतपिशाच्यांनां निरनिराळीं नांवें देऊन आपल्या देवांत त्यांचा समावेश करून घेतला व द्रविड समाजास चातुर्वर्ण्याची दीक्षा दिली. तरीपण, अद्यापि या द्राविडी लोकांत मूळच्या बऱ्याच कल्पना व चालीरीती प्रचारांत आहेत. स्मिथ म्हणतो कीं, या लोकांत सांप्रत क्षत्रिय व वैश्य हे वर्ण अस्तित्वांत नाहींत आणि सांप्रतच्या कांहीं जातींच्या, आपण क्षत्रिय आहोंत, हें ठरविण्याच्या हास्यकारक प्रयत्नांनींहि या दोन वर्णांचें अस्तित्व सिद्ध होत नाहीं (अ. हि. इं. १४). पण हें लिहितांना स्मिथ असंशोधक ब्राह्मणी कल्पनांस बळी पडला आहे. खरें पाहिलें असतां यांच्यांत लग्नाच्या व वारसांच्या कांहीं चाली, इतर हिंदु लोकांच्या चालींपेक्षां भिन्न आहेत. यांची लेखलिपी (वट्टेलुत्तु) ही ब्राह्मी लिपीपेक्षां व्हिन्सेंट स्मिथ यांस निराळी दिसते. तथापि पं. टी. गोपीनाथराव यांनीं त्रावणकोर आर्किआलाजिकल सीरीजमध्यें ग्रंथलिपीचा व अर्वाचीन तामील, तेलगू

लिपींचा उद्गव ब्राह्मीपासूनच दाखविला आहे. मि. चोकलिंगम् पिल्ले यांनीं (इंडियन रिव्ह्यू, जुलै १९११) असें म्हटलें आहे कीं, तामीळ देशांत सव्य जातीमध्यें समाजांतील बऱ्याच जातींचा म्हणजे ब्राह्मणापासून परियासारख्या अस्पृश्य जातींपर्यंत सर्व जातींचा समावेश होतो आणि वाम जातींत फक्त धंदेवाईक जातींचा समावेश होतो. या धंदेवाईक ब्राह्मणेतर जातींनीं बहुजनसमाजाच्या समजुतीविरुद्ध बंड केल्यामुळें त्या अलग झाल्या आहेत. या जातींची एकंदर संख्या सुमारें १० आहे. असो. प्राचीनकाळापासून तामील देशांत (तामीलकम्, तामीळनाडु), सोनें, मोतीं, मोत्यांचे शिंपले, शंख, मिरीं, गोमेदरत्न, हिरे व कापसाचें तलम कापड इत्यादि किफायतशीर पदार्थ उत्पन्न होत असत व त्यासाठीं परदेशच्या व्यापाऱ्यांची येजा या देशांत तेव्हांपासून सुरू होती. त्याचा परिणाम असा झाला कीं, दख्खनच्या या भागांत ल व्यापारी बंदरें व उतारपेठा या फार श्रीमंत बनल्या व त्यामुळें द्रविडी लोकांची संस्कृति बरीच सुधारली. शिवाय, द्रविडलोक हे समुद्रगमनाचा अडथळा मानीत नसून स्वतः परदेशीं व्यापारासाठीं जातीहि असत. तथापि, या काळचीं ऐतिहासिक साधनें अत्यंत अल्प आढळल्यानें जगांतील एका मानववंशाचा खरा इतिहास अद्यापि लिहिला गेला नाहीं आणि दख्खनमधील या लोकांच्या व राष्ट्राच्या इतिहासाशिवाय संबंध हिंदुस्थानचा इतिहास लिहिला जाणें शक्य नाहीं. [ स्मिथ; इंपे. ग्याझे. २ व ४; प्रीहिस्टॉरिक अँटिक्विटीज; फूट—कॅटलॉग ऑफ प्री हिस्टॉ. अँटि. मद्रास; आर्किआलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया रिपोर्टस्; लोगन—ओल्ड चिप्ड स्टोन्स ऑफ इंडिया; ग्रिअर्सन—लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया सेन्सस रिपोर्टस १९०१—११—२१; एल मोअर—द्रवीडियन इन मॉडर्न हिंदुइझम; लो० टिळक—ओरायन व आर्क्टिक होम इन दि वेदाज].

सांप्रतच्या जाती अन्न व लग्नव्यवहारांत लखोटबंद झालेल्या आहेत. त्याविरुद्ध वर्तन घडल्यास जातिबहिष्काराची शिक्षा जातगंगेकडून मिळत असे. आज चोहोंकडे नियम शिथिल झाले आहेत.

जातिभेद ही समाजाची अव्यवस्थित स्थिति होय. चातुर्वर्ण्य हें समाजाकडे कांहीं नियमानें स्पष्टीकरण करण्यासाठीं काढलेलें तत्त्व होय. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या प्रकारच्या ४ वर्गांनीं समाज पूर्णत्वास जातो. ही भारतीयांची कल्पना फारच प्राचीन म्हणजे मूलगृहकालीन असावी (पुरुषसूक्त पहा). हिचा अवशेष प्राचीन ग्रीक—इराण्यांतहि आढळतो. वर्ण याचा मूळ अर्थ जाती नसून वर्ग होता तसेंच मूळच्या चार वर्णांचा (म्हणजे त्यांच्या कपड्यांचा अथवा अंगांचा) रंग पांढरा, तांबडा, पिंवळा व काळा असून त्यावेळीं त्यांनाच अनुक्रमें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र म्हणत, असें राजवाड्यांसारख्या कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. पण स्पष्टीकरण करण्याकरतां कांहीं तरी काढलेली शक्कल या पलीकडे त्या म्हणण्यास महत्त्व देतां येत नाहीं. ऋग्वेदकालीं ब्राह्मणादि चार वर्गांस वर्ण हा शब्द लागतच नव्हता. वर्ण हा शब्द आर्य व दास यांसच लावला जाई. परंतु "कातडीचा रंग" हा अर्थ ऋग्वेदांतील वर्ण शब्दाचा नसून वर्ण याचा अर्थ मत किंवा आचार किंवा संप्रदाय याच्याजवळ जवळ होतो. तत्कालीन आर्यवर्ण आणि दासवर्ण हें वर्णभिन्नत्वहि कातडीच्या रंगभिन्नत्वावर उभारलें गेलें नसावें असें ज्ञानकोश वि. ३ मध्यें मांडलें आहे. बौद्धधर्मामुळें जाती मोडण्याऐवजीं त्या जास्त बळकट झाल्या. मनुस्मृति वर्ण व जाती यांत भेद मानते. हा स्मृतिकार वर्ण मानतो, पण जाती मात्र ९० मानतो; तसेंच या चार वर्णांत जन्मल्यानेंच आपापल्या वर्णाचा अधिकार ज्याला त्याला मिळतो, इतरांनां मिळत नाहीं, असें तो दिग्दर्शित करतो. या जाती वाढतां वाढतां ३०००पर्यंत वाढल्या आहेत. सुप्रसिद्ध इतिहासकार व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो कीं, "हिंदुस्थानांत विद्यमान असलेल्या जातींचें वर्गीकरण करतांना हल्लीं क्षत्रिय, वैश्य व शूद्र या नांवांनां कांहीं विशिष्ट अर्थ राहिलेला नाहीं. उत्तर हिंदुस्थानांत जातीविषयक तंटेभांडणांत व पुस्तकांत मात्र वैश्य व शूद्र हीं नांवें आढळतात. दख्खनमध्यें ब्राह्मणांशिवाय बाकीचे सर्व हिंदू हे शूद्र या नामाभिधानाखालीं येतात; कारण क्षत्रिय व वैश्य हीं नांवें तिकडे प्रचारांत नाहींत. स. १९०१ च्या मद्रास इलाख्याच्या सेन्सस रिपोर्टांत, ब्राह्मण ३.४ टक्के व शूद्र ९४.३ मिळून एकंदर लोकसंख्येंत हे दोनच वर्ग शेंकडा ९७.७ प्रमाणांत दाखविले आहेत. बाकीची क्षुल्लक संख्या कांहीं तेलंगी व कानडी लोकांची असून, ते मात्र स्वतःस क्षत्रिय व वैश्य म्हणवितात." (अ. हि. इं. ३९). ऋग्वेदमंत्रकालीं या चार वर्गांनां पडलेली वर्ण ही संज्ञा यजनवैशिष्ट्यामुळें पडलेली असावी. वर्ण हा शब्द पर्शुभारतीय असून त्याचा अर्थ धार्मिक वैशिष्ट्य व संप्रदाय असा

असावा. चातुर्वर्ण्याची मुख्य इमारत, समाजांत याजन-शिक्षण, रक्षण, व्यापार व दास्य या क्रिया आहेत आणि त्यांच्या अन्योन्याश्रयावर समाज रचला गेला आहे, या कल्पनेवर उभारलेली आहे. प्रथम हे ४ वर्ण वर्गस्वरूपाचे होते. ब्राह्मणवर्ग हा भारतीय युद्धाच्या सुमारास जातिरूप पावला आणि पुढें ब्राह्मणांतहि हजारों जाती लोकांस दिसूं लागल्या. त्यामुळें वर्ण व जाती या एकच असाव्यात आणि मूळ चार जाती असून मिश्रणानें किंवा संस्काररूपानें त्यांच्या शेंकडों जाती उत्पन्न झाल्या असाव्यात अशा कल्पना उत्पन्न झाल्या. मूळचे ४ वर्ण हे ४ क्रियांच्या स्वरूपांत होते. पुढें त्या ४ वर्णांनां भिन्नभिन्न संस्कार चालू झाले; त्यामुळें चातुर्वर्ण्य भिन्नकर्मांकित व भिन्नसंस्कारांकित झालें; मात्र त्यामुळें त्या वर्णांत असंगति उत्पन्न झाली. म्हणजे संस्कार ब्राह्मणाचें व कर्म शूद्राचें होऊं लागलें. त्यासाठीं आपद्धर्म निर्माण झाला. बौद्ध, जैन, चार्वाक इत्यादि पाखंडें सूत्रकालांत उत्पन्न झाल्यानें क्षत्रियवैश्यादिकांत वैदिक परंपरेचा फारसा प्रसार न होतां उलट लोप झाला व त्यामुळें ब्राह्मण व शूद्र हे दोनच वर्ण देशांत आहेत अशी कल्पना पसरली. चातुर्वर्ण्याचा शासनशास्त्रावर काय परिणाम झाला तें नक्की कोठें आढळत नाहीं. चातुर्वर्ण्याच्या तत्त्वाच्या दृष्टीनें अस्पृश्यवर्गाचें निराळें अस्तित्व संभवत नाहीं. त्यामुळें त्यांची गणना शूद्रांतच झाली पाहिजे (ज्ञा. को. 'चातुर्वर्ण्य' विभाग १३). बौद्ध व जैनधर्मांतील अहिंसा तत्त्वाचा समाजावर परिणाम झाला व त्यामुळें मांसाहार करणारे ब्राह्मण आणि मांसाहार करणारे ब्राह्मणेतर यांत अंतर उत्पन्न झालें. सामाजिक संबंध कमी कमी होत गेला व जातिभेद वाढला. मुसुलमानांच्या संबंधामुळेंहि हिंदुसमाजावर जातिभेद पक्का करण्याचा अनिष्ट परिणाम झाला. हल्लीं आढळणारें त्याचें जातिभेदामुळें स्थाणुस्वरूप त्याला आलें. पूर्वी पर्शु, दरद, शक वगैरे बाह्य म्लेंच्छांनां व्रात्यक्षत्रिय समजून त्यांनां व्रात्यस्तोमानें चातुर्वर्ण्यांत जागा मिळे. तसें पुढें होईनासें झालें. जातिभेदाचे गुणदोष पुष्कळांनीं वर्णिलेले आहेत पण अद्यापि त्याचें अविकृत स्वतंत्र व साग्र विवरण कोणी केलें नाहीं. कर्ममीमांसा, पुनर्जन्म व त्रैगुण्य या धार्मिक तत्त्वज्ञानात्मक चातुर्वर्ण्याचें व त्याच्या अनुषंगानें जातिभेदाचें समर्थन जुन्या हिंदु ग्रंथकारांनीं केलें आहे हें डॉ. केतकर यांनीं दाखविलें आहे व ते केतकरांचें मत समजून व्हिन्सेंटास्मिथनें त्यांस संमति दाखविली आहे. यासंबंधांत स्मिथचें म्हणणें असेंहि आहे कीं, हिंदुस्थानांतील सांप्रतच्या आणि भावी सुधारकांनां हिंदुस्थानांतील जाती कधींहि व केव्हांहि समूळ नामशेष करतां येणार नाहींत; कारण हिंदुस्थानाला त्यांचा उपयोग होणारा आहे. त्यामुळें फक्त चालू परिस्थितीचा फायदा घेऊन त्यांत योग्य ते फेरफार करावेत म्हणजे झालें (अ. हि. इं. ४२).

[मॅकडोनेल–हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर; वेबर–हि. अ. सं. लि; व्हिटने, लॅनमन–अथर्ववेद; मॅक्स मुल्लर–चिप्स फ्रॉम ए जर्मन वर्कशॉप; कोलब्रुक–मिसेलेनिअस एसेज्; मॅनिंग–एन्शन्ट अँड मिडिव्हल इंडिया; फ्रेझर–लिटररी हिस्टरी ऑफ इंडिया; लो० टिळक–ओरायन व आर्क्टिक होम इन दि वेदाज; पार्गीटर–डिनॅस्टीज ऑफ दि कली एज; डॉ. केतकर–हिस्टरी ऑफ कास्ट इन इंडिया; रामशास्त्री–दि इव्होल्यूशन ऑफ कास्ट; ज्ञानकोश विभाग २, ३ व १३].

सू त सं स्कृ ति का ल (ख्रिस्तपूर्व ३५०० ते २१००):– पुराणांनां निव्वळ काल्पनिक कथा मानणाऱ्यांचा काल आतां गेला. त्यांत ऐतिहासिक माहिती असते, मात्र ती तिचें निष्कर्षण करण्यासाठीं संशोधनशास्त्रामध्यें बरीच गति झाली पाहिजे असें आतां विद्वान पंडितांचें म्हणणें आहे. पुराण म्हणजे पुरातन घडलेला इतिहास. आज उपलब्ध असलेल्या पौराणिक कथांपैकीं कांहीं भाग दाशराज्ञ युद्धापूर्वीचा म्हणजे ऋग्वेदांतील अत्यंत प्राचीन सूक्तांपूर्वीचा आहे. पुराणें सांगणें हा धंदा सूतजातीचा असून तो वेदपूर्व कालीन आहे आणि यजुर्वेदीय संहिता व ब्राह्मणें या कालापासून ब्राह्मणी संस्कृतीचा संस्कार पावून चालत आला आहे. हे सूत म्हणजे अर्वाचीन भाटांसारखे असून त्यांच्याजवळ राजवंशावळी व राजवंशकथासंग्रह असे. निरनिराळ्या दीर्घकालीन सत्रांत या कथांचें ते संकीर्तन करीत; म्हणजे अशी कथासंग्रहरूपी पुराणें एक प्रकारें सूतसंस्कृतीचें वाङ्मयच होय. ही संस्कृति बहुधां गंगेच्या पूर्वेकडील प्रदेशांत जास्त फैलावली होती त्यावेळीं हिचा प्रसार इतका झाला होता आणि त्या संस्कृतीचें समाविष्टीकरण वैदिक लोकांस इतकें अवश्य वाटलें होतें कीं, त्यामुळें इतिहासपुराणांनां पांचवा वेद हें नांव मिळालें. या इतिहासपुराणांचा मांत्रवाङ्मयांत व्रात्यस्तोमकांडाशिवाय इतरत्र थोडाच उल्लेख आढळतो.

पौराणिक वंशावळयांत पुढच्या वंशावळींचें मागच्यांशीं संबंध दाखविलेला सांपडत नाहीं. निरनिराळ्या

वंशावळींचा संबंध परस्परांशीं दाखविण्यासाठीं प्रथम कालैक्य काढावें लागतें. कधीं कधीं एकच नांव अनेक व्यक्तींचें आढळतें त्यामुळें जास्त अडचण उद्भवते. साधारण प्रख्यात असे सूर्य व चंद्र हे दोन वंश राजे लोकांचे आढळतात व ब्राह्मणांत सप्तऋषींचे संप्रदाय प्रमुख मानले जातात. ऋग्वेदीय राजांनां सूर्यचंद्रवंशांचें लोढणें नाहीं. तें सूतसंस्कृतींतील देश्यराजांच्या गळीं अडकवलेलें दिसतें.

सर्व राजघराण्याची दैवी उत्पत्ति या भाटांनीं वर्णिली आहे. वैवस्वतमनूच्या इक्ष्वाकु या मुलापासून सूर्यवंश व विदेहवंश व त्याची कन्या इला हिच्या पुरूरवा या मुलापासून चंद्रवंश निघाला. मनूपासून निघालेल्या यादव, पौरव, काशी, सूर्य, दिष्ट, अनु या वंशांपैकीं यादव, सूर्य व विदेहघराण्यांच्या वंशावळी बऱ्याच मोठ्या व स्मृतिपरंपरनें बहुतेक जशाच्या तशा चालत आलेल्या आहेत. पौरव, अनु या वंशांत मध्यंतरीं खंड पडलेला दिसतो तर काशी व दिष्ट हे वंश दाशरथी रामाच्या वेळीं लोपलेले दिसतात. बाकीचे वंश कमी महत्त्वाचे असून ते उत्तरकालीं निघाले असावेत. सूर्यवंशाची वंशावळ दैवी उत्पत्ति वर्णन करण्यासाठीं आणलेले पहिले काल्पनिक पुरुष सोडून दिले असतां बहुतेक खरी आहे असें वाटतें, व तिच्यांतील राजांशीं इतर वंशावळींतील कांहीं कांहीं राजांचें कालैक्य आढळतें. या कालैक्यावरून इतिहासाचे धागे गुंतविण्यांत आले आहेत ते पुन्हां पुन्हां तपासून इतिहासाची गति अधिक निश्चित केली पाहिजे.

चंद्र ऊर्फ सोमवंशी मतिनारराजा हा सूर्यवंशी प्रसेनजिताचा समकालीन असावा.

(१) प्रसेनजित हा इक्ष्वाकूपासून १८ वा वंशज होता. इक्ष्वाकूचा काल पुढें ठरविला आहे. यादववंशी शशबिन्दु याचा बाप हा मतिनाराचा समकालीन असावा.

(२) विश्वामित्र, त्रिशंकू, हरिश्चन्द्र व जमदग्नि हे सर्व समकालीन असून जामदग्न्य (परशु) राम हे एका वेळचे असावेत.

(३) काशीराज, प्रतर्दन व सूर्यवंशी सगर हे समकालीन असून त्यांनीं तालजंघ हैहय यांचें वर्चस्व मोडलें होतें.

(४) दिष्टवंशी चक्रवर्ती मरुत्त या जामदग्न्यरामाचा समकालीन असावा.

(५) पौरववंशी भरत व दुष्यन्त हे सूर्यवंशी दिलीप, अंशुमान यांच्या वेळचे होते.

(६) उत्तरपंचाल अजमीढ हा सूर्यवंशी ऋतुपर्णकालीन असावा व पंचाल सृंजय हा दाशरथीरामकालीन असावा.

(७) यादववंशी भीम हाहि रामकालीन होता. पौरववंशी कुरु हा पंचाल सोमकाच्या वेळीं झाला.

(८) चेदी व मगध हीं घराणीं स्थापणारा चैद्य उपरिचर वसु हा परिक्षिति पुत्र (दुसरा) जनमेजयानंतर झाला.

सारांश इक्ष्वाकूपासून भारतीय युद्धापर्यंत झालेल्या या निरनिराळ्या राजवंशांनीं ठोकळ मानानें १८६० (९३ पिढ्या) वर्षांचा काल व्यापलेला असावा. इक्ष्वाकूचा ९३ वा वंशज भारतीययुद्धांत हजर होता. यावरून हें अनुमान साधारणतः देश्यराजांचें केलेलें आहे.

**दाशराज्ञ उर्फ वैदिक काळ** (ख्रिस्तपूर्वी २१०० ते १९०० ) दौष्यन्ती भरतावरून हिंदुस्थानास भरतखंड हें नांव मिळालें अशी सर्वसामान्य समजूत चुकीची असून, ऋग्वेदांत आलेल्या भरत य जातीवरून हें नांव मिळालें असें दिसतें(विभाग ३ प्र.३ पहा).दाशराज्ञयुद्धांत या भरतांबरोबर यदु, अनु, पुरु वगैरे वंश लढत होते व भरत हे सुदास राजाचे मदतनीस होते असें म्हटलें आहे. सुदास हा भरतवंशीयच होता. याच भरतांनीं विपाट व शुतुद्री यांच्या संगमांमधून पुढें भरतखंडांत मार्ग आक्रमण केला होता. हा काल भारतीययुद्धापूर्वी अजमासें ६००।७०० वर्षे असावा.

महाभारतांतीय कथांपैकीं अनेक कथा प्राचीन आहेत. नैषध, हरिश्चंद्र, दाशरथीराम, सत्यवान–सावित्री, मांधाता इ. ही मंडळी ( दाशरथीरामहि ) वेदपूर्वकालीन असावी. श्रीरामाचा काल दाशराज्ञीय सुदासाच्यापूर्वी २०० वर्षांपूर्वी येतो. रामकथेची मांडणी तीन भिन्न भिन्न प्रकारची आढळते. जैनांनीं सीतेला रावणाची मुलगी म्हटलें आहे, व बौद्धांनीं तर तिला रामाची बहीण बनविलें आहे.

सूतसंस्कृतीकाळीं जवळ जवळ आजच्यासारखी शिवविष्णुपूजा असावी. ऋग्वेदीय विष्णु व सूतसंस्कृतीय विष्णु हे थोडेसे भिन्न दिसतात. यावेळीं महादेवाचें पूजन लिंगस्वरूपांतहि होत असावें; या संस्कृतीच्या लोकांत मगानुयायी शकहि असावेत. इंद्राचें महत्त्व यावेळीं प्रजापतीस मिळालें. तसेंच स्थानिक दैवतांनां प्राधान्य देऊन मंत्रांस व क्रियांसहि महत्त्व दिलें आणि याप्रमाणें आपला श्रौतधर्म स्थानिकांस प्रिय होईल असें केलें.

यावेळीं अग्नियजनधर्म कमी होत चालला होता आणि आरण्यकीयधर्म वाढून त्यानें देश्यसंस्कृतीचें पुनरुजीवन व मांत्रसंस्कृतीचा विनाश चालविला होता. या आरण्यकीय धर्मांतूनच जैन व बौद्ध धर्मांचीं मुळें उत्पन्न झालीं.

भरतखंडांत प्राचीनकाळीं राजे व ब्राह्मण असे दोन श्रेष्ठ वर्ग होते. राजांचा जीवनक्रम म्हणजे त्यांचीं कुटुंबें व राज्यें यांचा प्रपंच करणें. त्यांनां कुलमहत्त्व असून ते पूर्वजांचा अभिमान बाळगीत व कुळांचा आणि राज्यांचा विस्तार करीत. ब्राह्मणांमध्यें ऋषींची संप्रदाय परंपरा असे, तर राजांची परंपरा पुत्र (अगर कुल) परंपरा असे. या कारणामुळें राजांच्या वंशावळींनां ब्राह्मणवंशावळींपेक्षां जास्त महत्त्व आलें. सूर्य-चंद्र-यादव इ. वंशावळींत ९०।९० पिढ्या आढळतात पण वसिष्ठ-जमदग्नि-अत्रि इत्यादि ऋषींच्या लागोपाठ १५।२० पिढ्याहि आढळत नाहींत (गुरुशिष्यपरंपरा मात्र आढळतात), याचें कारण हेंच आहे. राजवंशाची नोंद दरबारी भाटांकडे किंवा पुरोहितांकडे असावी.

पुराणांत पंजाबाकडील खळबळी फारशा येत नाहींत; गंगेच्या पूर्वेकडील विशेष येतात. पांडवांचे पैतृक देश जे उत्तरकुरु व उत्तरमद्र, त्यांवरून असें वाटतें कीं, मंत्रकालीन आर्यांचें आगमन जसें खैबरघाटांतून झालें असावें, तसें देश्य संस्कृतीच्या आर्यांचें आगमन उत्तरकुरुमार्गानें झालें असावें. रामायण, महाभारत व पुराणें यांत, उत्तर-पूर्व-पश्चिम हिंदुस्थानांतील प्रख्यात राजांच्या वंशावळी व कथा दिलेल्या आढळतात. या कथांचें मूळस्वरूप पुढीलप्रमाणें मांडलें गेलें आहे. मूळ दोन राजवंश होते;सूर्यवंश आणि चंद्रवंश. सूर्याचा उर्फ विवस्वताचा पुत्र मनु हा सूर्यवंशाचा मूळपुरुष व चंद्र उर्फ सोम याचा पुत्र ऐल पुरूरवस् हा चंद्रवशाचा मूळ पुरुष होता. सूर्यवशीय राजांचीं अयोध्या, विदेह व वैशाली येथें तीन पृथक् राज्यें होतीं; पैकीं अयोध्येचें घराणें श्रेष्ठ होतें. चंद्रवंशांत पुढें पौरव, यादव, अनु, द्रुह्यु व तुर्वस हीं पांच घराणीं निघालीं. पैकीं पौरवांनीं उत्तरहिंदुस्थान, यादवांनीं पश्चिमहिंदुस्थान व दक्षिण, अनुराजांनीं पजांब व पूर्वहिंदुस्थान व द्रुह्यूंनीं वायव्य-सरहद्दीकडील प्रदेश या ठिकाणीं राज्यें स्थापिलीं. या सर्वांत हस्तिनापूरच्या पौरव राजघराण्यास श्रेष्ठ मानीत. उत्तरेकडची सर्व राजघराणीं सूर्यवंशांत आणि चंद्रवंशांत बसविणें आणि तीं दोन्हीं वैवस्वतापासूनच उपजविणें हा अर्थात् भाटविद्येचा भाग होय. सर्व राजघराण्यांचा गौरव करण्याची ही युक्ति असली पाहिजे असें वाटतें. निरनिराळ्या राजघराण्यांचा आपआपसांत लग्न-संबंध असे व अशा कालीं हीं घराणीं एका वंशांतलीं आहेत असें मत सहज प्रसृत झालें असावें. सूर्य आणि चंद्र यांस पूर्वजत्व कसें मिळालें याविषयीं देखील कल्पना करतां येते. जपानचा मिक्याडो आपणांस सूर्यवंशी म्हणवितो व आपल्या निशाणावर सूर्य ठेवतो. वाल्मीकीनें रामायणांत ज्या लोकांस केवळ वानर म्हटलें आहे त्या किष्किंधा राष्ट्राच्या निशाणावर वानराचें चित्र होतें एवढेंच जैन रामायण सांगतें. एवंच चंद्र, सूर्य हीं ध्वज-चिन्हें असत्वींत आणि त्यांवरून वंश निघालें असावेत अशी कल्पना करण्यास हरकत वाटत नाहीं.

कोसल (अयोध्या) येथील सूर्यवंशाला सर्व पुराणांत अत्यंत श्रेष्ठ मानतात याचें कारण हा वंश पुष्कळ शतकें टिकला होता. परकीय (शक, पल्हव, कांबोज) बाह्यांनीं भरतखंडांत येऊन प्राचीनकाळींहि त्याचा उत्तरभाग व्यापला होता. त्यावेळीं त्यांनीं या कोसल-राज्याखेरीज बाकींच्या राज्यांनां बरेंच खिळखिळें करून टाकलें होतें. कोसल देश हा पूर्वेकडे असल्यानें तो कायम टिकला व त्या राजवंशाची वंशावळी अखंड राहिली. पौरव वसूनें मगधापर्यंत सर्व देश जिंकून आपल्या पांच मुलांत वांटून दिले. या पांच मुलांपासून पुढें मोठमोठीं पांच घराणीं निघालीं. अयोध्येच्या सूर्यवंशांतील निरनिराळ्या पुराणांतील उल्लेखांत अंतर पडतें. भागवत-गरुडादि पुराणांत विदेहवंश हा इक्ष्वाकूच्या निमिपुत्रापासून निघाल्याचें सांगितलें आहे. या वंशांतील जनक हें नांव व्यक्तिनाम नसून गोत्रनाम असावें. सीतेच्या बापाचें नांव सीरध्वज होतें. पुष्कळ ठिकाणीं एकच नांव अनेक व्यक्तींचेंहि आढळतें; त्यामुळें पुष्कळ वेळां त्या त्या व्यक्तींच्या कथा या एका व्यक्तीवर लादल्या जातात. सर्व वंशजांनां मूळपुरुषाच्या नांवानेंहि संबोधण्यांत येतें. सूर्यवंशाचा उपाध्याय नेहमीं वसिष्ठच आढळतो, त्यावरून वसिष्ठ हें नांव त्या कुलाची परंपरा दाखवितें. यादव वंशाविषयीं सर्व आधारांची एकवाक्यता आहे. याच कुलांत हैहय व तालजंघ या दोन शाखा प्रसिद्ध झाल्या. पौरव वंशांतील पिढ्यांबद्दल महाभारताखेरीज बाकींच्या पुराणांत एकवाक्यता आढळते. अहिच्छत्र येथील उत्तरपंचालवंश ऋग्वेदांत येतो. त्याच्या दोन शाखा सृंजय व सोमक

ह्या ब्राह्मणांत येतात. कांपिल्य येथें दक्षिणपंचालवंश होता. कान्यकुब्ज येथील वंशांत गाधि व विश्वामित्र झाले. काशी येथें काशीवंश होता. ययातीपुत्र अनु याचे वंशज पंजाब, मद्र, वृषदर्भ, केकय, शिबि या देशांत व पूर्वेकडे अंग देशांत होते. जयद्रथ हा या ( वडील ) अंगशाखेचाच होता व कर्णहि त्याच ( धाकट्या ) शाखेचा होता. मनूच्या दिष्ट ( नेदिष्ट ) पुत्राच्या वंशाला वैशाली म्हणू लागले. व वैशाली ही त्याची राजधानीहि होती.

विश्वामित्राची कथा लक्ष्यांत घेतांना प्रथम या नांवाचे पुष्कळ पुरुष झाल्याचें ध्यानांत ठेविलें पाहिजे. उ. हरिश्चंद्रकालीन विश्वामित्र व शकुंतलेचा पिता विश्वामित्र. प्रख्यात विश्वामित्र हा या विश्वामित्रगोत्राचा मूळ पुरुष असून कान्यकुब्ज देशच्या गाधीराजाचा पुत्र होता व त्याचें क्षत्रिय नांव विश्वरथ होतें. त्याचा सूर्यवंशाशीं निकट संबंध होता. त्याची आई सूर्यवंशांतीलच होती. याची वहीण सत्यवती ही प्रख्यात जमदग्नि ऋषीची आई होय व याच जमदग्नीचा पुत्र परशुराम होय. जमदग्नि व विश्वामित्र हे एकाच वेळीं जन्मले होते. विश्वामित्राच्या मामाच्या घराण्यांतीलच त्रिशंकु राजा होता म्हणून वसिष्ठाविरुद्ध विश्वामित्रानें त्याचा पक्ष धरला. या त्रिशंकूचा पुत्र हरिश्चंद्र व विश्वामित्र यांची कथा प्रसिध्दच आहे; तींतच शुनःशेप हा येतो व त्याला विश्वामित्र आपला पुत्र बनवितो. तथापि हरिश्चंद्र, विश्वामित्र आणि शुनःशेप यांच्या कथेची कृत्रिम जुळणी ही उत्तरकालीन श्रौतधर्मसंपादकांची कामगिरी आहे असें वाटल्याशिवाय रहात नाहीं. जामदग्न्य (परशु)राम हा हैहयकार्तवीर्यार्जुनाचा समकालीन होता. याची कारकीर्द हरिश्चंद्र व जमदग्नि यांच्या वेळेपासून सुरू झाली. हैहयकुल व जमदग्नीचें भार्गवकुल यांत वैर होतें. त्यामुळें पर्शुरामानें त्यांचा अनेकदां पराभव केला. कदाचित् या धांदलींत पल्हव, पारद, कांबोज, पर्शु (पारशी) इत्यादि बाह्यांनीं भारतवर्षांत प्रवेश करून धुमाकूळ घातला असावा व त्यांचा निःपात पर्शुरामानें केला असावा आणि त्यामुळें त्यानें २१ वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केल्याची कथा उद्भूत झाली असावी.

श्रीराम व त्याचा भाऊ शत्रुघ्न यांचा यादव घराण्याशीं संबंध जोडणारी एक कथा आहे. इतर पुराण्यावरून तींत थोडेसें तथ्य आढळतें शत्रुघ्नानें मधुवन तोडून तेथें मथुरा राजधानी स्थापिली. यादव वंशांत शत्रुघ्नाचा समकालीन राजा भीम म्हणून होता; या भीमाचा पूर्वज एक मधु याच नांवाचा होता. श्रीरामाच्या मृत्यूनंतर या भीमानें मथुरा काबीज केली.

पंचाल हें नांव पंच अलम् या शब्दांवरून निघालें अशी कित्येक व्युत्पत्ति देतात. सृंजय राजास पांच मुलें होतीं; त्यांच्याबद्दल त्यानें माझीं पांच (पंच) मुलें पांच राज्यांचें रक्षण करण्यास समर्थ (अलम) आहेत, असे उद्गार काढल्यामुळें हें नांव पुढें आलें. तत्पूर्वीचें क्रिवि हें नांव होतें. हें घराणें पृषताच्या काळीं नामशेष झालें.

पुरूचें राज्य मध्यदेशाच्या मध्यभागीं असल्यानें व तो प्रदेश नेहमीं युद्धयमान राष्ट्रांची रणभूमि बनत असल्यानें, त्यांत अंदाधुंदी माजून पुरूरव्यापासून मतिनारापर्यंत चालत आलेली या पौरववंशीयांची सत्ता मतिनाराचे पश्चात नष्ट झाली असावी. ही सत्ता चक्रवर्ती यादववंशीय शशबिन्दूनें बुडविली. ती सरासरी २० पिढ्या नष्ट झाली होती. ती पुन्हां शकुंतलापति प्रख्यात दुष्यन्तानें स्थापन केली म्हणून त्याला पौरववंशकर म्हणत.याचाच पुत्र चक्रवर्ती भरत होय. याच्यामुळें भरतखंड हें नांव पडलें अशी चुकीची समजूत रूढ आहे. पुन्हां अजमीढ, ऋक्ष व संवर्ण या तीन निरनिराळ्या पिढ्यांत या वंशांत खंड पडलेला दिसतो व त्यावेळींहि या पौरवांची साम्राज्यसत्ता नष्ट झाल्याचें दिसतें. त्यानंतर कुरु यानें पुन्हां आपलें राज्य स्वतंत्र केलें. तें मात्र थेट जनमेजयापर्यंत टिकलें. कुरूची प्रजा पुष्कळ होती, त्यानें कुरुक्षेत्रास आपलें नांव देऊन प्रयागापर्यंत राज्यविस्तार केला व पंचालांनां जिंकलें.

**कुरुपुरुवंशकाल उर्फ भारतीय काल (ख्रि.पू.२०००-१०००)**

मागें सांगितल्याप्रमाणें ९३ पिढ्या मोजून इक्ष्वाकु ते भारतीययुध्द यांत साधारण १८६० वर्षें झालीं. या कालांत यादव, हैहय, पौरव, कान्यकुब्ज, काशी, सूर्य, विदेह, दिष्ट, अनु, उत्तरपंचाल, दक्षिणपंचाल, द्विमीढ, मगध हे प्रख्यात राजवंश भरतखंडांत ठिकठिकाणीं राज्य करीत होते. यांचीं परस्परांत युध्दें होत आणि त्यांच्यामधील कोणी तरी शूर राजा चक्रवर्तीपद मिळवी. हें पद कांहीं कालानें दुसऱ्या एकाद्या पराक्रमी राजाकडे जाई. या कालांत जे चक्रवर्ती राजे झाल्याचें आढळतें त्यांचीं नांवें कालानुक्रमानें पुढील प्रमाणें आहेतः ययाति (पौरव उर्फ यादववंशी), शशबिन्दु (यादव), मान्धाता (सुर्यवंशी), शिबि (अनुवंशी), कार्तवीर्यार्जुन (हैहय), मरुत्त (दिष्टवंशी), सगर (सूर्य),

श्रीराम दाशरथी (सूर्य), शंतनु (पौरव), युधिष्ठिरधर्मराज भरत (पौरव), भगीरथ (सूर्य), अंबरीष (सूर्य), दिलीप (सूर्य) (पौरव). सारांश मनुपासून (मनूचा पुत्र इक्ष्वाकु) युधिष्ठिरापर्यंत ९३ पिढ्या झाल्या व श्रीराम व श्रीकृष्ण (युधिष्ठिरकालीनच) यांत २९ पिढ्या झाल्या असाव्यात. वर पुराणांतील राजावली घेऊन जे इतिहासाचे धागे जोडण्याचा प्रयत्न पार्गिटरनें केला आहे त्याचें फल दिलें आहे. तें देतांना हेंहि सांगितलें पाहिजे कीं, पार्गिटरचें हें सर्व विवेचन एक "इतिहासकल्पना" या पलीकडे गेलेलें नाहीं. दाशराज्ञयुद्ध ही एक महत्त्वाची कालमर्यादा धरून तिच्या पूर्वीच्या व नंतरच्या इतिहासाचें पार्गिटरनें चांगलें पृथक्करण केलें नाहीं. तें जेव्हां होईल तेव्हां प्राचीन इतिहासाची मांडणी करण्यांत एक पाऊल पुढें पडलें असें होईल.

पाणिनीयकाल (ख्रि. पू. १०७० ते ख्रि. पू. ५०१)

भारतीय युध्दापासून बुध्दापर्यंतच्या काळांत संस्कृतिविकास फारसा झाला नसावा. मात्र औपनिषद् विचारांचा प्रसार जास्त झाला. उपनिषदांत सर्वेश्वरीमत प्रामुख्यानें दिसतें. वृष्णिकुलोत्पन्न अवतारी वासुदेवानेंच नारदाला वासुदेव धर्म सांगितला. त्यांत हरीची भक्तियुक्त उपासना करणें व आरण्यकास प्रमाण मानणें हें तत्त्व मुख्य आहे. या वासुदेवाचें कृष्ण हें गोत्रनाम असावें, गीतेंतील धर्म व वासुदेवधर्म हे एकच आहेत अशी मांडणी करण्यांत डॉ. भांडारकरहि आहेत. उपनिषदें व दर्शनें यांतील तत्त्वज्ञान गीतेनें घेतलें आहे. भागवतसंप्रदायाचें मुख्य साधन जी भक्ति, तिचें मूळ प्राचीन तत्त्वज्ञानविषयक वाङ्मयांत आढळतें. श्रौतस्मार्त परंपरेला धरून ईश्वरविषयक कल्पना लोकांपुढें मांडण्याचें काम गीतेनें केलें. ज्ञानमूलक भक्तिप्रधान निष्कामकर्मयोग हें गीतेचें सार आहे. ऋग्वेदांत विष्णूचें महत्त्व फारसें नाहीं; पण पुढें त्याच्या परमपदामुळें पुराणांत त्याला परमेश्वर कल्पिलें आहे. गीताकालीं वासुदेव हा विष्णूचा पूर्णावतार मानीत. पांचरात्र व भागवतधर्म हे एकच. पंचरात्रसंहिता ही भागवतधर्माचा पाया होय.

कलियुगांतील राजघराण्यांची हकीकत बहुतेक सर्व पुराणांत आढळते. मात्र पाठ भिन्नभिन्न असतात. या सर्वांचा आधार भविष्यपुराण होय. पुराणांतील संस्कृत माहिती पूर्वी प्राकृतांत असावी व तिची रचना तिसऱ्या किंवा चौथ्या शतकांतील असावी. मत्स्य, वायु आणि ब्रम्हांड यांच्यांत फारसें पाठांतर नाहीं. पौरव, बार्हद्रथ, प्रद्योत, शैशुनाग, नंद, मौर्य, शुंग, काण्वायन व आंध्र यांचे वंश पुराणांत कलियुगकालीन म्हणून येतात.

हिंदुस्थानच्या इतिहासांतील कालखंड पुढीलप्रमाणें पडतातः–

१ हिंदुस्थानचा इतिहास.

२ प्रागैतिहासिक काल उर्फ बुद्धपूर्व हिंदुस्थान.

३ द्रावीड संस्कृतिकाल.

४ सूतसंस्कृतिकाल उर्फ सूर्यचंद्रवंशकाल (ख्रि. पू. ३५०० ते ख्रि. पू. २५००).

५ दाशराज्ञ उर्फ वैदिककाल (ख्रि. पू. २५०० ते २००० ).

६ कुरुपुरुवंशकाल उर्फ भारतीयकाल (ख्रि. पू. २००० ते ख्रि. पू. १०००).

७ पौराणिक उर्फ पाणिनीयकाल (ख्रि. पू. १००० ते ख्रि. पू. ५००).

८ ऐतिहासिककाल उर्फ बुद्धोत्तर हिंदुस्थान.

९ प्राचीनयुग (ख्रि. पू. ५०० ते इ. स. ५००).

१० मध्ययुग (इ. स. ५०० ते १२००).

११ अर्वाचीनयुग (इ. स. १२०० ते १८००).

१२ आधुनिककाल (इ. स. १८०० नंतरचा).

[ज्ञा. को. वि. ३; पार्गिटर–पुराण टेक्स्ट ऑफ दि डिनॅस्टिज ऑफ दि कलि एज; नेशन्स ऑफ इंडिया अॅट दि बॅटल बिट्विन पांडवाज अँड कौरवाज्; अमरकोश; श्रोडर–इंडियन लिटरेचर अँड कलचर; विंटरनिट्झ–हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर; भांडारकर–शैविझम अँड वैष्णाविझम; विष्णुपुराण; गृह्यसूत्रें; अष्टाध्यायी].

## बौद्धकालीन हिंदुस्थान.

(ख्रि. पू. ५००–५२३)

भारतीय युद्धानंतर व बुद्धजन्मापर्यंत हिंदुस्थानांत जो इतिहास घडला त्याची माहिती देणारीं उपलब्ध साधनें अत्यंत अल्प आहेत. जुनाट शहरें उकरून काढण्याचें काम हल्लींपेक्षां जास्त प्रमाणांत झाल्यास हीं साधनें जास्त उपलब्ध होतील. पाटलीपुत्र व तक्षशिला यांच्या जोडीला उज्जनी, काशी, दिल्ली, मथुरा, द्वारका, अयोध्या कांची, प्रयाग, पैठण इत्यादि प्राचीन राजधान्यांचे अवशेष उकरून काढले पाहिजेत. या राजधान्यांत प्राचीन काळापासून पुष्कळ शतकें निरनिराळे राजवंश राज्य करीत होते.

कीकटांतलि इंद्रास पायस न देणाऱ्या मगंदचा उल्लेख ऋग्वेदांतच आहे. मग हे कीकटांमध्यें यजुर्वेद कालाच्या इतक्या अगोदर स्थापन झाले होते कीं देशास मग हें नांव स्थापन झालें होतें आणि तेथील लोकांस मागध हे नांव पडलें होतें? सध्यां देखील मग ब्राह्मण गयेस आहेत. मागध हे परकीय लोक आहेत ही भावना यजुर्वेदांत दृष्टीस पडते पुरुष यज्ञांत त्यांनां बळी देण्यासाठीं शिफारस केलेली आहे आणि व्रात्यस्तोम हा त्यांच्यासाठींच तयार झाला. मगध या लोकांचें मगध (दक्षिण बिहार) राष्ट्र हें प्राचीन काळापासूनच पुढें आलेलें असून जैन व बौद्धधर्माचाहि त्याच्याशीं निकट संबंध येतो. या देशांत गिरिव्रज (गया जिल्हा) येथें शिशुनाग (नाक?) नांवाच्या एका सरदारानें ख्रि. पू. ६४२ च्या वर्षी राज्य स्थापिलें. त्याचा पांचवा वंशज बिंबिसार श्रेणिक (ख्रिस्तपूर्व५८२–५५४) यानें अंग (भागलपूर व मोंगीर जिल्हे) देश जिंकून राज्य वाढविलें.हा जैनधर्मीय असावा.याच्या वेळीं इराणचा राजा दराअस यानें ख्रिस्तपूर्व ५१६ च्या सुमारास सिंधुथडीचा प्रांत जिंकल्याचें आढळतें. हा प्रांत त्याच्या राज्याचा २० वा व अतिसमृद्ध (१कोटी रु. उत्पन्नाचा) असा सुभा होता. हा सुभा अलेक्झांडरच्या स्वारीच्या पूर्वीच इराणी राज्यांतून निसटून हिंदुस्थानच्या साम्राज्यांत आला. इ.स.च्या ४ थ्या शतकापर्यंत वायव्येकडील प्रांतांत आढळणारी खरोष्ठी लिपि ही बहुधा या इराण्यांनींच तिकडे पसरविली असावी. ती लिहिण्यांत ब्राह्मीच्या उलट आहे तरी पण वळण ब्राह्मीसारखें आहे. या इराणी असुरांचा व शिशुनागराजवंशाचा स्नेहसंबंध असावा. बिंबिसाराचा मुलगा अजातशत्रु(ख्रि.पू.५५४–५२७)उर्फ कुणिक यानें शोणगंगा संगमीं पाटलीपुत्र(पाटणा)शहर स्थापून कोसल व लिच्छिवी राज्यावर स्वाऱ्या केल्या व त्यांनां मांडलिक बनविलें. त्याची आई लिच्छिवीराजकन्या व त्याची राणी कोसलराजकन्या होती. लिच्छिवी वंश हा फार जुना असून त्यानें जवळ जवळ एक हजार वर्षें आयुष्य काढलें. पाटण्याहून उत्तरेस १४ कोसांवरील वैशाली ही लिच्छिव्यांची राजधानी होती. लोकांनीं निवडलेल्या नायकानें राज्य चालवावें असा या जातीचा नियम होता. प्रेतें टाकण्याच्या, फौजदारी कायद्याच्या व इतर गोष्टींवरून हे लोक मूळचे मोंगोलियन धर्तीचे डोंगरी होते असें म्हणतात. गौतमबुद्ध ज्या शाक्यकुळांत जन्मला तें कुळ या लिच्छिवी जातीपैकींच एक होय.स्मिथच्या मतें हा गौतमबुद्ध जन्मानें मोंगोलियन असावा व हल्लींच्या गुरख्याप्रमाणें मोंगोलियन चेहऱ्यामोहऱ्याचा व तिबेटी ठेवणीचा असावा. बील व फर्ग्युसन बुद्धाला शक किंवा तुराणी वंशीय म्हणतात. पहिल्या चंद्रगुप्ताची राणी ही लिच्छिवि राजकन्या होती व सातव्या शतकांतहि नेपाळचें राज्य या घराण्यांत नांदत होतें.स्मिथच्या मतें जैनधर्मसंस्थापक महावीर हा सुद्धां मांगोलियन डोंगरी मनुष्य होता. अजातशत्रूनंतर त्याचा पुत्र दर्शक (ख्रि. पू. ५२७–५०३) व त्याचा पुत्र उदय हे गादीवर आले. उदयानेंच पाटलीपुत्राजवळ कुसुमपूर शहर वसविलें. अजातशत्रूच्या काळीं बौद्ध व जैन हे दोन्ही धर्म विशेष पसरल्यानें त्यानें दोन्हीं धर्मांनां मदत केली होती.बौद्धांनीं अजातशत्रु हा पितृघ्न होता म्हणून मत्सरानें ठठविलेली कथा गप्प असावी. बिंबिसार हा महावीर वर्द्धमान तीर्थंकर आणि गौतमबुद्ध या दोघांचाहि समकालीन होता. अजातशत्रूनेंहि या दोघा धर्मसंस्थापकांची गांठ घेतली होती. त्याच्याच राजवटींत गौतम मेला.

**बौद्धपंथ व जैनपंथ**–सनातन भक्तियोग उर्फ नारायणीय धर्माच्या भरभराटीच्या वेळीं दुसरे विचारसंप्रदाय अस्तित्वांत असावे; बौद्ध व जैनपंथ हे त्यांपैकींच होत. बुद्धकाळीं जग व ईश्वर यांच्या संबंधींच्या प्रश्नांवर मोकळेपणानें विचार चालत. उत्तरकालीन जैनग्रंथकारांनां आजीविक हा पंथ माहीत होता, पण बौद्ध त्याला निर्ग्रन्थ म्हणून म्हणत. वास्तविक हा पंथ स्वतंत्र होता. कांहीं विद्वानांच्या मतें हा वैष्णवपंथ आहे. हा बुद्धापूर्वी पुष्कळ दिवस अस्तित्वांत असून, मौर्यकालीं तो जास्त पुढें आला. बौद्ध व जैनपथांनीं यज्ञसंस्था बुडविली हें मत खरें दिसत नाहीं. तत्पूर्वी आरण्यकीय विचारानेंच ती लुप्त होत चालली होती. महावीरानें जैन धर्म स्थापन केला नाहीं तर त्यांत सुधारणा केली; कारण, सद्धर्मालंकारांत त्याच्यापूर्वी पूर्णकाश्यपबुद्ध व मंखली गोशालादि सहा तीर्थंकरांचीं कथा आलेली आहे. बौद्धसंप्रदाय हा स्वतंत्र असून जैनसंप्रदायापासून निघाला नाहीं. जैनपंथांचें प्राचीन नांव 'निश्चित' असें होतें व दिगंबरपंथापूर्वी या संप्रदायांत सात निरनिराळे पंथ होतें. महावीराचे अनुयायी यांस पाखंड (निन्हव) म्हणत. अर्वाचीन जैनवाङ्मय बरेंच उपलब्ध आहे; मात्र प्राचीन उपलब्ध नाहीं. बौद्धसंप्रदायाचा पगडा प्रारंभीं मगध, कोसल, वत्स व अवंती या चार देशांत होता. हीं चार राजघराणीं शरीरसंबंधानें बद्ध झालीं होतीं, तरी त्यांच्यांत नेहमीं

भांडणें चालत. कोसलराज प्रसेनजित व मगधराज अजातशत्रु यांचें वितुष्ट असून पुढें ते विवाहानें संबद्ध झाले. अवंतीराज प्रद्योत व कौशांबीराज उदयन हेहि असेच वैरनाशानंतर सासरेजांवई झाले होते. मगधाचें प्राचीन बार्हद्रथ घराणें गौतमाच्या वेळेपर्यंत होतें. ख्रि. पू. ७ व्या शतकांत हिंदुस्थानांत निरनिराळीं प्रसिद्ध राज्यें होतीं.

गौतमकालीन शाक्यसमाजाची माहिती चांगली उपलब्ध आहे. त्यांची संख्या १० लाख असून, ते आपला राजा निवडीत व निरनिराळ्या शहरीं सभागृहें बांधीत. दूधदुभतें व तांदुळ यांवर त्यांची उपजीविका चाले. बौद्धमत–उदयाच्या वेळीं अंग, मगध, काशी इत्यादि जातिनामांवरून हिंदुस्थानचे १६ विभाग पडले होते. दक्षिणेकडील पैठण हेंच काय तें बौद्धग्रंथांत त्या दिशेकडील दूरचें गांव म्हणून आढळतें. अयोध्या, वाराणसी, चंपा, कौशांबी, राजगृह, इत्यादि शहरें उत्तरेकडे प्रसिद्ध होतीं. निकायांत समुद्रप्रवासाचें वर्णन आढळतें. ग्रामपंचायतीच्या धर्तीवर समाजरचना असून, जमीनीवर कोणाचा मालकी हक्क नसे. समाज चातुर्वर्ण्य असूनहि सामाजिक दर्जा बदलण्याची परवानगी होती. अनुलोमप्रतिलोमविवाह होत. बौद्धकालीन शहरें तटबंदीचीं असत. इमारती एकमजली व गवती छपराच्या असत. पुष्कळ धंदे प्रचारांत असून त्यांचे १८ संघ होते. नाणीं व हुंड्या प्रचारांत असून लोकांची सांपत्तिक स्थिति उत्तम होती. भिक्षूंचे अनेक पंथ असून, त्यांचा व्यवहार सामान्य कोसली भाषेंत चाले. ब्राह्मणांचें वर्चस्व यावेळीं सर्वांवर नसावें, तें पुढें मात्र जास्त जास्त होत गेलें. त्यासाठीं ब्राह्मणांनां आपलें वाङ्मय फिरवावें लागलें; त्यामुळें त्यांचा इतिहास एकांगी बनला. बौद्धधर्मांत तिपिटक ग्रंथसमूहास फार महत्त्व आहे. त्यांत कोठें कोठें बुद्धाचीं प्रत्यक्ष वचनें आहेत. खेरीज त्याचीं संभाषणें, गीतें, कथा व सांप्रदायिक नियम यांचा संग्रह या ग्रंथांत आहे; मात्र त्याचे भाग निरनिराळ्या काळचे आहेत. सिंहली बौध्द लेखक त्याचा रचनाकाल ख्रिस्तपूर्व २४२ असा देतात. या ग्रंथांतील मज्झिमनिकायांत प्राचीन संप्रदाय व बुद्धाची उपदेशपद्धति आढळते. ग्रंथांत दृष्टांत भरपूर असून ते सयुक्तिक व विनोदी आहेत आणि त्यामुळें तत्कालीन सांस्कृतिक इतिहास समजतो. धम्मपदांत नीतिविषयक सुभाषितसंग्रह आहे. थेर व थेरीगाथा हे दोन सुंदर काव्यसंग्रह वृद्ध भिक्षु व भिक्षुणी यांनीं रचले आहेत; त्यांत आध्यात्मिक तत्त्वें व तत्कालीन परिस्थिति रेखाटली आहे. जातक कथा या लौकिककथांना धार्मिक स्वरूप देऊन तयार केल्या असाव्यात. हीं जातकें लोकप्रिय असून त्यांनीं भारतीय संस्कृतीचा प्रसार सर्वत्र केल्यानें त्यांचें महत्त्व सर्व दृष्टींनीं आहे. बुद्धवंशांत २४ बुद्धांच्या कथा आहेत. कथावत्थू हा ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांतील बौद्धधर्माचा आदर्शग्रंथ होय. तिपिटकेतर वाङ्मय कांहीं पालींत कांहीं शुद्ध संस्कृतांत व कांहीं मिश्र संस्कृतांत आहे. सांप्रत हिंदुस्थानांत बौद्धपंथ नामशेष झाला असून सीलोन, जपान, चीन, तिबेट, सयाम इ. देशांत तो प्रचलित आहे.

मगधांत हे दोन्ही धर्म उत्पन्न होण्याचें कारण या वेळचे तेथील राजवंश (लिच्छिवि, शैशुनाग, शाक्य इ.) खरे आर्यक्षत्रिय नसावेत. बुद्ध व महावीर यांना व्रात्यक्षत्रिय असें ब्राह्मण लोक म्हणत. शिवाय मगधांत भारतीय आर्येतर मंगोलियनवंशीय लोकहि बरेच रहात असावेत खेरीज ब्राह्मणी धर्माचें कठोर क्रियाकांडात्मक आचरण त्यांना पाळतां येणें अशक्य झालें असावें. यज्ञसंस्थेंतील कांहीं प्रकारां(बलिदान)मुळेंहि त्या संस्थेविरुद्ध चळवळ सुरू झाली असावी. यामुळें ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकांत पुरातन ब्राह्मणी धर्माच्याविरुद्ध जोराची खळबळ सुरू होऊन निरनिराळे धार्मिक पंथ उदयास आले; पण त्यांपैकीं जैन व बौद्ध यांखेरीज बाकीचे सर्व नामशेष झाले. जैनपंथ बौद्धपंथापेक्षां फार थोडा पसरला, पण तो त्याच्यासारखा नष्ट न होतां अजून थोडाफार (राजपुताना व पश्चिमहिंदुस्थान) टिकून आहे. मध्यंतरीं त्याला अनेक राजांनीं आश्रयहि दिला होता. महावीरानें आपल्यापूर्वीं अडीच शतकें होऊन गेलेल्या पार्श्वनाथानें स्थापलेल्या धर्माचा जीर्णोद्धार केला. गौतमानेंहि प्राचीन बौद्धांच्या धर्माचा उद्धार केला असें सांगतात.

**महावीर व जैनपंथ**–महावीराचें खरें नांव वर्द्धमान असून तो वैशालीच्या एका लिच्छिवि सरदाराचा पुत्र होता. त्यानें संसारत्याग करून पार्श्वनाथपंथाची दीक्षा घेतली. वयाच्या ४२ वर्षीं केवल ज्ञान झाल्यानंतर चतुर्विध संघाची स्थापना केली व चालत आलेल्या जैन धर्माचा पुनरुद्धार केला. तदनंतर ३० वर्षें मगध, विदेह, मिथिला, अंग, बंग, काशीदेश, वत्स, दशार्ण या भागांत त्यानें उपदेश करीत काळ घालविला. भिक्षु

व भिक्षुणी या त्याच्या शिष्यांत असत. तो पावा ( पाटणा जिल्हा, बिहार) येथें निर्वाण प्रत गेला (खिस्तपूर्व ५२७) तेव्हां त्याचे १४ हजार शिष्य होते. विदेह, मगध व अंग या राजघराण्यांशीं त्याचें दूरचें नातें असावें असें कित्येकांस वाटतें तेथील सरकारांचा त्याच्या धर्मास पाठिंबा मिळाला. जैन हा बौद्ध संप्रदायांतील एक पंथ आहे अशी कांहीं पंडितांची समजूत होती; पण ती चुकीची आहे. हे दोन्ही धर्म निराळे आहेत. दोन्ही धर्म वेदांनां प्रामाण्य देत नाहींत व पशु यज्ञांच्या विरुद्ध आहेत. चातुर्वर्ण्याविरुद्ध व ब्राह्मणी देवांविरुद्ध यांनीं खटपट केली कीं नाहीं याबद्दल वाद आहे; पण केली असें धरलें तरी जाती नष्ट न होतां उलट जास्त झाल्या.

बौद्ध दंतकथांत इन्द्र, ब्रह्मा इत्यादि देवता येतात व सीलोनमध्यें सांप्रतहि विष्णु व शंकर यांनां बुद्धाचे अनुचर मानण्यांत येतें. जैनांपैकीं कांहीं लोक हल्लीं सनातनी ब्राह्मण उपाध्यायांकडून आपलीं कांहीं धार्मिक कृत्यें करवितात व कांहींजण आपला समावेश खानेसुमारीच्या रिपोर्टांत हिंदु या नांवाखालीं करवितात. सारांश ब्राह्मणधर्माहून फार दूर नसल्यामुळें जैनधर्माची वाढ परदेशांत झाली नसावी. बौद्धधर्म मात्र परकीय बाह्यांच्या सोईला उपयोगी पडेल अशा तत्त्वज्ञानाचा व आचारविचारांचा प्रथमपासूनच बनलेला असल्यामुळें त्याचा पगडा परदेशांत जास्त बसला. बौद्धांनीं आपल्या भिक्षूंच्या संघांनां जास्त महत्त्व देऊन सांप्रतच्या मिशनऱ्यांच्या पद्धतीप्रमाणें त्यांच्यामार्फत धर्माचा प्रसार केला. जैन हे अनेकांतवादी असून सर्व वस्तुजातांनां (माणसें, जनावरें, वृक्ष, दगड, वारा, अग्नि इ.) जीव आहे असें मानतात.त्यांचा ईश्वर म्हणजे सर्वसमर्थ, अत्युच्च, सर्वशक्तिमान असा असून त्यानें हें जग उत्पन्न केलें नाहीं असें ते म्हणतात. या धर्माचें मुख्य तत्त्व अहिंसा हें ब्राह्मणी व बौद्ध अहिंसेपेक्षां जास्त सूक्ष्म आहे. त्यामुळें गुजराथच्या कुमारपाल राजानें हा अहिंसानियम मोडल्याबद्दल पुष्कळ अपराध्यांनां देहदंडाची शिक्षा दिली होती. मनुष्याचें मन दुखविणें हेंहि अहिंसेच्या सदरांत पडतें. परंतु राजानें खुनी माणसास देहदंड करणें व न्यायाधिशानें त्याला ती शिक्षा फरमाविणें हा मात्र अपवाद आहे. नाना प्रकारच्या देहदंडना करून व नियम पाळून मनावर तावा ठेवण्यास या धर्मांत सांगितलेलें आहे. उपवास करीत करीत देहपात करण्यास या धर्माची आज्ञा आहे. जातीभेद नष्ट करण्याबद्दलहि यांत सांगितलें आहे, पण हल्लीं जैनांत सनातनी हिंदूंप्रमाणेंच जातिभेद कडक आढळतो. दुसऱ्या शतकांत या धर्मांत श्वेतांबर व दिगंबर हे दोन पंथ पडले. श्वेतांबरांतील स्थानकवासी नांवाच्या अलीकडील एका पोटपंथास मूर्तिपूजा मान्य नाहीं. दिगंबरांतहि मूर्तिपूजा अमान्य असलेला एक पथ आहे.

**बुद्ध व बौद्धपंथ**--वास्तविक बुद्धाच्या चरित्राचें सूक्ष्म परीक्षण आतांपर्यंत झालेलें नाहीं. ललितविस्तरांत भिक्षूंच्या विनंतीवरून भगवान् बुद्धानच हें चरित्र सांगितलें आहे. देवांनीं विनंति केल्यावरून तुषित येथील बोधिसत्त्वानें मायावती (शाक्यकुलांतील) च्या पोटीं खि. पू. ५६० च्या सुमारास कपिलवस्तु नांवाच्या नगराजवळील लुंबिनी राईत जन्म घेतला. त्याच्या लहानपणीं ईश्वरीसाक्ष पटविणारे चमत्कार घडले. गोपा नांवाच्या कन्येशीं त्याचा विवाह झाला. जरामृत्यू हीं दुःखें पाहुन विरक्त होऊन तो वैशालीस गेला. राजगृहीं बिंबिसारराजानें त्याला राहण्याचा आग्रह केला. तेथून तो गयेला गेला व तेथें त्यानें घोर तप केलें. त्यावेळीं मारा(मदना)नें त्याला मोहविण्याचा व्यर्थ प्रयत्न केला. तपानें बोधप्राप्ति होणार नाहीं हें जाणून आहार मिळवून तो बोधिमंडाकडे गेला. बोधिद्रुमाखालीं तो आसनस्थ असतां पुन्हां मारानें त्याला मोहांत अडकविण्याचा प्रयत्न केला, पण तो व्यर्थ गेला व त्यामुळें बुद्धाला बोधिसत्त्वाची प्राप्ति झाली आणि देवांनीं त्याला धर्मचक्रप्रवर्तनाविषयीं विनंति केली. शेवटीं त्यानें सारनाथ येथें प्रथम ५ शिष्य मिळवून पुढें शें. डों लोकांस उपदेश करून कुशीनगर येथें आपला अवतार संपविला ( खि. पू. ४७८ ). या चरित्राचें चिकित्सेनें निरीक्षण केल्यास पुढील गोष्टी पुढें येतात—पुराणकारांनीं बुद्धाचें खरें नांव व कुल नक्की सांगितलें नसून एक कल्पना म्हणून बुद्धावतार कल्पिला आहे. कै. गो. का. चांदोरकर तो कीकट ( कैकाडी ) जातींत जन्मला असें समजतात. पण कीकट प्रदेशांत जन्मला एवढेंच फार तर सिद्ध होईल. त्याच्या घरची स्थिति सांपत्तिक व नैतिक दृष्ट्या फार वाईट होती असें ग्रंथ पहातां दिसूं लागतें. त्याला दहा वैगुण्यें असल्यानें व त्याचें शरीर रोगयुक्त असल्यानें तो अरण्यांत गेला. त्यानें मनावर विजय मिळविण्याचा प्रयत्न केला, पण सासरा व मेव्हणा यांचा नाश करण्याची तो खटपट करीत होता.

बुध्दाचा सासरा आणि मेहुणा या दोघांच्या जातिविषयक कल्पना स्वार्थमूलक होत्या, असें चित्र

त्याच्या अनुयायांनीं रेखाटलें आहे. त्याच्या ईश्वरविषयक व वेदविषयक कल्पना निश्चितपणें समजत नाहींत. त्याची ओरड जातिभेदापेक्षां ब्राह्मणांविरुद्ध जास्त दिसते. बुद्धाची अपूर्वता ज्ञानमूलक किंवा आचरणमूलक नसून संघचालकत्वमूलक होती. प्रथम या धर्माचा उदय मगधकोसलांत झाला. बुद्धानंतर अशोकानें तो वाढविला. पुढें कनिष्काच्या काळीं त्यांत महायान व हीनयान दोन भेद पडून त्याची एकी नाहींशी झालेली दृष्टीस पडते आणि शेवटीं ८ व्या शतकापासून हिंदुस्थानांत त्याचा ऱ्हास चालू दिसतो या संप्रदायामुळें शिल्पकला व चित्रकला यांनां मात्र उत्तेजन मिळून स्तूप, चैत्य, विहार वगैरे स्थापत्य पुढें आलें आणि सिंहलद्वीप, पांड्यदेश, कांची बनवासी, महाराष्ट्र, अपरांत या दाक्षिणदेशांत याचा प्रसार झाला. पुढें त्याला कोणी पुढारी राहिला नाहीं. शैववैष्णव पंथांकडून त्याला जोराचा विरोध झाल्यामुळें हा धर्म दक्षिणेंतून उचकटला.

**बौद्धविचारांचें स्थूलस्वरूप**—सनातनधर्माप्रमाणें पुनर्जन्म व कर्मवाद बुद्धानें गृहीत धरून जन्म म्हणजेच पाप होय व उत्तम कर्मांनीं हें पाप टाळतां येतें म्हणजे पुनर्जन्म होत नाहीं व उत्तम कर्में घडण्यास आचार, विचार व उच्चार यांत नीतिमत्ता कडक असावी लागते या मुख्य मताचा प्रचार केला. यासाठीं त्यानें दहा आज्ञा ("दससीलम्") प्रसिद्ध केल्या; त्या म्हणजे, हत्या न करणें (अहिंसा), अस्तेय, व्यभिचार न करणें, सत्यभाषण, चहाडया न सांगणें, दोष न देणें, निर्लोभ, निर्द्वेष, वडिल माणसांनां मान देणें व व सजीव प्राण्यांबद्दल आदर ठेवणें या होत. चार सत्यें व आर्य अष्टांगिक मार्ग (विश्वास, विचार, भाषण, कृति, उपजीविकासाधन, यत्न, स्मृति, ध्यान हीं सत्य असावीं), म्हणजे केवळ संन्यास व केवळ विषयसेवन यांच्यामधील मार्ग बुद्धानें काढून त्यास मध्यम मार्ग असेंच नांव त्यानें दिलें. गृहस्थधर्मांत स्त्रीपुरुषांनां मोक्ष (निर्वाण) जितक्या प्रयासानें मिळेल, त्यापेक्षां अल्प श्रमानें संघांत दाखल झालेल्या भिक्षुभिक्षुणी यांनां थोड्या काळांत मिळेल असें त्याचें तत्त्व होतें. संघांत भिक्षुणींनां मोठेसें महत्त्व नव्हतें. हे भिक्षुसंघ बुद्धाच्या वेळीं शिस्तीचे, श्रीमंत व एकबंधुत्व ऊर्फ आत्मीय भावनेचे बनले होते; त्याच्यानंतरहि कांहीं काळ हे गुण त्यांच्यांत असल्यानें त्यांनीं आशियाखंडांत आपल्या धर्माचा प्रसार केला. केवळ हिंदुस्थानांतून चीनमध्यें प्रसारास जाऊन ग्रंथकार बनलेल्या ७९साधूंची माहिती "हिंदुस्थान व जग" या पुस्तकांत दिलीच आहे. ईश्वर आणि आत्मा यांच्या स्वरूपाविषयीं व जगाच्या अनंतत्वाविषयीं बुद्ध हा कधींहि वाद घालीत नाहीं. साधारणपणें तो निरीश्वरवादी व वेद–अप्रामाण्यवादी आहे, परंतु हिंदु देवता व भोळया समजुती यांच्या विरुद्ध फारसा नाहीं. लौकिक बौद्धधर्म हा शास्त्रीय प्रणीत बौद्धधर्मापेक्षां पुष्कळ सुलभ होता. बुद्धानें नवीन धर्म काढला असें म्हणण्याऐवजीं, स्वतः ठरविलेल्या व्यवहारोपयोगी नीतिशास्त्राच्या तार्किक पायाला उपयोगी पडतील अशीं अध्यात्मविषयांतील कांहीं गूढ प्रमेयें शोधून त्यांचा त्यानें प्रसार केला हें म्हणणें जास्त खरें ठरेल, असें कांहीं पंडितांचें मत आहे. बुद्धाबद्दल त्याच्या शिष्यांत इतकी भक्ति होती कीं, त्याच्या मृत्यूनंतर थोडयाच काळांत त्यांनीं त्याला देवत्व दिलें आणि त्यामुळें बौद्धधर्मांत दोन पंथ पाडले. ज्या पंथानें बुद्धाचें ऐतिहासिक स्वरूप बरेंचसें कायम ठेवलें त्या पंथास हीनयान (मुक्तीप्रत नेणारें हलकें वाहन) व जो बुद्धास देव मानून त्याची (त्याच्या मूर्तीची) पूजाप्रार्थना करी त्याला महायान (मुक्तीप्रत नेणारें श्रेष्ठ वाहन) म्हणूं लागले. हा महायानीपंथ जवळ जवळ सनातन हिंदूधर्माप्रमाणें बनला. पुढें अशोकानें हा धर्म जास्त पसरविला, परंतु त्यानेंहि जुलुमानें त्याचा प्रचार केला नाहीं. फक्त खाण्यापिण्याच्या बाबतींत प्रजेनें कांहीं नियम पाळावेत म्हणून त्यानें सरकारी हुकूम काढले होते एवढेंच. सारांश जैन किंवा बौद्ध धर्मानें सनातनी ब्राह्मणधर्मास फारसा धक्का बसला नाहीं; त्याची साक्ष पुढें चिनी प्रवाशांच्या वृत्तांतांत आढळून येते. केव्हांहि सनातनधर्मीयांचीच संख्या या दोन्ही संप्रदायांपेक्षां हिंदुस्थानांत जास्त होती. मात्र यामुळें सनातनधर्मीयांच्या यज्ञसंस्थेवर बराच परिणाम झाला. अहिंसेचा पगडा बसून महावीराच्या खटपटीमुळें वाढला. अगोदरच लोक जिला कंटाळले होते त्या यज्ञसंस्थेच्या विरुद्ध व अन्यकर्मदर्शक एक तत्त्वज्ञान उत्पन्न झालें. अहिंसेचें महत्त्व खरोखर बुद्धानें वाढविलें नसून जैनांनीं वाढविलें. व महाभारतांतहि अहिंसेचें स्तुतिस्तोत्र गावें लागलें; अहिंसेच्या तत्त्वाचा परिणाम ब्राह्मण आणि वैश्य या दोन वर्गांवरच झाला असें म्हणावें लागेल. बुद्धानें कांहीं तत्त्वज्ञान तर कांहीं कर्में यांची सांगड घालून सर्व लोकांसाठीं एक संप्रदाय निर्माण केला. त्याची स्पर्धा जेव्हां

ब्राह्मणास जाणवूं लागली तेव्हां त्यांच्या धार्मिक क्षेत्रांतील धोरणावर परिणाम झाला. श्रौत आणि गृह्य कर्में नांवानें त्रैवर्णिकांसाठीं पण वस्तुतः ब्राह्मणांसाठीं होतीं. उपनिषदांतील तत्त्वज्ञान केवळ विचारी लोकांसाठीं होतें आणि त्यामुळें सामान्य लोकांच्या धार्मिक भुकेसाठीं कांहीं तरी खाद्य हवें होतें. अद्यापि खालच्या वर्गांत ही बलिदानाची पद्धत चालू आहे. या मुळें पूर्वीच अस्तित्वांत आलेल्या विष्णु अथवा वासुदेव याच्या भक्तियोगास जास्त जोर चढला असावा. हा भक्तिपंथ ( नारायणीयधर्म ) बहुधां मथुरेजवळील ब्रह्मर्षिदेशांत उत्पन्न झाला असावा.

**नंद घराणें**—शैशुनाग घराण्यांत नंदिवर्धन हा नववा आणि महानंदिन् हा दहावा म्हणजे शेवटचा राजा झाला. त्यांच्यानंतर नऊ नंद राजांनीं साधारण १०० वर्षें राज्य केलें. त्यांचा मूळपुरुष महापद्म नांवाचा होता. या घराण्याबद्दल पुराणें, जैन व बौद्ध ग्रंथ, मुद्राराक्षस, ग्रीक लेखक वगैरेंच्या लेखांत माहिती आढळते; पण ती सुसंगत आढळत नाहीं. चंद्रगुप्त मौर्यानें ज्याला ठार केलें अथवा चंद्रगुप्ताकडून चाणक्यानें ( विष्णुगुप्त उर्फ कौटिल्यानें ) ज्याचा उत्खात करविला तो शेवटचा नंद राजाहि हलक्या कुलांत जन्मलेला, ब्राह्मणक्षत्रियांचा द्वेष्टा, फार श्रीमंत, शूर ( ग्रीक लेखकांच्या मतें ) २० हजार घोडदळ, २ लाख पायदळ, ४ हजार गजदळ, व २ हजार रथदळ यांचा स्वामी होता. चंद भाटानें अनंद कालाचा उल्लेख केलेला आहे. अनंद म्हणजे नंदविरहित. हा काल ९१ वर्षांचा धरून त्यानें तो आपल्या कालगणनेंत वजा टाकला आहे; यावरून चंद्रगुप्ताच्या राज्यरोहणापूर्वीं ( ३२२ ख्रि. पू. ) या नऊ नंदानीं ९१ वर्षें राज्य केलें असावें असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. चाणक्याच्या अर्थशास्त्राच्या शेवटावरून असा तर्क होतो कीं हा शेवटचा नंद बहुधां जैन किंवा बौद्धधर्मी (निदान त्या मतांशीं सहानुभूति बाळगणारा) असावा. चंद्रगुप्त व चाणक्य यांसहि परकीय (इराणी) ठरविण्याचा अगदीं स्वतंत्र विचारानें भरलेली पण स्वतंत्र विचार करतांना अवश्य माहितीचा अभाव दाखविण्याचा प्रयत्न डॉ. स्पूर यांनीं केला आहे.

**अलेक्झांडरची स्वारी**—यूरोपियन इतिहास लेखक ज्या अलेक्झांडरदिग्रेट (म्यासिडोनियाचा राजा) याच्या ख्रि. पू. ३२६ मधील हिंदुस्थानावरील स्वारीचा गाजावाजा करतात व जेथून खऱ्या ऐतिहासिक कालास आरंभ झाला म्हणून मानतात,त्या स्वारीचा यत्किंचितहि उल्लेख किंवा ओझरता नामनिर्देश हिंदुस्थानांतील देशी भाषेंतील कोणत्याहि प्राचीन ग्रंथांत आढळत नाहीं, ही मोठीच आश्चर्याची गोष्ट आहे. ही स्वारी मगधांत नंदराजे राज्य करीत असतां झाली. तिची सर्व हकीकत ग्रीक लेखांवरून देण्यांत येते. बदकशान, दरवाझ, सिंघनान वगैरे सिंधु आणि ऑक्सस नदीच्या थडींच्या आसपासचीं आजचीं ८ सरदार घराणीं आपण अलेक्झांडरच्या सैनिकांचे वंशज आहोंत असें मानतात. बॅक्ट्रिआ जिंकल्यावर हिंदुस्थानची बातमी काढून मग अलेक्झांडरनें ख्रि. पू. ३२७ च्या मे महिन्यांत हिंदूकुश ओलांडला व तें सबंध वर्ष त्यानें स्वात व बाजौर देश जिंकण्यांत घालविलें. नंतर पुढच्या वर्षी फेब्रुवारींत ओहिंद जवळ सिंधूनद ओलांडून अंभी राज्याची राजधानी तक्षशिला येथें तो आला. अंभीराजानें आपल्या शेजारच्या शत्रुराज्याच्या विरुद्ध अलेक्झांडरची मदत मागितली होती; यावरून परकीयांची स्वकीयांविरुद्ध मदत घेण्याची रीत इतक्या प्राचीन कालापासून हिंदुस्थानांत सुरू झाली असें दिसतें. तक्षशिला हें नगर अत्यंत प्राचीन आहे. मध्यआशियांतून हिंदुस्थानांत जो एक राजमार्ग येतो त्याच्या हिंदुस्थानांतील तोंडावर, एका सुपीक व लष्करी दृष्ट्या सुरक्षित अशा खोऱ्यांत हें शहर वसल्यानें त्याचें फार महत्त्व आहे. सांप्रत हें शहर उकरून काढण्याचें काम चाललें आहे, परंतु अद्यापि सर्व शहर उकरलें गेलें नाहीं. तें जवळ जवळ २० चौरस मैल पसरलें होतें. त्यापैकीं साधारण दक्षिणेकडील (जेथें अलेक्झांडर राहिला होता) भाग उकरून निघाला आहे. अनेक राजवंशांची हें शहर राजधानी होतें;त्यामुळें तेथील विद्यापीठ फार प्रख्यात असून त्यांतील विद्याशाखांत वैद्यकीयशाखा फार प्रसिद्ध होती. हिंदुस्थानांतील हजारों विद्यार्थी तेथें शिकत असत. स्ट्रॅबोनें येथील कायदेकानु उत्कृष्ट दर्जाचे असल्याचें सांगितलें आहे. व येथें सतीची चाल असल्याचें सतीचा जुना ऐतिहासिक उल्लेख बहुधां हाच असावा. सतीची चाल मूळची शक (सीथिअन) लोकांची असून ती मध्यआशियांतून त्यांच्या बरोबर हिंदुस्थानांत पसरली असावी असें स्मिथचें म्हणणें आहे. पण हें शहर हिंदुस्थानच्या सरहद्दीवर असल्यानें तेथें वैदिक, पर्शु, शक, असुर इत्यादि संस्कृति एकत्र आढळत; या जातीचे लोक तेथें आणि पंजाबांत रहात असावेत म्हणून पुढें पंजाब हें स्थान आर्यांनीं राहण्यास

अयोग्य होय अशी समजूत पसरली असावी. तक्षशिलेस नाना प्रकारच्या ललित कला पूर्णस्वरूपांत ग्रीक लोकांनां आढळल्या. त्यावरून-आर्यांच्या सुधारणांचा उगम अनेक शतकांपूर्वी झाला हें ठरतें. झेलम व चिनाब दुआबावर त्या वेळीं एका पुरु (पोरस) राजाचें राज्य होतें. त्याच्यावर अंभीराजाच्या मदतीनें अलेक्झांडरनें स्वारी केली. झेलमच्याकांठीं सिरवाल या खेडयाजवळ हें युद्ध झालें. पुरुराजाच्या राजदळानें अलेक्झांडरला हटविलें; तसेंच (ग्रीक लेखकांच्या मतें) "साऱ्या आशियामधील उत्कृष्ट व पहिल्या दर्जाच्या लढवय्या धिप्पाड पंजाबी आर्यांनीं" हि त्याची सरशी होऊं दिली नाहीं. पुरूचें सैन्य म्हणजे ३० हजार पायदळ, ४ हजार घोडदळ, ३०० रथदळ व २०० गजदळ होतें. ग्रीक लेखक म्हणतात कीं, आम्हीं पुरुराजाचा पराभव केला, पण हें संशयित दिसतें. आपल्या इकडे कोठेंहि या स्वारीचा उल्लेख नाहीं, त्यावरून कदाचित ही स्वारी झाली नसावी; तक्षशिलेपर्यंत येऊनच अलेक्झांडर परतला असावा; किंवा स्वारी झाली असल्यास पुरुराजाचा जय झाला असावा असें वाटतें. कारण या युद्धानंतरहि पुरुराज हा राज्यावर होता. पुरुराज साडेसहा फूट उंचीचा धिप्पाड पुरुष होता. अलेक्झांडर हा पुढें बिआसपर्यंत गेल्यावर त्याच्या शिपायांनीं आडवल्यामुळें मागें परतला व २००० जहाजांतून सैन्यानिशीं झेलम नदीच्या मार्गें सिंधुनदाच्या मुखाशीं जाऊन तेथून आपल्या देशीं परत गेला; त्यावेळीं मालव व क्षुद्रक या लोकांनीं त्याला फार अडथळे केल्याचें आढळतें (खिस्तपूर्व ३२५). ग्रीक लेखांवरून असें दिसतें कीं या सुमारास हिंदुस्थानांत स्थानिक राजांजवळ चतुरंग सैन्य मोठया प्रमाणांत असे; बैल व बकरीं यांचा खाण्याकडे बराच उपयोग होई; शस्त्रांत धनुर्बाण, कटयार, वज्र (फक्त राजाच्याच हातांत असे), दुधारी लांब तरवार, त्रिशूल, परशु, भाला इत्यादि शस्त्रें असत; बैलाच्या कातड्याच्या ढाला असत; चार घोडयांचे रथांत राजा बसे; पोलादाचीं वजनें असत; राजाच्या पशुशाळेंत पाळीव सिंह व वाघ असत. कलाकौशल्य उच्च दर्जास पोहोंचलें होतें. अलेक्झांडरच्या मृत्यू (खिस्तपूर्व ३२३) नंतर थोडयाच काळांत (खिस्तपूर्व ३१७) त्याच्या साम्राज्याचा किंचितहि मागमूस पंजाबांत उरला नाहीं, असें ग्रीक लेखक सांगतात. या वेळीं पाश्चात्त्य व पौरस्त्य लोकांची पहिली गांठ भेट होऊन परस्परांनां परस्परांची माहिती होऊन व्यवहार सुरू झाला. त्यामुळें पुढें गांधारशिल्पपध्दती व ग्रीकशिल्पपध्दती यांच्यांत जें साम्य आढळून येतें त्याचें कारण ही या दोन लोकांची परस्पर रहदारी होय. बौध्द देवतांवर व संस्कृतीवर ग्रीक देवतांचा बराच परिणाम होऊन बौध्द संस्कृति थोडीशी शिथील झाली पण सनातनधर्मावर ग्रीक संस्कृतीचा कांहींच परिणाम झाला नाहीं. खिश्चनधर्माच्या प्रारंभीच्या तत्त्वांवर मात्र बौध्द धर्माचा बराच परिणाम झाला. रोमन साम्राज्यांत या दृष्टीनें हिंदी तत्त्वज्ञान व धर्म यांचा प्रवेश या वेळीं होत होता.

खिस्तपूर्व ४थ्या-शतकांत हिंदुस्थानांत सर्वश्रेष्ठ असें मगधाचें साम्राज्य होतें. पंजावकडे पुरु व अंभी राजे असून शिवाय सात लहान पण स्वतंत्र राज्यें होतीं. कांहीं राज्यें (मालव, क्षुद्रक) लोकनियुक्त होतीं; क्षुद्रकांचें राज्य पुष्कळ प्राचीन काळापासून लोकसत्ताक असल्याचें आढळतें. महाभारतांत ( शांतिपर्व ) व कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत या लोकसत्ताकराज्यांचें सामान्य स्वरूप आढळतें. अलेक्झांडरनंतर २०।२२ वर्षांनीं आलेल्या मेग्यास्थेनीजनें त्याच्यावेळीं हिंदुस्थानांतील एकंदर राज्यांची संख्या ११८ दिली आहे. ग्रीक लेखक व कौटिल्याचें अर्थशास्त्र यांवरून या शतकांत हिंदी लोकांची भौतिक सुधारणा फार पुढें होती असें ठरतें. हिंदी लोक परदेशांशीं मोठया प्रमाणांत व्यापार करीत. उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांत तर सर्रास रहदारी व व्यापार चालू होता. उत्तरहिंदुस्थानांत कापड, चर्में, घोडे व थोडेफार हत्ती यांची पैदास होई, तर दख्खन मध्यें सोनें, हिरे, मोतीं, रत्नें, शंख, उत्तम हत्ती व मलमलीचें कापड यांची निपज होई. परकीय लोकांनां हिंदुस्थानांत व्यापार करण्यास हिंदी राजांचे परवाने काढावे लागत. यावेळीं सोने, चांदी व तांबें (फार थोडीं) यांचीं निरनिराळ्या ठशांचीं व निरनिराळ्या आकारांचीं नाणीं प्रचारांत होतीं. कांहीं ठिकाणीं ओतींव नाणींहि असत. या शतकांत मथुरेचा हरिकृष्ण (श्रीकृष्ण) पर्जन्यदेव इंद्र, व गंगानदी यांनां (उत्तर) हिंदुस्थानांत फार पूज्य मानीत असें ग्रीक लेखक म्हणतात. ब्राह्मणांनां सर्व जातींत श्रेष्ठपणाचा मान असून, ते राजांचे मंत्री असत. सिंधमधील ब्राह्मण आपल्या राजांनां परक्या शत्रूस देशाबाहेर हांकलून लावण्यास व धर्मासाठीं प्राण देण्यास उठावणी देत असें एरियनचें म्हणणें आहे.

[ बुध्दोत्तरजग ज्ञानकोश विभाग ४; आर्किऑ. रिपोर्टस, १९१४-१५ (तक्षशिला); वेंकटेश्वर-एन्शन्ट

हिस्टरी ऑफ मगध; शामशास्त्री-कौटिलीय अर्थशास्त्र; मिसेस स्टेव्हेन्सन-हार्ट ऑफ जैनिझम; जगंदरलाल जैनी-औटलाईन्स ऑफ जैनिझम; भांडारकर-वैष्णविझम अँड शैविझम; एरियन-इंडिका; बर्न्स-ट्रव्हल्स इन बुखारा; नगेंद्रनाथ वसु-मॉडर्न बुद्धिझम इन ओरिसा; स्मिथ-अर्लि व ऑक्सफर्ड हिस्टरी ऑफ इंडिया; विष्णुपुराण;मनुस्मृति; ज्ञानकोश विभाग चवथा; कर्न-इंडियन बुद्धिझम; बुल्हर-इंडियन स्टडीज; ब्रम्हजालसुत्त; जातक-विनय पिटक; सद्धर्म पुंडरीक; श्रावकाचार; ललितविस्तर; इतिहास ऐतिहासिक-चांदोरकरांचा लेख; स्पेन्स हार्डी-बुद्धधर्मावरील पुस्तकें, महावंसो; बिगंडेट-लाईफ ऑफ गौतम; पार्गिटर-डिनॅस्टीज ऑफ दि कली एज; व्हीज डेव्हिडस-बुध्दिस्ट इंडिया; हापकिन्स-रिलिजन्स इन इंडिया; विंटरनिटझ-इंडियन लिटरेचर; स्मिथ-अशोक ].

## मौर्य साम्राज्य

( ख्रि. पू. ३२२-ख्रि. पू. १८९ )

हिंदुस्थानचा इतिहास जो ऐतिहासिक आधारांवरून अवगत होतो तो या राजघराण्यापासूनच होय. या घराण्याचा व या पुढील अनेक घराण्यांबद्दलचा इतिहास लिहिण्याचीं अनेक ऐतिहासिक साधनें सांप्रत उपलब्ध झालीं आहेत; त्यामुळें त्यांबद्दल चांचपडत बसण्याचें कारण नाहीं. ख्रि. पू. चवथ्या शतकांतील वरिष्ठ साम्राज्य या घराण्यानेंच हिंदुस्थानांत स्थापिलें. या घराण्याच्या नंतरहि आणखी दुसरीं साम्राज्यें स्थापन स्थापन झालीं. त्या बहुतेकांची माहिती हल्लीं आपणांस उपलब्ध होते. कौटिल्याचें अर्थशास्त्र, ग्रीक बखरी व अशोकाचे अंकित लेख हे मुख्य आधार या मौर्य घराण्याबद्दल घ्यावे लागतात. मुद्राराक्षस (सुमारें इ. स. ९ वें शतक ) नाटकांवरून नंद घराण्यांतील राजसत्ता या घराण्याकडे कशी आली याची साधारण माहिती मिळते.

**चंद्रगुप्त**-शेवटच्या नंदराजापासून ( मुरा नांवाच्या) दासीच्या पोटीं चंद्रगुप्ताचा जन्म झाला. कांहींच्या मतें मौर्य ही नंदघराण्याचीच शाखा होती. बापानें त्याला कांहीं कारणामुळें मगध देशांतून पंजाबांत हद्दपार केलें होतें. तेथें असतांना कदाचित अलेक्झांडरनें त्याची भेट घेतली असेल. अलेक्झांडर मेल्यावर त्याच्या सिंधूनदाच्या आसपास असलेल्या (?) कांहीं ग्रीक अधिकाऱ्यांनां चंद्रगुप्तानें चाणक्याच्या बुद्धिसामर्थ्यानें व उत्तरेकडील राजांच्या मदतीनें हांकलून दिलें असें पाश्चात्य इतिहासलेखक म्हणतात. यानंतर अपमान केल्यामुळें चिडलेल्या ब्राह्मण कौटिल्यानें आपल्या शिष्या ( चंद्रगुप्ता ) कडून नंदाचा उत्खात करून व त्याला मगधाच्या सिंहासनावर सम्राटपदाचा अभिषेक करवून स्वतःच्या शेंडीस गांठ मारली (ख्रि. पू. ३२२). अलेक्झांडरच्या नंतर बाबिलोन येथील गादीवर सेल्यूकस निकेटर हा त्याचा एक सेनापति सीरीयाचा राजा म्हणून स्थानापन्न झाला ( ख्रि. पू. ३१८ ). त्यानें थोडया दिवसांनीं पंजाबवर स्वारी केली, पण चंद्रगुप्तानें त्याचा पराभव केला आणि त्याचे परोपनिषाद, आर्य, आराचोषिया, गेडोशिया, म्हणजे काबूल, हिरात, कंदाहार आणि बलोचिस्तान हे प्रांत हिसकावून घेतले व त्याची एक मुलगी आपली राणी केली. सेल्यूकसनें आपला मॅगॅस्थेनिस नांवाचा एक वकील चंद्रगुप्ताच्या दरबारीं ठेविला. त्यानें तत्कालिन परिस्थितीची एक बखर लिहिली आहे. सांप्रत ती संपूर्ण उपलब्ध नाहीं. मात्र तिच्यांतून पुढील अनेक लेखकांनीं घेतलेले पुष्कळसे उतारे तूर्त आपल्यास आढळून येतात.त्यांच्यावरून त्या वेळची बरीच माहिती उजेडांत येते. चंद्रगुप्तानें २४ वर्षें साम्राज्योपभोग घेतला. त्याच्या साम्राज्यांत सांप्रतचे अफगाणिस्तान, बलुचिस्तान, पंजाब, संयुक्तप्रांत, बिहार, काठेवाड व थोडासा बंगाल या प्रांतांचा समावेश झाला होता; म्हणजे नर्मदेच्या उत्तरेकडील सर्व हिंदुस्थानचा तो सम्राट होता; दंतकथेवरून दख्खनमध्यें म्हैसूरपर्यंत त्याचें राज्य पसरलें होतें असें समजतें. त्याचा राज्यकारभार मुख्यतः चाणक्याच्याच अनुरोधानें चालला होता. चाणक्य हा चंद्रगुप्ताचा पुत्र बिंदुसार याच्यावेळींहि त्याचा महामात्य होता असें म्हणतात. कांहींच्या मतें त्याला राज्यकारभाराचा कंटाळा येऊन तो चंद्रगुप्ताच्या कांळींच त्याच्यासह भडोचजवळील शुक्लतीर्थीं तप करण्यास निघून गेला. चंद्रगुप्ताच्या वेळींहि शैशुनाग व नंद यांच्याप्रमाणेंच मगधांत जैनधर्माला थोडाफार राजाश्रय असून त्याचा फैलावसुद्धां पुष्कळ झाला होता. जैनदंतकथा म्हणते कीं चंद्रगुप्त हा जैनधर्मी असून जैनसंत भद्रबाहु हा त्याच्या राज्यांत होऊन गेला. चंद्रगुप्ताच्या राज्याच्या शेवटीं शेवटीं १२ वर्षांचा दुष्काळ उत्तर हिंदुस्थानांत पडल्यामुळें भद्रबाहु हा आपल्या १२ हजार जैन शिष्यांसह दख्खनमध्यें (म्हैसूरप्रांतीं) श्रवणबेळगोळ येथें रहाण्यास आला व चंद्रगुप्तानें आपल्या मुलास गादीवर बसवून

तोहि या जैनमंडळीबरोबर श्रवणबेळगोळीं आला. येथें १२ वर्षें कडक तप करून व जैन मताप्रमाणें निराहार राहून चंद्रगुप्तानें वानप्रस्थाश्रम ( चाणक्याबरोबर ) स्वीकारला असावा; कारण ही रीत त्यावेळीं प्रचलित होती.

**बिंदुसार**–हाचंद्रगुप्ताचा पुत्र ख्रि. पू. २९८ च्या सुमारास गादीवर बसला. हा फार शूर असल्यानें व यानें दख्खनमधील पुष्कळ प्रांत आपल्या साम्राज्यास जोडल्यानें याला अमित्रघात (शत्रूंचा घात करणारा) हें बिरुद मिळालें. याची माहिती फारशी आढळत नाहीं. याच्या दरबारांत मेग्यास्थेनीसच्यानंतर देमाकोस हा सीरियन वकील होता व ईजिप्तच्या टालेमी फिलाडेल्फस या राजानेंहि आपला एक वकील ठेवला होता.

चंद्रगुप्त व बिंदुसार यांच्या राज्यव्यवस्थेचें स्वरूप अर्थशास्त्रावरून उत्कृष्ट रीतीनें दिसून येतें. हें मौर्यसाम्राज्य मोठें सुसंरक्षित, फार श्रीमंत, अतिशय सैन्य असलेलें, राज्यकारभाराचीं निरनिराळीं खातीं पाडलेलें, त्या त्या खात्यांत निरनिराळ्या दर्जाचे अधिकारी (सिव्हिल सर्व्हिस) नेमलेले असें होतें. स्मिथ म्हणतो कीं, अकबराच्या राज्यापेक्षांहि मौर्यांचा राज्यकारभार जास्त सुसंघटित व सुयंत्र होता. अकबरचा कारभार लष्करी पायावरच चाललेला होता; त्याच्या खास मुदबकखान्यांतील लहानमोठे अधिकारीहि लष्करी सरंजामदार होते. त्याच्या लष्करांत सरंजामी फौज जास्त असून सरकारी खडें सैन्य थोडें होतें. त्यामुळें पोर्तुगीजांच्या कवायती पलटणांपुढें त्याचा लाग चालत नसे. उलट मौर्यांचीं मुलकी व लष्करी खातीं भिन्न भिन्न असून, लष्कर हें ( आजच्याप्रमाणें) सर्वस्वीं सरकारच्या हुकमतीखालीं होतें, त्यामुळेंच सेल्युकसला चंद्रगुप्तानें पिटाळून लाविलें. शिवाय मौर्यासाम्राज्यांतील हेरखातें अकबराच्या खात्यापेक्षां फार श्रेष्ठ दर्जाचें असून त्यामुळें व एकंदर शिस्तीमुळें सरकारचा दाब साम्राज्यांतील निरनिराळ्या व दूरदूरच्या अधिकाऱ्यांवर कडकपणें बसला होता. म्हणून अकबराच्या साम्राज्यापेक्षांहि मौर्यसाम्राज्य विस्तृत असून तें अतिशय सुयंत्रित व कार्यकुशल होतें. त्यांत चंद्रगुप्त, बिंदुसार व अशोक या तीन पिढ्याहि कर्तृत्वान व दक्ष अशा सम्राटांच्या होऊन गेल्या, त्यामुळें तर त्याला जास्त स्थीरता आली.

**पा ट ली पु त्र**––चंद्रगुप्ताची राजधानी पाटलीपुत्र ही शोणनदाच्या उत्तरथडीस असून ती एक कोस रुंद व साडेचार कोस लांब होती आणि तिच्यांतच प्राचीन कुसुमपुर ही राजधानी लुप्त होऊन गेली होती. शोण व गंगा यांच्या संगमाच्या प्रचंड चिमट्यांत ती वसविल्यामुळें शत्रूंस दुष्प्राप्य होती. तिच्याभोंवतीं लांकडी तट असून, त्याला ५७० बुरूज व ६४ वेशी होत्या आणि तटाभोंवतीं शोणाच्या पाण्यानें भरलेला खोल व रुंद असा खंदक होता. मुख्य राजवाडा (बहुधां सांप्रतच्या कुम्रहार खेड्याच्या गांवठाणावर असावा) मुख्यत: लांकडी बांधणीचा असून त्याच्या खांबांनां सोन्याचें पाणी दिलें होतें व त्यांवर सोनेरी आणि रुपेरी नकशी काम केलें होतें. राजवाड्याभोंवतीं एक मोठें व सुंदर उद्यान असून त्यांत अनेक तलाव आणि नाना प्रकारचीं झाडें व वनस्पती लावलेल्या होत्या. ग्रीक लेखक म्हणतात कीं चंद्रगुप्ताचा राजवाडा तर सूस व एकबतन यांच्या राजवाड्यापेक्षांहि फार मौल्यवान होता. राजवाड्यांत ६।६ फूट उंचीचीं सोन्याचीं भांडीं पुष्कळ होतीं. सम्राट हा सोन्याच्या पालख्यांतून अथवा हत्तीवरील सोन्याच्या अंबारींतून हिंडत असे. त्याचे कपडे निळ्या रंगाच्या भरजरी मलमलीचे असत. सर्व आशियाखंडांतील मौल्यवान वस्तू त्याच्या राजवाड्यांत आढळत. त्याच्या अंगरक्षकांत शक अथवा यवन जातीच्या धिप्पाड व सशस्त्र धनुर्धारी स्त्रिया असत व त्याचें अंत:-पुर (जनानखाना) फार मोठें असे. त्याच्या मृगयेसाठीं राखीव जंगलें असत, त्यांत दुसऱ्यानें मृगया केल्यास त्यास शिक्षा होई. चंद्रगुप्त शेवटशेवटपर्यंत शिकार करीत असे (यावरून तो जैनधर्मी नसून सनातनधर्मी असावा असें दिसतें) व अशोकानेंहि बौद्धधर्मीय होण्यापूर्वी मृगया सोडली नव्हती. निरनिराळ्या प्रकारचीं (माणसांचीं, पशूंचीं व पक्ष्यांचीं) द्वंद्वयुद्धें व एकाच जोखडीखालीं बैल व घोडे जोडलेल्या रथांच्या शर्यती होत.

दरबारांत नृत्यांगना असत व सम्राटासाठीं फुलांच्या माळा करणें, त्याला पाणी अथवा विडे देणें, त्याला पोशाख घालणें, त्याच्यावर छत्रचामरें वारणें इत्यादि कामांस स्त्रिया असत. वेश्यांनां सरकारांत कर भरावा लागे व गुप्त हेरांचें कामहि करावें लागे.

**मौ र्यां चा रा ज्य का र भा र**–वायव्येकडील प्रांतांत खरोष्ठीलिपीचा प्रसार, गव्हर्नरांनां सत्रप (क्षत्रप) ही पदवी लावणें, अशोकाच्या अंकित लेखांचें स्वरूप इत्यादि गोष्टींवरून इराणी व हिंदू लोकांचें दळणवळण फार प्राचीन काळापासून चालू असल्याचें दिसतें; आणि त्यामुळें कांहीं इराणी दरबारी चालीरीती इकडेहि आल्या होत्या. मौर्यकालीं राजा हा राज्याचा कुलमुखत्यार असून, कांहीं विद्वान ब्राह्मणांचा थोडासा ताबा

त्याच्यावर असे. ब्राह्मणांस देहदंड नसे (फक्त राजद्रोह्यास पाण्यांत बुडवून मारीत). राजाला कमींत कमी चार प्रधानांचें प्रधानमंडळ असे व बहुशः त्याच्या सल्ल्यानें त्याला वागावें लागे. चतुरंग दळ या वेळीं होतें; ह्युएन्तसंगाच्या वेळीं मात्र (हर्षाच्या सैन्यांत) रथदळ नाहींसें झालें होतें. प्राचीन काळापासून हिंदी पायदळाची रचना शिस्तवार नाहीं. चतुरंगदळ मिळून नंदांचें सैन्य ३ लाख होतें तर मौर्यांचें ७ लाख होतें व त्यासाठीं स्वतंत्र लष्करी खातें असून त्यांत पांच निरनिराळीं पोटखातीं होतीं.

लढाऊ हत्तीवर चिलखत असून, त्याच्या पाठीवर माहुताखेरिज तीन धनुर्धर असत; प्रत्येक घोडेस्वाराजवळ एक ढाल व दोन भाले असत; प्रत्येक प्याद्याजवळ खांद्यास वादीनें अडकविलेली सरळ व रुंद पात्याची तरवार असून शिवाय लहान भाला व धनुर्बाण असे. घोडा, हत्ती व माणूस यांना चिलखतें असत. ॲम्ब्यूलन्स खातें असून, लढाईंत पिछाडीच्या बाजूस त्याचें काम चाले; त्यांत पुरुष व दायाहि असत. चाणक्यानें राज्यकारभारांत सामदामदंडभेद यांवर व विशेषतः भेदावर जास्त जोर दिला आहे, त्यामुळेंच त्याला कौटिल्य अथवा पौर्वात्य मॅकिएव्हेली म्हणतात. मेग्यास्थेनीस म्हणतो कीं, पाटलीपुत्रा सारख्या श्रीमंत राजधानींत जास्तींतजास्त ८० रु. च्यावर चोरी होत नसे, इतका राज्यांत बंदोबस्त होता व लोकहि सुखी होते. अपराध्यांनां शिक्षा कडक असल्यानें सहसा गुन्हे घडत नसत. अशोकाच्या वेळींहि शिक्षा कडकच देत. सरकारी अधिकाऱ्यांनीं प्रजेस विनाकारण त्रास दिल्यास त्यांनां शिक्षा होई. साम्राज्याचे मोठमोठे भाग पाडून त्यावर स्थानिक–सुभेदार ( गव्हर्नर्स ) नेमीत. मोठमोठ्या शहरांच्या पेठा करून त्यांवर स्थानिक, गोप इत्यादि संरक्षक अधिकारी नेमीत. अगदीं शेवटचा अधिकारी १० पासून ४० घरांवर देखरेख करणारा असे; शहराच्या मुख्य कोतवालास नागरक म्हणत. शहरांतील प्रत्येक स्त्रीपुरुषाची जात, गोत्र, नांव, धंदा व त्यांचा जमाखर्चहि या सरकारी अधिकाऱ्यांनां ठाऊक असे; सारांश, इतकी सूक्ष्म खानेसुमारी ठेवल्यामुळें कर वगैरे बसविण्यास सरकारास सुलभ जाई. आरोग्यरक्षणाचे नियम कडकपणें पाळीत व आगीबद्दल विशेष खबरदारी घेत. पाटलीपुत्रास म्युनिसिपालिटी असून तिचा कारभार ३० सरकारनियुक्त अधिकाऱ्यांकडे सोंपविला होता. या तिसांचीं ६ उपमंडळें असून त्यांच्याकडे औद्योगिक, परदेशियांचें संरक्षण, जननमरणनोंद, फुटकळ व घाऊक व्यापार, वजनमापेंपरीक्षण, आयातनिर्गत, विक्रीवरील (१० वा हिस्सा) कर गोळा करणें, सार्वजनिक कामें, बाजार–देवळें–बंदरें यांची व्यवस्था इ. कामें सोंपविलीं होतीं. सारांश, ख्रि. पू. ३०० च्या सुमारास या म्युनिसिपालिटीचें इतकें व्यवस्थित स्वरूप होतें, ही फार आश्चर्याची गोष्ट होय. तत्कालीन ग्रीक म्युनिसिपालिटया (?) हि इतक्या व्यवस्थित नव्हत्या आणि पुढें १८०० वर्षानंतरच्या अकबरास तर या संस्थेची माहितीहि नव्हती! मजुरी भरपूर देणें, कारागिरांस उत्तेजन देणें, व्यापारावर सुसह्य जकात बसविणें, पाटबंधारे व्यवस्थित ठेवणें, खाणी चालविणें इ. अनेक कामें सरकार करी; त्यासाठीं ३० निरनिराळीं खातीं होतीं; म्हणजे अधिकारविभागणीचें तत्त्व या राज्यांत प्रचलित होतें. सरकारी कामांत लांच खाणाऱ्यास जास्तींत जास्त देहांताचीहि शिक्षा ठेवली होती. महायुद्धापूर्वीच्या जर्मनींत जसें सुयंत्रित हेरखातें होतें तसें या साम्राज्यांत होतें. गुप्तलिपि, बातमीसाठीं खबूतरें उपयोगांत आणणें, प्रत्येक सरकारी खात्यांत गुप्तहेर ठेवणें, सर्व प्रधानांवरहि हेर ठेवणें हे प्रकार चालू होते. यावेळीं शेतकऱ्यांचा जमीनीवर मालकी हक्क नसावा असें अर्थशास्त्राच्या याबद्दच्या उल्लेखावरून दिसतें (अ. शा. २. १). शेतसारा बहुधा उत्पन्नाच्या एकचतुर्थांश असे (अकबर एक तृतीयांश घेई). मोठमोठ्या सडका असून दरेक मैलावर हल्लींप्रमाणें अंतर लिहिलेले दगड पुरलेले असत. तक्षशिला–पाटलीपुत्र हा मोठा राजमार्ग असून, खेरीज इतर सरकारी रस्ते पुष्कळ होते. सारांश, आजच्या विसाव्या शतकांतील राज्यांत राज्यकारभाराच्या ज्या सुधारणा आढळतात, त्या किंचित् फेरफारानें अडीच हजार वर्षांपूर्वींच्या या मौर्यसाम्राज्यांतहि होत्या, त्यावरून आधुनिक सुधारलेल्या राज्यपद्धतीपेक्षां मौर्यराज्यव्यवस्था मुळींच गौण नव्हती असें ठरतें.

**अशोक व त्याचें साम्राज्य**—बिंदुसारानंतर त्याचा पुत्र अशोकवर्धन उर्फ अशोक हा मगधाधीश झाला (ख्रि. पू. २७३). त्याला अनेक भाऊबहिणी असून एक सुसीम नांवाचा वडील भाऊहि होता परंतु बापानें अशोकालाच उत्तराधिकारी ठरविलें. तत्पूर्वी तो तक्षशिला व उज्जनी येथें व्हाइसराय म्हणून होता. त्याच्या अंकितलेखांवरून व सिलोनी ( महावंश आणि दीपवंश इ.) आणि हिंदी–बौद्ध दंतकथावरून त्याची

माहिती मिळते. तो शांतस्वभावी असल्यानें कोणतीहि राजकीय महत्त्वाची गोष्ट त्याच्या राजवटींत घडलेली दिसत नाहीं. फक्त त्यानें कलिंग देश जिंकून आपल्या साम्राज्यांत समाविष्ट केला. त्याचें साम्राज्य हिंदूकुशपर्वत ते म्हैसूरपर्यंत पसरलें होतें. त्याला ख्रिस्तपूर्व २६९ मध्यें राज्याभिषेक झाला. त्याच्या अंकितलेखांत त्याचा राज्याभिषेकशक असतो. त्यानें सुमारें ख्रिस्तपूर्व २३२ पर्यंत राज्य केलें. प्रथम तो सनातनधर्मी शैवपंथी असावा. तत्कालीन क्षत्रियांप्रमाणें त्यावेळीं तो मद्यमांसाहारी होता परंतु पुढें त्यानें कलिंग जिंकल्यानें (ख्रिस्तपूर्व २६१) त्याच्या उर्वरित आयुष्यांत मोठी क्रांति घडली. या लढाईंत आपण दीड लाख लोक गुलाम केले व एक लाख ठार केले असें खुद्द अशोक म्हणतो आणि त्या भयंकर कृत्यामुळेंच त्याला पश्चात्ताप होऊन पुढें त्यानें बौध्दधर्म स्वीकारला (अंकितलेख १३). यापुढें प्रत्येकानें आपल्या धर्माप्रमाणें वागून एकंदर प्राणिजातीस त्रास न देतां दयेनें वागावें असें त्याचें मुख्य तत्त्व बनलें, यामुळें त्याची कीर्ति त्याच्या साम्राज्याच्या बाहेरहि टॉलेमी, अँटिगोनस, मग, अलेक्झांडर, चोल, पाण्डय या राज्यांत पसरली. ऐहिक व पारलौकिक कल्याणासाठीं आपल्या वंशजांनीं व प्रजेन शांतीनें व दयाधर्मानें वागावें अशी त्याची आज्ञा असे. असल्याच आज्ञा त्याच्या ठिकठिकाणच्या बहुतेक शिलास्तंभावर कोरलेल्या आढळतात व त्याप्रमाणें सर्व सरकारी अधिकाऱ्यांनीं वागावें अशी त्याची कडक शिस्त होती. तो आपल्या प्रजेस 'स्वतःचीं मुलें' म्हणवी व जर तिच्यावर सरकारी अधिकाऱ्यांनीं जुलूम केला तर त्यांनां शिक्षा करी. वरील अशोकाच्या अंकितलेखाच्या उल्लेखांवरून सीरियाचा अँटिओकस थिऑस, ईजिप्तचा टॉलेमी फिलेडल्फस, कायरेनचा मगस व एपीरसचा अलेक्झांडर हे त्याचे समकालीन होते. हे चारी राजे ख्रिस्तपूर्व २५८च्या वेळीं हयात होते व ते त्याचे मित्र असल्यानें त्यांच्या राज्यांत (आशिया, आफ्रिका आणि यूरोप) अशोकानें आपले बौद्ध मिशनरी पाठविले होते. दख्खनमध्यें त्यावेळीं चोल, पाण्डय, केरळपुत्र, सत्यपुत्र हीं राज्यें होतीं व खुद्द अशोकाच्या साम्राज्यांत राष्ट्रिक, भोज, पैठणिक, आंध्र इत्यादि मांडलिक राज्यें होतीं. सीलोनी बखरींत अशोकानें सात मिशनरी बौद्ध भिक्षुमंडळें हिंदुस्थानांत व दोन मिशनरीमंडळें ब्रह्मदेश व सीलोनमध्यें पाठविल्याचें म्हटलें असून त्याला मेलसा येथील अंकित लेखांनीं पुष्टि दिली आहे. सीलोनमध्यें अशोकानें आपला भाऊ महेंद्र व बहीण संघमित्रा यांनां सिंहलराज तिस्स याच्या कारकीर्दींत पाठविलें होतें (ख्रिस्तपूर्व २९०). तिस्सानें स्वतः बौद्धधर्म स्वीकारून सरकारी रीत्या त्या धर्माचा पुष्कळ प्रसार केला. महेंद्र हा सीलोन मध्येंच अनुराधपूर येथें मेला. त्यानंतरहि सिंहलद्वीपांत हिंदुस्थानांतील अनेक बौद्ध मिशनरी जाऊन त्यांनीं त्या धर्माची वाढ चालविली होती. बौद्ध भिक्षु हे सुशिक्षित असल्यानें रानटी जातींत त्यांच्या धर्माची वाढ झपाट्यानें होई. जपान, तिबेट, सयाम, ब्रह्मदेश, व सीलोन या देशांत याच कारणानें हा धर्म पसरला. चीनमध्यें त्या देशाची पूर्वसंस्कृति असल्यानें बौद्धधर्म इतपत पसरला नाहीं. बौद्धभिक्षु हिंदुस्थानांतील त्यावेळच्या सुधारणाहि आपल्याबरोबर नेत. महेंद्रानें सिंहलद्वीपांत कालवे, बंधारे, इमारती इत्यादि शिल्पकामाच्या सुधारणा नेल्या होत्या. त्यामुळेंच अनुराधपूर व इतर ठिकाणीं तिस्सराज व त्याचे वंशज यांनीं अनेक प्रचंड दागोबे, स्तूप, मठ वगैरे इमारती बांधल्या. उपगुप्त नांवाच्या बौद्ध आचार्यानें अशोकास ख्रिस्तपूर्व २४९ त बौद्धधर्माची दीक्षा देऊन आपल्या बरोबर निरनिराळ्या बौद्ध तीर्थक्षेत्रीं फिरविलें. यापुढें अशोकानें मांसाहार अजीबात सोडला व अहिंसेची आज्ञा सर्वत्र प्रचारांत आणली. राज्यावर बसून तीस वर्षें झाल्यानंतर व बौद्धधर्माचा बराच प्रचार केल्यानंतर आपल्या एकंदर कार्याचा आढावा काढून तो अशोकानें कांहीं अंकित लेखांत कोरून ठेविला. या सुमारास पाटलीपुत्रास अशोकानें बौद्धभिक्षूंची एक संगीती (महासभा) भरविली. तींत बौद्धधर्मांत उत्पन्न झालेल्या पाखंडांवर व पोटभेदांवर उपाययोजना सुचविण्यांत आल्या. म्हातारपणीं अशोकानें बहुधा वानप्रस्थाश्रम घेतला असावा. अशोकाचे शिलालेख कांहीं मोठमोठ्या शिलाखंडांवर आहेत व कांहीं एकसंधी दगडी खांबांवर आहेत. पहिले व प्राचीन पंजाब ते म्हैसूरपर्यंतच्या अत्यंत दूरदूरच्या प्रांतांत आहेत व दुसरे मगध देशाच्या आसपासच्या प्रांतांत आहेत. अशोकाच्या साम्राज्यांत चार व्हॉईसराय असून ते तक्षशीला (वायव्यप्रांत), तोसली (ओरिसा), उज्जनी व सुवर्णगिरी (दख्खन) येथें असत. अशोकानें माणसांचे व पशूंचे दवाखाने काढले, प्रजेच्या शारीरिक शिक्षणाकडे जास्त लक्ष घातलें, धर्मशाळा बांधल्या, विहिरी खोदल्या, रस्त्यांवर झाडें लाविलीं व इतर पुष्कळ प्रजेच्या सुखसोयीचीं कामें केलीं. अशोक स्वतः कट्टा बौद्धधर्मी असला तरी इतर धर्मांचा त्यानें छळ अगर तिरस्कार

केला नाहीं; तो अत्यंत न्यायी होता. वाटेल तेथें व वाटेल त्यावेळीं प्रजेचें काम करण्यास तो तयार असे. खोदकाम, कोरीवकाम, चित्रकाम, सुंदर इमारती उभारणें, व्यापार, परदेशीं दळणवळण इत्यादि गोष्टी त्याच्या कारकीर्दींत जास्त पुढें आल्या. त्याच्यावेळीं शिल्पकामावर इराणी व ग्रीक शिल्पांची छाप बसली असें कांहीं विद्वान म्हणतात पण स्मिथ म्हणतो कीं, तें शिल्प मूळचें भारतीय कल्पनेचें व स्वरूपाचेंच होतें. सारनाथ येथील खांबाच्या चार सिंहाचें मथळ्याचें काम मार्शल याच्या मतें तत्कालीन सर्व जगांत पहिल्या प्रतीचें आहे आणि सर्वच मौर्यकालीन शिल्प, हें ग्रीक (अथेनियन) शिल्पापेक्षां श्रेष्ठ दर्जाचें आहे. अशोकाचे शिलास्तंभ तर ४०।४० फूट उंचीच्या गुळगुळीत व एकसंधी दगडाचे आणि उत्तम कारागिरीचे आहेत. गांवांतील शिलालेखांच्या शिला तर कांचेप्रमाणें चकचकीत आहेत. हे प्रचंड शिलास्तंभ उचलून दूर अंतरावर नेण्यांत एंजिनियरिंगची जरूरी असते व ती कला त्या लोकांना होतीहि. उठावदार चित्रें खोदण्यांतहि ते तरबेज होते. अशोकाच्या अंकित लेखांवरून त्याच्या प्रजेच्या साक्षरतेचें प्रमाण सांप्रतच्या हिंदी लोकांच्या प्रमाणापेक्षां जास्त होतें असें स्मिथ म्हणतो. अशोकानें ४० वर्षें अत्यंत उत्तम रीतीनें राज्य केलें. तो तक्षशीला येथें मरण पावला असें म्हणतात. त्याला बरींच मुलें होतीं. त्यापैकीं जलुक हा सनातनधर्मी असून त्यानें बापाच्या पश्चात काश्मीरकडे स्वतंत्र राज्य स्थापिलें. अशोकाचा नातू दशरथ हा अशोकाच्या मागून मगधाच्या गादीवर बसला व दुसरा नातू संप्रति हा उज्जनी येथें स्वतंत्र राजा बनला. यानें जैन धर्मास फार उत्तेजन दिलें. यापुढील मौर्य राजांची हकीकत स्पष्ट समजत नाहीं. त्यांच्यांतील शेवटचा राजा बृहद्रथ याला त्याचा सेनापति पुष्यमित्र शुंग यानें ठार मारून गादी बळकाविली (खिस्तपूर्व १८९).

**शुंगघराणें**—पुष्यमित्राचें शुंग घराणें ११२ वर्षें (खिस्तपूर्व ७३ पर्यंत) टिकलें. मगध व त्याच्या आसपासचे कांहीं प्रांत यांवर त्याचें राज्य पसरलें होतें. पुष्यमित्रानें अश्वमेध यज्ञ केला होता. पुष्यमित्राचा कालिंगराज खारवेलानें पराभव केला. या सुमारास काबूलचा ग्रीक राजा मिनँडर (बौद्ध मिलिंद) यानें सिंधू ओलांडून (खिस्तपूर्व १७५), पंजाबचा कांहीं भाग, काठेवाड हे प्रांत जिंकून व मथुरा, साकेत इत्यादि शहरें काबीज करून पाटलीपुत्रावर रोंख धरला, तेव्हां पुष्यमित्रानें त्याला पिटाळून लाविलें. पुष्यमित्र हा कट्टा सनातनधर्मी होता व त्यानें बौद्धधर्माचा पाडाव करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. याचाच समकालीन पतंजली हा व्याकरणकार होता. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र या नाटकांत पुष्यमित्राची कथा आली आहे. याच्या वंशांतील शेवटचा राजा देवभूति हा दुर्बल असल्यानें त्याचा ब्राह्मण प्रधान काण्व वासुदेव यानें राज्य बळकाविलें (खिस्तपूर्व ७३). शुंगघराण्यानें पुन्हां सनातनधर्म प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला.

**काण्व घराणें**—या घराण्यांत चार पुरुषांनीं ४५ वर्षें राज्य केलें. त्या काळांत राज्यांत सर्वत्र दंगेधोपे सुरू होते. यापेक्षां जास्त माहिती आढळत नाहीं. या घराण्यास काण्वायन असेंहि नांव होतें. त्यांतील शेवटच्या राजास एका आंध्र राजानें ठार करून राज्य घेतलें (खिस्तपूर्व २८) व पाटलीपुत्र ताब्यांत घेतलें.

**आंध्र आणि शातवाहन राजघराणें**—ज्या आंध्रराजानें काण्व घराण्याची सत्ता नामशेष केली त्याचें नांव आढळत नाहीं. आंध्र व आंध्रभृत्य उर्फ शातवाहन ऊर्फ शालिवाहन या दोन घराण्यांनीं ४५० वर्षें राज्य केलें व त्यांच्या एकंदर पिढ्या अजमासें ३० झाल्या. यांच्याबद्दल खरी माहिती उपलब्ध नाहीं. राजवाडे यांच्या मतें आंध्र हे क्षत्रिय आर्य होते व शातवाहन हे त्यांचे नौकर आणि कुंभार वगैरे हलक्या जातीचे होते. आंध्रांचें मूळ राज्य त्रिकालिंग (तेलंगण) देशावर होतें, म्हणजे साधारण गोदा-कृष्णा-दुआवांत होतें. मेग्यास्थेनीसच्या वेळींहि हें राज्य बलवान होतें. अशोकाच्या पूर्वीपासून तें अस्तित्वांत असून, अशोकानें त्याला आपलें मांडलिक बनविलें असावें व त्याच्या मरणानंतर तें पुन्हां स्वतंत्र झालें असावें. पुढें तर या घराण्यानें दख्खनमध्यें बंगालच्या उपसागरापासून अरबी समुद्रापर्यंत आपलें राज्य परसविलें. या घराण्याच्या व दोन्ही क्षत्रप घराण्यांच्या (जुन्नरचें प्राचीन क्षत्रप घराणें व उज्जनीचें अर्वाचीन क्षत्रप घराणें) लढाया होत असत. क्षत्रप हे शकवंशीय होते तर आंध्र हे चातुर्वर्ण्यविशिष्ट सनातनधर्मी होते. त्यांच्यांत गौतमीपुत्र यज्ञश्री हा फार प्रख्यात राजा होऊन गेला. यानें २९ वर्षें (इ. स. १७३-२०२) राज्य केलें. या घराण्याचा शेवटचा इतिहासहि अस्पष्ट आहे. तें बहुधा इ. स. २२५ च्या सुमारास बुडालें असावें.

[सॉंडर्स—दी स्टोरी ऑफ बुद्धिझम; कौटिल्य—अर्थशास्त्र; भांडारकर—हिस्टरी ऑफ दि डेक्कन; स्मिथ—अर्लि व ऑक्सफर्ड हि. इं.; अशोक; रॅप्सन—एन्शन्ट इंडिया].

**शक-यवनांचा धुमाकूळ**—अशोकाच्या वेळीं (खिस्तपूर्व २५०) सेल्यूकसच्या राज्याचे बॅक्ट्रिया आणि पार्थिया हे दोन प्रांत स्वतंत्र बनले. या दोन राज्यांचा पुढें हिंदुस्थानशीं बराचसा संबंध आला. पार्थिआ हा देश कास्पियन समुद्राच्या आग्नेयीस होता आणि बॅक्ट्रिया देश हिंदूकुश व ऑक्ससनदी यांच्या दरम्यान होता. हे दोन्ही देश अशोकाच्या परोपनिषाद (काबूल) या प्रांतास लागून होते, परंतु अशोक जिवंत असे-पर्यंत या दोन परदेशी राजांनीं परोपनिषाद प्रांतावर स्वारी वगैरे करण्यास हिंमत धरली नव्हती. त्याच्या मृत्यूनंतर सिंधूच्या पलीकडील इतर प्रांत या बाह्यांनीं हळू हळू हस्तगत केले. बॅक्ट्रियाचा चौथा ग्रीक राजा डेमेट्रिऑस यानें तर पंजाबावरहि स्वारी केली (सुमारें खिस्तपूर्व १८०). यानंतर काबूल येथें मिनँडर हा प्रख्यात ग्रीक राजा (बौद्ध नांव मिलिंद) झाला. हा बौद्ध-धर्मी असून त्याच्या नांवचा मिलिंद पन्ह म्हणून एक प्रख्यात ग्रंथ आहे. त्यानें हिंदुस्थानवर केलेली स्वारी पुष्य-मित्रानें पिटाळून लागली होती. यमुनाकांठच्या कांहीं प्रदेशांत याचीं कांहीं नाणीं अढळलीं. तक्षशिलेच्या अँटिअल्किडस राजाचा बेसनगर (विदिशा) राजदरबा-रांतील हेलिओडोरस नांवाच्या ग्रीक वकिलानें हिंदुधर्म स्वीकारून (?) बेसनगर येथें वासुदेव देवासाठीं एक शिलास्तंभ उभारला होता (खि. पू. १४०). ग्रीक (यवन) लोकांप्रमाणें पार्थिअन राजांच्या कांहीं किरकोळ स्वाऱ्या पंजाबांत झाल्या; त्यांची कांहींच खूण हिंदुस्थानांत उरली नाहीं. फक्त त्यांची सत्रप ही पदवी या देशांत पुष्कळकाळ पर्यंत अस्तित्वांत होती.

**कुशान-बौद्धधर्मविकास**—ही जात मध्यआशियां-तील यूएची या भटक्या रानटी जातीची एक शाखा असून तिचें खरें नांव कुशी आहे असें म्हणतात. काबूल येथें या जातीनें कांहीं काळ राज्य केलें; त्यांत कनिष्क हा प्रख्यात राजा होऊन गेला (अजमासें इ. स. १२०). कनिष्काच्या पूर्वीचा राजा कडफिसेस दुसरा, यानें हिंदुस्थानावर स्वारी केली आणि काशी-पासून नर्मदेपर्यंत धुमाकूळ घातला (अदमासें इ. स. ७८). माळव्याचे व जुन्नरचे क्षत्रप हे आपल्याला कड-फिसेसचे मांडलिक मानीत असत. कनिष्क याला गांधारचा राजा म्हणत, व त्याची राजधानीहि पुरुषपुर (पेशावर) होती; येथें त्यानें कांहीं बौद्ध इमारती बांधल्या होत्या. काश्मीर ते गंगानदी येथपर्यंतचा प्रांत त्यानें जिंकला होता. पुढें चीन देश जिंकण्यासाठीं तो तिकडे गेला असतां त्याच्या कंटाळलेल्या सैन्यानें त्याचा खून केला. त्याच्यामागें त्याचा मुलगा हुविष्क हा राजा झाला. कनिष्क हा शेवटीं बौद्धधर्मी बनला होता; कांहींचें मत त्यानें हा धर्म न स्वीकारतां त्याबद्दल आदर दाखविला असें आहे. त्यानें बौद्धधर्मांतील भिक्षूंची एक मोठी संगीति भरविली होती; अशोकाच्या संगीतीनंतर भरलेली ही दुसरी संगीति होय. तिचा हेतु धर्मवचनांचा व आचा-रांचा मेळ घालणें हा होता. हिनें दिलेला निकाल ताम्र-पत्रांवर खोदून ठेवून तो काश्मिरांतील एका स्तूपांत ठेवला आहे, अद्यापि हा स्तूप सांपडलेला नाहीं. या संगीतींत अशोकसंगीतीप्रमाणेंच हीनयान व महायान या पोटभे-दांचा तंटा मिटविण्याचा प्रयत्न झाला होता. कनि-ष्काच्या वेळीं महायानपंथ फार जोरांत होता व त्यामुळें बौद्धशिल्प त्यावेळीं फार पुढें आलें. जोंपर्यंत बौद्धधर्माचा प्रसार हिंदुस्थानांतच होत होता तोंपर्यंत त्याच्या मूळ स्वरूपांत (कर्म व पुनर्जन्म) फारसा फरक झाला नाहीं. परंतु जेव्हां त्याचा प्रसार मध्यआशिया, अलेक्झांड्रिया, जपान वगैरे परदेशांत होऊं लागला, तेव्हां तिकडील रानटी, पहाडी, भटके, अर्धवट सुधारलेले इत्यादि नाना-प्रकारच्या लोकांच्या मनांत बिंबेल असें स्वरूप त्याला देणें भाग पडलें. ईजिप्त व आशियाकडील भागांत त्याची व नुकत्याच उदयास आलेल्या ख्रिश्चनधर्माची गांठ पडली; तसेंच या दोन्ही धर्मांच्या आसपास मूर्ति-पूजक व अनेक देवतावादी लोकांची वसति होती. शिवाय प्राचीन इराणी धर्मांत झालेल्या सुधारणा समोर दिसत होत्या. यामुळें तत्कालीन बौद्धधर्मांत सुधारणा होणें अपरिहार्य झालें. देवाचें अस्तित्व, त्याची प्रार्थना करणें त्याच्यांत व भक्तांत बोधिसत्वासारखी मध्यस्थ मंडळी असणें, बुद्धाची मूर्ति करून तिची पूजा करणें इ. नवीन प्रकार त्यांत शिरले. हिंदुस्थानांतहि पुष्कळ वर्षांपासून बौध्द लोकांत कांहीं चळवळी झाल्यामुळें ह्या नवीन प्रकारचा प्रवेश झाला होता. या नव्या पंथासच महा-यान पंथ म्हणतात व त्याचा मुख्य प्रसारक नागार्जुन होय. हा कनिष्काचा समकालीन होता. तसेंच पुष्कळ बौध्दकवि, पंडित, आचार्य व हीनयानपंथी अश्वघोष, वसुमित्र व चरक हेहि या कालीं होऊन गेले. चरक हा कनिष्काच्या दरबारांतील आयुर्वेदाचार्य होता. कनि-ष्कानें पेशावर येथें एक ४०० फूट उंचीचा लांकडी मनोरा, मथुरेस अनेक देवळें, तक्षशिला येथें नवीन पेठा, काश्मिरांत एक शहर वगैरे अनेक शिल्पकामें तयार

करविली. या गांधार शिल्पावर ग्रीक शिल्पाची सामान्यतः छाया पडलेली आहे. आणि पहिल्या व दुसऱ्या शतकांत रोमन लोकांच्या पूर्वेकडील मोहिमांमुळें खोतान प्रांतांत ही कला आली व तेथून वायव्य प्रांतांत घुसली इ. पाश्चात्त्य लेखकांचें नेहमींचें म्हणणें असतें. मात्र मथुरा, सारनाथ व अमरावती (गंतूर जिल्हा) येथें जें उत्कृष्ट बौद्धशिल्प आहे तें मात्र पूर्ण भारतीय आहे असें हेच पंडित कबूल करतात. कनिष्कानंतर हुविष्क हा कुशानराजा गादीवर आला (इ. स. १६२). याची फारशी माहिती सांपडली नाहीं. यानेंहि कांहीं बौद्ध इमारती बांधल्या. तो बहुधा इ. स. १८५ च्या सुमारास मेला. त्याच्या मागून वासुदेव पहिला हा गादीवर बसला. नांवावरूनच या कुशान राजानें हिंदुधर्म स्वीकारल्याचें दिसतें. याच्यानंतर शेजारीं इराणांत सस्सानियन घराण्याचा उदय झाल्यानें व त्यानें काबूलकडे राज्यविस्तार चालविल्यानें हें कुशान घराणें नामशेष झालें (इ. स. २२६). तिसऱ्या शतकांतील हिंदुस्थानचा राजकीय किंवा धार्मिक इतिहास अस्पष्ट आहे. यावेळच्या सर्व हिंदुसंस्कृतीवर ग्रीक व्यापारामुळें त्या संस्कृतीचा बराच परिणाम झाला असें कांहीं पाश्चात्त्य विद्वान म्हणत असतात तें चूक आहे. कारण व्यापाऱ्यांकडून परदेशांत स्वतःची संस्कृति लादली जात नाहीं, या नियमान्वयें ग्रीक व्यापाऱ्यांमुळें त्यांची संस्कृति इकडे पसरली नाहीं. अलेक्झांडर थोडे दिवस इकडे होता व त्याला तात्कालिन हिंदु लोक राक्षस म्हणत असत, त्यामुळें त्याच्यानेंहि हा प्रकार घडविला गेला नाहीं. त्यानंतर तर खुद्द मेग्यास्थेनीसच सांगतो कीं, मौर्य साम्राज्यांत सर्व व्यवहार हिंदुधर्मशास्त्राप्रमाणेंच चालत आहे; सारांश वरील पाश्चात्त्यांचें मत चुकीचें आहे. उलट कांहीं ग्रीक राजांनींच (हिंदुस्थानच्या सरहद्दीजवळील) हिंदी संस्कृति उचलल्याचें सिद्ध झालें आहे. याप्रमाणें ही परकीय संस्कृति दूर सारण्याचें श्रेय सिथनें तत्कालीन ब्राह्मणांनां दिलें आहे. कुशान राजांच्या वेळीं हिंदुस्थानचा रोमन व ग्रीक लोकांशीं व्यापार सुरू असल्यामुळें उत्तरहिंदुस्थानांत व दक्षिणेंत रोमन व ग्रीक नाणीं येत असत. उत्तरेकडील व्यापाराचा मार्ग इराण, मेसापोटेमिया, आशियामयनर, पालमिरा, सीरिया असा (इ. स. १०५ ते २७३) होता. दक्षिणेंतील व्यापार जलमार्गाचा असून तो ईजिप्तशीं इ. स. २० पासून पांड्यदेशामार्फत चालू होता. अरबस्तानांतील बंदरापासून मुझीरी (क्रांगानोर) येथें येण्यास ४० दिवस लागत. या मुझीरीबंदरांत कांहीं रोमन व्यापारी त्यावेळीं रहात असत. हा व्यापार इ. स. २१५ च्या सुमारास काराकल्लाच्या कत्तलीमुळें बंद पडला. मुझीरीप्रमाणेंच वैक्कराई (त्रावणकोर संस्थान), कोरकई (ताम्रपर्णीच्या मुखाजवळ), कावेरीपट्टणम् (कावेरीच्या मुखाजवळ) इ. बंदरें त्यावेळीं फार प्रख्यात व श्रीमंत होतीं. त्यांतून मोतीं, गोमेद, पाच, माणीक इ. रत्नें, मिरीं व मसाल्याचे पदार्थ यांचा व्यापार चाले.

**तामीळ राज्यें व वाङ्मय**—या काळांत वरील व्यापारामुळें दक्षिणेंतील तामीळ राज्यें फार भरभराटीस आलेलीं होतीं व त्यांची संस्कृतीहि उच्च होती. अशोकानें व मेग्यास्थेनीसनें पाण्डय राज्याचा उल्लेख गौरवपर केला आहे. त्याखेरीज केरल (चेर), व चोल आणि केरलपुत्र हीं राज्यें स्वतंत्रपणें अस्तित्वांत होतीं. यांच्यांत परस्परांत नेहमीं भांडणें होत व प्रांतांची थोडी फार अदलाबदल होई. पाण्डय हें सर्वांत प्राचीन असून तें हल्लींच्या मदुरा व तिन्नेवेल्ली या जिल्ह्यांत पसरलें होतें. केरल (चेर) यांचें राज्य त्रावणकोर व कोचीन हीं संस्थानें व मलबार जिल्ह्यावर होतें आणि चोलांचें कारोमंडल किनाराभर पसरलें होतें. चोलांचा मुख्य व्यापार कापडाचा असून त्यांचें एक मोठें आरमारहि होतें व त्याचा दरारा मलाया द्वीपकल्पापर्यंत होता. ख्रिस्ती शकाच्या पहिल्या पहिल्या काळांत या सर्व मल्याळी राज्यांची प्रमुख भाषा तामीळ होती. त्यामुळें त्या भाषेंत उत्तमोत्तम ग्रंथभांडार तयार झालें. या वाङ्मयाचा अत्यंत भरभराटीचा काळ म्हणजे इ. स. चीं पाहिलीं तीन शतकें होय. मदुरा हें या काळचें मोठें विद्यापीठ होतें. या वाङ्मयाचे कुरल, शिल्पअधिकारम् व मणिमेखलई या तीन अत्यंत प्रख्यात ग्रंथांमुळें तीन कालखंड पडले आहेत. कुरलसंग्रहांत नीतिपर व भक्तिपर जी तत्त्वें प्रतिपादली आहेत तशीं संस्कृत ग्रंथांत फार थोडीं आढळतात. यावेळचा तामीळ देशांचा राजकीय इतिहास दुर्बोध आहे. या काळांत कारिकल चोल हा फार प्रख्यात राजा होऊन गेला (सुमारें इ. स. १००); त्यानेंच कावेरीपट्टण हें बंदर स्थापिलें व कावेरी नदीला १०० मैल लांबीचें धरण बांधलें. सिंहलद्वीपच्या राजांशीं या तामीळ (विशेषतः चोल) राजांचीं युद्धें अनेक शतकें चाललीं होतीं. सिंहलद्वीपचा ऐतिहासिक व प्रसिद्ध राजा गजबाहु हा २ ऱ्या शतकांत झाला व त्याचे समकालीन ऐतिहासिक पहिला पाण्डयराज, चोलराज (कारिकलाचा नातु) व चेरराज हे राजे होऊन

गेले. यानंतर चवथ्या शतकापर्यंत या राज्यांचा इतिहास अस्पष्टच आहे. [जर्नल्स रॉ. ए. सो; आर्कि. सर्व्हे रिपोर्ट्स १९१२-१९; एन्साक्लो. रिलिजन अँड इथिक्स; अर्लि व ऑक्सफर्ड हि. इं; अय्यंगार-एन्शन्ट इंडिया].

## गुप्त साम्राज्य व हर्ष साम्राज्य

( इ. स. ३००-६५० )

परकीय शकयवनांच्या धुमाकुळानंतर हिंदुस्थानांत गुप्तकालास सुरुवात होते. हा काल साधारण इ. स. ३००-६५० म्हणजे ३५० वर्षांचा धरतात. या काला-बद्दल मात्र बहुतेक प्रकारची माहिती उपलब्ध आहे. गुप्त घराण्याचा मूळ पुरुष चंद्रगुप्त ( पहिला ) यानें आपल्या सासऱ्यापासून पाटलीपुत्र ही राजधानी घेऊन तेथें आपलें राज्य स्थापिलें. याची राणी लिच्छिवी राज-कन्या होती. लिच्छिविवंशीय एक राजघराणें पाटली-पुत्रास यापूर्वी बरेच दिवस नांदत असावें. थोडयाच दिवसांत चंद्रगुप्तानें मगध, अयोध्या व प्रयागपर्यंतचा प्रदेश मिळवून स्वतःचें नाणें पाडलें व स्वतःचा (गुप्त) शक सुरू केला (२६ फेब्रुवारी ३२०). हा शक हिंदु-स्थानांत पुष्कळ काळ चालू होता. चंद्रगुप्त वारल्यावर (३३०) त्याचा पुत्र समुद्रगुप्त हा राजा झाला.

**समुद्रगुप्त**—हा स्वतःस लिच्छिवी राजकन्येचा पुत्र म्हणवून घेण्यांत फार भूषण मानी. हिंदुस्थानांतील अत्यंत प्रख्यात राजांपैकीं हा एक होय. यानें सुमारें ५० वर्षे राज्य केलें व सम्राटपद मिळविलें. बहुतेक सर्व उत्तर हिंदुस्थान काबीज करून, दक्षिणेंत पल्लव-राज्यापर्यंत स्वारी करून व याप्रमाणें आपलें साम्राज्य वाढवून त्यानें अश्वमेध यज्ञ केला आणि आपल्या नाण्यांवर अश्वाचें चित्र कोरलें. नेपाळ, वायव्यप्रांत, आसाम, गढवाल, सिंहलद्वीप वगैरे सरहद्दीवरील राजे त्याचे मांडलिक बनले होते. अशोकानंतर एवढें मोठें साम्राज्य याचेंच झालें. सीलोनचा मेघवर्मा हा याचा मित्र होता व त्याच्याच संमतीनें यानें बुद्धगयेस एक मठ बांधला. समुद्रगुप्त अत्यंत थोर व बहुगुणसंपन्न आणि विद्वान सम्राट होता. गाणेंबजावणें त्याला उत्तम येई. वीणा वाजवीत बसलेल्याचीं त्याचीं सोन्याचीं नाणीं सांपडतात. तो कवि असून त्यानें अनेक विद्वत्ताप्रचुर ग्रंथ लिहिले होते व त्याच्या पदरीं अनेक विद्वान होते. तो स्वतः ब्राह्मणीधर्माचा वैष्णवपंथी असूनहि त्यानें प्रख्यात बौद्ध ग्रंथकार वसुबन्धु यांस आश्रय दिला होता. समुद्रगुप्त उत्तम प्रकारें राज्य करून इ. स. ३७५ चे सुमारास वारला.

**चंद्रगुप्त दुसरा**—हा अत्यंत शूर होता. यानें माळवा, गुजराथ, सौराष्ट्र हे देश जिंकून तेथील शकांनां नामशेष केलें ( ३८८-४०० ). हे शक आपल्याला क्षत्रप, महाक्षत्रप म्हणवून कुशानांचे मांडलिक समजत. या कृत्यानें आणि त्याच्या सतत विजयीपणामुळें चंद्रगुप्तानें विक्रमादित्य ही पदवी आपल्यास घेतली. जुन्नर येथें एक प्राचीन शक महाक्षत्रप घराणें होतें, त्यांत भूमक व नहपान हे राजे झाले. तें राज्य गौतमीपुत्र आंध्रराजानें पुढें काबीज केलें (११७). उज्जनीसहि एक महाक्षत्रप घराणें होतें व त्यांत चष्टन नांवाचा एक राजा झाला होता. त्याचा नातु रुद्रदामन यानें गौतमीपुत्र आंध्रानें मिळविलेलें जुन्नरकर शकांचें राज्य जिंकून घेतलें (१३०). हा कनिष्काचा मांडलिक होता. कुशान सत्तेचा नाश झाल्यावर हें उज्जनीकर महा-क्षत्रप घराणें स्वतंत्र बनलें. त्यांच्या २१ पिढ्या, दुसऱ्या चंद्रगुप्तानें त्यांचें राज्य घेईपर्यंत झाल्या. उज्जनी हें पवित्र, पुरातन व व्यापारी उतारपेठेचें शहर होतें. तसेंच भडोच, सोपारें इत्यादि पश्चिम किनाऱ्यावरील भरभरा-टीचीं बंदरें श्रीमंत होतीं. सारांश, दोन्ही शकांचीं राज्यें खालसा झाल्यानें अत्यंत श्रीमान प्रदेश गुप्तसाम्राज्यांत समाविष्ट होऊन त्याचा खुष्कीच्या व दर्यावरील व्यापार बराच वाढला. पहिल्या चंद्रगुप्ताखेरीज इतर बहुतेक गुप्त राजे यांनीं दीर्घकाल राज्य केलें आहे. या दुसऱ्या चंद्र-गुप्तानें ४० वर्षे राज्य केलें. हा फार शूर, धाडसी, कडक स्वभा-वाचा व विस्तृत साम्राज्य चालविण्यास सर्वस्वी लायक होता. हा समोरासमोर सिंहाची शिकार करी. संयुक्त-प्रांतांत इ. स. १८२४ पर्यंत सिंह पुष्कळच होते. सांप्रत गिरनारच्या जंगलांत आढळतात. गुप्तसाम्राज्याची हकी-गत अनेक शिलालेख, नाणीं व चिनी प्रवाशांचीं वृत्तें यांवरून ठरली गेली आहे. या प्रवाशांत फाहिआन हा प्रमुख होय. त्यानें ३९९-४१४ पर्यंत हिंदुस्थानांत प्रवास केला. विनयपिटकाची अस्सल किंवा प्राचीन प्रत मिळ-विण्यास व बौद्धधर्माची इतर माहिती काढण्यास हा चीन मधून पामीर घाट ओलांडून स्वात, तक्षशीला, पेशावर मार्गानें पाटलीपुत्र आला. तेथें तो ३ वर्षे राहून ताम्रलिप्ती बंदरांत (हल्लींचें तामलुक बंगाल) २ वर्षे राहिला व मग तेथून सीलोन जावामार्गें देशीं परत गेला. तो ६ वर्षे दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या साम्राज्यांत होता. त्यानें विशेषतः बौद्धधर्माचाच अभ्यास केला व प्रसंगोपात तत्कालीन परिस्थितीची माहिती लिहून ठेविली; त्यामुळें ती पुष्कळशी विश्वसनीय दिसते. बिहार, संयुक्तप्रांत,

माळवा, राजपुताना यांनां तो मध्यदेश म्हणतो. तो सांगतो कीं सिंधुनदापासून मथुरेपर्यंत अनेक बौद्ध मठ, स्तूप वगैरे असून त्यांत हजारों भिक्षू असत. खुद्द मथुरेस २० मठ व ३००० भिक्षू होते. मगधांत मोटीं शहरें असून लोक सुखी व श्रीमंत होते. दानधर्म विपुल चाले, राजरस्त्यांवर अनेक धर्मशाळा असत, पाटलीपुत्र येथें एक लोकांच्या आश्रयानें चाललेला धर्मार्थ दवाखाना होता. पाटलीपुत्र हें अत्यंत श्रीमान व सर्वसाधनांनीं भरलेलें शहर असून तेथें हीनयानी व महायानी विद्यापीठें होतीं, त्यांत ७ हजार भिक्षू व शिक्षक व लांबलांबचे आलेले हजारों बौद्ध विद्यार्थी होते, शहराच्या मध्यभागीं अशोकानें बांधलेले मूल्यवान व जणूं काय देवनिर्मित असे राजवाडे होते. फाहियाननें पाटलीपुत्रास राहून संस्कृतचा अभ्यास केला होता.

**शेवटचे गुप्त राजे**—दुसऱ्या चंद्रगुप्ताचा मुलगा पहिला कुमारगुप्त यानें बापाच्या मागें ४० वर्षें राज्य केलें (४१३–४५५); यानें साम्राज्य वाढवून अश्वमेध केला, याखेरीज याची माहिती अनुपलब्ध आहे. पुष्यमित्र नांवाच्या एका राजानें केलेली स्वारी मात्र त्यानें परतवून लाविली. त्याच्यानंतर त्याचा मुलगा स्कंदगुप्त हा गादीवर आला. त्यानें मध्यआशियांतून आलेल्या भटक्या श्वेतहुणांच्या अनेक टोळ्यांचा पराभव केला. हा या घराण्यांतील शेवटचा सम्राट होय. याच्यानंतर हें घराणें मर्यादित प्रदेशावर पुष्कळ काळ राज्य करीत होतें.

**गुप्त साम्राज्याची परिस्थिति**—राज्यकारभार शिस्तीचा पण सौम्य असे. परक्या लोकांनां साम्राज्यांत सर्वत्र वावरण्यास मुभा असे, परवाने लागत नसत. सर्व शिक्षा दंडाच्या असत, देहदंडाची शिक्षा नसे, फक्त राजद्रोह्याचा उजवा हाततोडीत, चोराचिलटांची मुळींच भीति नसे, ब्राह्मणी यज्ञयागसंस्था पुन्हां जोरांत सुरू होती; सोनें—चांदी—तांबें यांचें चलन चालें, धार्मिक स्वातंत्र्य असे. काळीचें उत्पन्न हाच राज्याचा मुख्य वसूल असे, जीवहत्या होत नसून दारूचा गुत्ता मुळींच आढळत नसे, गुरांची विक्री चालू नसे, चांडाळांची वस्ती गांवाबाहेर असे; सारांश, अशोकापेक्षां यावेळची समाजस्थिति पुष्कळ बदललेली होती. अशोकानें जीवहत्या अजीबात बंद केली नव्हती. अर्थशास्त्रांत तर मद्यापासून सरकारी वसूल जमा करण्याचा उल्लेख आढळतो. गुप्तसाम्राज्यांत प्रजा एकंदरींत फार सुखी असून सरकार तिच्या कारभारांत सहसा हात घालीत नसे. एक यूरोपियन ग्रंथकार या गुप्तसाम्राज्यास (ग्रीसप्रमाणें) पेरिक्लियन युग म्हणतो व एक हिंदी इतिहासकार हिंदुसंस्कृतीचा पुनरुद्धारकाल म्हणतो तें खरेंच आहे. वाङ्मय, कलाकौशल्य, शास्त्रें, धार्मिकसुधारणा इत्यादि अनेक सुधारणांमुळें हा काळ म्हणजे एक सुवर्णयुग होय असें स्मिथहि म्हणतो. अशोकानें बौद्धधर्मप्रसाराची खटपट अतिशय केली तरी त्याच्यानंतर जैन व ब्राह्मणीधर्म यांनीं पुन्हां उचल खाल्ली. कुशान, कानिष्क सोडल्यास त्यांच्या नंतरच्या राजांनीं ब्राह्मणीधर्माकडेच जास्त लक्ष दिलें. उज्जनीचे क्षत्रप तर सनातनधर्मी बनले होते. शेवटीं या गुप्तवंशानें पुन्हां यज्ञसंस्था स्थापून सनातनधर्माला १५० वर्षें प्रामुख्यानें उचलून धरलें, त्यामुळें साहजिकच संस्कृत भाषेचा राजदरबारीं मान चढला. अशोक व आंध्र राजे हे राजदरबारीं प्राकृत (पाली व महाराष्ट्री) भाषा वापरीत असत. त्यामुळें त्यांच्यानंतर संस्कृत भाषेस राजमान्यता आली. अगदीं प्राचीन उपलब्ध संस्कृत शिलालेख मथुरा (१४४) व गिरनार (१५२) येथील कनिष्क व रुद्रदामन् यांच्यावेळचे आढळतात. गुप्तराजांनीं अनेक विद्वानांनां आश्रय दिला होता त्यामुळें त्यांच्या राजवटींत संस्कृतवाङ्मय बहुत उत्पन्न झालें. अनेक अर्वाचीन पंडितांच्या मतें यावेळचें संस्कृत काव्यवाङ्मय सर्व काव्यवाङ्मयांत उत्तम आहे. कालीदास हा बहुधा चंद्रगुप्त दुसरा उर्फ विक्रमादित्य व कुमारगुप्त पहिला यांच्या राजवटींत झाला. तो माळव्यांतील रहिवासी असावा आणि उज्जनीशीं त्याचा दृढ परिचय असावा. पाश्चिमात्य पंडितांनांहि ज्याच्या शकुंतलेमुळें एक प्रकारचें वेड लागलें; त्याच्या जन्मस्थान व निधनस्थानाबद्दल अजून वाद चालू आहेत. मुद्राराक्षस, मृच्छकटिक, वायुपुराण व दुसरीं कांहीं पुराणें हीं साधारणतः या १५०।२०० वर्षांत निर्माण झालीं. वसुंबधु हा प्रख्यात बौद्धपंडित चंद्रगुप्त पहिला व समुद्रगुप्ताच्या वेळीं होता हें मागें सांगितलेंच आहे. शास्त्रांत ज्योतिषशास्त्र, फलज्योतिष, शिल्पशास्त्र, संगीतशास्त्र, (प्रस्तरमय व धातुमय) मूर्तिशास्त्र, चित्रकला, गणितशास्त्र, धातुकर्मशास्त्र, इत्यादि अनेक शास्त्रें या राजवटींत अत्यंत उच्च दर्जास पोहोंचलीं. आर्यभट्ट (४७६), वराहमिहिर (५०५), ब्रह्मगुप्त (५९८) हे ज्योतिषशास्त्रांत श्रेष्ठ पंडित होते. संगीतादि ललितकलेंत तर खुद्द समुद्रगुप्तच तरबेज होता. गुप्तशिल्प फारच उच्च दर्जाचें

होतें, त्यापैकीं बहुतेकांचा पुढें मुसुलमानांनीं अनेक शतकेंच्या शतकें नाश केला; त्यामुळें सांप्रत ह्यांचा फार थोडा अवशेष आढळतो. झांशी जिल्ह्यांत देवगडचें देऊळ (याच्या भिंतींवर सुंदर नकशीकाम आहे), कानपूर जिल्ह्यांत भितरगांवचें देऊळ (यांतील भित्तिचित्रलेपाचें काम उत्कृष्ट आहे), सारनाथचें देऊळ (येथील खोदकाम पाहाण्यासारखें आहे) हीं तत्कालीन शिल्पाचीं उदाहरणें आहेत. सारनाथ गांवास तर गुप्तकालीन मूर्ती व चित्रकला यांचें अजबघर म्हणतात. दिल्लीचा समुद्रगुप्ताचा घडीव लोखंडाचा स्तंभ हा तत्कालीन धातुकर्मविद्येचा उत्कृष्ट नमुना आहे. तांब्याचे ओतीव पुतळे तयार करण्याचीहि कला श्रेष्ठतेस पोहोंचली होती हें नालंदाच्या ८० फूट उंचीच्या बुद्धाच्या सुंदर पुतळ्यावरून दिसून येईल. अजिंठ्याच्या लेण्यांपैकीं १६ वें व १७ वें लेणें या काळांतील आहे; व तीं दोन्ही अतिशय सुंदर कोरलेलीं आहेत. अजिंठ्याच्या लेण्यांच्या योग्यतेबद्दल सर्व जगानें धन्योद्गार काढले आहेत. सारांश ५ व्या शतकांत हिंदुसंस्कृति सर्व अंगांनीं अत्यंत श्रेष्ठ दर्जास पोहोंचली होती. या काळांत अनेक परदेशांशीं हिंदुस्थानाचा संबंध आला होता. स. ३९७ ते ५७१ पर्यंत हिंदुस्थानांतून साधारण १० वकीलमंडळें चीनदेशांत गेलीं होतीं तर उलट अनेक चिनी प्रवाशीहि इकडे येत होते. मलाया, जावा इकडे बौद्धधर्माचा विशेष प्रसार यावेळींच झाला. इराणशीं तर जोरांत व्यापार चालत असे. रोमन राजांकडेहि तीन शिष्टमंडळें इकडून गेलीं होतीं (स. ३३६, ३६१ व ५३०). ईजिप्त, सीरिया, ग्रीस व यूरोप यांच्यांशीं दक्षिणेंतील बंदरांतून व उत्तरेकडील खुष्कीमार्गें व्यापार चालू होता. एकंदरींत गुप्तकालीं हिंदुस्थान अत्यंत भरभराटीला पोहोंचलें होतें.

**हूणराजे**—स्कंदगुप्ताच्या वेळीं श्वेतहूणांनीं हिंदुस्थानावर हल्ले करून पंजाबकडील बराचसा गुप्तसाम्राज्याचा भाग काबीज केला होता. त्याच वेळीं त्यांनीं इराणहि काबीज केलें होतें. त्यांच्यापैकींच तोरमाण नांवाच्या एका पुरुषानें माळव्यांत सत्ता स्थापिली ती त्याच्यानंतर त्याचा मुलगा मिहिरगुल (हा फार क्रूर होता) याच्या वेळेपर्यंत (५००—५२८) होती. इ. स. ५२८ त माळव्याचा राजा यशोधर्म यानें त्याला तेथून हांकलून दिलें तेव्हां हूण त्या प्रांतांत स्थाईक झाले. या हूणांनीं हिंदुसंस्कृतीचा थोडा फार नाश केला.

**रजपूतराजांचा उदय**—गुप्तांचें साम्राज्य कमकुवत झाल्यावर ठिकठिकाणचे सरदार, जहागीरदार प्रबळ होऊन त्यांनीं स्वतंत्र राज्यें स्थापिलीं. हे लोक क्षत्रिय जातीचे असून उत्तरेकडे त्यांनां राजपूत असें म्हणण्याचा प्रघात पडला. राजपूत हा शब्द प्रथम मुसुलमानांनीं तयार केला. तत्पूर्वी यांनां क्षत्रियच म्हणत. ह्युएनत्संग त्यांनां क्षत्रियच म्हणतो. अनेक पाश्चात्त्य विद्वान या राजपुतांनां परकीय अनार्यांचे वंशज म्हणतात; परंतु तें चुकीचें असल्याबद्दल पौर्वात्य पंडितांचें म्हणणें आहे. या राजपूत राज्यांत वल्लभीचें मैत्रक घराणें हें प्राचीन होतें. तें पुष्कळ काळ टिकून अखेर अरबांनीं त्याचा नाश केला (७७०). हा वंश गुप्तशक मानीत होता, ह्या राज्यांत संपत्ति पुष्कळ असून पश्चिम हिंदुस्थानांत तें महत्त्वास चढलें होतें. सहाव्या शतकांत वल्लभीपुरास अनेक बौद्धमठ व बौद्धविद्यापीठें होतीं. तो मान सातव्या शतकांत नालंदा (विहार) या ठिकाणास मिळाला. हें घराणें नामशेष झाल्यावर अनहिलवाडा येथें चावडा घराण्यानें राज्य स्थापिलें, अनहिलवाडचें राज्य मुसुलमानांमीं पंधराव्या शतकांत घेऊन अहमदाबाद ही राजधानी केली. जालंधर, मुलतान, कनोज, नेपाळ, गौंड, कामरूप, कोसल, माळवा, आंध्र, कांची, बदामी इत्यादि ठिकाणीं या सहाव्या शतकांत निरनिराळ्या राजसत्ता स्थापित झाल्या होत्या. मगधाचें साम्राज्य संपुष्टांत आल्याबर बहुधां कनोज येथील मौखरींचें राज्य बहुतेक उत्तर हिंदुस्थानावर पसरलेलें दिसतें, त्यांच्यानंतर हर्षवर्धनचें साम्राज्य झालें. या मौखरींनीं हूण राजांनां सतावून सोडलें होतें. या सुमारास माळव्यांतील गुप्तघराणेंहि बरेंच पुढें आलें होतें. तामीळ राज्यांचा या कालचा इतिहास फारसा उपलब्ध नाहीं. सातव्या शतकाचा इतिहास समजण्यास भरपूर साधनें आहेत. ह्युएत्संगाचें प्रवासवृत्त, सरकारी चिनी हकीकती, बाणाचें हर्षचरित्र शिलालेख, नाणीं, ताम्रपट इत्यादि साधनांनीं या काळची माहिती उजेडांत आलेली आहे.

**हर्षवर्धन** (६०६-४७)—सहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत ठाणेश्वर येथील प्रभाकरवर्धन या राजानें हूणांनां हांकलून देऊन आपली सत्ता गुर्जर, मालव इत्यादिकांवर बसवून राज्य वाढविलें. तो वारल्यावर त्याचा वडील मुलगा गादीवर बसला, परंतु त्याला बंगाल (गौड)च्या राजानें विश्वासघातानें ठार मारलें. या वेळीं प्रभाकराचा धाकटा मुलगा हर्ष हा १६—१७ वर्षांचा असतांहि प्रधानमंडळानें त्याला गादीवर (६०९) बसविलें. तावडतोब हर्षानें राज्यकारभारांत लक्ष घालून दिग्विजयास प्रारंभ केला व तें कार्य ५-६ वर्षांत संपवून स्वतःचा शक सुरू

केला. ह्युएनत्संग हा याच्याच कारकीर्दीत इकडे आला. हर्षाचें सैन्य-९ हजार गजदळ, ५० हजार पायदळ व १ लाख घोडदळ असें होतें. दिग्विजयांत त्यानें व त्याच्या सैन्यानें मुळींच विश्रांति घेतली नाहीं. त्याच्या साम्राज्यांत पंजाबखेरीज सर्व उत्तर हिंदुस्थान होतें. त्यानें दक्षिणेंत चालुक्यांवर चाल केली, परंतु त्यांत त्याचा पराभव होऊन दोन्ही राज्यांची मर्यादा नर्मदा ठरली गेली (६२०). यानंतर त्यानें आपलें सर्व लक्ष राज्यसुधारणेकडे घातलें.

**हर्षकालीन समाजस्थिति**—हर्षानें कनोज ही राजधानी करून तेथें अनेक इमारती बांधल्या. त्यावेळीं हें शहर दोन कोस लांब व अर्धा कोस रुंद आणि तटबंदीचें असून, अत्यंत श्रीमंत होतें. त्यांत अनेक तलाव व बागा होत्या. तसेंच १०० बौद्ध मठ व त्यांहूनहि जास्त हिंदु देवळें होतीं व बौद्ध आणि सनातन हे दोन्ही धर्म प्रचलित होते. कनोजचा सर्व नाश १६ व्या शतकांत शेरशहानें केला. हर्ष हा ४८ व्या वर्षाच्या सुमारास वारला. साऱ्या आयुष्यांत त्यानें राजकारभाराकडेच लक्ष दिलें. तो सतत (पावसाळ्याखेरीज) फिरून साम्राज्याची पहाणी करीत असे. राज्यांत जुलूम, जबरदस्ती, कडक शिक्षा, बेबंदशाही वगैरे कांहीं नसून प्रजा सुखी असे. त्याची स्वारी मोठ्या डामडौलानें निघे. प्रांतांवर गव्हर्नर अथवा मांडलिक राजे असत. प्रत्येक प्रांतांत स्वतंत्र सरकारी दफ्तर (कारभार) असे. शिक्षणाचा प्रसार फार झाला होता. नालंदा येथील बौद्ध विद्यापीठ यावेळीं फार प्रख्यातीस आलें होतें. कलाकौशल्यहि पुष्कळ पुढें आलें होतें. हर्ष हा स्वतःविद्वान होता व त्याच्या पदरीं पंडित होते. व्याकरण, काव्य, नाटकें इत्यादि विषयांवर त्यानें ग्रंथरचना केली होती. बाण हा प्रसिद्ध कवि हर्षाचा मित्र व चरित्रकार होता. त्याच्या हर्षचरित्रामुळें त्यावेळचा इतिहास बराच समजतो. त्याचा कादंबरी हा ग्रंथ संस्कृत वाङ्मयांत वरच्या दर्जाचा आहे. हर्ष हा प्रथम सनातनधर्मी होता, पण पुढें त्याचा ओढा बौद्ध धर्माकडे जास्त वळला व अशोकाप्रमाणें त्यानें त्या धर्माच्या प्रसारासाठीं पुष्कळ खटपट केली. यावेळीं चातुर्वर्ण्यहि जोरांत होतें.

**ह्युएनत्संग**—हा एका चिनी सरदाराचा मुलगा होता याचा जन्म स. ६०० च्या सुमारास झाला. लहानपणापासून याचा ओढा धर्माकडे असल्यानें त्यानें प्रथम बौद्धधर्माचें पुष्कळ ज्ञान मिळवून घेतलें व मग सरकारी बंदीला न जुमानतां तो २९ व्या वर्षी स्वदेश सोडून निघाला. बौद्धधर्माचा सूक्ष्म अभ्यास व अस्सल बौद्ध ग्रंथ मिळविणें हा त्याचा हिंदुस्थानांत येण्याचा उद्देश होता. स्वतःच्या गांवापासून काबूलपर्यंत तीनहजार मैलांचा अत्यंत कठीण प्रवास करून त्यानें हिंदुस्थानांत इ. स. ६३० त प्रवेश केला. हर्षाच्या राज्यांत त्यानें ६३९–४३ पर्यंत प्रवास करून हिंदुस्थानची तत्कालीन सर्व प्रकारची माहिती लिहून ठेविली आहे. पुढें तो ६४९ त स्वदेशीं गेला. त्यानें बरोबर अनेक बौद्ध ग्रंथ, मूर्ति व इतर संस्मरणीय वस्तू नेल्या. त्यानें स्वदेशांत बौद्धधर्माचें एक विद्यापीठ स्थापिलें. तो इतका विद्वान होता कीं त्यावेळच्या चिनी बादशहानें तर त्याचा उत्तम मान राखलाच पण आजहि चीनमध्यें त्याला श्रेष्ठ प्रकारचा मान मिळतो. हर्ष हा बंगाल्यांत असतां ह्युएनत्संग त्याला भटेला होता. हर्षानें त्याचा पुष्कळ मान ठेवला. पुढें हर्षानें कनोज येथें एक महासभा भरविली, तिला उत्तरहिंदुस्थानांतील सर्व राजे व ह्युएनत्संग हजर होता. पुढें प्रयाग येथेंहि अशीच दुसरी महासभा भरवून हर्षानें आपला बहुतेक खजिना धर्मादाय केला (६४३). दर पांच वर्षांनीं याप्रमाणें सभा भरवून तींत सरकारी शिल्लक खर्च करण्याची त्याची रीत होती. प्रयागची महासभा ही या प्रमाणें ६ वी होती.

**हर्षाच्या नंतरची स्थिति**—हर्ष हा स. ६४७ च्या सुमारास वारला. त्याला मुलगा नसल्यानें राज्यांत सर्व बेबंदशाही होऊन, सरदार लोक स्वतंत्र बनले. तिबेटच्या राजानें ही संधी साधून तिरहूत हा हर्षाचा प्रांत काबीज केला. यानंतर उत्तरहिंदुस्थानांत निरनिराळीं हिंदू राज्यें अस्तित्वांत आलीं व तीं साधारण मुसुलमानांच्या आगमनापर्यंत कायम होतीं. काश्मीरांत कुशानानंतर कर्कोटक, उत्पल इ. व या घराण्यांनंतर १३३९ त एक मुसलमान घराणें आलें. नेपाळांत गुरख्यांनीं सत्ता स्थापीपर्यंत तेथेंहि अनेक घराणीं झालीं. कनोजास महंमद घोरी येईपर्यंत हिंदु राज्य होतें माळव्यांत परमार आणि बंगाल्यांत पाल व सेन राजे होते. खेरीज राजपुतान्यांत सिंध, आसाम व काबूल येथेंहि हिंदु राज्यें होतीं. तीं साधारण मुसुलमानांच्या आगमनापर्यंत कायम होतीं दक्षिणेकडे ज्या पुलकेशी (दुसरा) चालुक्यानें हर्षाचा पराभव करून साम्राज्य स्थापिलें होतें, त्याचा पराभव करून नरसिंहवर्मा पल्लवानें आपली सत्ता स्थापिली (६४२). शिवाय, राष्ट्रकूट, यादव ह्यांचीहि सत्ता नांदत होती. दक्षिणेंत या काळीं हिंदुधर्माबरोबर जैनमतहि

बरेंच पसरलें होतें; पुढें तें नष्ट झालें. मात्र तेथील सामाजिक स्थिति उत्तम प्रकारची होती.

[आर्किऑ. रिपोर्टस; हर्षचरित; वाटर्स–ह्युएनत्संग; वैद्य–मध्ययुगीन भारत; भांडारकर–हिस्टरी ऑफ डेक्कन; भांडारकर–कॉमेमेरेशन व्हाल्यूम; स्मिथ–अर्लि व ऑक्सफर्ड हि. इं; अजिंठा फ्रेस्कोज; इंडियन स्कल्पचर ऑफ दि गुप्त पीरिअड].

## मध्ययुगीन हिंदु साम्राज्यें व राज्यें.

(इ. स. ६५०–१२००)

हर्षाच्या नंतर व मुसुलमानांच्या राज्यस्थापनेपर्यंत उत्तर हिंदुस्थानांत साधारण ५०० वर्षे हिंदु क्षत्रिय राजांनीं आपलीं लहान मोठीं राज्यें स्थापलीं होतीं. त्यांत राजपुतान्यांत (राजपुताना हा शब्द इंग्रज लेखकांनीं बनविला आहे) जे राजे होते त्यांनां पुढें (मुसुलमान लोक) राजपूत म्हणूं लागले व बहुधा याच राजपुतांनीं उत्तर हिंदुस्थानांतील पश्चिम भाग आपल्या ताब्यांत ठेवला होता. यांपैकीं बऱ्याच राज्यांचीं नांवें ह्युएनत्संगाच्या यादींत येऊन गेलीं आहेत. काबूल येथील बौद्धधर्मी घराणें, स्वातचें बौद्धधर्मी घराणें, काश्मीरचें कर्कोकट घराणें (पंजाब याच्याच ताब्यांत होता), मुलतानजवळील टेक्का घराणें, सिंधचें ब्राह्मण चच घराणें, चितोडचें मौर्य घराणें, वल्लभीपूरचें वल्लभी घराणें, भिनमाळचें उत्तर गुर्जर घराणें व भडोचचें दक्षिण गुर्जर घराणें, धारानगरीचें शिलादित्य घराणें, उज्जनी, झजोटी व ग्वाल्हेरचीं ब्राह्मण घराणीं, ईदरचें गुहिलोट घराणें इत्यादि राज्यें पश्चिमेकडे होतीं. मध्यदेशांतील ठाणेश्वर व कनोज हीं दोन वास्तविक निराळीं राज्यें असून तीं हर्षाच्याच अंमलाखालीं होतीं. या काळीं पाटलीपुत्र नामशेष होऊन तो मान जो कनोजेस मिळाला, तो इ. स. ६०० ते १२०० पर्यंत कायम राहिला. पुढें तो दिल्लीस मिळाला, तो अजून चालूच आहे. अलवार, हरद्वार, गढवाल, श्रावस्ती, मगध (अशोकवंशीय राजा), कामरूप (ब्राह्मणवंश), कर्णसुवर्ण, ताम्रलिप्ति, समतट (ब्राह्मणवंश), ओरिसा व गंजम इ. राज्यें मध्य व पूर्व हिंदुस्थानांत होतीं. दक्षिणेंत कलिंग, कोसल, आंध्र (वरंगळ), वेंगी (चालुक्य), चोल, कांची (पल्लव), मदुरा (पांड्य), बनवासी (कदंब) व महाराष्ट्र (चालुक्य) इत्यादि राज्यें होतीं. ह्युएनत्संगानें वर्णिलेलीं हींच राज्यें पुढेंहि कांहीं काल थोड्या फार फरकानें कायम राहिलीं होतीं.

**सिंधचें राज्य**–सिंधमध्यें मौर्यवंशी साहसीराय हा हर्षाच्या मृत्यूच्या वेळीं राजा होता. याच्या हाताखालीं लहान ३१४ राज्यें असून त्यांचे राजे जाट वगैरे क्षत्रियें होते. साहसीच्या नंतर चच या ब्राह्मण मंत्र्यानें सिंधूराज्य बळकावून तें काश्मीर, स्वात आणि कच्छपर्यंत वाढविलें व बौद्धधर्माचा नायनाट करण्याचा प्रयत्न केला. याची राजधानी ब्राह्मणावाद येथें होती. त्याच्या मागून चंद्र व दाहीर हे राजे झाले. दाहर हा चचचा पुत्र होता. दाहरच्या वेळीं मुसुलमान व्यापाऱ्यांनां हिंदू लुटारूंनीं लुटल्याच्या आरोपावरून इराणच्या सुभेदारानें धर्मयुद्धाच्या नांवावर महंमद कासीम याला सिंधवर पाठविलें. तो प्रथम देबल बंदरांत आला व त्यानें उल्हाट यंत्रांच्या साहय्यानें व घोडदळाच्या बळावर आणि विशेषत: फितुरीच्या युक्तीनें सिंधमधील मोठमोठीं शहरें भराभर घेतलीं. बौद्धधर्मीय प्रजेनें यावेळीं दाहीरविरुद्ध कासीमला मदत केली आणि दाहीरच्या एका अधिकाऱ्यानें तर फितूर होऊन कासीमला सिंधूच्या अलीकडील कांठीं आणविलें. शेवटीं ब्राह्मणावादजवळ लढाई झाली, तींत प्रथम दाहीरनें कासीमचा पराभव केला, पण दारूच्या बाणानें दाहीरचा हत्ती बुजून दाहीर हा कासीमच्या हातीं लागला व त्यानें त्याचा जीव घेतला. याप्रमाणें सिंधचें राज्य अरबांच्या हातीं गेलें (७१२). या मोहिमेंत कासीमनें हजारों देवळें व बायका भ्रष्ट केल्या, हजारों हिंदूंनां बाटविलें, हजारों लोकांची कत्तल करून अगणित लूट मिळविली व ६० हजार स्त्रीपुरुषांनां गुलाम केलें. लुटीचा पांचवा हिस्सा राजाला देण्याची व बाकीचे चार हिस्से सेनापति व सैन्य यांत वांटण्याची मुसुलमानांची पद्धत असल्यानें परदेश जिंकण्याची व लुटालूट करण्याची उमेद या लोकांत जास्त असे. कासीमनें सिंधनंतर बहुतेक पंजाब हस्तगत करून तेथेंहि वरीलप्रमाणेंच भयंकर अत्याचार केले व असंख्य द्रव्य मिळविलें. पुढें दाहीरच्या मुलींच्या सांगण्यावरून (यांनां कासीमनें जुलमानें बगदादच्या खलीफाच्या जनान्यांत घातलें होतें म्हणून त्याचा सूड घेण्यासाठीं) खलीफानें कासीमला ठार मारविलें, पण सिंधप्रांत महंमुद गझनीकराच्या स्वारीपर्यंत अरबांच्या ताब्यांत राहिला; त्यामुळें तेथें बरेच हिंदू बाटले गेले. महंमूदनें सिंध १०२५ त घेतला व कुतुबुद्दीननें गिझनीकरांपासून तो १२०० त जिंकून घेतला. तैमूरच्या स्वारीनंतर [illegible] सुम्र आणि सुम्म या मूळच्या

रजपूत पण पुढें मुसुलमान झालेल्या घराण्यांनीं १३३८–१५१९ पर्यंत सिंधवर राज्य केलें. त्यानंतर बाबरवंशाचा अमल १७६२ पर्यंत चालून व मध्यंतरीं थोडा काळ अंमल होऊन १८४३ त सिंध इंग्रजांच्या हातीं गेला.

**काबूलचें शाही घराणें**—अरबांनीं सिंध व पंजाब घेतल्यावर काबूल येथील बौद्धधर्मी हिंदु राजावर स्वारी करून त्याला बाटविलें(६६३).तरी पण त्यानें व त्याच्या वंशजांनीं गनीमी काव्यानें आपल्या राज्याचा बचाव पुष्कळ वर्षें केला (९००). काबूलचें राज्य बरेंच मोठें (हल्लीचें अफगाणिस्थान) होतें. गिझनी हें त्या राज्यांतील एक मोठें शहर अरबांनीं जिंकून काबूलच्या (हिंदू) शहास मांडलिक बनविलें (९७५). शेवटीं महंमूद गिझनीकरानें १०२१ त काबूलचें राज्य सर्वस्वी खालसा केलें व झाडून सर्व हिंदू आणि बौद्ध लोकांना मुसुलमान बनविलें. काबूलचें हें हिंदू क्षत्रियघराणें स्वतःस शाह ही पदवी लावीत असे. हें घराणें काबूल येथें सुमारें ४०० वर्षें नांदत होतें.

**काश्मीरचें राज्य**—सातव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत काश्मीरांत गोनर्दीयवंश राज्यावर होता. त्यानंतर कर्कोटक वंशाचा मूळ पुरुष दुर्लभवर्धन हा गादीवर आला (६०२). याच्या वंशांत १७ राजे होऊन त्यांनीं इ. स. ८५६ पर्यंत उत्तम प्रकारें राज्य केलें. हें घराणें शिवोपासक असल्यानें त्याच्या काळीं काश्मिरांत बौद्धधर्माचा लोप झाला. दुर्लभवर्धनाच्या वेळींच ह्युएनत्संग हा काश्मिरांत गेला होता. तक्षशिला, सिंहपूर इ. लहान राज्यें काश्मीरचीं मांडलिक होतीं. दुर्लभाचा पुत्र प्रतापादित्य हा फार न्यायी होता. त्याच्या वेळीं काश्मीरांत उत्तम शिल्पकामें झालीं. त्याचा पुत्र ललितादित्य यानें तर हर्षानंतर उत्तर हिंदुस्थानांत साम्राज्य स्थापिलें. त्याच्या साम्राज्यांत (बलोचिस्तान) मेकरान, (तुर्कस्तान) तुराण, कांबोज, तिबेट, सिंध, कनोज (येथील यशोवर्म्याला त्यानें मांडलिक केलें), गौड, कलिंग, कर्णाटक, कोंकण, सौराष्ट्र, माळवा हीं राज्यें येत होतीं. पुढें तो गोबीच्या अरण्याच्या पलीकडील प्रांत जिंकण्यास गेला असतां तिकडेच मरण पावला (७३६). दिग्विजयामुळें अलोट संपत्ति मिळवून ललितादित्यानें तिचा प्रजेच्या उपयोगाच्या कामीं व्यय केला. यानें पूल, अन्नसत्रें, पाणपोया, देवळें, राजरस्त्यांवर विहरी इ. कामें केलीं. यानेंच ५४ हात उंचीचा एकसंधी, दगडी गरुडस्तंभ बांधला. ललितादित्याचा नातू जयापीड हाहि शूर विद्वान व उत्तम गुणी राजा होता. त्याच्या पदरीं क्षीरस्वामी, उद्भट, वामन, दामोदरगुरु इ. अनेक विद्वान पंडित होते. सर्व हिंदुस्थानांतील नामांकित पंडित तो आपल्या पदरीं आणून ठेवी पण पुढें पुढें तो जुलमी झाला व अखेर ७८२ त वारला. त्याच्या मागें या वंशांत दुर्बल राजे होऊन ८५५ त हें घराणें जाऊन उत्पल घराणें गादीवर आलें. या वेळेपासून काश्मीरदेश हा साधारणपणें हिंदुस्थानापासून अलिप्त राहूं लागला. उत्पल घराण्याचा संस्थापक अवन्तिवर्मा यानें बंधारे, कालवे, मंदिरें इत्यादि लोकोपयोगी कामें केलीं. तो विद्वान व न्यायी होता. ८८४ त त्याचा पुत्र शंकरवर्मा यानें थोडासा राज्यविस्तार केला. याचा वंश दुर्बळ झाल्यानें ब्राह्मणांनीं यशस्कर या मंत्र्याची राजा म्हणून निवड केली. यावरून त्याकाळीं मधून मधून राजा निवडण्याचें काम ब्राह्मणांकडे येई असें दिसतें. यशस्कराच्या राज्यांत दारें उघडीं टाकून लोक निजत इतकी त्याची राज्यव्यवस्था उत्कृष्ट होती. पुढें कांहीं काळानें दिद्दा नांवाची जुलमी राणी गादीवर आली. तिनें ४५ वर्षें राज्य केलें. तिच्यानंतर (१००३) लोहर घराणें गादीवर आलें व त्याच वेळीं मुसुलमानांनीं हिंदुस्थान जिंकण्यास प्रारंभ केला. अनंतदेव नांवाच्या राजाच्या वेळीं मुसुसमानांनीं फितुरीनें काश्मीरवर स्वारी केली पण राजानें त्यांचा पराभव केला. हा माळव्याच्या भोजराजाप्रमाणें दाता असून त्याचा समकालीनहि होता. त्याचा नातू हर्ष हा कनोजच्या हर्षाप्रमाणें विख्यात झाला. तो कवि, संगीतज्ञ व विद्वानांचा पोशिंदा होता (११०१). यानंतर उच्छल याचें सातवाहनघराणें गादीवर आलें. त्याचा नातू जयसिंह हा राजा असतांना प्रसिद्ध राजतरंगिणीकार कल्हण हा होऊन गेला (११४८). पुढें हें राज्य अंतःकलहानें निर्बळ होऊन १३४९त मुसुलमानांच्या हातीं गेलें. तरी १५८६ पर्यंत तेथें ब्राह्मणांचें व संस्कृत भाषेचें वर्चस्व चालू होतें. काश्मीरच्या राज्यांत राजाला सल्ला देण्यास मंत्रिमंडळ असे.पुढें पुढें तंत्री नांवाच्या लष्करी लोकांची सत्ता राज्यांत बरेच दिवस वाढली होती. कर्मस्थान नांवाचें हल्लींसारखें पब्लिकवर्क्स खातें त्यावेळीं होतें. चलनांत तांबें, चांदी व सोनें(दीनार)चाले.या देशांतील भूमे (वन्य) डामर नांवाचे शूर लोक होते. त्यांनीं अनेकदां राज्यक्रांत्या केल्या होत्या. सरकारी शेतसारा ऐनजिन्नसी घेत. हा देश विद्येबद्दल पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. येथील विद्यापीठांना राजेलोक अग्रहार देत. सर्व

हिंदुस्थानभर काश्मिरी पंडितांची ख्याति असे, म्हणून त्यांनां जिंकल्याशिवाय धार्मिक चक्रवर्तित्व मिळत नसे. यासाठीं आद्य शंकराचार्यांनीं तेथील पंडितांनां जिंकून तेथें मठस्थापना केली. काश्मीर हा देश दोन प्रचंड पर्वतांच्या दरम्यान असून त्यांत शिरण्यास बारामूळा (वराहमूळ)व आणखी ११२ घाट आहेत ते बंद केल्यास आंत जातांच येत नाहीं. राजधानी श्रीनगर ही फार प्राचीन (अशोकपूर्वकालीन) आहे. केशर व तांदूळ हे उत्पन्नाचे मुख्य जिन्नस आहेत.

**वल्लभीपूरचा मैत्रकवंश**—हें वल्लभीपूर भावनगर-जवळ आहे. भट्टार्क मैत्रक हा या घराण्याचा मूळपुरुष होता. ह्युएनत्संगानें या घराण्यास क्षत्रिय म्हटलें आहे. हें घराणें आपल्यास अयोध्येच्या सूर्यवंशांतील समजे. भट्टार्क हा पाटलीपुत्राच्या गुप्तसम्राटाचा सेनापति होता. या घराण्यानें स्वातंत्र्य धारण केल्यावरहि गुप्तशकच चाल-विला. त्यालाच चुकीनें पुढें वल्लभी शक म्हणूं लागले. भट्टार्कानें गुप्तांचा पडता काळ पाहून वल्लभीस राज्य स्थापिलें पण तो व त्याचा पुत्र ध्रुवसेन हे गुप्तांचे मांड-लिक होते. ध्रुवसेनाचा पुतण्या गुप्तसेन हा मात्र स्वतंत्र झाला (५३९–५६९). याचा पणतु ध्रुवसेन दुसरा हा कनोजचा सम्राट हर्षवर्धन याचा जांवई व सहाय्यकर्ता होता. ह्युएनत्संगानें याचेंच वर्णन केलें आहे (६२०–४०); शेवटीं शेवटीं हा बौद्धमताचा बनला. याचा पुत्र चवथा ध्रुवसेन हा या वंशांत सर्वांत बलिष्ठ होता. त्यानें चक्रवर्तिपदवी धारण केली होती (६४९). याच्या वेळींच प्रसिद्ध भट्टीकवि झाला. ध्रुवसेनाचा पणतु तिसरा शिलादित्य यानें राज्याचा विस्तार केला (५७५). याच्या नंतर पुढील राजांनीं शिलादित्य हें उपपद लावण्याचें सुरू केलें. या घराण्यांतील शेवटचा राजा सातवा शिलादित्य (ध्रुवभट्ट) होता. याच्यावेळीं रंक नांवाच्या एका सरदारानें सिंधच्या आरबांनां फितूर होऊन त्यांच्याकडून एकाएकीं चाल करवून हें राज्य नष्ट कर-विलें (७७५). या राज्यांत पश्चिम माळवा, उत्तरगुजराथ व पूर्वकाठेवाड येई. हे राजे प्रजानिष्ठ व त्यांची गुज-राती प्रजाहि राजनिष्ठ होती. त्यामुळें व व्यापारामुळें हें राज्य भरभराटीस आलें होतें. राज्यकारभार उत्तम होता. मात्र पुढें अहिंसातत्त्व फार बोकाळल्यानें हें राज्य दुर्बळ झालें.

**भडोच येथील गुर्जरवंश**—या भरुकच्छाच्या राज्यांत हल्लींचा बहुतेक गुजराथ येतो. येथील राज-वंशांत सहासात राजे (५८०पासून ७३५ पर्यंत) झाले. भडोच आणि नंदिपूर (नांदोद) त्यांच्या राजधान्या होत्या. हे राजे बहुधां भिनमालच्या गुर्जरांचे मांडलिक असावेत. कारण ते स्वतःस सामन्त म्हणवितात. यांच्या पूर्वी या देशावर हैहयवंशी त्रिकूट वंशाचें राज्य होतें. त्रैकूटकशकाचाच उपयोग या गुर्जरांनीं केलेला आहे. या घराण्याचा नाश नवसारी येथील चालुक्य घराण्यानें केला असावा. या घराण्यावरून मूळचा आनर्त व लाट या देशांनां गुजराथ देश हें नांव मिळालें. गुजराथी लिपीप्रमाणें महाराष्ट्री लिपीचा पगडा एके काळीं येथें होता. कारण या देशांतील जैनवाङ्मय महाराष्ट्री लिपींत आहे. येथील गुजराथी भाषा उत्तर गुर्जरांच्या शौरसेनी भाषेवरून बनली असावी. गुर्जर हे मूळचे सोमवंशी वैश्यवर्णाचे होते. ते पंजाब, मारवाड (भिन-माळ) येथून गुजराथेंत आले. भडोच, खंबायत, प्रभास संजान हीं बंदरें व्यापारासाठीं इ. स. २०० पासून चांगलींच प्रसिद्ध आहेत. तत्कालीन या बंदरांतील आया-तनिर्गतीची यादी दिली आहे तींत अनुक्रमें मद्य, पितळ कथिल, शिसें, चीट, सोन्यारुप्यांचीं नाणीं, अरबी-इराणी घोडे, राजवाड्यांतील वाद्यें, राजांच्या यवनी दासी (नाटकशाळा), हस्तिदंत, मातीचीं भांडीं, कापूस, रेशीम, मिरची, इमारती लांकूड, माल्यांचे दांडे, पाचू इ. माल होता.

**बदामीचें चालुक्यघराणें**—ह्युएनत्संगाच्या वेळीं महाराष्ट्र कांची व कोंकणपूर या राज्यांचे राजे म्हणजे हल्लींच्या मराठ्यांचे पूर्वज होत. सोळंखी(चाळके), पल्लव (पालवे), कदंब (कदम) हे अनुक्रमें तत्कालीन राजवंश होत. वंशदृष्टीनें हे महारट्ठ मिश्र आर्य असून प्रथमतः ते गोदावरीच्या आसपास रहात. व महाराष्ट्री भाषा बोलत. शातवाहनांचें राज्य दुसऱ्या शतकाच्या अखे-रीस नामशेष झालें व मग महाराष्ट्रांत लहान लहान राज्यें अस्तित्वांत राहिलीं. बहुधां याच काळांत (उत्तर) महाराष्ट्रांत वाकाटक घराणें पुढें आलेलें होतें. त्या घरा-ण्यांतील विन्ध्यशक्ति व प्रवरसेन या राजांचीं नांवें अजिंठ्याच्या लेण्यांतील शिलालेखांत आहेत. हें घराणें बौद्धमतानुयायी असून त्यानें व तत्कालीन महाराष्ट्रांतील मोठमोठ्या बौद्धधर्मीय व्यापाऱ्यांनीं हीं अजिंठ्याचीं लेणीं कोरलीं असावीं. कांहींच्या मतें हें घराणें सना-तनधर्मी होतें, कारण त्यानें यज्ञसंस्था पुन्हां सुरू केली होती. पुढें या वाकाटकास राष्ट्रकुट चालुक्य या सना-तन धर्मीय राजघराण्यांनीं हुसकाऊन महाराष्ट्र जिंकला. चालुक्य हे सोमवंशी क्षत्रिय असून ते अयोध्येहून इकडे

आले आणि गोविंद राष्ट्रकूटाचा पराभव केल्यावर त्यांची सत्ता वाढली. या वंशांतील प्रख्यात पहिला पुलकेशी यानें तर अश्वमेध करून सनातनधर्माची प्राणप्रतिष्ठा केली. ह्युएनत्संगानें पुलकेशीला द्रविड न म्हणतां क्षत्रिय म्हटलें आहे. कदंब व चालुक्य हे एकगोत्रीच होते. या पुलकेशीचीच राजधानी वातापी ही होती. तो ५६७ त वारला. त्याचा मुलगा कीर्तिवर्मा यानें उत्तरकानडा व उत्तरकोंकण जिंकलें. त्याचा भाऊ मंगलीश यानें त्रिपूरदेश घेऊन पूर्वपश्चिमसमुद्रापर्यंत सर्व महाराष्ट्रावर राज्य स्थापिलें (६००). त्याचा पुतण्या दुसरा पुलकेशी हा या वंशांत सर्वांत श्रेष्ठ राजा होता (६०८). त्यानें कांचीकर पल्लवांनां जिंकून, नर्मदेपासून रामेश्वरापर्यंत साम्राज्य स्थापिलें व कनोजच्या हर्षवर्धनाचा पराभव केला. यानें वेंगी (पूर्वकिनारा) येथें आपल्या भावाला एक लहान राज्य दिलें तें पुढें पुष्कळ दिवस टिकलें होतें. तसेंच दुसऱ्या भावास लाटदेश दिला, एका मुलास गोवाप्रांत दिला आणि दुसऱ्या मुलास कर्नाटक दिलें. हीं राज्यें त्याच्यामागें थोडीफार टिकलीं. पुलकेशीची राजधानी नाशिक असावी. त्यानें आपला वकील इराणच्या खुश्रु राजाकडे पाठविला व खुश्रूनेंहि आपला वकील पुलकेशीकडे पाठविला होता (६२५). पुलकेशीच्या मृत्यूचें कारण समजत नाहीं. ह्युएनत्संग याच्या दरबारीं आला होता. यावेळीं महाराष्ट्रांत १०० बौद्धमठ व ५००० भिक्षु होते. ह्युएननें पुलकेशीचें वर्णन केलें आहे. त्याचा पुत्र विक्रमादित्य हाहि सम्राट होता (६८०). त्याचा मुलगा विनयादित्य (दुसरा); हे दोघेहि पराक्रमी होते. या वंशांतील शेवटचा राजा कीर्तिवर्मा (दुसरा) हा दुर्बळ असून त्याचें साम्राज्य त्याच्या दंतिदुर्ग राष्ट्रकूट नांवाच्या एका मांडलिकानें घेतलें (७५०). यानंतर वातापीस या घराण्यानें मांडलिक म्हणून राज्य केलें असावें; तत्पूर्वी २०० वर्षें त्यांचें साम्राज्य दक्षिणेंत होतें. यांच्या अमदानींत पुन्हां सनातनधर्म व यज्ञसंस्था चालू झाली व बौद्धधर्म हतप्रभ झाला. मात्र जैनधर्माला पुढील पुढील राजांनीं थोडथोडा आश्रय दिला. सनातनधर्मास पौराणिक उपासनेची जोडहि यावेळींच मिळाली. बौद्धांप्रमाणें सनातनधर्मीय लोकांनीं या राजवटींत लेणीं कोरलीं; बदामीचीं लेणीं या वेळचींच आहेत. इतर देवळेंहि या राजांनीं पुष्कळ बांधलीं. या राजवंशाच्या वेळीं तीन महाराष्ट्र होते व त्यांची ग्रामसंख्या ९९ हजार होती. या घराण्यानें शालीवाहन शकच चालविला. यांचें व पल्लवांचें नेहमीं भांडण होत असे.

**कांचीचें पल्लव घराणें**—या घराण्यानें ७ व्या व ८ व्या शतकांत चालुक्यांबरोबर दक्षिणच्या चक्रवर्तित्वाबद्दल अनेक लढाया केल्या. कांजीवरम् ही त्याची राजधानी असून त्यांनीं चोल, पाण्डय, केरल वगैरे द्राविड जातीय लोकांवर आपली सत्ता स्थापिली. पल्लवांची भाषा आर्यभाषा होती असें ह्युएनत्संग म्हणतो. हे पल्लव व परकीय शकवंशीय पल्लव हे भिन्न होत. हे पल्लव आर्य असून महाराष्ट्रांत प्रारंभीं वसाहत करणाऱ्या आर्यांपैकीं होत. हल्लींच्या पालवे मराठ्यांचें व या पल्लवांचें गोत्र एकच आहे. ह्युएनत्संगानें त्यांनां क्षत्रियच म्हटलें आहे. या घराण्याची सत्ता इ. स. २००–८०० पर्यंत होती. पहिल्यानें हे शातवाहनांचे मांडलिक होते पण शातवाहन दुर्बळ झाल्यावर हे स्वतंत्र बनून त्यांनीं कृष्णा–तुंगभद्रा दुआबांत (पूर्वकिनाऱ्याकडे) सत्ता स्थापिली. या घराण्याचा मूळपुरुष वीरकूर्च होता (१०७). त्याचा नातू कुमारविष्णु यानें कांची राजधानी केली (२००). वरिकूर्चाचा ११ वा वंशज विष्णुगोप याला समुद्रगुप्तानें जिंकलें होतें (३३८). पुढें ३२ वा राजा सिंहविष्णू यानें पांण्डय, चोल व सीलोन हे देश जिंकून दाक्षिणेस सर्वत्र आपलें राज्य वाढविलें. याचा नातु नरसिंहवर्मा हा दुसऱ्या पुलकेशी चालुक्याचा समकालीन असून त्यानें त्याचा पराभव केला असें म्हणतात. ह्युएनत्संग त्याच्या राज्यांत गेला होता (६४०). त्यानेंहि दक्षिणेंत आपलें साम्राज्य स्थापिलें होतें. या राजवंशानें सनातनधर्माचा उद्धार केला. कुमारविष्णूचा मुलगा शिवस्कंदवर्मा यानें अश्वमेध केला होता. इतर मराठ्यां प्रमाणें पल्लव हे शैव होते. त्यांनीं कांचीच्या आसपास व तेथेंहि अनेक भव्य व सुंदर शिव (आणि कांहीं विष्णु) मंदिरें बांधिलीं, त्यांत कांचीचें कैलासनाथाचें देऊळ फार अप्रतिम आहे, बौध्द व जैन पंथांनां त्यांचा थोडाफार आश्रय असे. दक्षिणेंतील शैवपंथाचें मुख्य पीठ कांचीसच आहे, आणि कांची ही सप्तपुऱ्यांपैकीं एक आहे. कांचीचे उत्तरपल्लव व बदामीचे पूर्वचालुक्य हीं घराणीं समकालीन होतीं. या पल्लवांतील ९ राजांनीं ५८२–७४२ पर्यंत राज्य केलें. शेवटचा नंदीपोतवर्मा (नरसिंहवर्म्याचा ९ वा वंशज) याचा दुसरा विक्रमादित्य चालुक्य यानें पराभव केल्यामुळें हें घराणें नामशेष झालें. चालुक्य व पल्लव यांच्या नेहमीं लढाया चालत असत. यांनीं स्वतःचा शक चालू केला होता. चालुक्य

नामशेष होऊन राष्ट्रकूट प्रबल झाल्यावर पल्लव हे त्यांचे मांडलिक बनले. नंदीपोतवर्म्याचा ९ वा वंशज अपराजित याला चोलराज आदित्यानें ९०० च्या सुमारास हुसकावून दिल्यानंतर पल्लवांचें नांव ऐकूं येईनासें झालें. या पुढें चोलांची सत्ता प्रस्थापित झाली. सांप्रतचा पदुकोट्टाईचा राजा स्वतःस पल्लववंशीय म्हणवितो.

**वेंगी व कलिंगचे प्राच्य चालुक्य**–बदामीच्या दुसऱ्या पुलकेशीचा भाऊ कुब्ज विष्णुवर्धन हा वेंगीघराण्याचा मूळ पुरुष; भावानेंच याला हें राज्य तोडून दिलें होतें. वेंगीदेश मूळचा पल्लवांचा; तो जिंकून पुलकेशीनें कुब्जास दिला (६०९). याचा वंश ११व्या शतकाच्या अखेरीपर्यंत (५०० वर्षें) येथें नांदून अखेर चोलघराण्यांत अंतर्धान पावला. कारण, त्या चोलघराण्याचा संस्थापक या चालुक्यघराण्यांतील शेवटच्या राजाचा दौहित्र होता. या वंशांत २६ राजे झाले. त्यांतील ७ वा राजा कोकिली याच्यावेळीं काश्मीरच्या ललितादित्यानें हा देश आपल्या साम्राज्यांत समाविष्ट केला होता. यांतील २० वा राजा भीम यानें एका चोल राजकन्येशीं लग्न लाविलें, त्यामुळें त्याच्या मुलाच्या (धन) कारकीर्दीनंतर चोल व चालुक्य यांत भांडाभांडी होऊन २७ वर्षें वेंगीस अराजकता माजली. पुढें धनाचा पुत्र शक्तिवर्मा हा राजा झाला. त्याचा पुतण्या राजराज यानेंहि चोलराजकन्येशीं लग्न केलें; तिच्यापासून झालेला राजेंद्र हा या वंशांतील २६ वा राजा (१०६०) होय. येथपासून हें घराणें चोल घराण्यांत अंतर्भूत झालें (१०७८). या राज्यांत फारशी भानगड न होतां तें ५०० वर्षें सुरळीत चालू होतें. सांप्रतचें राजमहेंद्री हें शहर या वंशांतील राजमहेंद्र या राजानें वसविलें. वेंगीराज्य पूर्व किनाऱ्यावरील गोदा-कृष्णा–दुआबांत होतें. या राजांना कलिंगचे गंग, दक्षिणेकडील चोल व पल्लव आणि पश्चिमचे राष्ट्रकूट यांच्याशीं सतत लढावें लागे. पैकीं १४ वा राजा भीम यानें १०८ लढाया मारल्या व १०८ देवळें बांधलीं अशी कथा आहे. या वंशाची मूळ भाषा मराठी पण मागाहून कानडी आणि तेलगु झाली. दहाव्या शतकांत चोलकुल आर्यक्षत्रियांत गणण्यांत येऊं लागलें असावें. यांची राज्यव्यवस्था महाराष्ट्रीय चालुक्यांप्रमाणेंच होती. हा वंशहि शैव व सनातनधर्मी होता. यांच्यांत एक गणितज्ञ राजा होऊन गेला, त्याला गुणक ही पदवी होती.

**ओढ्या( ओरिसा )चें केसरी घराणें**— या देशाचें मूळ नांव ओड्र. येथें प्रथम आर्यांनीं वसाहत केली तेव्हां कैवर्त हे अनार्य लोक रहात होते. हा अत्यंत सुपीक देश आहे. आर्यांनंतर बौद्धधर्मी लोकांनीं वसाहत केली. अशोकापासून रक्तबाहू या राजापर्यंत (ख्रि. पू. २५०–इ. स. ३२०) येथें बौद्धांचा अंमल होता. रक्तबाहूचा वंश ४७४ पर्यंत टिकला. या वंशानें अनेक कोरीव लेणीं कोरलीं आहेत. शैवमताच्या ययाति केसरी या क्षत्रिय घराण्यानें ४७४ त रक्तबाहूच्या वंशजापासून राज्य हिसकावून घेतलें. हर्षाच्या साम्राज्यांत हा देश सामील झाला होता. त्याच्या वेळीं तेथें बौद्धधर्म थोडाफार होता. त्याच्या मृत्यूनंतर प्रख्यात भुवनेश्वरचें देऊळ केसरीराजांनीं बांधलें; त्याच्या आसपास ७००० मूर्ती होत्या इतकें तें प्रचंड असून त्याचा कळस तीन कोसांवरून दिसे. जगन्नाथपुरी हें पूर्वी शैवमंदिरांनीं व्याप्त होतें, पुढें तेथें विष्णुमंदिरें झालीं. या केसरीघराण्यानें हजारों ब्राह्मण अयोध्येकडून आणवून त्यांची वसाहत केली व सनातनधर्माचा उद्धार केला. त्यांची राजधानी भुवनेश्वर ही होती. पुढें जयपूर आणि मग कटक येथें नवीन राजधान्या झाल्या. या प्रांतांत या काळांत अनेक मूर्ती, पुतळे आणि देवळें सर्वत्र पसरलेलीं आहेत; पैकीं पुष्कळ देवळांचा व मूर्तींचा १६ व्या शतकांत मुसुलमानांनीं विध्वंस केला. हे पुतळे ८।१० फूट उंचीचे असून अप्रतिम कारागिरीचे आहेत. यांचा दगड ५० कोसांवरून आणल्यामुळें त्यावेळीं इंजिनियरिंगकलाहि अस्तित्वांत असावीसें दिसतें; तिची विशेष साक्ष महानदीच्या दक्षिणमुखावरील या राजांनीं बांधलेल्या प्रचंड पुलावरून व बंधाऱ्यांवरून पटते. हें घराणें ११३२ पर्यंत राज्य करीत होतें. त्यानंतर एक सूर्योपासक घराणें अधिकारारूढ झालें. त्याच्या कारकीर्दीत सर्व हिंदुस्थानांतील अप्रतिम व प्रख्यात असें सूर्यमंदीर या देशांत बांधलें गेलें. नंतर कलिंगदेशीय चोल-गंग या वैष्णवधर्मीय राजघराण्यानें राज्य केलें. यावेळींच जगन्नाथाचें देऊळ बांधलें गेलें. यांच्या कारकीर्दीत १३६१ त फिरोजशहानें स्वारी केली. पुढें कुतुबशाही राजांनीं हळू हळू हा देश जिंकला. १५६८ त शेवटचा हिंदुराजा मुकुंददेव हा होता. त्या सुमारास अकबरानें हा देश आपल्या राज्यास जोडला. नंतर १७५१ त हा भोसल्यांच्या ताब्यांत येऊन १८०३ त इंग्रजांच्या हातीं गेला.

**गौड देशचे गुप्तराजे**–हें घराणें मूळ माळव्यांतील गुप्तांचें होतें. या घराण्याचा मूळ पुरुष माधवगुप्त हा हर्षवर्धनाचा मित्र होता. त्याचा नातु देवगुप्त याचा

वध काश्मीराधिपति ललितादित्यानें केला तो गौडवहो या प्राकृत काव्यांत वर्णिलेला आहे. त्याचा नातू जीवितगुप्त हा सूर्यभक्त होता(७४०). हें घराणें ८००पर्यंत मगध देशांत राज्य करीत होतें. हें सनातनधर्मी होतें. बंगाल (वंग) देशांत ६०० पासून ८०० पर्यंत अनेक छोटीं राज्यें होतीं. आसामांत फार प्राचीन काळापासून भगदत्ताचें ब्राह्मणकुल राज्य करीत होतें. त्यांतील भास्करवर्मा हा राजा ह्युएनत्संगाचे वेळीं हयात होता. तसेंच ७६९ त त्याच्या कुलांतील हर्षदेवानें गौड, ओरिसा, कलिंग, कोसल हीं राज्यें जिंकलीं होती.

**कनोजचें वर्म ( मौखरी ) घराणें**—हर्षवर्धनानंतर थोडयाच काळांत कनोज येथें प्राचीन मौखरी घराण्यांतील एक पुरुष राजा झाला; ७ व्या शतकाच्या अखेरीस कनोजेस यशोवर्मा हा प्रख्यात राजा होता. हा विद्वान असून याच्या पदरीं भवभूति, वाक्पतिराज इ. कवी होते. वाक्पतीनेंच गौडवहो हें काव्य केलें आहे. यशोवर्म्यानें ६८० च्या सुमारास गौडदेश जिंकला होता. यानें साम्राज्यस्थापनेचा केलेला प्रयत्न उत्तरेकडे ललितादित्य, कर्कोटक (काश्मीरचा) व दक्षिणेकडे विनयादित्य चालुक्य यांनीं हाणून पाडला. यशोवर्म्याच्या कारकीर्दींत पुन्हां वैदिकधर्म पुढें सरसावला. व बौद्धधर्माची पिच्छेहाट झाली. पूर्वमीमांसे(वैदिक कर्मकांडा )चा अभ्यास हर्षाच्याच काळीं सुरू झाला होता. कुमारिलभट्ट हा त्यावेळीं हयात होता व त्याचा शिष्य भवभूति हा यशोवर्म्याचा आश्रित होता. पुढें ( ८०० ) त्याच्या चक्रायुध नांवाच्या वंशजाचा पराभव बंगालच्या पालराजानें केला यावेळींहि प्रयागच्या पश्चिमेकडील बरेंचसें उत्तरहिंदुस्थान या चक्रायुधाच्या अंमलाखालीं होतें. पुढें ८१६ त नागभट्ट प्रतिहारानें हें वर्म घराणें नामशेष केलें.

**कोसलचें हैहयघराणें**—यांचा प्राचीन राजा सहस्रार्जन याचा परशुरामानें वध केल्याचें प्रसिद्ध आहे, यांची राजधानी नर्मदाकांठचें महेश्वर होती व त्यांचें राज्य मध्यप्रांतांत (छत्तीसगडभाग) बरेंच पसरलें होतें, सांप्रतचें मध्यप्रांतांतील रत्नपूर हें संस्थान हैहयवंशीय एका राजाचें आहे, ह्युएनत्संगाच्या वेळीं येथील राजा क्षत्रिय पण धर्मानें बौद्ध होता. कलचुरी ही शाखा या हैहयांचीच होती. तिनें चेदी देशावर राज्य केलें होतें. व स्वतःचा शक सुरू केला होता(२४८पासून). त्यांची सत्ता कांहीं काळ कोंकण व गुजराथेवर होती. हैह-यांचें कोसलांतील राज्य डोंगराळ असल्यामुळें विशेष भानगडी न होतां ७ व्या शतकापासून १८ व्या पर्यंत ( मराठयांच्या चढाईपर्यंत ) अस्तित्वांत होतें.

याशिवाय भिनमाल येथें चाप घराणें (५५० त ७५०), पश्चिम माळव्याचें वर्धन घराणें (यांतील यशोधर्म्यानें मिहिरकुल हूणराजास हांकलून दिलें. ५००-६४१), जेजाकभुक्ति व महेश्वरपूर येथील ब्राह्मणघराणीं इ. राज्यें हर्षानंतर मध्यहिंदुस्थानांत नांदत होतीं.

नेपाळांत हर्षाच्या काळापर्यंत लिच्छिवि राजघराणें नांदत होतें. पुढें अंशुवर्मा याचा वंश सुरू झाला. हाहि लिच्छिवीपैकींच एका शाखेचा होता. हें घराणें ८८० च्या सुमारास लयास जाऊन दुसरें क्षत्रिय घराणें गादीवर आलें. हल्लींचें गुरखा घराणें १७६८ त राज्यावर आलें. मधलीं घराणीं विशेष प्रसिद्ध नाहींत. नेपाळ ते काश्मीरपर्यंत चंपा (चंबा), उदुंबर (नुरपूर) त्रिगर्त (कांग्रा), निर्मंड (मंडी) इ. संस्थानें त्या काळीं असून त्यांचे राजे क्षत्रिय होते. या राज्यांत कांहीं काल बौद्धधर्म प्रचलित होता, पण पुढें पुन्हां सनातनधर्म वाढला.

**पंजाबांतील राज्यें**—या मध्ययुगांत पंजाबांत बलाढ्य व स्वतंत्र अशीं राज्यें फारशीं नव्हतीं व जीं होतीं त्यांची माहिती त्यांच्या आसपासच्या मोठमोठया राज्यांत आली आहे. ह्युएनत्संगच्या वेळीं तक्षशिला, सिंहपूर, राजपूर, उरशा इ. राज्यें काश्मीरच्या राज्यांत मोडत व कुलूत, शतद्रू इ. राज्यें कनोजच्या अंमलाखालीं होतीं. जालंधरचें राज्य म्हणजे प्राचीन त्रिगर्तांचें (हल्लीं कांगडा दरीचा प्रांत) व टेक उर्फ टांक (मुलतान) हीं राज्यें मात्र स्वतंत्र होतीं. टांक हें तक्षकवंशीय घराणें असून मुसुलमानी अंमलांत बहुतेक बाटलें गेलें. व महंमद कासीमनें तें राज्य बुडविलें. त्यावेळीं मुलतानचें सूर्यमंदिर अत्यंत प्रख्यात असून तेथें महारोग नाहींसा होत असे; तें ९७६ त मुसुलमानांनीं उध्वस्त केलें परंतु हिंदूनीं पुन्हां बांधलें. शेवटीं औरंगजेबानें तें शेवटचें पाडून टाकलें. कनोजच्या परिहारांचा अंमल सतलजच्या पलीकडे नसल्यानें तेथें ६ व्या व ७ व्या शतकांत स्वतंत्र राज्यें असत. पैकीं एक राज्य मोठें असून त्याची राजधानी भटिंडा होती. महंमुद गिझनीकराच्या वेळीं येथला राजा जयपाळ होता. ९ व्या शतकांत दिल्ली अगदीं लहान असून ११ व्या शतकांत याचा राजा अनंगपाल तोमर होता. या राज्याचा उत्कर्ष १२ व्या शतकांत

झाला. तोमर व सांबरचे चव्हाण यांचीं या काळांत युद्धें होत असत, तीं पृथ्वीराजाच्या वेळीं बंद झालीं.

**चितोडचें गुहिलोट घराणें**—मध्यकालीं आणि सांप्रतहि या घराण्यास हिंदुस्थानांतील क्षत्रिय घराण्यांत पहिल्या प्रतीचा मान आहे. हें घराणें रामाचें वंशज म्हणवितें. यानें ८०० वर्षें मुसुलमानांशीं टक्कर देऊन आपलें स्वातंत्र्य राखलें व अद्यापिहि तें राज्य इंग्रजांच्या अंमलाखालीं कायम आहे. त्यांतील बाप्पा, खुमान, समरसी; भीम, हमीर, संग, प्रताप, इत्यादि वीरपुरुषांनीं हिंदुस्थानच्या इतिहासांत मोठी कामगिरी बजाविली आहे. या घराण्याचा संस्थापक बाप्पारावळ हा अत्यंत पराक्रमी व विख्यात पुरुष होता. वल्लभी राजघराण्यांपैकीं ईडरच्या शाखेंतील एका उपशाखेंत तो जन्मला. त्यानेंच प्रथम सिंधांतून राजपुतान्यावर स्वारी करणाऱ्या अरबांनां पिटाळून लावलें. चितोडास मौर्य घराणें नांदत होतें त्याचा बाप्पा हा सेनापति होता पण तें दुर्बळ झाल्यानें बाप्पाच पुढें तेथील राजा बनला (७३०). त्यानें पुष्कळ वर्षें राज्य करून मग वानप्रस्थाश्रम स्वीकारला (७६३). त्याच्यानंतरच्या गुहिल या राजपुरुषाच्या नांवावरून या घराण्यास गुहिलोट म्हणूं लागले. त्याच्यानंतर ९ वा पुरुष खोण हा बाप्पाप्रमाणेंच शूर असून त्यानेंहि अरबांनां हांकलून दिलें होतें(८२५). बाप्पानंतरचा १८ वा पुरुष समरसी हा ११४० त हयात होता व तो ११९३ मध्यें पृथ्वीराजाबरोबर मुसुलमानांनां अडथळा करीत असतां स्थानेश्वराच्या लढाईत पडला. प्रतापसिंहाचें नांव तर सर्वांच्याच परिचयाचें आहे.

**सांबरचे चाहमान उर्फ चव्हाण**—हें घराणें गुहिलोटांबरोबरच उदयास आलें व शौर्याच्या बाबतींत तें त्याच्याहिपेक्षां श्रेष्ठ होतें. सांप्रतचीं बुंदी, कोटा, शिरोही हीं राज्यें या घराण्यांतील आहेत, पृथ्वीराज चव्हाण हा प्रख्यात पुरुष याच घराण्यांतील होता. पृथ्वीराजाच्या पुढें या घराण्यांत बाणेदारपणा टिकला नाहीं. त्यानें मुसुलमानी सत्ता अनेकदां कबूल केली व कांहीं वेळां तर मुसुलमानी धर्मंहि स्वीकारला. या वंशांतील सामन्तसिंहानें बाप्पारावळाच्या वेळीं सांबर येथें राज्य स्थापिलें. त्याचे वंशज गूवक (८७०) व वाक्पति (९२८) हे राजे फार शूर होते व सिंहराज (९४३) आणि विग्रहराज हे फार दानशूर होते.

**कनोजचे प्रतीहार**—नागभट्ट प्रतीहारानें ७२५ च्या सुमारास आपलें राज्य स्थापून मुसुलमानांनां हिंदुस्थानांतून हांकलून देण्याचें काम गुहिलोट व चाहमान यांच्या बरोबरीनें केलें व सम्राटपद स्थापन केलें, तें या घराण्याकडे ९ व १० या दोन शतकांत चालू होतें. हें घराणें सूर्यवंशी होतें. या कुलांतील वत्सराज हा फार शूर पुरुष असून त्यानें पुष्कळ राज्यविस्तार केला. त्याचा पुत्र दुसरा नागदेव उर्फ नागभट्ट यानें दिग्विजय करून व कनोजच्या वर्म घराण्यास हतप्रभ करून तेथें आपलें साम्राज्य स्थापिलें (८१६). हें साम्राज्य हिमालयापासून काठेवाडापर्यंत व प्रयागपासून पंजाबपर्यंत पसरलें होतें. नागभट्टाचा नातु मिहिरभोज हाहि फार शूर होता. त्यानें ५० वर्षें राज्य करून नर्मदोत्तर सर्व हिंदुस्थान काबीज केलें होतें (८९०). त्याच्या राज्याचें वर्णन अल्-मस उदी या अरबानें लिहून ठेविलें आहे. हें राज्य फार श्रीमंत असून चोरांचें भय तेथें मुळींच नाहीं असें तो म्हणतो. भोजाचा मुलगा महेंद्रपाल याच्याच पदरीं कर्पूरमंजरीकार राजशेखर कवि होता. महेंद्रानें बापाच्या वेळचें राज्य थोडेसें वाढविलें. पुढें ९१७ च्या सुमारास चालुक्य व राष्ट्रकूट यांनीं कनोजची सत्ता मोडकळीस आणली. सबक्तगीनच्या वेळीं कनोजच्या विजयपाळानें पंजाबच्या जयपाळास मदत केली होती (९९०). त्याचा मुलगा राजपाल याचें राज्य महंमद गिझनीकरानें नष्ट केलें (१०१८-१९).

**अनहिलवाड पाटणचे चावडा**—भिनमालच्या चापोत्कट घराण्याची चावडा ही एक शाखा होय तिचा मूळपुरुष वनराज. यानेंच अनहिलवाड वसवून तेथें आपली राजधानी केली (७४६). यावेळीं कनोजच्या साम्राज्यास उतरती कळा लागली होती. वनराज ८०५ पर्यंत हयात होता. याच्या शेवटच्या वंशजाला पदच्युत करून १० व्या शतकांत त्याच्या भाचानें (मूलराज सोळंखी) गादी बळकावली.

**धारचे परमार**—या घराण्याचें मूळ ठिकाण अबू होय. या घराण्याचा मूळपुरुष कृष्णराज हा ९१० त होऊन गेला. अबूहून पुढें धार येथें राजधानी नेण्याचें कारण अनिहलवाडकरांनां तोंड देण्यासाठीं या वंशांतील (सीयक) हर्षदेवानें हूणांनां (अरब) हांकलून दिलें. हाच नवसाहसांकचरितांत आलेला हर्ष होय. याचा पुत्र प्रसिध्द मुंजराज होय. तो शूर, विद्वान व कवि असून विद्वानांचा पोशिंदा होता. त्यानें राष्ट्रकूट, कर्नाटक, चोल, केरल इत्यादि राजांचा पराभव केला. तैलप चालुक्यानें त्याच्यावर केलेल्या एका लढाईत हा ठार झाला (९७७).

त्याचा पुतण्या प्रसिध्द भोजराज होय. हा सर्व परमारांत पराक्रमी व विद्वान होता (१०१०-६०). संस्कृत विद्येचा मान त्यानें फार राखला. आदर्शभूत हिंदु राजा म्हणून तो प्रसिद्ध आहे. गुजराथ व चेदी येथील राजांनीं याचा पराभव केल्यावर हें घराणें हतप्रभ झालें.

**बुंदेलखंडचे चंदेल्ल**—या घराण्याचा मूळपुरुष नन्नुक होता (८३१). त्याचा वंशज राहील हा शूर व कलाकौशल्याचा शोकी असून त्याची राजधानी महोबा होती. त्याचा नातु यशोवर्मा हा या घराण्यांत श्रेष्ठ होऊन गेला. त्यानें कलचूरींचा पराभव करून कालिंजर हा बळकट किल्ला घेतला. हा किल्ला महाभारतकालापासून बळकटीबद्दल फार प्रख्यात असे. नन्नुक हा पूर्णपणें स्वतंत्र राजा होता. त्याचा मुलगा धंग यानें आपलें राज्य पुष्कळ वाढविलें. सबक्तगीनाबरोबर जयपाळानें लढाई केली तींत धंगानें जयपाळास मदत केली होती व त्याचा मुलगा गंड यानें महंमूद गिझनीकराशीं टक्कर दिली होती. या घराण्याचीं स्वतंत्र नाणीं सांपडतात. या घराण्यानें मध्यहिंदुस्थानांत ३०० वर्षे मोठ्या इभ्रतीनें राज्य केलें. कनोजच्या पडत्या काळींच या घराण्यानें स्वातंत्र्य धारण केलें होतें. या वंशांतील कीर्तिवर्मा यानें चेदीकर्णदेवाचा पराभव करून आपलें राज्य पुष्कळच वाढविलें. हा फार विद्वान व विद्वानांचा पोशिंदा होता. प्रबोधचंद्रोदय नाटक यानेंच रचिलें आहे (१०६९). याच्या नांवचा कीरतसागर तलाव महोबाजवळ आहे. या वंशांतील परमार्दि याचा पृथ्वीराज चव्हाणानें (११८२) व कुत्बुद्दीन ऐबकानें (१२०३) पराभव केल्यावर हें घराणें मांडलिक बनलें. तरी सुद्धां बुंदेलखंडाच्या जंगलांत तें थोडें फार स्वतंत्र म्हणून नांदत होतें. प्रख्यात राणी दुर्गावती-जिनें अकबराचा १५६४ त पराभव केला ती-याच घराण्यांतील असून सांप्रत गिधौरचा राजा(विहारप्रांत)हि या वंशांतील आहे. [ज्ञा. को. वि. १२ (ग) पृ. ११८].

**त्रिपूरचे कलचुरी**—हैहय घराण्यांतील कलचूरी ही एक शाखा असून तिनें त्रिपूर येथें स्वतंत्र राज्य स्थापिलें होतें. त्यांचा स्वतःचा शक (चेदी) आहे. तो इ. स. १४८ पासून सुरू होतो. मध्यहिंदुस्थानांत ठिकठिकाणीं यांच्या शाखा पसरल्या व ९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत यांचें स्वतंत्र राज्य बनलें व कोक्कल हा त्यांतला पहिला राजा झाला. या वंशांतील एक राजकन्या (बोधा) ही प्रसिद्ध तैलप चालुक्याची आई होय. या वंशांतील प्रसिद्ध राजा गांगेयदेव होय.

**बंगालचे पाल व सेन**—पाल या क्षत्रिय घराण्यानें अखिल बंगालचें एक राष्ट्र बनविलें. आठव्या शतकाच्या उत्तरार्धांत कनोजची सत्ता डळमळित झाल्यावर बंगाल्यांतील निरनिराळ्या सरदारांनीं एकमतानें या घराण्यांतील मूळपुरुष गोपालराज यास आपलें आधिपत्य दिलें. त्यानें मोंगीर येथें आपली राजधानी करून बंगाल, मगध, व गौड हे प्रांत अंमलाखालीं आणले (८००). त्याचा मुलगा धर्मपाल यानें कनोजच्या चक्रायुधास मदत केली होती. या पालघराण्याची सोयरीक राष्ट्रकूटघराण्याशीं झालेली आहे. या घराण्यांतील महीपाल हा गझनीकर महंमुदाच्यावेळीं हयात होता. त्याच्यावर राजेंद्र चोलानें १०२३ त स्वारी केली होती आणि तेव्हांपासूनच या घराण्यास उतरती कळा लागून सेन घराणें पुढें आलें. सांप्रतचे बंगाल, बिहार, आसाम हे प्रांत सेनांच्या राज्यांत मोडत असत. सेनांपैकीं बल्लाळसेन यानें सनातनधर्माचा उद्धार करून ब्राह्मण, कायस्थ व वैद्य या जातींनां कुलीन वर्गांत घातलें. यानें ११९८-७० पर्यंत राज्य केलें. सेन हें दाक्षिणात्य ब्राह्मणघराणें असावें. त्यांचा इतिहास अस्पष्ट आहे.

**दक्षिणेंतील राष्ट्रकूट**—हें यादववंशीय घराणें होय. यांतील पहिला प्रसिद्ध राजा दान्तिराज होय. यानें चालुक्यांनां जिंकून महराष्ट्र आपल्या अंमलाखालीं आणलें. नर्मदा-तुंगा-दुआब हें त्याचें राज्य होतें. त्याचा चुलता कृष्ण यानें त्याचा खून केला असें म्हणतात. या कृष्णानेंच वेरूळचें अति प्रसिद्ध कैलास लेणें कोरून राज्यविस्तार केला. याचा पुत्र ध्रुव यानेंहि उत्तरेकडील राजे जिंकून राज्य वाढविलें. याचा मुलगा तिसरा गोविंद हा या वंशांतील श्रेष्ठ राजा होय. याच्याइतका शूर राजा या वंशांत झाला नाहीं. यानें उत्तरेस कनोज व दक्षिणेस कांचीपर्यंत राज्य केलें (८१०). याचा मुलगा अमोघवर्ष यानें अंग, मगध, माळवा इ. देशांवर स्वाऱ्या केल्या होत्या. त्यानेंच मालखेड ही नवीन राजधानी वसविली व ६० वर्षे राज्य केलें. हा फार विद्वान असून दिगंबरजैनमताकडे त्याचा विशेष कल होता. हा माळव्यांतील भोजराजाचा समकालीनच होता (८८०). सुलेमान या अरब प्रवाशानें याला जगांतील चौथा मोठा बादशहा म्हटलें होतें. त्यानें बलहारा (वल्लभराय) असें यास टोपण नांव दिलें आहे. हा अतिशय श्रीमान असून त्याचा

व्यापार मोठा व सैन्यहि अगणित होतें. याचा पुत्र अकालवर्ष व त्याचा नातु इंद्र (९१६), तसेंच तिसरा कृष्ण (९६०), व खोट्टिग (९७१) हेहि राजे प्रख्यात होऊन गेले. खोट्टिगाचा पुतण्या कोक्कल हा दुर्बळ असल्यानें चालुक्य तैलपानें त्याचें साम्राज्य हिसकावून घेतलें (९७४). सारांश, दक्षिणचें साम्राज्य या घराण्याकडे ७५०–९७४ पर्यंत होतें. हे राष्ट्रकूट व राजपुतान्यांतील राष्ट्रकूट (राठोड) हीं घराणीं भिन्न आहेत. त्यांचीं गोत्रेंच भिन्न आहेत. यांचें साम्राज्य माळवा, गुजराथपासून तंजावरपर्यंत पसरलें असून ते उत्तरेकडे स्वाऱ्या करीत असत. यांनीं तर कनोजवरहि स्वाऱ्या करून तें उध्वस्त केलें होतें. अलीकडील मराठ्यांप्रमाणें यांचें सैन्य घोडदळाचेंच विशेष असे व त्याच्या जोरावरच यांनीं हें साम्राज्य स्थापिलें. यांची राज्यव्यवस्था पद्धतशीर होती.

**कदंब व गंग**–आंध्रांचें साम्राज्य तिसऱ्या शतकांत मोडल्यावर म्हैसूरकडे कदंब नांवाच्या घराण्यानें बनवासी (जयंति) येथें राज्य स्थापिलें, तें ६ व्या शतकापर्यंत टिकलें; त्यापुढेंहि चौदाव्या शतकापर्यंत कदंबराजे मांडलिक म्हणून नांदत होते. यांच्याप्रमाणें म्हैसूरच्या आसपासच्या प्रदेशावर गंग राजे दुसऱ्या पासून ११ व्या शतकापर्यंत राज्य करीत होते आणि शेजारच्या बलाढ्य राजांनां मदत करून आपला प्रांत वाढवीत होते. दक्षिणेंत जैनधर्माचा प्रसार ख्रि. पू. ४ थ्या शतकापासून चालला होता. गंगराजे जैनधर्माभिमानी होते. त्यांचा एक प्रधान चामुंडराय यानें ९८३ मध्यें ५६॥ फूट उंचीचा गोमट जैनाचा भव्य व उत्कृष्ट दगडी पुतळा तयार करून श्रवणबेलगोळ येथें स्थापिला. तसें काम साऱ्या हिंदुस्थानांत दुसरें झालें नाहीं. ओरीसांतहि या गंगवंशानें ६००–१६०० पर्यंत राज्य केलें.

**कल्याणीचें चालुक्य घराणें**–तैलप चालुक्यानें कोक्कल राष्ट्रकूटापासून राज्य हिसकावून कल्याणी येथें आपली गादी स्थापिली (९७४). या वंशांतील राजांनीं शेजारील राजांबरोबर अनेक लढाया मारल्या. पुढें ११ व्या शतकाच्या प्रारंभीं राजराज थोरला (चोलराज) यानें हें राज्य बुडविलें व लोकांचा फार छळ केला, परंतु सोमेश्वर चालुक्यानें राजाधिराज चोलाचा पराभव करून आपलें राज्य परत मिळविलें (१०५३). या घराण्यांत विक्रमांक अथवा विक्रमादित्य हा फार प्रख्यात राजा झाला. यावेळीं चोलांनीं पल्लवांपासून कांची घेऊन आपलें राज्य वाढविलें होतें, ह्यामुळें विक्रमांकाचें व त्यांचें अनेकदां युध्द होई. त्यानें आपला शकहि सुरू केला होता. बिल्हणानें त्याच्यावर विक्रमांकदेवचरित म्हणून एक काव्य केलें आहे. याच्याच वेळीं मिताक्षरा या प्रसिध्द ग्रंथाचा कर्ता विज्ञानेश्वर हा कल्याणीस रहात होता (११२९). मध्यंतरीं बिज्जल कलचूर्य व त्याचा मुलगा यांनीं बंड करून कांहीं दिवस (११६७) चालुक्यगादी बळकावली होती. शेवटीं चालुक्य घराणें १२०० च्या सुमारास हतप्रभ होऊन होयसळ व देवगिरी येथील यादवघराणीं पुढें आलीं.

**होयसळ घराणें**–(उर्फ पोयसळ) हें मूळचें सह्याद्रीच्या खोऱ्यांत राहणारें होतें. त्यांतील बिट्टीग उर्फ बिट्टीदेव हा प्रथम पुढें आला. तो पहिल्यानें चालुक्यांचा मांडलिक होता. तो ११४१ त, ३० वर्षें राज्य करून वारला. त्यानें सर्व आयुष्य लढायांत घालविलें. त्यानें व त्याच्या वंशजांनीं अनेक लोकोपयोगीं कामें केलीं. हा प्रथम जैनपंथी होता व म्हणून त्यानें चोलराजांनीं पूर्वीं पाडलेलीं जैनदेवळें पुन्हां बांधलीं, पण पुढें रामानुजाचार्याच्या उपदेशानें बिट्टीग हा वैष्णव बनून त्यानें विष्णुवर्धन हें बिरुद आपल्यास लाविलें व विष्णूचीं पुष्कळ सुंदर देवळें बांधिलीं. त्याचा नातु वीरबल्लाळ यानें आपलें राज्य उत्तरेस वाढवून देवगिरीकर यादवांच्या हद्दीस आपली हद्द भिडविली (११९२), यामुळें हें राज्य मोठ्या वैभवास चढलें. पुढें १३१० त मलीक काफूर यानें हें राज्य जिंकून हळेबिड येथील देवळें पाडलीं; १३२६ पर्यंत हें घराणें टिकून होतें पण पुढें तें नामशेष झालें.

**देवगिरीकर यादव**–हे यादव पूर्वीं चालुक्यांचे मांडलिक होते, पण त्यांच्या पडत्या काळांत यांनीं आपलें राज्य स्थापिलें. यांचा व होयसळांचा १२ व्या शतकांत झगडा चालू होता. या घराण्यांत सर्वांत श्रेष्ठ असा सिंधण नांवाचा राजा (१३ वें शतक) झाला व त्यानें गुजराथपर्यंत आपलें राज्य वाढविलें. पुढें १२९४ त येथील राजावर अल्लाउद्दीन खिलजीनें चाल केली. रामचंद्रदेव हा दक्षिणचा शेवटचा स्वतंत्र राजा होता. त्याचा पराभव १३०९ त मलीककाफरनें केला. त्याच्यापुढें हें राज्य १३१८ पर्यंत टिकलें, रामचंद्राच्या वेळींच ज्ञानदेव हा सत्पुरुष झाला.

**चोल राजे**–यांची हकीकत इ. स. ९०७ पासून स्पष्टपणें समजते. यावर्षीं पल्लवांनां जिंकणाऱ्या आदित्याचा

पुत्र परांतक ( पहिला ) हा गादीवर बसला. त्यानें ४२ वर्षें राज्य करून पांडयराजास हांकलून मदुरा घेतलें आणि सीलोनवरहि स्वारी केली. या घराण्यांत राजराज (९८९) व त्याचा मुलगा राजेंद्र (पहिला १०३९) हे फार प्रख्यात झाले. त्यांनीं कलिंग, पांडय व चेर यांनां जिंकलें, आणि वेंगीच्या चालुक्यांनां मांडलिक बनवून बहुतेक मद्रासइलाखा पादाक्रांत केला. राजराज याचें आरमारहि प्रबळ होतें, त्यामुळें लखदीव-मालदीव व इतर बरींच बेटें त्यानें जिंकलीं. राजेंद्रानें तर ब्रह्मदेशांतील पेगू प्रांत व अंदमान-निकोबार हीं बेटें जिंकून बंगालच्या महिपालाचा पराभव केला (१०२३), आणि स्वतःस गंगैकोंड हें विरुद लावून त्या नांवाची एक राजधानी स्थापून तेथें अनेक राजवाडे, देवळें, तलाव बांधले. राजेंद्राचा मुलगा राजाधिराज हा चालुक्यांबरोबरच्या लढाईंत मेला (१०९२). याच्या पुढील वंशांत राजेंद्रकुलोत्तुंग (पहिला) हा फार प्रख्यात झाला. याचा संबंध चालुक्यांशीं असल्यानें यापुढें याच्या वंशजांस चालुक्यचोल असें म्हणत. कुलोत्तुंगानें ४९ वर्षें उत्तम तऱ्हेनें राज्य करून, सर्वत्र विजय मिळवून राज्य वाढविलें व १०८६ त आपल्या राज्याच्या जमीनीची तरमबंदी केली. तेराव्या शतकांत पाण्ड्यांनीं चोलांचें राज्य नामशेष केलें, व त्याच सुमारास विजयनगरकरांनींहि चोलांनां हतप्रभ केलें.

**पाण्ड्य राजवंश**—ह्युएनत्संगानें त्याच्या वेळच्या पाण्ड्येदशाचें वर्णन दिलें नाहीं. त्याची राजधानी मदुरा असून तत्कालीन राजा हा पल्लवांचा मांडलिक होता. दिगंबर जैनधर्म व सनातनधर्म हे यावेळीं तिकडे प्रचलित होते, आणि बौद्धधर्म नामशेष झाला होता. या सुमारास कून उर्फ सुंदरपाण्डय यानें जैन लोकांचा छळ केला व दंतकथेप्रमाणें ८ हजार जैनांनां सुळीं दिलें. कून हा मूळचा जैन पण पुढें शैव बनला होता. पाण्डय राजे हे पल्लव, चोल, चेर सीलोनाधिपति इत्यादि राज्यांशीं मधून मधून भांडत. शेवटीं १३ व्या शतकांत त्यांनीं बरेंच महत्त्व मिळविलें; पण १३१० त मुसुलमानी हल्ल्यामुळें पुन्हां तें निर्बल झालें. सांप्रत या वंशांतील कांहीं किरकोळ जहागीरदार आढळतात.

**चेर राजवंश**—या राज्याची मध्ययुगीन माहिती फार संदिग्ध आहे. हें राज्य सांप्रतच्या त्रावणकोर संस्थानाएवढें त्यावेळीं होतें. राजराज चोलानें ९९० त हें राज्य जिंकलें. या राज्यांतहि ग्रामपंचायती होत्या. कोल्लम हें शहर स्थापल्यानंतर बहुधा (८२४–२५) कोल्लमशक (मलबारांतील) सुरू झाला असावा.

**मध्ययुगीन धार्मिक, राजकीय व इतर परिस्थिति**—तिबेटांत बौद्धधर्माचा (महायानी पंथाचा) प्रसार इ. स. ६५० च्या सुमारास, तेथील राजानें इकडील विद्वान बौद्धपंडित नेऊन त्यांच्यामार्फत करविला. तेथील सांप्रतची लिपीहि मूळची हिंदुस्थानांतील असून वरील काळींच तिकडे गेलेली आहे. नेपाळांत असलेला बौद्धधर्म हल्लीं बराच हीनावस्थेस पोहोंचलेला आहे व त्यावर सनातनधर्माची छाप पुष्कळ बसली आहे. नेपाळांत बौद्धवाङ्मयाचे हस्तलिखित ग्रंथ फार असून त्यांचा शोध हॉड्सननें १८२५ च्या सुमारास लावला. येथील कलाकौशल्यावर तिबेटी छाया दिसते. मूर्तीशिल्प व चित्रें तर तिबेटी नमुन्याचींच आढळतात; अलीकडे मात्र चिनी धर्तीवर त्यांची निपज होत आहे. काश्मीरमध्यें संस्कृतचा अभ्यास पूर्वीपासून विशेष प्रमाणावर चालतो. खोतानमध्यें बौद्धधर्म व तत्कालीन कलाकौशल्य जें गेलें तें काश्मीरमधून गेलें. सारांश हिंदूसंस्कृतीची छाप चिनी तुर्कस्तान व त्याच्या आसपासचे इतर देश यांच्यावर पडण्यास काश्मीरच कारण झालें. येथील स्थानिकशिल्प ८ व्या व ९ व्या शतकांत उदयास आलें. त्याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे ललितादित्यानें बांधलेलें मार्तंडाचें देऊळ होय. आसाम हा देश नेपाळ व काश्मीर यांच्याप्रमाणें पर्वतांनीं वेष्टिलेला असल्यानें त्याच्यावरहि परकीयांच्या स्वाऱ्या फार होत नसत व झाल्या तरी त्यांची सत्ता फारकाळ टिकत नसे. अहोम घराण्यानें १३ व्या शतकांत तेथें मूळ सत्ता स्थापिली ती १८१६ त ब्रम्ही लोकांनीं हिसकावून घेतली व त्यांच्यापासून १८२५ त इंग्रजांनीं घेतली. आसामी लोकांचा एक देशीधर्म होता; सध्यां ते बव्हंशीं हिंदुधर्मी बनले आहेत. त्यांची मूळची भाषा जाऊन हल्लीं ते संस्कृतोत्पन्न आसामी भाषा बोलत असतात. हे लोक लांकडावर कोरीव काम फार उत्कृष्ट कोरतात. मोंगोलियन व हिंदी या दोन्ही जातींच्या सीमेवर हा देश असल्यानें त्या दोन्ही संस्कृतींचें सर्व तऱ्हेचें स्वरूप येथें पहावयास सांपडतें. त्यामुळेंच तांत्रिकधर्म या देशांत फार पसरलेला आहे. पैकीं शक्तिउपासना हा त्याचा एक भाग आहे. गोहत्तीजवळील कामाख्या देवीचें देऊळ हें या पंथाचें मुख्य ठिकाण आहे. या मध्ययुगांत सांप्रतच्या हिंदी, बंगाली, गुजराथी मराठी इत्यादि देशी भाषांमध्यें वाङ्मय निर्माण

होऊं लागलें. भोज परिहाराच्या सैन्यांत प्रथमच उंटदळाचा उल्लेख आढळतो.त्याच्या नाण्यावर आदिवराहाचें चित्र व नांव असे.त्याचा मुलगा महेंद्र याच्या पदरीं दाक्षिणात्य प्रसिद्ध कवि व नाटककार राजशेखर होता. बंगाल्यांत (गौर) ७ व्या शतकांत आदिसूर नांवाच्या एका सनातनधर्मीय राजानें कनोजहून पांच ब्राह्मण नेऊन बंगाल्यांत सनातनधर्माचा पुनरुद्धार केला व त्या ब्राह्मणांपासूनच सांप्रतच्या राधीय व वरेंद्र ब्राह्मण जाती निघाल्या असें म्हणतात. धर्मपाल राजानें ८१० च्या सुमारास विक्रमशिला येथें एक बौद्ध विद्यापीठ स्थापन केलें. हा राजा महायानपंथी मताचा होता. या कालांतील इमारत उरलेली दिसत नाहीं मात्र दिनाजपूर जिल्ह्यांत बांधीव तलाव पुष्कळ पहावयास सांपडतात. बंगाल्यांतील प्रस्तरशिल्प व धातुशिल्प या काळीं उत्तम होत असे. धीमान व विटपाल हे याच वेळीं मोठे प्रख्यात शिल्पज्ञ होऊन गेले. चंदेल्ल राजवटींतहि बुंदेलखंडांत हीं दोन्ही शिल्पकामें प्रख्यातीस आलीं होतीं. चंदेल्लांनीं अनेक तलाव व देवळें बांधलीं आहेत व मूर्ती घडविल्या आहेत. तलावांच्या भिंती व देवळांचें काम पहाण्यासारखें आहे. खजुराहो येथील देवळें तर हिंदीशिल्पाचा एक उत्कृष्ट नमुना आहे. चंदेल्ल राजवटींत जैन धर्माला बराच आश्रय मिळाल्यानें त्याचीं देवळें व मूर्ती (यांच्यावर लेख कोरलेले असतात) पुष्कळच निर्माण झाल्या. बौद्धधर्मास मात्र राजाश्रय नव्हता. भोजराजा (धारेचा) परमार हा तर कलेचा अत्यंत भोक्ता होता. त्याच्या राजवटींत, धारेस व माळव्यांत अनेक उत्कृष्ट शिल्पकामें तयार झालीं. त्यांपैकीं पुष्कळ मुसुलमानांनीं पाडून टाकलीं. भोजपूर नांवाचा २५० चौ. मैलांचा एक मोठा तलाव बांधून त्यानें शेतकऱ्यांचा दुवा घेतला होता. पुढें ५०० वर्षांनीं हुशंगशहानें त्याचा बंधारा फोडला. विज्जल कलचूर्य याचा ब्राह्मण प्रधान बसव यानें १२ व्या शतकांत लिंगायतधर्म स्थापला. बसव हा प्रथम जैनधर्माचा होता असें म्हणतात. सांप्रत हा लिंगायतपंथ कानडी प्रांतांतील व्यापारीवर्गांत जास्त पसरलेला आहे. हे लोक लिंगपूजा करतात, वेद व पुनर्जन्म मानीत नाहींत आणि विधवापुनर्विवाह यांनां मान्य आहे. बसव हा ब्राह्मण असतांहि हे लोक ब्राह्मणांचा द्वेष फार करतात. लिंगायतधर्म निघाला तेव्हां त्याच्यांत व जैनांत फार द्वेष माजला होता. होयसळ राजांनीं बांधलेल्या देवळादि शिल्पांनां होयसळशिल्प असें नांव आहे. हीच बांधणी पुढें जैन लोकांनींहि उचलली होती. या शिल्पकामांत चौथरा व त्यावरील अनेक कोणाकृति देऊळ यांच्या सर्व बाजूंवर उत्तम दर्जाचें कोरीवकाम केलेलें असतें. साधारणपणें नक्षत्रासारखा या शिल्पाचा नमुना असतो आणि या देवळांनां ३।३ किंवा ४।४ कळस असतात. बाह्यगोल नकसकाम, पुतळे, मूर्ती इत्यादि सर्व प्रकारचें नक्षीकाम या धर्तीत फार पुढें आलें. याचें उत्तम उदाहरण म्हणजे हळ्ळेबीडचें देऊळ होय. सारांश होयसळकाळीं कलाकौशल्याचा उर्जितकाल होता. या वेळच्या शिल्पकारांनीं आपलीं नांवें कोरून ठेविलीं आहेत. या राजवटींतच रामानुज हा विद्वान वैष्णवाचार्य जन्मला. यानें कांची येथें विद्या संपादिली. याचें मूळ ठिकाण श्रीरंगम्, पण अधिराजेंद्र चोलाच्या (तो शैव होता) त्रासानें हा म्हैसूरकडे आला व अधिराजेंद्राच्या मृत्यूनंतर घरीं गेला. १२ व्या शतकाच्या मध्यांत हा वारला. ह्याचें मत आद्य शंकराचार्यांच्या अद्वैतमताहून भिन्न होतें. या मतास विशिष्ट अद्वैत म्हणतात. पल्लवराजे स्वतः विद्वान असून विद्वानांचे पोशिंदे व कलाकौशल्याचे भोक्ते होते. त्यांनीं लेणी, तलाव, देवळें, इत्यादि कामें करून उत्तरेकडील बौद्धशिल्प दक्षिणेंत आणलें. ह्युएनत्संगानें यांचें राज्य भरभराटलेलें असल्याचें लिहिलें आहे. लोक धाडसी, सत्यवादी व विद्वान होते असें तो म्हणतो. कांची शहर हें तर सांप्रतच्या नगररचनाशास्त्रानुरोधानें वसविल्याचें प्रो. गेडीज लिहितो. नरसिंह पल्लवानें महावल्लीपूर हें शहर वसवून तेथें प्रख्यात सात पागोडा नांवाचीं सात रथांचीं देवळें बांधलीं. तेथील कांहीं लेणीहि त्यानें कोरलीं असून त्यांतील अतिउत्तम म्हणजे अर्जुनतपश्चर्येचें लेणें होय. चोलांची राज्यव्यवस्था अति उत्कृष्ट दर्जाची व सुसंघटित असून फार प्राचीनकाळापासून अस्तित्वांत होती. परांतकाच्या कांहीं शिलालेखांवरून त्यावेळच्या (१० वें शतक) ग्रामपंचायतींची उत्तम कल्पना येते. कांहीं खेड्यांचा एक कुर्रम नांवाचा गट करून तो लोकनियुक्त आणि एक वर्ष अस्तित्वांत राहणाऱ्या महासभेच्या अधिकारांत ठेवीत. प्रत्येक गटास कार्षिक व धार्मिक पूर्ण स्वातंत्र्य असे. तळीं, बागा, न्याय, वगैरे खातीं पंचायतींत असत. कांहीं कुर्रमचा एक नाडु (जिल्हा), कांहीं नाडूंचा एक कोट्टम (भाग), व कांहीं कोट्टमचा एक मंडल (प्रांत) असे. एकंदर चोल राज्याचे ६ मंडल होते. शेतसारा $\frac{1}{6}$ असे, व करांसहित मिळून सर्व सरकारी महसूल $\frac{1}{4}$ होता, सोन्याचें चलनच विशेष प्रचारांत होतें, पाटबंधाऱ्यांचीं

कामें उत्कृष्ट व मोठ्या प्रमाणावर झालीं होतीं. गंगैकोंडाचोलपुरमचा बंधारा १६ मैल लांब होता; तंजावर येथील एका देवळाचें शिखर फक्त एकाच दगडाचें असून त्याचा खालचा भाग २५॥ चौ. फूट व वजन ८० टन आहे. सडकाहि उत्तम होत्या. सारांश चोल राजवटींत पल्लव शिल्प व कलाकौशल्याची वाढ पण जास्त व भव्य प्रमाणांत झाली. याची साक्ष तंजावर, दादापुरम् येथील उंच उंच व प्रचंड देवळें देतात. उत्तर चोलकलेंत गोपुरांची(चिदंबरचें गोपुर प्रख्यात आहे)च वाढ विशेष झाली. चोलशिल्प हेंच सीलोनमधील हिंदू देवळांच्या शिल्पाचें मूळ होय.चोल राजे शैव असून तामीळ भाषेला त्यांनीं उत्कर्षास चढविलें. पाण्डय राज्यांत १२८८ व १२९३ मध्यें मार्कोपोलो हा आला व त्यानें तत्कालीन वर्णन लिहून ठेवलें. पांडय राज्य श्रीमंत असून त्याचा दर्यावरील व्यापार अरेबिया व चीन देशांशीं चालतो. त्याचें कायल हें बंदर फार भरभराटलेलें आहे. परक्या व्यापाऱ्यास पुष्कळ सवलती मिळतात इ. मार्कोचें म्हणणें आहे. [ डुब्रेल–दि पल्लवाज; द्रवेडियन आर्किटेक्चर; अय्यंगार–तामीळ स्टडीज; एन्शन्ट इंडिया; गोपिनाथराव–एलिमेंट्स ऑफ हिंदू इकॉनॉग्राफी; स्मिथ–अर्लि व ऑक्सफर्ड हिस्टरी; वेंकटराम–टाऊन प्लॅनिंग ऑफ एन्शन्ट डेक्कन; राजगोपाळाचारियर–रामानुजाचार्य; रासमाला डेनिकर–गॉड्स ऑफ नॉर्दर्न बुद्धिझम; बसु व शास्त्री-मॉडर्न बुद्धिझम; वैद्य–मध्ययुगीन भारत,भा.१.२].

**दिल्लीचे सुलतान**–मागें सांगितल्याप्रमाणें साधारणरीत्या मध्ययुगांत व विशेषतः १० व्या शतकांत मुसलमानांच्या आगमनापूर्वीं हिंदुस्थानांत हिंदु राज्यें नांदत होतीं. यापुढें जे मुसलमान हिंदुस्थानवर चालून आले, ते तत्पूर्वीं आलेल्या अरबांपेक्षां पुष्कळ बाबतींत सरस होते. त्यांची धार्मिक व सामाजिक संस्कृति त्यांचे आचार–विचार, त्यांची युद्धपद्धति इ. सर्वच प्रकार हिंदु संस्कृति, आचार–विचार, युद्धपद्धति वगैरेपेक्षां अत्यंत भिन्न होती. त्यामुळें या दोन्ही संस्कृतींचा धुडगूस पुढें अनेक शतकें हिंदुस्थानांत चालू होता.

**मुसलमानांच्या पहिल्या स्वाऱ्या**–दहाव्या शतकाच्या अखेरीस भटिंडाचा राजा जयपाल याचें राज्य सिंधूपलीकडे जलालाबादेपर्यंत पसरलें होतें व त्याला लागून गझनीच्या अमीर सबक्तगीनचा प्रांत होता. त्यामुळें त्यांच्यांत नेहमीं कटकटी होत; पैकीं एका लढाईंत (९९१) जयपालाला कनोजचा राज्यपाल परिहार व महोबाचा धंग चंदेल्ल यांनीं साहाय्य केलें होतें. सबक्तगीनचा मुलगा महमूद गझनीकर हा अत्यंत लोभी, क्रूर व मूर्तीपूजकांनां ठार मारण्यांत आनंद मानणारा दुष्ट मनोवृत्तीचा होता. स्मिथनें याच्या हिंदुस्थानावरील स्वाऱ्यांनां खुनी स्वाऱ्या म्हटलें आहे. मुसुलमान लेखकांनीं त्याच्या स्वाऱ्यांचा इतिहास कादंबरीवजा लिहिला आहे. हिंदी तत्कालीन इतिहासांत त्याची विशेष हकीकत आढळत नाहीं. महंमूदनें कांगडा, मथुरा व सोमनाथ हीं देवळें लुटलीं आणि आनंदपाल भटिंडकर व राज्यपाल (कनोजचा) यांच्यावर स्वाऱ्या केल्या. एकंदरींत महंमूद हा मोठ्या प्रमाणावरील एक वाटमाऱ्या होता (स्मिथ. ऑ. हि. १९४). त्याच्या स्वाऱ्यांचा परिणाम पंजाबखेरीज इतरत्र कांहीं झाला नाहीं. त्याच्या पदरीं अलबेरूणी नांवाचा एक विद्वान पंडित होता; त्यानें बरींच वर्षें पंजाबांत राहून व संस्कृत शिकून तत्कालीन हिंदुस्थानची पुष्कळशी माहिती लिहून ठेविली आहे; तिच्यापैकीं बरीचशी प्रसिद्ध झाली असून अद्यापि कांहीं शिल्लक राहिली आहे.

**पृथ्वीराज व जयचंद**–कनोजचें परिहार घराणें १०९० त दुर्बल होऊन चंदेल्लांपैकीं गढवाल घराणें पुढें आलें. त्यांतला गोविंदचंद्र हा फार प्रख्यात राजा होता. त्यानें पुन्हां कनोजचें वैभव उभारून ९० वर्षें राज्य केलें (११००-६०). त्याचा नातु जयचंद होय. मुसुलमानांनीं त्याला हिंदुस्थानचा सम्राट म्हटलें आहे. त्याची व मुहम्मद घोरी याची मोठी लढाई ११९४ त होऊन जयचंदाचा मोड झाला. सांभर व अजमेर येथील प्रख्यात चाहमान कुळांत प्रसिध्द पृथ्वीराज चव्हाण उर्फ रायपिठोरा जन्मला. त्याचा चुलता विग्रहराज (चवथा) हा फार विद्वान असून त्यानें रचलेलीं दोन नाटकें (कांहीं प्रवेश) अजमेर येथें शिलालेखरूपांत आज दृष्टीस पडतात. पृथ्वीराजानें जयचंद गढवालाची मुलगी संयोगिता हिचें ११७५ चे सुमारास हरण केलें व ११८२ त चंदेल्लांचा पराभव करून आपलें अजमीर व दिल्लीचें राज्य वाढविलें. त्यानें मुहम्मद घोरीस अनेक वेळां जोराचा अडथळा केला,पण ११९३ तील ठाणेश्वर जवळील तरैनच्या लढाईंत तो कैद झाला. हा फार शूर असल्यानें उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक भाट लोकांचा वर्ण्यपुरुष होऊन बसला असून, हिंदुस्थानचा शेवटचा वीर म्हणून त्याच्याबद्दल सर्वत्र पूज्यबुध्दी आढळते. त्याचा भाट चंदबरदाई यानें ५००० कवित्तांचा पृथ्वीराज

रासा नांवाचा ग्रंथ केला असून सांप्रत त्याची संख्या १। लाख झाली आहे. मूळ ग्रंथ विश्वसनीय आहे व त्यांत पृथ्वीराजाचें चरित्र दिलें आहे. पृथ्वीराजाच्या दिल्लीची (हल्लीं कुतुबमिनारच्या आसपासची जुनी दिल्ली) स्थापना ९३० च्या सुमारास झाली असावी. तोमर राजांनीं ११ व्या शतकांत तेथें अनेक देवळें बांधलीं. तींच पाडून पुढें मुसुलमान राजांनीं आपल्या इमारती बांधल्या. पृथ्वीराजाची लाट म्हणून प्रसिध्द असलेल्या घडीव लोखंडी स्तंभाचें वर्णन मागें आलेंच आहे. ही लाट समुद्रगुप्ताची असून २४ फूट उंच व ६ टन वजनाची आहे. हा हिंदु कारागिरीच्या कामाचा एक उत्कृष्ट नमुना आहे.

मुहम्मद घोरीनें ११७८ च्या सुमारास गुजराथेवर स्वारी केली परंतु तेथील मूलराज या राजानें त्याला इतक्या जोरानें पिटाळलें कीं, त्यापुढें एक शतकपर्यंत कोणाहि मुसुलमान राजानें गुजराथ जिंकण्याचा प्रय.न केला नाहीं. तरैनच्या लढाईनंतर कनोजचा राजा जयचंदहि या सुमारास एका लढाईत पडला.त्यामुळें मुसुलमानांची सत्ता उत्तर हिंदुस्थानांत पहिल्यानें स्थापन झाली.तत्कालीन हिंदु लोक धर्मशास्त्राप्रमाणें युद्धें करीत व मुसुलमानादि परकीय लोक युद्धांत धर्म वगैरे पाळीत नसत. त्यामुळें दोन हिंदू राजांत जें धर्मयुद्ध चाले, तें या परक्या लोकांच्या कामांत उपयोगी न पडतां उलट हिंदूंचा पराजय होई. शिवाय ह्या परक्या लोकांची सर्व भिस्त चपळ घोडदळ व तोफखाना यांवर असे तर हिंदूंची गजदळावर असे; पण पहिल्यापुढें दुसऱ्याचा निभाव लागत नसे; त्यामुळें हिंदूंच्या पदरीं अपजय येई. परंतु यापासून घ्यावयाचा तो धडा अद्यापिहि हिंदु लोक घेत नाहींत. हिंदु लोक हे या परक्या लोकांइतकेच प्राणाविषयीं बेफिकीर व शूर आहेत, पण वरील दोषामुळें त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. मुहम्मद घोरकर परत गेल्यावर त्याचे सेनापति कुत्बुद्दीन ऐबक व मुहम्मद खिलजी यांनीं दिल्ली घेऊन (११९३), बिहार प्रांत काबीज केला. नंतर त्यांनीं हजारों देवळें पाडलीं व अमानुष कत्तल केली. मुसुलमान इतिहासकार म्हणतात कीं, बिहार प्रांतांतील सर्व क्षौरी ब्राह्मण मुहम्मदानें ठार मारले. हे ब्राह्मण बहुधा बौद्ध भिक्षू असावेत. कारण त्यावेळीं बिहार प्रांतांत बौद्धधर्म थोडा फार टिकून होता. यापुढें मुसुलमानांच्या जुलुमानें बौद्ध लोक तिबेट, चीन, नेपाळ, व दक्खनकडे पळून गेले आणि उत्तर हिंदुस्थानांत बौद्धधर्म नामशेष झाला (११९७). यावेळीं मुसुलमानांनीं मोठमोठीं ग्रंथसंग्रहालयें जाळून टाकलीं व असंख्य बुद्धमूर्ती, मठ, स्तूप, स्तंभ इत्यादि सुंदर इमारती आणि देवळें मोडूनतोडून टाकून त्याजागीं मशिदी उभारल्या. मुहम्मद खिलजीनें ११९९ चे सुमाराम बंगालचा शेवटचा ब्राह्मण राजा लक्ष्मणसेन याचा पराभव करून गौड येथें आपली राजधानी स्थापिली. या वेळेपासून बंगालचें स्वातंत्र्य नष्ट झालें. महोबाच्या चंदेल्ल राजाच्या प्रधानानें फितूर करून प्रख्यात कालिंजरचा किल्ला कुत्बुद्दीनच्या हवालीं केला (१२०३). पुढें मुहम्मद घोरकर मेल्यावर कुत्बुद्दीन यानें आपल्याला दिल्लीचा सुलतान म्हणून जाहीर केलें (१२०६). हा मूळचा गुलाम असल्यानें याच्या वंशास पुढें गुलाम घराणें म्हणूं लागले. हा अत्यंत क्रूर, माथेफिरू व हिंदूंची निष्कारण कत्तल करणारा होता. मुसुलमानांची सत्ता स्थापन होण्यास त्या लोकांनीं लढाऊ व बिनलढाऊ अशा असंख्य हिंदु लोकांची केलेली कत्तल हें कारण होय. या रानटी गोष्टीची मुसुलमानी इतिहासकारांनीं मोठी स्तुति केली आहे. कुतुब व त्यापुढील दिल्लीचे सुलतान यांना स्मिथनें 'रक्तपिपासु' म्हटलेलें आहे (ऑ. हि. २२३). कुतुबच्या वेळेपासून मुसुलमानी शिल्प हिंदुस्थानांत सुरू झालें; त्यांतील प्रख्यात इमारत म्हणजे कुत्बुमीनार होय. जवळ जवळ २७ हिंदू देवळें पाडून त्यांच्या सामानानें ही बांधली आहे. मुहम्मद खिलजी हा आसामवर चालून जात असतां त्याचा खून झाला (१२०५), व कुतुब हा १२११ त मेला. त्याचा जांवई इल-तुत-मिश (अल्तमश) यानें थोडासा राज्यविस्तार करून सासऱ्याप्रमाणें हिंदु देवळांच्या अवशेषांनीं अजमेर येथें एक सुंदर मशीद बांधली. याच्या कारकीर्दीतच चेंगीजखान या प्रसिद्ध मोंगल लुटारूची धाड पेशावरपर्यंत येऊन परत गेली; याचें खरें नांव तेमूजीन उर्फ तमूर्ची असून चेंगीज ही चिनी पदवी होती. तबकात ई-नासिरीच्या मुसुलमान कर्त्यानें चेंगीजला खाटीक म्हटलें आहे. इल-तुत-मिशाची मुलगी रझिय्यत इनें तीन वर्षे शांतपणें राज्यकारभार केला, पण पुढें तिच्या सरदारांनींच तिचा खून केला. तिच्यानंतर तिचा भाऊ नासिरुद्दीन ह्यानें २० वर्षे राज्य केलें. हा फार धर्मवेडा होता. तबकात-ई-नासिरीचा कर्ता मिनहाज-ई-सिराज हा याचा एक अधिकारी होता. नासीरचा सासरा बल्बन यानें जांवयाचा खून करून गादी बळकावली. हा मूळचा इलतुतमिशाचा एक गुलाम होता. हा अत्यंत क्रूर असून माणसें ठार मारण्याबद्दल व रक्ताचा सडा पाडण्याबद्दल

त्याला कांहींच खंती वाटत नसे. "गुप्त हेरांच्या बळावर त्यानें ६० वर्षें राज्य चालविलें. त्यानें हिंदूंनां अत्यंत छळलें. त्यानें स्वतःविरुद्ध उठलेल्या मेवाती हिंदूंचा पराभव करून त्यांतील १२ हजार कैद्यांची कत्तल केली. यांत म्हातारे, लहान मुलें व बायकाहि होत्या. आणि १०० माणसांच्या अंगांची कातडी सोलून काढून त्यांत पेंढा भरून तीं दिल्लीच्या निरनिराळ्या वेशींवर टांगून ठेविलीं. राज्यांतील ठिकठिकाणच्या मोठमोठ्या शहरांच्या बाहेर सुळीं देण्याच्या सुळांच्या रांगाच्या रांगा दिसत असत." (स्मिथ) याच्या पदरीं अमीर खुश्रू नांवाचा एक उत्तम फारशी कवि होता. बलबन नंतर गुलाम घराणें नाश पावलें. या घराण्यांतील सुलतान हे क्रूर, धर्मवेडे व व्यभिचारी होते. त्यांनीं हिंदूंचा अत्यंत छळ करून केवळ सैन्याच्या बळावर पंजाब, संयुक्तप्रांत, बिहार, बंगाल, व सिंध या प्रांतांवर आपली सत्ता स्थापिली. या घराण्यानंतर खिलजी घराणें गादीवर आलें. त्यांतील पहिला राजा जल्लालुद्दीन यानें मोंगल लुटारूंनां भीतीनें मोठमोठ्या सरकारी जागा दिल्या व त्यांनां मुसुलमान केलें. यापुढें यांनां नवीन मुसुलमान असें संबोधण्यांत येऊन त्यांचें हिंदुस्थानांत कायमचें वास्तव्य झालें. जलालच्या कारकीर्दीत ठगांचा पहिला उल्लेख आढळतो. जलालला ठार मारून गादीवर बसणारा त्याचा पुतण्या अल्लाउद्दीन हा रानटी, मूर्ख, अन्यायी, क्रूर व जुलमी होता. बराणी हा इतिहासकार म्हणतो कीं, "त्यानें निरपराधी बायका, मुलें यांनां सुद्धां ठार मारून रक्तपात करणाऱ्यांत नांव मिळविलें. स्वतःच्या वाटेंत येणाऱ्या प्रत्येकाची अत्यंत निष्ठूरपणें कत्तल करून त्यानें राज्य हांकलें, त्यामुळें त्याच्या कारकीर्दीत अनेक बंडें उद्भवलीं व अनेक कट उभारले गेले." ते नामशेष करण्यांतच त्याचें आयुष्य खर्च होऊन, गुजराथशिवाय त्याचा राज्यविस्तार झाला नाहीं. दख्खनवर त्यानें कांहीं स्वाऱ्या केल्या आणि उत्तरेकडे रणथंबोर व चितोड हे प्रख्यात किल्ले घेतले. मोंगल लोकांनीं १२९७–१३०९ पर्यंत अनेकदां हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या. एकदां (१३०३) तर त्यांनीं दोन महिने दिल्ली आपल्या ताब्यांत ठेवली होती. त्यांच्यापैकीं जे नुकतेच मुसुलमान झाले होते त्यांनीं बंड केलें, तेव्हां अल्लाउद्दीनानें त्या सर्वांची (१९ ते ३० हजार) कत्तल केली. दख्खनमधून मलिक काफूरनें देवगिरीकर यादव, द्वारसमुद्रकर होयसळ व मदुरेकर पाण्ड्य यांचा पराभव करून अगणित संपत्ति दिल्लीस आणली. चितोड घेतांनाच प्रख्यात पद्मिनीची कथा घडलेली आहे (१३०३). अल्लाउद्दीनानें मूर्खपणाच्या बऱ्याच गोष्टी केल्या. यानें हिंदूंनां छळण्यांत पूर्वीच्या सुलतानांवर ताण केली. त्यानें "सर्व हिंदूंनां भरडून काढण्यास व भिकारी करण्यास" सरकारी हुकूम काढले होते. उत्पन्नाच्या निम्मे शेतसारा घेण्याची अत्यंत जुलमी रीत त्यानें उपयोगांत आणली. गुप्त हेरांच्या बळावर अतीशय जुलूम करून त्यानें राज्य चालविलें. (स्मिथ) त्यानें दिल्लीजवळ सिरी (हल्लीचें शहापूर) नांवाचें शहर वसवून कांहीं इमारतीहि बांधल्या; परंतु त्या पुढें शेरशहानें पाडून टाकल्या. कुत्बुमीनारजवळ दुसरा एक मीनार बांधण्यास त्यानें प्रारंभ करून त्यावेळीं हजारों मोंगलांच्या रक्ताचा सडा (शांतीसाठीं म्हणून) तेथें शिंपविला (स्मिथ). त्याचा मुलगा मुबारक हाहि मूर्ख, क्रूर, व्यभिचारी व कुचकामाचा होता. फक्त देवगिरीच्या हरपालदेवाचा पराभव करण्याचेंच काय तें काम त्यानें केलें. बायकी अलंकार व पोषाक घालून तो खुषमस्कऱ्यांत बसे. या नादान राजाचा वध त्याचा आवडता सरदार खुश्रू (हा मूळचा हिंदु होता) यानें करून, पुन्हां हिंदू राज्य स्थापण्याचा प्रयत्न केला पण कांहीं महिन्यांनीं सर्व मुसुलमान एक होऊन त्यांनीं तो प्रयत्न ढांसळून टाकला; आणि आपल्यांतील एक गाझी मलिक यास गादीवर वसविलें. गाझीचा बाप बल्बनचा गुलाम असून आई जाट जातीची होती. गाझीनें स्वतःस घीयासुद्दीन तुघ्लक नांव घेऊन राज्यांत बरा बंदोबस्त केला. त्याचा मुलगा जूना खान यानें वरंगळवर स्वारी केली असतां तेथील हिंदूराजानें त्याला पिटाळून लाविलें, म्हणून पुन्हां त्यानें जास्त सैन्यानिशीं जाऊन राजाचा पराभव केला, व बेदर घेतलें. नंतर तो दिल्लीस आला व त्यानें विश्वासघात करून आपल्या बापाच्या व भावाच्या अंगावर एक लांकडी घर कोसळवून त्यांचा खून केला आणि स्वतःस मुहम्मद नांव घेऊन गादी बळकावली (१३२५). अल्लाउद्दीन खिलजीप्रमाणेंच यानें २६ वर्षें अत्यंत जुलूम करून राज्य केलें. जगांत जे अत्यंत जुलमी व क्रूर राजे होऊन गेले त्यांतील हा एक होता. बापानें मिळविलेली सर्व संपत्ति त्यानें उधळून टाकली. त्याच्या दरबारचा भपकाहि फार मोठा होता. अफ्रिकेचा रहिवासी व प्रवासी आणि मुहम्मदचा ९ वर्षें नौकर असलेला इब्न बतूता यानें व मुहम्मदचा सरकारी अधिकारी झियाउद्दीन बराणी यानें या काळच इतिहास प्रत्यक्ष पाहून लिहिलेले आहेत. त्यांवरून

मुहम्मद हा विद्वान, शूर, दारू न पिणारा, उत्तम वर्तनाचा परंतु अत्यंत क्रूर, खुनी व जुलमी होता असें दिसतें. बतूता म्हणतो कीं, तो किंचित वेडसरहि असावा. त्याच्या दुष्कृत्यांचें वर्णन करण्यास लेखणीहि धजावत नाहीं असें स्मिथ म्हणतो. मनांत येईल ती लहर पुरविण्यास तो मागें पुढें पहात नसे. तो स्वतः म्हणे कीं, मी म्हणेन तसें लोक वागत नाहींत म्हणून साध्या अपराधासाठींहि मी त्यांनां ठार करतों व शेवटपर्यंत करीन. दिल्लीच्या लोकांनीं स्वतःच्या जुलुमाविरुद्ध तक्रारी केल्यामुळें ९ कोस लांबीची दिल्ली राजधानी मोडून देवगिरी (दौलताबाद) राजधानी करणें (सर्व दिल्ली ओस पडली असतां एक आंधळा व एक अर्धांगवायू झालेला अशीं दोन माणसें मुहम्मदाच्या आढळण्यांत आलीं, पैकीं आंधळ्याला थेट देवगिरीपर्यंत फरफटत नेण्याची व दुसऱ्याला तोफेच्या तोंडीं देण्याची त्यानें शिक्षा दिली. आंधळ्याच्या शरीराचे तुकडे होऊन फक्त एक तंगडी तेवढी देवगिरीस गेली!), तर्मशिरीन मोंगलानें थेट दिल्लीवर चाल केली असतां त्याला भरभक्कम लांच देणें, इराणवर स्वारी करणें, चांदीच्या नाण्यांची किंमत तांब्यांच्या नाण्यांनां लावणें, चीनवर स्वारी करण्यासाठीं १ लाख घोडदळ पाठवून त्याचा नाश होऊन त्यांतील बचावून आलेल्या १० स्वारांनांहि स्वतः ठार मारणें, बंडखोर भाचाच्या अंगाचें जीवंतपणीं कातडें सोलून त्याच्या मांसाचा भात त्याच्या बायकामुलांस खाण्यासाठीं पाठविणें, कनोजपासून रायबरेलीपर्यंतचीं सर्व हिंदू माणसें कापून काढणें, इ. इ. अनेक क्रूर व माणुसकीस काळीमा आणणारीं कृत्यें मुहम्मदानें केलीं. त्यामुळें त्याच्या राज्यांत सर्वत्र बंडाळी माजली व त्याच्या राज्यांतील बंगाल, दख्खन, तेलंगण, इ. बरेच प्रांत स्वतंत्र बनले, भयंकर दुष्काळ पडून प्रजा भिकारी झाली आणि बहामनी व विजयानगर हीं प्रतिस्पर्धी राज्यें उत्पन्न झालीं. शेवटीं बंडें मोडित असतांना मुहम्मद हा सिंध प्रांतांत १३५१ त मेला. त्याच्यानंतर गादीवर आलेल्या फिरोझशहानें बंगालवर स्वारी करून १ लक्ष ८० हजार लोकांची कत्तल केली, तरी बंगाल त्याच्या हातीं आला नाहीं व सिंधहि स्वतंत्र बनला. फिरोज हा श्रद्धाळु, इमारतींचा शोकी व साधारण थंड प्रवृत्तीचा होता. फिरोझाबाद (दिल्लीजवळील इंद्रपत), हिस्सार, फिरोझ, जोनपूर इ. गांवें त्यानें वसविलीं. त्यानें आपल्या ३७ वर्षांच्या कारकीर्दीत बांधलेल्या मशिदी, किल्ले, गांवें, कॉलेजें, बंधारे, कालवे इ. शिल्पकामांची एक स्वहस्ताची यादी लिहून ठेवली आहे. सरकारी अधिकाऱ्यांनां पूर्वी जहागिरी देत असत, ती पद्धत अल्लाउद्दीन यानें मोडून रोख पगार सुरू केला होता, पण फिरोझनें पुन्हां जहागिरी दिल्या; ही पद्धत पुढें अकबरानें बंद केली आणि पगाराची पद्धत सुरू केली. लढाईंत पकडलेल्या लोकांनां बाटवून गुलाम करण्याची चटक फिरोजला इतकी होती की, त्याच्या परिवारांत १लक्ष ८० हजार गुलाम होते अर्थात त्यांनां गुलाम बनविण्यांत थोडाफार जुलूम होईच;खेरीज हिंदूंनां त्रास देणें, त्यांचीं देवळें पाडणें, त्यांच्या धर्मगुरूंनां ठार मारणें,त्यांच्यावर जीझया (दरेकास दरसाल १०॥ रुपये) बसावणें, त्याच्या सुटीची लालूच दाखवून हिंदूंनां बाटविणें,इत्यादि जुलमाच्या गोष्टी त्यानें केल्याच, मात्र पूर्वीच्या अमानुष व रानटी शिक्षा त्यानें बहुंशीं बंद केल्या. सांप्रत दिल्लीस असलेले दोन अशोकाचे लेखांकित शिलास्तंभ हे फिरोजनेंच तोप्रा व मीरत येथून आणले. त्याच्या मरणानंतर (१३८८) व तैमूरची स्वारी होईपर्यंत दोन तीन नांवाचे सुलतान गादीवर बसले होते, पण राज्यांत सर्वत्र बंडाळी माजली होती (स्मिथ).

अमीर तैमूर हा जातीचा बर्लास तुर्क असून त्याचा जन्म १३३६त होऊन तो समरकंदच्या गादीवर १३६९त बसला. चेंगीजखानाप्रमाणेंच यानेंहि ठिकठिकाणीं स्वाऱ्या करून जुलूम व रानटीपणाचा कळस केला. हिंदुस्थानांतील अराजकतेचा फायदा घेऊन त्यानें ९० हजार घोडदळासह मुलतान मार्गानें चालून येऊन व पानिपत येथें महमूद तुघ्लखाचा पराभव करून दिल्लीस आपल्याला बादशहा म्हणून जाहीर केलें परंतु दिल्लीच्या लोकांनीं बंड केल्यानें त्यानें १ लाख लोकांची कत्तल केली व पांच दिवस लूट करून पिढयानपिढया सांठलेली दिल्लीची सर्व संपत्ति बरोबर घेऊन व वाटेंतील गांवें लुटून व जाळून-पोळून तो आपल्या देशीं परत गेला(१३९८).(स्मिथ) या स्वारीनें पुढें२००वर्षें उत्तरेकडे नाण्यांचा व चांदीसोन्याचा तुटवडा पडला होता. यापुढें ९० वर्षें दिल्ली येथें नांवाचा मुसुलमान राजा राही व त्याचा अंमल दिल्लीच्या आसपासच्या अत्यंत थोडया प्रदेशावर चाले, बाकी सर्व देश निरनिराळ्या स्वतंत्र राज्यांत समाविष्ट झाले होते. हे नांवाचे दिल्लीचे राजे स्वतःस सय्यदवंशांतील म्हणवीत; त्यांतील शेवटचा अल्लाउद्दीन याचा पराभव करून पंजाबचा अफगाण सुभेदार बहलोल लोदी हा दिल्लीचा राजा बनला (१४५०). बहलोलनें थोडासा राज्यविस्तार करून बंडाळी मोडली. त्याच्या शिकंदर नांवाच्या मुलानें बिहार

प्रांत काबीज केला. त्या काळीं प्रांत काबीज करणें याचा अर्थ स्वतंत्र सुभेदारांपासून वार्षिक कांहीं तरी खंडणी घेणें असा होई. शिकंदर कट्टा मुसुलमान असून त्यानें हिंदूधर्माचा फार द्वेष केला. मथुरेचीं सुप्रसिद्ध देवळें त्यानें जमीनदोस्त केलीं. मात्र त्याच्या राज्यांत सुबत्ता होती. महमूद गिझनीकरानें आग्रा शहर नामशेष केलें होतें, तें यानें पुन्हां वसविलें आणि अकबराचें थडगें असलेलें शिकंदरा गांवहि यानेंच वसविलें. याच्या कारकीर्दींत उत्तर हिंदुस्थानांत (व इराणांत) मोठा भूकंप होऊन बरेंच नुकसान झालें (१५०५). शिकंदरानंतर त्याचा मुलगा इब्राहिम हा गादीवर आला. तो दुर्बळ असून त्याचीं व त्याच्या अफगाण सरदारांचीं नेहमीं भांडणें होत अखेर सरदारांनीं काबूलच्या बाबर बादशहास बोलावणें धाडलें त्याप्रमाणें किरकोळ लढाया करून अखेरीस १५२६ त काबूल सोडून बाबर पानिपत येथें येऊन पोहोंचला व त्यानें तेथें इब्राहीमला लढाईत ठार करून दिल्लीचें तक्त आपल्या ताब्यांत घेतलें (२१ एप्रिल).

फिरोझ तुघ्लकानें जोनपूर नांवाचें शहर स्थापलें होतें; तेथें महमूद तुघ्लकानें एक खोजा ख्वाजा जहान ही पदवी देऊन पूर्वेकडील प्रांताचा सुभेदार (मलीक-उस-शर्क) म्हणून ठेवला (१३९४). तैमूरच्या बंडाळींत याचा मुलगा स्वतंत्र बनून त्यानें मुबारकशहा शर्की (पौर्वात्य) हें नांव धारण केलें (१३९९). त्याच्या मागें त्याचा भाऊ इब्राहिम यानें ४० वर्षें राज्य करून मुसुलमानी धर्माचा प्रसार केला. त्याचा मुलगा महमूद व त्याचा हुसेन, हुसेनवर बहलोल लोदीनें चाल करून त्याला बंगालकडे पळवून लावलें (१४७६); व हें ७५ वर्षें टिकलेलें स्वतंत्र राज्य नष्ट केलें आणि तेथें आपला मुलगा बारबक यास सुभेदार नेमलें. त्याला शिकंदर लोदीनें हांकलून हें राज्यच खालसा केलें. येथले राजे फारशी व आरबी वाङ्मयास उत्तेजन देणारे व इमारतींचे शोकी होते.

दिल्लीच्या वरील सव्वा तीनशें वर्षांच्या (१२०६–१५२६) सुलतानशाहींत बहुतेक रक्तपाताचाच इतिहास भरलेला आहे. बहुतेक सुलतान रक्तपिपासू, जुलमी, क्रूर, विश्वासघातकी असून सर्व सुलतान (फिरोझ तुघ्लक सुद्धां) कट्टे धर्मवेडे व हिंदुधर्माचे द्वेष्टे होते. थोड्या जणांनीं फक्त मुसुलमानी (आरबी, फारशी) वाङ्मयास आश्रय दिला होता. त्यांनीं मक्कामदिना व दमास्कस इकडील मुसुलमानी शिल्प इकडे प्रचारांत आणलें पण त्याच्यावर हिंदूशिल्पाची दाट छाया पडलेली आहे. असंख्य हिंदू देवळें व शिल्पकामें पाडून त्यांनीं आपल्या मशिदी, राजवाडे वगैरे कामें उभारलीं.

मुसुलमानांनीं हिंदूनां कोणत्या साधनांनीं जिंकलें त्याचा थोडक्यांत नामनिर्देश पुढीलप्रमाणें. मुसुलमान हे थंड आणि डोंगराळ देशांतील असल्यानें शरीरानें हिंदूपेक्षां जास्त मजबूत, काटक आणि आडदांड; त्यांच्यांत जाती नसल्यानें व मांसाहार असल्यानें त्यांचें कोठें नडत नाहीं व लढण्याच्या कामीं जास्त चिकाटी येते; त्यांचे विलक्षण धर्मवेड; मुसुलमानेतर सर्व लोकांस लुटणें, ठार मारणें, त्यांचीं देवळें मोडणें इ. गोष्टी करण्यास त्यांची धर्माज्ञा; त्यासाठीं निर्दय बनून लाखो लोकांची कत्तल करून व नाना तऱ्हेचे रानटी अत्याचार करून अल्लास खूष करतां येते ही भावना; या कामीं रणांत पडल्यास इहलोकीं गाझी (धर्मवीर) ही पदवी मिळून परलोकीं सर्व स्वर्गीय सुखें मिळतात हा विश्वास व त्यामुळें बिनधोक लढाई चालू ठेवणें; पराभव झाल्यास परत स्वदेशीं जाण्याची असाध्यता; हिंदुस्थानांतील अगणित संपत्ति मिळविण्याचा लोभ; लुटींत मिळणारा वांटा इ. इ. याच्या उलट हिंदूंची परिस्थिति असे. त्यांचें युद्धशास्त्र अत्यंत जुनें व धर्माच्या पायावर आणि हिंदूंहिंदूंत लढण्याच्या नियमावर बसविलेलें; जातीमुळें व तटामुळें सैन्यांतील शिस्तीचा अभाव; चपळ घोडदळाचा व गमिनीकाव्याचा अभाव आणि त्याऐवजीं अवजड व गोंधळ झाल्यास आपल्याच सैन्याचा नाश करणाऱ्या गजदळाची बेसुमार संख्या; जातींजातींतील तंटे आणि एकीचा पूर्ण अभाव बंदुका व तोफा या शस्त्रांची माहिती पूर्णपणें नसणें, त्यासाठीं परक्यांवर अवलंबून रहाणें इ. इ. गोष्टींमुळें वास्तवीक शूर असलेले हिंदूलोक मुसुलमानां पुढें हरले.

या सुलतानांच्या कारकीर्दींत राज्यव्यवस्थेचे कायदेकानु फारसे प्रचारांत नव्हते. अल्लाउद्दीनानें बरेचसे नियम केले होते पण ते चुकीचे होते. बंगाल प्रांतांत मात्र हिंदु राजाची पूर्वापार चालत आलेली राज्यव्यवस्था चालू होती. वास्तविक १२व्या शतकापासून मुसुलमानी अंमलाखालीं बंगाल गेला होता व तेथील सुभेदार पूर्णपणें स्वतंत्र असून नांवाला दिल्लीच्या राजाला खंडणी देत. असें असतांहि त्यांनीं बंगालमधील हिंदू राजांनां कायम ठेवून त्यांच्या राज्यव्यवस्थेस धक्का लाविला नव्हता. बंगाल इंग्रजांच्या ताब्यांत जाईपर्यंत परतंत्रच होता.

सुलतानी सत्ता अत्यंत जुलुमी असे, तिला आळा बंडानें किंवा खुनानें पडे. अल्लाउद्दीन खिलजी व महंमद तव्लख हे तर जुलम्यांचे म्होरके होते. लष्कराच्या हातीं सुलतान निवडण्याचें असे व त्यामुळें एकाच घरण्यांतील राजे न येतां वाटेल त्या (मुसुलमान) कुटुंबांतील येत. मुसुलमानी देशांतून इकडे येऊन वसति करणें व जुलुमानें किंवा लालूच देऊन बाटविणें. या साधनांनीं मुसुलमानांनीं आपली संख्या वाढविली; संख्या वाढविण्यांत त्यांची गति हिंदूंपेक्षां जास्त आहे. शक, हूण इत्यादि प्राचीन बाह्यांप्रमाणें मुसुलमान हे हिंदूंच्या चातुर्वर्ण्यांत मिसळून गेले नाहींत याचें कारण शकादींनां स्वतःचा धर्म नव्हता म्हणून त्यांचा ब्राह्मणी धर्मापुढें टिकाव लागला नाहीं. मुसुलमानांनां स्वतःचा धर्म होता, व तो ताजाच निघाला असल्यानें त्याच्याविषयीं त्यांच्या ठिकाणीं उदासीनताहि आली नव्हती, उलट त्याच्या ठायीं त्यांची अत्यंत निष्ठा (किंबहुना अंधभक्ति) होती. पहिल्यानें हे मुसुलमान लोक सामान्य हिंदु समाजांत मिसळत नसत. पण बऱ्याच काळानें ही स्थिति पालटली बाटग्या हिंदूंत अद्यापीहि अर्धवट हिंदू चालीरिती व धर्माचार शिल्लक राहिले आहेत. या दोन जातींच्या बऱ्याच दिवसांच्या संघट्टणामुळें एक स्वतंत्र उर्दू नांवाची (दिल्लीकडील हिंदी व फारशी मिश्रित) भाषा अस्तित्वांत आली. ऊर्दू हा तुर्की शब्द असून त्याचा अर्थ लष्कर असा आहे. लष्करांतील भाषा असल्यानें तिचा प्रसार जलद झाला. हिचें व्याकरण व रचना हिंदी असून शब्दांचा भरणा मात्र फारशी आहे. सांप्रतच्या हिंदुस्थानांतील मुसुलमानांची मायभाषा ऊर्दूच असून तींत पुष्कळ मुसुलमानांनीं ग्रंथ लिहिले आहेत. अमीर खुश्रु (१३२५) याच्या ग्रंथांत पुष्कळ हिंदी शब्द आढळतात. मुसुलमानी एकेश्वरी धर्माचा थोडासा परिणाम हिंदुधर्मावरहि झाला. एकेश्वरत्व हें हिंदूधर्मांत मूळचें आहे, पण मुसुलमानांच्या आगमनामुळें त्याला थोडें जास्त उत्तेजन मिळून रामानंदी पंथासारखे कांहीं पंथ निघाले व हिंदु मुसुलमान या दोन भिन्न धर्मांचा तीव्र झगडा जरासा शांत होत चालला. रामानंद(१३५०-८०)मूळचा दख्खनमधील असून, त्यानें हिंदी भाषेंत आपला उपदेश चालू ठेवला व जातिभेदाकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. त्याचे १२ मुख्य शिष्य असून त्यांत रजपूत, न्हावी, चांभार व मुसुलमान असे भिन्न भिन्न जातीचेहि होते. कबीर हा रामानंदाचाच शिष्य होता; त्यानें मूर्तिपूजा व जाती यांच्या विरुद्ध मत प्रतिपादिलें आहे. त्याच्या शिष्यांत हिंदु व मुसुलमान दोघेहि असत. कबीराप्रमाणेंच इराणी साधु जलालुद्दीन रूमी हफीज याचें तत्त्वज्ञान होतें. असाच (हिंदूमुसुलमानांच्या धार्मिक एकीचा) प्रयत्न पुढें नानकनें केला व शीखपंथ काढला, पण मोंगल राजांच्या जुलमामुळें शीख हे मुसुलमानांचे कट्टे द्वेष्टे झाले. हिंदुस्थानांत या धार्मिक बाबतींत एक विशेष मौज अशी आढळते कीं, सनातनी धर्माच्या (चातुर्वर्ण्याच्या) विरुद्ध म्हणून एखादा नवीन धर्मपंथ कोणीं काढल्यास कांहीं काळानें तो पंथच मूळच्या हिंदु जातींत आणीक एका जातीची भर घालतो पण चातुर्वर्ण्य नष्ट होत नाहीं. कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत स्त्रियांच्या पडदपोशीचा क्वचित उल्लेख आढळला तरी मुसुलमानांच्या आगमनापासून (व त्यांच्या जुलुमापासून रक्षण करण्यासाठीं) ही चाल विशेष प्रचारांत आली. [झियाउद्दीन बराणी–तारीख ई फिरोझशाही; इब्न बतूता–ट्रॅव्हल्स; इलियट अँड डॉसन भा. ३, ४, ५; फिरिश्ता; बदौनी; थॉमस–क्रॉनिकल्स ऑफ पठाण किंग्ज ऑफ दिल्ली; अहमदशहा–कबीर; फर्कुहर–प्रीमीअर ऑफ हिंदुइझम; राव्हर्टी–तबकात-ई-नासीरी; तबकात-ई-अकबरी; राव्हर्टी–नोट्स ऑन अफगाणिस्थान; चंद–पृथ्वीराजरासा; अल्बेरुणी; स्मिथ; वैद्य.]

## मोंगलपूर्व इतर मुसुलमानी राज्यें

दिल्लीच्या सुलतानशाहींत व मोंगलांच्या आगमनाच्यापूर्वीं हिंदुस्थानांत जीं कांहीं मुसुलमानी राज्यें होतीं, त्यांत ठळक अशीं बंगाल, काश्मीर, माळवा, गुजराथ व बेदर (बहामनी व तिच्या शाखा) येथील राज्यें होतीं. त्यांची संक्षिप्त माहिती पुढें देतों.

**बंगाल**–मुहम्मद तुघ्लकाच्या जुलमाचा व अव्यवस्थेचा फायदा घेऊन फक्रुद्दीननें बंगाल्यांत स्वतंत्र राज्य स्थापन केलें (१३४०); तें राज्य पुढें अकबरानें दाऊदखान याला १५७६ त जिंकून पुन्हां आपल्या ताब्यांत आणलें. या दरम्यानच्या काळांतील हिंदु संस्कृतीचा इतिहास अद्यापि पूर्णपणें उजेडांत आला नाहीं. मात्र तेथील निरनिराळ्या मुसुलमानी राजांच्या कारकीर्दी त्यांच्या नेहमींच्या रिवाजाप्रमाणें रक्तपात, बंडाळी व लूट वगैरे गोष्टींनीं भरलेल्या आढळतात. बंगालच्या या सर्व मुसुलमानी राजांत अल्लाउद्दीन हुसेन शहा (१४९३–१५१९) हा चांगला राजा होऊन गेला. त्यानें २४ वर्षें राज्य करून प्रजेचा दुवा घेतला व राज्याची सुधारणा केली. त्याच्या १८ मुलांपैकी नसरत शहा मुसुलमानी राजांची

नेहमींची रीत अंमलांत न आणतां, म्हणजे आपल्या भावांनां ठार न मारतां, त्यांनां उत्तम प्रकारें वागवून बावरचा स्नेह संपादन केला; मात्र म्हातारपणीं हा जुलमी बनला होता. या राजांनीं मुसुलमानी शिल्प बंगाल्यांत पसरविलें. त्यांची राजधानी जी गौर, तेथें २९।३० चौ. मैलभर तत्कालीन जुने अवशेष अजून आढळतात. त्यांत सोनेरी मोठी मशीद, कदम रसूल, अदीना मशीद इ. इमारती प्रेक्षणीय आहेत. अदीन मशीदींत तर जवळ जवळ ४०० घुमट असून, तिचें काम फार सुंदर आहे. याच काळांत प्रख्यात बंगाली रामायणकार कृत्तिवास होऊन गेला (१३४६); तुळशीदासाप्रमाणें त्याची कीर्ति तिकडे पसरलेली आहे. हुसेनशहा व मस्रतशहा यांनीं महाभारताचीं बंगाली भाषांतरें करविलीं होतीं; साधारणपणें बंगाली वाङ्मयास या राजांनीं थोडें बहुत उत्तेजन दिलें होतें.

**माळवा**—इलतुतमिशनें प्रथम माळव्यावर स्वारी केली; त्यानंतर अल्लाउद्दीनानें तो प्रांत ताब्यांत आणून आपला एक सुभेदार तेथें नेमला (१३१०). ही सुभेदारी तैमूरच्या स्वारीपर्यं चालल्यानंतर, त्या वेळच्या तेथील सुभेदारानें तत्कालीन गोंधळाचा फायदा घेऊन स्वतंत्रता धारण केली (१४०१). हा सुभेदार महंमद घोरकराचा वंशज असून त्यानें आपल्यास सुलतान शिहाबुद्दीन घोरी हेंच नांव धारण केलें. हें राज्य १९३१ पर्यंत टिकून पुढें गुजराथच्या राज्यांत समाविष्ट झालें व शेवटीं (१९६४) अकबरानें तें खालसा केलें. प्रथम या राज्याची राजधानी धार होती; ती दुसरा राजा होशंगशहा यानें बदलून मांडू (मांडवगड) येथें नेली व तेथें बऱ्याच सुंदर इमारती बांधल्या. त्याचा मुलगा महमूद हा दारूबाज व दुर्बल असल्यानें त्याला त्याचा प्रधान महमूद खिलजी यानें वीष चारून गादी उपटली (१४३६) व खिलजी घराण्याची स्थापना केली. हा सर्व माळवी मुसुलमानी राज्यांत चांगला होऊन गेला याच्या शेजारच्या (गुजराथ, चितोड, बहामनी इ.) राजांशीं नेहमीं लढाया सरू असत. यानें हिंदूंस फारसा त्रास दिला नाहीं. चितोडच्या कुंभ राण्यानें याचा पराभव करून त्याचें स्मारक म्हणून चितोड येथें एक कीर्तिस्तंभ उभारला होता (१४४९). याच्या नंतरचा राजा घियासुद्दीन याला ८० व्या वर्षी त्याचा मुलगा नासीर यानें वीष चारलें. मुसुलमानी राजांत पितृहत्या करणाऱ्या राजांचीं उदाहरणें अनेक आहेत अशे स्मिथ म्हणतो (ऑ. हि. २६७). नासीर हा निव्वळ पशु होता. त्याचा मुलगा दूसरा महमूद, याला गुजराथच्या बहादूरशहानें पकडून फांशीं दिलें व राज्य खालसा केलें (१९३१). मांडूचा किल्ला फार मोठा असून त्याच्या तटाची लांबी १३ कोस आहे. आंत उत्तम, उत्तम परंतु पडके असे पुष्कळ राजवाडे, तलाव, देवळें मशीदि, थडगीं वगैरे इमारती आहेत. त्यांत जामी मशीद, हिंदोलां महाल, जहाज महाल, होशंगचें थडगें, बाजबहादूर व रूपमतीचे महाल हे विशेष पहाण्यासारखे आहेत. जहांगीर बादशहा हा मांडवगड येथें (१६१७ त) असतांना यांपैकीं बऱ्याच इमारती उभ्या होत्या. त्यानें त्याचें वर्णन आपल्या आठवणींत दिलें असून त्यांच्या डागडुजीला ३ लाखांपर्यंत खर्च केला होता

**गुजराथ**—गुजराथच्या सुपीकपणामुळें व परदेशाशीं चालणाऱ्या व्यापारामुळें, या प्रांतावर हिंदुस्थानांतील निरनिराळ्या सत्ताधाऱ्यांचा नेहमीं डोळा असे. महमूद गिझनीकराला तेथें आपली सत्ता स्थापता आली नाहीं, पण त्यानें अगणित लूट मात्र नेली. अल्लाउद्दीनानें अखेर (१२९७) हा प्रांत खालसा करून तेथें आपला सुभेदार नेमला दिल्लीच्या सुलतानशाहीच्या डळमळीत डोलाऱ्याची संधी साधून झाफरखान या शेवटच्या सुभेदारानें स्वातंत्र्य धारण करून (१४०१) आपल्या मुलास राजा केलें. पण ६ वर्षांनीं झाफरनें आपल्या मुलाला वीष देऊन त्याचा खून केला व गादी बळकावली. पुढें त्याचा नातु अहमदशहा यानें वीष चारून बापाचा सूड घेतला (१४२१). यानें ३० वर्षें राज्य करून आपलें राज्य वाढविलें व अहमदाबाद शहर स्थापलें. यानें खानदेश माळवा, राजपुताना वगैरे शेजारच्या राजांशीं अनेक लढाया मारल्या. राज्यव्यवस्था चांगली ठेविली, पण हिंदूंनां छळण्यांत व त्यांचीं देवळें पाडण्यांत मात्र तो कोणत्याहि मुसुलमान राजास हार गेला नाहीं. याचा नातु महमूद बेगडा यानें १९११ पर्यंत भरभराटीनें ९२ वर्षें राज्य केलें. या घराण्यांत हाच प्रख्यात होऊन गेला, इतका कीं त्याच्या दंतकथा यूरोपमध्यें (प्रवाशांकडून) पसरल्या होत्या. त्यानें पोर्तुगीज लोकांनां हांकलून देण्यासाठीं बराच प्रयत्न केला व त्यासाठीं तुर्कस्थानच्या सुलतानाची मदत घेऊन, यूरोपियन राजकारणांत हात घातला (१९०७). परंतु तें राजकारण साधलें नाहीं, व पोर्तुगीच कायम राहिले. त्यानें आपलें राज्य बरेंच वाढविलें व मुसुलमानी धर्माचा प्रसारहि

बराच केला. याचा नातु बहादूर यानेंच माळव्याचें राज्य जिंकलें, पण हुमायून बादशहानें याचा पराभव करून त्याला पळवून लाविलें (१५३५). इतक्यांत शेरशहाचें बंड उद्भवल्यानें हुमायून तिकडे गेला व बहादुरला स्वस्थता मिळाली. वास्तविक उभयतांत नेहमींचें वैर असतांहि मोंगलांमुळें बहादूरनें वसई बंदर देऊन पोर्तुगीजांनां आपले मित्र बनविलें. परंतु पुढें दीव बंदराच्या बाबतींत पोर्तुगीझ गव्हर्नर व बहादूर यांच्यांत वाटाघाटी चालू असतां बहादूरला पोर्तुगीजांनीं समुद्रांत ढकलून ठार मारलें (१५३७). यानंतर अकबरानें हें राज्य खालसा करीपर्यंत (१५७२) राज्यांत सर्वत्र अंदाधुंदी होती. गुजराथ देश इमारतींतील कुसरीच्या कामाबद्दल विशेषत: दगडी जाळ्या व लांकडी कोरीव कामाबद्दल पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. मुसुलमान राजांनीं प्राचीन जैन व हिंदू शिल्पाला उत्तेजन देऊन, अहमदाबाद, खंबायत वगैरे ठिकाणीं बऱ्याचशा सुंदर इमारती बांधल्या. अहमदाबाद हें शहर जगांतील अत्युत्तम शहरांपैकीं एक आहे असें तत्कालीन प्रवासी व आजचे यूरोपिअन प्रवासीहि म्हणतात. अद्यापीहि हें शहर व्यापारासाठीं व कोट्याधीश व्यापाऱ्यांसाठीं प्रसिद्ध असून रेशीम, कापूस व जर या तीन धाग्यांवर त्याचें भाग्य अवलंबून आहे असें म्हणतात. राजधानीच्या वेळीं त्याची लोकसंख्या ९ लाख होती व आज २ लाख आहे.

**काश्मीर**-येथील शेवटच्या हिंदूराजाच्या पदरीं असलेल्या शहा मीर मिर्झा नांवाच्या सरदारानें विश्वासघात करून गादी बळकाविली. (१३३४). तैमूरच्या वेळीं मिर्झाचा ६ वा वंशज शिकंदर हा होता. डोंगराळ प्रदेशामुळें तैमूर काश्मीरांत गेला नाहीं (१३९८). ह्यानें हिंदूंवर अतीशय जुलुम करून त्यांनां बाटविलें व त्यांचीं देवळें पाडलीं. त्यामुळें महमूद गिझनीकरासारखें त्याला मूर्तीभंजक असें नांव मिळालें. त्यानें काश्मिरी ब्राह्मणांनां बाटविण्यासाठीं अमानुष अत्याचार केले, पण त्यांनीं आपले प्राण देऊन धर्माचें रक्षण केलें, या वंशांतील आठवा राजा झैनुल आबिदीन हा मात्र शांत व परधर्मसहिष्णु होता. त्यानें परागंदा झालेल्या ब्राह्मणांनां बोलावून आणलें, देवळें बांधविलीं, जिझिया नाहींसा केला, गोवधास बंदी केली, चित्रकला व वाद्य वगैरे ललितकलांस उत्तेजन दिलें. वाङ्मयास मदत देऊन संस्कृत व आरबींत नूतन ग्रंथरचना करविली. सारांश, तो बराच चांगल्या वर्तनाचा होऊन गेला. याच्या नंतरचे राजे दुर्बल झाले. पुढें हुमायूनचा सुभेदार मिर्झा हैदर यानें ११ वर्षें (१५४१-५२) पर्यंत राज्य केलें. त्याच्या मागून चकवंशानें राज्य केलें व शेवटी अकबरानें १५६० त काश्मीर खालसा केलें.

**बहामनी राजे**-महम्मद तुघ्लकाच्या जुलमी व अराजक व्यवस्थेमुळें त्याचा दक्षिणेचा सुभेदार झफरखान यानें दौलताबाद येथें स्वतंत्र राज्य स्थापून स्वत:स अल्लाउद्दीन बहामनी हें नांव धारण केलें (१३४७). हा पूर्वी गंगू नांवाच्या ब्राह्मणाचा गुलाम होता, त्याच्या उपकारास्तव त्यानें बहामनी ही पदवी स्वत:च्या वंशास लाविली. याच्या घराण्यानें १५२६ पर्यंत राज्य केलें; त्याची राजधानी कुलबुर्गा (गुलबुर्गा) ही होती. त्यानें आपलें राज्य पश्चिमेस आरबी समुद्र (दाभोळ तें गोवें), पूर्वेस, भोनगीर (निजामराज्य), उत्तरेस पैनगंगा व दक्षिणेस कृष्णा या दरम्यान वाढविलें. याचा मुलगा मुहम्मद पहिला हा फार क्रूर व रक्तपिपासू होता. त्यानें हिंदूंवर अत्यंत जुलूम करून अनेकांची कत्तल केली. विजयानगरचे राजे व वरंगळचे राजे यांच्यांशीं यानें लढाया केल्या. यापुढेंहि या दोन्ही हिंदूमुसुलमान राज्यांत अनेकदां युद्धें झालीं; परंतु बहामनी राजांनां विजयानगरकरांचा समूळ नाश करतां आला नाहीं. मुहम्मदच्या जुलमामुळें कर्नाटकची बरीचशी वसति उठून गेली. त्याचा पुतण्या फिरोज, याच्या वेळीं महाराष्ट्रांत प्रसिद्ध १२ वर्षांचा दुर्गादेवीचा दुष्काळ पडला (१३९६). तो इतका कडक होता कीं, तीस वर्षांनीं महाराष्ट्राला पुन्हां पूर्वीची स्थिति प्राप्त झाली. फिरोझ हा फार धर्मांध असून हिंदूंचा द्वेष्टा होता. खेरीज दारूबाज असून त्याचा जनानखाना फार मोठा होता. इमारतीचा शोकी असल्यानें त्यानें कुलबुर्ग्यास एक मशीद बांधली. ती सुंदर असून कार्डोव्हा (स्पेन) येथील मशीदीच्या धर्तीवर बांधलेली आहे. विजयानगरकरांनीं त्याचा पानगळ येथें सपाटून पराभव केल्यानें त्या दहशतीनें त्यानें पुन्हां हत्यार उचललें नाहीं. त्याचा भाऊ अहमद यानें त्याचा खून करून गादी बळकावली. बहामनीवंशांत असे खुनी प्रकार पुष्कळ झाले आहेत त्यामुळें प्रजेच्या तें अंगवळणी पडलें होतें. अहमद हा पूर्वीच्या सर्व सुलतानांपेक्षां क्रूर व हिंदूंवर जुलूम करणारा होता. त्यानें वरंगळच्या राजास मांडलिक करून गुजराथ व माळव्याच्या सुलतानांशीं लढाया मारल्या. यानें कुलबुर्गा बदलून बिदर (अहमदाबाद ऊर्फ मुहम्मदाबाद) ही राजधानी केली. मेडोज टेलर म्हणतो कीं, अनेक दृष्टीनें हें शहर सर्व दक्षिणमध्यें राजधानी करण्यास योग्य असेंच

आहे. याच्या वेळींहि (१६२०) एक मोठा दुष्काळ पडला होता. याचा मुलगा अल्लाउद्दीन दुसरा हा फार दारूबाज व विषयी होता, त्यामुळें विजयानगरकरांनीं त्याचा बरात्र प्रांत घेतला. याच्याच वेळीं त्याच्या राज्यांत दक्षिणी (दक्षिणेंतील बाटलेले व हबसाणांतील हबशी) आणि परदेशी (अरब, तुर्क, फारशी, मोंगल) असे दोन तट पडले. पहिले सुनी व दुसरे शिया असल्यानें त्यांच्यांत नेहमीं भांडणें होत. अल्लाउद्दीनचा मुलगा हुमायून हा तर मुहम्मद तुघ्लकाचा अवतार होता; विद्वान, वेडसर, निर्दय, क्रूर इत्यादि बाबतींत हा त्याची प्रतिमाच होता. त्याला त्यावेळींच झालीम (अत्यंत जुलमी) हें नांव लोकांनीं दिलें होतें. त्याच्या भेटीस जावयाचें म्हणजे बायकापोरांचा शेवटचा निरोप घेऊन जात असत अशी दंतकथा आहे. त्यामुळें शेवटीं त्याचा खून झाला. त्याचा मुलगा तिसरा मुहम्मद याचा दिवाण ख्वाजा महमूद गावान हा होता. गावान हा चांगला सेनापति व मुलकी अधिकारी होता. त्यानें शहाचें राज्य वाढविलें, परंतु तोहि धर्मांध आणि हिंदूंचा अत्यंत द्वेष्टा व रक्तपिपासू होता. मुहम्मदशहानें कांचीवर स्वारी करून व तेथील थोडीशीं देवळें पाडून कांहीं ब्राह्मणांचा स्वहस्तें खून केला (१४८१). बहामनी वंशांत ब्राह्मणांचा खून करणारा हाच पहिला शहा झाला. त्यामुळेंच पुढें त्याचें राज्य नामशेष झालें असें तत्कालीन दक्षिणी मुसुलमान लोक म्हणूं लागले. गावान हा परदेशी असल्यानें दक्षिण्यांनीं कट करून शहाकडून त्याला ठार मारलें; गावान हा विद्वान, शूर व दानधर्म करणारा होता, पण हिंदूंचा अत्यंत द्वेष्टा होता. त्यानंतर थोडयाच दिवसांनीं शहाहि दुर्व्यसनांच्या अतिरेकानें मेला (१४८२). त्याच्या मागून त्याचा मुलगा महमूद हा राजा झाला; परंतु हा अत्यंत व्यभिचारी व दुर्बल होता. त्याच्यानंतरचे चार राजे तर नांवाचेच राजे होते. खरी सत्ता त्यांचा दिवाण कासीम बरीद व त्याचा मुलगा अमीर यांच्या हातीं होती. याच वेळीं बहामनी राज्य मोडलें जाऊन त्याच्या पांच पातशाह्या झाल्या व अमीरनें बिदर येथें बरीदशाही स्थापन केली (१५२६). या बहामनी वंशांत १४ राजे झाले; त्यांत चौघांचा खून झाला, दोघांचे डोळे निघाले व फक्त एका ( महम्मद दुसरा ) शिवाय एकूण एक राजे रक्तपिपासू, धर्मांध, जुलमी आणि हिंदुद्वेष्टे होते. हुमायून तर राक्षस होता. बहुतेक राजे व्यभिचारी, दारूबाज असून, ज्याच्याबद्दल थोडेंतरी चांगलें लिहितां येईल असा एकहि राजा त्यांच्यांत झाला नाहीं; सारांश या राजवंशापासून हिंदुस्थानचा कांहींच फायदा झाला नाहीं, उलट देशांत जाळपोळ, कत्तली व अमानुष जुलूम मात्र झाला. या राज्यांत निकितन नांवाचा एक रशियन प्रवासी आला होता ( १४७०–७४ ) त्यानें लिहिलें आहे कीं, प्रजा अत्यंत गरीब व निःसत्त्व झालेली असून राजा व सरदार अत्यंत श्रीमान आणि चैनी बनलेले आहेत; सैन्य ३ लाख आहे पण ते बेशिस्त आहे. किल्ले बांधण्यांत मात्र या राजांनीं नांव कमावलें. नरनाळा, गाविलगड, औसा, धारूर, परिंडा, सोलापूर इत्यादि किल्ले बळकटीच्या दृष्टीनें तत्कालीन यूरोपिअन किल्ल्यांपेक्षांहि श्रेष्ठ दर्जाचें आहेत असें टेलरचें म्हणणें आहे. या वंशानें दख्खनमध्यें हिंदूंवर अत्यंत जुलूम करून व भयंकर कत्तली करून त्यांना बाटविण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत त्यांनां फारसें यश आलें नाहीं. अद्यापि सुद्धां विजापूर जिल्ह्यांत व निजामाच्या मुसुलमानी राज्यांत (या राज्यांतच साधारणपणें बहामनी राज्य पसरलें होतें.) मुसुलमानांची लोकसंख्या शेकडा अकरा टक्केच आहे. हिंदू संस्कृतीवर मात्र या वेळीं मुसुलमान संस्कृतीचा बराचसा परिणाम झाला.

**वऱ्हाडची इमादशाही**—महमूद बहामनीच्या दुर्बलतेमुळें ठिकठिकाणचे सुभेदार स्वतंत्र होऊन बहामनी राज्याचीं पांच स्वतंत्र राज्यें बनलीं; त्यापैकीं प्रथम वऱ्हाडचें राज्य (सुभा) स्वतंत्र झालें ( १४८४ ). गाविलगडचा सुभेदार फत्तेउल्ला (हा मूळचा विजयनगरचा ब्राह्मण होता) यानें इमादउल्मुल्क ही पदवी घेऊन आपलें घराणें स्थापन केलें. त्याच्या राज्यांत सांप्रतचें सर्व वऱ्हाड (वैनगंगा व पैनगंगा दुआब) येत होतें. हा वंश चार पिढया टिकला व शेवटीं येथील राज्य अहमदनगरच्या निजामशाहींत समाविष्ट झालें १५७४). या राज्यांत सांगण्यासारखें महत्त्वाचें घडलें नाहीं. हा प्रांत १५९६ त अकबरपुत्र मुराद याच्या ताब्यांत आला. मोंगली सुभेदार एलिचपूर येथें रहात असे.

**बिदरची बरीदशाही**—हें राज्य लहानसें होतें; बिदरच्या आसपासचा व इतर चार शाह्यांतून बचावलेला फारच थोडा प्रांत या राज्यांत मोडत होता. कासीम बरीद हा मूळचा तुर्क असून महमूद बहामनीचा प्रधान होता. त्यानें जरी स्वतंत्रता धारण केली तर त्याच्या अमीर नांवाच्या मुलानें १५२६ नंतर शहा ही पदवी घेतली. हें राज्य १६०९ पर्यंत टिकून, त्यानंतर आदिलशाहींत समाविष्ट झालें. उत्तम इमारतींखेरीज या राज्यांत लक्षांत घेण्याजोग्या गोष्टी घडल्या नाहींत.

**गोवळकोंड्याची कुत्बशाही**—गोवळकोंडयाचें राज्य १५१८ त स्वतंत्र झालें. हें राज्य म्हणजे पूर्वीच्या वरंगळच्या काकतीय घराण्याचेंच राज्य होय. गोदावरी—कृष्णा दुआब व बंगालचा उपसागर आणि बिदर यांच्या दरम्यान हें राज्य पसरलें. जमीन सुपीक असून प्राचीन हिंदू राजांनीं अनेक कालवे काढून ती जास्त सुपीक केली होती. या घराण्याचा संस्थापक सुलतान कुली कुत्बशहा हा मूळचा तुर्क असून तेलिंगणचा सुभेदार होता. त्यानें १५४३ पर्यंत बऱ्या प्रकारें राज्य केलें. त्याचा मुलगा जमशीद यानें त्याचा खून केला. जमशीदचा मुलगा इब्राहीम हा तालीकोटच्या लढाईत होता; त्याच्यावेळीं हिंदूंना मोठमोठ्या अधिकाराच्या जागा मिळाल्या व त्यांना फारसा त्रास झाला नाहीं. त्याचा नातु अब्दुल्ला हुसेन व त्याचा जांवई अबूहसन हे शिवाजी छत्रपति यांना खंडणी भरीत असत. औरंगझेबानें १६८७ त अबूहसनला कैद करून हें राज्य खालसा केलें. या राज्याची राजधानी (वरंगळ बदलून) गोवळकोंडें होती, पुढें ती बदलून भागानगर (हैद्राबाद) झाली. गोवळकोंड्यास या राजवंशाचीं थडगीं व इतर इमारती आहेत.

**अहमदनगरची निजामशाही**—विजयानगरचा तिमाप्पा बहीरंव याचा पुत्र बाटल्यावर महमूद बहामनीचा एक मोठा सरदार बनला. त्यानें निजामुलमुल्क हें नांव धारण करून दक्षिणीतटाचा पुढाकार घेतला. याचा मुलगा मलीक अहमद या जुन्नर प्रांताचा सुभेदार होता, त्यानें १४९० त स्वतंत्र राज्य स्थापलें व लष्करीदृष्टया उपयोगी असें अहमदनगर शहर स्थापून तेथें राजधानी केली आणि स्वतःस निझामशहा पदवी घेतली. त्यानें अनेक वर्षे खटपट करून १४९९ त दौलताबाद (देवगिरि) किल्ला हस्तगत केला व राज्य वाढविलें. त्याचा पुत्र बुऱ्हाण यानें ४५ वर्षे राज्य करून व शेजारच्या राजांशीं लढाया करून राज्य बळकट केलें. त्यानें एकदां आदिलशहा विरुद्ध विजयानगरकरांस मदत केली होती; परंतु त्याचा मुलगा हुसेन हा तालीकोटच्या लढाईत मुसुलमानांच्या बाजूनें होता. या घराण्यानें १५७४ त वऱ्हाडचें राज्य जिंकलें. प्रसिद्ध चांदबिबी ही या हुसेनची मुलगी व अली आदिलशहाची बायको होय. तिनें अकबराच्या विरुद्ध अहमदनगरचें मोठ्या शौर्यानें रक्षण केलें (१५९६); परंतु पुढें तिच्या एका सरदारानें तिचा खून केला व अहमदनगर पडलें (१६००). तत्रापि पुढें बराच काळ मलिकअंबर आणि शहाजी राजे यांनीं ती तगविली. अखेर आदिलशहाच्या विश्वासघातानें शहाजीचा नाइलाज होऊन निझामशाहीचा अंत झाला (१६३७). तत्पूर्वी कित्येक वर्षे शहाजी हाच निजामशाहीचा खरा मालक होता.

**विजापूरची आदिलशाही**—पांच शाह्यांत विजापूरची आदिलशाही विशेष प्रसिद्धीस आली. हिचा मूळ पुरुष युसूफ आदिल खान हा गावानचा एक जॉर्जियन जातीचा गुलाम होता. त्याच्या आश्रयानें हा विजापूरचा सुभेदार झाला व पुढें (१४८९) त्यानें स्वतंत्र राज्य स्थापिलें. या राज्याचा इतिहास फिरिष्ता यानें बराच लिहिला आहे, पण तो बराच एकतर्फी आहे. युसूफचें घराणें शियापंथी होतें व शेजारचीं मुसुलमान राज्यें सुनीपंथी होतीं म्हणून त्या दोघांत नेहमीं लढाया चालत. याच्यावेळीं गोंवें हें बंदर व्यापारासाठीं फार प्रख्यातीस आलें होतें. परंतु तेथील आदिलशाही आरमाराची दुर्बलता पाहून अल्बुकेर्क यानें तें काबीज करून मुसुलमान लोकांची भयंकर कत्तल केली (१५१०). तेव्हांपासून गोंवें पोर्तुगीजांच्या ताब्यांत आहे. युसूफनें व त्याच्या बऱ्याच वंशजांनीं मराठ्यांच्या मुलींशीं लग्नें केलीं. या राजवटींत अनेक हिंदूंनां मोठमोठ्या जागा मिळत. राज्यकारभारांत (निजामशाही व इमादशाहीप्रमाणेंच) मराठी भाषेला प्रमुख स्थान होतें. युसूफ हा चांगला राजा होऊन गेला. त्यानें विजापूरचा किल्ला बांधला. त्याचा मुलगा इस्माईल हा त्याच्यासारखाच बरा होऊन गेला. त्याच्या वेळीं इराणचा वकील विजापुरास आला होता. दोघांनींहि शेजारच्या राजांशीं लढून आपलें राज्य वाढविलें. त्याचा मुलगा इब्राहीम पहिला यानें सुन्नीपंथ स्वीकारून दक्षिण्यांची बाजू घेतली. या राज्यांतहि दक्षिणी व परदेशी असे तट होते. यानें एकदां (१५३५) विजयानगरकरास मदत केली होती. त्यामुळें याच्यावर बिदर, अहमदनगर व गोवळकोंडा येथील शहांनीं एकत्र मिळून स्वारी केली; परंतु तींत त्यांचा पराभव झाला. मरणाच्या आधीं कांहीं दिवस हा दारूबाज व व्यभिचारी बनला होता. त्याचा मुलगा अली यानें पुन्हां शियापंथ पसरविला. यानें विजयानगरकराच्या मदतीनें निजामशहावर स्वारी केली (१५५८). विजयानगरकरांचा मोड कोणाहि एकट्या मुसुलमान राजाकडून होणें शक्य नव्हतें, म्हणून पुढें चारी मुसुलमानशहा एक होऊन त्यांनीं तालिकोट येथें रामराजाचा पराभव

केला (१५६५). त्यासाठीं निजामशहानें चांदबिबी ही आपली मुलगी अली याला दिली होती. तालीकोटजवळ रक्कसगी आणि तंगडगी (राक्षसतागडी) या दोन गांवांच्या दरम्यान ही लढाई झाली हिंदूंनां फसवून मुसलमानांनीं कृष्णा ओलांडली, निजामशहाचा तोफखाना उत्तम असल्यानें आणि रामराजाच्या सैन्यांतील सर्व मुसुलमान सरदार फितूर झाल्यानें, प्रथम जरी रामराजास जय मिळाला होता व अदिलशहा आणि कुत्बशहा यांनां त्यानें पिटाळून लाविलें होतें तरी अखेरीस फितूरीनें त्याच्या सैन्याची बाजू लंगडी पडली. त्यांत एक हत्ती घाबरून रामाराजाच्या पालखीवर धावून आल्यानें भोयांनीं पालखी टाकून दिली. राजा दिसेनासा झाल्याबरोबर नेहमींच्या पद्धतीप्रमाणें हिंदु सैन्यानें पाय मागें काढला. वृद्ध रामराजा कैद झाला व निजामशहानें त्याचा निर्दयपणें स्वहस्तें खून केला (२३ जानेवारी १५६५); याप्रमाणें दोनशें वर्षें अस्तित्वांत असलेलें दक्षिणेंतील एक हिंदु साम्राज्य नष्ट झालें. पुन्हां दोनशें वर्षेपर्यंत असलें साम्राज्य स्थापण्याचा प्रयत्न फारसा कोणीं केला नाहीं. या साम्राज्याचा मुलूख आदिलशहा आणि कुत्बशहा यांनीं वांटून घेतला. पुढें निजामशहा व कुत्बशहा यांनीं एक होऊन पोर्तुगीजांनां हिंदुस्थानांतून हांकलून देण्याचा जोराचा प्रयत्न केला, पण तो साध्य झाला नाहीं (१५७०). अलीच्यानंतर इब्राहीम दुसरा हा गादीवर आला. हा सर्व आदिलशहांत चांगला राजा होऊन गेला; त्यानें उत्तम प्रकारें राज्य केल्यानें तो लोकांचा आवडता होता. त्यानें जमीनीची तरमबंदी जवळ जवळ तोडरमल्लच्या पद्धतीवर केली, उत्तम व सुंदर इमारती बांधल्या, हिंदुधर्माबद्दल आदर बाळगला, हिंदूंनां (त्यांतहि ब्राह्मणांनां) मोठमोठे अधिकार दिले, पोर्तुगीजांनां खुला व्यापार करूं दिला, कोणत्याहि धर्माचा द्वेष केला नाहीं, उलट त्या त्या धर्मांच्या प्रसाराला सक्रिय मदत केली; या कारणांमुळें त्याचें राज्य भरभराटीस आलें होतें. त्याचा मुलगा मुहम्मद हा बापाच्या विरुद्ध वर्तनाचा होता. शहाजी राजे याच्याच वेळीं विजापुरास आले. शिवाजी छत्रपतींनीं याच्या व याचा मुलगा दुसरा अली व नातु शिकंदर याच्या वेळीं विजापूरच्या राज्यांत स्वाऱ्या करून अलीस व शिकंदरास तर खंडणी देण्यास भाग पाडलें. संभाजी छत्रपतींनेंहि शिकंदरापासून खंडणी घेऊन त्याला औरंगझेबाविरुद्ध अनेकदां मदत केली; पण अखेरीस विजापूरच्या दरबारांतील फाटाफुटीमुळें व औरंगझेबाच्या कारस्थानानें आदिलशाही नष्ट होऊन तें राज्य मोंगली राज्यांत सामील झालें (१६८६).

**खानदेशचे फारुकी राजे**—खानदेश हा प्रांत बहामनी राज्यांत मोडत नसे. तेथले राजे फारुकी नांवाच्या मुसुलमान वंशाचे होते. फिरोज तुघ्लकाच्या वेळीं हें राज्य स्वतंत्र बनलें (१३८८). या राजांच्या शेजारच्या राजांशीं पुष्कळ लढाया झाल्या. मध्यंतरीं गुजराथच्या सुलतानांचें हें राज्य मांडलिक होतें. बऱ्हाणपूर ही राजधानी असून, अशीरगडसारखा अत्यंत प्रसिद्ध किल्ला यांच्या ताब्यांत होता. अकबरानें १६०१ त हें राज्य खालसा केलें व त्याचा एक सुभा बनविला.

**कलाकौशल्य व वाङ्मय**—बऱ्हाणपूरच्या जुम्मा मशीदींतील दगडी जाळीचें काम फार उत्तम आहे. गोवळकोंडा व विजापूर येथील शिल्पकामांची पद्धत निरनिराळी असून उत्तर हिंदुस्थानी पद्धतीपेक्षांहि स्वतंत्र आहे. गोवळकोंडयास राजवाडे, मशिदी, तट वगैरे अनेक अवशेष आहेत. कुत्बशाही राजांचीं थडगीं शाबूत असून त्यांच्या घुमटांचा आकार एक विशिष्ट तऱ्हेचा आढळतो. आदिलशाही इमारती अत्यंत भव्य व भरभक्कम बांधणीच्या आणि सुंदर कलाकुसरीच्या आहेत. विजापूरचा तीन कोस लांबीचा तट ९ सुलतानांच्या कारकीर्दींत तयार झाला. यूसुफ, अली, दुसरा इब्राहीम व मुहम्मद या चार जणांनीं अनेक इमारती बांधल्या. जुम्मा मशीदींत पांच हजार लोक बसण्याची सोय असून, तिचा प्रमाणबद्धपणा व विशेषतः जिच्यापुढें नमाज पढावयाचा ती भिंतींतील सोनेरी काम केलेली कमान प्रेक्षणीय आहे. अलीनें बांधलेले बंधारे व गगनमहाल, इब्राहीमचा नाजूक नकशीचा इब्राहीम रोझा, महमूदचा बोल गुंबज (गोलघुमट) आणि इतरहि बऱ्याच इमारती पहाण्यासारख्या आहेत. घुमटाचा नंबर जगांतील असल्या प्रकारच्या घुमटांत दुसरा आहे. अहमदनगर व विजापूर येथें मोठमोठीं ग्रंथसंग्रहालयें होतीं. आदिलशहा, इब्राहीम दुसरा यानें मुहम्मद कासीम फिरिश्ता याचेकडून इतिहास लिहवून घेतला. या राजाला संगीतकलेचीहि गोडी होती व त्यानें आपल्या राजवाडयांत एक सरस्वतीचें देऊळहि बांधलें होतें. [ मिडोज टेलर—मॅनुअल ऑफ धि हिस्टरी ऑफ इंडिया; स्केच ऑफ धि सिटी ऑफ गोवा; फर्गसन—हिस्टरी ऑफ ईस्टर्न अँड इंडियन आर्किटेक्चर

कॉझीन-विजापूर अँड आदिलशाही डिनॅस्टी; किंग-हिस्टरी ऑफ धि बहामनी डिनॅस्टी; बुऱ्हाण-ई-माआ-सीर; हिस्टॉरिकल्यांडमार्क्स ऑफ धि डेक्कन; हकल्यूत सोसायटी-इंडिया इन धि फिफ्टीन्थ सेंचरी; राइट-कॅटलॉग ऑफ कॉइन्स; ग्रँट डफ व फिरिश्ता ].

## विजयानगरचें हिंदू साम्राज्य

या साम्राज्यानें दोनशें वर्षे (१३३६-१५६५) दक्षिण-विशेषत: कर्नाटक-देशांत राज्य करून व सतत शेजाऱ्च्या मुसुलमानी राज्यांशीं टक्कर देऊन हिंदु संस्कृति कायम ठेविली. उत्तरेकडून येणाऱ्या यावनी लोंढ्याला परतवून देण्याचें आश्चर्यजनक काम या साम्राज्यानें केल्यानें अनेक यूरोपीयन इतिहासलेखकहि या राज्याची वाखाणणी करितात. या राज्याचा इतिहास लिहिण्यास पुष्कळ ऐतिहासिक सामुग्री उपलब्ध आहे.

मुहम्मद तुघ्लकाच्या अखेरीस जी अराजकता माजली तिचा फायदा घेऊन द्वारसमुद्र येथील (अथवा वरंगळ येथील) होयसळ बल्लाळ राजांचा एक सरदार संगम, याच्या पांच पुत्रांनीं हें साम्राज्य स्थापन केलें. साधारण याच सुमारास हसन गंगू यानें बहामनी राज्य स्थापन केलें. त्यामुळें विजयानगर व बहामनी या राज्यांत त्यांच्या स्थापनेपासूनच भांडाभांडीस सुरवात झाली. या युद्धांत विजयानगर बहुधा नेहमीं विजयी होत असे. बहामनी राज्यानें अखेरपर्यंत विजयानगरचा नाश करविला नाहीं. याच बहामनीचीं पुढें पांच निरनिराळीं मुसुलमानी राज्यें झालीं; त्यांनीं जोराचा प्रयत्न करून व फितुरी माजवून अखेर हें हिंदु साम्राज्य नष्ट केलें. तरी पण तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील सर्वच प्रांत मुसलमानांना निर्वेध उपभोगतां आला नाहीं. अनेक लहान लहान हिंदु संस्थानिक व पाळेगार यांनीं आपल्या ताब्यांत तो १७ व्या शतकापर्यंत ठेवला. विजयानगरचा व पोर्तुगीजांचा संबंध आल्यानें विजयानगरचें परदेशांशीं दळणवळण सुरू झालें. या पांच भावांत हक्क अथवा हरिहर पहिला व बुक्क हे दोघे विशेष प्रख्यातीस आले. प्राचीन अनेगुंदीसमोर तुंगभद्रेच्या दक्षिण तीरीं १३३६ त यांनीं विजयानगर उर्फ विद्यानगर स्थापन केलें, त्याचें काम १३४३ पर्यंत चालू होतें. दहा वर्षांत या बंधूंनीं पूर्व-पश्चिम समुद्रांच्या दरम्यानचा सर्व प्रदेश काबीज केला. बुक्क राजानें १३७४ च्या सुमारास चीनच्या राजाकडे आपला वकील पाठविला होता. बहामनी राजांशीं लढा-या मारण्यांत त्याचा बहुतेक काळ गेला. तो १३७६ त वारला. त्याचा मुलगा हरिहर दुसरा हा मोठा शूर विद्वान व परधर्मसहिष्णु असा होता. यानेंच तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील सर्व हिंदुस्थान पादाक्रांत करून साम्राज्य स्थापिलें व स्वत:स सम्राट पदवी घेतली. शिव-विरूपाक्ष ही देवता त्याची आवडती होती. त्याच्यापुढें कोणाहि बहामनी राजाची डाळ शिजली नाहीं. तो वारल्यावर (१४०४) गादीवर आलेल्या पहिल्या देवरायानें फिरोझ बहामनीशीं पुष्कळ वेळ तोंड दिलें, तेव्हां त्यानें देवरायाशीं तह केला. देवरायानंतर विजयराजाच्या वेळीं (अजमासें १४१०) दक्षिण कर्नाटकांत सव्य व वाम जाती निर्माण झाल्या. सव्य (किंवा उजव्या हातच्या) जातींत ब्राह्मणापासून परियासारख्या अस्पृश्यांपर्यंत सर्व जातींचा समावेश होतो. वाम (किंवा डाव्या हातच्य) जातींत धंदेवाईक ब्राह्मणेतर जाती येतात. या जातींनीं बहुजनसमाजाच्या समजुतीविरुद्ध बंड केल्यानें त्या अलग झाल्या. वाम जातीच्या मनुष्याच्या हातचें अन्न सव्य जातींतील परियानें खाल्ल्यास तो बाटतो. दुसऱ्या देवरायाच्या कारकीर्दींत अहमद बहामनीनें असंख्य हिंदूंची कत्तल केली. निरपराधी बायका, मुलें, पुरुष ह्यांचे खून करून त्यांची संख्या जर एका दिवसांत २० हजार भरली, तर अहमद हा तीन दिवस मोठा समारंभ करी असा तो एक नरपशु होता (स्मिथ-ऑ. हि. ३०३)! त्यानेंच वरंगळचें हिंदु राज्य नाहींसें केलें (१४२५). देवरायानें अनेक मुसुलमान घोडेस्वारांचीं व धनुर्धरांचीं पथकें पदरीं ठेविलीं होतीं. त्याच्या कारकीर्दींत निकोलो कॉंटी हा इटालियन व अबदुल रझाक हा मुसुलमान प्रवासी हे त्याच्या साम्राज्यांत आले होते. देवरायापुढील त्याच्या वंशांतील राजे साधारणप्रतीचे होते, त्यामुळें १४८६ च्या सुमारास चंद्रगिरीचा गव्हर्नर नरसिंग सालुव यानें गादी बळकावली व राज्यांतील बंडाळी मोडून पुन्हां साम्राज्य बळकट केलें. त्याची राज्यव्यवस्था इतकी उत्तम होती कीं, तत्कालीन यूरोपियन लेखक विजयानगरच्या साम्राज्यास नरसिंगाचें साम्राज्य असाच शब्द योजीत. याच्याच कारकीर्दींत बहामनी राज्याचे तुकडे झाले; त्यांतील आदिलशाहीनें या वेळेपासूनच विजयानगरकरांशीं लढण्यांत पुढाकार घेतला. नरसिंगाचा मुलगा इम्मडि नरसिंग, याचा सेनापति तुळुव जातीचा नरस नायक यानें खून करून गादी बळकावली (१५०५). या वंशांतील तिसरा राजा कृष्णदेवराय हा अत्यंत विख्यात व उत्तम दर्जाचा राजा होऊन गेला.

१५०९-२९). त्यानें मुसुलमानांशीं अनेक लढाया करून त्यांचा पराभव केला व त्यांचे पुष्कळ किल्ले व रायचूर प्रांत हस्तगत केला (१५२०). त्यामुळें त्याचा दरारा शेजारच्या मुसुलमान राजांवर फार बसला. नुनीझ नांवाच्या पोर्तुगीज बखरनविसानें त्यावेळची माहिती दिली आहे. त्यानें एकदां तर विजापूर ही राजधानी काबीज केली मात्र मुसुलमानांसारखे अत्याचार केले नाहींत. तो शूर, उदार, दयाळु, न्यायी व उत्तम राजकारणी पुरुष होता. बहामनी वंशाची जुनी राजधानी कुलबुर्गा हीहि त्यानें घेतली होती. तो १५२९ त गुडघी (ऊरुसंधी ?) च्या रोगानें वारला. विजयानगरचे बहुतेक राजे याच रोगानें मरत असें म्हणतात. कृष्णराय हा राजे लोकांस ललामभूत असणाऱ्या अनेक गुणांनीं संपन्न असा होता असें त्याला प्रत्यक्ष पाहिलेल्या पाएज नामक एका परदेशी लेखकानें लिहून ठवलें आहे. दक्षिण हिंदुस्थानांत या शतकांत होऊन गेलेल्या हिंदु राजांत व त्या सुमारच्या चार पांच शतकांत होऊन गेलेल्या सर्व मुसुलमानी राजांत कृष्णराजाचें स्थान पहिल्या प्रतीचें आहे असें स्मिथ सुद्धां म्हणतो. त्याचें साम्राज्य म्हणजे तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील सर्व हिंदुस्थान होय. त्याचा पुत्र अच्युत याच्या वेळीं मुसुलमानांचीं व त्याचीं अनेक युद्धें झालीं. त्याच्या मागें (१५४२) त्याचा पुतण्या सदाशिवराय गादीवर आला, पण खरी सत्ता त्याचा प्रधान तिम्मराज व त्याच्यानंतर त्याचा मुलगा रामराज स लुव यांच्या हातीं होती. रामराजाचा राजघराण्याशीं शरीरसंबंधहि झाला होता. रामराजानें शेजारच्या मुसुलमान राज्यांतील एकदोघांस हाताशीं धेऊन उरलेल्या राज्यांवर स्वाऱ्या करून त्यांनां हतप्रभ करण्याची हातोटी उचलली होती (१५४३-५८). पुढें हें धोरण समजल्यावर सर्व मुसुलमान राजांनीं एक होऊन विजयानगरवर मोहीम करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें आदिलशहा, निजामशहा, कुत्बशहा व बरीदशहा हे १५६४ त एक झाले व त्यांनीं १५६५ चे जानेवारींत तालीकोट येथें स्वारी केली. सारें विजयानगरचें राज्य यावेळीं निर्धास्त होतें. दोन शतकें मुसुलमानांचा पाय विजयानगरांत शिरला नव्हता. त्यामुळें राज्याच्या बळकटीबद्दल रामराजास खात्री वाटत होती पण सेनापतीस अवश्य लागणारी सावधानता त्यानें न ठेवल्यानें त्याच्या पदरचे सारे मुसुलमानी व थोडे बहुत हिंदु सैन्यहि फितुर झालें होतें. शिवाय निजामशहाचा तोफखाना६०० उत्कृष्ट तोफांचा होता. प्रथम हिंदूंचाच जय झाला होता, पण मागें सांगितलेल्या कारणांनीं त्यांचा शेवटीं पराजय झाला व निजामशहानें रामराजाचा खून केला. जवळ जवळ १ लाख हिंदूंची कत्तल मुसुलमानांनीं करून रानटीपणानें विजयानगर जाळूनपोळून व लुटून फस्त केलें; जगांत इतका अत्याचार कोणाहि जुलमी राजांनीं आतांपर्यंत केला नाहीं असें स्मिथ म्हणतो (ऑ. हि. ३०७). रामराजाचा भाऊ तिरुमल यानें लढाईनंतर पेनुगोंडा येथें एक स्वतंत्र राज्य स्थापिलें (१५७०); त्याचा मुलगा पहिला वेंकट हा या वंशांत मोठा विख्यात राजा झाला (१५८५). त्यानें चंद्रगिरी ही राजधानी केली व तेलगु आणि वैष्णव विद्वानांनां आणि ग्रंथकारांनां आश्रय दिला. याचा वंश पुढें दुर्बळ झाला. त्यापैकीं रंगराय दुसरा यानें मद्रास येथें इंग्रजांनां वखार घालण्यास जागा दिली होती. तिम्मराजाचा एक मुलगा रामराजा यानें श्रीरंगपट्टण येथें राज्य स्थापिलें. रामराजाचा वंश म्हणजे सांप्रतचा अनेगुंदीचा राजा होय. मदुरा येथील नायक राजे (विशेषतः तिरुमल नायक) हे विजयानगरच्या ध्वंसानंतर पुढें आले. या राजांनीं आश्चर्यकारक शिल्पकामें बांधलेलीं आहेत. विजयानगर शहर अत्यंत धनाढ्य होतें. दुसऱ्या बुक्कानें तुंगभद्रेस पंधरा मैलांचा प्रचंड बंधारा बांधून एक मोठा तलाव बांधला होता व त्यांतलें पाणी विजयानगरांत पिण्यासाठीं आणलें होतें. फिरिस्ता म्हणतो कीं १३८० पर्यंत विजयानगरकर हे सर्वच बाजूंनीं बहामनी राजांपेक्षां श्रेष्ठ होते. निकोलो काँटी (१४२०) म्हणतो कीं, विजयानगर अत्यंत सुरक्षित शहर असून त्याचा तट ६० मैल लांबीचा आहे व तेथला राजा (देवराव दुसरा) सर्व हिंदुस्थानांत बलाढ्य आहे. हिरातचा अब्दुर रझाक सांगतो कीं (१४४३), १० चौ. यार्ड विस्तारानें व ९ यार्ड उंचीचें व सर्व ओतीव पितळेचें असें एक सुंदर देऊळ मी पाहिलें. त्याखेरीज बेलूर व इतर ठिकाणीं भव्य व उत्तम उत्तम देवळें मला दिसलीं. विजयानगरसारखें सुंदर व मजबूत शहर पृथ्वीवर आपण कोठेंहि पाहिलें नाहीं, त्याला एकांत एक असे सात तट होते, चार कोस लांबीचा बालेकिल्ला होता, बाजारांच्या मोठ्या चार पेठा होत्या, त्याखेरीज कारागिरांच्या पेठा स्वतंत्र होत्या, भर बाजारांत उघड्यावर जवाहीर व रत्नें विकत मिळत, गांवांतून व राजवाड्याच्या आसपास लहान लहान पाण्याचे पाट व पुष्करणा होत्या. प्रत्येक माणसाच्या अंगावर दागिने झळकत होते. कृष्णरायाच्या वेळीं या साम्राज्याचें वैभव कळसास पोंचलें होतें. त्या वेळीं (१५२२) आलेला फिरंगी डोमिंगो पाएज हा फिरस्ता म्हणतो कीं,

विजयानगर हें रोमशहराइतकें मोठें आहे, त्यांत एक लाख घरें आहेत, लोकसंख्या ९ ते १० लाख असावी. अनेक उपवनें, पुष्करण्या, पाट आहेत. सर्व जगांत हें शहर सर्व वस्तूंनीं समृद्ध असें आहे, राजवाड्याच्या एका भागांतच ३४ रस्ते आहेत व एक हस्तिदंती महाल आहे, त्या महालांत भिंती, कडीपाट, खांब वगैरे सर्व ठिकाणीं नकशीदार हस्तिदंत वापरलेलें आहे, राजवाड्यांतील राजाच्या वापरण्याचीं सर्व भांडीं सोन्याचीं आहेत, दरबार फार भपक्याचा आहे; राजाची रोजनिशी ठेवणारे लेखक असतात, राजाचे अलंकार अत्यंत मूल्यवान आहेत. कृष्णरायाच्या खड्या सैन्यांत ७ लक्ष पायदळ, ३२ हजार घोडदळ व ५५० गजदळ होतें, त्याखेरीज जरूरीच्या वेळीं १ लक्ष नवीन सैन्य त्याला जमवितां येई. पण सैन्यांत कवायती शिस्त विशेष नसे. साम्राज्याचे २०० जिल्हे होते व त्यांवर सरंजामी पद्धतीचे कलेक्टर नेमलेले असत. सामान्य लोक व शेतकरी सुखी होते. शेतसारा फक्त नाण्यांत वसूल करीत, तो उत्पन्नाच्या ½ असे. व्यभिचार व फितुरी यांनां देहदंडाची शिक्षा असे. राज्यांत चोरी क्वचितच होई. हातांत तलवार घेऊन द्वंद्वयुद्ध करण्याची चाल फार होती, तीच पुढें दाक्षिणेंतील मुसुलमानी राज्यांत चालू राहिली. द्वंद्वयुद्धांत जो मरे त्याची मालमत्ता जिवंत राहणाऱ्याला देत असत. देवदासींची पद्धत प्रचलित होती, त्यांनां समाजांत व राजवाड्यांतहि मोठा मान मिळे, त्यांपैकीं कांहीं अत्यंत श्रीमान असत. त्यांच्यावरील सरकारी करावर राजधानींतील १२००० पोलीसांचा बराचसा पगार भागविला जाई. साम्राज्यांत कोठेंहि गोवध होत नसे. दसऱ्याच्या दिवशीं राजधानीमध्यें राजाच्या समोर २५० रेडे व ४५०० बोकड यांचा देवीला बळी देत. विजयानगरचे पहिले राजे शैव होते तर शेवटचे वैष्णवपंथी होते. विजयानगरचे राजे मूळचे तेलंगी जातीचे होते असें म्हणतात व त्यामुळें त्यांनीं कानडीपेक्षां तेलगू व संस्कृत वाङ्मयास फार उत्तेजन दिलें. सायणाचार्य व माधवाचार्य हे अनुक्रमें दुसरा हरिहर व बुक्क यांचे (पूर्वाश्रमीं) मुख्य प्रधान होते; त्यामुळें विजयानगरच्या पहिल्या घराण्याचा संबंध नेहमी श्रृंगेरी-पीठाशीं येत असे. नरसिंग सालुव यानें तेलगु वाङ्मयास बरेंच उत्तेजन दिलें. कृष्णराय तर स्वतः उत्तम कवि व ग्रंथकार होता आणि अनेक विद्वानांचा आश्रयदाता होता. रामराजा व त्याचे बंधु हेहि स्वतः फार विद्वान व विद्वानांचे पोशिंदे होते; त्यांनीं वैष्णवपंथाला फारच भरभराटीच्या स्थितीस आणलें. विजयानगरच्या सर्वच राजांनीं मजबूत किल्ले, तटबंदीचीं ठिकाणें, भव्य व उत्कृष्ट पाटबंधारे आणि तलाव, प्रचंड राजवाडे आणि देवळें बांधलीं, त्यांत रंगीत चित्रकला व खोदीव चित्रकला अत्यंत उच्च दर्जाची दृष्टीस पडते. त्यांचे चित्रकार व शिल्पी हे सामान्य वस्तूपासून अत्यंत सुंदर वस्तू निर्माण करीत, त्यामुळें दाक्षिणेंत विजयानगरी शिल्प व चित्रकलेची एक स्वतंत्र शाखाच निर्माण झाली होती. सांप्रत हीं शिल्पकामें बरींच हयात आहेत, चित्रें मात्र क्वचित आढळतात. रामस्वामीच्या हजारखांबी देवळांत (१५१३ त बांधलेलें) भिंतीवर काढलेले रामायणांतील प्रसंग अत्यंत सुंदर आहेत. याखेरीज अनेक बाजूंनीं हें साम्राज्य भरभराटीस चढलें होतें, त्या सर्वांचा नामनिर्देश करण्यासहि येथें सवड नाहीं. [इंडि. अँटि. भा. २०; लाँगहर्स्ट—हंपी रुईन्स; विल्क्स—हिस्टॉरिकल स्केचेस, हिस्टरी ऑफ म्हैसूर; मिडोज टेलर—मॅनुअल; कृष्णस्वामी अय्यंगार—विजयानगर हिस्टरी; राइस—म्हैसूर अँड कूर्ग, म्हैसूर गॅझेटियर; सिवेल—ए फर्गॉटन एंपायर; स्मिथ—ऑ. हि. इंडिया; सूर्यनारायणराव—ए नेव्हर दुबी फर्गॉटन एंपायर; श्रीनिवास अय्यंगार—एन्शन्ट इंडिया.]

**मोंगल राज्य**—हिंदुस्थानांत मोंगली राज्याचा पाया घालणारा झहिरुद्दीन मुहम्मद उर्फ बाबर (बाबर ही सिंह अर्थाची नुसती पदवी आहे) हा प्रख्यात पुरुष तैमूरचा पांचवा वंशज असून, आईकडून चेंगीझखानाच्या कुळांतील होता; त्यामुळें त्याचें रक्त आशियाखंडांत धुमाकूळ घालणाऱ्या दोघा विख्यात पुरुषांच्या रक्तांचें मिश्रण होतें. त्याचें सर्व आयुष्य लढायांतच गेलें. अकराव्या वर्षी त्याला समर्कंदची गादी मिळाली, ती त्याच्या हातून दोनदां जाऊन पुन्हां त्याच्या हातीं आली. काबूलचें राज्य त्यानें १५०४ त हस्तगत केल्यानें त्याचा संबंध हिंदुस्थानाशीं आला. तेथील संपत्तीच्या लोभानें त्यानें दोनदां हिंदुस्थानावर (पंजाबांत) किरकोळ स्वाऱ्या केल्या. पुढें दौलतखान याच्या बोलावण्यावरून त्यानें दिल्लीचा शेवटचा सुलतान इब्राहीम लोदी याच्यावर १५२५ त स्वारी केली. त्याचें सैन्य थोडें असतांहि (परंतु तें बहुतेक सर्व घोडदळाचें असल्यानें) केवळ ७०० तोफांच्या बळावर त्यानें पानीपत येथें इब्राहीमचा सपशेल पराभव केला (२१ एप्रिल १५२६). त्यावेळीं तोफा नुकत्याच उदयास येऊं लागल्या होत्या. तुर्कांनीं त्यांचा प्रथम उपयोग केला होता आणि त्यांच्यासंबंधामुळें बाबरला त्याचें ज्ञान मिळालें होतें.

उलट उत्तरहिंदुस्थानांत त्यावेळपर्यंत तोफांची मुळींच माहिती नव्हती. इब्राहिम तरुण व अनुभवी तर बाबर तज्ज्ञ सेनापति असल्यानें अखेरीस इब्राहीम रणांत पडला व बाबर दिल्लीचा राजा बनला. पुढें राज्य चालविण्यांत त्याला दिल्लीच्या अफगाणपक्षानें सर्वतोपरी मदत केली. बाबरनें पुढें राज्यविस्तार करण्यासाठीं मेवाडच्या राणा संगा(संग्रामसिंह)वर चढाई केली. संग हा अत्यंत शूर पुरुष होता; त्यानें शंभर लढाया मारल्या होत्या व त्याच्या अंगावर ऐंशी जखमा झाल्यां होत्या व त्याच्या हाताखालीं शूर रजपुतांचें मोठें सैन्य होतें. त्यानें हिंदुधर्माच्या रक्षणासाठीं बाबरशीं खानुआ येथें भयंकर लढाई केली, पण त्यांतहि तोफांमुळेंच बाबरला जय मिळाला (१५२७). तत्रापि त्याला राजपुताना अथवा मेवाड जिंकतां आलें नाहीं. नंतर बिहार प्रांताच्या अफगाण राजालाहि त्यानें आपला मांडलिक बनविलें. त्यामुळें ऑक्ससपासून बंगाल व हिमालयापासून ग्वाल्हेरपर्यंतचा प्रदेश त्यानें जिंकला (१५२९). यानंतर तो एक वर्षानें आग्रा येथें मुलाच्या दुखण्यानें हाय खाऊन मेला त्याचें थडगें काबूल येथें आहे. मध्यआशिया व हिंदुस्थान, मोंगल व हिंदी, तार्तर व तुर्की इत्यादि निरनिराळ्या संस्कृतींची जोड जुळविण्याचा प्रयत्न बाबरनें केला. त्यानें तुर्की भाषेंत आत्मचरित्र लिहिलें आहे. त्याला तुर्की व फारशी दोन्ही भाषा चांगल्या येत असून त्यांत त्यानें कविताहि केल्या आहेत. बाबरचें आत्मचरित्र हुमायूननें स्वहस्तें लिहिलें आणि त्याचें फारशी भाषांतर अकबरानें करविलें. बाबरच्या मागें हुमायुनादि त्याच्या चार मुलांत राज्याबद्दल तंटे लागले. वडील मुलगा कामरान यानें काबूल, व पंजाब हे प्रांत दाबल्यामुळें न तिकडून होणारी पैशाची आणि शिपायांची भरती थांबल्यानें, तसेंच बिहार व बंगाल येथील अफगाण राजांनीं आणि गुजराथच्या मुसुलमान राजानें पूर्वेकडून व दक्षिणेकडून जोर धरल्यामुळें हुमायूनची परिस्थिति बिकट झाली. त्यामुळें त्याला जरी दिल्लीची गादी मिळाली तरी ती राखण्यासाठीं आसपासच्या राजांशीं सतत लढावें लागलें. त्यानें गुजराथवर स्वारी करून चंपानेरचा किल्ला घेतला, इतक्यांत बिहारमध्यें शेरखान नांवाच्या मांडलिकानें बंड केल्यानें तो तिकडे गेला, परंतु खानानें त्याचा चौसा येथें सपाटून पराभव केला व स्वतःस राजा म्हणविलें (१५३९). त्यानंतर शेरशहानें पुन्हां हुमायूनाचा पराभव केल्यावर (१५४०) तो पळूं लागला. मारवाड, राजपुताना वगैरे भागांत असतां उमरकोट येथें अकबराचा जन्म झाला (१५४२). हुमायूनाला कोणाची मदत मिळेना म्हणून तो पळून इराणचा शहा तहमास्प याच्या आश्रयास गेला. त्यानें त्याला शियापंथी बनवून मदतीस सैन्य दिलें, त्यामुळें हुमायुननें कंदाहार स्वतःच बळकावला आणि त्यानंतर दिल्ली व आग्रा काबीज करून आपलें राज्य परत मिळविलें (१५५५). दोन्हीं वेळ मिळून त्यानें सारें १० वर्षें राज्य केलें. त्याची सर्व कारकीर्द लष्करीच झाली. राज्यांत त्यानें व बाबरनेंहि कांहीं सुधारणा केल्या नाहींत. हिंदूंचा छळ करण्यांत व त्यांची कत्तल करण्यांत दोघेहि सारखेच होते. स्मिथ म्हणतो कीं हे सर्व तैमूरवंशी राजे आशियांतील जुलमी प्रवृत्तीचे असून रक्तपात करणारे व खुनशी वृत्तीच्या कौटुंबिक परंपरेनें लिडबिडलेले होते; त्यांच्यांत कोणीं सुद्धां—अकबरानेंहि—मानवी प्राणांचा दरकार बाळगला नाहीं, उलट त्या सर्वांनीं भयंकर रानटी कत्तली व जुलमी शिक्षा करण्याचें सोडलें नाहीं ( ऑ. हि. ३२६ ).

**सूर वंश**—शेरशहानें हुमायूनला हांकलून दिल्ली घेतल्यावर राजपुताना, माळवा, बुंदेलखंड वगैरे प्रांतांत स्वाऱ्या केल्या. त्यांपैकीं बुंदेलखंडाच्या स्वारींत तो मारला गेला. हा निव्वळ रानटी अफगाणांपेक्षां जरा जास्त सुधारलेला होता. त्यानें राज्यकारभारांत अल्लाउद्दीन खिलजीच्या धोरणावर बऱ्याच सुधारणा केल्या, त्यांचीच वाढ पुढें अकबरानें केली. त्यानें नवी दिल्ली वसवून सहसराम (त्याची बिहारची जुनी राजधानी) येथें एक उत्तम मशीद बांधली. त्यानें जमीनीची तरमबंदीहि सुरू केली, न्याय देण्याची पद्धत सुधारली, ग्रामपंचायतींनां बरेच अधिकार दिले, शेतकऱ्यांवरील जुलूम नाहींसा केला, मोठमोठ्या सडका तयार केल्या, त्यांच्या कांठीं सराया बांधल्या आणि चांदीच्या रुपयांत पुष्कळ सुधारणा केली. तो जर जास्त जगता तर मोंगल राजवंश हिंदुस्थानांत उदयास येताना. तो त्याचा प्रतिस्पर्धी हुमायून याच्यापेक्षां अनेक बाबतींत श्रेष्ठ होता. त्याच्या मागें त्याचा मुलगा इस्लामशहा व त्याच्या मागें त्याचा मेव्हणा मुहम्मद हे गादीवर आले. परंतु मुहम्मद हा दुबळ असल्यानें त्याचा सर्व कारभार त्याचा हिंदु प्रधान हेमू हा पहात असे.

**अकबर**—बाप मेला तेव्हां अकबर तेरा वर्षांचा होता व त्याच्यावर बैरामखान याची देखरेख होती, हे दोघे शिकंदर सूरचा पाठलाग करीत असतां त्यांनां हुमायूनची

बातमी समजली आणि कलानौर येथें अकबराचें नांवाच तक्तारोहण झालें (फेब्रु. १५५६). सूरवंशांतील दोन पुरुष व त्यांचा मुख्य हिंदु प्रधान हेमू आणि अकबर हे तिघे या वेळीं दिल्लीच्या गादीसाठीं हक्क सांगूं लागले. एका दृष्टीनें अकबर हा जास्त परका होता. हेमूनें तर अकबरापासून दिल्ली हिसकाऊन स्वतःस राजा विक्रमजित म्हणवून जाहीरहि केलें. त्याच्यावर अकबर चालून आला व त्यांच्यांत पानपत येथें लढाई झाली. पहिल्यानें हेमूचाच जय झाला होता, पण त्याच्या डोळ्यांत बाण घुसून तो घरी येऊन पडला व तो दिसेना तेव्हां नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्याचें हिंदी सैन्य मागें हटलें. पुढें हेमू हा अकबराचे हातीं सांपडला व त्यानें त्याचें क्रूरपणें स्वहस्तें डोकें उडवून मेलेल्या माणसांचीं डोकीं कापून त्याचा एक स्तंभ उभारला (नोव्हेंबर १५५६). पुढें शिकंदर सूर शरण आला आणि दिल्ली व आग्रा अकबराच्या हातीं पडलीं. उत्तरहिंदुस्थानांत या सुमारास भयंकर दुष्काळ पडून माणसें परस्परांनां खाऊं लागलीं असें म्हणतात. नंतर ग्वाल्हेर, अजमेर, जौनपूर वगैरे ठिकाणें व किल्ले अकबरानें घेऊन माळवा व राजपुतान्यावर स्वाऱ्या केल्या पण त्या फुकट गेल्या (१५५८-६०) या वेळींच अकबरानें आईच्या व इतर कांहीं मंडळींच्या सांगण्यावरून बैरामखानावर उध्दटपणाचा व आज्ञाभंगाचा आरोप ठेवून कामावरून दूर केलें; त्यामुळें त्यानें बंड केलें पण तें मोडलें जाऊन, तो मक्केस जात असतां वाटेंत त्याचा खून झाला (१५६१). यापुढें कांहीं काळ अकबरानें चैनींत दिवस घालविले. त्याच्या एका सेनापतीनें माळवा काबीज करून तेथें त्यानें बराच रानटी अत्याचार केला परंतु अकबरानें त्यास अडथळा केला नाहीं. यावेळीं अकबराला कळून आलें कीं; हिंदुस्थानचा राजा ज्याला व्हावयाचें असेल त्यानें हिंदु व मुसुलमान या दोन्ही समाजांच्या राजनिष्ठेस पात्र झालें पाहिजे. याप्रमाणें विचार ठरवून त्यानें आपली पुढली दिशा ठरविली. त्यानें आपलें पहिलेंच लग्न जयपूरच्या बिहारीमल राजाच्या मुलीशीं लावलें, त्यामुळें हिंदूंचा-विशेषतः जयपूर घराण्याचा-पाठिंबा त्याला शेवटपर्यंत मिळाला. हिच्याच पोटीं जहांगीर जन्मला. यानंतर रजपूत-मुसुलमान लग्नें बरींच झालीं. अकबरानें हिंदु यात्रेकरूंवरील कर कमी केला, त्यांच्यावरील जिझिया अजिबात बंद केला, युद्धकैद्यांनां गुलाम करण्याचें बंद केलें इत्यादि सुधारणा (अबुल फजलची भेट होण्यापूर्वीं बरीच वर्षें) स्वतःच्या मनानें केल्या. हें त्याचें राज्यधोरण पुढें ४१ वर्षें चाललें. तो सत्तेचा व संपत्तीचा फार महत्वाकांक्षी असल्यानें यापुढें त्यानें न्यायान्याय न पाहतां शेजारच्या स्वतंत्र राजांवर कारणाशिवाय चढाई करून त्यांचीं राज्यें बळकावलीं. हा त्याचा क्रम १६०१ पर्यंत म्हणजे साधारण शेवटपर्यंत चालू होता. गोंडवनची प्रसिद्ध शूर राणी दुर्गावती ही विधवा असतां व तिचा कांहींहि दोष नसतां अकबरानें तिच्यावर चालून जाऊन तिचें राज्य उपटलें. दुर्गावतीनें मरेपर्यंत मोठ्या शौर्यानें आपलें रक्षण करून कीर्ति मिळविली. अकबरानें या लढाईंत क्रूरपणाची वागणूक केली व जाळपोळ, लुटालूट करण्यास सोडलें नाहीं. अकबराचें इराणी राज्यकारभाराचें धोरण कांहीं मुसुलमान सरदारांनां न आवडून त्यांनीं त्याच्या चुलतभावास गादीवर बसविण्याचा कट करून बंड केलें, पण अकबरानें तें मोडून क्रूरपणें त्या भावास फांशीं दिलें (१५६५). त्यानंतर मेवाडचा महाराणा आपल्याला मुलगी देत नाहीं व आपल्याशीं वांकून वागतो म्हणून अकबरानें त्याच्यावर विनाअपराध चढाई केली आणि चितोडास वेढा दिला. स्वतः राणा फार शूर नव्हता पण किल्लेदार जयमल्ल यानें मोठ्या शौर्यानें चार महिने किल्ला लढविला. अखेर दैववशात अकबराच्या बंदुकीच्या गोळीनें जयमल्ल ठार झाल्यानें किल्ला अकबराच्या हातीं आला (फेब्रु. १५६८). तत्पूर्वीं सर्व रजपुतांनीं बायकांचा जोहार करून स्वतः रणांत देह अर्पण केले. यामुळें अकबरानें चिडून तीस हजार हिंदूंची कत्तल केली. पुढें रणथंबोर, कालिंजर वगैरे प्रसिद्ध किल्ले व राजपुताना, बुंदेलखंड इत्यादि प्रांत अकबरानें काबीज केले. अनेक रजपूत राजांनीं त्याची नोकरी पत्करली. फक्त एकट्या मेवाडच्या घराण्यानें त्याची पर्वा बाळगली नाहीं, त्यासाठीं अकबरानें त्या घराण्याशीं म्हणजे प्रख्यात महाराणा प्रतापसिंहाशीं अनेकदां लढाया केल्या, त्याच्यावर पुष्कळदां संकटें आणलीं, परंतु तें घराणें व प्रतापसिंह त्याला हार गेला नाहीं. अकबराला कलाकौशल्याची आवड चांगली होती, त्यानें तत्कालीन हिंदुस्थानांतील प्रख्यात तानसेन नांवाच्या हिंदु गवयास आश्रय दिला, स्वतः गायन व चित्रकलेचा अभ्यास केला, जयमल्ल व पुत्त या दोघां(चितोडच्या वीर पुरुषां)चे पुतळे तयार करविले, आग्र्याच्या किल्ल्याचा तट बांधला, आग्र्यांत गुजराथी व बंगाली धाटणीच्या अनेक सुंदर इमारती बांधल्या व फत्तेपूर-शिक्री येथें नवीन सुंदर राजधानी (७ वर्षांत) वसविली. अजमीरास अकबराचीं पहिलीं मुलें मेल्यामुळें त्यानें

ती राजधानी सोडली; फत्तेपूरला १५ वर्षे राजधानी होती. तेथील सुंदर इमारती अद्यापि बऱ्याच शाबूत आहेत; त्यांत प्रमुख म्हणजे बुलंद दरवाजा होय. यापुढें अकबरानें गुजराथेवर स्वारी करून तो प्रांत खालसा केला. यावेळीं त्यानें स्वतः अकरा दिवसांत तीनशें कोसांचा प्रवास केला होता. गुजराथमुळें त्याचें राज्य वाढून अत्यंत सुपीक प्रांत त्याला मिळाला व सुरत, भडोच इत्यादि बंदरांमुळें दर्यावरील व्यापार त्याच्या हातीं आला आणि पोर्तुगीजांशींहि संबंध येऊं लागला. यापुढें १७५८ पर्यंत (यावेळीं मराठ्यांनीं गुजराथ घेतला) गुजराथ हा मोंगली राज्याचा एक मोठा महत्त्वाचा सुभा होता. येथेंच राजा तोडरमल्लानें आपली जमाबंदी प्रथम सुरू केली. यावेळीं अकबरानें सरंजामी लष्करी पद्धत कमी करून सरकारचें पगारी सैन्य वाढविलें, जहागिरदारी पद्धतहि बंद करून सरकारी वसुली कामदार नेमले व मनसबदारांत तेहतीस दर्जे पाडले (१५७३–७८). बंगालचा मुसुलमान तरुण राजा दाऊद हा घमेंडखोर व दुर्बळ असल्यानें अकबरानें विनाकारण त्याचेवर स्वारी करून व राजमहालच्या लढाईंत त्याला ठार करून बंगालप्रांत खालसा केला (१५७६) आणि त्यानंतर बारा वर्षांनीं ओरिसा प्रांत जिंकला. बंगालच्या जयाच्या सुमारास राजपुतान्यांतील विख्यात असें हळदीघाटचें युद्ध झालें. त्यांत प्रतापसिंहाचा भाला सेलीमच्या अंबारीला अडकून पडल्यानें सेलीम वांचला व युद्धाचें पारडें पालटलें. हळदीघाट म्हणजे राजपुतान्यांतील थर्मापिली होय. यावेळीं प्रतापचीं सर्व ठाणीं व राज्य अकबरानें घेतलें तरी त्या थोर पुरुषानें धीर न सोडतां १५९७ च्या पूर्वी चितोड व अजमेर खेरीज आपलें सर्व राज्य व किल्ले परत घेतले आणि खुद्द अकबराच्या तोंडून प्रशंसेचे उद्गार काढविले. अकबराचें राज्य १५९६ चे सुमारास काबूल ते बंगाल (सिंधखेरिज) व हिमालय ते नर्मदा येथपर्यंत होतें; असंख्य लोकसंख्या, सुपीक जमीन, पुष्कळ प्रकारचे उद्योगधंदे, अंतर्गत व परदेशचा मिळून भरभराटलेला व्यापार यामुळें त्यावेळीं सर्व जगांत हें राज्य पहिल्या दर्जाचें झालें होतें. बंगालच्या जयानंतर अकबर स्वतः फारसा लढायांवर गेला नाहीं. त्यानें १५७८चे सुमारास फत्तेपूर येथें सर्व धर्मावरील चर्चा करण्यासाठीं एक इबादतखाना नांवाची इमारत बांधली. खंबायत येथें १५७२ त अकबराची व यूरोपियन ख्रिस्त्यांची प्रथम गांठ पडून पुढील वर्षी त्यानें पोर्तुगीजांना बऱ्याचशा सवलती दिल्या आणि त्यांचा धर्म समजून घेण्यासाठीं दोन जेसुईट पाद्र्यांनां बोलाविलें (१५८०). तत्पूर्वीच अकबरानें मुसुलमानी धर्मातील धर्मगुरूचें बहुतेक काम आपल्या हातीं घेतलें; धार्मिक विषयांचे निकाल तो स्वतः लावूं लागला, स्वतः उपदेश करूं लागला व त्यावेळीं जुन्या प्रार्थना न म्हणतां फैजीनें रचलेल्या प्रार्थना म्हणूं लागला. सारांश, त्याची इस्लामधर्मावरील श्रद्धा बहुतेक उडाल्यासारखी होऊन त्यानें ख्रिस्ती, (जेसुईट) जैन, पारशी व हिंदु या धर्मांनां जरासें जवळ केलें, त्यामुळें बहुतेक मुसुलमानसमाज त्याचेवर नाखूष झाला आणि मुसुलमानांनीं बंडें उभारलीं. त्यांत जोनपूरचा काझी, बंगाल व बहार येथील अफगाण सरदार आणि काबूलचा मुहम्मद हकीम (अकबराचा भाऊ) हे मुख्य होते. अकबरानें काझीला देहदंड केला व बाकीचीं बंडें लष्करी सत्तेनें मोडून टाकलीं (१५८०–८१). अकबरानें स्वतः एक नवीन धर्म काढून त्याचें नांव दीन इलाही असें ठेवलें व त्यांत एकेश्वरीमताला प्रमुख मान देऊन मुहम्मद पैगंबराला प्रेषित न म्हणतां, तो मान आपल्याकडे घेतला. या कृत्यास बहुधा लष्कराचा त्याला पाठिंबा असावा. अबुल फजल हा या धर्माचा प्रसारक अधिकारी बनला. परंतु या धर्माचा फैलाव अकबराच्या काळींहि फारसा झाला नाहीं व पुढें तर तो धर्म नामशेषच झाला. त्याचा एक जेसुईट पाद्री शिक्षक म्हणतो कीं, अकबरानें मी मुसुलमान राहिलों नाहीं असें स्वतः आपल्याला सांगितलें. पण एकंदरींत त्याच्या मनावर कोणत्याच धर्माचा कायमचा ठसा उमटला नाहीं असें दिसतें. त्यामुळें त्यानें अनेक धर्मांनां उत्तेजन मिळेल असेहि कांहीं सरकारी नियम तयार केले होते. इ. स १५९५ ते १५९८ पर्यंत (१५९९ प्रमाणें) भयंकर दुष्काळ पडून उत्तर हिंदुस्थानांत कहर उडाला. त्यानंतर अकबरानें अहमदनगरवर स्वारी केली, तींत प्रथम चांदबिबीनें त्याचा पराभव केला पण पुढें वऱ्हाड देऊन त्याच्याशीं तह केला. तरीहि पुन्हां लढाई सुरू झाली, तींत एका फितुऱ्यानें चांदबिबीचा खून केल्यानें अहमदनगरचें राज्य अकबराचे हाताखालीं आलें (१६००). याच सुमारास अशीरगडचा किल्ला—जो त्यावेळीं सर्व जगांतील अजिंक्य किल्ल्यांपैकीं एक होता तो—लढाईनें हस्तगत होत नाहीं असें पाहून; अकबरानें निर्लज्जपणें विश्वासघात करून व पैसा चारून आणि खानदेशच्या राजास वचन मोडून कैदेंत टाकून मिळविला असें स्मिथ म्हणतो (ऑ. हि. ३६३). यानंतर

अकबराचें आयुष्य दुःखांत गेलें. त्याचीं दोन मोठीं मुलें मेलीं व सेलीमनें उघडपणें बंड केलें. अकबरानें मोठ्या कुशलतेनें हें बंड मोडलें (१६०४). त्यानंतर थोड्याच महिन्यांनीं अतिसार होऊन त्यांत अकबराचा अंत झाला (आक्टोबर १६०५). कांहींचें म्हणणें त्याला विषप्रयोग करण्यांत आला. त्याचें थडगें शिकंदरा येथें आहे. पुढें १६९१ त जाट लोकांनीं बंड करून त्याचें थडगें उकरून त्यांतील हाडें जाळलीं. अकबर हा सर्व तऱ्हेनें राजा बनला होता असें त्याच्या एका जेसुईट मित्रानें म्हटलें आहे. अकबर उतावीळ परंतु आपल्या लहरींनां ताब्यांत ठेवणारा, गरिबांची सोय पहाणारा, पूर्ववयांत अत्यंत रागीट, दयाशील परंतु एखाद्यावेळीं अत्यंत रानटी शिक्षा करणारा, कारागिरीचा शोक असणारा, विशेषतः बंदुका व तोफा ओतविण्यांत दक्ष, राज्यकारभारांत बारकाईनें लक्ष घालणारा वगैरे गुणावगुणांचा होता. तो शेवटपर्यंत अक्षरशत्रु परंतु धड स्मरणाचा असल्यानें निरनिराळ्या शास्त्रांत—विशेषतः धार्मिक वादविवादांत—विशेष लक्ष घाली (स्मिथ). तो स्वतः प्रथम सुन्नीपंथी होता व आपण आपल्या पूर्ववयांत नास्तिकांनां देहदंड केल्याचें त्यानें स्वतः कबूल केलें आहे. पुढें हिंदु तत्त्वज्ञानाचा व तत्सदृश सुफी तत्त्वज्ञानाचा पगडा त्याचेवर बसला होता. धर्माच्या बाबतींत तो जरी उदार होता तरी मुसलमानांनां जास्त सवलती देई. एकंदरींत तो पूर्ण वेलगामी राजा होता. हिंदु लोकांनां—विशेषतः आप्त झालेल्या रजपूत राजांनां—त्यानें मोठमोठे अधिकार दिले; त्यामुळेंच त्याच्या राज्यास वळकटी आली. ही जहांगीर व शहाजहान यांच्या वेळेपर्यंत टिकली; औरंगझेबानें रजपुतांनां त्रास दिल्यानें ती मोडली व मोंगली राज्यहि नामशेष झालें. राज्यकारभाराच्या सर्व खात्यांत त्यानें पूर्वीची सरंजामी पध्दत काढून पगारी नोकरपध्दत सुरू केली, तोडरमल्लाच्या साह्यानें तरमबंदी करून शेतकऱ्यांनां सरकारी लुटीच्या जाचांतून सोडविलें. सारा प्रत्यक्ष शेतकऱ्यांकडून वसूल होई; मात्र पूर्वीच्या हिंदु राजांपेक्षां सारा दुप्पट व जब्बर होता. उत्पन्नाच्या एकतृतीयांश रक्कम नक्त घेई (धान्यरूपाची नसे). स्वस्ताई असून व्यापार तेज होता. त्याचें खडें सैन्य थोडें असून मनसबदारी फौज मात्र पुष्कळ होती; तिचा पगार रोख असे. मनसबदारांनां जहागिरी दिल्या नव्हत्या. न्यायदानाची पध्दत सुधारलेली नव्हती. फैजी, अबुल फजल, तोडरमल्ल, तानसेन, बिरबल, मानसिंग इत्यादि पुरुष अकबराचे मित्र व अधिकारी होते. तुळशीदास कवि याच्याच वेळीं झाला. त्याचें रामचरित मानस (रामायण) सर्व उत्तरहिंदुस्थानांत प्रसिध्द आहे. अबुल फजलनें ऐने-ई-अकबरी ग्रंथ लिहिला. मोंगल चित्रकला याच वेळीं उदयास आली, तींत फारशी व हिंदी दोन्ही तऱ्हांचें मिश्रण आहे. तिची भरभराट शहाहजानचे वेळीं झाली. शिल्पकलेतहि यावेळीं हिंदु व मुसलमानी मिश्रण झालेलें आढळतें.

जहांगीर—यानें मुसुलमानी धर्माचें रक्षण करण्याची शपथ घेऊन राज्यारोहण केल्यानें सर्व मुसुलमान सरदार त्याला मिळाले. त्यानें कांहीं किरकोळ कर बंद केले. जहांगीर गादीवर आल्यावर थोड्याच दिवसांत त्याच्या खुश्रु नांवाच्या मुलानें बंड केलें. तें जहांगीरनें मोडून अपराध्यांस क्रूर शिक्षा दिल्या (१६०६) व खुद्द खुश्रूचे डोळे काढण्याचा प्रयत्न केला त्यांत त्याचा एक डोळा शाबूत राहिला. शीख गुरु अर्जुन यानें खुश्रूला नुसती पैशाची मदत केल्यानें त्याचा अत्यंत छळ केला व शेवटीं त्याला ठार मारलें. खुश्रूला दहा वर्षें (१६१६)पर्यंत कैदेंत ठेविलें होतें, तरी त्याच्यावर लोकांचें प्रेम जास्त होतें. जहांगीरनें नूरमहलच्या नवऱ्याचा नायनाट करून तिला आपली मुख्य राणी केलें व तिचें नांव नूरजहान ठेवलें (१६११). तिनें तत्काळ आपली छाप जहांगीरवर बसविली व यापुढें जहांगीरच्या अखेरपर्यंत तीच खरी बादशहा होती. तिचें नांवहि जहांगीरच्या नाण्यांवर कोरलें होतें. पुढें जहांगीर हा बापासारखा धर्माच्या बाबतींत बराचसा उदार बनला. यावेळीं इंग्रजांनीं व्यापारासाठीं जहांगीरशीं खटपटी चालविल्या पण त्या पोर्तुगीजांनीं निष्फळ केल्या(१६११). बंगाल व दक्षिण इकडे बंडाळ्या झाल्या. पैकीं जहांगीरचा अंमल दक्षिणेंत शेवटपर्यंत बसलाच नाहीं. पोर्तुगीजांची व बादशाही आरमाराची दर्यावरील व्यापारासाठीं नेहमीं झटापट होत असे. त्यांत फिरंग्यांची बहुधां सरशी होत असे. मेवाडच्या राणा अमरसिंहानें अनेक वर्षांच्या लढायांनां कंटाळून जहांगीरची सत्ता कबूल केली (१६१४). जहांगीरनेंहि मेवाडच्या घराण्याला सन्मानानें वागविलें. हिंदुस्थानांत पहिली प्लेगाची सांथ १६१६ त उत्पन्न होऊन ती जवळ जवळ आठ वर्षें टिकली व हजारों लोक मेले. पुढें १७०३-०४ सालीं पुन्हां प्लेग उद्भवला तो दक्षिणेंत उद्भवला, नंतर १८१२ त कच्छ व गुजराथेंत उद्भवला आणि १८९६ त मुंबई, पुण्यास उमटला. इंग्लंडचा जेम्स १ ला यानें थॉमस रो याला व्यापाराच्या

सवलती मागण्यासाठीं जहांगीरकडे पाठविलें (१६१९); पण त्याच्यानें विशेषसें काम झालें नाहीं. जहांगीरनें १६२० त कांग्रा प्रांत घेऊन तेथील मुख्य देवळांत गोहत्या केली. त्यापुढें शहाजहाननें आपला वडील भाऊ खुश्रू याचा खून करविला पण त्याबद्दल जहांगीरनें कांहींच रोष दर्शविला नाहीं (१६२२). याच वर्षीं इराणच्या शहा-अब्बासनें कंदाहार प्रांत घेतल्यानें जहांगीरनें शहाजहान यास त्याच्यावर पाठविलें, पण त्यानें बापाच्याविरुद्ध बंड करून बराच धुमाकूळ उडविला. तेव्हां त्याच्यावर सरकारी सैन्य धाडण्यांत आलें. त्यानें त्याचा बलोचपूर येथें पराभव केल्यानें तो दक्षिणेंत पळून निजामशाहींतील मलिक अंबरास मिळाला. तेथेंहि पाठलाग झाल्यानें तो बंगालकडे पळाला. अखेरीस (१६२५) बापलेकांची समजूत पटली. या सुमारास नूरजहानचें प्रस्थ फार माजलें होतें, त्यामुळें दरबाऱ्यांचा तिच्यावर रोष होता. त्यांच्यापैकीं महबतखानानें एकदां जहांगीरास पकडून तिला पळवून लावलें परंतु तिच्या युक्तीनें हा डाव फसला व महबतखान दक्षिणेंत पळून गेला. यावेळीं शहाजहाननें आपला भाऊ पर्विझ याला विष देऊन मारलें. इकडे जहांगीरहि काश्मीरप्रांतीं मरण पावला (१६२७). जहांगीर हा अकबरापेक्षां कमी दर्जाचा होता. तो फार दारूबाज, नूरजहानवर नेहमीं अवलंबून रहाणारा, थोड्याशा चुकीसाठींहि अपराध्यांनां अमानुषपणें ठार करणारा, पण त्याबरोबरच वेळीं दयाळु, न्यायी, व राज्यकारभार चांगल्या प्रकारें पाहणारा, चित्रकलेचा व गायनकलेचा शोकी, स्वतः चित्रें काढणारा व धार्मिक बाबतींत थोडाबहुत उदासीन होता. त्यानें गुजराथेंतील जैनांचा फार छळ केला, बापासारखी त्याला हिंदुधर्माची ओढ नव्हती. सरकारचा खर्च फार उधळ्या होता. दरबारी खर्च (सोन्याच्या तुला करणें वगैरे) हि विलक्षण होता. हाकीन्स नांवाच्या चारशें स्वारांच्या यूरोपियन मनसबदाराला सालीना ३० हजार रु. पगार होता. लोकोपयोगी कामें त्यानें फारशीं केलीं नाहींत, त्यानें आपल्या १९ वर्षांचें एक आत्मचरित्र लिहिलेलें प्रसिद्ध झालें आहे. फारशी वाङ्मयास त्यानें उत्तेजन दिलें. अबुल हसन व मनसूर हे त्याचे प्रसिद्ध चित्रकार होते. आग्र्याचें इतिमदुद्दवल्याचें, शिकंदरा येथील अकबराचें व लाहोर येथील खुद्द जहांगीरचें थडगें हीं त्या वेळचीं उत्तम शिल्पकामें होत.

**शहाजहान**—बाप मेला तेव्हां हा दक्षिणेंत जुन्नरकडे होता. त्याचा सासरा असफखान यानें त्याला गादीवर बसविण्यांत मदत केली. शहाजहाननें आपले निकटचे सर्व पुरुष नातेवाईक अनेक क्रूर उपायांनीं ठार मारले. झुंजारसिंग बुंदेल्यानें बुंदेलखंड स्वतंत्र करण्यासाठीं शहाजहानशीं आठ वर्षें जोराचा झगडा केला. शहाजहानचा एक सरदार खानजहान लोदी यानें बंड केलें व निजामशहाचा आसरा घेतला पण पुढें त्याचा एका लढाईंत अंत झाला. यापुढें कोणी शत्रु न उरल्यानें शहाजहाननें आपलें लक्ष चैनीकडे वळविलें. आग्र्याच्या राजवाड्यांत एक चांदीसाठीं व एक सोन्यासाठीं अशीं दोन तळघरें होतीं. प्रत्येक तळघर ७० फूट चौरस व ३० फूट उंच होतें. अकबराच्या वेळेपासून जमविलेलें अमूल्य जडजवाहीर खर्चून शहाजहाननें बेबदलखान नांवाच्या कारागिरास सात वर्षें खपवून प्रख्यात मयूरसिंहासन तयार केलें. या सिंहासनाचे पाय सोन्याचे, वर एक जडावाची मेघडंबरी, तिचे रत्नजडित १२ खांब, दर्शनी बाजूस दोन बहुमूल्य रत्नजडित मोर व त्यांच्यामध्यें एक जडावाचें झाड असें हें सिंहासन असून त्याची किंमत कमींतकमी १ कोटी रु. होती. हें सिंहासन १७३९ त नादीरशहानें इराणास नेलें; पुढें त्याची मोडतोड झाली. याखेरीज आणखी सहा सिंहासनें होतीं. मयूरसिंहासन घडविणें चालू असतांच गुजराथेंत व दक्षिणेंत भयंकर दुष्काळ पडला तो इतका कीं आईबापें आपलीं पोटचीं पोरेंच खाऊं लागलीं व रस्त्यावरच्या प्रवाशास बुभुक्षित लोक फाडून खाऊं लागले (१६३०–३१). याच दुष्काळांत शहाजहानची आवडती बेगम मुम्ताझ महल ही मेली. तिचें थडगें जगविख्यात ताजमहालांत आहे. तिला एकंदर १४ मुलें झालीं. दारा-सुजादि भांडणारे चार भाऊ यापैकींच होत. पोर्तुगीजांनीं कलकत्त्याजवळील हुगळी गांवीं १५७९ च्या सुमारास एक वखार घालून प्रथम तंबाखूचा व्यापार सुरू केला. पण पुढें त्यांनीं गुलामांचा व्यापार व जुलमानें बाटविण्याचें काम चालविल्यानें शहाजहाननें त्यांनां हुगळीहून हांकलून देऊन तीन वर्षेंपर्यंत त्यांनां कडक शिक्षा देण्याचें सुरू ठेविलें होतें. त्याच वेळीं त्यानें अनेक हिंदु देवळें पाडलीं. बाप व आजा यांचें धर्मविषयक उदार धोरण त्यानें ठेविलें नाहीं. मलिक अंबर मेल्यावर व शहाजीला पाठबळ न राहिल्यामुळें शहाजहाननें निजामशाही बुडविली आणि त्या कामीं आदिलशहाची मदत घेतली; तसेंच फत्तेखान या निजामशाही सरदारानें व शहाजीनें निजामशाही तगविण्याच्या खटपटीविरुद्ध १०॥ लाख रुपये लांच खाऊन शहाजीशीं फितुरी

केली (१६३२). शहाजीनें शहाजहानसारख्या बादशहास सात आठ वर्षे आपल्या मराठा घोडदळासह टक्कर देऊन दमविलें होतें. आदिलशहानें शहाजहानास मदत करून निजामशाहीचा अर्धा वांटा स्वतःस मिळविला (१६३६). या वेळीं खानदेश (राजधानी बुऱ्हाणपूर व अशीरगड किल्ला), वऱ्हाड (राजधानी इलिचपूर व गावीलगड किल्ला), तेलिंगण (राजधानी नांदेड व खंदार किल्ला) आणि दौलताबाद (राजधानी खडकी ऊर्फ औरंगाबाद व देवगिरी किल्ला) मिळून दक्षिणचा सुभा होऊन त्यावर औरंगझेब हा १८ व्या वर्षी सुभेदार नेमला गेला. या सुभ्याचें उत्पन्न ९ कोटी रु. असून त्यांत ६४ किल्ले होते, त्यांपैकीं पुष्कळसे शहाजीच्या ताब्यांत होते. औरंगझेबानें आठ वर्षे (१६३६-४४) सुभेदारी केल्यावर बापाच्याविरुद्ध कांहीं उलाढाली केल्यानें बापानें त्याला आठ महिने बडतर्फ केलें. पुढें त्याला २ वर्षे गुजराथचा व नंतर बल्खचा सुभेदार नेमलें. त्यावेळीं औरंगझेबानें बल्खवर स्वारी केली, पण तींत त्याचा सपाटून पराभव झाला (१६४७); तेव्हां त्याची नेमणूक मुलतानच्या सुभेदारीवर झाली. त्यानंतर पांच वर्षे कंदाहार हें इराणच्या शहापासून जिंकण्याचा औरंगझेबानें जोराचा प्रयत्न केला पण प्रत्येक पाळीला त्याचा पराजय झाला (१६४९-५३). या लढायांत हिंदी तोफखान्यापेक्षां इराणी तोफखाना श्रेष्ठ ठरला. पुढें केव्हांहि कंदाहार मोंगल बादशहांच्या हातीं पडलें नाहीं. शहाजहानच्या (१६४८ च्या वेळच्या) राज्याचें एकंदर उत्पन्न २९ कोटी रुपये होतें; वरील कंदाहार स्वाऱ्यांत १२ कोटी रु. खर्च झाले. यावेळीं यूरोपशीं होणाऱ्या व्यापाराच्या हुंडणावळीचा भाव दर रुपयास २ शिलिंग ३ पेन्स होता. औरंगझेबानें वायव्य-सरहद्दीवरील लढायांत मार खाल्ल्यानें त्याला पुन्हां दक्षिणच्या सुभेदारीवर पाठविलें (१६५३). या वेळीं या सुभ्याची सर्व तऱ्हेनें खबरदारी झाली होती. त्यामुळें मुर्शिद कुलीखान यानें या सुभ्यांत तोडरमल्ली तरमबंदी सुरू केली व पूर्वीची नांगरसाऱ्याची (दरेक नांगरागणिक सारा बसविणें) पद्धत बंद केली; मात्र सारा नख्ताप्रमाणें ऐन जिन्नसीहि भरण्यास सवड ठेविली (१६५६-५८). यानंतर औरंगझेबानें विजापूर व गोवळकोंडें येथील राज्यें जिंकण्याचा उद्योग आरंभिला. हीं दोन्हीं राज्यें शियापंथी तर मोंगली राज्य सुन्नीपंथी असल्यानें त्यांच्यांत धार्मिक वैर होतेंच. गोवळकोंडें तर १६३६ पासून दिल्लीचें मांडलिक राज्य बनलें होतेंच. तेथील वझीर मीर जुम्ला हा महत्त्वाकांक्षी होता. त्यानें ४० लाख रुपये उत्पन्नाचा कर्नाटकप्रांत स्वतःच्या हाताखालीं दाबून उत्तम सैन्य व यूरोपियन अंमलदारांचा तोफखाना जवळ ठेवला व कुत्बशहाशीं फितुरी करून तो औरंगझेबास मिळाला. तेव्हां औरंगझेबानें गोवळकोंड्यास वेढा देऊन आसपासचा मुलूख लुटून फस्त केला. शेवटीं बरीच खंडणी व लांच घेऊन शहाजहाननें औरंगझेबास वेढा उठविण्यास भाग पाडलें (१६५६). मद्रास येथें १६३९ त इंग्रजांनीं जागा विकत घेऊन वखार घातली. औरंगझेबानें गोवळकोंड्यानंतर विजापुरावर फितुरी मीर जुम्ला याच्या मदतीनें चालू केली. आपला टिकाव लागत नाहींसें पाहून आदिलशहानें कांहीं किल्ले व प्रांत देऊन त्याच्याशीं तह केला (१६५७). इतक्यांत शिवाजीनें मोंगली मुलखांत स्वाऱ्या करण्यास प्रारंभ केला व तिकडे शहाजहानहि बराच आजारी पडला. त्यामुळें स्वतः गादी बळकावण्यासाठीं औरंगझेबानें आदिलशहा व शिवाजी यांच्यांशीं तह करून आग्र्याकडे मोर्चा फिरविला. वास्तविक दारा, शुजा, औरंगझेब व मुराद हे चौघे सख्खे भाऊ असून त्यांच्यांत परस्परमत्सर व गादीवर बसण्याबद्दलची तीव्र मनीषा होती. "तख्त् (गादी) या (किंवा) तख्त (थडगें)" ही त्यांची प्रतिज्ञा होती आणि त्यासाठीं या चौघांनीं सूक्ष्मासूक्ष्म वाटेल त्या खटपटी केल्या. दारावर बापाची मर्जी फार म्हणून प्रथम तिघांनीं त्याच्याविरुद्ध लढाई करून त्याला नामशेष केलें आणि पुढें औरंगझेबानें उरलेल्या दोघांनां वाटेंतून दूर करून गादी बळकावली (१६५८ मे). या कामांत अथपासून इतिपर्यंत औरंगझेबानें कपट, फितुरी, वचनभंग इत्यादि अनेक गोष्टी केल्या आणि धूर्तता, तडफ, सावधानता, समयोचितपणा, निश्चयी स्वभाव, इत्यादि गुणांच्या जोरावर तिघा भावांनां व बापालाहि आपल्या मार्गांतून दूर सारलें. दारा हा धर्माच्या कामीं सहिष्णु असून त्यानें कांहीं उपनिषदांचें फारशी भाषांतरहि करविलें होतें; तें कारण दाखवून औरंगझेबानें धर्मवेड्या मुसुलमानांनां आपल्या बाजूस ओढलें होतें; शिवाय कासीमखानानें धरमतच्या लढाईंत दाराविरुद्ध फितुरी केली होती. औरंगझेबानें शहाजहानास पकडून शेवटपर्यंत कैदेंत टाकलें, मुरादला फांशीं दिलें, शुजाला आराकानमध्यें कायमचें हांकलून दिलें, शुजाला मदत केल्याबद्दल स्वतःचा मुलगा मुहंमद याचा वध केला, दाराचा मुलगा सुलेमान याला विश्वासघात करून विष चारलें

दारावर नास्तिकपणाचा आरोप ठेवून त्याचें डोकें उडविलें. हीं सर्व दुःखें सहन न झाल्यानें शहाजहानहि थोडयाच दिवसांत मेला (१६६६ जाने.). शहाजहानमध्यें अनेक दुर्गुण व थोडेसे सद्गुण होते. त्याचा दरबार भपक्याचा असून त्यानें ताजमहालासारखी जगविख्यात इमारत बांधविली होती. परंतु त्यानें बापाविरुद्ध बंड केलें, वडील भाऊ व गादीच्या आड येणारे नातेवाईक यांनां ठार मारलें, मुमताज मेल्यावर बेअब्रू होईल इतका तो विषयी बनला व राजकीय कामांत क्रौर्य, विश्वासघात, बेजबाबदारपणा इत्यादि गोष्टी त्यानें केल्या. चोरांचा सुळसुळाट इतका होता कीं, त्यांचीं डोकीं उडवून, तसलीं ३० ते ४० डोकीं ज्या दगडी मिनारांत चुन्यानें चिणीत असत असले चोरमिनार एकटया कानपूर जिल्ह्यांतच २६० होते. मात्र शुजाच्या कारकीर्दींत बंगालच्या व्यापार व शेती भरभराटली होती आणि संपत्ति भरपूर होती. शहाजहानच्या कारकीर्दींत मोंगली व हिंदी कलाकौशल्य उच्च दर्जाचें होतें. या वेळचें शिल्प फारसें नसून भव्य व मजबूत कोमल व जनानी तऱ्हेच्या सौंदर्याचें होतें; लाल दगडाऐवजीं संगमरवरी दगड पुढें आला. शहाजहानाबाद उर्फ दिल्ली १६४८ त नवीन वसाविण्यास प्रारंभ केला. ताजमहालास २२ वर्षें लागलीं व हिंदीपारसिक शिल्पाचा उत्कृष्ट नमुना जी मोतीमशीद ती १६५३ त पुरी झाली. चित्रकलेंत यूरोपियन कलेचा थोडासा प्रवेश होऊन ती बरीच उच्च दर्जास गेली. या वेळीं कुंचल्याची सफाई इतकी होती कीं, खारीच्या शेपटीच्या एका केसाची सुद्धां कुंचली तयार होई व तिनें अत्यंत बारीक रंगीत चित्र रेखाटलें जाई. व्यक्तीचा चेहरा हुबेहुब दाखविण्याचें कौशल्यहि या वेळीं साधलें होतें. बीरसिंगानें सर्व हिंदुस्थानांतलें–अत्यंत पैसा खर्चून (३३ लाख रु.) बांधलेलें–मथुरेचें केशवाचें देऊळ शहाजहानाच्या कारकीर्दीपूर्वी तयार झालें, त्यांत हिंदु शिल्प उत्तम दर्जाचें होतें तें औरंगझेबानें पुढें पाडलें. शहाजहानानें नवीन देवळें बांधू दिलीं नाहींत. बादशाहनामा व मुंतखबुल लुबाब हे फारशी इतिहास यावेळीं तयार झाले आणि बिहारीलाल हा नांवाजलेला हिंदी कवि पुढें आला.

**औरंगझेब**—औरंगझेबानें खरें राज्यारोहण १६५९त केलें. इतक्यांत आसामी लोकांनीं बंडाळी केल्यानें त्यांच्यावर मीरजुम्ला यास धाडण्यांत आलें, पण त्याचा पराभव होऊन तिकडे त्याचा अंत झाला. याप्रमाणें राज्यावर बसविण्यांत औरंगझेबास ज्यानें फार मदत केली व जो त्याला डोईजड झाला होता त्याचा परस्पर शेवट झाला (१६६३). दक्षिणेंतून औरंगझेब गेल्यामुळें आदिलशाही व कुत्बशाही यांनां पुढें तीस वर्षें मोंगलांची भीति राहिली नाहीं; पण शिवाजीनें मात्र त्यांनां पुष्कळ त्रास दिला व आपलें राज्य वाढविलें. आदिलशहाचे शिवाजीला ताब्यांत आणण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ झाले. नंतर ठरलेला तह मोडून औरंगझेबाच्या शास्ताखान नांवाच्या दक्षिणच्या सुभेदारानें शिवाजीचा कांहीं प्रांत घेतला म्हणून शिवाजीनें त्याच्यावर मोठया युक्तीनें हल्ला करून त्याला पळवून लावलें व मोंगली मुलखांत स्वाऱ्या सुरू करून खंडण्या बसविल्या आणि सुरतेहून पुष्कळ संपत्ति आणली. शास्ताखान पुढें बरींच वर्षें बंगालचा सुभेदार होता. शिवाजीचें बळ वाढलेलें पाहून औरंगझेबानें जयसिंहास त्याच्यावर पाठविलें. काळवेळ जाणून शिवाजीनें आदिलशहाविरुद्ध जयसिंहास मदत केली व आग्र्यास प्रयाण केलें. तेथें विश्वासघात करून औरंगझेबानें त्याला नजरबंद केलें असतां त्यानें युक्तीनें आपली सुटका केली (१६६६). जयसिंगानें ज्या औरंगझेबास अनेकवार मदत केली त्या औरंगझेबानेंच बहुधां जयसिंगाला विषप्रयोग करवून मारलें असें म्हणतात (१६६७).कारण हिंदूंचा छळ करण्याच्या कामीं तो आड येत असे. यानंतर मुअज्झम व जसवंतसिंह हे दख्खनचे सुभेदार होते. परंतु त्यांच्यानें शिवाजीच्या राज्यविस्तारास आळा बसला नाहीं. शिवाजीनें पुन्हां सुरत, कारंजा, खानदेश, खुद्द औरंगाबाद इत्यादि ठिकाणीं स्वाऱ्या करून व खंडण्या घेऊन चौथाई व सरदेशमुखीचा हक्क प्रस्थापित केला. पुढें त्यानें स्वतःस राज्याभिषेक केल्यावर पुन्हां खानदेश–वऱ्हाडांत चौथाई वसूल केली व अनेकदां मोंगली अंमलदारांनां पळवून लावलें. कांहीं ठिकाणीं तर समोरासमोर मैदानी लढायांत मोंगली सैन्याचा त्यानें पराभव केला; त्यामुळें त्याच्या वाटेस कोणीहि मोंगल सरदार जाईना. तिकडे खुद्द आग्र्याच्या जवळच औरंगझेबाच्या जुलमास त्रासून जाटांनीं बंड केलें त्यामुळें औरंगझेब तिकडे अटकला; हें बंड मधून मधून १६६९ पासून ९१ पर्यंत चालू होतें; त्यांत एकदां तर जाटांनीं अकबराचें थडगें उकरून त्यांतील हाडें जाळून टाकलीं. सत्नामी लोकांनीं, अफगाणांनीं व (तेघबहादूर या नवव्या गुरूस–तो बाटेना म्हणून–ठार मारल्यामुळें) शिखांनीं याच सुमारास बंडें केलीं, तींहि

शिवाजीच्या पथ्यावर पडली. त्यानें दक्षिणेंत स्वारी करून बहुतेक कर्नाटक जिंकला व जिंजीसारखा नामांकित किल्ला हस्तगत केला (शिवाजीचें चरित्र व मराठीराज्याचें वर्णन पुढें स्वतंत्र देण्यांत येईल). शिवाजीला हिंदुधर्माचा संरक्षक व मराठ्यांत राष्ट्रीयभावनेचें उत्पादनकर्ता म्हणून कांहीं कट्टया यूरोपियन लेखकांनींहि म्हटलें आहे. औरंगझेबानें १६६८ त सरकारी अखबारनिसांनां इतिहासलेखनाची बंदी केली, ती त्याच्या मृत्यूपर्यंत कायम होती. त्यामुळें त्यावेळची खाफीखानाची अथवा इतर मुसुलमान लेखकांच्या बखरी पुष्कळ बाबतींत अविश्वसनीय आहेत. यापुढील दोन वर्षांत औरंगझेबानें हिंदूंचीं हजारों देवळें पाडण्याचा व त्यांचीं कथापुराणें बंद करण्याचा सपाटा लावला; पैकीं काशीविश्वेश्वराचें व मथुरेचें केशवदेवाचें देऊळ याच वेळीं पाडण्यांत आलें (१६६९-७०). जयसिंग मेल्यानें औरंगझेबाला हिंदूंचा छळ करण्यास सवड सांपडली व यावेळेस त्याचें आसनहि स्थिर झालें होतें. त्यासाठीं त्यानें जसवंतसिंगासहि विष देऊन मारलें व त्याच्या मुलाच्या पाठीमागें तो लागला असें टॉडचें म्हणणें आहे. परंतु दुर्गादासानें व मेवाडकर राजसिंगानें मुलाचा बचाव केला. त्यामुळें औरंगझेबानें रजपुतांवर स्वारी केली व याच सुमारास जिझिया कर पुन्हां बसविला. सर्व मालमत्तेची किंमत काढून तिच्या दर शेंकडा ३ टक्के हा कर घेत. त्यामुळें हिंदु लोक चिडले. शिवाजीनें या करावद्दल औरंगझेबास एक खरमरीत पत्र लिहिलें होतें. रजपुतांची व औरंगझेबाचीं युद्धें अनेक वर्षें चालू होतीं; त्यांत औरंगझेबास विशेष लाभ झाला नाहीं. उलट त्याचा आवडता मुलगा अकबर हा रजपुतांस मिळाला. त्यावेळीं एक तर औरंगझेब रजपुतांच्या हातीं लागण्याची संधि आली होती. पुढें अकबर दक्षिणेंत येऊन संभाजीच्या आश्रयास राहिला व कांहीं काळानें इराणांत निघून गेला. औरंगझेबानें नामुष्कीचा तह करून मेवाडशीं चालविलेली लढाई थांबविली (१६८१). नंतर तो आपल्या प्रचंड सैन्यानिशीं मराठे, आदिलशहा व कुत्बशहा यांनां नामशेष करण्यासाठीं औरंगाबादेस आला. प्रथम त्यानें मराठ्यांशीं लढाई सुरू केली, पण तींत त्याला कांहीं फलप्राप्ति झाली नाहीं. संभाजीनें त्याला दमविलें म्हणून त्यानें विजापुरावर स्वारी केली त्यावेळीं संभाजीनें आदिलशहास मदत केली. पण आदिलशाहींत सर्वत्र बेबंदशाही माजल्यानें अखेर औरंगझेबानें विजापूर घेतलें (१६८६). तेथील सुलतानाला १५ वर्षें कैदेंत ठेवून पुढें औरंगझेबानें त्याला विष दिलें. विजापुराहून निघून औरंगझेबानें गोवळकोंडयास वेढा दिला. अनेक उपायांनीं व लढून किल्ला हस्तगत होईना, तेव्हां त्यानें लांच देऊन व फितुरी करून किल्ला घेतला व अबुलहसन कुत्बशहास दौलताबादेस कैदेंत ठेविलें (१६८७). त्यानंतर दोन वर्षें मराठ्यांनीं औरंगझेबास दाद दिली नाहीं, पण संभाजी गाफिलपणानें त्याच्या हातीं लागला व त्याचा रानटीपणानें शेवट करण्यांत आला (१६८९). परंतु या कृत्यानें मराठे दबले न जातां जास्त चवताळले व पुढें १८ वर्षें म्हणजे औरंगझेबाच्या मरणापर्यंत त्यांनीं त्याला सतावून सोडलें. मध्यंतरी औरंगझेबाचा वडील मुलगा मुअज्झम (शहाअलम्) यानें आदिलशहाच्या बचावाचा राजद्रोही प्रयत्न केल्यानें बापानें त्याला पकडून सात वर्षें कैदेंत ठेविलें; पण अकबर इराणांतून हिंदुस्थानवर चालून येत आहे असें पाहून शहाअलमला सोडून त्याचेवर पाठविलें. त्यानें अकबराला पळवून लाविलें (१६९४). संभाजीनंतर राजाराम व त्याच्यानंतर रामचंद्रपंत अमात्य व इतर मराठमंडळ यांनीं औरंगझेबास मुळींच विश्रांति घेऊं दिली नाहीं. त्यांनीं त्याचा सर्व खजिना रिता केला आणि त्याच्या तंबूचे कळस कापून नेले. त्यांतच दक्षिणेंत सात आठ वर्षें प्लेग आणि दुष्काळ पडून त्याचें सैन्यहि कमी झालें. त्याचें सैन्य ९ लाख होतें आणि त्याचा तळ १५ कोस घेरांचा व २५० निरनिराळ्या बाजारांचा होता. एवढ्या वैभवाचा औरंगझेब, मराठ्यांनां जिंकण्याची आशा सफल न होतां अहमदनगर येथें २४ वर्षांनीं परत येऊन मेला (१७०७ फेब्रु.). त्याचें थडगें रोझ्यास आहे. तो कट्टर हानिफी मताचा मुसुलमान होता, त्यानें आपल्या मुलांनांहि तसलें धार्मिक शिक्षण दिलें होतें. कुराणांत सांगितल्याप्रमाणें त्यानें स्वतःचा आयुष्यक्रम आंखला होता. त्यानें हिंदूंचा अत्यंत छळ केला, न्यायखातें सर्वस्वीं मुसुलमानी धर्मावर स्थापिलें. त्यामुळें मुसुलमानांनीं त्याचा फार मान ठेवला परंतु राजा या दृष्टीनें तो कुच कामाचा ठरला. त्याच्यानें पुढें पुढें सर्व राज्यावर सारखी हुकमत ठेववली नाहीं. तो फार संशयी होता. बापाशीं व भावांशीं स्वतः केलेली वाईट वागणूक आपलीं मुलें आपल्याशीं करतील ही त्याला भीति वाटे. पुढें त्याचे सरदारहि स्वतंत्र बनूं लागले. त्याचा सर्व भर लुच्चेगिरीवर असल्यानें तो उत्तम सेनापति नव्हता. वाङ्मय व कला यांस त्यानें मुळींच मदत केली नाहीं. उलट

(अनेक जुनी, निरनिराळ्या कलाकुसरीचीं देवळें पाडून) त्यांची मुद्दाम पिछेहाट केली. त्याच्या आयुष्यांतील सर्व धोरण विश्वासघाताचें होतें व त्याबद्दल त्याला मरणाच्या वेळीं सुद्धां पश्चात्ताप झाला नाहीं. औरंगझेबाच्या राज्याचे २१ सुभे होते, सैन्य फार असलें तरी बेशिस्त होतें. औरंगझेबाचा समकालीन मनूची म्हणतो कीं, चांगलें शिस्तीचें ३० हजार यूरोपियन सैन्य मोंगली राज्य काबीज करूं शकेल. मोंगली आरमारहि चांगलें नव्हतें.

**बहादूरशहा वगैरे**–औरंगझेबाचा मुलगा शहाअलम् यानें अझम व कामबक्ष या आपल्या २ भावांनां लढाईंत मारून गादी बळकावली व बहादूरशहा असें नांव धारण केलें. नंतर त्यानें रजपूत राजांशीं तह करून शाहूस दक्षिणेंत जाऊं दिलें व त्यामुळें मोंगली राजाचे दोन शत्रू तात्पुरते गप्प बसविले परंतु पंजाबांत शिखांनीं बंड उभारलें. औरंगझेबाच्या कारकीर्दीत शिखांचा गुरु गोविंदसिंग यानें मुसुलमानांच्या विरुद्ध शिखांची एक लष्करी जात निर्माण केली होती. त्यानें बहादूरशहास गादी मिळविण्याच्या कामीं मदत दिली होती. त्याच्या मुलांनां सरहिंदच्या मुसुलमान सुभेदारानें क्रूरपणानें ठार मारल्यानें शीख गुरु बंदा यानें मुसुलमानांविरुद्ध हत्यार उपसलें. शिखांनीं अनेक मुसुलमान कापून काढले आणि कांहीं मशिदी पाडून टाकल्या. त्यांचा तात्पुरता समाचार बहादूरनें घेतल्यावर थोडयाच दिवसांत तो मेला(१७१२). त्याच्या चार मुलांत गादीसाठीं भांडाभांडी सुरू झाली, तींत जहांदरनें तिघांनां मारून स्वतः गादी बळकावली; पण त्याचा त्याच्या फर्रुखसियर नांवाच्या पुतण्यानें खून करून राज्य घेतलें (१७१३). हा दुष्ट, व्यभिचारी व नालायक असल्यानें त्याला सय्यदबंधूंनीं (अबदुल्ला व हुसेनअल्ली यांनीं) ठार करून तीन चार नामधारी शहा गादीवर बसविले. फर्रुखसीयरनें बंदागुरूचा रानटीपणानें वध करून हजारों शिखांची कत्तल केली होती. या धुमाकुळींत इंग्रजांनां व्यापाराच्या बाबतींत कांहीं सवलती मिळाल्या होत्या (१७१९). याच धुमाकुळीचा फायदा घेऊन मराठ्यांनीं आपला हात दिल्लीच्या राजकारणांत शिरकविला. मुहम्मदशहा नांवाच्या बादशहानें हुसेनअल्लीस ठार करून अबदुल्लास कैदेंत टाकलें. यानें १७४८ पर्यंत राज्य केलें पण तो नालायख होता. त्याचा फायदा घेऊन त्याचा वझीर चिनकिलीचखान उर्फ आसफजाह यानें दक्षिणेंत हैद्राबाद येथें स्वतंत्र सत्ता स्थापन केली (१७२४). सादतखानानें (दुसरा वजीर) अयोध्येस राज्य स्थापिलें, अलीवर्दीखाना(बंगालच्या सुभेदारा)नें बंगालचें स्वतंत्र राज्य केलें आणि रोहिल्यांनीं रोहिलखंड निराळें केलें. याप्रमाणें औरंगझेबाच्यानंतर सतरा वर्षांत मोंगली राज्याचे तुकडे पडले. बाळाजी विश्वनाथानें सय्यदबंधूंनां सहाय्य देऊन व मुहम्मदशहाकडून दख्खनमध्यें चौथाई व सरदेशमुखी मिळविण्याच्या सनदा घेऊन, शाहूचें स्वतंत्र राज्य कबूल करवून घेतलें (१७२०). नंतर हे दोन कर वसूल करण्यासाठीं पेशव्यानें मोंगली प्रांतांत आपलें निरनिराळे हस्तक ठेवून त्यांचा परस्परांवर दाब असावा या दृष्टीनें त्यांनां एकाच प्रांतांत निरनिराळे हक्क दिले. त्यामुळें मराठी राज्याची व्यवस्था लागून त्याचा विस्तारहि झाला. थोरल्या बाजीरावानें शिंदे–होळकरादि नवीन सरदार निर्माण करून मुसुलमानांच्या हातून उत्तरहिंदुस्थान सोडविण्यासाठीं तिकडे अनेक स्वाऱ्या केल्या व आसफजाह उर्फ निजाम यालाहि दाबांत ठेवलें; बाजीरावाच्या पुढें निजामाचें कांहीं चालेना. हळू हळू बाजीरावानें गुजराथ, माळवा, बुंदेलखंड घेऊन दिल्लीच्या वेशीपुढें आपलें मराठी सैन्य नेलें (१७३७); तेव्हां मुहम्मदशहानें मराठ्यांच्या सल्ल्यानें चालण्याचें कबूल करून आपली गादी राखली. मराठे दक्षिणेंत गुंतले असतां नादीर (तहमास्प) कुलीखान इराणचा शहा यानें गझनी, काबूल, लाहोरवरून थेट दिल्लीपर्यंत स्वारी केली. कर्नाळ येथें बादशाही सैन्याचा पराभव करून तो दिल्लीस आला. गांवकऱ्यांनीं तो मेल्याची खोटी बातमी उठविल्यानें त्यानें नऊ तास एकसारखी कत्तल करून दोन लक्ष लोक मारले. नंतर ५८ दिवस दिल्ली लुटून साडेतीन शतकांत तेथें सांठलेली साडेचवदा कोटी रुपयांची संपत्ति, प्रसिद्ध मयूरसिंहासन व कोहिनूर हिरा यांसह स्वदेशीं नेली आणि सिंधूच्या पलीकडील अफगाणिस्तानादि सर्व मोंगली प्रांत काबीज केला (१७३९). या नंतर दिल्लीस मराठ्यांचें प्राबल्य वाढलें व मोंगली राज्य एकप्रकारें मराठ्यांच्या ताब्यांत गेलें. नादीरच्या नंतर अफगाणिस्तानच्या अहंमदशहा दुराण्यानें हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्यास प्रारंभ केला. दुसऱ्या स्वारींत त्यानें पंजाब घेतला. त्यानंतर ५।६ वर्षांनीं गाजीउद्दीन नांवाच्या वजिरानें मुहम्मदशहाचा मुलगा अहमदशहा याचे डोळे काढून दुसऱ्या अलमगिरास गादीवर बसविलें (१७५४). त्यानंतर दोन वर्षांनीं अहमद दुराणी यानें खुद्द दिल्लीवर स्वारी करून राजधानी लुटली व

अनेक अत्याचार केले. यावेळीं नानासाहेब पेशवा पेशवाईचे गादीवर असून शाहूनें त्याला सर्व मराठी साम्राज्याची वडीलकी दिली होती. त्यानें सर्व मराठमंडळ एक करून उत्तरहिंदुस्थान व दक्षिणहिंदुस्थान इकडे मुलुखगिऱ्या चालविल्या होत्या. रघूजी (थोरला) भोसले, शिंदे, होळकर, पवार, गायकवाड, पटवर्धन, रास्ते इत्यादि सरदारांनीं यावेळीं मराठी राज्य वाढविण्याचा जोराचा प्रयत्न चालविला होता. इतक्यांत राघोबादादानें पंजाब अहंमदशहाच्या हातून हिसकाऊन घेतला. हें मराठ्यांचें वाढतें बळ पाहून सुजाउद्दौला, नजीबखान, हफीजरहमत वगैरे मुसुलमान जहागीरदार हे एक झाले. इतक्यांत अलमगीरचा खून होऊन शहा अलम गादीवर आला. अहंमद दुराण्यानेंहि पंजाबांत पुन्हां आपला अंमल बसविला (१७५९). यावेळीं मराठ्यांची सत्ता शिरोबिंदूस पोहोंचून सर्व हिंदुस्थान त्यांच्या अमलाखालीं आलें होतें असें एल्फिन्स्टन म्हणतो, तें खरें आहे. नानासाहेब व भाऊसाहेब हे यावेळीं सर्व हिंदुस्थानचें साम्राज्य आपल्या ताब्यांत घेण्यासाठीं खटपट करीत होते. नानासाहेब मुत्सद्दी होते तर भाऊसाहेब सेनानी होते. आतां फक्त दुराण्याचाच अडथळा मध्यें होता. मोंगलपातशाही वांचविण्यासाठीं उत्तरेकडील सर्व मुसुलमान मुत्सद्यांनीं व जहागीरदारांनीं दुराण्याला बोलाविलें व त्याला तोंड देण्यासाठीं भाऊसाहेब मराठी फौजेनिशीं उदगीरहून निघाले. भाऊसाहेबांनीं दिल्ली एका झटक्यांत काबीज केली. पुढें पावसाळ्यामुळें दुराणी व मराठे हे स्वस्थ बसले (१७६०). पावसाळ्यानंतर मराठ्यांनां हुलकावणी देऊन अहमदशहा यमुना उतरला (आक्टोबर). त्यामुळें नाइलाजानें मराठ्यांनां पानपतास खंदक खणून रहावें लागलें. गोविंदपंत बुंदेल्यानें दुराण्याची रसद बंद केल्यानें त्याचे फार हाल झाले, पण एकदां गफलतीनें जात असतां गोविंदपंत मारला गेला. इकडे उलट मराठ्यांचे रसद न मिळाल्यानें हाल होऊं लागले. सर्व तऱ्हेची आशा संपल्यावर भाऊसाहेबांनीं दुराण्याशीं लढाई दिली. तीनप्रहरपर्यंत मराठ्यांचा जय होता व इब्राहिमखानाच्या तोफखान्यानें दुराण्याची बरीच फौज भाजून काढून पळविली होती. इतक्यांत दुर्दैवानें विश्वासरावास गोळी लागली व ते गतप्राण झाले त्यामुळें निराशेनें भाऊसाहेब हत्तीवरून उतरून घोडेस्वार झाले आणि हिंदुस्थानांतील नेहमीच्या संप्रदायाप्रमाणें मुख्य सेनापति दिसेनासा झाल्यानें गोंधळून आधींच उपासमारीनें हलक्या झालेलें मराठी सैन्य मागें निघालें आणि दुराण्याचा जय झाला (१४ जानेवारी १७६१). पण हा जय त्याला इतका महाग पडला कीं पुढें दुराणी ११ वर्षें जगला असतांहि मराठ्यांच्या फारसा वाटेस गेला नाहीं. या युद्धानें मराठी साम्राज्य स्थापण्याची संधि गमावली गेली. अपयशाच्या कारणांची मीमांसा येथें न देतां पुढें (मराठ्यांच्या भागांत) देऊं.

मोंगली बादशाहीहि वरील प्रसंगानें यावेळीं नामशेष झाली; त्यामुळें तिच्या ऱ्हासाचीं कारणें येथें देतों. आशियांतील चालीप्रमाणें ही पातशाही एकमुखी म्हणजे राजाच्या तंत्रानें चालणारी होती. अशा ठिकाणीं राजा जसा बरावाईट असेल व त्याची हुकमत सैन्यावर जशी असेल तसें राज्य टिकतें अथवा मोडतें. राज्ययंत्रास एक शिस्त नसे, लोकांच्या स्वदेशाभिमानाची व राज्य म्हणजे आपलें होय या भावनेची जोड नसे व संघटनात्मक निरनिराळ्या राज्यतंत्रांच्या संस्था नव्हत्या कीं ज्यांचा अनुभव पिढ्यानुपिढ्या टिकूं शकेल. मोंगलराजांत अकबरच काय तो राज्य कसें टिकवितां येईल या दृष्टीनें विचार करून त्याप्रमाणें थोडाफार वागणारा झाला. औरंगझेबानें पुष्कळ वर्षें राज्य केलें, पण त्याच्या बिनशहाणपणाच्या कृतीनें त्यानेंच मोंगली राज्य पोखरून ठेवलें, राज्यांत व सैन्यांत चैनबाजी शिरली. त्यामुळें नुसता फुगीर दिसणारा मोंगली साम्राज्याचा बुडबुडा अखेर मराठ्यांनीं फोडला. जुलूम, अधिकाऱ्यांवरील बादशहाच्या दाबाचा अभाव, जुलुमामुळें पसरलेलें दारिद्र्य, सरकारी खजिन्यांतील तुटवडा, सुयंत्र राज्यकारभार नसणें, हिंदूंचा अमानुष छळ, त्यामुळें रजपुतांचा पाठिंबा नाहींसा होणें गादीबद्दल शहाजाद्यांमध्यें चालणाऱ्या यादवी, आरमाराकडे दुर्लक्ष्य इत्यादि कारणांनीं औरंगझेबाच्या मरणानंतर हें खिळखिळें झालेलें मोंगली साम्राज्यरूपी जहाज सह्याद्रींतील प्रचंड काळ्या खडकाप्रमाणें असलेल्या मराठेरूपी खडकावर आपटून फुटलें. [ सियरूल मुताखिरीन; खाफीखान; ग्रँट डफ; काशीराजाची बखर; कनिंगहॅम–हिस्टरी ऑफ धि शीख्ज; कीन–फॉल ऑफ धि मोंगल एंपायर; मिडोज टेलर; आयर्व्हिन; मनुची; एलफिन्स्टन; बर्निअर; फ्रायर; गेमेली कारेरी; टॉड; लेनपूल–औरंगझेब; जदुनाथ–औरंगझेब; बिलिमोरीया–औरंगझेब्स लेटर्स; मराठी बखरी; इलियट ॲंड डॉसन; माआसीरी आलमगिरी; मुंडी; टयाव्हर्निअर; होस्टेन–बंगाल पास्ट ॲंड प्रेझेंट; ऑर्म; राव्हर्टी, बिव्हरीज–जहांगीर्स मेमॉयर्स; ग्लाडविन–हिस्टरी ऑफ हिंदोस्तान; टेरी–व्हॉयेज; ऐने– ई–अकबरी; अकबरनामा;

तबकात–ई –अकबरी; मुंतखबुत तवारीख; जेसुईट मिशन्स ड अकबर; स्मिथ–अकबर; बाबर्स मेमॉयर्स; जौहर्स मेमॉयर्स; फिरिष्ता; अर्स्किन–बाबर अँड हुमायून; लेन-पूल–बाबर; थॉमस–पठाण किंग्ज ऑफ दिल्ली ].

मराठ्यांचा इतिहास या विभागांत स्वतंत्र दिला नाहीं याचें कारण तो 'महाराष्ट्र' विभागांत सविस्तर यावयाचा आहे. स्वराज्य मिळविण्याप्रीत्यर्थ मराठ्यांनीं कशी उचल केली याची त्रोटक पण सुसंबद्ध माहिती 'बुद्धोत्तर जग' (ज्ञा. को. वि. ४) या विभागांत सांपडेल. शिवाय याहि विभागांत मोंगल व ब्रिटिश यांचा इतिहास देतांना अनुषंगानें मराठे साम्राज्याचा इतिहास जरूर तेवढा दिला आहे.

**परकीय यूरोपियनादि प्रवासी व त्यांच्या वसाहती**–सोळाव्या शतकापासून परकीय यूरोपियन प्रवाशांचा व वसाहतकारांचा संबंध हिंदुस्थानशीं येऊं लागला. गुजराथच्या मुसलमान राजानें हुमायूनच्या वेळीं परकियांची मदत घेण्याचा प्रयत्न केला होता. अकबराचा संबंध पोर्तुगीजांशीं बऱ्याच वेळां आला होता. ख्रिस्ती शकाच्या पहिल्या तीन शतकांत रोमन-साम्राज्याशीं हिंदुस्थानचा व्यापारी संबंध ( खुष्की व जलमार्गानीं ) नेहमीं येत असे, हें मागें सांगितलेंच आहे. चौथ्या शतकांत हा परदेशी व्यापार बंद होऊन, पुन्हां ९ व्या व ६ व्या शतकांत तो सुरू झाला. अरबांनीं ईजिप्त व इराण जिंकल्यावर हा व्यापार त्यांनीं युरोपियनांपासून आपल्या हातीं घेतला, त्यामुळें व्हेनिस बंदर फार भरभराटीस आलें. त्यावद्दल मत्सर उत्पन्न होऊन स्पेनच्या राजांनीं १४६० पासून हिंदुस्थानचा जलमार्ग शोधण्यासाठीं धडपड चालविली, शेवटीं वास्को द गामा यानें केप ऑफ गुडहोपच्या मार्गानें येऊन कालिकत येथें आपला पाय ठेविला ( २० मे १४९८ ). त्यावेळीं तेथील हिंदु राजा झामोरिन म्हणून होता. त्यानें गामाला मदत करण्याचें आश्वासन दिलें, पण अरब व्यापाऱ्यांनीं गामाला हुसकाऊन दिलें त्यामुळें तो स्वदेशीं परत गेला. त्याच्या मागून ( १५०० ) काब्राल हा बरोबर संरक्षणार्थ आरमार घेऊन कालिकत येथें आला व तेथें त्यानें वखार स्थापिली आणि व्यापार सुरू केला, यालाहि अरब ( मोपला ) लोकांनीं जोराचे अडथळे केल्यामुळें पोर्तुगीजांनीं त्यांच्यावर भयंकर अत्याचार केले, मात्र त्यावेळीं त्यांनीं हिंदूंनां त्रास दिला नाहीं. यावेळीं पोर्तुगीजांमध्यें दोन तट उत्पन्न झाले; अले-ढाच्या पक्षाचें म्हणणें आपली आरमारी शक्ति जोरांत ठेवून मग वाटल्यास हिंदुस्थानांत राज्यविस्तार करावा, दुसऱ्या म्हणजे अल्बुकर्क पक्षाचें म्हणणें आरमाराऐवजीं किनाऱ्यावरील मोक्याचीं बंदरें ताब्यांत घेऊन व तेथें शिबंदी वगैरे ठेवून आणि हिंदु बायकांशीं लग्नें लावून राज्यविस्तार करावा. त्यांत अल्बुकर्कच्या पक्षाचें म्हणणें पुढें अपुरें ठरलें. मात्र त्यानें आपल्या म्हणण्याच्या सिद्धतेसाठीं प्रथम आदिलशाहींतील महत्त्वाचें बंदर गोंवा हें घेऊन तेथें आपली राज्यव्यवस्थाहि सुरू केली (१५१०); मुसलमान अधिकारी काढून त्यांच्या जागीं फिरंगी व हिंदू नेमले, हिंदु शिपायांची पलटन प्रथम तयार केली, व सतीची चाल बंद केली आणि ग्रामपंचायतीस उत्तेजन दिलें. राज्यविस्ताराबरोबरच हिंदुस्थानचा परदेशाशीं होणारा व्यापार जो मुसुलमानांच्या (मूर) हातीं होता तो सर्वस्वीं आपल्या हातीं घेण्याचाहि त्यानें प्रयत्न चालविला व त्यांत त्याला थोडेंबहुत यशहि येत चाललें, विशेषतः मसाल्याचा व्यापार त्यानें बराच बळकावला. मलाका हें बंदर या मसाल्याच्या व रबराच्या व्यापारासाठीं उतारपेठ म्हणून प्रख्यात होतें म्हणून तें अल्बुकर्कनें काबीज केलें (१५११). तें पुढें १३० वर्षांनीं डचांनीं घेतलें व १८२४ त इंग्रजांनीं हस्तगत केलें. मसाल्याच्या बेटांबद्दलहि अल्बुकर्कनें झटापट केली होती. तांबड्या समुद्रावर ताबा बसविण्यासाठीं त्यानें मुसुलमानांच्या एडनवर स्वारी केली, पण ती फसली, मात्र इराणी अखातावरील होर्मझ बंदर त्यानें हाताखालीं घातलें. मलाकाप्रमाणेंच हें त्यावेळीं अत्यंत भरभराटीस आलेलें व सर्व देशांच्या व्यापाऱ्यांनीं गजबजलेलें होतें. पुढें इंग्रजांनीं १६२२ त तें फिरंग्यांपासून घेतलें. हल्लीं तें मागें पडून बंदर अब्बास हें पुढें आलें आहे. मिश्र लग्नें लावून आपल्या राज्यास बळकटी आणण्याचें अल्बुकर्कचें धोरण चुकलें, कारण या मिश्र प्रजेच्या ठिकाणीं यूरोपियनांचे राज्यकर्त्यास आवश्यक असणारे गुण उत्पन्न न होतां उलट ते खालावत चालले असें स्मिथ म्हणतो (ऑ. हि. ३३९). पोर्तुगीजांनीं मुसुलमानांवर भयंकर जुलुम केला, खुद्द अल्बुकर्कनें झामोरीनला विषप्रयोग करविण्याच्या कामीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. गोव्यास १५६० त स्थापन झालेल्या इन्क्विझिशननें एतद्देशीय लोकांनां बाटविण्यासाठीं भयंकर, अनन्वित व रानटी अत्याचार केले, गोव्याचें सरकार अत्यंत दुर्बल झालें होतें, सरकारी अधिकारी नीतिभ्रष्ट होते, १५८० नंतर यूरोपियन राजकारणाचा परिणाम

सहन करण्याची ताकद गोंवेसरकारांत नव्हती, पोर्तुगालला इतक्या लांबच्या वसाहतीवर जरब ठेवतां येईना, इत्यादि कारणांनीं पोर्तुगीजांनां हिंदुस्थानांत राज्य स्थापतां आलें नाहीं व त्यांचें तेज इंग्रज व डच यांच्यापुढें फिक्के पडलें. हल्लीं गोंवें (१३०१ चौ. मै.), दमण (१०० चौ. मै.) व दीव (२० चौ. मै.) एवढाच काय तो पोर्तुगीजांचा प्रांत हिंदुस्थानांत आहे.

सतराव्या शतकाच्या प्रारंभीं डच व इंग्रज या दोघांनीं एकाच वेळीं पोर्तुगीजांशीं टक्कर देण्यास प्रारंभ केला त्यांत फिरंगी हरले. प्रथम डचांनीं आपली सत्ता पसरविली परंतु शेवटीं डचांनां सैन्याचा जोर नसल्यानें इंग्रजांनींच एकोणिसाव्या शतकांत त्यांनां हुसकाऊन आपले पाय रोंवले. या काळांत गोंवें बंदरासहि फारसें व्यापारी महत्त्व उरलें नाहीं. डचांनीं पुढें हिंदुस्थाना ऐवजीं जावा व मसाल्याचीं बेटें इकडेच आपला पसारा जास्त पसरला. अंबोयना येथें १६२३ त इंग्रजांची जी कत्तल झाली तीमुळें डचांनां जास्तच जोर आला. ड्यानिश ईस्ट इंडिया कंपनी नांवाची डेन्स लोकांचीहि एक व्यापारी कंपनी इ. स. १६१६ त स्थापन झाली होती, पण तिची भरभराट न झाल्यानें त्या लोकांनीं १८४५ त ती इंग्रजांनां विकली. फ्रेंच लोक सर्वांच्या शेवटीं (१६६४ त) हिंदुस्थानांत आले, परंतु त्यांनां हिंदुस्थानचा व्यापार किंवा राज्य हस्तगत करतां आलें नाहीं. सांप्रत चंद्रनगर, पांदेचरी वगैरे किरकोळ वसाहती त्यांच्या ताब्यांत आहेत. इंग्रजफ्रेंचांचा हिंदुस्थानांत राज्य स्थापण्याचा झगडा पुढें देऊं.

स्पेनच्या आरमाराचा १५८८ त इंग्रजांनीं धुव्वा उडविल्यामुळें पूर्वेकडे व्यापार करण्याची ईर्षा उत्पन्न होऊन, एलिझाबेथनें १६०० त स्थापन झालल्या ईस्ट इंडिया कंपनीला व्यापाराची सनद दिली. पहिली बारा वर्षें या कंपनींतील मोठमोठ्या व्यापाऱ्यांनीं सुट्या सुट्या व स्वतःच्या जबाबदारीवर हिंदुस्थानाकडे सफरी मारल्या परंतु फिरंग्यांनीं त्यांनां विरोध केल्यामुळें अखेर(१६१२) त्यांनीं एकत्र होऊन व गुजराथच्या मोंगल सुभेदाराचा परवाना मिळवून सुरत, खंबायत वगैरे ठिकाणीं व्यापारास प्रारंभ केला; आणि पुढें बादशाही फर्मान मिळवून सुरतेस पहिली वखार घातली आणि पोर्तुगीजांशीं आरमारी लढाया मारून त्यांनां दुर्बळ केलें(१६१५,१६२२). या सुमारास जहांगीरच्या दरबारीं सर थॉमस रो हा इंग्रजांचा वकील आला व त्यानें आपल्या देशासाठीं जहांगीरकडून कांहीं हक्क मिळविले. पश्चिम किनाऱ्यावर यापुढें किरकोळ वखारी इंग्रजांनीं घालून मग पूर्वकिनाऱ्यावर मच्छलीपट्टण, आरमगांव इत्यादि ठिकाणीं व बंगाल्यांत(१६२५)हि कांहीं वखारी घातल्या. पुढें तटबंदीची जागा असावी या इच्छेनें इंग्रजांनीं चंद्रगिरीच्या राजापासून सालीना ६ हजार रुपयांच्या भाडेपट्ट्यानें पूर्व किनाऱ्यावर दोन चौरस कोसांची जमीन विकत घेतली व तेथें एक किल्ला बांधून त्याचें नांव सेंट जार्ज ठेवलें(१६३९).हेंच सांप्रतचें मद्रास शहर होय.पुढें औरंगझेब दक्षिणेंत आहे असें पाहून व बंगालच्या नवाबाची समजूत पाडून इंग्रजांनीं कलकत्ता येथें फोर्ट विल्यम म्हणून एक किल्ला बांधला (१६९०), पोर्तुगीजांनीं डचाविरुद्ध स्वतःस मदत करण्यासाठीं मुंबई बेट इंग्लंडचा राजा दुसरा चार्लस याला हुंडयादाखल दिलें, तें त्यानें सालीना १०० रु. स्वामित्वानें ईस्ट इंडिया कंपनीस दिलें.आंगियर या मुंबईच्या गव्हर्नरानें(१६७०) मुंबई शहराची बरीच सुधारणा केली. इ. स. १६८३ त कंपनीचा एक लष्करी अधिकारी केगविन यानें कंपनीविरुद्ध बंड करून मुंबई बेट एक वर्ष ताब्यांत ठेवलें होतें. त्यामुळें पुढें सुरतेचें महत्त्व जाऊन कंपनीचें ठाणें मुंबईस आलें तरी पण वॉरन हेस्तिंग्जच्या वेळेपर्यंत त्याला महत्त्व आलें नाहीं आणि बोरघाटांत व थळघाटांत रस्ते होईतोंवर मुंबईचें बंदर भरभराटीस आलें नाहीं. सतराव्या शतकाच्या अखेरीस ई. इं. कंपनीला इंग्लंडमध्यें बरेच अडथळे उत्पन्न होऊन दुसरी एक व्यापारी कंपनी निर्माण झाली त्यामुळें त्या दोन्ही कंपन्यांत अनेक भांडणतंटे सुरू झाले, अखेरीस (१७०२) त्या दोघींची मिळून एक कंपनी बनली. या कंपनीच्या व्यापाराला इंग्लंडच्या राजाचा आश्रय होता व तिचे अधिकारी धाडसी, सततोद्योगी व धोरणी होते आणि तिचें आरमारहि बऱ्यापैकीं होतें म्हणून कंपनीला येथें राज्य स्थापन करतां आलें.

**ईस्ट इंडिया कंपनीचा कारभार**–मागें सांगितल्याप्रमाणें १७०२ च्या सुमारास इंग्रज व्यापाऱ्यांची दोन कंपन्यांची मिळून एक ईस्ट इंडिया कंपनी बनली. तिनें साधारण १७५६ पर्यंत व्यापाराच्या पलीकडे फारसें लक्ष घातलें नाहीं. मात्र व्यापारासाठीं तिनें अनेक लटपटी केल्या. मोंगल बादशहास अनेक नजराणे वगैरे देऊन निरनिराळ्या सवलती मागून घेतल्या. पानपत नंतर (१७६१) बंगाल व दक्षिण इकडील कंपनीच्या

कारभारांत मात्र निराळ्या तऱ्हेची उचल होऊं लागली. इंग्रज व फ्रेंच यांच्या भांडाभांडीस १७४६ त सुरुवात होऊन इंग्रजांच्या हातचें मद्रास गेलें. पुढें तें भांडण १७६१ त (पानिपताच्या पूर्वी एक आठवडा) संपून पांडिचेरी इंग्रजांच्या हातीं पडली. बंगाल्यांत कंपनचि व्यापारी फुलटा येथें १७५६ त पळून गेले होते तेहि परत आले. इंग्रज–फ्रेंचांच्या या भानगडी सविस्तर येथें देण्याचें कारण नाहीं; मुख्य मुख्य भाग तेवढा देतों.

फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनी १६६४ त स्थापन झाली. दहा वर्षांनीं मच्छलीपट्टण येथून तिला डचांनीं हांकलून दिल्यानें तिनें कांहीं दिवसांनीं पांडिचेरी येथें दुसरी वखार घातली (१६८३) तीहि डचांनीं कांहीं दिवसांनीं काबीज केली, पण पुढें यूरोपांत या दोन राष्ट्रांत झालेल्या तहानें परत दिली (१६९७). त्यानंतर ५० वर्षें पांडिचेरी व्यापारामुळें भराभराटीस आली होती. डुप्ले हा प्रख्यात गव्हर्नर १७४२ त इकडे आला. चंद्रनगर १६७३ त फ्रेंचांनीं घेऊन, डुप्लेच्या कारकीर्दींत तें भरभराटीस आणलें. याखेरीज मही, कारीकल व यनान हीं गांवें त्यांच्या ताब्यांत आहेत. फ्रेंचांचीं हीं ठाणीं व्यापार, मजबुती व सांपत्तिकदृष्ट्या इंग्रजांच्या ठाण्यांपेक्षां कमी दर्जाचीं होतीं. यूरोपांत फ्रान्स व इंग्लंड यांच्यांत युद्ध सुरू झाल्यानें इकडेहि या दोन कंपन्यांनीं लढाई चालविली (१७४६). तींत लाबर्दोने या फ्रेंच सेनापतीनें एकहि माणूस न गमावतां हल्ला करून इंग्रजांचें मद्रास घेतलें. या सुमारास त्यानें इंग्रजांकडून ४ लक्ष रु. लांच खाल्ला व त्यामुळें त्याचें व डुप्लेचें भांडण झालें असें म्हणतात. त्यांत डुप्लेनें एका इंग्रज आरमाराचा १७४८ त पराभव केल्यानें त्याच्या मनांत हिंदुस्थानांतील इंग्रजांना हांकलून आपलें राज्य स्थापावें अशी महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली. त्यामुळें यूरोपांत या दोन राष्ट्रांत तह झाला असतांहि हिंदुस्थानांत या दोन कंपन्यांनीं तहाकडे दुर्लक्ष करून व तिकडील आपल्या सरकारांचे हुकूम न मानतां इकडील स्थानिक राजांच्या भांडाभांडीच्या मिषानें आपापले (राज्य स्थापण्याचे) हेतु साधण्यास प्रारंभ केला. आसफजाह निजाम या वेळीं (१७४८) मेला, म्हणून त्याच्या गादीबद्दल तंटे लागले, तसेच तंटे तंजावरच्या गादीबद्दल व कर्नाटकच्या नबाबीच्या बाबतींतहि सुरू झाले आणि या निरनिराळ्या तंट्यांत दोन भिरनिराळ्या बाजूंस इंग्रज व फ्रेंच यांनीं मदत करून स्वतःचा फायदा करून घेण्याचा सपाटा चालविला. निजामाच्या बाबतींत फ्रेंचांचा जय होऊन त्यांनीं मुजफरजंगाला निजाम बनविलें. त्यानें डुप्लेस (कृष्णा ते रामेश्वरपर्यंतच्या) दक्षिणचा सुभेदार नेमलें (१७५०). परंतु मुजफरचा खून झाल्यावर डुप्लेनें सलाबतजंगास निजाम केलें. इंग्रजांनीं हातीं धरलेला नासीरजंग मारला गेल्यानें इंग्रज लटके पडले. त्यांनीं हातीं धरलेल्या मुहम्मद अल्लीस फक्त त्रिचनापल्लीचा किल्लाच राहिला व फ्रेंचांनीं मदत केलेला चंदासाहेब खरा कर्नाटकचा नबाब बनला. त्रिचनापल्लीसहि चंदासाहेबानें वेढा घातला, तेव्हां क्लाईव्हनें त्याच्या राजधानीस (अर्काट) उलट वेढा दिला. यावेळीं क्लाईव्ह हा २६ वर्षांचा असून एक कारकून होता. क्लाईव्हनें अर्काट घेतल्यावर चंदानें त्रिचनापल्लीचा वेढा उठवून अर्काटस वेढा दिला पण ५३ दिवस वेढा देऊनहि अर्काट त्याला मिळालें नाहीं. पुढें कावेरीपाक वगैरे दुसऱ्या ठिकाणीं फ्रेंचांचा पराजय होऊन चंदासाहेब मुहम्मदअल्लीच्या हातीं लागला. त्यास मुहम्मद आणि तंजावरचा राजा यांनीं विश्वासघातानें ठार केलें. चंदासाहेब हा शूर आणि उदार मनाचा होता असें ऑर्म म्हणतो. याप्रमाणें मुहम्मदअल्ली हा कर्नाटकचा नबाब बनला व इंग्रज हे फ्रेंचांच्या जागीं पुढें आले (१७५२). निजामाच्या दरबारीं बुसी नांवाचा एक फ्रेंच मुत्सद्दी होता. त्यानें ७ वर्षें निजामावर आपली सत्ता बसवून डुप्लेला पैशाची मदत वरीच केली. बुसीनें आपल्या फ्रेंच सैन्याच्या खर्चासाठीं उत्तरसरकारप्रांत मिळविला होता. इतक्यांत डुप्लेला फ्रेंच कंपनीनें परत बोलावलें त्यामुळें इंग्रज–फ्रेंचांचीं येथील युद्धें बंद झालीं (१७५३). पण पुढें (१७५६) यूरोपांत या दोन राष्ट्रांत सप्तवार्षिक युद्ध सुरू झाल्यानें फ्रेंचांनीं लाली नांवाच्या सेनापतीस इकडे पाठविलें. त्यानें निजामाच्या दरबारांतून बुसीला परत बोलावल्यानें तेथील फ्रेंचांचें वजन नाहींसें झालें. यावेळीं इंग्रजांचा पाय बंगाल्यांत बळकट बसला होता व त्यांना मद्रासचें इतकें महत्त्व राहिलें नव्हतें. लालीच्या मत्सरामुळें पांडिचेरीच्या इतर फ्रेंच अधिकाऱ्यांनीं लढाईच्या कामांत व इतर सरकारी कामांत कुचराई केली. तरीहि त्यानें इंग्रजांचा प्रथम पराभव केला पण पांडिचेरीच्या इतर अधिकाऱ्यांनीं त्याला रसद व सैन्य यांचा पुरवठा न केल्यानें अखेर त्याचा वांदिवाश येथें इंग्रजांनीं पराभव केला (१७६०) आणि पांडिचेरीहि घेतली. लालीनें आपल्या उद्धट स्वभावानें हिंदी लोक व फ्रेंच लोक यांनाहि बराच त्रास दिला होता. यानंतर फ्रेंचांचीं बहुतेक ठिकाणें इंग्रजांनीं काबीज केलीं. आफ्रिका, यूरोप, कानडा, फिलिपाईन बेटें इत्यादि

दुसऱ्या देशांतहि यावेळीं फ्रेंचांनां उतरती कळा लागली होती.

याप्रमाणें ज्या फ्रेंचांनीं १७४६ पासून १७६१ पर्यंत दक्षिणेंत बरेंच प्रामुख्य मिळविलें त्यांच्या अपयशास साधारण पुढील कारणें घडलीं:—फ्रेंच कंपनी इंग्रज कंपनीपेक्षां रचना, धाडस व संपत्ति या बाबतींत कमी दर्जाची होती; तिचे अधिकारी इंग्रजांप्रमाणें धाडशी व चिकाटीचे नव्हते; राजाची सत्ता तिच्यावर फार होती. यूरोप-अमेरिकेंतील लढायांमुळें फ्रान्सला हिंदुस्थानांतील डुप्लेसारख्यांच्या योजनांनां पैसा भरपूर पाठवितां येईना; डुप्ले व बुसी यांच्याशिवाय राज्यप्रसाराची कल्पना बाकीच्या (येथील) फ्रेंच लोकांनां पटेना त्यामुळें तेहि या दोघांनां मनापासून मदत करीतना; डुप्ले गर्विष्ठ असून नावाजलेला मुत्सद्दी नव्हता; इंग्रजांना (१७५७त) श्रीमंत बंगाल मिळाला होता; त्यांचें आरमार श्रेष्ठ होतें; इत्यादि कारणांनीं फ्रेंच फसले. ज्याला सर्व हिंदुस्थान हातांत ठेवावयाचें असेल त्यानें पहिल्यानें उत्तरहिंदुस्थान जिंकिलें पाहिजे व मग दक्षिण घेतली पाहिजे.

विजयानगरचें राज्य नष्ट झाल्यावर म्हैसूर प्रांत एका वोडेयार घराण्यानें आपल्या हाताखालीं घातला. या राज्यांत प्रधान हा बहुधा राजापेक्षां मुख्य असे व राजा नांवाचा असे. १७५५ त येथें नंजराज नांवाचा प्रधान होता व त्याचा एक आवडता मुसलमान दिंदिगलचा फौजदार होता; तोच हैदरअल्ली होय. हळूहळू तो बलाढ्य झाला; पानिपत झालें तेव्हां त्याचा अंमल म्हैसूरच्या राज्यावर बसला. त्यानें १७६३ त बेदनूर लुटलें. त्या संपत्तीमुळेंच आपल्याला पुढें चांगले दिवस आले असें तो म्हणे. म्हैसूरचा राजा १७६६ त मेल्यावर हैदरच खराखुरा म्हैसूरचा राजा बनला. त्यानंतर निजाम, कर्नाटकचा नबाब, मराठे व इंग्रज यांच्यांशीं त्यानें सतत लढाया करून आपलें राज्य वाढविलें. इंग्रजांवर त्याचा दांत विशेष होता व एकदां तर त्यानें कर्नाटकांतील इंग्रजांचे प्रांत उध्वस्त करून थेट मद्रासवर स्वारी करून आपण घालून दिलेल्या अटीवर इंग्रजांकडून तह करवून घेतला (१७६९). मद्रासकर इंग्रज त्याला फार भीत असत. यावेळीं कर्नाटकांत नवाब आणि इंग्रज या दोघांचाहि अंमल चालत होता. त्या वेळचें मद्रास सरकार लोभिष्ट, दुर्गुणी, गैरमुत्सद्दी, व प्रजेवर अत्यंत जुल्म करणारें होतें असें विल्क्स म्हणतो.

नादीरशहाच्या स्वारीचा फायदा घेऊन बिहारचा मोंगल सुभेदार अलीवर्दीखान हा स्वतंत्र झाला व बंगालचा नवाब बनला होता. त्यानें आपला आश्रयदाता बंगालचा सुभेदार सर्फराजखान यास बंड करून ठार मारिलें होतें; पण अलीवर्दीला मराठ्यांपुढें हात टेकावे लागले. अकरा वर्षें त्या दोघांचे झगडे चालू होते आणि त्यांत मराठ्यांनीं चौथाईहि वसूल केली होती. कलकत्त्याच्या इंग्रजांनां मराठ्यांची धास्ती वाटून त्यांनीं तेथें मराठ्यांचा खंदक म्हणून एक खंदक खोदला होता (१४७२). अलीवर्दीखानानें भास्करराम या मराठा सेनापतीचा विश्वासघातानें खून केल्यानें मराठ्यांनीं त्याच्यापासून जबरदस्त खंडणी घेऊन ओरिसा प्रांत काबीज केला व बंगालची १२ लाख रु. चौथ ठरवून घेतली (१७५१). पुढें पन्नास वर्षें ओरिसा मराठ्यांच्या ताब्यांत होता अलीवर्दीच्या उतारवयांत त्याचा नातू सिराजुद्दौला हा गादीवर आला. तो लहानपणापासून इंग्रजांचा द्वेष करणारा होता. इंग्रजांच्या व्यापारावर व पैशावर त्याची दृष्टि होती. इंग्रजांनीं कांहीं आगळीक केल्यानें सिराजनें त्यांची कासीमबाजारची वखार लुटून कलकत्त्यावर हल्ला करून तेथला किल्लाहि घेतला. त्यावेळीं तेथलें इंग्रजी सैन्य व गव्हर्नर पळून गेले (१७५६). यावेळीं घडलेली अंधारकोठडीची गोष्ट खोटी आहे असें अलीकडे एका इंग्रज गृहस्थानेंच प्रसिद्ध केलें आहे. [ बंगाल पास्ट ॲंड प्रेझेंट व्हा. ११; जे एच. लिटल. ज. बेंगाल ब्रॅं. रा. ए. सो. सप्टेंबर १९१५]. मद्रासला ही बातमी कळल्यावर वॅटसन आणि क्लाईव्ह हे कांहीं आरमार व सैन्य घेऊन कलकत्त्यास आले. तत्पूर्वी क्लाईव्हनें विजयदुर्ग (घेरिया) किल्ला निव्वळ तोफखान्याच्या जोरावर घेतल्यानें त्याला तोफांचें महत्त्व समजलें होतें (१७५३). क्लाईव्हनें व वॅटसननें कलकत्ता पुन्हां परत घेतला (१७५७). इतक्यांत यूरोपांत इंग्रज–फ्रेंचांचें युद्ध सुरू झाल्यानें क्लाईव्हनें फ्रेंचांचें चंद्रनगर घेतलें व तें लुटून सर्व पाडून टाकलें. फ्रेंचांनां सर्वस्वी हांकलून देण्यासाठीं इंग्रजांनीं सिराजशीं तह करून त्याची मदत मागितली. पण सिराजनें उलट फ्रेंचांची मदत मागून इंग्रजांनांच हांकलण्याची योजना केली पण फ्रेंच वेळेवर आले नाहींत. सिराजचा सेनापति मीरजाफर यास क्लाईव्हनें फितूर केलें व तो मुर्शिदाबादेवर चालून गेला. सिराजनें घाईनें त्याला प्लासी येथें तोंड दिलें. त्यावेळीं ठरल्याप्रमाणें फितुरी मीरजाफर लढाई सोडून आपल्या सर्व फौजेसह पळाला; अर्थात सिराजचा परायय झाला (१७५७). पुढें तो पळून जात असतां त्याला पकडून मीरजाफरच्या मुलानें त्यास रानटीपणें ठार मारलें. स्मिथ म्हणतो कीं, प्लासीची ही लढाई खऱ्या वीराला जरी लज्जास्पद वाटली तरी तिनें सर्व हिंदुस्थानचें भवितव्य ठरविलें.

क्लाईव्ह व मीरजाफर यांचें खलबत अमीरचंद व जगत्शेट या दोघां सावकारांस माहीत होतें. तें गुप्त ठेवण्याबद्दल क्लाईव्हनें अमीरचंदास मोठी रक्कम ( २० लाख रु. ) देऊं केली; पण पुढें दुसराच खोटा कागद पुढें आणून क्लाईव्हनें लुच्चेगिरीनें त्याला फसविलें. ही गोष्ट नैतिक व राजकीय दोन्ही दृष्ट्या वाईट होय असें कांहीं इंग्रज ग्रंथकारांचेंहि म्हणणें आहे. मीरजाफरला त्याच्या राजद्रोहाचें बक्षीस म्हणून ठरल्याप्रमाणें नबाब करून क्लाईव्हनें त्याच्याकडून अलोट संपत्ति उपटली. स्वतःस तीस लाख रुपये, कंपनीस एक कोटी रु. व शिवाय इतर इंग्रज अधिकाऱ्यांनां अगणित बक्षिसें मिळविलीं आणि हुगळी नदीकांठची १० लाख रु. उत्पन्नाची जहागिरहि स्वतःसाठीं घेतली. या लुटीनें बंगालच्या नबाबाचा खजिना सर्व रिकामा झाला. याप्रमाणें बंगाल प्रांत इंग्रजांच्या हातांत आला. मीरजाफरला पुढें आपली खरी स्थिति कळून आली. त्यामुळें त्यानें इंग्रजांविरुद्ध डच व फ्रेंच यांच्याशीं कारस्थानें केलीं पण तीं फसलीं. इतक्यांत दिल्लीच्या शहाजाद्यानें पाटणावर स्वारी केली तेव्हां क्लाईव्हनें जाफरकडून बरीच खंडणी देऊन शहाजाद्यास परतविलें (१७५९). त्यामुळें शहाअलमनें क्लाईव्हला अकरा हजारी मनसबदारी व जहागीर दिली. यावेळीं उत्तरहिंदुस्थानांत सर्वत्र गडबड असल्यानें बंगाल्यांत आपण एकदम राज्य स्थापावें असें क्लाईव्हनें ठरवून त्यासाठीं तो विलायतेस गेला (१७६०); पण तेथें त्याला पाठिंबा मिळाला नाहीं. त्या सुमारास मराठ्यांनीं बंगाल्यावर स्वारी करून धुमाकूळ उडविला. इकडे मीरजाफरकडून पाहिजे तितका पैसा मिळेना व कलकत्त्याचा कंपनीचा खजिना रिकामा झाला म्हणून व्यवस्थेच्या नांवावर इंग्रजांनीं जाफरला पदच्युत करून त्याच्या जांवयास गादीवर बसविलें. जाफरच्या मिरन नांवाच्या मुलाचा खून करण्यांत आला असें म्हणतात. हाहि पूर्वी इंग्रजांस फितूर झाला होता. या मीर कासीमनें मागील सर्व बाकी फेडून शिवाय इंग्रजांनां फौजेसाठीं ५० लक्षांचा प्रांत दिला. तैनाती फौजेची ही सुरवात होय. या सुमारास शहाअलम पातशहा दुर्बळ झाला होता. त्यानें इंग्रजांकडे आपल्याला दिल्लीस गादीवर बसविण्यासाठीं मदत मागितली. पण मराठ्यांच्या भीतीनें इंग्रजांनीं तें नाकारलें (१७६१). इकडे मीरकासीमचेहि डोळे उघडले. इंग्रजांच्या हातांतील आपण बाहुलें नसावें म्हणून त्यानें त्यांच्याविरुद्ध युद्धविषयक तयारी चालविली. यावेळीं इंग्रजांनीं कंपनीच्या परदेशी आयात व्यापाराप्रमाणें देशांतील अंतर्गत व्यापारावरीलहि जकात देण्याचें नाकारल्यानें मीरकासीम जास्त चिडला ( हा जकात न देण्याचा ठराव अत्यंत अन्यायाचा व जुलमाचा होता असें स्मिथहि म्हणतो आ. हि. ५००) तसेंच पाटणा येथील इंग्रज वकिलानें एकदम तें शहर व किल्ला यास वेढा घातला व कासीमशीं शत्रुत्वाची वागणूक आपण होऊन केली. कलकत्त्याहून त्याच्या मदतीसाठीं दारूगोळा वगैरे आला आणि कंपनीनें कासीमला पदच्युत करून पुन्हां मीरजाफरास गादीवर बसविलें (१७६३). त्यामुळें कासीमनें चिडून २०० इंग्रज कैद्यांची कत्तल केली. पुढें इंग्रजांनीं त्याला पळवून लावल्यानें तो दिल्लीच्या बादशहाच्या आश्रयास गेला. तेव्हां इंग्रजांनीं मीरजाफरास पुन्हां नबाब बनविलें; तो मेल्यावर त्याच्या मुलाला गादीवर बसविलें. या सर्व गोष्टी कलकत्ता कौन्सिलनें निव्वळ पैसे खाण्यासाठींच चालविल्या होत्या असें स्मिथ म्हणतो. इकडे कासीमच्यासाठीं बादशहानें इंग्रजांवर चाल केली असतां त्याचा बक्सार येथें पराभव झाला (१७६४) आणि बंगाल प्रांत कायमचा इंग्रजांच्या ताब्यांत गेला. बादशहा इंग्रजांच्या आश्रयास गेला व चुनार आणि प्रयाग इंग्रजांनीं घेतल्यामुळें सुजाउद्दौला निष्प्रभ बनला.

यावेळीं कंपनीच्या नोकरांत लांच खाणें, बादशाही दरबारांत लांड्यालबाड्या करून व लांच देऊन दरबारची मर्जी राखणें, बक्षिसें उपटणें, चैनबाजी करणें इत्यादि अनेक दुर्गुण भरले होते. स्मिथ म्हणतो कीं मानवीपणास काळीमा आणणारीं कृत्यें या लोकांनीं केलीं. एवढेंच नव्हे तर पिढ्यानुपिढ्या आपली प्रजा आपला तिरस्कार करील अशा गोष्टी त्यांनीं केल्या (ऑ. हि. ४९७). वॉरन हेस्टिंग्जनें तर राज्य चालविण्याची कुवत व्यापारी कंपनीच्या अंगीं नसून कंपनी नालायक होती असें म्हटलें आहे. खुर्चीवर बसावें व खोऱ्यानें पैका ओढावा असा कंपनीच्या अधिकाऱ्यांचा नियम बनला होता असेंहि तो म्हणतो. प्रत्येक मनुष्याचा व गोष्टीचा क्रयविक्रय होत असे. इकडे क्लाईव्ह बंगालचा गव्हर्नर होऊन परत आल्यावर (१७६५) त्यानें कंपनीच्या नोकरांसंबंधीं व बंगालच्या राज्यकारभाराविषयीं व्यवस्था केली, पण त्याला पहिल्या बाबतींत यश मिळालें नाहीं. कारण कंपनीचे लोक पैसा खाण्यास संवकले होते. खुद्द क्लाईव्हच त्यांत अग्रेसर होता. त्यानें कांहीं मंडळींच्या साह्यानें कंपनीच्याशिवाय दुसरी एक सोसायटी ऑफ ट्रेड नांवाची खाजगी कंपनी काढून व कायद्यानें बंद

असलेला अंतर्गत व्यापार करून लाखों रुपये मिळविले. त्यानें स्थापिलेली ही कंपनी डायरेक्टरांच्या हुकुमाविरुद्ध होती. त्यानें हें निर्लज्जपणाचें कृत्य केलें असें स्मिथहि म्हणतो. क्लाईव्हच्या असल्या वर्तनानें लष्करांतील इंग्रज शिपायांनीं व अधिकाऱ्यांनीं तर बंडच केलें, पण तें हिंदी शिपायांच्या साह्यानें क्लाईव्हनें मोडलें. बंगालवर दिल्लीचा बादशहा, अयोध्येचा नबाबवजीर व बंगालचा सुभेदार या तिघांची सत्ता असल्यानें त्या तिघांबरोबर निरनिराळे ठराव करून क्लाईव्हनें ४ कोटी रुपयांचा बंगाल (दिवाणी कारभार) घशांत घातला. त्या ऐवजीं बादशहाला सालीना २६ लक्ष रु. देण्याचें ठरलें. यामुळें बंगाल्यांत दुहेरी राज्यव्यवस्था निर्माण झाली; तींत दिवाणी म्हणजे वसुली कारभार कंपनीकडे व बंदोबस्ताचा कारभार बादशहाकडे राहिला (१७६९). यामुळें दक्षिणेंतील निजाम व इतर सुभेदार यांच्यापेक्षां बंगाल्यांत कंपनीचा अधिकार थोडासा जास्तच वाढला. पण वसूल एकानें घ्यावा व न्यायमनसुबा आणि रक्षण वगैरे दुसऱ्यानें करावें यामुळें कारभारांत फार घोटाळे झाले. लोकांवर जुलूम झाले, कंपनीचे नोकर खाजगी व्यापार करून गबर बनले आणि वसूल व व्यापार यांत तूट आली. विलायतेंतहि कंपनीचे व्यापारी लांच देऊन डायरेक्टरांच्या जागा विकत घेऊं लागले. त्यांत १७७०त बंगाल-बिहारांत भयंकर दुष्काळ पडला. एकतृतीयांश प्रजा मरण पावली, तरीहि कंपनीनें कांहीं उपाय योजिले नाहींत. एवढेंच नव्हे तर त्या प्रांतांचा १७७१ सालचा वसूल तर सर्व घेतलाच पण दरसालापेक्षां शेंकडा १० टक्के आणखी जास्त जमा केला! त्यामुळें सर्व गोंधळ माजल्यानें, पार्लमेंटनें रेग्युलेटिंग ॲक्ट पसार केला (१७७३). बंगालच्या गव्हर्नरचा अधिकार इतर सर्व इलाख्यांवर चालावा व त्याला गव्हर्नर जनरल असें म्हणावें, त्याची मुदत ५ वर्षें असावी, कलकत्यास एक वरिष्ठ न्यायकोर्ट असावें, गव्हर्नर जनरलच्या मदतीस विलायतेहून पाठविलेल्या ४ सभासदांचें कौन्सिल असावें, गव्हर्नर जनरलला सालीना २॥ लाख व कौन्सिलर्सना १लाख रु. पगार असावा, त्यांनीं खाजगी व्यापार वगैरे करूं नये, हिंदुस्थानचा कारभार विलायतच्या प्रधानमंडळाच्या मार्फत चालावा, कंपनीचे हिशेब पार्लमेंटपुढें दाखवावे, कलकत्यास हायकोर्ट असावें इत्यादि नियम या नवीन कायद्यांत होते. त्याला अनुसरून वॉरन हेस्टिंग्ज हा पहिला गव्ह. जनरल आला. आजच्या कॉन्स्टिटयूशनल सुधारणेचा हा कायदा म्हणजे पाया होय. क्लाईव्ह विलायतेस परत गेल्यावर (१७६७) त्याच्यावर खटला करण्यांत आला; त्याच्या निंद्य वर्तनाबद्दल पार्लमेंटपुढें ठराव आला होता व तो "प्रत्येक कुरापतींत व लबाडींत वाकबगार आहे" असा त्याचा बोलबाला झाला. आणि त्यानें त्यामुळें आत्महत्याहि केली परंतु इंग्रजी राज्याचा संस्थापक म्हणून पुढें त्याचे देव्हारे माजले. कंपनीनें व्यापाराऐवजीं आपलें राज्य स्थापण्याकडे विशेष लक्ष्य घालण्याचें सुरू केल्यामुळें रेग्युलेटिंग ॲक्ट केला तेव्हांच कंपनीच्या व्यापाराची कायमची सनद काढून घेऊन ती ठरीव मुदतीकरतां जरूरीप्रमाणें पुन्हां पुन्हां द्यावयाची असें ठरलें. ही मुदत बहुधां वीस वर्षांची असे; त्याप्रमाणें १७७३, १७९३, १८१३, १८३३, १८९३ या वर्षी कंपनीच्या इतिहासांत बरेच फरक झाले. पैकीं पहिल्या १० वर्षांत कंपनीच्या कारभाराची दर तीन वर्षांनीं उजळणी होऊं लागली व १७८१-१७९४ पर्यंत पार्लमेंटांत हिंदुस्थानच्या राज्यकारभारावर वादविवाद झाले. पुढें पुढें कंपनीचा अधिकार व व्यापाराचा मक्ता कमी होऊन १८५८ त विलायतसरकारनें हिंदुस्थानचा राज्यकारभार आपल्या हातीं घेतला.

**वॉरन हेस्टिंग्ज**-हा मूळचा फारसा शिकलेला नव्हता त्यामुळें प्रथम कंपनींत १८ व्या वर्षी कारकून म्हणून राहिला. तेथें हुशारी दिसल्यानें क्लाईव्हनें त्याला आपला हस्तक म्हणून मीरजाफरच्या दरबारीं वकील नेमला (१७५७). चार वर्षांनीं कलकत्ता कौन्सिलचा सभासद होऊन त्या मुदतींत त्यानें बरीच पुंजी जमविली. पुढें तो मद्रास कौन्सिलांत लागला. तेथें व्यापाराची व्यवस्था त्यानें नीट लावल्यानें त्याला बंगालकौन्सिलांत परत नेमलें. नंतर थोडयाच दिवसांनीं (१७७२) तो बंगालचा गव्हर्नर आणि रेग्युलेटिंग कायद्यान्वयें गव्हर्नर जनरल बनला (१७७४). त्यावेळचे कंपनीचे कलेक्टर्स खाजगी व्यापार करून पैसा कमावीतच होते व बहुतेक नालायक व अविश्वासी होते. न्याय वगैरे नांवाचाच होता असें हेस्टिंग्जनेंच म्हटलें आहे. हेस्टिंग्ज क्लाईव्हच्या तालमेंत उत्तम तरबेज झाला होता आणि त्यानें त्याचेंच धोरण पुढें चालविलें. परंतु कांहीं दिवस त्याला त्याच्या तिघा कौन्सिलरांनीं विरोध चालविला होता, तसेंच हायकोर्ट व हेस्टिंग्जचें सरकार यांच्यांत मधून मधून खटके उडत. त्यावेळींच नंदकुमाराचें प्रकरण उद्भवलें. बंगाल्यांत सुभेदाराचे नोकर म्हणून सीताबराय आणि रेझाखान म्हणून दोन गव्हर्नरासारखे अधिकारी होते. त्यांना काढून बंगाल्यांत सर्व आपले इंग्रज अधिकारी

नेमावे व हळू हळू राज्यकारभार ताब्यांत घ्यावा असा बेत करून हेस्टिंग्जनें नंदकुमारास हातीं धरलें. त्याच्याकडून वरील दोघां अधिकाऱ्यांबद्दल गाऱ्हाणीं आलीं म्हणून हेस्टिंग्जनें त्यांनां कैद करून नंदकुमाराच्या मदतीनें त्यांची चौकशी केली. पुढें रेझाखानची जागा न भरतां (ती नंदकुमारास पाहिजे होती) सर्व प्रांतांत वसुलीसाठीं इंग्रज कामदार (कलेक्टर्स) नेमले. त्यामुळें नंदकुमार रागावला व त्यानें हेस्टिंग्जवर लांच खाल्ल्याची फिर्याद कौन्सिलपुढें आणली. कौन्सिलनें बहुमतानें हेस्टिंग्जवर आरोप खरा धरला. तेव्हां हेस्टिंग्जनें आपल्या जिवाविरुद्ध नंदकुमारानें कट केल्याबद्दल त्याचेवर फिर्याद केली तींत तो सुटला म्हणून नंदकुमारानें सहा वर्षांपूर्वी एक खोटा दस्तऐवज केला अशी त्याच्यावर फिर्याद करविण्यांत आली. न्यायाधीश इंपे हा हेस्टिंग्जचा सोबती होता. त्यामुळें त्यानें ज्यूरीच्या एकमतानें (ज्यूरींत सर्व यूरोपियन होते) नंदकुमारास दोषी ठरविलें व या क्षुल्लक अपराधासाठीं त्याला फांशीं दिलें (१७७५). यावरून या फिर्यादीच्या मूळाशीं हेस्टिंग्ज असावा अशी बळकट शंका उद्भवते. "गव्हर्नर जनरल व चीफ जज्ज यांनीं कट करून व न्यायाचा खून करून त्याच्या रक्तावर इंग्रजी साम्राज्याचा पाया बांधला अशी लोकांत समजूत आहे पण ती खरी नसावी" असें स्मिथ म्हणतो. नंदकुमार हा हेस्टिंग्जच्या धोरणाच्या आड येणारा होता त्यामुळें वाटेंतला कांटा काढण्यासाठीं असें करणें हेस्टिंग्जला भाग पडलें असावें. इंपेला मेकॉलेनें दुर्लौकिकवान म्हटलें आहे. यावेळीं बंगालची राजधानी मुर्शिदाबाद बदलून कलकत्ता येथें नेली गेली (१७७२). यानंतर हेस्टिंग्जनें पैसा मिळविण्यासाठीं फार अनन्वित कृत्यें केलीं. बंगालच्या सुभेदारास क्लाईव्हनें सालीना ६० लाखांची नेमणूक प्रथम केली परंतु त्यानेंच पुढें ती ४५ लाखांवर आणली व ती पुढें केव्हांहि कमी होणार नाहीं असें त्याला वचन दिलें (१७६६). पण तीनच वर्षांनीं वान्सिटार्टनें ती ३५ लाख केली आणि बंगाल्यांत इंग्रज कामदार नेमले त्यासाठीं जास्त खर्च येतो या सबबीवर हेस्टिंग्जनें पुढें चारच वर्षांनीं ती एकदम १७ लाखांवर आणून ठेवली (१७७३)! इंपे आणि हेस्टिंग्ज यांनीं मिळून दरमहा ९ हजार रु. पगाराची एक नवीन न्यायाधिशाची जागा, आधींच सालीना ८० पगार हजार घेणाऱ्या इंपेसाठीं निर्माण केली. याप्रमाणें शहाअलम बादशहाचीहि फसगत केली. शहाअलम बादशहास कडा (माणिकपूर) व प्रयाग हे जिल्हे खाजगी खर्चास व २६ लक्ष रुपयांची वार्षिक खंडणी कंपनीनें ठरवून दिली होती व त्याबद्दल कंपनीला बंगाल व बिहार या प्रांतांची दिवाणी मिळाली होती. बादशहास दिल्लीस नेऊन गादीवर स्थापन करण्याचें काम इंग्रजांनीं पत्करलें होतें, पण तें त्यांनीं केलें नाहीं. तेव्हां मराठ्यांच्या साहाय्यानें बादशहा दिल्लीस गेला तेव्हां तें कारण दाखवून हेस्टिंग्जनें त्याची खंडणी बंद केली (१७७३), आणि कडा व अलाहाबाद प्रांत शहाअलम मराठ्यांनां बक्षिसीदाखल देतो म्हणून ते जप्त करून अयोध्येच्या वजिराकडून ५० लक्ष रु. घेऊन ते त्यास कायमचे विकले (१७७४). सुजाचें राज्य हेस्टिंग्जनें मुद्दाम मराठ्यांत व आपल्यांत बफरस्टेट म्हणून राखून ठेवलें. यानंतर हेस्टिंग्जनें देशी राज्यें कांहीं तरी खुसपटें काढून जिंकण्याचा सपाटा चालविला. या वजिरास हाताशीं घेऊन केवळ त्याच्या सांगण्यावरून हेस्टिंग्जनें रोहिलखंड काबीज करून वजिराला दिलें व त्याबद्दल २४ लक्ष रुपये घेतले (१७७४). मराठे रोहिलखंडांतून अयोध्या प्रांत व बंगाल प्रांत यांत स्वाऱ्या करीत म्हणून मराठ्यांनां शह देण्यासाठीं ही रोहिलखंडाची लढाई उकरून काढली असें हेस्टिंग्ज स्वतः म्हणे. काशीचा राजा चेतसिंग हा इंग्रजांचा दोस्त असे. त्याच्याजवळ, फ्रान्स व इंग्लंडचें युद्ध सुरू झाल्यानें हेस्टिंग्जनें ठराविक रकमेपेक्षां (सालीना) जास्त रक्कम मागितली व आपल्यासाठीं एक पलटण चाकरीस ठेवण्याबद्दल त्याला हुकूम केला तो त्यानें नाकारला. त्यामुळें आपण त्याच्यावर स्वारी केली व 'हुकूम अमान्य केला म्हणून सूडादाखल ५० लाख रु. दंड मागितला' असें हेस्टिंग्जच म्हणतो. या लढाईंत प्रथम हेस्टिंग्जचा पराभव होऊन त्याला पळून जीव बचावावा लागला; पण पुढें त्याचा जय झाला व त्यानें बनारस प्रांत खालसा केला (१७८०) व राजवाडा लुटून सर्व संपत्ति प्राईझ मनी म्हणून सैन्यास वाटली. या कृत्यास पिटनें "क्रूर, अन्यायी व जुलमी" म्हटलें आहे. अयोध्येचा वजीर सुजाउद्दौला यावेळीं मरून त्याचा दुर्बल मुलगा असफउद्दौला गादीवर होता. त्याच्या राज्यांत अव्यवस्था माजल्याचा फायदा घेऊन हेस्टिंग्जनें आपली एक गोरी पलटण त्याच्या दिमतीस दिली. पुढें तिच्या पगारबाकीच्या निमित्तानें हेस्टिंग्जनें असफ याला हाताशीं घेऊन त्याची आई व आजी यांच्यापाशीं असलेली अफाट संपत्ति मिळविण्यासाठीं त्यांच्यावर चेतसिंगास मदत केल्याचा आरोप ठेवून त्यांचा अतोनात अमानुष छळ केला. त्यामुळें शेवटीं एक कोट रुपये

त्याला मिळालें. हेस्टिंग्जचा अशा रीतीनें उत्तरेकडे राज्यविस्तार करण्याचा प्रयत्न जसा साधला तसा दक्षिणेकडे साधला नाहीं. त्यासाठीं त्यानें हैदराशीं दोन व मराठ्यांशीं एक अशीं युद्धें केलीं. हैदरच्या पहिल्या (१७६७-६९) स्वारीची हकीकत मागें आलीच आहे. तींत इंग्रजांची नामुष्की फार झाली. त्यामुळें त्यांनीं तहांत ठरल्याप्रमाणें, मराठ्यांनीं जेव्हां हैदरावर स्वारी केली तेव्हां (१७७२) त्याला मदत दिली नाहीं; उलट मराठ्यांशीं सख्य केलें. तसेंच मही हें फ्रेंचांचें बंदर इंग्रजांनीं घेऊन तेथून होणारा हैदरचा व्यापार वगैरे बंद केला. त्याचें उट्टें काढण्यासाठीं नाना फडणिसानें रचलेल्या इंग्रजांच्या विरुद्ध कारस्थानांत हैदरनें मराठ्यांनां मदत केली व एकदम मद्रासेवर स्वारी केली (१७८०). यावेळीं मद्रासचें इंग्रजी सरकार नीतिदृष्ट्या सर्व बाजूंनीं भ्रष्ट होतें असें थॉर्नटन म्हणतो. हें हैदरचें दुसरें युद्ध होय यांत हैदरानें इंग्रजांचा सपशेल पराभव करून, मनरोस पळवून लावून बेली व ब्रेथवेट या सेनापतींस कैद केलें. फ्रेंच आरमारानेंहि त्याला मदत केली होती. ही मोहीम चालू असतांच हैदर मेला (१७८२). तो साहसी, हिशेबी संकटांनां न डगमगणारा, कडक शिस्तीचा, पांच भाषा बोलणारा, राज्यकारभारांत दक्ष, हिंदूंनां फारसा त्रास न देणारा, इंग्रजांचा कावा ओळखणारा व कर्तबगार होता. या मोहिमेंत हेस्टिंग्जनें निजामाला गुंतूर देऊन फितूर केलें होतें व भोंसल्याला पैसा चारून त्याच्या राज्यांतून सैन्य पाठविलें होतें. टिप्पूनें बापाची मोहीम पुढें चालवून इंग्रजांचा मलबार किनाऱ्यावर पराभव करून त्यांचीं ठाणीं घेतलीं व पुष्कळसे इंग्रज कैद केले. तेव्हां हेस्टिंग्जनें कसाबसा (मंगळूरचा) तह करून त्याची समजूत पाडली (१७८४). आणि मराठ्यांच्याहि अटी पाळून त्यांच्याशीं दोस्ती केली. मराठ्यांच्या पहिल्या स्वारीची हकीकत मागें आली आहे. मराठ्यांची भीति यावेळीं इंग्रजांनां इतकी वाटत होती कीं मद्रासच्या गव्हर्नरनें (म्याकार्टनें) मराठ्यांनां गुजराथ, वसई, साष्टी वगैरे देऊन हेस्टिंगच्या विरुद्ध मदत करण्याचेंहि कबूल केलें होतें. हेस्टिंग्जनें इंग्रजी राज्याचा विस्तार करून बनारस, रोहिलखंड, थोडासा कर्नाटक व मुंबईजवळील थोडासा प्रांत हस्तगत केला. क्लाइव्हची बंगाल्यांतील दुहेरी राज्यव्यवस्था बंद करून मुलकी व दिवाणी कामें वेगळीं केलीं व सर्व सरकारी कामदार इंग्रज नेमले आणि वेगवेगळीं खातीं निर्माण केलीं; शिक्का छापण्या सुरू केला, कलकत्ता-मुंबई-मद्रास येथें हलक्या दर्जाचीं हायकोर्टें स्थापून एक ९९ कलमांचा (हेस्टिंग्ज कोड नांवाचा) कायदा तयार केला, हायकोर्टाच्या चीफजस्टीसला साहीना ८० हजार रु. पगार होता. विल्यम जोन्सच्या साहाय्यानें एशियाटिक सोसायटी ऑफ बंगाल ही हेस्टिंग्जनें स्थापिली. या सुमारास अमेरिकेंतील वसाहती इंग्रजांच्या हातून गेल्या. फ्रान्स, स्पेन, हालंडशीं इंग्लंडच्या लढाया सुरू झाल्या व इकडे हेस्टिंग्जनें हिंदुस्थानांत सूक्तासूक्त न पाहतां देशी राज्यें बुडविण्याचा क्रम आरंभिला, म्हणून विलायतेंत चर्चा सुरू होऊन त्याला व त्याचा मित्र इंपे याला कामावरून दूर करण्यांत आलें (१७८५). हेस्टिंग्ज कार्यसाधु, प्रसंगीं न डगमगणारा, विद्येचा भोक्ता व जुलमी होता. त्यानें कांहीं संस्कृत ग्रंथांचीं इंग्रजी भाषांतरें करविलीं. हिंदुस्थानांतील देशी राज्यांची नियंत्रणशक्ति हिंदुस्थानांतील इंग्रज अधिकाऱ्यांच्या हातीं न ठेवतां इंग्लंडच्या राजाच्या हातीं असावी असें त्याचें मत होतें. रेग्युलेटिंग कायद्याच्या नियमाप्रमाणें ५ वर्षें संपल्यावरहि त्यानें ३॥ वर्षें जास्त गव्हर्नर जनरलचें काम केलें. तो विलायतेस गेल्यावर त्याच्या कारभाराविषयीं तिकडे फार गवगवा झाला. त्यानें फार अन्याय, घोर जुलूम केला असल्यानें त्याची चौकशी करून ते अन्याय खरे ठरल्यास त्यास शिक्षा झाली पाहिजे असें लोकमत बनलें. त्यावेळीं तिकडील बर्क, शेरिडन, फॉक्स, डंडास, फ्रॅन्सिस, पिट्ट या विद्वानांनीं हिंदी रयतेचा पुढाकार घेऊन हेस्टिंग्जवर पार्लमेंटपुढें ११ आरोपांची फिर्याद केली (१३।२।१७८८). त्यावेळीं लोकांचीं मनें हेस्टिंग्जच्या जुलमी कारकीर्दीनें चिडून गेलीं होतीं. त्यावेळचीं बर्क शेरिडनचीं हेस्टिंग्जवरील आरोपाचीं भाषणें सणसणीत झालीं. बेगमांवरील जुलुमाबद्दलच्या शेरिडनच्या ५ तास झालेल्या भाषणानें लोक इतके क्षुब्ध बनले होते कीं, अध्यक्षानें सभा तत्काळ बरखास्त केली. ही चौकशी सात वर्षें चालली; त्यामुळें लोक कंटाळले, हेस्टिंग्जनें सांठविलेली सर्व संपत्ति खर्च झाली आणि शेवटीं, हेस्टिंग्जनें कांहींहि केलें असलें तरी त्यानें इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानांत स्थापन केलें या समाधानावर त्याला निर्दोष सोडण्यांत आलें (२३।४।१७९५). प्रोप्रायटरांनीं हेस्टिंग्जला ५ हजार पौंडांचें पेनशन व ७१ हजार पौंडांपर्यंत खर्च देण्याचें सुचविलें, पिट्ट व डंडास यांनीं व्हेटोच्या अधिकारानें त्या रकमा नामंजूर केल्या.

या सुमारास हिंदुस्थानच्या राजकारणाच्या परीस्थितीवर पार्लमेंटच्या निवडणुकी होऊं लागल्या व पार्लमेंटांत हिंदुस्थानविषयक चर्चाहि बरीच चाले. हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेपासून विलायतच्या राज्यावर पुष्कळच परिणाम होई म्हणून पार्लमेंटचें विशेष लक्ष त्यावेळीं हिंदुस्थानकडे असे. हेस्तिंगजच्या कारभाराचा गवगवा झाल्यानें कंपनीच्या कारभाराचा तपास करण्यासाठीं बर्क व डंडास यांच्यामुळें दोन कमेट्या नेमल्या गेल्या. त्यांच्या निकालामुळें व कंपनीनें विलायतेस कर्ज मागितल्यामुळें तत्कालीन इंग्लंडचा मुख्य प्रधान फॉक्स यानें एक बिल पार्लमेंटपुढें आणलें. त्यांत राजा, कंपनी व बडे लोक यांच्या हातून कंपनीचा कारभार काढून तो पार्लमेंटच्या हातीं देण्याचें योजल्यामुळें हे सर्वजण त्याच्या विरुद्ध जाऊन बिल नापास झालें. तेव्हां पिट्ट नांवाचा एक हुशार व तरुण (२४ वर्षांचा) गृहस्थ मुख्य प्रधान होऊन त्यानें पुढील 'इंडिया ॲक्ट' तयार केला (१७८४). त्यांत फॉक्सचें मुख्य तत्व कायम होतें. पार्लमेंटनें नेमलेल्या बोर्ड ऑफ कंट्रोलनें हिंदुस्थानांतील मुलकी व लष्करी कारभार, कायदे, लढाया, तह वगैरे ठरवावे, त्याच्या हाताखालीं तीन डायरेक्टर्स असावेत, व त्यांच्या हाताखालीं ग. जनरल असावा, कंपनी कायमची असावी पण तिच्या हातीं राज्यकारभार नसावा, हिंदुस्थानांत जास्त मुलूख जिंकूं नये व प्रत्येक नोकरानें पेनशन् घेतल्यावर आपण हिंदुस्थानांत पैसा कसा मिळविला त्याची हकीकत सांगावी. हा कायदा बहुमतानें पास झाला. राज्यविस्तार न करण्याचें कलम मात्र उलट अंमलांत आलें. शिवाय आणीक कांहीं कलमांनीं रेग्युलेटिंग कायद्यांतील अडचणी काढून टाकल्या. आजचा सेक्रेटरी ऑफ स्टेट हा वरील बोर्ड ऑफ कंट्रोलचा अध्यक्षच होय व वरील तीन डायरेक्टरांचें ऑफीस म्हणजेच आजचें इंडियाकौन्सिल होय. पिट्टची ही "दुहेरी राज्यव्यवस्था" थोड्या फार फरकानें १८५८ पर्यंत कायम राहिली.

**कार्नवालीस**—हेस्तिंगजनंतर २० महिने सर जॉन म्याकफर्सन यानें गव्हर्नरजनरलचें काम केलें. त्याला कार्नवालीसच्या पत्रव्यवहारांत अत्यंत रद्दड, निंद्य, तिरस्करणीय गव्हर्नरजनरल म्हटलें आहे. त्यानें नोकर लोकांच्या पगारांत कपात करून कांहीं खर्च वांचविला. याच्याचवेळीं मराठ्यांनीं बंगाल्यांत आपल्या चौथाईचें टुमणें लाविलें होतें. त्याच्या वेळीं कर्नाटकांतील परिस्थिति जास्तच बिघडली. त्यानंतर लॉर्ड कॉर्नवालीस हा गव्हर्नरजनरल म्हणून आला; त्यानें ७ वर्षें (१७८६–९३) कारभार शहाणपणानें व कोणाच्या फारशा भानगडींत न पडतां केला. तो अमेरिकेच्या युद्धांत पुढें आला. त्याच्या पराजयानें अमेरिका इंग्लंडच्या हातची गेली. तो साधारण समतोल व शांत वृत्तीचा असल्यानें व हिंदुस्थानांतील राजेरजवाडयांच्या कारभारांत हात घालूं नये आणि जास्त प्रदेश जिंकण्याच्या नादीं लागूं नये अशी त्याला विलायतेंतून ताकीद असल्यानें, म्हैसूरच्या तिसऱ्या युद्धाशिवाय त्यानें इकडे फारशी भानगड न करतां उलट कंपनीच्या कारभारांत व सिव्हिलसर्व्हिसमध्यें कांहीं सुधारणा केल्या. गव्हर्नरजनरलच्या कौन्सिलचा ठराव धाब्यावर बसविण्याचा अधिकार त्याला मिळाला होता, शिवाय कमांडर–इन–चीफचाहि अधिकार त्याला देण्यांत आला होता त्यामुळें त्याची बाजू पुष्कळ सोपी झाली होती. कंपनीचे अधिकारी भरमसाट पगार खात असूनहि लांच खात, तें त्यानें बंद केलें. उदा. काशीच्या रेसिडेंटास सालीना ४ लक्ष रु. पगार होता; तो त्यानें ६० हजारांवर आणला. मंगळूरच्या तहानंतर टिप्पूनें आपली सत्ता वाढविली, ती कंपनीस दुस्सह झाली. म्हणून तिनें कर्नाटक–बालाघाट हा त्याचा प्रांत निजामास देण्याचें ठरविलें (निजामास आपल्या बाजूस कायमचें ओढण्यासाठीं ही खटपट होती). टिप्पूचा मांडलिक जो त्रावणकोरचा राजा त्यास इंग्रजांनीं आश्रय दिला. त्यामुळें राजानें कोचीनच्या राज्यांतील दोन गांवें उपटलीं. तेव्हां कोचीन व त्रावणकोर यांत भांडण उपस्थित झालें व त्यांचे पक्ष अनुक्रमें टिप्पू व इंग्रज यांनीं उचलले. टिप्पूनें त्रावणकोरवर हल्ला केल्यानें (१७८९) कॉर्नवॉलीसनें मराठे व निजाम यांनां मित्र करून युद्धांतील फायदा त्रिवर्गांनीं सारखा वाटून घेण्याचें ठरविलें (१७९०). मेडोसनें टिप्पूवर स्वारी केली, पण त्यांत त्याचा पुरा पराभव झाला (१७९०). तेव्हां स्वतः कॉर्नवॉलीसनें स्वारी करून बंगलोर घेतलें व श्रीरंगपट्टणास वेढा दिला, पण टिप्पूनें कार्नवालीसची रसद बंद केल्यानें त्याचें फार नुकसान होऊन तो मद्रासेस परत जाण्यास निघाला. अखेरीस परशुरामभाऊच्या आयत्यावेळीं आलेल्या मदतीनें त्याचे प्राण वांचले व त्याबद्दल त्यानें मराठ्यांचे फार आभार मानले. मराठ्यांनीं टिप्पूचा धारवाडचा मजबूत किल्ला व पुष्कळसा प्रांत जिंकला. निजामानेंहि कांहींसा प्रांत घेतला. तेव्हां टिप्पूनें जेरीस येऊन आपलें अर्धें राज्य व तीन कोटी

३० लक्ष रु. या दोस्तांनां दिले (१७९२); याच वेळीं कूर्गप्रांत इंग्रजांनां मिळाला, तो पुढें १८३४ त त्यांनीं खालसा केला. टिप्पू हा इंग्रजांचा अत्यंत द्वेष्टा होता पण त्याच्या अंगीं मुत्सद्दीपणा कमी असल्यानें इंग्रजांनां कायमचें हांकून देण्याचा त्याचा बेत फसून उलट त्याचाच नाश झाला. तो धर्मवेडा व अत्यंत क्रूर असल्यानें मराठ्यांनांहि त्यानें हातचे गमावले. निजाम तर १७६८ च्या तहानें इंग्रजांची तैनाती फौज पदरीं बाळगून त्यांचा मांडलिक बनलाच होता. वास्तविक कॉर्नवॉलीसनें पार्लमेंटचा हुकूम मोडून हें युद्ध उपस्थित केलें होतें; पण त्याबद्दल पार्लमेंटनें त्याला मार्क्वीसची बढती दिली. त्याच्या सुधारणांत पुढील प्रमुख होत्या. कामदारांनीं लांच घेऊं नये व सरकारी पैका खाजगी कामांकडे वापरूं नये यासाठीं त्यांची पगारवाढ केली. पूर्वी जिल्ह्यांच्या कलेक्टरांकडे वसुलाचें व न्यायाचें अशीं दोन्हीं कामें होतीं त्यामुळें अन्याय होई म्हणून त्यानें प्रत्येक जिल्ह्यांत निराळे यूरोपियन न्यायाधीश नेमले व कांहीं अपीलकोर्टें नेमलीं, इंपेचा फौजदारी कायदा दुरुस्त केला. काशी, बिहार व बंगाल्यांतील जमीनदारी पद्धत काढून व दर दहा दहा वर्षांनीं सारा वाढविण्याचें नाकारून कायम धारापद्धति बसविली. त्यामुळें मूळचे जमीनदार हे जमीनीचे कायम मालक राहून त्यांचीं वतनें त्यांच्याकडे कायम राहिलीं. मात्र कंपनीनें एकदां जो कायमचा सारा ठरवून दिला तो न भरल्यास त्यांच्या जमीनदारीचा लिलांव होई (१७९३). या कायद्यामुळें कंपनीचें नफानुकसान काय झालें यावर आतांपर्यंत वाद चालूच आहेत. पण एकंदरींत नफाच पुष्कळ झाला; सरकारचें काम लोकांचें रक्षण करण्याचें असून, लोक हेच जमीनीचे खरे मालक हें तत्त्व शाबीत झालें. मात्र जमीनदार हा कुळावर जुलूम करतो व सरकारी उत्पन्न खुंटतें असे तोटेहि झाले. अकबर हा जमीनदारांनां साऱ्याच्या शेंकडा २॥ टक्के कमीशन देई. जमीनदाराच्या जुलमासाठीं बंगाल टेनन्सी कायदा (१८५९); व बंगाल लँड कायदा (१८८२); हे पुढें तयार केले. हिंदुस्थानांत सरकारचें मुख्य उत्पन्न म्हणजे शेतसाराच होय. इंग्रजशाहीपूर्वी हें उत्पन्न एकंदर उत्पन्नाच्या शेंकडां ७५ टक्के असे तर आज इतर उत्पन्नाचे प्रकार वाढले असतांहि शेंकडां ३८ ते ४० टक्के आहे. इंग्रजी पहिल्या अंमलांत बंगालखेरीज पुष्कळ ठिकाणीं शेतकऱ्यांनां डोईजड सारा बसविला होता, पण त्यानें उलट तोटाच होत असे. कॉर्नवॉलीसनें स्वतः म्हटलें आहे कीं "आज कंपनीच्या राज्यांतील एकतृतीयांश मुलूख जंगली व ओसाड आहे तो लागवडीस आणण्यासाठीं कायम धारापद्धतीच बरोबर आहे" कॉर्नवॉलीसनें सरकारी मोठ्या जागा फक्त यूरोपियन लोकांसच दिल्या. ही त्याची मोठी चूक होती असें मार्शमन म्हणतो म्हणून तो हिंदी लोकांस अप्रिय झाला. न्यायहि बरोबर मिळेना. बरद्वानच्या कोर्टांत १७९५ सालीं ३० हजार खटले शिल्लक पडले होते. जिल्हे पाडून राज्याचे शेवटचे घटक कॉर्नवॉलीसनेंच केले.

**सर जॉन शोअर-(१७९३-९८).** कॉर्नवालीसच्या मागून हा ग. ज. झाला. परराज्याच्या भानगडींत न पडतां यानें शांतपणें राज्यकारभार केला. मराठे व निजाम हे यावेळीं इंग्रजांचे दोस्त होते. खर्ड्याच्या लढाईत आपणास मदत करावी म्हणून निजामानें केलेली मागणी यानें मराठ्यांच्या भीतीनें फेटाळून दिली. यावेळीं हिंदुस्थानांत इंग्रजी फौज दोन प्रकारची होती; एक कंपनीची आणि दुसरी खास इंग्लंडच्या राजाची. त्यांच्यांत भांडणें होत. सरकारी अधिकारी कंपनीच्या फौजेला कमी लेखीत. तिनें पगारवाढीची मागणी केलेली नाकारल्यानें बंडावा केला तेव्हां शोअरनें पुढें मागणी मान्य केली (१७९५). अयोध्येचा वजीर असफ याला तैनाती फौजेसाठीं ७५ लक्ष रु. सालीना द्यावे लागत. त्याबद्दल त्यानें पुष्कळ तक्रारी केल्यानें कॉर्नवालीसनें ५० लक्ष रक्कम ठरविली. असफ मेल्यावर (१७९७). त्याच्या वजीरअली नांवाच्या दासीपुत्रास इंग्रजांनीं गादीवर बसविलें पण पुढें त्याला पदच्युत करून असफच्या भावा(सादतअली)स गादी दिली व पुन्हां वरील रक्कम ७५ लाख केली व अलाहाबादचा किल्ला आपल्याकडे घेतला (१७९८). त्यामुळें वजीरनें पुढें बंडाळी चालविली व लखनौच्या रेसिडेंटास ठार मारलें. बरेच दिवस झटापटी होऊन वजीरास पकडून कलकत्त्यास कैदेंत ठेवण्यांत आलें. कंपनीची मुदत १७९३ त सनद देऊन २० वर्षें वाढविली आणि कंपनीशिवाय इतरांसहि सालीना ३००० टन (वजनाचा) व्यापार करण्यास परवानगी मिळाली. हिंदुस्थानांत खिस्ती धर्माचें शिक्षण व तद्द्वारा विद्यादान करण्यास केलेल्या सूचना फेटाळून लावल्या.

**लॉर्ड वेलस्ली उर्फ मॉर्निंगटन-सन (१७९८-१८०५).** हा हिंदुस्थानांत आला तेव्हां येथील परिस्थिति कंपनीच्या दृष्टीनें काळजीची होती पण बोर्ड ऑफ

कंट्रोलमध्यें तो पुष्कळ दिवस असल्यानें त्याला इकडील परिस्थितीची पूर्ण माहिती झाली होती. फ्रान्समध्यें नेपोलियन राजा होऊन त्यानें यूरोपांत धुमाकूळ चालविला होता. इंग्लंडची हिंदुस्थानांतील सत्ता नामशेष केल्याखेरीज त्याच्यावर आपला पगडा बसणार नाहीं हें ओळखून नेपोलियननें त्या दृष्टीनें मराठे, टिप्पू, निजाम, काबूलचा अमीर, इराणचा शहा इत्यादिकांशीं मसलती चालविल्या होत्या. तथापि मराठे आणि टिप्पू यांनां यूरोपियन राजकारण व परिस्थिति यांचें साग्र ज्ञान नव्हतें व त्याचप्रमाणें नेपोलियनला हिंदुस्थानांतील खरी परिस्थिति माहीत नव्हती त्यामुळें हें परस्प रांचें राजकारण फसलें. त्यांत नेपोलियनचा ईजिप्तकडे पराभव झाला, इकडे नाना फडणीस वारला, टिप्पू गैरमुत्सद्दी, निजाम धरसोडीचा इत्यादि कारणानें नेपोलियनची मसलत फुकट गेली. निझाम, भोंसले, शिंदे यांच्यापाशीं फ्रेंच फौज पुष्कळ होती व इंग्रजांचा खजीना रिकामा होता तरीहि लॉर्ड वेलस्ली अत्यंत कावेबाज व सूक्ष्मासूक्ष्म मार्गांकडे न पहाणारा होता. त्यानें हिंदुस्थानांतील शिरजोर राजांशीं स्नेहाचे तह केले (उदा. निजाम, गायकवाड, अयोध्येचा वजीर), जे पुढें शिरजोर होतील त्यांचा बंदोबस्त चालविला (उ. टिप्पू, शिंदे, होळकर) आणि दुर्बलांचे प्रांत खालसा केले (उदा. तंजावर, कर्नाटक). मात्र या गोष्टी एकदम न करतां निरनिराळ्या वेळीं वरील राजांच्या आपापसांतील द्वेषाच्या बळावर व एका विरुद्ध दुसऱ्यास उभें करून केल्या. केलेला निश्चय तावडतोब अंमलांत आणणें, हाताखालीं निवडक माणसें ठेवणें व त्यांनां प्रसंगीं पूर्ण अधिकार देणें, धाडस, धूर्तता इत्यादि त्याचे गुण होते. हेस्टिंग्जच्या तैनाती फौजेची कल्पना यानें जास्त उचलून धरली. तैनाती फौज संस्थानिकानें पदरीं ठेवल्यास पुढील अटी त्यास कबूल कराव्या लागत:—इंग्रजांचें मांडलिकत्व कबूल करणें, दुसऱ्या संस्थानिकांशीं इंग्रजांच्या मध्यस्थीनें कारभार करणें, इतर यूरोपियनांस नोकरीस न ठेवणें, फौजखर्चासाठीं मुलूख तोडून इंग्रजांस देणें व जरूर लागेल तेथें व तेव्हां ही फौज इंग्रजांनां देणें. यामुळें फौजेचा परभारे खर्च भागून वाटेल तेवढी फौज ठेवतां आली व हिंदी संस्थानिक इंग्रजांचा मांडलिक बनला. तैनाती फौजेचे अधिकारी इंग्रज असत व तिचा पगार इंग्रजांकडून मिळे. पुढें कंपनीचीं व हिंदी संस्थानिकांचीं जीं युद्धें होत त्यांत ही फौज अर्थातच कंपनीस मिळे. हिंदुस्थानात

इंग्रजी राज्याची स्थापना झाली. वेलस्लीनें प्रथम निजामाच्या पदरची फ्रेंच फौज काढून आपली फौज ठेवली. रावबाजीनें नाइलाजानें वसईचा तह करून ही फौज पदरीं बाळगली. त्यापूर्वीच गायकवाडानें खंबायतच्या तहानें फौज आपल्याजवळ ठेवली व तो इंग्रजांचा मांडलिक बनला. सादतअल्लीपासून दीड कोटीचा प्रांत घेऊन त्याच्या गळ्यांतहि १८०० च्या सुमारास फौज बांधण्यांत आली. या प्रांतावर वेलस्लीनें आपला भाऊ हेन्री याला लेफ्ट. गव्हर्नर नेमलें. त्याच्या भाश्याची वर्णी लावलेली डायरेक्टरांनां आवडली नाहीं. त्यांनीं याबद्दल वेलस्लीची खरडपट्टी काढली. फ्रेंचांचीं कारस्थानें झपाट्यानें व्हावयास लागलीं, त्यांचें सैन्य मॉरिशस बेटांतून येऊन मंगळूरास उतरलें, काबूलचा जमानशहा पंजाबांत स्वारी करण्याच्या तयारीस लागला हें पाहून वेलस्लीनें प्रथम निजामास फितूर केलें. त्याची १४ हजार फ्रेंच फौज काढून आपली तैनाती फौज त्या ऐवजीं ठेवली. यावेळीं मराठे साधारण तटस्थ राहिले. नंतर वेस्लीनें २०० तोफा व ३७ हजार फौजेनिशीं टिप्पूवर स्वारी केली. किरकोळ युद्धें होऊन इंग्रजांनीं श्रीरंगपट्टणास वेढा देऊन साधारण एक महिन्यानें किल्ला घेतला. तटाच्या खिंडाराजवळ शौर्यानें लढत असतां टिप्पू मरण पावला (३ मे १७९९). टिपूनें १७ वर्षें राज्य केलें. तो उतावळा, क्रूर, शूर, राज्यकारभारांत दक्ष, कट्टा मुसुलमान, महत्वाकांक्षी, कोणावर भरंवसा न ठेवणारा होता. एक नवीन धर्म स्थापून आपण त्याचे पैगंबर बनावें अशी त्याची एक इच्छा होती. त्याचा ग्रंथसंग्रह मोठा व अमूल्य होता. हैदरानें पदच्युत केलेल्या हिंदु राजाच्या नातवाकडे तैनाती फौजेचा ठराव करून अर्धें राज्य ठेवून इंग्रजांनीं अर्ध्या राज्यांत आपली आणि निजामाची वांटणी केली. पैकीं निजामानें आपला प्रांत पुढल्याच वर्षी तैनाती फौजेच्या खर्चासाठीं इंग्रजांनां देऊन टाकला. टिप्पूच्या वंशजास ९ लाखांची नेमणूक ठरविली. श्रीरंगपट्टणांत इंग्रजी सेन्यानें लुटीचा इतका धुमाकूळ घातला कीं, त्यासाठीं "मला शिपायांनां फटके मारावे लागले व कांहींना फांसांवर लटकवावें लागलें" (ऑ.हि.९८३) असें गव्हर्नर जनरलचा भाऊ आर्थर वेलस्लीच म्हणतो. तंजावरचें राज्य वास्तविक स्वतंत्र असतांहि कर्नाटकचा नबाब त्यावर आपला हक्क सांगे व इंग्रजहि त्यासाठीं त्याला वारंवार मदत देत. पुढें एकदां (१७७१) इंग्रजांनीं तें राज्य खालसा केलें तें डायरेक्टरांनां पसंत न पडून त्यांनीं राजास परत केलें, मात्र

त्यावेळीं त्याच्या पदरीं तैनाती फौज ठेवून बराचसा मुलूख खालसा केला. त्यानंतर गादीच्या वारसाच्या तंटयांत दोघां वादींनां कांहीं काळ गादीवर बसविलें व अखेर शेवटचा राजा सरफोजी याचा हक्क कायम करून राज्य मात्र खालसा केलें. फक्त सरफोजीस थोडीशी नेमणूक करून दिली (१७९९). दत्तकप्रकरणानें तीहि (१८५५ त) काढून घेतली. कर्नाटकचा नबाब महमद अल्ली व त्याचे मालक इंग्रज यांच्यांत नेहमीं तक्रारी चालू होत्या. तो मेल्यावर (१७९५) त्याचा दुर्बळ मुलगा उमदत्-उल्-उमरा याच्यावर टिप्पूस फितूर असल्याचा आरोप इंग्रजांनीं केला म्हणून तो १८०१ त मेल्यावर त्याचें राज्य खालसा केलें. सुरत संस्थानहि औरस संततीच्या अभावीं खालसा केलें. अयोध्येचा पुष्कळ प्रांतहि जुलूम-जबरदस्तीनेंच गिळंकृत केला. वेलस्लीचें खरें कारस्थान मराठामंडळ फोडण्यांत होतें. यावेळीं मराठेच हिंदुस्थानचे मालक होते. त्यांनां मोडून वेलस्लीनें इंग्रजांनां हिंदुस्थानची मालकी मिळवून दिली. या मोहिमांचें वर्णन मराठयांच्या भागांत दिलें आहे. अबदालीचा नातु जमानशहा पंजाबवर स्वारी करील व अयोध्येचा वजीर त्याला मदत करील म्हणून वजीराची तैनाती फौज वाढविली. नेपोलियनचें आशियांतील कारस्थान हाणून पाडण्यासाठीं वेलस्लीनें सर मालकमला इराणांत वकिलीच्या कामावर पाठविलें होतें. सदसद्विवेक न पाहतां चढाईचें धोरण पुढें ठेऊन वाटेल त्याप्रमाणें भडाभड देशी राज्यें वेलस्लीनें खालसा केलीं. तैनाती फौजेच्या युक्तीनें राष्ट्राच्या पौरुषाची व एकंदर गुणांची खच्ची होते व अखेरीस तें राष्ट्र अथवा राज्य गुलामच बनतें असें सिडने ओवेनचें (ऑ. हि. ५९१) म्हणणें आहे. वेलस्लीचा राज्यकारभार डायरेक्टरांनां पसंत न पडून त्यांनीं त्याला ठपका दिला. नेपोलियनच्या दराऱ्यानें विलायतेंतील लोक भ्याले होते म्हणून वेलस्लीनें मराठयांशीं काढलेल्या कुरापतींचा धाक पडून वेलस्लीला परत बोलावण्यांत आलें व कॉर्नवॉलीसला पुन्हां इकडे पाठविलें. वेलस्लीला विलायतेस कोर्ट ऑफ प्रोप्रायटर्सच्या सभेनें त्याच्या अन्यायाच्या कारभाराबद्दल सरकारी रीत्या ठपका दिला व हेस्टिंग्जप्रमाणें त्याची चौकशी करण्याची खटपट चालली होती, पण ती थंडावली. वेलस्लीनें व्यापारावरील कांहीं निर्बंध काढले. चढावाच्या धोरणांत वॉरनहेस्टिंग्जचाच वेलस्ली हा शिष्य बनला होता व डलहौसी, एलफिन्स्टन, मालकम यांचा तो गुरु होता. सिव्हिल सर्व्हिसमध्यें व्यापारी दृष्टि टाकून राजकीय दृष्टया म्हणजे इंग्रजांचें राज्य कायम टिकवितील या दृष्टीनें जे यूरोपियन नोकर नेमावयाचे त्यांनां तसल्या प्रकारच्या शिक्षणांत तरबेज करण्यासाठीं वेलस्लीनें कलकत्त्यास डायरेक्टरांच्या संमतीखेरीज एक कॉलेज काढलें, पण तें पुढें रद्द ठरून इंग्लंडांत काढलें गेलें (१८०९), तें पुढें ५० वर्षें टिकलें. म्हैसूर व निजाम (१७९८ व १८०० च्या तहांनीं) हे यावेळीं इंग्रजांचे मांडलिक बनले होते. त्यामुळें मराठयांशिवाय त्यांना प्रबळ शत्रु उरला नाहीं, पण मराठयांनां चिडविण्याचें धैर्य वेलस्लीला यावेळीं झालें नाहीं. परंतु त्यानें अनेक लटपटी करून नाना फडणीस वारल्यावर रावबाजीला तैनाती फौज ठेवावयास मात्र भाग पाडलें (१८०३). शिंद्यांचा पराभव दिल्लीकडे झाल्यानें इंग्रजांनीं आंधळ्या शहाअलमास (आपला मांडलिक म्हणून) गादीवर बसविलें. या वेळचें हें मराठे इंग्रज युद्ध हिंदुस्थानच्या सार्वभौमत्वासाठींच झालेलें युद्ध असून त्यासाठीं वेलस्लीनें अनेक सूक्ष्मासूक्ष्म डावपेंच केले होते. आपली सत्ता स्थापणें व तिच्या (हिंदुस्थानच्या) बळावर नेपोलियनची इंग्लंड तुडविण्याची महत्त्वाकांक्षा ठार करणें हे वेलस्लीचे दोन प्रमुख हेतू होते.

**सर जॉर्ज बार्लो**-(१८०५-०६) कॉर्नवॉलिस इकडे आल्यावर शिंद्यानें इंग्रज वकील जेंकिन्स याला कैद केल्याबद्दल त्याच्या विरुद्ध कॉर्नवॉलिसला हात उचलण्याचें धैर्य झालें नाहीं. तीन महिन्यांनीं कार्नवालीस मेल्यावर बार्लो हा गव्हर्नर जनरल झाला. यानेंहि कॉर्नवॉलिसचीच शांततेची राज्यपद्धति ठेवून व चालू असलेलीं युद्धें बंद करून तह केले; ते मराठयांच्या भागांत मागें दिले आहेत. मद्रासच्या सैन्यांतील शिपायांनां विशिष्ट प्रकारचा पोषाक करण्यास व गंध लावूं नये, विशिष्ट दाढया राखाव्या इत्यादि नवीन नियम पाळण्यास सक्ति केल्यानें व आपणांस ख्रिस्ती करणार या भूमकेनें त्यांच्यांत असंतोष फैलावून वेल्लोरच्या शिपायांनीं बंड करून दोन यूरोपियन कंपन्यांची कत्तल केली. तें बंड तत्काळ मोडलें गेलें व त्यांत भाग घेतल्याचा आरोप ठेवून टिप्पूच्या कुटुंबास तेथून काढून कलकत्त्यास पाठविलें (विलसननें हा आरोप सिद्ध झाला नाहीं असें स्पष्ट म्हटलें आहे.) मद्रासचा गव्हर्नर लॉर्ड बेंटिंग याला बडतर्फ केलें व बार्लोला तेथें गव्हर्नर नेमलें.

**लॉर्ड मिंटो**-(१८०७-१३) हा विलायतेस कंपनीच्या बोर्ड ऑफ कंट्रोलचा अध्यक्ष होता. विलायतेंत नेपोलियनचा दरारा इंग्लंडला पडल्यामुळें इकडे मिंटोनें साधारण

शांततेचें धोरण ठेवलें. हिंदुस्थानची वायव्येकडील सरहद्द रक्षण करण्यासाठीं रणजितसिंगाशीं तह केला. अहमदशहा अब्दालीच्या मागें अफगाण लोकांत तंटे लागल्याचें पाहून शिखांनीं पंजाब हस्तगत केला व आपलीं लहान लहान राज्यें स्थापिलीं, त्यांच्यांतहि तंटे लागले, तेव्हां चतरसिंग नांवाच्या राजानें हीं राज्यें एकत्र करण्याचा उपक्रम केला; तो त्याच्या महासिंग नांवाच्या मुलानें बराचसा सिद्धीस नेला. त्याचा मुलगा रणजितसिंग यानें शौर्यानें व हुशारीनें त्यांवर आपली मुख्य सत्ता स्थापिली. सतलज नदीच्या पूर्वेच्या शिख राजांनीं रणजितसिंगास मानलें नाहीं म्हणून त्यांस जिंकून यमुनेपर्यंत राज्य वाढविण्याची त्यानें खटपट चालविली. तेव्हां त्या संस्थानांनीं इंग्रजांची मदत मागितली. यावेळीं रणजित जबरदस्त होत चाललेला पाहून मिंटोनें वरील मदतीच्या मिषानें तटस्थपणा सोडून देऊन मेटकॉफबरोबर फौज देऊन रणजितकडे पाठविलें. परंतु मेटकॉफनर अनेक प्रसंग गुदरल्यानें आणि रणजितशीं युद्ध करणें सोपें नसल्यानें सतलज ही रणजितच्या राज्याची पूर्व सीमा ठरविली गेली व लुधियाना येथें इंग्रजी फौजेचें ठाणें बसलें (१८०९) आणि इंग्रजांची हद्द सतलजपर्यंत सरकली. रणजितच्या मरणानंतर इंग्रजांनीं इमानानें तह पाळला. याखेरीज पोर्तुगीज, डच, फ्रेंच वगैरेंशीं दर्यावर मिंटोनें कांहीं लढाया मारल्या. त्रावणकोरच्या राज्यांत दंगा झाल्याच्या सबबीवर त्यानें तेथला कारभार कांहीं दिवस कंपनीच्या हातीं घेतला;तसेंच तंबूच्या खरेदींतील कमीशन कापल्यामुळें मद्रासच्या यूरोपियन फौजेनें बंडाळी केली ती गव्हर्नर बार्लोनें हिंदी पलटणांच्या मदतीनें मोडली. या सुमारास कंपनीच्या वीस वर्षांच्या सनदेची मुदत संपली. तेव्हां पार्लमेंटांत चार महिने वाद माजून पुन्हां वीस वर्षांची सनद देणें, सर्व अधिकारी कंपनीनें नेमणें, हिंदुस्थानांत वाटेल त्यानें (कंपनीखेरीज) व्यापार करणें, चीन देशाशीं मात्र कंपनीनें व्यापार करणें इत्यादि अटी ठरल्या(१८१३). याच वेळीं हिंदुस्थानांत हिंदी पैशानें ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याचें ठरून कलकत्यास एक बिशप नेमला. यानंतर मिंटो विलायतेस गेला. तो वॉरन हेस्टिंग्जचा खटला भरणाऱ्या मंडळींतला एक व बर्कचा मित्र होता. नेपोलियनच्या भीतीनें यानें मराठ्यांची कुचाळी काढली नाहीं. मात्र त्यानें फ्रान्सची पूर्वेकडील केप गुडहोपपासून केप हार्नपर्यंत सर्व सत्ता नाहींशी केली. याच वेळीं आज साखर पिकविणारें मॉरिशस बेट इंग्रजांनीं मिळालें. नेपोलियननें इराणांत एक मिशन पाठविलें असतां यानें मालकमला तिकडे आपला वकील म्हणून पाठविलें, पण त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. नेपोलियननें परदेशांतील बरीचशीं बंदरें दाबल्यानें इंग्रज लोकांनां हिंदुस्थानाखेरीज दुसरीकडे निर्गत व्यापार करणें शक्य नव्हतें.

**लॉर्ड हेस्टिंग्ज**–(१८१४–२२) प्रथम हा बर्कच्या व कॉर्नवालीसच्या मताचा असून वेलस्लीची त्यानें निंदाहि केली होती; पण इकडे आल्यावर तो इतका उलटला कीं, ज्या चार गव्हर्नर जनरलांनीं हिंदुस्थानांत सूक्ष्मासूक्ष्म कृत्यांनीं इंग्रजी राज्य स्थापिलें, त्यांपैकीं हा एक बनला. वॉरन हेस्टिंग्जचा पहिला नंबर व याचा दुसरा होय. देशी शिक्षणाच्या शाळा स्थापणें व छापखाने आणि वर्तमानपत्रांनां साधारण उत्तेजन देणें एवढीच काय तीं दोन बरीं कामें यानें केलीं. "विलायतेंतील इंडियाहाऊस हिंदी लोकांनां शिक्षण देण्याच्या अगदीं विरुद्ध होतें" असें हेस्टिंग्ज व व्हि. स्मिथ म्हणतात. बाकी सर्व कारकीर्दीत हेस्टिंग्जनें युद्धेंच केलीं. त्यांत मराठे व पेंढारी यांच्या युद्धाची माहिती मागें दिली आहे व नेपाळच्या युद्धाची हकीकत पुढीलप्रमाणें आहे:—कंपनीचा व्यापार नेपाळशीं बराच चाले; तिबेटांतील सोनें कंपनी बंगाल्यांत आणीत असे. मध्यंतरीं काश्मीरांतील गुरख्यांनीं नेपाळच्या नेवार राजास हांकलून राज्य जिंकलें तेव्हां त्यानें इंग्रजांची मदत मागितली. त्यावेळीं इंग्रजांनीं पाठविलेल्या सैन्याचा गुरख्यांनीं पुरा पराभव केला. गुरख्यांचा राजा लोकांच्या कौन्सिलाच्या मदतीनें राज्य करी. सैन्यांत दर तीन वर्षांनीं तेच तेच सैनिक निवडून येत व दर वर्षी नवीन भरती होई; म्हणजे नेपाळी राष्ट्र लढावय्ये होतें. हिंदुस्थानांत त्यावेळीं तरी असल्या प्रकारचें एवढेंच एक राज्य होतें. नेपाळचा जुलमी राजा रणबहादर याला त्याच्या सरदारांनीं काशीस हद्दपार केल्यानें त्यानें इंग्रजांची मदत मागितली, तेव्हां इंग्रजांनीं नेपाळांत आपला हात शिरकविला, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. परंतु नेपाळी लोकांनीं कंपनीच्या हद्दींतील कांहीं गांवें घेतलीं या सबबीवर हेस्टिंग्जनें नेपाळावर स्वारी केली. तीन बाजूंनीं चार सैन्यांनीं त्यानें नेपाळला कोंडलें. परंतु त्या वर्षी (१८१९) नेपाळ्यांनीं त्या चौघांचा पराभव केला. त्यांत जनरल मार्ले तर घाबरून पळून गेला. पुढील वर्षीहि हें युद्ध सुरूच होतें, त्यांत दोघांचीं बहुतेक बरोबरी झाली व नेपाळनें दक्षिणेकडील इंग्रजांचे

प्रांत सोडावे आणि इंग्रजांनीं तराई प्रांत नेपाळास परत द्यावा आणि आपला वकील नेपाळांत ठेवावा असा तह ठरला (१८१६). यामुळें गुरखे लोक इंग्रजांच्या फौजेंत नोकरीस राहूं लागले व सिमला, नैनीताल, मसूरी वगैरे उत्तम हवेचीं ठिकाणें इंग्रजांना मिळालीं. हेस्तिंग्ज हा चौथ्या जॉर्ज राजाचा मित्र होता, हा जॉर्ज कोणत्या प्रकारचा मनुष्य होता हें प्रसिद्ध आहे. हेस्तिंग्जनें उदेपूर, जोधपूर, कोटा, कच्छ, जयपूर, भोपाळ, येथील राजे, नागपूरकर भोंसले, होळकर, शिंदे इत्यादिकांशीं तह करून त्यांनां दोस्त उर्फ मांडलिक बनविलें. अमेरिकेचें युद्ध व हिंदुस्थानांतील इतर युद्धें यांत यानें प्रामुख्यानें भाग घेतल्यानें तो उत्तम सेनापति होता. यावेळीं कंपनीचें सैन्य २ लाखांच्यावर असून तोफखाना चांगलाच होता. भोंसल्यांचें राज्य व पेशव्यांचें राज्य याच्या वेळीं नष्ट होऊन 'सर्व हिंदी संस्थानें मांडलिक बनून' इंग्रज हे खरेखरे हिंदुस्थानचे मालक बनले. या मांडलिकांनीं इंग्रजांशीं कसे संबंध ठेवावयाचे याचें जें सामान्य धोरण हेस्तिंग्जनें ठरविलें; तें साधारणपणें आजपर्यंत चालू आहे. हेस्तिंग्ज म्हणतो "पेशव्यांचें नांव सुद्धां पुसून टाकण्याचें कारण आमचा दरारा हिंदी संस्थानिकांनीं मानावा." जपान–चीनपर्यंतचा सर्व पूर्वेकडील इंग्रज व्यापार सुरक्षित चालावा म्हणून हेस्तिंग्जनें डचांचें सिंगापूर बेट बळजबरीनें काबीज केलें. गेल्या महायुद्धापूर्वी सालीना दीड कोटी भरताडाचीं ११ हजार जहाजें या बंदरांतून व्यापार करीत असत. जबर शेतसारा व इतर जुलमामुळें रोहिलखंड व ओरिसामधील शेतकऱ्यांनीं बंड केलें तेव्हां त्यांचें म्हणणें हेस्तिंग्जनें कबूल केलें (१८१६). शहाअलम बादशहाला सर्व इंग्रज अधिकारी जो नजराणा करीत तो यानें बंद केला, मात्र १८३५ पर्यंत कंपनीच्या नाण्यांवर शहाअलमचें अधिराजदर्शक नांव कोरीत असत. डायरेक्टरांच्या दपटशामुळें हेस्तिंग्जनें मद्रासप्रांतांत ग्रामपंचायती पुन्हां सुरू केल्या; पण कॉर्नवॉलीसनें केलेली सुधारणा मोडून पुन्हां प्रत्येक कलेक्टराला दिवाणी–फौजदारी अधिकार एकत्र देण्यांत आले. मद्रासप्रांतांत यानें व मद्रासचा गव्हर्नर सर थामस मनरो यानें रयतवारी तरमबंदी चालू केली. पण आकार भारी बसविल्यानें व जुलूम केल्यानें शेतकऱ्यांनीं दंगेधोपे केले. मुंबई इलाख्यांतहि गव्हर्नर एलफिन्स्टन यानें तरमबंदी केली. तीं जमीनदारी, रयतवारी वगैरे पद्धतींचें मिश्रण होतें. पेशव्यांची पद्धति चांगली असल्यानें बहुतेक तीच इंग्रजांनीं कायम केली. एका ब्यांकेच्या कामांत कांहीं घोटाळा केल्याचा आरोप आल्यावरून कंपनीनें हेस्तिंग्जवर ठपका भरला तेव्हां त्यानें राजीनामा दिला. त्याच्या मागें अडाम यानें ७ महिने गव्हर्नरजनरलचें काम केलें. त्यानें कलकत्ता जर्नलच्या संपादकास हद्दपार केलें. हिंदुस्थानांतील पहिलें इंग्रजी वर्तमानपत्र हिकी यानें १७८० त काढलेलें बंगाल ग्याझिट म्हणून होतें. हिकीनें मिसेस हेस्तिंग्ज व इतर कांहीं लोक यांची बदनामी केल्याच्या आरोपावरून त्याला कैदेंत टाकून पत्र बंद केलें (१७८२). नंतर इंडियन ग्याझिट निघालें. त्याच्या संपादकास कॉर्नवॉलीसनें हद्दपार केलें (१७९१). हा अधिकार गव्हर्नरजनरल यास असावा असें सुप्रीम कोर्टानें ठरविलें होतें. पुढें (१७९९) सेन्सॉरशिप ठेवण्यांत आली, ती मिंटोनें जास्त कडक केली (१८१३); पण ती हेस्तिंग्जनें काढून त्याऐवजीं कायद्यांत कडक नियम केले. कलकत्ता जर्नल वकिंगह्यामनें काढलें व अडामवर सडकून टीका केली, तेव्हां त्यानें प्रत्येक प्रिंटरनें सरकारी परवाना(लायसेन्स)पत्र घेतलें पाहिजे असें ठरविलें, पण त्यानेंहि अडामचें काम अडलें नाहीं म्हणून त्यानें त्यास हद्दपार केलें. बेंटिंगलाहि वर्तमानपत्रावर 'अतिशय कडक नजर' ठेवणें जरूर वाटे. पुढें मेटकॉफनें हीं सर्व बंधनें काढलीं (१८३५), तेव्हांपासून लिटनच्या कायद्यापर्यंत (१८७८) वर्तमानपत्रांवर मुळींच नियंत्रण नव्हतें. लिटननें जें नियंत्रण घातलें तें फक्त देशी पत्रांवर घालून अन्यायाची वर्तणूक केली. रिपननें हें नियंत्रण काढून टाकलें. पुढें १९०८ मध्यें प्रेसअॅक्ट कडक केला आणि १९१० त तर नवीन प्रेस अॅक्ट जास्तच कडक केला. हिंदुस्थानांत पहिलें छापील पुस्तक हालहेडचें बंगाली व्याकरण होय (१७७८). तसेंच पहिलें हिंदी वर्तमानपत्र बंगाली समाचारदर्पण म्हणून होतें.

**लॉर्ड ॲम्हर्स्ट**–(१८२३–२८) याच्या वेळीं बहुतेक हिंदुस्थान इंग्रजांच्या हातीं आला होता, त्यामुळें इंग्रजांनीं आतां आपली सरहद्द बळकट करण्याकडे लक्ष देऊन तशी तयारी चालविली. ब्रह्मीयुद्ध हें तिचेंच एक अंग होय. ब्रम्हदेश सुपीक आहे. तेथें लहान लहान राज्यें असून तीं आपसांत झगडत. पैकीं तालैन नांवाच्या बंडखोर लोकांस अलोंपरा या ब्रम्ही राजाविरुद्ध अठराव्या शतकांत इंग्रजांनीं मदत केली होती. पुढें (१८१२) कांहीं ब्रम्ही बंडखोर पळून इंग्रजी हद्दींत आले व ते इंग्रजांनीं परत करण्याचें नाकारल्यानें पहिलें

ब्रम्ही युद्ध उपस्थित झालें. त्यांत इंग्रजांचा पैशाच्या व माणसांच्या बाबतींत फार तोटा झाला. (१८२४ फेब्रु). त्यांतील पहिल्या तीन मोहिमांत इंग्रजांचा पराभव होऊन शेवटच्या मोहिमेंत ब्रम्ही सेनापति मेल्यामुळें व ब्रम्ही फौज आपोआप पळून गेल्यानें जय झाला व तेनासेरीम, आसाम, आक्कारान हे प्रांत आणि युद्धखर्च इंग्रजांनां मिळाला (१८२६ फेब्रु ). यापूर्वी ब्रम्हदेशच्या राजानें रावबाजीशीं कारस्थान केलें होतें असें म्हणतात (१८१७). या वेळेसच जाटांचें युद्ध सुरू झालें. भरतपूरकर जाटाशीं तह करून इंग्रजांनीं त्याची ५ हजार फौजेची मदत शिंद्याविरुद्ध घेतली होती (१८०३), पण पुढें जाट इंग्रजांविरुद्ध होळकरास मिळाला तेव्हां इंग्रजांनीं डीगचा किल्ला घेतला, पण भरतपूर त्यांच्या हातीं पडलें नाहीं. त्यानंतर १८२५ मध्यें भरतपूरच्या गादीच्या वारसाच्या तंट्यांत इंग्रजांनीं मुद्दाम हात घालून व बळवंतसिंगाचा पक्ष घेऊन भरतपुरास वेढा दिला. तो पुष्कळ दिवस टिकून अखेर किल्ला इंग्रजांच्या हातीं पडला व त्यांनीं सर्व कारभार हातीं घेऊन अज्ञानी बळवंतसिंगास गादीवर बसविलें (१८२६). यावेळीं इंग्रज सेनापतीनें फार लूट केली. सिमल्यास हिंदुस्थान सरकारची कचेरी नेण्याचें ॲम्हर्स्टनें सुरू केलें. बराकपूरच्या देशी पलटणींनीं कांहीं धार्मिक बाबतींत इंग्रजांनीं जुलुम केला म्हणून बंड केलें तें लवकरच मोडलें गेलें (१८२४). स्मिथ म्हणतो कीं अधिकाऱ्यांनीं त्यांत विनाकारण फार लोक मारले. ब्रम्ही युद्धामुळें हिंदीमहासागरांत लष्करी जहाजांचा प्रवेश झाला.

**लॉर्ड विल्यम बेंटिंक**–(१८२८–३५) हा मद्रासचा गव्हर्नर असतां वेल्लोरच्या बंडामुळें त्याला बडतर्फ केलें होतें, तरी ॲम्हर्स्टनंतर यालाच गव्हर्नर जनरल नेमलें. हा लष्करीपेक्षां मुलकी कामांत जास्त दक्ष होता. ब्रम्ही लढाईमुळें खजिन्यांत तूट आल्यानें यानें यूरोपियन लष्करी व मुलकी अधिकाऱ्यांच्या भत्त्यांत काटकसर केली, पण त्यामुळें ते याच्यावर पुष्कळ तडफडले. तसेंच हिंदी शिपायांनां फटक्यांची शिक्षा माफ करून यूरोपियन शिपायांनां ठेवल्यामुळें ते शिपाईहि त्याच्यावर असंतुष्ट झाले. यानें केलेली मुलकी व दिवाणी सरकारी खात्यांची योजनाच बहुतेक मांटेग्यु–चेम्सफर्ड सुधारणा होईपर्यंत चालू होती. यानें मांडलिक राजांचे संबंध, लोकोपयोगी कामें, व राजकीय सुधारणा यांत विशेष लक्ष घातलें. यावेळीं हिंदी राजे व इंग्रज कंपनी यांचे परस्परसंबंध फार भानगडीचे झाले होते, त्यांचे संबंध स्पष्टपणें ठरले गेले नव्हते. बहुतेकांच्या दरबारीं इंग्रज रेसिडेंट असे; तो केव्हां केव्हां राज्यांतील अव्यवस्थेच्या नांवावर संस्थानच्या अंतर्गत कारभारांत हात घाली. जोधपूरच्या मानसिंगास दरबाऱ्यांनीं पदच्युत केलें तेव्हां कंपनीनें त्याला मदत करून गादीवर बसविलें होतें. इंदूरचा दुसरा मल्हारराव मेल्यावर त्याच्या राणीनें दत्तक घेऊन कारभार चालविला, तेव्हां कंपनीनें त्या दोघांनां काढून लावून हरिराव नांवाचा दुसराच माणूस गादीवर बसविला. बडोद्याचा सयाजीराव गायकवाड हा आपल्या हक्कासाठीं कंपनीशीं झगडे करीत होता. भोपाळची बेगम शिकंदर व तिचा पुतण्या यांच्यांतील भांडणांत कंपनीनें पुतण्याची बाजू घेऊन त्याला गादीवर बसविलें. म्हैसूरचा दिवाण पूर्णय्या हा मेल्यावर तेथला राजा कृष्णराज हा दुर्वृत्त निघाला या सबबीवर कंपनीनें त्याला पदच्युत करून व थोडीशी नेमणूक ठरवून राज्य आपल्या ताब्यांत घेतलें. निजामासहि स्वतःच्या राज्यांत सुधारणा करण्यास ताकीद दिली. तसेंच उदेपूर–जयपूर येथील राजांनांहि कंपनीनें समज दिली. मात्र रणजितसिंग व सिंधचे अमीर यांच्याशीं दोस्तीचे तह केले. तेहि रशियाच्या स्वारीच्या भीतीमुळें केले. रणजितनें व अमीरनें कंपनीला आपल्या राज्यांत व्यापाराची परवानगी दिली. ब्रम्हदेशाच्या युद्धांत काचारचें संस्थान कंपनीच्या बाजूचें असतां, तेथील राजा निपुत्रिक मेल्यानें तें संस्थान कंपनीनें खालसा केलें (१८३०). या प्रांतांत चहा आणि तांदूळ फार पिकतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कुर्गचें राज्यहि असेंच यावेळीं (१८३४) खालसा केलें. तेथील प्रांत फार सुपीक आहे. विजयनगरचें राज्य बुडाल्यावर एका साधूनें या प्रांतांत राज्य स्थापिलें. तें २०० वर्षे स्वतंत्र होतें. हैदर आणि टिप्पू यांच्यांनीं तें जिंकवलें गेलें नाहीं. इंग्रज–टिप्पू यांच्या युद्धांत कूर्गचा वीरराज इंग्रजांचा स्नेही होता. त्याचा नातू चिक्कराज यानें राज्य अव्यवस्थित चालविलें असा आरोप त्याजवर ठेवून कंपनीनें तें राज्य खालसा केलें. बेंटिंकनें या कृत्याखेरीज (लोकांच्या संमतीनें) सतीच्या चालीस बंदी करणें, ठग लोकांचा बंदोबस्त करणें, हिंदुस्थानांत इंग्रजी शिक्षण सुरू करणें, वाफेच्या गलबतांनीं तांबड्या समुद्राच्या मार्गानें व्यापारवाढ करणें, सरकारी कामांत देशी भाषांचा उपयोग व देशी आणि पाश्चात्त्य वैद्यकशिक्षणाची शाळा काढणें, अफूविक्रीस परवाने देणें, हिंदी लोकांस महत्त्वाच्या नोकऱ्या देणें,

इत्यादि कामें केलीं. देशी राजांजवळची फौज कमी झाल्यानें ठगांची संख्या वाढली होती; तिच्यांत एकी वाखाणण्यासारखी असून ते लोक अनेक जातींचे (मुसुलमान सुद्धां) असूनहि कालीचे भक्त असत. कोंकणखेरीज सर्व हिंदुस्थानांत यांच्या टोळ्या फिरत. गळफांस देऊन माणसास मारीत व द्रव्य लुटीत. एका ठगानें तर स्वत: ७१९ माणसें मारल्याचें कबूल केलें होतें. ठगांची एक सांकेतिक भाषा असे. कंपनीनें सर्व हिंदुस्थान हातीं घातल्यावर तिच्यापुढें एक प्रश्न उभा राहिला, तो म्हणजे हिंदी लोकांस सज्ञान करून त्यांच्यावर राज्य करावें कीं त्यांनां अडाणी ठेवून जास्त सुलभपणें राज्य हांकावें? खेरीज शिक्षण देणें झाल्यास तें हिंदी जुन्या पद्धतीचें द्यावें कीं, पाश्चात्त्य धर्तीचें द्यावें? ट्रिव्हेलिन, डफ, मेकॉले, हे पाश्चात्त्य शिक्षणाचे आग्रही होते, व त्यासाठीं या माणसांनीं कांहीं लेखहि लिहिले आहेत. अखेर मेकॉलेच्या म्हणण्याप्रमाणें टरून पाद्र्यांच्या देखरेखीखालीं इकडे इंग्रजी शिक्षणाच्या शाळा निघाल्या. कंपनीची मुदत १८३३ त संपली, तेव्हां पार्लमेंटांत तिच्याबद्दल कडक वादविवाद होऊन व अनियंत्रित विरुद्ध नियंत्रित व्यापाराबद्दलहि रगे माजलीं. अखेरीस पुढेंहि वीस वर्षें कंपनीस राज्य करण्याची सनद मिळाली. त्यावेळीं चीन देशाचा व्यापार सर्वांस मोकळा केला गेला कंपनीचें आरमार मोडलें. गव्हर्नरजनरलास आणखी कांहीं अधिकार मिळाले, कायदेमंत्री निर्माण करून मेकॉलेला पहिला कायदेमंत्री नेमलें गेलें. गव्हर्नराचीं कौन्सिलें मोडून कौन्सिलाचे अधिकार आणि कायदा करण्याचे अधिकार गव्हर्नरजनरलास मिळाले आणि हिंदुस्थानांत यूरोपियन लोकांस जमीनी विकत घेण्यास (चहा, नीळ व ताग पिकविण्यासाठीं) परवानगी मिळाली.

**चार्लस मेटकॉफ**-(१८३५-३६) हा वायव्येकडील प्रांताचा लेफ्टनंट गव्हर्नर होता. त्यास गव्हर्नर जनरल कायम केल्यावर (तो कंपनीचा कामदार असल्यानें) आपला अधिकार कमी होतो म्हणून पार्लमेंटानें त्याला काढून आक्लंड याला गव्हर्नर ज. नेमलें. मेटकॉफनें वर्तमानपत्रांस व छापखानेवाल्यांस पुष्कळ सवलती दिल्या. हें त्याचें कृत्य विलायतेंत पसंत न पडून डायरेक्टरांनीं त्याजवर ठपका ठेवल्यामुळें त्यानें राजीनामा पाठविला.

**लॉर्ड आक्लंड**-(१८३६-४२) याच्या वेळीं नेपोलियनचा पाडाव होऊन मध्यआशियांत रशियाची सत्ता वाढली व तो इराण-अफगाणिस्तान यांना हाताशीं घेऊन हिंदुस्थानवर येणार अशी शंका इंग्रजांनां वाटली म्हणून त्याच्या उलट कारवाई करण्याचें आक्लंडनें ठरविलें. अहमदशहा अब्दलीच्या झमानशहा व शहा सूजा नांवांच्या नातवांस त्यांचा वझीर फत्तेअल्ली यानें हांकलून अफगाणिस्तानाची गादी उपटली. कांहीं दिवसांनीं फत्तेअल्लीचा खून होऊन त्याचा भाऊ दोस्तमहंमद हा राजा झाला (१८२६). शहासुजास पुढें करून रणजितसिंग व इंग्रज हे अफगाणिस्तानांत हात घालूं पहात होते. रशियाच्या चिथावणीनें इराणनें हिरातला वेढा घातला, पण तो फसला (१८३७). रणजितसिंगाकडून पेशावर प्रांत घेण्यासाठीं रशियानें दोस्तमहंमदास मदत देण्याचें कबूल केलें. तेव्हां शहासुजा, रणजित व इंग्रज या त्रिवर्गांचा तह झाला. त्यामुळें शहासुजास गादीची प्राप्ति व रणजित आणि इंग्रज यांच्या सरहद्दींचें संरक्षण होणार होतें. वास्तविक इंग्रजांची सरहद्द अफगाणिस्तानच्या हद्दीपेक्षां फार लांब होती, मध्यें रणजिताचें सबंध राज्य होतें. तरी पण इंग्रजांच्या मुत्सद्यांनीं ओढून ताणून अफगाण युद्ध अंगावर ओढून आणलें. खरें म्हटल्यास दोस्तमहंमदानें इंग्रजांचें कांहीं वांकडें केलें नव्हतें. इंग्रजांची फौज रणजित आपल्या राज्यांतून जाऊं देईना म्हणून सिंधच्या अमीरांच्या प्रांतांतून ती गेली. तिनें शहासुजास काबूल येथें गादीवर बसविलें (१८३९ आगस्ट); दोस्त महंमद बुखाऱ्याकडे पळाला. शहासुजाच्या रक्षणासाटीं इंग्रजी फौज तीन वर्षें काबुलास होती. त्यावेळीं अफगाणिस्तानचे खरे राजे इंग्रजच होते. अफगाण लोक आंतून इंग्रजांचा द्वेष करीत. अखेर इंग्रज वकील बर्न्स याचा त्यांनीं खून केला आणि बंड उभारलें (१८४१ नोव्हें.). दोस्तमहंमदाचा पुत्र अकबर हा बंडवाल्यांचा पुढारी होता. इंग्रजांची फार तारांबळ उडाल्यानें ते सर्व खजिना व दारूगोळा त्याच्या स्वाधीन करून हिंदुस्थानांत परत यावयास निघाले आणि कांहीं मंडळी ओलीस म्हणून राहिली पण वाटेंत खिंडींत गांठून बंडखोरांनीं १६ हजार इंग्रजांच्या फौजेस बकऱ्यांप्रमाणें कापून काढलें; फक्त एक मनुष्य पळून गेला. तिकडे रणजित वारल्यानें (१८३९) पेशावरासहि शीख फौजांनीं इंग्रजांविरुद्ध उचल केली. त्यामुळें आक्लंडची व त्याबरोबर इंग्रजांची व इंग्लंडची सर्वत्र नाचक्की होऊन त्याला परत बोलावून एलेन्बरो गव्हर्नर जनरल नेमण्यांत आलें. आक्लंडनें शैक्षणिक व वैद्यक खात्यांत कांहीं थोडया सुधारणा केल्या, व जत्रेवरील कर कमी केले. इंग्लंडच्या प्रधानमंडळाच्या चुकीच्या धोरणामुळें त्याला अफगाणयुद्धांत जबरदस्त

ठोकर बसली. सन १८३७ मध्यें उत्तर हिंदुस्थानांत भयंकर दुष्काळ पडून ८ लाख माणसें मेलीं, परंतु सरकारास दुष्काळाचें पूर्ण निवारण करतां आलें नाहीं. अयोध्येचा नबाब नासीर मेल्यावर त्याच्या बेगमेनें इंग्रजांच्या तावडींतून सुटण्याचा प्रयत्न केला,पण तो फसला. आक्लंडनें दुसरा नबाब गादीवर बसवून त्याच्यापासून कंपनीस जास्त फायदेशीर तह करविला (१८३८). सातारकर छत्रपतीनेंहि इंग्रजांच्या ताब्यांतून निसटण्याचा प्रयत्न केला म्हणून त्याला(प्रतापसिंहाला)पदच्युत करून त्याच्या भावास (शहाजीस)गादीवर बसविलें (१८३९). कर्नूलच्या नबाबानें कंपनीविरुद्ध खटपट चालविल्याचा आरोप त्याच्यावर टेवून त्याचें राज्य खालसा केलें (१८४२). सिंधमध्यें खैरपूर, हैद्राबाद आणि मीरपूर येथें तीन अमीर स्वतंत्रपणें १७८६ पासून राज्य करीत होते. त्यांचा १८३१ पर्यंत इंग्रजांशीं कांहीं संबंध आला नाहीं. या वर्षी इंग्रजांनीं त्यांच्याशीं व्यापारविषयक तह केला; त्यांत स्वच्छ म्हटलें होतें कीं, अमीरांच्या प्रांतांतून इंग्रजी फौज किंवा युद्धोपयोगी सामान जाऊं नये व परस्परांनीं परस्परांच्या देशांवर डोळा ठेवूं नये. पुढें (१८३९) अमीरांच्या विरोधास न जुमानतां वरील तह मोडून इंग्रजी फौज सिंधमधून गेली. तसेंच शहासुजाच्या वतीनें इंग्रजांनीं अमीरांनां खंडणीचा तगादा लावला. वास्तविक त्यापूर्वी सुजानें त्यांनां खंडणी माफ केली होती. तसेंच १८३९ सालीं कंपनीनें आपली तैनाती फौज जबरीनें अमीरांच्या गळ्यांत अडकविली व त्यांचा गक्कर हा मजबूत किल्ला व कराची बंदर आपल्या ताब्यांत घेतलें. याप्रमाणें अमीरांशीं कंपनीनें जबरदस्ती चालविली व त्यांचें स्वातंत्र्य हिरावून घेतलें. अफगाणयुद्धांत अमीर इंग्रजांशीं स्नेहभावानेंच वागले होते.

**लॉर्ड एलेन्बरो**–(१८४२–४४)हा इकडे आल्यावर यानें अफगाणिस्तानांतील अपमानकारक मोहिमेचा शेवट लावला. जलालाबाद व कंदाहार येथील फौजांनीं व त्यांनां मदतीस पाठविलेल्या पोलकच्या फौजेनें अकबरखानाचा पराभव करून गझनी घेतली व काबूल काबीज केलें आणि तेथें भयंकर लूट व जाळपोळ केली. पण तत्पूर्वी शहासुजाचा खून होऊन अकबर अफगाणिस्तानचा अमीर बनला होता. इंग्रज कैद्यांनां सोडवून व शहासुजाच्या बायकामुलांस घेऊन इंग्रज फौज हिंदुस्थानांत परतली. पुढें दोस्तमहंमद अमीर झाला; इसवी सन तो १८६३ त मेला. इकडे सिंधचे अमीर आणि इंग्रज यांच्यांतील तेढ विकोपास जाऊन मियानी येथें इंग्रजांनीं अमीरांचा पराभव केला आणि हैद्राबाद काबीज करून तेथील अपार संपत्ति लुटली. पुन्हां हैद्राबादेस अमीरांचा शेवटचा पराभव होऊन नेपीयर व औटराम यांनीं सिंधप्रांत खालसा केला (१८४३ मार्च). सिंधुनदांतून इंग्रजी व्यापार सुरळीत चालावा म्हणून मुद्दाम अन्यायानें एलन्बरोनें हें कृत्य केलें असें इंग्रज ग्रंथकारहि म्हणतात. या कामीं नेपीयरनें हलकटपणाचें व जुलमाचें कृत्य केलें असें स्मिथ स्पष्ट म्हणतो (ऑ. हि. ६८५) व त्यानें ७ लाख रुपये लुटीचे स्वतः निर्लज्जपणें खाल्ले असेंहि म्हणतो. अमीरांनां हद्दपार करण्यांत आलें. नेपीयर सिंध–पंजाबचा गव्हर्नर झाला. खैरपूरच्या अमीरानें इंग्रजांस मदत केल्यानें त्याचें संस्थान मात्र कायम ठेविलें. याच सुमारास ग्वाल्हेरचा जनकोजी शिंदे (दौलतरावाचा दत्तक पुत्र) निपुत्रिक वारला. त्याच्या बायकोनें जयाजीराव म्हणून एक दत्तक घेतला. जयाजी व त्याची आई अज्ञान असल्यानें राज्यांत गोंधळ माजला. ती संधि साधून व अद्यापि शिंद्याच्या पदरीं असलेलें सुसज्ज ४० हजार सैन्य (व ८०० तोफा) कमी करण्याच्या उद्देशानें एलन्बरोनें ग्वाल्हेरवर स्वारी केली. शिंद्यानें इंग्रजांची कांहींहि खोडी काढली नव्हती. महाराजपूर व पनीयार येथें लढाया होऊन जयाजीचा पराभव झाला. मात्र इंग्रजांचें नुकसानहि फार झालें. इंग्रजांनीं युद्धखर्च घेऊन शिंद्याची स्वतःची फौज पुष्कळ कमी केली व आपली तैनाती फौज वाढवून तिच्यासाठीं बराचसा मुलुख तोडून घेतला (१८४६). पुढें शिखांची सत्ता नष्ट करावयाची होती; त्यांचें सैन्य यावेळीं ९० हजार होतें. अर्थात पुढें जेव्हां शिखांवर स्वारी करावयाची तेव्हां पाठीवर ४० हजार मराठे नसावेत हा खरा उद्देश या स्वारींत होता. एलन्बरोनें आपल्या सैन्यास बिलकूल फुरसत दिली नाहीं. तेव्हां आणीक भानगडी उपस्थित होऊन आपल्या राज्यावर संकटें येतील म्हणून विलायत सरकारनें त्याला परत बोलावलें व हार्डिंजला इकडे पाठविलें. यानें गुलामांचा व्यापार बंद केला, पोलीसखातें सुधारलें व सोडती बंद केल्या.

**लॉर्ड हार्डिंज**–(१८४४–४८) हा आला त्यावेळीं शिखांच्या सुसज्जित लष्करी राष्ट्राची भीति इंग्रजांनां वाटूं लागली होती; व त्यांची ती लष्करी शिस्त कशी

मोडेल इकडे इंग्रजांचें लक्ष होतें. चाळीस वर्षें अव्याहत खटपट करून ज्या शूरपुरुषानें शिखांचें राज्य स्थापलें व ज्याला इंग्रजलोक भीत होते तो रणजीतसिंग मेल्यावर (१८३९) त्याचा मुलगा धुलीपसिंग लहान असल्यानें, राण्या, प्रधान व लष्करी सरदार यांच्यांत तंटे लागले. त्यांत एका पक्षास इंग्रजांनीं आंतून मदत केली. क्षुल्लक कारण दाखवून इंग्रजांनीं शिखांवर चढाई केली. पहिल्या दोन लढायांत इंग्रजांचा सपाटून पराभव झाला (१८४५), मात्र पुढील दोन लढायांत शिखांचा पराजय झाला. त्यांत शिखांकडील एक प्रमुख सरदार (लालसिंग) इंग्रजांस फितूर होता असें म्हणतात. नंतर लाहोरास तह होऊन त्यांत बराचसा प्रांत व लढाईखर्च इंग्रजांनां मिळाला व शिखांची फौज ८९ हजारांवरून २० हजारांवर उतरविली [तोफा ८०० होत्या] (१८४६). हें सैन्य फ्रेंच व इटालियन सेनापतींच्या हाताखालीं तरबेज झालेलें होतें. यावेळीं रणजितचा सरदार गुलाबसिंग (जो काश्मीरचा सुभेदार होता) याला काश्मीरचा राजा करून इंग्रजांनीं त्याच्यापासून पुष्कळ पैका काढला. त्याचा वंश हल्लीं काश्मिरच्या गादीवर आहे. धुलीप अज्ञान म्हणून लालसिंग व धुलीपची आई आणि रेसिडेंट पंजाबचें राज्य चालवीत. पुढें लालसिंगास, त्यानें गुलाबसिंगाच्या विरुद्ध बंड केलें म्हणून ठरवून काशीस नजरकैदेंत ठेविलें. हार्डिंजनें लष्करीखात्यांत सुधारणा केल्या व कांहीं काटकसरहि केली. पेनिनशुलर व वाटर्लूच्या लढायांत हार्डिंज लढला असल्यानें लष्करी बाबतींत तो हुशार होता.

**लॉर्ड डलहौसी**–(१८४८–५६)इंग्रजी राज्य स्थापणाऱ्या चार इंग्रज गव्हर्नरजनरलांपैकीं हा एक होता. ठिकठिकाणीं पसरलेलें इंग्रजी राज्य यानें सलग करण्यासाठीं अनेक लटपटी व अन्यायी कृत्यें केलीं. त्यामुळें १८५७ ची नानागर्दी उसळली. हा लहानपणापासून हुशार म्हणून प्रख्यात होता. २५ व्या वर्षींच तो पार्लमेंटचा सभासद झाला. मुख्य प्रधान पील याचा हा बगलबच्चा होता म्हणून याला व्यापारखात्याच्या मुख्याची जागा मिळाली. पुढें याला हिंदुस्थानांत गव्हर्नरजनरल म्हणून पाठविलें. तेव्हां हा ३५ वर्षांचा होता. यानें देशी राज्यें खालसा केलीं, शीख व ब्रम्ही युद्धें केलीं व राज्यकारभारांत कांहीं सुधारणा केल्या. रणजितसिंगाच्या पंजाबच्या राज्याचे खरे सूत्रधार यावेळीं इंग्रज होते. त्यांनीं पंजाबचें राज्य ताब्यांत घेण्याचा उद्योग हळू हळू चालविला होता. मुलतानचा शूर सुभेदार मूलराज याला राजीनामा देण्यास भाग पाडून तेथें इंग्रजांनीं आपल्या पक्षाचा एक सुभेदार नेमला, त्यामुळें शिखांत असंतोष उत्पन्न होऊन त्यांनीं युद्धाची तयारी चालविली. त्यांत रणजितची महाराणी त्यांनां मिळाली असा इंग्रजांनीं तिच्यावर आरोप ठेवून तिला काशीस नजरकैदेंत ठेविलें आणि शिखांवर चढाई केली. पण शिखांनीं मुलतान (सप्टेंबर १८४८), रामनगर (नोव्हेंबर १८४८) व चिलियनवाला (जानेवारी १८४९) येथें इंग्रजांचा सपाटून पराभव केला आणि त्यांचीं निशाणें व तोफा हिराडून नेल्या. पुढें इंग्रजांनीं मुंबईकडून फौज मदतीस आणून गुजरातच्या लढाईंत शिखांचा पराभव (त्यांनां रसद न मिळाल्यामुळें) केला आणि धुलीप(दिलीप)सिंगाचा कांहीं बाक नसतांहि त्याचें पंजाबचें राज्य खालसा केलें. मात्र त्याला ५ लक्षांची नेमणूक करून दिली. तो पुढें ख्रिस्ती बनून विलायतेस राहिला; त्यानें इकडे येण्याचा अनेकवार प्रयत्न केलेला फसून तो तिकडेच वारला. कोहिनूर हिरा याच वेळीं हिंदुस्थानांतून जाऊन इंग्रज राजाच्या मुकुटांत बसला. डलहौसीनें सर्व शिखांनां बिनहत्यारी केलें. पंजाब खालसा करण्यास यानें डायरेक्टर किंवा स्वतःचें कौन्सिल यांचा मुळींच सल्ला घेतला नव्हता. ब्रह्मदेशांत इंग्रजांनीं तेथील राजाच्या दरबारांत आपला रेसिडेंट नेमून तें राज्य घेण्याची खटपट मागेंच सुरू केली होती. पण ब्रम्ही लोक इंग्रजांचा द्वेष करीत. उलट इंग्रज लोक सैन्याच्या जोरावर त्यांच्याशीं अहंमन्यतेनें वागत. इंग्रजांनीं ब्रम्ही लोकांवर केलेल्या आगळीकींनां कायदेशीर शिक्षा देण्यास ब्रम्ही राजा भीत असे. एका ब्रम्ही खलाशाच्या खुनाबद्दल इंग्रज खुनी माणसाला सारा ९९९ रु. दंड झाला. असें असतांहि डलहौसीनें तिकडील इंग्रजांची बाजू घेऊन राजास निर्वाणीचा खलिता पाठवून आपण होऊनच अन्यायानें युद्ध उपस्थित केलें. त्यांत आरमाराच्या जोरावर अत्यंत सुपिक दक्षिण ब्रम्हदेश घेऊन डलहौसीनें तो हिंदुस्थानास जोडून टाकला (१८५२) आणि कलकत्त्यापासून सिंगापूर पर्यंतचा समुद्रकिनारा ताब्यांत आणला. वर सांगितल्याप्रमाणें ठिकठिकाणीं पसरलेल्या इंग्रजी प्रांतांस सलग करण्यासाठीं मध्यें मध्यें असलेलीं देशीं राज्यें डलहौसीनें अन्यायानें बुडविलीं. अशा वेळीं दत्तकनामंजुरी, बेवारसी, अव्यवस्था किंवा शेवटीं युद्ध अशा वाटेल त्या सूक्ष्मासूक्ष्म प्रकारांनीं त्यानें ही कामगिरी केली. या प्रकरणांत प्रथम सातारचें राज्य खालसा झालें, त्याला बेवारसीचें कारण

( दत्तक असतांहि ) लावण्यांत आलें ( १८४८ ) त्या नंतर रावबाजी पेशवे वारल्यामुळें त्यांची नेमणूक नानासाहेबांनीं मागितली असतां, ती तहाहयात होती अशी सबब काढून बंद केली ( १८५३ ). याच रावबाजीनीं व नानासाहेबांनीं इंग्रजांनां त्यांच्या संकटांत मदत केली होती. त्यामागून झांशी खालसा केली. पेशवाई गेल्यावर इंग्रजांनीं झांशीकरांशीं जो तह केला त्यांत तें राज्य वंशपरंपरा कायम ठेवण्याचें वचन दिलें होतें, आणि १८३९ त तर राजाला दत्तकाची परवानगीहि दिली होती. राजा गंगाधरराव यांनीं मरतेवेळीं रेसिडेंटाच्या समक्ष दत्तक घेतला होता. पण डलहौसीनें संस्थानास दत्तकाचा अधिकार नाहीं असें फर्मान काढलें व राज्य खालसा केलें (१८५३). या अन्यायानें गंगाधररावांची राणी लक्ष्मीबाई ही नानागर्दींत सामील झाली. यापुढें अर्काटच्या नबाबांची पाळी आली. वास्तविक त्यांच्यामुळेंच इंग्रजांचा प्रथम हिंदुस्थानांत शिरकाव झाला. वेलस्लीनें तर त्यांनां जहागीरदार बनविलें होतें. पुढें नबाब महंमद हा निपुत्रिक वारल्यानें त्याची जहागीर डलहौसीनें खालसा केली (१८५३). तंजावरचा राजा शिवाजी हा यानंतर दोन वर्षांनीं वारला; तोहि निपुत्रिक म्हणून डलहौसीनें त्याचेंहि राज्य घेतलें (१८५५); त्याचप्रमाणें जैतपूर आणि संबळपूरचेंहि छोटें राज्य निपुत्रिकतेच्या सबबीवर घेतलें. यावेळीं नागपूरचें भोंसल्यांचें राज्य ७५९०० चौरस मैलांचें होतें. भोंसल्यांशीं १८१७ त इंग्रजांनीं तह केला त्यांत राज्य वंशपरंपरा चालविण्याचें ठरलें असतां, १८५३ त रघूजी भोंसले निपुत्रिक वारल्यानें डलहौसीनें तहाचें कलम गुंडाळून हें राज्य खालसा केलें. सिंधच्या अमीरांपैकीं खैरपूरचा अमीर आपल्या भावाविरुद्ध फितूर होऊन मागें इंग्रजांस मिळाला होता व त्यावेळीं इंग्रजांनीं त्याचें राज्य कायम राखण्याचें वचन दिलें होतें; पण पुढें तो राज्यांत अव्यवस्था माजवतो या कारणानें त्याचें १९ लाखांचें राज्य खालसा करून त्याला डलहौसीनें जहागीरदार बनविलें (१८५३). सिक्कीमच्या राज्यांत दार्जिलिंग म्हणून बंगालसरकारचें हवा खाण्याचें ठिकाण होतें; त्यासाठीं इंग्रज सिकीमकरास सालीना ६ हजार रुपये भाडें देत असत. पुढें सिकीमकर उद्दाम वागतो या सबबीवर डलहौसीनें दार्जिलिंगच्या आसपासचा प्रांतच जबरीनें खालसा केला. त्याच प्रांतांत हल्लीं चहाचे अनेक मळे आहेत. निजामाकडे इंग्रजांच्या तैनाती फौजेच्या खर्चाची बाकी १८५१ त तुंबून ८० लाख रुपये झाली. ती देण्यास त्याला सवड होइना म्हणून डलहौसीनें त्याला तंबी देऊन ४० लाख बाकी वसूल केली आणि ५ हजार पायदळ २ हजार घोडदळ व कंटिजंट फौज म्हणून निजामानें ठेवून ती इंग्रजांच्या ताब्यांत ठेवावी, तिच्या खर्चास व मागील बाकीफेडीसाठीं वऱ्हाड आणि कृष्णातुंगा दुआब हे सुपीक प्रांत इंग्रजांस द्यावे, इंग्रजांनीं हिशेब ठेवून कर्जफेड झाल्यावर हे प्रांत परत करावेत असें ठरलें. पुढें (१९०३) वऱ्हाडचा कायमचा निकाल होऊन वऱ्हाड इंग्रजांनीं खालसा केला, मात्र त्याबद्दल सालीना २६ लक्ष रुपये निजामास मिळतात. अयोध्येच्या राज्यांत १८३७ च्या सुमारास इंग्रज रेसिडेंट घुसला होता. पुढें (१८४७) वजीरअल्ली याच्या राज्यांत फार अव्यवस्था झाली म्हणून स्लीमन या रेसिडेंटानें व त्याच्या नंतरचा रेसिडेंट औटराम यानें डलहौसीला अयोध्येचें राज्य ताबडतोब खालसा करण्याचा सल्ला दिला आणि विलायतच्या डायरेक्टरांनींहि डलहौसीच्या रिपोर्टांवरून त्यास मान्यता दिली. त्यामुळें त्यानें हेंहि राज्य खालसा करून वजीरांस १२ लाखांची नेमणूक करून कलकत्त्यास ठेवलें. याप्रमाणें एका मागून एक हिंदी राज्यें पूर्वींचीं वचनें, तह वगैरे गुंडाळून ठेवून डलहौसीनें खालसा केलीं. यानें थोडीं लोकोपयोगी कामें केलीं; त्यांत वायव्यप्रांताची सरहद्द मजबूत करणें, हिंदुस्थानांत आगगाड्या, व्यापारी व लष्करी दृष्टीनें उपयोगी पडतील अशी तारायंत्र, पोष्ट, पब्लिकवर्क्स खातें, स्वतंत्र विद्याखातें, सिव्हिल सर्व्हिस परीक्षेस हिंदी उमेदवार घेणें या गोष्टी मुख्य होत्या. विलायतेस गेल्यावर त्याच्या अन्यायी कृत्यावर पुष्कळ टीका झाल्या आणि त्यांचा धक्का बसून पुढें तो चार वर्षांनींच मेला. डलहौसी अत्यंत जुल्मी होता असें कांहीं इंग्रज इतिहासकारांनीं म्हटलें आहे.

**लॉर्ड कॅनिंग**–(१८५६–६२)याच्या कारकीर्दींतील मुख्य गोष्ट म्हणजे नानागर्दी होय. नानागर्दीस अनेक कारणें झालीं. मुख्य कारण डलहौसीचें देशी राज्यें खालसा करण्याचें धोरण होय. त्यामुळें लोकांत असंतोष उत्पन्न झाला. फौजेंतहि कांहीं अव्यवस्थेमुळें व गाई–डुकरांच्या चरबीच्या काडतुसांमुळें असंतोष उत्पन्न झाला होता. पण फौजेला लोकांनीं मदत न केल्यानें नानागर्दी मोडली. दिल्लीच्या बादशहाकडील नामधारी सत्ता काढून घेतल्यानें मुसलमान चिडले. पाद्र्यांनीं सरकारी शाळांतून

इंग्रजी शिक्षण सुरू केलें, तें सरकारनें आपल्याला बाटविण्यासाठीं केलं असा लोकसमज झाला. ज्या ज्या राजांचीं राज्यें खालसा केलीं त्यांच्यापैकीं बहुतेकांनीं नानागर्दी उभारली. त्यावेळीं उत्तरहिंदुस्थानांत फौजेंतून आणि दरेक गांवांतून दुसऱ्या गांवीं कमळाचीं फुलें आणि भाकरी जाऊं लागल्या. (कमळाचीं फुलें आणि भाकरी बंडाच्या सूचनेचा संकेत समजला जात असे). बंगाल्यांतील एकोणिसाव्या पलटणींत दोन महिने असंतोष धुमसत होता. तिनें पुढें काडतुसें घेण्याचें नाकारल्यानें तिला निःशस्त्र करून बडतर्फ केलें; हा मूळ प्रारंभ झाला (२३ जानेवारी, १८५७). त्यांतील लोक अयोध्या, रोहिलखंड इकडील रहाणारे होते, त्यांनीं आपापल्या देशीं जाऊन बंगाल्यांतील शिपायांच विचार प्रसृत केले. या सुमारास इंग्लंड विरुद्ध क्रिमिया, इराण व चीन या भागांत लढाया चालू होत्या व खुद्द हिंदुस्थानांत यूरोपियन सैन्य कमी होतें. पुढें घडणाऱ्या प्रसंगाच्या सूचना कांहीं यूरोपियन अधिकाऱ्यांस कळल्या. पण त्यांनीं तिकडे दुर्लक्ष केलें. दिल्लीचें दारूगोळ्याचें प्रचंड कोठार हिंदी शिपायांच्या ताब्यांत होतें. नानागर्दी १८५७ मे पासून १८५८ च्या अखेरीपर्यंत होती. कुरापती निघून शिपाई व अंमलदार यांच्यांत तंटे होत. त्यांत प्रसंगीं दोन्ही बाजूंचे लोक ठार होत, बंगल्यांनां व बराकींनां आगी लागत आणि खजिना वगैरे लुटला जाई. केव्हां दोन्ही पक्षांत भयंकर लढाया होत, कोठें यूरोपियन अंमलदार वेढ्यांत अडकत तर कोठें लढायांत त्यांचा पराभव होऊन संहार होई. नानागर्दीचा प्रसार नर्मदेच्या दक्षिणेस फारसा झाला नाहीं. उत्तरेकडे नानागर्दीचीं मुख्य ठिकाणें कानपूर व दिल्ली होतीं आणि पंजाब, संयुक्तप्रांत, बंगाल, बिहार व मध्यहिंदुस्थान यांत नानागर्दी उसळली होती. त्यांत दिल्ली, आग्रा, कानपूर, अलाहाबाद, बनारस, पाटणा, बरेली, मेरट, अलीगड, लखनौ, झांशी, ग्वाल्हेर, काल्पी, नीमच, नशिराबाद, इत्यादि ठिकाणें पुढें आलीं. मे १० तारखेस मेरटच्या शिपायांनीं हत्यार उपसलें व दिल्ली काबीज केली, कानपुराजवळ ब्रह्मावर्त येथें नानासाहेब पेशवे असत, त्यांच्याशीं पेनशनच्या बाबतींत इंग्रजांनीं अन्याय केल्यानें ते या इंग्रजांच्याविरुद्ध युद्धाचे प्रमुख बनले व त्यामुळेंच या युद्धास नानागर्दी म्हणतात. कानपूरच्या यूरोपियनांनीं १९ दिवस नानासाहेबांशीं लढून अखेर ते त्यांच्या हवालीं झाले. नानासाहेबांच्या आश्रि-हित शिपायांनीं या लोकांची पुढें कत्तल केली. लखनौची यूरोपियन फौज सहा-सात महिने वेढ्यांत सांपडली होती. शिपायांचा मुख्य भरणा दिल्लीस होता, इंग्रजांनीं दिल्लीस वेढा घालून साडेतीन महिन्यानंतर शिखांच्या साहाय्यानें दिल्ली घेतली, त्यानंतर इंग्रजांनीं वृद्ध बहादूरशहास पकडून रंगुनास हद्दपार केलें, तो तेथें १८६२ त मेला. त्याच्या मुलांनां इंग्रजांनीं गोळ्या घालून ठार मारलें. दिल्ली घेतल्यानंतरहि दीड वर्ष नानागर्दी मोडण्यास लागलें. अयोध्येची बेगम, आणि बरेली व बांद्याचे नबाब हेहि नानासाहेबांस सामील झाले. त्यामुळें अयोध्या व रोहिलखंड येथील लोकहि त्यांनां मिळाले. हिंदुस्थानांतील इंग्रज फौजेनें काम भागेना म्हणून विलायतेहून बरीचशी इंग्रज फौज आल्यानंतरहि नानागर्दी मोडण्यास वर सांगितल्याप्रमाणें दीड वर्ष लागलें. या वेळीं मुंबई–मद्रासकडील एतद्देशीय फौजा, शिंदे, निजाम, नेपाळचा राजा, बरेचसे रजपूत राजे, शीख लोक आणि अनेक एतद्देशीय राजे इत्यादिकांनीं इंग्रजांनां सक्रिय मदत केल्यानें इंग्रजांचा अखेरीस जय झाला. झांशीच्या राणी लक्ष्मीबाई यांनीं नानासाहेबांनां शेवटपर्यंत मदत केली होती. त्यांनीं प्रथम झांशीचा किल्ला हस्तगत करून १० महिने इंग्रजांस दाद दिली नाहीं. पुढें लक्ष्मीबाई, तात्या टोपे, रावसाहेब वगैरे मंडळींनीं ग्वाल्हेर घेतलें; त्याचें रक्षण करीत असतां लक्ष्मीबाई रणांत ठार झाल्या. ह्यू रोझनें त्यांची स्तुति केली आहे. त्यानंतर १ वर्षानें तात्या टोपे एका संस्थानिकाच्या विश्वासघातानें इंग्रजांच्या हातीं लागला. नानासाहेब पेशवे व त्यांची मंडळी नेपाळांत निघून गेली. यावेळीं शिपायांपेक्षांहि इंग्रजांनीं सूडाच्या भावनेनें अत्यंत जाळपोळ व कत्तली केल्या असें देशी इतिहास म्हणतो. इंग्रजांच्या सुसंघटित सैन्यापुढें व सुसज्जित शस्त्रास्त्रापुढें नानागर्दी मोडली. तारायंत्राचाहि उपयोग इंग्रजांनां बराच झाला. एकीचा व शिस्तीचा अभाव, अदूरदर्शीपणा, हिंदुमुसलमानांचे तंटे, राष्ट्राभिमानाची अजाणता इत्यादि दुसरींहि नानागर्दी मोडण्यास कारणें आहेत. या युद्धामुळें विलायतच्या लोकांचें व पार्लमेंटचें लक्ष हिंदुस्थानकडे लागलें. पार्लमेंटनें हिंदुस्थानच्या राज्यकारभारासाठीं एक कायदा करून, ईस्टइंडिया कंपनी मोडली. ती १८७४ त लिक्विडेशनमध्यें गेली. राज्यकारभार व्हिक्टोरिया राणीनें घेतला, बोर्ड ऑफ कंट्रोल मोडून इंडिया कौन्सिल निर्माण झालें, गव्हर्नर जनरलला व्हाईसराय

पदवी मिळाली आणि अनेक किरकोळ दुरुस्त्या केल्या. त्याच वेळीं राणीनें हिंदी प्रजेस यूरोपियन प्रजेप्रमाणें समानतेनें वागविण्यांत येईल, राजेरजवाड्यांनां दत्तक घेण्याचा हक्क देऊं, देशी राज्यें खालसा करण्यांत येणार नाहींत, धर्मांत हात घालणार नाहीं इत्यादि कलमांचा एक जाहीरनामा काढला. सन १७७३ मध्यें रेग्युलेटिंग कायदा, त्यानंतर पिटचा कायदा आणि त्यानंतर हा १८५८ सालचा कायदा हे हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत निर्माण केले गेले. नानागर्दी मोडण्यास इंग्रजांनां ४० कोटी रुपये कर्ज होऊन पुढें जादा जास्त सैन्य ठेवल्यानें सालीना १० कोटी रुपायांचा बोजा हिंदुस्थानावर बसला. तेव्हां जकाती वाढवून, उत्पन्नावर नवीन कर (इनकमटॅक्स) बसवून आणि कागदी नोटांचें चलन सुरू करून ही तूट भरून काढण्यांत आली. लॉर्ड कॅनिंग हा पहिला व्हॉईसरॉय होता. त्यानें अयोध्या प्रांत सबंध खालसा केला. या युद्धानंतर लष्करी दृष्ट्या आगगाडीचे फांटे अनेक काढण्यांत आले व लष्करांतहि बऱ्याच सुधारणा केल्या. बंगाल व पंजाब प्रांतांतील फौजेंत दोन हिंदी शिपायांबरोबर एक गोरा शिपाई आणि मद्रास-मुंबईकडील फौजांत एका गोऱ्या बरोबर तीन हिंदी शिपाई असें प्रमाण ठरविलें; सर्व तोफखाना गोऱ्यांच्या ताब्यांत गेला. बंगाल्यांत नीळ पिकविणाऱ्या गोऱ्या मळेवाल्यांनीं फार जुलूम केल्यानें त्यांच्यासाठीं एक कायदा करण्यांत आला (१८६०). शिवाय दुसरे नवीन कायदे झाले. हायकोर्टें स्थापन झालीं, कायदेमंडळ व कार्यकारीमंडळें यांच्यांत सुधारणा झाल्या. इ. स. १८६१ सालीं उत्तरहिंदुस्थानांत भयंकर दुष्काळ पडला. इ. स. १८५७ सालींच कलकत्ता, मुंबई व मद्रास येथें लंडन येथील विद्यापीठाच्या धर्तीवर तीन विद्यापीठें स्थापलीं. त्यांच्यामुळें पूर्व व पश्चिम यांच्या संस्कृतींची परस्पर ओळख होऊन त्यांनां परस्परांपासून बरेचसे फायदे लाभले.

**लॉर्ड एल्गिन**-(१८६२-६३) हा येथें आल्यावर थोडक्याच काळांत मेला. याच्या कारकीर्दीत विशेष कांहीं घडलें नाहीं.

**सर जॉन लॉरेन्स**-(१८६४-६९) यानें सरहद्दीसारख्या यःकश्चित कारणावरून भूतानशीं युद्ध केलें. याच्या वेळीं मद्रास इलाखा व उत्तर हिंदुस्थानांत मोठा दुष्काळ पडला होता (१८६६). त्यांत दहा लाखांवर माणसें मेलीं. यावेळीं सरकारला दुष्काळाविरुद्ध फारसें कांहीं करतां आलें नाहीं मात्र भावी दुष्काळनिवारण्याच्या योजना यावेळीं प्रथम ठरविल्या गेल्या. या दुष्काळांत झालेल्या हिंदुस्थानसरकारच्या हलगर्जीपणाबद्दल व्हि. स्मिथनें त्यास दोष दिला आहे (ऑ. हि. ७४१). पंजाबप्रांत खालसा करण्यांत या गव्हर्नरचा पुष्कळसा हात होता. व पंजाबचा हा चीफ कमीशनर होता. यानें कॅनिंगनें ज्या नवीन सुधारणा आंखल्या होत्या व राणीनें ज्या कबूल केल्या होत्या त्या करण्यांत आपली बहुतेक कारकीर्द संपविली. वास्तविक हा मूळचा डलहौसीचाच शिष्य परंतु नानागर्दीमुळें राज्यें खालसा करण्याचें धोरण पुढें यानें सोडून दिलें. राणीनेंहि यापुढें आम्ही राज्यविस्तार करणार नाहीं असें जाहीरनाम्यांत वचन दिलें होतें. या वेळीं देशी संस्थानें इंग्रजसरकारचीं दोस्त होतीं. पुढें १८७७ त जेव्हां राणीनें हिंदुस्थानची बादशाहीण ही पदवी धारण केली तेव्हांहि संस्थानें व साम्राज्यसरकार यांच्या परस्परसंबंधांत विशेष फरक पडला नाहीं. हल्लीं हिंदुस्थानसरकार दुर्व्यवस्थेच्या नांवाखालीं संस्थानाच्या अंतर्गत कारभारांत हात घालतें व क्वचित् संस्थानिकांस पदच्युतहि करतें पण सहसा संस्थान खालसा करीत नाहीं. लॉरेन्सच्या वेळीं दुसऱ्या अफगाणयुद्धास प्रारंभ झाला. दोस्त महंमद १८४२ त काबूलच्या गादीवर बसला होता. त्यच्या मागें त्याच्या दोन मुलांत गादीबद्दल तंटे लागले. त्यांत शेरअल्ली नांवाच्या मुलानें शेवटीं गादी मिळवून इंग्रजांविरुद्ध रशियाशीं दोस्ती केली (१८७७). त्यामुळें हिंदुस्थानसरकारनें अफगाणिस्तानवर स्वारी केली. अमेरिकेंत यादवी सुरू होऊन हिंदुस्थानांतील कापसास फार मागणी आल्यानें १८६५ च्या सुमारास मुंबईस भयंकर सट्टेबाजी सुरू होऊन मुंबई बँकेवरहि तिचा परिणाम घडला. शेतकऱ्यांच्या बाबतींत लॅरेन्सनें कांहीं सुधारणेचे कायदे केले. हा सिव्हिल सर्व्हंट असून गव्हर्नर जनरल झाला म्हणून इंग्लंडच्या पुष्कळ लोकांनीं तक्रारी केल्या होत्या.

**लॉर्ड मेयो**-(१८६९-७२) हा हुशार असल्यानें निरनिराळ्या खात्यांत यानें बऱ्याच सुधारणा केल्या. शेतकीचें खातें त्यानें नवीन काढून सडका, कालवे, आगगाडीचे रस्ते वगैरे नवीन बांधले. सार्वजनिक उपयोगाचींहि कांहीं कामें केलीं. अंदमान बेटांत कैद्यांची पहाणी करण्यास हा गेला असतां एका कैद्यानें याचा खून केला (१८७२). हा जातीनें आयरिश होता. अफगाणिस्तानच्या

अमीरास ( शेरअल्ली ) हिंदुस्थानसरकार जी खंडणी देई तिची रक्कम यानें वाढविली व रशियाच्या झारकडे एक वकीलहि पाठविला होता. अलवारचें संस्थान आणि काठेवाडांतील कांहीं लहान संस्थानें यांत कांहीं भानगडी उपस्थित झाल्या त्या यानें दाबून टाकल्या. प्रत्येक इलाख्याच्या सरकारकडे जमेच्या व खर्चाच्या कांहीं बाबी यानें मुखत्यारीनें सोंपवून दिल्या व कांहीं नवीन कर बसविले. या पूर्वी प्रांतिक सरकारांस लागणारा पैसा हिंदुस्थानसरकार पुरवीत असे.

**लॉर्ड नार्थब्रुक**–( १८७२–७६ ) याच्या वेळेस बिहार–बंगाल्यांत मोठा दुष्काळ पडला. त्यावेळीं यानें (१८७३–७४) ७० लाख रुपये खर्चून दुष्काळनिवारणाची खटपट केली. युवराज एडवर्ड हा यानंतर ( १८७५–७६ ) हिंदुस्थानांत आला होता. बडोद्याचे मल्हारराव गायकवाड याजवर रेसिडेंटास विषप्रयोग केल्याचा आरोप ठेवून व तो शाबीत होईना म्हणून अव्यवस्थित राज्यकारभारचा आरोप ठेवून यास पदच्युत केलें (१८७५) व सांप्रतच्या महाराजांस (सयाजीराव) गादीवर बसविलें. मल्हारराव १८९३ त मद्रासेस वारले. नार्थब्रुकनें मँचेस्टरच्या कापडावर जकात बसविल्यानें इंग्लंडचें प्रधानमंडळ रागावलें आणि त्यामुळें याला आपली जागा लवकर सोडावी लागली.

**लॉर्ड लिटन**–(१८७६–८०) याच्याहि कारकीर्दींत बहुतेक सर्व हिंदुस्थानांत तीन वर्षें (१८७६ ते ७७) भयंकर दुष्काळ पडून फक्त इंग्रजी हद्दींतच पन्नास लाख लोक मेले; पण त्याच वेळीं (१८७७) उत्तर हिंदुस्थानांत दिल्लीस लिटननें मोठा दरबार भरविला. त्यांत व्हिक्टोरिया राणीनें बादशाहीणकैसर ई हिंद पदवी धारण केली यामुळें याच्यावर देशी पत्रकारांनीं बऱ्याच कडक टीका केल्या व याच्या अफगाणविषयक धोरणामुळें इंग्लंडांतील लोकांनीं याची कारकीर्द अयशस्वी ठरविली. यानें पहिलें दुष्काळी कमिशन नेमलें. त्याचे ठराव सांप्रतच्या दुष्काळी कायद्याला आधारभूत आहेत. हा खुल्या व्यापाराचा भोक्ता होता व त्याप्रमाणें त्यानें थोडासा प्रयत्न केला. हिंदुस्थानांत मिठाच्या व्यापारावर नजर ठेवण्यासाठीं एक सरकारी शिपायांचें स्वतंत्र खातें होतें तें यानें रद्द केलें. याच्या कारकीर्दींत रशिया व तुर्कस्तान यांची लढाई चालू होती व त्यामुळें इंग्लंडला रशियाची नेहमीं धास्ती वाटे. लिटनच्या राज्यकारभारावर देशी पत्रकारांनीं कडक टीका केल्यानें त्यानें देशी पत्रकारासाठीं एक प्रेसॲक्ट पास केला व वर्तमानपत्रकारांची मुस्कुटदाबी केली. शेरअल्ली अफगाणिस्तानचा अमीर हा रशियास मिळाल्यानें यानें केटा हें लष्करी दृष्टया उत्तम ठाणें एकदम खालसा केलें. त्यामुळें बोलनघाट इंग्रजांच्या हातांत आला. शेरअल्ली रशियास मिळाल्यानें यानें अफगाणिस्तानवर स्वारी करून कांहीं ठाणीं घेतलीं तेव्हां शेरअल्ली रशियांत पळाला व इंग्रजांनीं याकुबखानास अमीर केलें व तेथें आपला वकील ठेवला पण त्याला अफगाणांनीं ठार मारलें (१८७९) तेव्हां पुन्हां इग्रजांनीं स्वारी करून काबूल-कंदाहार घेतलें व याकुबखानास हिंदुस्थानांत आणलें. इतक्यांत इंग्लंडमध्यें लिबरल प्रधानमंडळ झाल्यानें लिटननें राजीनामा दिला. काबूल गेल्यानें अफगाणी लोकांनीं पुन्हां उचल करून इंग्रज फौजेस अडकावून १८४२ सारखी स्थिति आणली. तेव्हां जनरल लॉर्ड राबर्टस यानें तिची सुटका करून अबदुल रहमान याला अमीर कबूल केलें (१८८०). याप्रमाणें अफगाणिस्तानच्या राज्याचे निरनिराळे तुकडे करून त्यांवर आपली छाप बसविण्याची लिटनची मसलत फुकट गेली. तरी पण त्यानें आंखलेलें धोरण आतांपर्यंत चालत आलें असून आगगाड्या, रस्ते वगैरे झाल्यानें आतां वाटेल त्या वेळेस काबूल, कंदाहार, गझनी वगैरे शहरें काबीज करतां येतील.

**लॉर्ड रिपन**–(१८८०–८४) हा आल्यावर अफगाणिस्तानचें युद्ध संपलें व त्यामुळें याला हिंदुस्थानांत बऱ्याच सुधारणा करण्यास वेळ सांपडला. यानें वर्तमानपत्रांवरील सरकारावर टीका करण्याचा प्रतिबंध नाहींसा केला, शिक्षणखात्यांत सुधारणा केल्या; खाजगी शाळांनां उत्तेजन दिलें, हिंदी न्यायाधिशांनां यूरोपीयन गुन्हेगारांची चौकशी करण्याचे अधिकार दिले(इलबर्टबिल)पण त्यामुळें यूरोपियन लोकांनीं फार आकांडतांडव केलें. म्युनिसिपालिट्यांचा व जिल्हालोकलबोर्डांचा कायदा करून मोठमोठया शहरांत त्यांची स्थापना केली व बिन सरकारी अध्यक्ष निवडण्याचा हक्क दिला. रिपन रोमनकॅथॉलिक पंथी होता. त्यामुळें त्याच्यावर प्रॉटेस्टंट यूरोपियन मुत्सद्यांनीं व लोकांनीं फार झोड उठविली. म्हैसूरचें राज्य मध्यंतरीं (१८६७) जें इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत घेतलें होतें तें १८८१ त तेथील राजास परत दिलें. हा राजा १८९४ त वारला. त्याच्या मागें हल्लींचे कृष्णराजेंद्र महाराज गादीवर आले. हिंदुस्थानची पहिली खानेसुमारी १८८१ त झाली. वर सांगितलेलें इलबर्ट बिल बेजबाबदार

यूरोपियन चळवळीमुळें रिपनला मागें घ्यावें लागून त्याला यूरोपियन ज्यूरीची पुस्ती जोडावी लागली (१८८३)बहुधां त्यामुळें त्याला शेवटीं राजीनामा द्यावा लागला. हिंदी लोकांनीं रिपनला मोठ्या मानमरातबानें मान दिला; यूरोपियनांनीं अर्थात उलट कृति केली.

**लॉर्ड डफरीन**–( १८८४–८८ ) यानें उत्तर ब्रह्मदेशावर स्वारी करून तेथील थीबा राजास पदच्युत करून तो देश खालसा केला (१८८६). थीबानें फ्रेंच लोकांस इंग्रजांपेक्षां जास्त व्यापारी सवलती दिल्या हें या युद्धाचें मुख्य कारण होय.सर्व ब्रह्मदेश,विशेषत: त्यांतला उत्तर ब्रह्मदेश हा फार सुपीक असल्यानें इंग्रजांचा त्यावर पूर्वीपासून डोळा होता. थीबानंतर ७/८ वर्षें तेथील लोक इंग्रजांना हांकून लावण्याचा प्रयत्न करीत होते. याचवर्षी हिंदुस्थानसरकारनें ग्वाल्हेरचा किल्ला शिंद्यास परत दिला व त्याऐवजीं झांशी घेतली. कारण सांप्रतच्या लष्करी युद्धांत किल्ल्यांचा फारसा उपयोग राहिला नाहीं.पुढल्या वर्षी व्हिक्टोरिया राणीची पन्नासाव्या वर्षाची ज्युबिली झाली.डफरीनच्या बायकोच्या नांवें इकडे दवाखाने घालण्यासाठीं एक फंड जमविला गेला.डफरीन पूर्वेकडे बहुतेक देशांत वकील म्हणून राहिला असल्यानें आशियांतील राजकारणाची त्याला बरीच माहिती झाली होती. राशियानें अफगाणिस्तानांत हळू हळू आपला हात शिरकविण्याचा प्रयत्न केला, पण डफरीननें अमीरला खंडणी देऊन खूष केलें त्यामुळें राशियाचा डाव हुकला. शेतकी कायद्यांत डफरीननें कांहीं सुधारणा केल्या.

**लॉर्ड लॅन्सडाउन**–( १८८९-९४ ) याच्या कारकीर्दींत हिंदी राष्ट्रीय सभेच्या मागण्यांप्रमाणें प्रत्येक इलाख्याच्या कायदेकौन्सिलांत लोकनियुक्त सभासद घेण्याची व्यवस्था सुरू झाली (१८९२). यानें अमीरास द्यावयाची खंडणी १२ लाखांची १८ लाख रु. वाढवून आणि इतर पुष्कळ खर्च करून सरहद्दीकडे शांतता ठेवली. आणि ५४ मैल लांबीचा बोलनघाट निर्धास्त केला. त्यामुळें राष्ट्रीय सभेनें त्याच्या या "मूर्खपणाच्या साम्राज्यविस्तारावर व निरर्थक उधळपट्टीवर" टीका केली. मणीपूर, खिलात वगैरे सरहद्दीवरील किरकोळ राज्यें यानें खालसा केलीं. याच्या वेळीं विलायत व हिंदुस्थान यांच्यांतील (यूरोपियन नोकरांचा व व्यापाऱ्यांचा तोटा होतो म्हणून) हुंडणावळीचा भाव बऱ्याच वांटाघाटी होऊन १ शिलिंग ४ पेन्स ठरला गेला.

**लॉर्ड एल्जिन**–(१८९४–९९) हा पूर्वीच्या लॉर्ड एल्जिनचा मुलगा. यानें अफाट खर्च करून वायव्य-सरहद्दीवरील टिऱ्हा प्रांतांतील आफ्रिडी लोकांशीं युद्ध केलें तरीहि त्यांचा उपद्रव कायमचा कमी झाला नाहीं. इ. स. १८९६ त हिंदुस्थानांत प्लेग होऊन भयंकर प्राणहानि झाली. स. १९०३ पर्यंत प्लेगानें २० लाख लोक मेले असा सरकारी रिपोर्ट आहे. सरकारनें प्लेग बंद होण्यासाठीं क्वारंटाईन वगैरे जे उपाय योजले त्यांची सक्ति विशेष झाल्यानें व ते उपाय हिंदूंच्या धार्मिक भावनांच्या थोडेफार विरुद्ध झाल्यानें महाराष्ट्र व मुंबई आणि आणखी कांहीं ठिकाणीं दंगे उत्पन्न झाले. त्यांत आणखी दुष्काळ पडला (१८९६–९७). आतांपर्यंतच्या सर्व दुष्काळांत हा दुष्काळ फार कडक होता. त्यामुळें सात कोटी लोक मेले ( स्मिथ ऑ. हि. ७६८ ). यावेळीं सारा हिंदुस्थान अन्नान्न दशेंत व प्लेगांत ग्रस्त झाला होता. व्हिक्टोरिया राणीची डायमंड ज्युबिली यावेळींच झाली. ब्रह्मदेशाच्या बाजूकडे इंग्रज व फ्रेंच यांच्या आणि रशिया व हिंदुस्थान यांच्या मर्यादा निश्चित ठरल्या. चित्रळ संस्थानच्या गादीच्या वारसातंट्यांत हिंदुस्थानसरकारनें त्या प्रांतांत आपला अंमल सुरू केला (१८९५).

**लॉर्ड कर्झन**–(१८९९–१९०५) हा पक्का साम्राज्याभिमानी, गर्विष्ठ व हुशार होता. राज्यकारभारांतील हरेक बाबींत लक्ष घालून व जरूर वाटलेले फेरफार करून सर्व खात्यांस त्यानें एक प्रकारचें वळण लावलें आणि होतां होईतों त्यांचा कारभार लोकांच्या हातून काढून सरकारच्या हातीं जेवढा आणतां येईल तेवढा आणला. स. १९०० मध्यें हिंदुस्थानांत जबर दुष्काळ पडला म्हणून एक कमिशन नेमलें गेलें. स.१९०१मध्यें व्हिक्टोरिया वारली व तिचा मुलगा सातवा एडवर्ड हा राजा झाला. त्याचा समारंभ १९०३ सालीं दिल्लीस होऊन कर्झननें दरबार भरविला. युनिव्हर्सिटीकमिशन नेमून शिक्षणांत सुधारणा केली, पण तें सरकारच्या ताब्यांत जास्त आणलें. सरकारी कामाच्या सोईच्या सबबीवर बंगालची फाळणी केली, वायव्यसरहद्दीचा एक स्वतंत्र प्रांत बनविला, तिबेटांत व्यापारी दळणवळण वाढविण्यासाठीं म्हणून एक मिशन (स्वारी) पाठविलें (पण त्याचा कांहीं उपयोग न होतां तें हात हालवीत परत आलें), याबद्दल विलायत सरकार आणि लॉर्ड कर्झन यांच्यांत खटके उडाले. जुने अवशेष रक्षण करण्यासाठीं एक खातें स्थापलें. युवराज जार्ज १९०५

मध्यें इकडे येऊन गेल्यावर कर्झन परत गेला. याच्या कांहीं अरेरावीच्या कृत्यांमुळें हिंदुस्थानांत असंतोष पसरला. हिंदुस्थानांत येण्यापूर्वी आशियांतील बहुतेक देशांची याला माहिती झाली होती. कोरियाच्या राजावर आपली छाप बसविण्यासाठीं कर्झन बरेंच खोटें बोलला होता. व्हिन्सेन्ट स्मिथ म्हणतो कीं, डलहौसीच्या कृत्यांमुळें जशी नानागर्दी उसळली तशी याच्या कृत्यांमुळें अराजकता व असंतोष पसरला; तसेंच त्यानें अनेक चुकाहि केल्या. तुर्क, फ्रेंच, रशियन, जर्मन यांची खटपट एकीकडे सारून यानें इंग्लंडचें वर्चस्व इराणी आखातावर बसविलें. यानें वायव्यसरहद्दीकडील डोंगरी जातींपासून सरहद्दीच्या रक्षणासाठीं तिकडील आफ्रिडी वगैरे मुसुलमानांची शिबंदी गोऱ्या सैन्याच्या जोडीला ठेवली. यानें ४० देशी संस्थानांनां भेट दिली. सन १९०२ मध्यें यानें निजामाची अगदीं एकटयाचीच गांठ घेऊन त्याचेकडून वऱ्हाड कायमच्या भाडेपट्टयानें घेतला व त्याच्या पदरची तैनाती फौज रद्द केली. यानें अधिकारविभागणीऐवजीं अधिकारएकीकरण केल्यानें कांहीं सरकारी अधिकारीहि नाखूष झाले. शेतकऱ्यांनां ऋणमुक्त करण्याचा कायदा केला, पण त्यामुळें फारसा फायदा होत नाहीं. खेड्यांत सहकारी पतपेढ्या स्थापण्याची चळवळहि यानें काढली. बंगालच्या फाळणीमुळें स्वदेशी चळवळ पुढें आली. मुसुलमानांनां खूष ठेवणें हा या फाळणींतील एक सरकारी हेतु होता असें म्हणतात. पुढें लॉर्ड किचनेर व कर्झन यांच्यांत हिंदी लष्करासंबंधीं खटके होऊन किचनेरचें म्हणणें विलायतेंतील प्रधानमंडळानें ग्राह्य ठरविल्यानें कर्झननें राजीनामा दिला.

**लॉर्ड मिंटो**-(१९०५-१०) हिंदुस्थानांत असंतोष पसरला व कांहीं ठिकाणीं राजकीय अत्याचार झाले. त्यामुळें प्रेस ॲक्ट करण्यांत येऊन इतर अनेक अंगांनीं दडपशाही सुरू झाली, पण त्यामुळें असंतोष कमी झाला नाहीं. मात्र अत्याचार थांबले. तथापि लोकांनीं स्वराज्याचे हक्क जास्त चिकाटीनें मागण्यास सुरुवात केली. तेव्हां स्टेटसेक्रेटरी लॉर्ड मोर्ले व मिंटो यांनीं कायदेकौन्सिलांच्या बाबतींत थोडे बहुत जास्त हक्क दिले. स. १९१० त सातवा एडवर्ड वारला व सांप्रतचा राजा पांचवा जॉर्ज गादीवर बसला. हा मिंटो मागील मिंटोचा पणतू होता. चीनमध्यें येथील अफू जी फार जात असे, तिच्यावर यानें नियंत्रण घातलें. त्यामुळें सालीना आठ ते दहा कोटींचा हिंदुस्थानचा तोटा होऊं लागला. मोर्ले-मिंटो सुधारणा, १८९३ चा चार्टर कायदा आणि १८६१ व १८९२ च्या कौन्सिलकायद्यांच्या धोरणावर निर्माण झाल्या (१९०९). या सुधारणांनीं स्टेट सेक्रेटरीच्या कौन्सिलांत, गव्हर्नरजनरलच्या कार्यकारी मंडळांत व प्रांतिक गव्हर्नरांच्याहि कार्यकारीमंडळांत हिंदी कौन्सिलर्स नेमले गेले; वरिष्ठ कायदेमंडळांत एकवीसच्या ऐवजीं साठ सभासद नेमले गेले व प्रांतिक कायदेमंडळांतहि साधारण पूर्वीच्या दुप्पट सभासद नेमले गेले. पण त्यांत जातवार मतदारसंघांकडून प्रतिनिधि निवडण्याची एक योजना केली. बहुतेक हिंदी व यूरोपियन मुत्सद्दी व पुढारी या जातवारीच्या विरुद्ध होते व अद्यापिहि आहेत. वार्षिक अंदाजपत्रकावर वादविवाद करण्याचा हक्कहि वरील सुधारणांनीं मिळाला. गव्हर्नरजनरलवर स्टेट सेक्रेटरीचा जो विशेष ताबा आहे आणि एका अंडर सेक्रेटरीनें गव्हर्नर जनरलला स्टेट सेक्रेटरीचा "एजंट" म्हणून जें मागें म्हटलें होतें त्यांत अद्यापि कांहीं सुधारणा झाली नाहीं. ही स्थिति हिंदुस्थानसरकारला अडचणीची भासते. तसेंच "कौन्सिलांच्या मतानें राज्यकारभार गव्हर्नरजनरल आणि स्टेटसेक्रेटरी व व्हॉईसराय हे फारसे चालवीत नाहींत, ते खोडसाळपणानें आपापल्या कौन्सिलांनां धुडकावून देतात निमसरकारी (डेमी ऑफिशियल) नांवांखालीं स्टेटसेक्रेटरी व व्हॉईसराय हे अरेराव (आटोक्राट) आपापसांत पत्रव्यवहार करून खाजगी प्रकारें साम्राज्याचा कारभार चालवितात असले खलिते जर प्रसिद्ध झाले तर सरकारास आज जे शिव्याशाप (लोकांकडून) मिळतात त्यांत बरेंच तथ्य आहे असें उघडकीस येईल" असें व्हिन्सेंट स्मिथ (१९१८ मध्यें) म्हणे (ऑ. हि. ७७९-८०).

**लॉर्ड हॉर्डिंज**-(१९१०-१६) राजकीय चळवळ जोरात चालली असतां पूर्वीच्या हार्डिंजचा नातू याला गव्हर्नरजनरल म्हणून इकडे पाठविण्यांत आलें. स. १९११ च्या खानेसुमारींत ३१॥ कोटी लोकसंख्या हिंदुस्थानची भरली; म्हणजे १९०१ च्या लोकसंख्येपेक्षां शेकडा ७·१ टक्के वाढली. राजकीय चळवळ शांत करण्यासाठीं जार्ज राजा व मेरी राणी यांनां इकडे आणवून राजाकडून "अशक्य" ठरविलेली बंगालची फाळणी रद्द करविली, हिंदुस्थानची राजधानी कलकत्त्याहून दिल्लीस बदलली व इतर कांहीं किरकोळ सुधारणा करविल्या. सन १९१४ त यूरोपांत महायुद्ध सुरू झालें आणि त्यांत इंग्लंडला हिंदुस्थाननें सर्वतोपरी मदत केली. त्या

मदतीबद्दल इंग्लंडनेंहि हिंदुस्थानचे आभार मानले आहेत.

**लॉर्ड चेम्सफर्ड**–(१९१६–१९२१) याच्या कारकीर्दीत महायुद्ध संपलें. महायुद्धांत हिंदुस्थाननें साम्राज्यासाठीं आपल्या शक्तीबाहेर मदत केली होती व मोर्ले--मिंटो सुधारणांनां १०।११ वर्षें होऊन गेलीं होतीं. शिवाय राजकीय चळवळ ही सनदशीर रीत्या प्रगमनशील चालली होती तरीहि सरकारनें ती दाबून टाकण्यासाठीं कांहीं कडक कायदे पास केले. अखेर चेम्सफर्ड व स्टेटसेक्रेटरी मांटेग्यू यांनीं आणखी कांहीं राजकीय सुधारणा देण्याचें कबूल केलें. त्यांनां 'मांटफर्ड सुधारणा' म्हणतात. या सुधारणांनीं मतदानाची वाढ होऊन स्टेट कौन्सिल व लेजिस्लेटिव्ह असेंब्ली या दोन व प्रत्येक प्रांतिक कायदेमंडळ, कार्यकारीमंडळ, गव्हर्नर जनरलचें कार्यकारीमंडळ आणि स्टेटसेक्रेटरीचें कार्यकारीमंडळ यांच्यांत सभासदांची वाढ झाली. बजेट पास करणें; कायदे पास करणें; स्थानिक स्वराज्य; आरोग्य; शिक्षण इत्यादि खातीं लोकनियुक्त करणें; लोकनियुक्त सभासदांतून दिवाण निवडणें वगैरे हक्क मिळून, राष्ट्रीयसभेनें ठरविलेलें "स्वराज्य" हिंदुस्थानास पुढें देण्याचें पार्लमेंटनें कबूल केलें. पण या सुधारणा अपुऱ्या व असमाधानकारक आहेत असें ठरवून राष्ट्रीयसभेनें त्यांवर बहिष्कार घातला.

**लॉर्ड रेडिंग**–(१९२१–२६) राष्ट्रीय सभेनें सुधारणांवर बहिष्कार घालून असहकारितेची चळवळ सुरू केली, पण त्यामुळें एकंदरींत राष्ट्राचें नफ्याऐवजीं नुकसान होऊं लागलें. तथापि राजकीय चळवळ जोरांत वाढली. त्यामुळें सरकारनें युवराजास इकडे आणविलें, पण त्याच्या समारंभावर ठिकठिकाणीं बहिष्कार घालण्यांत आले. या सुधारणांत जातीवार निवडणुकीचें तत्त्व पुढें आल्यानें व अन्यकारणांनीं हिंदुमुसुलमान ऐक्य भंग पावलें. ब्राह्मणब्राह्मणेतरवाद जोरांत वाढला व राजकीय चळवळीचें बळ नाहींसें झालें. निजामानें वऱ्हाड परत मिळविण्यासाठीं केलेली खटपट फुकट गेली व रेडिंगनें हिंदी संस्थानें हीं इंग्रजसरकारचे मित्र नसून मांडलिक होत असें जातां जातां प्रसिद्ध केलें (१९२६), वायव्यसरहद्दिवर अफगाणिस्तानच्या सरहद्दीपर्यंत रेल्वे तयार केली. राजकीय चळवळीच्या दडपशाहीसाठीं कांहीं कायदे तयार केले. रेडिंगच्या नंतर लॉर्ड अयर्विन यांची नेमणूक गव्हर्नरजनरलच्या जागेवर झाली असून सध्यां (१९२७) त्यांची कारकीर्द सुरू आहे.

---

## प्रकरण ४ थें.

## लोकसमाज.

**वंशविचार**–हिंदुस्थान हें एक स्वतंत्र खंडच असल्यामुळें त्यांत भिन्नभिन्न वंशांचे व रक्ताचे लोक आढळल्यास नवल नाहीं. डॉ. कीन याच्या मताप्रमाणें कृष्णवामन (नेग्रिटो), कोलेरियन, द्राविड, आर्यन् व मंगोलियन अशा पांच प्रकारचें रक्त हिंदुजनतेंत आहे (ज्ञानकोश विभाग १. पृ.८१पासून पुढें). पण हें मत पुष्कळांनां मान्य नाहीं. सेन्ससकार सर नेहरी रिस्लेनें येथील लोकांचे सात प्रादेशिक वर्ग पाडेल आहेत ते असे:–

**तुर्को इराणी**–बलोच, ब्राहुइ व बलुचिस्तान आणि वायव्यसरहद्दप्रांत यांतील अफगाण लोक या वर्गांत मोडतात. तुर्क आणि इराणी या लोकांच्या मिश्रणानें या जाती बनल्या आहेत. त्यांतल्यात्यांत यांच्यांत तुर्की रक्त आधिक्यानें खेळत आहे असें दिसून येईल. बांधा मध्यमापेक्षां उंच, वर्ण गोरा, डोळे बहुधां काळे पण क्वचित पिंगट; चेहऱ्यावर बरेचसे केस; डोकें रुंद, नाक साधारण अरुंद पण बरेंच लांब व पुढें आलेलें हीं यांचीं वैशिष्ट्यें होत.

**भारती आर्य**--(इंडो–आर्यन)–हे लोक पंजाब, राजपुताना आणि काश्मीर या भागांत राहतात. रजपूत, खत्री आणि जाट हीं या वर्गाचीं नमुनेदार उदाहरणें होत. जे आर्य लोक हिंदुस्थानांत प्रथम वसाहत करण्यास आले त्यांच्यासारखेच जळवजवळ हे असावेत असें समजतात. अतिशय उंच, गौर वर्ण, डोळे काळेभोर, चेहऱ्यावर केंसांची बरीच वाढ, लांब डोकें, अरुंद पण प्रामुख्यानें दिसणारें नाक (पण विशेष लांब नव्हे) हे यांचे विशेष होत.

**सिथो द्राविडी**–पश्चिम हिंदुस्थानांतील मराठा ब्राह्मण, कुणबी आणि कुर्ग लोक या वर्गांत मोडतात. द्रविडी लोकांशीं मिश्रण झाल्यामुळें यांच्यांतील कांहीं आर्यवैशिष्ट्यें नष्ट झालीं आहेत. बांधा ठेंगणा, डोकें बरेंच लांब, पण नाक लहान यामुळें तुर्को-इराणी लोकांहून हे अगदीं निराळे दिसतात. द्रविडी लोकांशीं सिथियनांचें मिश्रण झालें हें रिस्लेचें म्हणणें बऱ्याच मानववंशशास्त्रज्ञांनां मान्य नाहीं.

**आर्य-द्राविडी किंवा हिंदुस्थानी**—संयुक्तप्रांत, राजपुतान्याचा कांहीं भाग व बिहार यांमध्यें हे लोक असून यांच्यांतील श्रेष्ठ दर्जाचे लोक म्हणजे हिंदुस्थानी ब्राह्मण व कनिष्ठ दर्जाचे चमार होत. यांच्या डोक्याचा आकार लांबट पण मध्यम असतो, रंग थोडा तपकिरी व काळा यांच्या दरम्यान असून नाक इंडो-आर्यन् लोकांपेक्षां रुंद असतें व बांधा ठेंगणा असतो.

**मोंगल द्राविडी**—खालचा बंगाल आणि ओरिसा यांत असणारे बंगाली ब्राह्मण आणि कायस्थ, पूर्व बंगालमधील मुसलमान, आणि या भागांतील लोकजाती या वर्गांत मोडतात. या वर्गाच्या उच्च जातींत द्राविडी आणि मोंगोल मिश्रणाखेरीज इंडो-आर्यन् भेसळ आढळते. रुंद डोकें, काळा रंग, केंसाळ चेहेरा, मध्यम बांधा, मध्यम पण रुंद होण्याकडे कल असलेलें नाक हे या वर्गाचे विशेष होत. या वर्गांतील लोक कारकुनीपेशाचे आहेत.

**मोंगलसदृश**—हिमालय, नेपाळ, आसाम व ब्रह्मदेश या भागांत हे लोक रहातात. उदा. लाहुल आणि कुलूचे कानैत; दार्जिलिंग आणि सिक्कीमचे लेघा; नेपाळचे लिंबू, मुर्मी आणि गुरुंग; आसामचे बोडो; आणि ब्रह्मी लोक. यांचें डोकें लांबट असून रंग पिंवळसर काळा असतो. चेहेरा विशेष चपटा असून त्यावर फारसे केंस नसतात. नाक चपटें असून एकंदरींत बांधा फार ठेंगणा असतो. डोळ्याच्या पांपण्या पडलेल्या अशा दिसतात.

**द्राविडी**—सिंहलद्वीपापासून गंगथडीपर्यंतच्या प्रदेशांत या वर्गाचे लोक राहतात; म्हणजे मद्रास, हैद्राबाद, मध्यप्रांत, मध्यहिंदुस्थानचा बहुतेक भाग आणि छोटानागपूर या प्रांतांत द्राविडी लोक आढळतात. मलबारचे पणियन आणि छोटानागपूरचे संताळ हे यांचे उत्कृष्ट नमुने होत. काळे डोळे, कुरळे केंस, लांबट डोकें, मोठें पसरट नाक, काळा रंग व काळा बांधा हे यांचे विशेष होत. कष्ट करणें हा यांचा जन्मसिद्ध धर्म दिसतो. या वर्गाची परस्पर भेसळ होऊन नवीन दुसरे पोटवर्ग होत आहेत. एखादा मनुष्य नक्की अमुक वर्गाचा आहे असें सांगणें त्यामुळें कठिण पडतें. संकरामुळें वरील प्रत्येक वर्गाचीं शारीरिक वैशिष्ट्येंहि जात चाललीं आहेत.

आज हिंदुस्थानांतील कोणताहि वर्ण किंवा जात परस्पर किंवा परकीय संकरापासून अलिप्त अशी सांपडणार नाहीं. वेदकालीन चातुर्वर्ण्यापासून (ऋ. १०. ९०, १२) त्रैवर्ण्य, द्वैवर्ण्य, असे कमी कमी वर्ग होत गेलेले दिसतात. एका वर्णांतून दुसऱ्या वर्णांत गेलेल्यांचीं अनेक उदाहरणें वेद-पुराणांतून दाखवून देतां येतील. क्षत्रिय विश्वामित्रापासून कौशिकगोत्री ब्राह्मण झाले (महाभारत, अनुशासनपर्व). तसेंच कण्वगोत्रीयांचा पूर्वज अजमीढ हा क्षत्रिय होता (विष्णुपुराण ४. १९; ९, १०). 'गणिकागर्भसंभूतो वसिष्ठश्च महामुनिः'। 'जातो व्यासस्तु कैवर्त्याः श्वपाक्यास्तु पराशरः' या भारतांतील कुलकथा संकर स्पष्ट करतात. या वर्ण-जाति-संकराच्या वाङ्मयीन पुराव्याखेरीज परकीय संकराचे शिलालेखादि ऐतिहासिक पुरावे भरपूर सांपडतात. प्राचीन ग्रीक (यवन) लोकांनीं हिंदु किंवा बौद्धधर्म स्वीकारून हिंदुसंस्कृति व समाज यांत प्रवेश करून घेतला होता. या यवन राजांचीं नांवें हिंदु असत व ते हिंदु धर्माला पाठिंबा देत असत. माळव्यांतील बेसनगरच्या स्तंभावरील लेखांत (खिस्तपूर्व २ रें शतक) हेलिओडोरा या ग्रीक वकिलाला भागवत असें संबोधिलें असून त्यानें गरुडध्वजाचें देऊळ बांधल्याचा उल्लेख केलेला आहे. ग्रीकांनंतर आलेले शक व त्यांचे सुभेदार क्षत्रप हे हिंदूंत मिसळून गेलेले दिसतात (उदा. नाशिकचा वृषभदत्ताचा शिलालेख पहा). क्षत्रप रुद्रदामा याची कन्या शातवाहन या हिंदुराजास दिली होती (कान्हेरीच्या लेण्यांतील लेख). आभीर-अहीर हे परद्वीपस्थ लोक हिंदूंच्या चातुर्वर्ण्यांत शिरले आहेत हें आपण आभीर ब्राह्मण, अहीर सोनार, अहीर सुतार यांसारख्या जातींवरून पहातोंच. कुशानराजेहि हिंदु बनले होते. शाकद्वीपी ब्राह्मण पारशी मगांचे वंशज होत यांत शंका दिसत नाहीं. हैहय या म्लेंच्छ कुलांतील कार्तवीर्याचे वंशज कलचुरी राजे होत; त्यांची गणना क्षत्रियांत होत असे. हैहयांप्रमाणेंच हूणहि क्षत्रिय मानले जात, इतकेंच नव्हे तर त्यांच्या बरोबर आलेले गुर्जर (गुजर) लोकहि त्रैवर्णिक बनून काठेवाड, गुजराथ व राजपुताना यांतून स्थाईक झाले. शिवाजीची कुळी रजपूत धरल्यास शिवाजी हाहि गुजरच ठरतो. कऱ्हाडे ब्राह्मणांत सुद्धां गुर्जर हें आडनांव आढळतें. रावत व ओझे हीं आडनांवें राउत व ओझा यांशीं सदृश आहेत. कनोजचे प्रतिहार घराणेंहि गुर्जर असावें पण त्याची गणना रघुवंशी क्षत्रियांत केली जात असे. चव्हाण, चालुक्य व कदंब हे सिवालिक(सपादलक्ष-सवालाख)डोंगरांतून खालीं उतरले असले पाहिजेत.

याला एक पुरावा म्हणजे राजस्तानी भाषा व चंबा ते नेपाळपर्यंतच्या डोंगरी मुलुखांतील भाषा या पुष्कळशा सारख्या वाटतात (इं. अँटि. पु. ४० पृ. १५०–९२). या रजपूत लोकांचे ब्राह्मण उपाध्यायहि तिकडूनच आले. म्हैसूरच्या वायव्यभागांतील हव्यक (हविग्) ब्राह्मणांत असे ब्राह्मण सांपडतील (डी. आर. भांडारकर–इंडि. अँटि. पु. ४० (१९११) पृ. ७–३७). गुजर लोक यूरोपच्या सरहद्दीवरून हिंदुस्थानांत येत असतां त्यांनीं गुर्जिस्तान, उजरिस्तान, गुजरिस्तान, इत्यादि मुलुखांत वसाहती केल्या. खझर, गझर, खिसर, घुसर, या जातीहि गुजरांच्याच वाटतात. नागर हीहि हिंदुस्थानावाहेरील एक राष्ट्रजात दिसते. गुजराथ, कर्नाटक, नेपाळ,काश्मीर वगैरे प्रदेशांत नागरांच्या पोटजाती आढळतात. ब्रह्मक्षत्री या जातीवरून ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्यांतील शरीरसंबंध स्पष्ट दिसतो. ब्रह्मक्षत्र्यांमधील गुहिलोट हे प्रथम नागर ब्राह्मण होते. उदेपूरचें गुहिलोट राजघराणें सर्व रजपूत घराण्यांत अगदीं शुद्ध समजलें जातें. इतर रजपुतांप्रमाणेंच हे गुहिलोटहि हिमालयाच्या पहाडी मुलुखांतून इकडे आले असले पाहिजेत. यासर्व गोष्टी आज पूर्णपणें सिद्ध झाल्या नाहींत तर विचारार्थ घेतलेल्या कल्पना या स्थितींत त्या आहेत अहीर गवळी आपला संबंध यदूंशीं लावीत आहेत व परकीय रक्ताचे आपण आहोंत ही कांहीं दिवसापूर्वींच्या संशोधकांची कल्पना अगदीं चुकीची आहे अशी मांडणी करीत आहेत.

यावरून असें अनुमान निघतें कीं, परकीय संस्कृतीच्या लोकांनां आत्मसात करण्याकडे त्यावेळच्या लोकांचें धोरण असे. कोणी चातुर्वर्ण्यांत बसत नसेल तर त्याच्या करितां पंचम हा निराळा वर्ग काढला होता. या वर्णांतील कांहीं लोक चातुर्वर्ण्यांत कालांतरानें शिरत.

**वंशविचाराचें महत्त्व**–वंशविचाराचें महत्त्व अर्वाचीन जगांत फारसें नाहीं. भिन्न वंशांच्या लोकांनीं लग्नव्यवहार केले तर दोहोंमधील वाईट गुण प्रजेंत उत्पन्न होतात इ. मतें स्पेन्सरसारख्यांनीं प्रतिपादन केलीं आहेत. पण तीं मतें देखील प्रत्यक्ष चौकशींत टिकतील असें नाहीं. अमेरिकन लोक नीग्रो लोकांबरोबर म्हणजे आफ्रिकन वंशाबरोबर लग्नव्यवहार करण्यास तयार नाहींत. त्यांच्या बाबतींत वंशविषयक विचाराचें महत्त्व आहे. हिंदुस्थानामध्यें वंशविषयक विचाराचें महत्त्व मुळींच नाहीं व वंशविषयक विचारानें लोकांच्या भावना नियमित होत नाहींत. वंशविचारास प्राधान्य द्यावयाचें झाल्यास कोंकणस्थ ब्राह्मणांस अफगाण किंवा सोमाली जातीचा मनुष्य किंवा इंग्रज हे जवळचे होतील. आणि देशांतल्याच अनेक जाती दूरच्या होतील. समाजाच्या भावना वंशविषयक विचारांशीं निगडित झाल्या नाहींत. त्यामुळें पाठीमागें केलेला वंशविचार आजच्या सामाजिक बाबतींत मुळींच महत्त्वाचा नाहीं. गुर्जर किंवा अभीर हे परदेशी आहेत असें जरी धरलें तरी ते दूरचे वाटणार नाहींत आणि अफगाण हे पक्के आर्यन् जरी ठरले तरी ते जवळचे वाटणार नाहींत. हिंदुसमाजाचा वंशविषयक विचार करावयाचा तो एवढ्याचसाठीं कीं, पाठीमागच्या एकंदर इतिहासाचें स्पष्टीकरण व्हावें. आज हिंदुस्थानच्या लोकसमाजाचें वर्गीकरण करावयाचें झाल्यास तें हिंदु व अहिंदु असेंच करावें लागेल. हिंदूमध्यें नागरिक हिंदु व वन्य असें वर्गीकरण करावें लागेल व अहिंदूंचें मुसुलमान, ख्रिस्ती, पारशी व यहूदी असें वर्गीकरण करावें लागेल. जगांतील सर्व धर्म व सर्व प्रकारच्या जाती यांचे समुच्चय हिंदुस्थानांत आहेत. तथापि अशा बाह्यांची संख्या फार थोडी आहे. लोकसमाजाचें वर्णन करावयाचें म्हणजे हिंदुसमाज आणि त्याचे इतरांशीं संबंध असेंच वर्णन करावें लागेल.

**हिंदुसमाजाचा इतिहास**–हिंदु समाजाचा थोडक्यांत इतिहास पुढीलप्रमाणें देतां येईल:–वेदकालीं साधारणपणें विदर्भ देशापर्यंत आर्यन् संस्कृतीचे लोक असावेत. दख्खनचा बराचसा भाग अरण्यमय असावा आणि महाराष्ट्राच्या दक्षिणेस द्राविड वंशाचे लोक असावेत आणि सिंव्हलद्वीपांत आर्यन वंशाचे लोक असावेत. अशी वांशिक परिस्थिति चोहोंकडे असतां वायव्येकडून दिवोदास आणि सुदास यांच्या म्हणजे भरतांच्या नेतृत्वाखालीं नवीन आर्यन् लोक आले व त्यांची व स्थानिक आर्यन् लोकांची संस्कृति एक होऊन हिंदु संस्कृति निर्माण झाली. हे दोन समाज एक होण्याची क्रिया चालू असतां ब्राह्मण जात तयार झाली. ती जात यज्ञ करणारे धंदेवाईक ऋषी आणि ऋत्विज यांच्यापासून झाली. या जातींत शास्त्र आणि वाङ्मय यांचा अभ्यास वाढला. आणि तिनें आपली संस्कृति आसेतुहिमाचल पसरविली. त्यामुळें अनेक निरनिराळ्या वंशांतील लोक सदृश झाले. व हे जे लोक सदृश झाले तोच हिंदुसमाज होय. यानें प्रत्येक ठिकाणचीं स्थानिक दैवतें हीं शिव-विष्णु-दुर्गा इत्यादींचीं रूपें किंवा अवतार आहेत अशी कल्पना प्रत्येक स्थानिक समुच्चयाच्या

मनांत भरवून समाज एकरूप केला व त्या समाजाचें पौरोहित्य आपल्याकडेसच ठेविलें. हा संस्कृतिप्रसार कांहीं समुच्चयांत पूर्णपणें पोसला नाहीं. आणि त्या वर्गास आजचे सेन्ससकार व यूरोपियन शास्त्रज्ञ हिंदूपासून वगळूं इच्छितात. अशा प्रकारच्या जाती म्हटल्या म्हणजे गोंड, भिल्ल या होत. ज्या अनेक जाती ब्राह्मणान्वयी बनल्या त्या हिंदु होत. तथापि हिंदूमध्येंच पुढें त्यांची ब्राह्मणी विचारपद्धति बहुतेक अंगीकारावयाची पण ब्राह्मणाचें महत्त्व तेवढें नाकारावयाचें अशा तऱ्हेचे संप्रदाय तेथें उत्पन्न झाले. ते बौद्ध व जैन होत. बौद्धांची संख्या हिंदुस्थानांत थोडी आहे. पण जैनांची बरीच आहे. पण ब्रह्मदेशांत बौद्धांची संख्या बरीच मोठी आहे.

हिंदूंची संस्कृति पूर्वेकडे प्रसार पावत होती तर चीनमध्यें उत्पन्न झालेली संस्कृति पूर्वेकडून पश्चिमेकडे धांव घेत होती. तर या दोन संस्कृतींचें युद्ध आपणांस कंतानपासून ब्रह्मदेशपर्यंत दृष्टीस पडलें. हिंदु संस्कृतीचा प्रसार जसा ब्राह्मणांनीं केली तसाच तो हिंदु संस्कृतीत उत्पन्न झालेल्या दुसऱ्या एका संप्रदायानें केला. त्या संस्कृतींचा परिणाम फार मोठा होऊन तो जपानपासून ट्रान्सकॉकेशियापर्यंत हिंदुस्थानच्या उत्तरेस स्पष्ट दिसत आहे. हा परिणाम करणारा संप्रदाय बौद्धांचा होय. मणिपूरपासून सयामपर्यंत जे लोकसमूह आहेत ते हिंदु व चिनी या दोन्ही संस्कृतींच्या आवरणाखालीं आहेत. हिंदु संस्कृतींत संकोच उत्पन्न करणारी संस्कृति मुसलमानांची होय. तिनें देशांत नवीन समाजघटना-उपासनापद्धति, कायदेपद्धति, लिपि व बाह्यशब्दसमुच्चय हीं ओतलीं, व ती देश्य संस्कृतीशीं स्पर्धा करीत आहे. व एकाच रक्ताचे लोक निरनिराळ्या संस्कृतींच्या अभिमानानें एकमेकांविरुद्ध गडबड करीत आहेत. हिंदुसंस्कृति व मुसलमानसंस्कृति यांचा एकीकरण करण्याचा प्रयत्न शीखाकडून झाला. हा हिंदूमध्यें मुसलमानी तत्त्वें घरांत घेणारा पंथ होता. त्याचप्रमाणें हिंदुतत्त्वें घरांत घेणारे पंथ मुसलमानांत उत्पन्न झाले. असो.

हिंदूमध्यें सामाजिक अंतर्घटनेचें रूपांतर करूं इच्छिणाऱ्या अनेक चळवळी निघाल्या. त्यांत बसवाची चळवळ जातिभेद मोडण्यासाठीं खटपट करणारी होती, तशीच महानुभावांचीहि होती. बौद्धांची वृत्ति चातुर्वर्ण्यास कबूली देऊन क्षत्रियांचें महत्त्व ब्राह्मणापेक्षां ज्यास्त वाढविण्याची होती. आणि ब्राह्मण--क्षत्रियाखेरीज सामान्य कारागिरांचा वर्ग आहे त्या कारागिरांची चळवळ कारागीरवर्गाचें महत्त्व ब्राह्मणाइतकें स्थापन करण्याची होती. या चळवळीविषयीं सविस्तर माहिती विद्यासेवक वर्ष २, अंक २ यांत सांपडेल.

अस्पृश्यांकडून आपलें महत्त्व संस्थापित करण्याची चळवळ फारशी झाली नाहीं. सामान्य ब्राह्मणेतर वर्गांत जागृति उत्पन्न करून त्या वर्गाचें सामाजिक महत्त्व स्थापन करण्याकरतां जी अलीकडची चळवळ झाली त्या सत्यशोधकांच्या चळवळीस प्राधान्य दिलें पाहिजे.

हिंदुस्थानांतील सर्व लोकांवर आपल्या संस्कृतीचें आवरण टाकणारी संस्कृति म्हटली म्हणजे यूरोपीयन संस्कृति होय. या संस्कृतीबरोबर अर्वाचीन सुधारणा बरीच आपणांकडे आली. देशांतील बहुसंख्याक असलेल्या लोकांची संस्कृति म्हणजे हिंदूंची संस्कृति इतर समाज आपल्या पचनीं पाडून अखिल भारतीय राष्ट्रीयत्व उत्पन्न करील कीं दुसऱ्या संस्कृतीमध्यें विलीन होईल याविषयीं सध्यां कांहींच भविष्य सांगतां येत नाहीं.

**समाजांतील जातिभेद**–हिंदुस्थानांतील लोक जातीवरून ओळखण्यांत येतात; उदाहरण हा ब्राह्मण, हा सोनार, हा चांभार, इत्यादि. त्यामुळें एकंदर लोकसमाजांत भेदाभेद दृढमूळ झाल्यासारखे होऊन एकोप्यानें व एकविचारानें कार्य करणें अवघड होऊन बसलें आहे. जेथें तेथें जातिभेद प्रामुख्यानें मनांत घोळत असतो व स्वजातीयांकडे प्रत्येकाचा साहजिक ओढा दृष्टीस पडतो. शिवाय हिंदु लोकांतील जातीजातीमधला उच्चनीचपणा कसा ठरवावा हें अलीकडे कठिण होऊं लागलें आहे. धंद्यांवरून ठरविणें झाल्यास अलीकडे धंद्याच्या बाबतींत फेरफार पुष्कळ झाले असून वाटेल त्या जातीच्या इसमानें वाटेल तो धंदा करावा हें स्वातंत्र्य प्रस्थापित होत चाललें आहे. बालविवाह, बहुभार्यापद्धति व विधवाविवाहप्रतिबंध यांवरूनहि जातींचा उच्चनीचभाव ठरवितां येत नाहीं; कारण शिक्षणप्रसाराबरोबर या रूढींतहि बदल होत चालला आहे. त्यामुळें साधारणतः हिंदु समाजाचे फक्त तीनच पोटभाग करतां येतात ते. (१) ब्राह्मण, (२) ब्राह्मणेतर, व (३) अस्पृश्य.

**ब्राह्मणः**–ही भरतखंडांतील प्रमुख जात आहे. या जातीचें चातुर्वर्ण्यांत प्रथम स्थान असल्यामुळें समाजांत तिला अग्रमानाचा मान आहे. या जातीचा प्रसार सर्व भरतखंडभर आहे. या जातीचे पंचगौड व पंचद्राविड

असे मुख्य दोन भेद आहेत. पंचगौडांमध्यें सारस्वत, कान्यकुब्ज, गौड, उत्कल व मैथिल असे पांच भेद असून पंचद्राविडांम यें महाराष्ट्रीय, आंध्र, द्राविड, कर्नाटक आणि गुर्जर असे पांच भेद आहेत. यांचे पुन्हां आगखी बरेच पोटभेद पडले आहेत ते कांहीं प्रादेशिक असून कांहीं वेदशाखांनुसार पडले आहेत. उदाहरणार्थ कुडाळदेसकर, कोंकणस्थ, देशस्थ, ऋग्वेदी, सामवेदी, काण्णव, मैत्रायणी इत्यादि.

बंगालमध्यें ब्राह्मणजातीचा प्रसार बराच उत्तरकालीन झाला असल्यामुळें तेथें निराळेच भेद उत्पन्न झाले आहेत. ब्राह्मणांचें वेदकालापासून मुख्य काम पौरोहित्याचें व समाजांतील धर्मनियमनाचें असे. प्रसंगीं त्यांस क्षत्रियाचेंहि कार्य करावें लागलें व अनेक ब्राह्मण घराणीं राज्यारूढ झाल्याचा इतिहास आहे. आजकाल धंदा हा परंपरागत राहिला नाहीं.

ब्राह्मण व ब्राह्मणेतर—ब्राह्मण जातीची संख्या एकंदर १४० लक्ष आहे. सोनार, लोहार, सुतार वगैरे सारख्या कांहीं जातीहि स्वतःस ब्राह्मण म्हणवूं लागल्या आहेत. एकंदर २१७० लक्ष लोकसंख्येपैकीं (१) ब्राह्मण १४० लक्ष, (२) अस्पृश्य ५३० लक्ष आणि (३) अलीकडे हिंदु बनलेल्या जंगली जातींचे ६५ लक्ष लोक वजा जातां बाकी १४३५ लक्ष ब्राह्मणेतर आहेत. यांमध्यें शेतकी, व्यापार, कारागिरी व केवळ मजुरी करणाऱ्या अनेक जातींचा समावेश होतो. या ब्राह्मणेतर समूहांतहि उच्चनीच भेद आहेतच. सोनार—कासारादि ब्राह्मणेतर जातींत पोटजाती बऱ्याच असून त्यांमध्यें रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर यांत जे तंटे आहेत त्याप्रमाणेच मराठे व इतर ब्राह्मणेतर यांत आहेत.

अस्पृश्यः—अशा जातींची एकंदर संख्या ५३० लक्ष म्हणजे एकंदर लोकसंख्येच्या एकषष्ठांशाहूनकी मोठी असून कायदेमंडळांत अस्पृश्यांचे प्रतिनिधी घेण्याची व्यवस्था झाल्यामुळें या जातींनां महत्त्व आलें आहे. त्यांची अस्पृश्यता नष्ट करण्याचे व त्यांनां सुधारण्याचे जोराचे प्रयत्न असहकारितेच्या काळापासून सुरू झाले आहेत. मद्रास इलाख्यांत ही अस्पृश्यता फार तीव्र स्वरूपांत आहे. ख्रीस्ती किंवा मुसलमान बननांच अस्पृश्यता नष्ट होऊन सामाजिक दर्जा एकदम वाढत असल्यामुळें हिंदु समाजांतील संख्येनें बराच मोठा असा हा वर्ग धर्मांतर करील तर तो दुबळ्या हिंदुसमाजाचा मोठा तोटा आहे ही जाणीव वरिष्ठ हिंदुजातींनां झाली आहे. अस्पृश्यांची एकंदर संख्या ५२६८०००० तिची प्रांतवारी पुढीलप्रमाणें आहे.—

अस्पृश्यांची प्रांतवार संख्या
( आंकडे हजारांचे आहेत. )

| | | | |
|---|---|---|---|
| आसाम | २००० | बडोदें | १७७ |
| बंगाल | ९००० | मध्यहिंदुस्थान | २१४० |
| बिहार व ओरिसा | ८००० | ग्वालेर | ५०० |
| मुंबई | २८०० | हैद्राबाद संस्थान | १३३९ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ३३०० | म्हैसूर | ९३२ |
| मद्रास | ६३७२ | राजपुताना | २२६७ |
| पंजाब | २८९३ | त्रावणकोर | १२६० |
| संयुक्तप्रांत | ९००० | | |

याशिवाय 'अस्पृश्यता' लेख पहा ( ज्ञानकोश वि. ७ वा. अ पृ. ६४१ ).

जंगली जातीः—यांमध्यें नाग, अबोर, गारो, मुंडा, संताळ, गोंड, भिल्ल, तोडा, वगैरे जातींचा समावेश होत असून त्यांची संख्या सुमारें १६० लक्ष आहे पण अलीकडे जंगली जाती म्हणून ओळखणें फार कठिण झालें आहे. कारण पूर्वींचीं मोठमोठीं जंगलें तुटलीं गेलीं असून या जातींपैकीं बरेच लोक उघड्या मैदानावर रहावयास लागले आहेत, व शेजारच्या हिंदु जातींचा धर्म, धंदा, भाषा व चालीरीती अंगिकारूं लागल्या आहेत. वन्यधर्म किंवा विशिष्ट जातिधर्म सांगणारे लोक हल्लीं अवघे ९३/४ दशलक्षच आहेत म्हणजे ६ ते ७ दशलक्ष लोकांनीं हल्लीं हिंदुधर्मी असल्याचें सांगण्यास सुरवात केली आहे. कांहीं जातींत धंदा निश्चित नाहीं व जुनीं नांवें नाहींत तेव्हां नवीन समुच्चयात्मक नांवें त्या जातीचे लोक आपणांस घेऊं लागले आहेत. महाराष्ट्रांत या प्रकारची जात म्हटली म्हणजे सोमवंशीं आर्यक्षत्रियांची होय.

शीखः—शीख लोकांत पोटजात खानेसुमारीच्या वेळीं विचारली व नोंदली जाऊं नये असा ठराव लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत आला होता. स्वतःचें राजकीय महत्त्व वाढविण्याच्या हेतूनें जातिभेद मोडण्याचा शीखांचा प्रयत्न अलीकडे जोरानें चालू आहे. १९११ सालीं २८८४० लक्ष शीख लोकसंख्येपैकीं फक्त २२१ इसमांनींच जात सांगण्याचें नाकारलें होतें. पण १९२१ सालीं ६७००० लोकांनीं जात सांगण्याचें नाकारलें. तथापि स्वतःची विशिष्ट जात मानून इतर शीख जातींशीं बेटीव्यवहार न करणारे असे लोक शीखांत पुष्कळ आहेत. शीखांतील प्रमुख जातींची संख्या पुढीलप्रमाणें:—

शिखांतील जाती ( आंकडे हजारांचे )

| | | | |
|---|---|---|---|
| जांट | १८२३ | रामगटिया | ६८ |
| चमार | १६३ | मझहबी | ६४ |
| तर्खन | १४० | क्षत्री | ६३ |
| आरोरा | १२१ | महतम | ६३ |
| कंबोज | ८४ | सैनी | ५४ |
| | | झिवर | ५२ |

मुसुलमानः—या लोकांच्या धर्मात जातीभेद मानीत नाहींत, आणि विशेषतः वायव्यसरहद्दप्रांतांत प्रत्यक्ष व्यवहारांतहि जातीभेद आढळत नाहीं; कारण इस्लामी धर्माचें शुद्ध स्वरूप तेथें विशेष आहे. अस्सल मुसुलमानांचे जंगली मुसुलमान लोकांशींहि रोटीबेटीव्यवहार बिनहरकत होतात. पण हिंदुस्थानच्या इतर भागांत हिंदुधर्माचा मुसुलमानांच्या आचारविचारावर फार परिणाम झाला आहे. हिंदुस्थानांतील मुसुलमानांपैकीं बहुतेक संख्या बाटलेल्या मुसुलमानांच्या वंशजांचीच आहे. खुद्द पंजाबमध्यें सुद्धां फक्त शें. १९ मुसुलमान खऱ्या अस्सल रक्ताचे आहेत. असें १९११च्या खानेसुमारीच्या रिपोर्टांत म्हटलें आहे. इतर प्रांतांत अस्सल मुसुलमानांचें प्रमाण फारच अल्प आहे. मुसुलमानांत पठाण, मोगल, सय्यद व शेख अशीं चार मुख्य घराणीं असून मुंबई इलाख्यांतील बोहरी, खोजा व मेमन; बंगालमधील जुलाहा व कुल्हु; आणि उत्तरहिंदुस्थानांतील रजपूत व जाट या सर्व मूळच्या हिंदु जाती मुसुलमान बनल्या आहेत. हे मुसुलमान जातीभेदाचा तोंडानें निषेध करतात पण प्रत्यक्ष बेटीव्यवहाराच्या वेळीं जातिभेद पाळतात. उदा. बंगाल्यांतील शेख कुल्हुशीं विवाहसंबंध करीत नाहींत. पंजाबांत रजपूत, जाट, व अैरण या तीन मुख्य मुसुलमान जाती आहेत. अैरण जातीचे लोक बहुतेक सर्व मुसुलमान आहेत पण रजपूत व जाट या जातींचे लोक हिंदु, मुसुलमान व शीख या तिन्ही धर्मांत आहेत. मद्रास इलाख्यांत मापिल्ला (मोपला) नांवाच्या मुसुलमानांची संख्या इतर जातींच्या मुसुलमानांपेक्षां सर्वांत मोठी (११,०७,००७) आहे. हे गेल्या मोपला बंडांत कुप्रसिद्धी पावलेले सर्व लोक पश्चिम किनाऱ्यावर राहतात. यांची संख्या गेल्या दशकांत शेंकडा ६॥ वाढली व याचें कारण चेरुमन नांवाचे बरेच लोक बाटून मुसुलमान झाले आहेत. पूर्वी व्यापारानिमित्त आलेल्या अरबांनीं एतद्देशीय बायकांशीं लग्नें लावल्यानें निर्माण झालेली ही प्रजा असून अलीकडे या जातींत इतर रक्ताची भेसळ झालेली नाहीं.

ब्रह्मीः—ब्रह्मदेशीय लोक मिश्र जातीचे—इंडोनेशियन व दक्षिण मोंगोल—आहेत. दक्षिण मोंगोल लोकांत शान, काचिन, तलैंग, करेण व इतर पोटजाती असून त्यांचीं लग्नें होऊन सांप्रतच्या ब्रह्मी जाती निर्माण झाल्या आहेत. शान व काचिन लोक ईशान्य व उत्तर भागांत तलैंग व करेण जातींपैकीं बरेचसे दक्षिण ब्रह्मदेशांतील समुद्र किनाऱ्यालगत आणि पलौंग—वा लोक शान संस्थानांत राहतात.

चिनीः—या लोकांत युन्नानेसे व इतर चिनी असे दोन पोटवर्ग असून पहिले ५९००० व दुसरे ९००० आहेत. गेल्या चाळीस वर्षांत चिनी लोकसंख्या फार झपाट्यानें वाढली आहे ती अशीः—१९२१ सालीं १४९०६०; १९११ सालीं १२२८३४; १९०१ सालीं ६२५२९; १८९१ सालीं ४१७७४.

युन्नानेसे उत्तर भागांत व इतर चिनी दक्षिण ब्रह्मदेशांत राहतात. दक्षिण ब्रह्मदेशांतील प्रत्येक गांवांत बहुधां चिनी वाण्यांचीं दुकानें असून त्या भागांतील बहुतेक व्यापार चिनी लोकांच्या हातीं गेला आहे. यापैकीं बरेच चिनी लोक मलायांतून आलेले असून ते मिश्र जातीचे आहेत. हे चिनी लोक तद्देशीय स्त्रियांशीं विनहरकत लग्नें लावतात आणि अशा कुटुंबांतील पुरुषसंतति चिनी संस्कृतीची आणि स्त्रीसंतति आईच्या जातीची बनते.

झेर्बादी (ब्रह्मदेश):—इंडो—ब्रह्मी जातींपैकीं झेर्बादी ही एक जात असून ती हिंदी मुसलमान व ब्रह्मी स्त्रिया यांची प्रजा आहे. झेर्बादी लोक ब्रह्मी पद्धतीचा पोशाख करतात व ब्रह्मी भाषा बोलतात. तथापि अशा संततीपैकीं पहिली पिढी आणि बहुधां पुढील पिढयाहि हिंदी व ब्रह्मी या दोन्ही भाषा बोलतात. झेर्बादी लोक मुसुलमानी धर्माचे आहेत, व त्यांची संख्याहि झपाट्यानें (म्हणजे १९०१ सालीं २०४२३, १९११ सालीं ६००००, आणि १९२१ सालीं ९३००० या प्रमाणें) वाढली आहे. इंडो—ब्रह्मी वंशांत आराकानी मुसुलमान ही आणखी एक जात असून ती अक्याब जिल्ह्यांत राहते. यांची संख्या २४००० असून हे लोक स्वजातीबाहेर बेटीव्यवहार करीत नाहींत, त्यामुळें त्यांची स्वतंत्र जात बनली आहे. ब्रह्मदेशांत ८८७००० हिंदी लोक असून त्यांत ४८४००० हिंदु व जंगली जातीचे, ३६६००० मुसुलमान व २३००० ख्रिस्ती आहेत. निम्याहून अधिक हिंदी लोक दक्षिणेकडील दुआब्रांत राहतात. एकट्या रंगून शहरांत १९०००० हिंदी लोक आहेत. हिंदूंमध्यें तेलगु, तामिळ व हिंदुस्थानी लोकांचा भरणा विशेष आहे. ब्रह्मदेशांत ब्रह्मी लोकांऐवजीं हिंदी लोकांचा भरणा

वाढत आहे अशी एक ओरड ऐकूं येते; व तिचें कारण रंगून बंदरांत हिंदुस्थानाकडून येणाऱ्या बोटींतून उतरणारे हिंदी लोकांचे तांडे हें होय. रंगून वगैरे बंदरांत व्यापाराकरितां किंवा किनाऱ्यालगतच्या भातशेतीच्या जमीनी कसण्याकरितां हे हिंदी लोक जमतात. पण किनाऱ्यापासून दूर अन्तर्भागांत हिंदी लोकांची वस्ती अगदीं थोडी आहे. शिवाय या हिंदी लोकांत बायकांचें प्रमाण थोडें असून ब्रह्मदेशांत राहणारे हिंदी पुरुष ब्रह्मी स्त्रियांबरोबर लग्नें लावतात व त्यांची प्रजा ब्रह्मी लोकांतच मिसळते. त्यामुळें ब्रह्मी लोकांनां हिंदी लोक हुसकावून लावण्याऐवजी हिंदी लोकच ब्रह्मी लोकांत मिसळून जाण्याचा संभव अधिक आहे.

यूरोपीय व अँग्लो--इंडियनः—यूरोपीय लोकांत लष्करी व इतर नोकऱ्यांत असणारे किंवा नोकरी संपल्यावर स्वदेशीं परत जाणारे लोक फार आहेत. कांहीं थोडे यूरोपीय व सर्व आंग्लो--इंडियन हे मात्र येथील कायमचे रहिवाशी आहेत. त्यांचें संख्यादर्शक कोष्टक ( आंकडे हजारांचे आहेत. )

| ठिकाण | ब्रिटिशेतर यूरोपीय १९११-२१ | | यूरोपीय व तत्सदृश १९११-२१ | | आंग्लो-इंडियन १९११-२१ | |
|---|---|---|---|---|---|---|
| हिंदुस्थान | १६४ | १० | १७४ | १९७ | १०० | ११३ |
| ब्रिटिश मुलुख | ९ | १४८ | १५७ | १७८ | ८६ | ९६ |
| संस्थानें व एजन्सी | १ | १५ | १९ | १६ | १४ | १६ |

आधुनिक सामाजिक प्रवृत्ति.—उच्च जातीचा दर्जा मिळवूं पाहणें, स्वतःची सामाजिक स्थिति सुधारणें व स्वजातीच्या सभा व संघ स्थापणें, ही प्रवृत्ति अलीकडे फार जोरांत आहे. जात्याभिमान कमजोर होण्याऐवजीं तो वाढत असून त्याबरोबर परजातीबद्दल हेवा व द्वेष वाढत आहे. हलक्या जातींनां राजकीय हक्क उच्च जातींच्या बरोबरीनें मिळाल्यामुळें सामाजिक व धार्मिक हक्क वरिष्ठ जातींच्या बरोबरीनें मागण्याचा उपक्रम विशेषतः मद्रासेकडे झाला आहे. वरिष्ठ जातींचा दर्जा मिळावा म्हणून वरिष्ठ जातींतल्या बालविवाह, विधवाविवाहप्रतिबंध, मिश्रजातीय विवाहास बंदी वगैरे कांहीं कांहीं रूढी कनिष्ठ जाती स्वीकारीत आहेत. उलटपक्षीं कांहीं जातींत योग्य सामाजिक सुधारणा अंगिकारण्याचा प्रयत्न चालू आहे. बिहार-ओरिसामधील अहीर ऊर्फ गोप जातीनें आपली महासभा स्थापून व 'अहीर समाचार' नामक मासिक चालवून पंजाबपासून बंगालपर्यंत पसरलेल्या सर्व अहीर जातीची एकी करण्याचा प्रयत्न सुरू केला आहे. आपण क्षत्रिय आहों असें या जातीचें म्हणणें असून तद्दर्शक जानवें वापरण्यास कांहींनीं सुरवात केली आहे. शिवाय मद्यपानबंदी, बालविवाहप्रतिबंध वगैरेसंबंधी ठराव त्यांच्या महासभेनें पास केले आहेत. अहीरांतील पोटजातींत रोटीबेटीव्यवहार सुरू झाले आहेत. या जातीप्रमाणें कुर्मी, कहर, धनुक वगैरे जातींतहि चळवळ सुरू झाली आहे.

दुसरी प्रवृत्ति रोटीव्यवहार आणि अस्पृश्यताबाबत निर्बंध नष्ट करणासंबंधीं. रोटीव्यवहाराला असलेला प्रतिबंध बऱ्याच पोटजातींत चालला आहे; इतकेंच नव्हे तर मुख्य जातीहि एकमेकांशीं रोटीव्यवहार करण्यास अधिकाधिक प्रवृत्त होत आहेत. पोटजातींत परस्पर बेटीव्यवहार सुरू करण्याची प्रवृत्ति कांहीं वरिष्ठ जातींतच फक्त दिसते. बंगाल्यांतील कायस्थ जातीच्या दक्षिण राढीं, उत्तर राढीं व बंगज या पोटजातींमध्यें, ओरिसांतील ब्राह्मणांच्या ससनी व मस्तन या पोटजातींमध्यें व भिंगापुरच्या ससनी ब्राह्मण व चौधरी घराण्यामध्यें बेटी व्यवहार सुरू झाले आहेत. अशीं उदाहरणें उच्च वर्गांतील सुशिक्षित लोकांमध्येंच फक्त आढळतात. अस्पृश्यतेसंबंधीं नियम गेल्या महायुद्धांत परदेशीं गेलेल्या इसमांमध्यें फारच शिथिल झाले; व परदेशांतून परत आलेल्या इसमांनां प्रायश्चित्त देण्याचा आग्रह फारसा कोठें दिसत नाहीं. जमशेटपूर येथील मोठ्या कारखान्यांत हरएक जातीचे लोक स्पृश्यास्पृश्यभेद न मानतां एकत्र काम करीत असतात. याप्रमाणें व्यवहारांत अनेक प्रसंगीं अस्पृश्यताविषयक निर्बंध मोडले जात असले तरी एकंदरीनें अस्पृश्यता फारशी मोडलेली नाहीं. उच्च जातींतला इसम अस्पृश्य इसमाला आपल्या बैठकीवर बसूं देत नाहीं; तसेंच आपला हुक्का, अन्न, पाणी, यांनां स्पर्श करूं देत नाहीं. अस्पृश्य जातींच्या मुलांनां शाळेच्या व्हरांड्यांत स्वतंत्र बसवितात. अखिल जातीजातींमधील प्रश्न बाजूला ठेवून केवळ व्यक्तिशः विचार केल्यास शिक्षण व धन या दोन गोष्टींच्या आधारानें हलक्या जातींतील व्यक्ति वरिष्ठ जातींशीं अधिक सुलभतेनें व्यवहार करूं शकते. नीच जातीचा इसमहि सुशिक्षित व सुधारलेल्या राहणीचा असल्यास त्याला कोणी अस्पृश्य मानीत नाहीं. जातिबहिष्कार हें शस्त्रहि अधिकाधिक बोथट होत चाललें आहे. मात्र असहकारितेच्या काळांत

हें बहिष्काराचें शस्त्र कांहीं राजकीय बाबतींत वापरलें गेलें. जंगली जाती हिंदुधर्मांत शिरण्यास त्यांचा नोकरी धंद्यांत प्रवेश हें कारण होतें. सशस्त्र रिझर्व्ह पोलिसांत कचरा जातीचे लोक शिरल्यावर गुरखा लोकांच्या सहवासामुळें ते हिंदु बनले.

पंजाबांत हिंदु व शीख लोकांत मुसुलमानांशेजारामुळें सामाजिक स्वातंत्र्याच्या कल्पना अधिक वाढल्या. जातिजातींमधील रोटीबेटीव्यवहारासंबंधीं निर्बंध बरेच शिथिल झाले आहेत. शिवाय शिक्षणाचाहि परिणाम फार होत आहे. आर्यसमाज व सिंघसभा यांच्या चळवळीमुळें जातिजातीमधील दुर्ग्रह नष्ट होत आहेत. यामुळें शीख व हिंदु लोकांत हल्लीं फक्त तीन वर्ग दिसतात तेः–(१) पुराणमतवादी (ऑर्थोडाक्स) म्हणजे जुने जातिनिर्बंध कडकपणें पाळणारे (२) रोटीव्यवहाराच्या निर्बंधाकडे दुर्लक्ष करून फक्त बेटीव्यवहाराबाबत निर्बंध पाळणारे आणि (३) तिसरा वर्ग रोटी व बेटी हे दोन्ही व्यवहार अनिर्बंधपणें करणारे. यांपैकीं पहिला पुराणमतवादी वर्ग अद्यापहि संख्येनें मोठा असला तरी त्याची संख्या दरसाल कमी कमी होत चालली आहे. रोटीव्यवहाराचे निर्बंध न पाळणारा वर्ग बराच मोठा आहे व तोहि सारखा वाढत आहे. आरोरा जातींतील उन्धी व दस्म ह्या पोटजातींत बेटीव्यवहार सुरू झाला आहे. जातिजातींतील निर्बंध नष्ट करण्यांत हिंदूंपेक्षां शीख लोक फार पुढें गेले आहेत. 'आनंद मॅरेज ॲक्ट' नांवाचा कायदा झाल्यामुळें मिश्रजातीय विवाहास अधिक सुलभता आली आहे.

धर्म.–सरकारी खानेसुमारीच्या रिपोर्टांत हिंदु, शीख, जैन, बौद्ध, पारशी, मुसुलमान, ख्रिस्ती, व ज्यू इतके निराळे धर्म मानले असून शिवाय जंगली जातींचा वन्य किंवा प्राथमिक ('प्रिमिटिव्ह' किंवा ट्रायबल) धर्म म्हणून आणखी एक सदर आहे. यांपैकीं शीख, जैन, बौद्ध तसेंच जंगली जाती यांचा अन्तर्भाव हिंदुधर्म सदरांतच होतो कीं नाहीं असा प्रश्न उपस्थित झाला आहे. अखिलभारतीय हिंदुमहासभेनें 'हिंदु' या शब्दाची व्याख्या केली आहे ती अशी.–" जो कोणी स्वतःस हिंदु म्हणवितो किंवा जो हिंदुस्थानांतच उद्भवलेल्या कोणत्याहि धर्माचें पालन करतो तो हिंदु होय व यामध्यें सनातनी, आर्यसमाजी, शीख, जैन, बौद्ध, ब्रह्मसमाजी, वगैरे सर्वांचा समावेश होतो." याप्रमाणें शीख, जैन वगैरेंनां धर्माऐवजीं पंथाचें स्वरूप कल्पून त्या सर्वांचा हिंदुधर्म या व्यापक नांवाखालीं समावेश करण्याचा उपक्रम झाला आहे. तथापि १९२१ सालच्या खानेसुमारीच्या रिपोर्टांत पूर्वींप्रमाणेंच नोंद करण्यांत आली आहे. हिंदुस्थानांतील धर्म व त्यांचा वृद्धिसंकोच दाखविणारें कोष्टक पुढील पृष्ठावर दिलें आहे.

प्रांतवार दृष्टीनें पाहतां मध्य व दक्षिण हिंदुस्थानांत हिंदूंची संख्या इतर धर्मसंख्येच्या मानानें फार मोठी आहे. आसाम, बिहार–ओरिसा, संयुक्तप्रांत, मध्यहिंदुस्थान, राजपुताना आणि मुंबईइलाखा यांमध्यें हिंदु लोक बहुसंख्याक आहेत. उलटपक्षी वायव्यसरहद्दप्रांत, बलुचिस्तान, व काश्मीर यांमध्यें बहुतेक मुसलमान असून पंजाब, पूर्वबंगाल व सिंध यांत ते बहुसंख्याक आहेत. मुसुलमान आसामांत शें. २८, संयुक्त प्रांतांत शें. १४ व हैद्राबादसंस्थानांत शें. १० आहेत. बौद्ध लोक बहुतेक सर्व ब्रह्मदेशांत असून तेथें त्यांची संख्या शें. ८९ आहे. शीख लोक पंजाबांतच आहेत आणि जैन राजपुताना, अजमीर-मेरवाड व भोंवतालच्या संस्थानांत आहेत. वन्य धर्मी जंगली जाती बिहार–ओरिसा, मध्यप्रांत, व आसाम या तीन प्रांतांतच मुख्यतः आहेत. पण बंगाल, ब्रह्मदेश, मद्रास, राजपुताना, मध्यहिंदुस्थान व हैद्राबादसंस्थान यांमध्येंहि अशा जातींची बरीच संख्या आहे. ख्रिस्ती लोकांपैकीं $\frac{3}{4}$ पेक्षां अधिक संख्या दक्षिण हिंदुस्थानांत (हैद्राबादसंस्थान धरून) आहे; व बाकीची संख्या हिंदुस्थानांत उरलेल्या भागांत पसरलेली असून पंजाब, संयुक्तप्रांत, बंगाल, बिहार–ओरिसा, ब्रह्मदेश, मुंबई व आसाम या प्रांतांत बहुतेक आहे. पारशी आणि ज्यू लोक मुख्यतः मुंबई इलाख्यांत आहेत. अखिल हिंदुस्थानचें सरासरी मान हिंदु शें. ६८, मुसुलमान २२, बौद्ध ३, शीख १, ख्रिस्ती १ आणि बाकीच्या धर्मांचे शेंकडा एकाहूनहि कमी आहे.

हिंदु:–ख्रिस्ती व मुसुलमान लोकांचा एक एक मुख्य धर्मसंस्थापक, व धर्माचें एकेक मुख्य पुस्तक आणि विशिष्ट संस्कृति असल्यामुळें ख्रिस्ती किंवा मुसुलमान कोणाला म्हणावें हें ठरविणें सोपें आहे. पण हिंदुधर्माचे अनेक धर्मग्रंथ व अनेक धर्मपुरस्कर्ते असल्यामुळें या धर्माची एक थोडक्यांत व निर्दोष व्याख्या ठरविणें फार कठिण झालें. अगदीं अलीकडे हिंदुमहासभेनें केलेली व्याख्या वर दिलीच आहे. बौद्ध, जैन, शीख वगैरे या व्याख्येप्रमाणें 'हिंदु' ठरतात. पण हिंदु हा शब्द भिन्न मानववंश, भिन्न भाषा, भिन्न सामाजिक चालीरीती असलेल्या

### ब्रिटिश हिंदुस्थानांतील धर्म व त्यांचा वृद्धिसंकोच

| धर्म | १९२१ सालची लोकसंख्या ( आंकडे हजारांचे ) | लोकसंख्येच्या दर दहाहजारी प्रमाण | | | | | फेरबदलाची शेंकडेवारी (वाढ+ घट –) | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | १९२१ | १९११ | १९०१ | १८९१ | १८८१ | १९११–२१ | १९०१–११ | १८९१–०१ | १८८१–९१ |
| इंडोआर्यन्— | २३२७२३ | ७३६२ | ७४१७ | ७४७९ | ७५९६ | ७६८८ | +.१ | +५.६ | +.९ | +११.८ |
| हिंदु | २१६७३५ | ६८५६ | ६९३९ | ७०३७ | ७२३२ | ७४३२ | –.४ | +५.०४ | –.३ | +१०.१ |
| ब्राह्मणी | २१६२६१ | ६८४१ | ६९३१ | ७०३४ | ७२३१ } | ७४३२ | { –.५ | +५.० | –.३ } | +१०.१ |
| आर्य | ४६८ | १५ | ८ | ३ | १ } | | { +९२.१ | +१६३.४ | +१३१.३ } | |
| ब्राह्मो | ६ | .२ | .१८ | .१४ | .१ | .०४ | +१६.१ | +३५.९ | +३२.७ | +१६५.९ |
| शीख | ३२३९ | १०३ | ९६ | ७५ | ६७ | ७३ | +७.४ | +३७.३ | +१५.१ | +२.९ |
| जैन | ११७८ | ३७ | ४० | ४५ | ४९ | ४८ | –५.६ | –६.४ | –५.८ | +१५.९ |
| बौद्ध | ११५७१ | ३६६ | ३४२ | ३२२ | २४८ | १३५ | +७.९ | +१३.१ | +३२.९ | +१०८.६ |
| इराणी— | १०२ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | +१.७ | +६.३ | +४.७ | +५.३ |
| झोरोआस्टर (पारशी) | १०२ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | +१.७ | +६.३ | +४.७ | +५.३ |
| सेमेटिक— | ७३५११ | २३२५ | २२५१ | ५२२२ | २०७६ | २०४८ | +४.२ | +७.९ | +९.७ | +१४.६ |
| मुसुलमान | ६८७३२ | २१७४ | २१२६ | २१५२ | १९९६ | १९७४ | +५.१ | +६.७ | +८.९ | +१४.३ |
| ख्रिस्ती | ४७५४ | १५० | १२४ | ९९ | ७९ | ७३ | +२२.६ | +३२.६ | +२८.० | +२२.६ |
| ज्यू | २२ | .६ | .७ | .६ | .६ | .५ | +३.८ | +१५.१ | +६.० | +४३.१ |
| प्राथमिक अवस्थेंतील— | ९७७५ | ३०९ | ३२८ | २९२ | ३२३ | २५९ | –५.१ | +१९.९ | –७.५ | +४१.२ |
| वन्यधर्मी | ९७७५ | ३०९ | ३२८ | २९२ | ३२३ | २५९ | –५.१ | +१९.९ | –७.५ | +४१.२ |
| किरकोळ— | १८ | १ | १ | ४ | २ | २ | –५१.५ | –७१.४ | +२०३.७ | +२८.७ |
| किरकोळ धर्मांचे व धर्म न सांगितलेले | १८ | १ | १ | ४ | २ | २ | –५१.५ | –७१.४ | +२०३.७ | +२८.७ |

अनेक लोकसमुदायांस लागतो. तसेंच प्राथमिक धर्म पाळणाऱ्या जंगली जातींसहि तो लागतो. वरील कोष्टकांत ब्राह्मणी धर्माचे जे हिंदु आहेत त्यांची संख्या १८८१ पासून एकसारखी कमी होत आली आहे. बंगाल प्रांतांत हिंदूंचें प्रमाण शें. ४९ होतें तें शें. ४४ झालें असून मुसुलमानांचें प्रमाण शें. ५२ होतें तें शें. ५४ इतकें वाढलें आहे. हिंदु हे मुसुलमानांच्या मानानें दीर्घायुष्य व अपत्योत्पादन या दोन्ही बाबतींत कमी असल्याचें आढळून आलें आहे. गेल्या इन्फ्ल्युएन्झामध्यें मुंबई इलाखा व संयुक्तप्रांत यांमध्येंच प्राणहानि अधिक झाली व दोन्ही प्रांतांत हिंदूंचें संख्याधिक्य फार आहे.

जैन:–बौद्ध धर्माप्रमाणें जैन हा हिंदुधर्मांतूनच निघालेला धर्म आहे, पुष्कळ जैन स्वतःस हिंदु म्हणवितात, हिंदूंशीं बेटीव्यवहार करतात व हिंदूंच्या धार्मिक उत्सवांत भाग घेतात. जैनांपैकीं शें. ७० राजपुताना, मुंबई इलाखा व बडोदें संस्थान यांमध्यें आहेत; पण हे लोक बहुतेक व्यापारी असल्यामुळें सर्व हिंदुस्थानभर विभागलेले आहेत. या लोकांत बालविवाह व विधवाविवाहप्रतिबंध या दोन रूढी कडकपणें पाळीत असल्यामुळें त्यांची लोकसंख्या एकसारखी कमी होत आहे. १८९१ मध्यें त्यांचें प्रमाण शें. ४९ होतें तें हल्लीं (१९२१) ३७ आहे. ब्राह्मणी हिंदूंचें प्रमाण कमी होण्याला जीं कारणें लागू आहेत तींच जैनांनांहि लागू आहेत.

बौद्ध:–हे लोक मुख्यतः ब्रह्मदेशांत आणि तिबेटलगतच्या काश्मीर व हिमालय यांच्या भागांत आहेत. त्यांत शान, करेण व तलैंग या तीन प्रादेशिक जातींचा समावेश होत असून या तिन्ही एकाच मानववंशांतील आहेत.

शीख:–या धर्मांतील लोक तात्त्विक व धार्मिक बाबतींत हिंदूंहून फारसे भिन्न नाहींत. केस व दाढी वाढविणें आणि धूम्रपान न करणें हीं शीखांचीं दोन मुख्य लक्षणें आहेत, १८८१ पासून यांची संख्या सारखी वाढत आहे, व त्याचें कारण अस्पृश्य जातींतील हिंदु शीखधर्मी बनले हें होय. या लोकांत प्रौढविवाह व विधवाविवाह रूढ असल्यामुळें लोकसंख्यावृद्धीस मदत झाली आहे.

आर्यसमाज:–आर्यसमाजी ४६८ हजार लोकांपैकीं २४५ हजार संयुक्तप्रांतांत आणि २२३ हजार पंजाब व दिल्ली प्रांतांत राहतात, १९११ पासूनच्या दहा वर्षांत यांची संख्या शें. ९२ नीं वाढली आहे. ही वाढ आर्यसमाजानें जें शुद्धिकार्य म्हणजे इतर धर्मांतील लोक शुद्ध करून आर्यसमाजांत घेण्याचें कार्य जोरांत चालविलें त्यामुळें झाली आहे. ख्रिस्ती, मुसुलमान व अस्पृश्य जाती यांमधून बरेच लोक शुद्धिसंस्कारानें आर्यसमाजांत घेण्यांत आले. आर्यसमाजांत जातिभेद नसल्यामुळें अस्पृश्य जातींतील हिंदु आर्यसमाजी लवकर बनतात. संयुक्त प्रांतांतील डोम हे अस्पृश्य लोक बरेचसे आर्यसमाजी झाले. ख्रिस्ती किंवा मुसुलमानांतहि जातिभेद नाहीं, पण आर्यसमाज स्वतःस हिंदुधर्मी म्हणवीत असल्यामुळें अस्पृश्य जातींनां ख्रिस्ती किंवा मुसुलमान होण्यापेक्षां आर्यसमाजी होणें अधिक पसंत पडतें.

ब्रह्मसमाज:–या पंथाच्या एकूण ६३८८ संख्येपैकीं बंगालच्या पूर्वेकडील तीन प्रांत, आसाम, आणि विहार व ओरिसा यांमध्यें ४६०० असून बाकी ब्रह्मदेश आणि पंजाबमध्यें आहे. हा लहान समाज बंगालमध्यें गेल्या दशकांत शें. १६ नीं वाढला आहे. या समाजाची संख्या लहान असली तरी त्यांच्या धर्मतत्त्वांचा परिणाम बऱ्याच अधिक लोकसंख्येवर झालेला आहे. इंग्रजी शिक्षण मिळून पाश्चात्त्यांच्या विचारसरणीशीं ज्यांचा परिचय झाला आहे असे पुष्कळ इसम जुन्या हिंदुधर्मतत्त्वांपेक्षां ब्रह्मसमाजाचीं तत्त्वेंच पाळतात; पण प्रत्यक्ष हिंदुधर्म सोडून ब्रह्मसमाजांत दाखल होत नाहींत.

आदिवन्यधर्म:–जे लोक हिंदु, ख्रिस्ती, मुसुलमानी वगैरे कोणत्याच धर्माचे असल्याचें सांगत नाहींत त्यांचे खानेसुमारीच्या तक्त्यांतील 'धर्म' ह्या रकान्यांत जातिनाम घालतात. मागील खानेसुमारीच्या तक्त्यांत 'ॲनिमिस्ट' हें नांव अशा जातींच्या धर्माकरितां योजलें होतें. पंचमहाभूतें व मृत पितर यांनां देव मानून पूजणें याला वन्यधर्म म्हणतात, पण हा पूजेचा प्रकार हिंदुधर्मांतहि असल्यामुळें हिंदु धर्मांतील कनिष्ठ जाती व वन्यधर्मी गोंड किंवा भिल्ल वगैरे जाती यांमध्यें फारसा फरक नसतो. ९३/४ दशलक्ष किंवा दहा हजारांत ३०९ इतके या जातीचे लोक आहेत यांची संख्या १९११ पेक्षां हल्लीं सुमारें ९ लाख कमी झाली आहे. कारण बरेचसे लोक हिंदु व ख्रिस्ती धर्मांत शिरले आहेत. ओराओन लोकांत तान भगत नांवाची चळवळ सुरू होऊन त्यांनीं स्वतःची धार्मिक सुधारणा केली पण हिंदुधर्म प्रत्यक्ष स्वीकारला नाहीं. अशाच धार्मिक सुधारणेच्या चळवळी इतर कांहीं वन्य जातींतहि सुरू झाल्या आहेत.

मुसुलमानः–हिंदु धर्मातून मुसुलमानी धर्मात शिरलेल्या बऱ्याच लोकांमध्यें पूर्वीची हिंदु जात व त्यांचे धार्मिक विधी व उत्सव कायम असतात. मद्रासकडील दुदेकुल ही अशा प्रकारची जात असून मुंबई इलाख्यांत अशा जाती बऱ्याच आहेत; इतकेंच नव्हे तर सिंधमधील संजोगी ही जात आपण हिंदु नाहीं व मुसुलमानहि नाहीं असें म्हणते. हिंदुस्थानांत मुसुलमान ६९०लक्ष असून हिंदुस्थानच्या पूर्वभागांतील व मद्रास इलाख्यांतील मुसुलमान बहुतेक सर्व बाटलेल्यांचे वंशज असून अस्सल मुसुलमान फारच थोडे आहेत. खुद्द पंजाबमध्यें अस्सल मुसुलमान शें. १९ च आहेत. १९११–२१मध्यें मुसुलमानांची संख्या शें. ३.१इतकी वाढली आहे. हल्लीं मुसुलमानी धर्म स्वीकारणारे नवे इसम फारच थोडे आढळतात. तरीहि मुसुलमानांची संख्या वाढली आहे. त्याचीं कारणें, त्याच्यांतील विधवाविवाहाची रूढी व बालविवाहाचा बहुतेक अभाव हीं आहेत. शिवाय बरेचसे मुसुलमान औषधपाण्याची सोय आहे अशा मोठाल्या गांवांत राहणारे असल्यामुळें गेल्या इन्फ्ल्युएन्झामध्यें हिंदूंपेक्षां मुसलमानांची प्राणहानि कमी झाली.

ख्रिस्तीः--मुंबई इलाख्यांत ख्रिस्ती बनलेले कोळी लोक स्वतःच्या मूळच्या हिंदु धर्मांतील देवतांची घरीं पूजा करतात. मद्रासेंतील तिनेवेल्ली जिल्ह्यांत एक विचित्र जात आहे ती स्वतःस ज्यू व ख्रिस्ती दोन्ही म्हणविते. हिंदूंच्या कनिष्ठ किंवा अस्पृश्य जातींतील व वन्यजातींतील लोकच कायते बाटून ख्रिस्ती होतात; इतर हिंदु किंवा मुसुलमान ख्रिस्ती होत नाहींत. ख्रिस्ती लोकांत बालविवाह व विधवाविवाहप्रतिबंध हीं संख्यावृद्धीला अडथळा करणारीं कारणें नसल्यामुळें ख्रिस्ती समाजाची लोकसंख्या वाढती असून १८८१पासून आजपर्यंत ही संख्या २॥ पट वाढली आहे. जंगली जातींपैकींच बरेच लोक मिशनरी लोकांच्या प्रयत्नानें ख्रिस्ती बनतात व हें बाटण्याचें प्रमाण १८९१ ते १९०१ या दशकांतील दुष्काळी सालांतच विशेष अधिक होतें.

पारशीः–झोरोआस्टर धर्माचे पारशी लोक बहुतेक मुंबई इलाखा व त्यांतील संस्थानें व बडोदें संस्थान यांत राहतात. गेल्या दशकांत त्यांची वाढ शें. २.३इतकी झाली आहे. निरनिराळ्या वयोमानांतील पारशांची संख्या पाहतां १९ ते ९० या दरम्यानच्या वयाच्या इसमांची संख्या वाढली आहे पण ९ वर्षांच्या आंतील संख्या कमी झाली आहे. फ्रान्सपेक्षांहि या समाजांतील हें प्रमाण कमी आहे; पारशी लोक बहुतेक सुस्थितींत असून पाश्चात्य राहणीनें राहतात; त्यामुळें त्यांच्यांत जननाचें प्रमाण कमी होत आहे यांत आश्चर्य नाहीं. पण या समाजांत दीर्घायुष्यता वाढत आहे हेंहि लक्षांत घेण्यासारखें आहे.

अ स्ती क डी ल धा र्मि क प्र वृ त्तिः -सध्यां सर्वत्र धार्मिक अस्वस्थता दिसून येत आहे. इतर धर्मांपेक्षां हिंदुधर्मांत धार्मिक विधी व सामाजिक आचार यांचें आसन फार डळमळित झालें आहे. देवाल्यांची स्थिति विशेष निराशाजनक आहे. भजन, कीर्तन, पुराण वगैरे धार्मिक बाबींचें महत्त्व हल्लींच्या हिंदु माणसांच्या आयुष्यक्रमांत पूर्वींच्या हिंदूंच्या मानानें पुष्कळ कमी झालें आहे. प्राचीन संस्कृत भाषेचें ज्ञान नसल्यामुळें धार्मिक संस्कार व विधी यथासांग करण्यास लागणारी धर्मश्रद्धा फार कमी झाली आहे. पारशी लोकांमध्येंहि अर्धवट यूरोपीय व आशियाटिक चालीरीती शिरल्यामुळें त्यांचीहि स्वतःच्या धर्मावरील श्रद्धा कमी होत चालली आहे. मात्र नवसरी हें जें त्यांचें धार्मिक क्षेत्र आहे व जेथें पारशांपैकीं बरेच लोक राहतात तेथें मात्र जुन्या झोरोआस्टर धर्माचें कडक आचरण चालू आहे. मुसुलमानी धर्म मात्र वरील दोन्ही धर्मांपेक्षां अधिक जिवंत स्थितींत आहे. तसेंच जैन धर्माचेंहि जोमदार पुनरुज्जीवन लवकरच होणार अशीं चिन्हें दिसत आहेत.

हिंदी लोकांतहि धर्मांतरास आळा बसावा म्हणून सामाजिक सुधारणा घडवून आणण्याकरितां जोराची चळवळ सुरू आहे. तसेंच जे लोक पूर्वी बाटून निराळ्या धर्मांत गेले आहेत त्यांचा पुन्हां हिंदु धर्मांत समावेश करतां यावा म्हणून शुद्धीची चळवळ सुरू झाली आहे व अनेक ठिकाणीं धर्मांतर केलेल्यांस पुन्हां शुद्ध करून घेण्याचें कार्य चालू आहे. या कार्यांत आर्यसमाजानें विशेष पुढाकार घेतला आहे. तसेंच हिंदु समाज बलवान् व स्वसंरक्षणक्षम व्हावा म्हणून संघटना करण्याचेंहि कार्य जारीनें चालू आहे. ठिकठिकाणीं हिंदुसभा स्थापन होऊन त्यांमार्फत समाजामध्यें जागृति होत आहे व समाजांतील जातिभेद, अस्पृश्यता इत्यादि संघटनेस विरोधक भावना घालवून समाजास एकरूप बनविण्याचें कार्यहि सुरू आहे.

असें जरी आहे तरी स्वधर्माबद्दल एक प्रकारचा राष्ट्रीय अभिमान मात्र हल्लीं वाढत आहे. हा अभिमान पाश्चात्य संस्कृतींतल्या ' मटीरिॲलिझम ' ( जडवादा )ला नांवें

ठेवण्यांत चांगल्या सुशिक्षित लोकांच्या वादविवादांतहि वारंवार दृष्टीस पडतो. ही विरोधाची प्रवृत्ति आजकालची नसून स्वामी दयानंदांनीं ख्रिस्ती मिशनरी व मुसुलमान मौलवी ह्यांच्याबरोबर जेव्हां जोराचे वाद केले तेंव्हांपासूनची आहे; व त्याला त्यांचा स्वधर्माभिमान जितका कारण झाला तितकेच हिंदुधर्मावर मिशनरी व मौलवी यांनीं अज्ञानपणानें केलेले हल्लेहि कारण झाले. तेव्हांपासून आर्यसमाजी, थिऑसाफिस्ट व हिंदुधर्म महासभा यांनीं हा विरोध प्रज्वलित ठेवला आहे. ब्राह्मोसमाज मात्र यापासून अलिप्त आहे; पण त्यामुळें तो ख्रिस्ताळलेला समाज म्हणून गणला जातो. रूसो-जपानी युद्धांत जपान या आशियांतील राष्ट्रानें यूरोपीय राष्ट्रावर विजय मिळविल्यापासून हिंदूनां सर्व आशियाटिक राष्ट्रांबद्दल (मुसुलमानी राष्ट्रांबद्दल सुद्धां) एक प्रकारचा आत्मभाव वाटत असून फक्त ख्रिस्ती धर्माबद्दल म्हणजे पाश्चात्त्य संस्कृतीबद्दल अनादर उरला होता; पण या अनादरालाहि महात्मा गांधी यांनीं आपल्या चळवळीनें बराच आळा घालण्याचा प्रयत्न केला आहे. इस्लामी धर्माबद्दल पूर्ण बंधुभाव आणि ख्रिस्तीधर्म व त्याचा संस्थापक येशू ख्रिस्त याबद्दल मनःपूर्वक आदर गांधींच्या मनांत असल्यामुळें पूर्वी या दोन धर्मांबद्दल वाटत असलेला द्वेष बराच कमी होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं पण हिंदु-मुसुलमानांनीं स्वसमाजवर्चस्व स्थापण्यासाठीं अनेक प्रकारें चढाईचें धोरण सुरू केल्यामुळें हिंदु-मुसुलमानांत अनेक ठिकाणीं दंगे झाले व होत आहेत, आणि हिंदु-ख्रिस्ती यांच्यामधील द्वेषापेक्षां हिंदु-मुसुलमानांमधील द्वेष वाढत आहे. तथापि ज्याअर्थी या दोन्ही समाजांस हिंदुस्थानांत कायमचें एकमेकांच्या सान्निध्यांत रहावयाचें आहे त्या अर्थी दोन्ही समाजांतील समंजस पुढारी या प्रवृत्तीला वरचेवर आळा घालून दोघांमध्यें सलोखा राखण्याचा प्रयत्न वरचेवर करीत असतात. त्याप्रमाणें संयुक्त मतदारसंघ स्थापन करण्याची चळवळ हा एक अशा प्रकारचा प्रयत्न सध्यां चालू आहे व मध्यंतरी उसळलेली ही लाट थोडी ओसरली म्हणजे पूर्वीप्रमाणें हे दोन्ही समाज सलोख्यानें राहूं लागतील असा अंदाज करण्यास हरकत नाहीं.

भाषा.-हिंदुस्थानांत मुख्यतः पुढील भाषावर्ग आणि पोटवर्ग प्रचलित असून त्या भाषा बोलणाऱ्यांची संख्या (१९२१ सालची) पुढील प्रमाणें-

| | |
|---|---|
| अ-हिंदुस्थानांतील देशी भाषा | |
| ऑस्ट्रिक वर्ग- | (आंकडे दशलक्षांचे) |
| ऑस्ट्रो-नेशियन (मलाया समूह) | ०.०१ |
| ऑस्ट्रो-आशियाटिक (मोनख्मेर, मुंडा पोटवर्ग) | ४.९२ |
| तिबेटो-चिनी वर्ग- | |
| तिबेटो ब्रह्मी | ११.९६ |
| ताई चिनी | ०.९३ |
| करेण | १.११ |
| द्राविडी वर्ग (आंध्र व द्राविड समूह) | ६४.१३ |
| इंडो-यूरोपियन वर्ग- | |
| आर्यन् (इराणी व हिंदी शाखा) | २३२.८९ |
| अवर्गीकृत भाषा (अंदमानी, जिप्सी भाषा) | ०.०२ |
| आ-इतर आशियांतील देश आणि आफ्रिका यांतील देशी भाषा | ०.२१ |
| इ-यूरोपियन भाषा | ०.३२ |

ऑस्ट्रो-आशियाटिकः-आर्यन् भाषा हिंदुस्थानांत शिरण्यापूर्वी गंगा-सिंधु मैदानी प्रदेशांत ऑस्ट्रो-आशियाटिक भाषा प्रचारांत होत्या. तेव्हां या भाषावर्गाचा इतिहास फार प्राचीन आहे. याचा अवशेष अद्याप त्या मुलुखांत आढळतो. या वर्गाचे दोन स्थानिक पोटवर्ग पडतातः मोनख्मेर ( बोलणारांची संख्या अदमासें ०.६ दशलक्ष) व मुंडा (संख्या ३.८). पहिल्या पोटवर्गांत रंगूनच्याआसपासची मोन किंवा तलैंग, आसाम डोंगरांतील खासी व सालविनच्या आजूबाजूस असणारी पलौंग व तत्संबद्ध पोटभाषा येतात. या पोटभाषा बोलणारे प्रत्येकी अदमासें २० लाख लोक भरतील. छोटानागपूर पठारावरील मुंडा पोटवर्गांत खेरवारी ( ३.४ दशलक्ष ) भाषा मुख्य आहे, संताळ ( २.१ ), मुंडारी (०.६) व हो (०.४) या तिच्या शाखा आहेत. मध्य प्रांताच्या पश्चिमेकडील कोर्कू (०.१४) आणि मद्रासच्या उत्तरेची सवरा (०.१७) या मुंडाप्रदेशाबाहेरच्या भाषांतील प्रमुख भाषा होत.

तिबेटो-चिनीः-यांचे तिबेटो-ब्रह्मी (११ दशलक्ष) व सयामी-चिनी (२ दक्षलक्ष) असे दोन पोटवर्ग पडतात. पहिल्या पोटवर्गांतील भाषा, शान संस्थानें, त्यांच्या

दक्षिणेकडची सयामसरहद्दीची पट्टी आणि वरच्या ब्रह्मदेशांतील उत्तरजिल्हे हा प्रदेश सोडून सर्व ब्रह्मदेशांत बोलल्या जातात. आसाम आणि हिमालयीन क्षेत्रांत सुद्धां तिबेटो-ब्रह्मी भाषा वापरतात. यांत बऱ्याच पोटभाषा आहेत; ब्रह्मी खेरीज (८ दशलक्ष) बाकीच्या भाषा बोलणारे लोक फार थोडे आहेत. ब्रह्मीच्या खालोखाल आराकानी मणिपुरी आणि बोडो आणि चिन, मोतिया, गारो व काचीन या महत्त्वाच्या पोटभाषा आहेत. सयामीब्रह्मी, वर्गांत करेण आणि ताई या पोटभाषा येतात. शानसंस्थानें, ब्रह्मदेशाच्या लगतचा प्रदेश आणि ब्रह्मपुत्रा खोऱ्याच्या पूर्वेकडील कांहीं जातींतून या भाषा बोलतात.

द्राविडी:—द्राविड, आंध्र, व यांमधील गोंडादि असे तीन भाषासमूह या वर्गांत मोडतात. आंध्रसमूहांत सुमारें २४ दशलक्ष लोक निघतील; तेलगू, कंध किंवा कुई आणि कोलामी या पोटभाषा आंध्र होत. सुमारें १८ लाख लोक तेलगू भाषा बोलणारे मद्रास व हैद्राबाद संस्थानांत आहेत. गोंडादि मध्यसमूह वऱ्हाड--मध्यप्रांत, मध्यहिंदुस्थान व हैद्राबादसंस्थानचा पूर्वभाग यांत रूढ आहे. मद्रासच्या वायव्य आणि मध्यभागांतील तामिळ, कानडी, मलयालम्, व तुलु या मुख्य पोटभाषा द्राविडसमूहांत येतात. बलुचिस्तानांतील ब्राहुई भाषेचाहि या समूहांत समावेश करण्यांत येतो; पण त्याबद्दल वाद आहे.

इंडोयुरोपियन्:--या वर्गांतील स्थानिक भाषा आर्यन पोटवर्गांतल्या आहेत. याच्या इराणी व भारतीय (इंडियन) अशा दोन शाखा आहेत. इराणी शाखा हिंदुस्थानाबाहेर बलुचिस्तान, अफगाणिस्तानसरहद्द या प्रदेशांत असून तिच्यांत पांच भाषा आहेत व बोलणारांची संख्या अदमासें २० लाख आहे. त्यापैकीं पुस्तु बोलणारे ६ असून बाकीचे बहुतेक बलुची भाषा बोलणारे आहेत. आर्यन् पोटवर्गाच्या भारतीय शाखेंत पुन्हां दोन विभाग पडतात. असंस्कृत किंवा पिशाची पोटशाखेंत काश्मीर संस्थानांतल्या पांच भाषा येतात. बोलणारांची लोकसंख्या अदमासें १२ लाख येईल. संस्कृत पोटशाखेंत सुमारें २३० दशलक्ष लोक आढळतील. डॉ. होर्नेलच्या मतें या शाखेंतील सर्व भाषा हिंदुस्थानावर लगेंच एकामागून एक स्वाऱ्या करणाऱ्या दोन टोळ्यांनीं आणल्या. दुसऱ्या टोळीनें पहिल्या टोळीच्या भाषांचें कांहीं अंशीं निर्मूलन तर कांहीं अंशीं मिश्रीकरण केलें. पश्चिम हिंदी हें दुसऱ्या टोळीच्या भाषेचें आधुनिक स्वरूप म्हणतां येईल. ही भाषा आणि पहिल्या टोळीची भाषा यांमध्यें गुजराथी, राजस्तानी, पंजाबी, पहाडी, आणि पूर्वहिंदी या भाषा बसतील. सिंधी, लहंडा, मराठी, बिहारी, उडियां, बंगाली, आणि आसामी या भाषा पहिल्या टोळीच्या भाषांचे वंशज म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां हिंदुस्थानांतील आजच्या प्रमुख भाषांकडे वळूं: या भाषा पुढें दिल्याप्रमाणें निरनिराळ्या प्रांतांत चालू असून त्या बोलणारांची संख्या पुढें दिली आहे.

### हिंदुस्थानांतील प्रमुख भाषा

| भाषा | बोलले जाणारे प्रांत | बोलणारांची संख्या (आंकडे हजारांचे) १९२१ | १९११ |
|---|---|---|---|
| पश्चिम हिंदी | सं. प्रांत; पंजाब; मध्यहिंदु.; मुंबई; हैद्राबाद; मद्रास. | ९६७१४ | ९६०४१ |
| बंगाली | बंगाल–बिहार; ओरिसा;आसाम. | ४९२९४ | ४८३६८ |
| तेलगु | मद्रास; हैद्राबाद; म्हैसूरसंस्थानें. | २३६०१ | २३५४३ |
| मराठी | मुंबई; मध्यप्रांत. | १८७९८ | १९८०७ |
| तामिळ | मद्रास; म्हैसूर. | १८७८० | १८१२८ |
| पंजाबी | पंजाब; काश्मीर. | १६२३४ | १५८७७ |
| राजस्तानी | राजपुताना; मध्य-हिंदुस्थान. | १२६८१ | १४०६८ |
| कानडी | म्हैसूर; मद्रास; मुंबई;हैद्राबाद. | १०३७४ | १०५२६ |
| उडिया | बिहार;ओरिसा मद्रास. | १०१४३ | १०१६२ |
| गुजराथी | मुंबई; बडोदें व संयुक्तप्रांत. | ९५५२ | ९२३८ |
| ब्रह्मी | ब्रह्मदेश. | ८४२३ | ७८९३ |
| मल्याळी | मद्रास. | ७४९८ | ६७९२ |
| लाव्हडा उर्फ पश्चिम पंजाबी | पंजाब. | ५६५२ | ४७७९ |

हिंदुस्थानांत एकंदर २२२ भाषा आहेत. भाषाशास्त्रज्ञांच्या मतें हिंदुस्थानी व ऊर्दु या पश्चिम हिंदी भाषेच्या पोटभाषा आहेत. हिंदी व ऊर्दु यांच्या लिपी निरनिराळ्या असून ऊर्दु भाषेंत पर्शियन शब्दांचा तर हिंदीमध्यें संस्कृत शब्दांचा भरणा फार असतो. ऊर्दु व हिंदी या दोन नांवांनीं संबोधिल्या जाणाऱ्या भाषा वास्तविक एकच आहेत. पण या दोन नांवांनां धार्मिक महत्त्व

आहे, कारण मुसुलमान लोक ज्या भाषेला उर्दु म्हणतात तिलाच हिंदु हिंदी म्हणतात. रामनगर भागांत उडिया भाषा बोलणारांची संख्या १९११ सालीं ५०००० होती ती १९२१ सालीं १७० झाली. याचें कारण १९२१ च्या सुमारास हा भाग ओरिसामधील बालासोर जिल्ह्यांत सामील करण्याचा सरकारचा प्रयत्न चालू होता. तो लोकांनां पसंत नसल्यामुळें त्यांनीं उडियाऐवजी स्वतःची बंगाली भाषा असल्याचें नमूद केलें. लाव्हडा ही पंजाबी भाषेहून अगदीं भिन्न भाषा आहे. पण सदरहू भाषानाम लोकांच्या परिचयाचें नाहीं. १९२१ च्या खानेसुमारीच्या वेळीं विशेष काळजीपूर्वक नोंद करण्यांत आली तीवरून ही भाषा बोलणारे लोक सिंधमध्यें ५९२०, वायव्यसरहद्द प्रांतांत सुमारें दहा लक्ष, आणि पंजाबांत हिच्या निरनिराळ्या पोटभाषा बोलणारे मिळून लोक ४३ लक्ष आहेत. मुंबई इलाख्यांतील कांहीं दुय्यम भाषांविषयींहि बराच घोंटाळा झालेला गेल्या दोन तीन सेन्सस रिपोर्टांवरून दिसतो. खानदेशी उर्फ अहिराणी ही खानदेशी मुलुखांतील भाषा बोलणारे लोक १२९३००० असल्याचें 'लिंग्विस्टिक सर्व्हे' या पुस्तकांत दिलें आहे. पण ही संख्या सेन्सस रिपोर्टांत १९०१ सालीं २०६६ आणि १९११ सालीं ४६३ अशी नमूद आहे. १९२१ सालीं विशेष काळजीपूर्वक नोंद केली तेव्हां ही संख्या २००००० च्या वर भरली. ही अहिराणी भाषा गुजराथी भाषेवरून निघाली असून तिच्यांत मराठी भाषेचें मिश्रण आहे. भिल्ली भाषेचाहि गुजराथी, मराठी व राजस्तानी या भाषांशीं घोंटाळा होतो. १९११ च्या सेन्सस रिपोर्टांतील आंकडा 'लिंग्विस्टिक सर्व्हे' या पुस्तकांतील आंकड्यापेक्षां १२,९०,००० इतका कमी आहे. भिल्ली भाषेची कोंकणी म्हणून एक पोटभाषा आहे. तिचा गोव्याकडील कोंकणी भाषेशीं घोंटाळा होतो. तसेंच या इलाख्यांतील जिप्सी भाषा म्हणून गणल्या जाणाऱ्या भाषा हल्लीं योग्य रीतीनें इतर भाषांत अंतर्भूत केल्या गेल्या आहेत. त्यामुळें जिप्सी भाषा बोलणारांची संख्या १९११ सालीं ४६००० होती. पण १९२१ सालीं ती फक्त ६००० असल्याचें आढळून आलें आहे.

कनिष्ठभाषा:- आर्य भाषांशीं संबंध येऊं लागल्यावर कनिष्ठ प्रतीच्या अनार्य भाषा नष्ट होत चालल्या असल्याचा पुरावा दर सेन्सस रिपोर्टांवरून मिळतो. हे लोक एकत्र मिसळून त्यांची मिश्र जात बनतेच असें नाहीं; तर अनार्य लोक आपली मूळ भाषा टाकून आर्य भाषा स्वीकारतात. मध्य प्रांतांतील पुष्कळ जातींनीं आपली मूळ भाषा गमावली आहे. उदा. सवर, भैग, भैण, भरीआ, भुइनर, बिंझवार, कवर, खखर, कोळी, रौनिआ, सओंटा, भिल्ल, व हळबा. अनार्य भाषा दूर जंगलांत राहणारे लोक अद्याप बोलतात, पण जंगल तुटून त्यांचा संबंध सुधारलेल्या जगाशीं येऊं लागला कीं त्यांच्या मूळ भाषा नष्ट होत जातात. गोंड, भिल्ली, ओराबान, कोर्कु, बंजारी वगैरे भाषांची हीच स्थिति झाली आहे. बिहार-ओरिसा प्रांतांत कनिष्ठ भाषांची हीच गत चालू आहे. महत्त्वाच्या अनार्य भाषा अद्याप जिवंत आहेत. मुंडावर्गांतील भाषांची ही स्थिति आहे; पण त्या वर्गांतील भुमजी भाषा मात्र नष्ट होत चालली आहे. मद्रास इलाख्यांतील एजन्सी विभागांत बऱ्याच अनार्य भाषा प्रचलित असून त्या नष्ट होण्याचीं चिन्हें अद्याप दिसत नाहींत. खोंड, कोय, गडब व बार्डो या अनार्य भाषा बोलणारांची संख्या कमी झाली आहे खरी; पण सवर, खोंड, गोंडी या भाषा बोलणारांची संख्या तितक्याच प्रमाणांत वाढली आहे. मध्यप्रांतांत २४७००० गोंड जातीचे लोक आहेत, पण २४०००० लोक गोंड भाषा बोलतात; आणि एकंदर ९,०८,००० गोंड लोकांपैकीं ४,९४,००० लोकच गोंड भाषा बोलतात.

ब्रह्मदेशांत कनिष्ठ भाषा नष्ट होण्याचें कार्य अधिक वेगानें चालू आहे. ब्रह्मी भाषा व तिच्या पोटभाषा बोलणारांची संख्या १९२१ पासून अलीकडे शेंकडा ११ नें वाढली आहे. तात्पर्य, जेथें जंगली जातीचें सुधारलेल्या लोकांशीं दळणवळण वाढलें नाहीं, तेथें मात्र कनिष्ठ प्रतीच्या आद्य भाषा चालू आहेत. हा झगडा फक्त भाषांपुरातच असतो असें नाहीं, तर जंगली जाती आर्य भाषेबरोबर आर्य संस्कृतीहि ग्रहण करीत असतात. कनिष्ठ भाषा नष्ट होण्यापूर्वी मध्यंतरी एक द्विभाषावस्था असते म्हणजे जंगली जाती कांहीं स्वतःची कनिष्ठ भाषा व शेजारच्या पुढारलेल्या समाजाची आर्य भाषा या दोन्ही भाषा बोलतात.

वरील प्रकारचा झगडा निरनिराळ्या आर्य भाषांमध्यें आपसांतहि होतो. एका चिरस्थायी समाजाच्या मुलुखांत दुसरा उपरी लोकांचा वर्ग राहावयास गेल्यास उपरी वर्ग तेथील स्थानिक लोकांची भाषा अंगिकारतो. असा प्रकार बडोदें संस्थानांत दिसतो; कारण तेथें रहावयास गेलेले मराठी, कच्छी आणि उर्दु भाषा बोलणारे लोक

गुजराथी भाषा स्वीकारूं लागले आहेत. उलटपक्षीं सरकारनें व विद्यापीठानें अंगिकारलेली भाषा परकी असली तरी ती स्थानिक भाषेसहि नष्ट करूं लागते.

एकराष्ट्रीय भाषा आणि लिपी:—सर्व हिंदुस्थानची मिळून एक बोधभाषा ( कॉमन मीडियम ) आणि लिपी असावी ही आवश्यकता अलीकडे फार भासूं लागली आहे; आणि त्यामुळें द्विभाषापद्धति म्हणजे स्वतःची प्रांतिक भाषा आणि राष्ट्रीय भाषा अशा दोन भाषा अवगत असणें प्रत्येक इसमाला जरूर झालें आहे. हिंदी ही राष्ट्रीय भाषा झाली पाहिजे याबद्दल बहुतेक एकमत झालें आहे. कारण हिंदी भाषा बोलणारे लोक इतर कोणतीहि प्रांतिक भाषा बोलणारांच्या संख्येपेक्षां अधिक आहेत. शिवाय बिहारी व राजस्तानी या दोन भाषांचें हिंदी भाषेशीं फार साम्य आहे. या तीन भाषा बोलणारे मिळून एकंदर लोक १०कोटींहून अधिक आहेत. उत्तर आणि मध्यहिंदुस्थानांतील बहुतेक लोकांस हिंदी भाषा येते; इतकेंच नव्हे तर दक्षिणहिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेल्या मुसलमान वस्तीमुळें तिकडील लोकांसहि हिंदी भाषेचा थोडाफार परिचय झालेला असतो. त्यामुळें हिंदी ही राष्ट्रीयभाषा मानली जाण्यास कोणाचा फारसा विरोध नाहीं. पण एक लिपि करण्यासंबंधानें मात्र अद्याप फारसें मतैक्य झालें नाहीं. देवनागरी लिपि मद्रासखेरीज इतर सर्व प्रांतिक लिपींशीं बरीच सदृश आहे. तथापि गुजराथी लोक गुजराथी लिपि आणि मराठी लोक मोडी लिपि सोडून देण्यास अद्याप तयार नाहींत. पण या बाबतींतहि द्विलिपिपद्धतीनें हा प्रश्न सुटण्यासारखा आहे. ही हिंदी किंवा हिंदुस्थानी भाषा कोणत्या स्वरूपाची आहे हें तिच्यांतील वाङ्मयाकडे लक्ष दिल्यास कळून येईल. येथेंच हिंदुस्थानी प्राचीन व अर्वाचीन वाङ्मयासंबंधी पुढें विवेचन केलें आहे.

**हिंदुस्थानी वाङ्मय, हिंदी वाङ्मयाचें सिंहावलोकन.**--बाराव्या शतकापासून मुसुलमानांचा हिंदुस्थानावर अधिकाधिक अंमल बसूं लागला असतां हिंदूंचीं राज्यें भराभर बुडूं लागलीं व जीं कांहीं थोडींबहुत जीव धरून राहिलीं होतीं त्यांमध्यें रजपूत घराण्यांचा प्रामुख्यानें निर्देश केला पाहिजे. त्यांनीं मुसुलमान राज्यकर्त्यांनांहि आपलें जाचक अस्तित्व सिद्ध करून दाखवून त्यांनां आपल्याशीं नाखुषीनें कां होईना पण स्नेहभाव पाळण्यास भाग पाडिलें होतें. याच काळांत हिंदुस्थानांतील अर्वाचीन भाषांनां कांहीं आकार येऊं पहात होता; व हिंदुस्थानी वाङ्मयाचा भाट किंवा शाहिरी काव्य म्हणून उदय होत होता. त्या धामधुमीच्या काळांत राजभाटांनां काव्यस्फूर्तीला बरेच चांगले विषय होते व उदार अंतःकरणाच्या राजामहाराजांकडून त्यांच्या श्रमाचें व प्रतिभेचें उत्कृष्ट चीजहि होई. त्यांच्या त्यावेळच्या उत्कृष्ट सफाईदार व राजस्तुतिपर पोवाड्यांतून हिंदुमुसुलमानांमधील विलक्षण तेढ व तत्कालीन परिस्थितींतील अनुरूप वीरांचे शौर्यदाक्षिण्यादि गुण एकदम श्रोत्यांच्या डोळ्यांपुढें उभे राहतात. अशा भाटांचा नायक व त्या काळच्या हिंदी वाङ्मयाचा अलंकार म्हणजे पृथ्वीराजाच्या पदरचा चंदभाट होय. चंदाचा समकालीन जगनायक व १४ व्या शतकांतील शारंगधर हेहि प्रसिद्ध हिंदी भाट कवी होते.

या शाहिरी वाङ्मयानंतर १५ व्या शतकाच्या आरंभीं रामोपासनावाङ्मय आलें व त्यानें सर्व देशी वाङ्मयांनां बरीच चालना दिली. याच रामवाङ्मयाला कबीरानें निरीश्वरी भक्तीचें वळण दिलें. या काळापासून वाङ्मयावर निरनिराळ्या धार्मिक मतांचा पगडा बसूं लागून निरनिराळें संप्रदायी वाङ्मय तयार होऊं लागलें. नामदेव, कबीर, विद्यापति, मिराबाई आणि मलिक महमद हे या काळांतील मोठे कवी होत. पहिल्या काळांतील शाहिरी वाङ्मयभाषेपेक्षां या दुसऱ्या काळांतील भाषा आज लोकांनां जास्त समजण्यासारखी आहे. या दुसऱ्या कालास हिंदी वाङ्मयाचें तारुण्ययुग म्हणतां येईल.

हिंदी वाङ्मयाच्या सुवर्णयुगाला सुमारें १५५०पासून सुरुवात होते. अकबर, जहांगीर यांनीं केवळ राज्याचा विस्तार करूनच सुराज्य स्थापिलें असें नव्हे तर त्यांनीं देशी वाङ्मयांनांहि चांगलें उत्तेजन दिलें. हिंदी वाङ्मयाचा सुवर्णकाल यांच्या अमदानींतला असून तो आंग्ल वाङ्मयांतील एलिझाबेथ सुवर्णकालाशीं जुळतो. या काळांत हिंदी वाङ्मयाचें कला म्हणून संवर्धन होऊं लागलें व त्याची ठाकठिकी करून तें सुंदर व कलायुक्त करण्याकडे लेखकांची प्रवृत्ति असे. केशवदासादींनीं काव्यकलेला व्यवस्थित स्वरूप देण्याचा प्रथमच प्रयत्न केलेला आढळतो. तुलसीदास, सूरदास, बिहारीलाल, त्रिपाठीबंधू, देवकवि व सेनापति हीं हिंदी वाङ्मयाच्या या युगांतील रत्नें होत. मोंगल सत्तेच्या ऱ्हासाबरोबरच या वाङ्मयांतील उत्कृष्ट गुणांचा ऱ्हास होत जाऊन पहिल्या दर्जाचे ग्रंथकार दुर्मिळ होऊं लागले.

एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापासून हिंदी वाङ्मयावर यूरोपियन संस्कृतीचा पगडा बसूं लागला. इंग्रजी

अंमल हिंदुस्थानांत जिकडे तिकडे होऊन पाश्चात्य वाङ्मय संस्कृति-सुधारणा यांचा लोकांच्या मनावर फार परिणाम झाला. देशी वाङ्मयाला नवीन चालना मिळाली व नवीन वाङ्मययुग सुरू झालें. हें वाङ्मय-पुनरुज्जीवनाचें युग अद्याप चालू आहे. या युगाच्या आरंभीं अर्वाचीन हिंदी गद्याचा पाया लल्लुजीलालनें घातला व त्याकरितां नवीन वाङ्मयीन भाषा निर्माण केली. छापखाने सुरू होऊन त्यांनीं वाङ्मयाचा सररहा प्रसार चालविला. हरिश्चंद्रानें हिंदी काव्याचा जीर्णोद्धार केला. याच काळांत हिंदी नाट्याचाहि उदय झाला.

हिंदी भाषा, उगमः—यूरोप आणि दक्षिण आणि पश्चिम आशियांतील बराचसा भाग या ठिकाणीं प्रचलित असणाऱ्या इंडो-यूरोपियन भाषासमूहाची एक शाखा म्हणजे इंडो-आर्यन् भाषा होय. यूरोप आणि आशिया यांच्या सरहद्दीवरील भूप्रदेशावर रहाणारे लोक मूळ भाषा बोलत असत. या लोकांपैकीं आर्यन् नांवाचा एक मोठा वर्ग पूर्व दिशेनें ऑक्ससंसकडे सरकत सरकत आला; पण पुढें सरकतां सरकतां त्याच्यामध्यें दोन पोटवर्ग पडून त्या दोन वर्गांच्या भाषाहि निरनिराळ्या झाल्या. यापैकीं एका वर्गाच्या भाषेपासून पुढें मेदिक, पह्लवी, फारसी, इत्यादि 'इराणी' या सामान्यवाचक नांवानें संबोधिल्या जाणाऱ्या भाषा निघाल्या. दुसरा वर्ग काबूलच्या दऱ्याखोऱ्यांतून उत्तरहिंदुस्थानांत आला. या वर्गाला उत्तरहिंदुस्थानामध्यें येण्याला बराच काळ लागला. येथें जे लोक आले त्यांनां इंडो-आर्यन् असें नांव मिळालें. इंडो-आर्यन् भाषा ही प्राचीनकाळापासूनच वाङ्मयभाषा बनली व या भाषेस संस्कृत भाषा म्हणूं लागले. ही जी वाङ्मयभाषा ती स्थिर झाली परंतु व्यवहारांत बोलली जाणारी जी प्राकृत भाषा ती हळूहळू बदलत चालली. निरनिराळ्या टापूंतील भाषांमध्येंच परस्परांत थोडा फार फरक पडूं लागला. या काळामध्यें प्राकृत भाषेमधील कांहीं प्रकार (उदाहरणार्थ पाली) हे वाङ्मयाच्या योग्य झाले. हल्लींच्या इंडो-आर्यन् भाषांच्या वाढीपूर्वीच्या प्राकृत भाषेच्या शेवटल्या स्थितींत या प्राकृत भाषा अपभ्रंश या नांवानें संबोधिल्या जात असत व या अपभ्रंश भाषांपासूनच पुढें हिंदी, पंजाबी, मराठी या भाषा उदयास आल्या व या उदयास येण्याचा काल स्थूलमानानें (१००० वर्ष) म्हणजे दहावें अगर अकरावें शतक होय.

विस्तारः—यानंतर आपणाला 'हिंदी' या शब्दाचा अर्थ नीटपणें ठरविला पाहिजे. कारण पुष्कळ वेळां याचा अर्थ निरानिराळ्या तऱ्हेनें केला जातो. उदाहरणार्थ, कांहीं वेळां पश्चिमेला पंजाब आणि सिंध, व पूर्वेला बंगाल यामधील टापूला 'हिंदी' हा शब्द उपयोजिला जातो. कांहीं वेळां हिंदी या पदानें विदग्ध हिंदीचा निर्देश केला जातो. या वरील टापूला कोणी हिंदुस्थान असें म्हणतात; सर जॉर्ज ग्रियरसनप्रभृति विद्वानांनीं परिश्रमान्तीं असें ठरविलें आहे कीं या टापूंत, राजस्तानी, पूर्वहिंदी, पश्चिम हिंदी आणि बिहारी या चार प्रमुख भाषा प्रचलित असून त्यांचा उगमहि स्वतंत्र आहे. याठिकाणीं खरोखर जेवढ्या टापूला हिंदुस्थान अशी संज्ञा देतां येईल तेवढ्याच भागांतील वाङ्मयाच्या इतिहासाचा येथें उल्लेख करण्यांत येणार आहे. गंगायमुनांच्या खोऱ्यापासून तों पूर्वेकडेस कोशी नदीपर्यंत, राजपुताना, मध्यहिंदुस्थान आणि नर्मदेच्या दऱ्यांपासून तों पश्चिमेकडे खांडवा व मध्यप्रांताच्या उत्तरभागापर्यंतचा टापू हिंदुस्थान या नांवांत घेतलेला आहे. जरी पंजाबमध्यें हिंदुस्थानी भाषा बोलतात तरी तो देश अगर खालचा बंगाल यांत समाविष्ट केलेला नाहीं.

या टापूमध्यें अनेक भाषा प्रचलित आहेत. नागरिक लोक बहुधा ऊर्दू भाषा वापरतात. पण सर्वसाधारण लोक अनेक प्रकारच्या हिंदी भाषा वापरतात. यांतील शब्द बहुतेक प्राकृत आणि संस्कृत भाषेपासून आलेले आहेत व ह्या भाषा देवनागरी अगर कैथी लिपींत लिहिल्या जातात. यांपैकीं प्रमुख भाषा म्हणजे मारवाडी, जयपुरी, व्रजभाषा, कनोजी, अवधी, बैखारी आणि बिहारी होत. ज्याला आपण विदग्ध हिंदी म्हणतों ती वाङ्मयाच्याच उपयोगी आहे. दिल्लीच्या आसपास व उत्तरेस हिमालयापर्यंत वापरल्या जाणाऱ्या भाषेचा पाया असणाऱ्या पश्चिम हिंदी भाषेचेंच विदग्ध हिंदी हें विकसन आहे.

इतर प्राचीन वाङ्मयाप्रमाणेंच प्राचीन हिंदुस्थानी वाङ्मय हें बहुतेक पद्यांतच आहे, व गद्य वाङ्मय हें अगदीं अलीकडील आहे. संस्कृत व फारशी भाषांबरोबर स्पर्धा करणाऱ्या दोन भाषा म्हणजे अनुक्रमें हिंदी व ऊर्दू या होत. पण या दोहोंमध्यें अंतर हें कीं हिंदी भाषेनें ब्राह्मणांचीच होऊन बसलेल्या संस्कृत भाषेला प्रतिकार करण्याच्या निमित्तानें, आपली उन्नति साधून घेतली तर ऊर्दू भाषेनें आपली आई जी फारसी भाषा तिच्याशीं गोडीगुलाबीनें वागूनच आपला शिरकाव

करून घेतला. संस्कृत व फारशी भाषा हल्लीं फक्त लेखनाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत. हल्लीं त्यांचा व्यवहारांत कांहींच उपयोग होत नाहीं.

या विषयाचे चार भाग पाडतां येतील ते खालीलप्रमाणें:--(१) वैष्णव आचार्यांनीं अगर राजपुतान्यांतील प्राचीन भाटांनीं उपयोगांत आणलेली व प्राकृत भाषांतील शब्दांच्या योगानें बनलेली अशी जुन्या काळची हिंदी भाषा (सन ११००--१५५०).(२) हिंदी काव्याच्या ऐन उत्कर्षाच्या कालची मध्ययुगीन हिंदी (१५५० ते अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत). (३) वाङ्मयोपयोगी ऊर्दू भाषेचा उदय व वाढ (सोळाव्या शतकाच्या अखेरपासून तो अठराव्या शतकांतील उत्कर्षकालापर्यंत). व (४) १९ व्या शतकाच्या आरंभापासून दोन्ही भाषांतील गद्य वाङ्मयाच्या उत्कर्षाचा अर्वाचीन काल.

प्रा ची न हिं दी --राजपुतान्यांतील प्राचीन ऐतिहासिक काव्याची खात्रीलायक माहिती उपलब्ध नाहीं व जी अपूर्ण माहिती उपलब्ध आहे ती टॉडच्या 'राजस्तानच्या गोष्टी' या प्रमाणग्रंथावरून घेतलेली आहे काव्यांचें स्वरूपच अशा प्रकारचें असतें कीं त्यांत नेहमीं फेरफार होत असतो व भर पडत जाते. हीं काव्यें त्या त्या घराण्यांतील भाटांकडून वेळोवेळीं रचलीं गेलीं असतात. एका गोष्टीभोंवतीं कालांतरानें अनेक काल्पनिक गोष्टींचा जमाव जमतो. ह्या सर्व गोष्टींची संगति पुढील एखादा भाट लावण्याचा प्रयत्न करतो; ती संगति व्हावी तितकी खात्रीलायक होत नाहीं. यांत ऐतिहासिक सत्यतेपेक्षां काव्यकल्पनांचीच अधिक रेलचेल असते.

चंद कवि--सर्वांत प्राचीन उपलब्ध हिंदी काव्यग्रंथ पृथ्वीराजाच्या पदरीं असलेल्या चंद भाटाचा होय. या ग्रंथाचें नांव 'पृथ्वीराज रासो' हें असून त्याच्या ६९ सर्गांमध्यें त्यावेळची सर्व हकीकत दिलेली आहे. ह्यापैकीं कांहीं भाग बंगाल एशियाटिक सोसायटीनें छापलेला आहे. चंद हा लाहोरचा रहाणारा होता. चंद्राच्या वेळीं तेथें मुसलमानी अंमल असल्याकारणानें, त्याच्या काव्यांत फारशी शब्दांचा भरणा बराच दिसून येतो. आज ज्या स्थितींत ग्रंथ उपलब्ध आहे ती स्थिति मूळची नसून १७ व्या शतकाच्या सुरवातीस मेवाडच्या अमरसिंहानें त्यांत बराच फेरफार केलेला आहे. यामुळें त्यांत वर्णन केलेल्या गोष्टींबद्दल संशय वाटतो. कविराज शामळदास यानें म्हटल्याप्रमाणें या ग्रंथांतील प्रत्येक तारखेंत ९० वर्षांची चूक आढळून येते. या ग्रंथांत वारंवार पृथ्वीराज व महंमद घोरी यांच्यामधील युद्धांचीं वर्णनें आलीं असून त्यांत शेवटच्या लढाईखेरीज बाकी सर्व लढायांत महंमद घोरीचा पराजय होतो, त्याला पकडण्यांत येतें व नंतर खंडणी घेऊन सोडण्यांत येतें असें लिहिलेलें आहे. अर्थात पर्शियन इतिहासकारांच्या माहितीशीं ताडून पाहतां या गोष्टींत ऐतिहासिक सत्यता नाहीं असें दिसून येतें. कारण वास्तविक महंमद घोरीचा एकदांच पराजय झालेला असून तो न सांपडतांच पळून गेला आहे. मोंगलांनीं हिंदुस्थानांत पाऊल ठेवण्याच्या अगोदर तीस वर्षें त्यांनां हिंदुस्थानांत आणून पृथ्वीराजानें त्यांचा पराजय केला, असें यांत लिहिलेलें आहे. तथापि जरी ऐतिहासिक गोष्टींचा यांत बराच अभाव असला तरी त्याचें काव्य हें शुद्ध, अपभ्रंश, शौरसेनी आणि प्राकृत शब्दांनीं पूर्ण अशा गौडीवाङ्मयाचा प्राचीन मासला आहे असें म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. यांतील भाषा हल्लीं प्रचारांत नसल्यानें अर्थ समजण्यास कठिण वाटतो. पण भाषा फार उमदी व वीररसपूर्ण आहे.

चंदसंप्रदाय:--चंद कवि हा त्याच्यानंतर त्याचें अनुकरण करणारी जी लांबच्यालांब कविमालिका झाली तिचा प्रतिनिधि आहे असें म्हणावयास हरकत नाहीं; या कवींनीं केलेलीं अनेक काव्यें फार लोकप्रिय आहेत. त्यापैकीं सर्वांत प्रसिद्ध असें काव्य म्हणजे अल्हाखंड होय. हें चंदाचा समकालीन असणारा बुंदेलखंडांतील महोबाचा जाग्निक (जगनायक) यानें परमाल राजाच्या कृत्याचें वर्णन करण्यासाठीं लिहिलेलें आहे. या काव्यांतील नायक अल्हा आणि उदल असून त्या पौराणिक व्यक्ती आहेत. काव्याच्या दोन प्रती अशिक्षित भाटांच्या म्हणण्यावरून तयार झालेल्या आहेत. यानंतर तिसरा प्रसिद्ध भाट म्हणजे रतनभोरचा शारंगधर होय. यानें १३६३ मध्यें रतनभोरचा चव्हाणाधिपति हम्मीरदेव याच्या पराक्रमाच्या वर्णनपर काव्य केलें आहे. त्यानें संस्कृतमध्येंहि 'शार्ङधरपद्धति' नांवाचा काव्यग्रंथ लिहिला आहे. यानंतर लालकवि ह्यानें 'छत्रप्रकाश' हा ग्रंथ लिहिला. यांत बुंदेलखंडाचा इतिहास असून याचें १८२८ मध्यें पॉग्सननें केलेलें भाषांतर कलकत्ता येथें छापलेलें आहे.

प्राचीन हिंदी भाषेच्या महत्त्वाच्या अंगाकडे वळण्यापूर्वी आणखी एका महत्त्वाच्या ग्रंथाचा उल्लेख करणें जरूर आहे. व तो म्हणजे 'पद्मावली' ग्रंथ होय. हा ग्रंथ

एखाद्या हिंदु भाटानें लिहिलेला नसून अयोध्येचा मलीक महंमद जायसी नांवाच्या मुसलमान साधूनें स.१५४०त लिहिला आहे. या साधूचा व अमेथीचा हिंदु राजा याचा फार स्नेह होता. हा ग्रंथ १८४० सालीं प्रसिद्ध झाला. काव्य अवधी भाषेंत असून फारशी लिपींत लिहिलें आहे. यामध्यें मेवाडमधील चितोडच्या रतनसेन चव्हाण राजाची सुप्रसिद्ध बायको पद्मिनी हिची गोष्ट दिलेली आहे. इतिहासांत पद्मिनीचा नवरा भीमदेव असून मलिकमहंमद यानें त्याला रतनदेव असें नांव दिलें आहे. याबद्दलची सर्व हकीकत सुप्रसिद्धच आहे. पण मलिकमहंमदानें ही गोष्ट रूपक म्हणून सांगितली असून त्यांतील पात्रांच्या मागें, आत्मा (रतनसेन), बुद्धि(पद्मिनी), माया (अल्लाउद्दीन) इत्यादिकांचें अधिष्ठान आहे असें म्हटलें आहे. हा ग्रंथ फार महत्त्वाचा असून त्याचें भाषांतर संस्कृतमध्येंहि झालेलें आहे. या ग्रंथाची भाष्य व टीपा यांसहित प्रत डॉ. ग्रियरसन व पंडित सुधाकर द्विवेदी यांनीं तयार केली असून त्याचें भाषांतरहि बिब्ली. इंडिकांत प्रसिद्ध केलें आहे.( न्यू सीरिज, नं. ८७७, पु. १. १५, १६ ).

वर महत्त्वाचें अंग म्हणून ज्याचा नुकताच उल्लेख केला तें अंग म्हणजे भागवत (भक्तियुक्त) वाङ्मय हें होय. या वाङ्मयानें केलेल्या भक्तिमार्गाच्या प्रसाराबद्दल फार प्रासिद्धि आहे. याचा त्या काळावर व भाषेवर फार मोठा परिणाम घडून आला यांत शंका नाहीं. वाङ्मयदृष्ट्या देखील याचें स्वरूप व विषय फार महत्त्वाचा आहे. यानंतर झालेल्या सर्व हिंदी वाङ्मयावर या वैष्णव तत्त्वांपैकीं कोणत्या तरी तत्त्वाचें प्रतिबिंब उमटलेलें दिसून येतें. हें वैष्णवतत्त्व अगर भक्तिमार्ग हा मूळ ब्राह्मणांच्या सत्तेचा मोड करण्यासाठींच अस्तित्वांत आला होता. या वैष्णव ग्रंथकारांपैकीं पुष्कळ ग्रंथकार ब्राह्मणेतर व हीन जातीचे देखील होते. वैष्णव वाङ्मय मुख्यतः हिंदी भाषेमध्येंच आहे.

ह्या वैष्णव तत्त्वाचा उगम रामानुजापासून झाला असें मानण्यांत येतें. रामानुज ११ व्या शतकाच्या अखेरीस उदयास आला. त्यानें वेदांतसूत्रावर व इतर विषयांवर लिहिलेले ग्रंथ संस्कृतमध्यें असून, त्या ग्रंथांत मुख्य तत्त्व असें आहे कीं, परमेश्वर हा सगुण व सर्व चांगल्या गुणांची मूर्ति आहे व त्याची भक्ति केली असतां कितीहि पापी मनुष्य असला तरी तो उद्धरून जातो. परमेश्वर अत्यंत दयामय असल्यामुळें तो नेहमीं अवतार धारण करीत असतो; व या अवतारांत देखील राम व कृष्ण हे अवतार अतिशय महत्त्वाचे असून त्याचें आपण पूजन केलें पाहिजे. विशेषतः रामानुजानें समभक्तीचें महत्त्व फार वाढविलें. रामानुजाचे भक्त बहुतेक सर्व ब्राह्मणच होते.

रामानुजानें जरी रामभक्तीचें महत्त्व वाढविलें तरी तो कृष्णाचीहि उपासना करीत असे. व या कृष्णाबरोबरच रुक्मिणीला तो आदिशक्ति मानीत असे. परंतु त्याच्या नंतरचे ग्रंथकार राधेला फार मान देतात. हे राधा--कृष्ण भक्तीचे प्रकार विशेषतः रामानुजानंतर अधिक उदयास आले. पण जयदेवाच्या वेळेपासून (१२५०) 'कृष्ण व राधा' हा विषय पूर्ण रीतीनें प्रस्थापित झाला होता व यामध्यें 'जीवाची ब्रह्म होण्याची धडपड' हें तत्त्व प्रमुख आहे असें सांगितलें जात होतें व त्यामुळें वरील राम व कृष्ण या दोन प्रकारांत अधिकाधिकच भिन्नता होऊं लागली होती.

रामचरित्राची शिकवण कौटुंबिक पद्धतीवर उभारलेली असून परमेश्वराचा व भक्ताचा संबंध हा पितापुत्रसंबंध आहे असें त्यांत दर्शविलें आहे. कृष्णावतारांत भूतदयेचा भाग फार कमी दिसत असून थिल्लरपणा व कामुकता फार आहे. त्यांतील भक्तीहि जवळजवळ विषयविकारापर्यंत पोंहोंचते. या भक्तितत्त्वाचे पुरस्कर्ते फार शुद्ध व अलौकिक पुरुष होते; पण पुढें या तत्त्वाचा फार दुरुपयोग केला गेला असें आढळून येईल.

कृष्णाचीं बालपणांतील कृत्यें, विशेषतः बायकांनां फार प्रिय असल्यामुळें कृष्ण ज्या ठिकाणीं बालपणीं राहिला तेथें म्हणजे व्रजांच्या राजधानीच्या--मथुरेच्या-आसपास कृष्णभक्ति फार प्रचलित आहे; व त्यांतील वाङ्मय व्रजभाषेमध्यें आहे. रामवाङ्मय जरी सर्वत्र प्रचलित असलें तरी तुलसीदासानंतर अवधी अगर बैश्वरी भाषेमध्यें तें फार प्रसृत झालें. अशा रीतीनें या दोन भाषा, काव्यभाषा होऊन बसल्या.

रामानुजानंतर १२५० च्या सुमारास, बंगालमधील बीरभूम तालुक्यांत झालेल्या 'गीतगोविंद' (कर्त्यानें जयदेवानें) व महाराष्ट्रांतील नामा शिंप्यानें याचा प्रसार केला. यांच्या कविता शिखांच्या आदिग्रंथांतहि घेतलेल्या आहेत पण १५ व्या शतकामध्यें रामानंद नांवाच्या रामानुजपंथी साधूनें, कांहीं भांडण झाल्यामुळें, उत्तरहिंदुस्थानांत येऊन वैष्णव तत्त्वाचा ब्राह्मणेतर वर्गात खरा प्रसार केला. त्याच्या बारा शिष्यांमध्यें एक रजपूत,

एक जाट, एक चांभार, एक न्हावी, व एक मुसुलमान होता. मुसलमान शिष्य म्हणजे कबीर हा होय. रामानंदानें केलली एक छोटी कविता आदिग्रंथामध्यें आढळून येते. डॉ. ग्रियरसननें मिथिलेंत प्रचलित असलेलीं त्याचीं अनेक भजनें गोळा केलीं आहेत. रामानंद व कबीर हे दोघेहि रामोपासक होते. रामानंदाचा समकालीन कवि विद्यापति ठाकूर यानें विहारमधील मिथिली भाषेंत अनेक वीणाकाव्यें केलीं असून, कृष्णभक्तीचा प्रसार केल्याबद्दल त्याची फार प्रसिद्धि आहे. या विद्यापतीलाच, सर्व बंगाली वैष्णव वाङ्मयाचा जनक मानतात. पण या वैष्णव तत्त्वाचा चैतन्यानें फार प्रसार केला व त्या नंतर मिराबाईनें केला. मिराबाईचीं अनेक पद्यें उत्तरहिंदुस्थानांत फार प्रसिद्ध आहेत. प्राचीन वैष्णव भक्तांचीं काव्यें शिखांच्या आदिग्रंथांत आढळून येतात. पण हा ग्रंथ गुरुमुखी भाषेंत असल्यामुळें त्याचा आपणांस सध्या विचार कर्तव्य नाहीं.

म ध्य यु गी न हिं दी.—मध्ययुगीन हिंदी वाङ्मयाचा आरंभ अकबराच्या कारकीर्दीपासून होतो. अकबराचें सर्व बाबतींतील धोरण उदार असल्यामुळें व त्याच्या अमदानींत हिंदुस्थानांत शांतता असल्यामुळें, वाङ्मयाचा बराच उत्कर्ष झाल्यास नवल नाहीं. अकबराच्या दरबारी कविमंडळच होतें. प्रख्यात गवई तानसेन, याच्या कविता अद्यापि लोक म्हणतात. अकबराचा प्रधान बिरबल हा गवई, कवि आणि राजकारणी पुरुष होता; व त्याला कविराज ही पदवी मिळाली होती. त्याची फुटकळ कविता व गाणीं फार लोकप्रिय आहेत. यांशिवाय दुसरे कवी म्हणजे, खानखानान, अबदुररहिम, आणि फैजी हे होत.

यावेळीं वल्लभाचार्यानें राधावल्लभ( कृष्ण )भक्ति या पंथाची स्थापना केली होती. वल्लभाचें लेखन मुख्यत: संस्कृतमध्यें चालत असे. पण त्याच्या व त्याचा मुलगा विठ्ठलनाथ याच्या शिष्यसमुदायांत पुष्कळ जाडे हिंदी कवी होऊन गेले. वल्लभाचार्यांचे चार व विठ्ठलनाथाचे चार शिष्य मिळून आठ कवी १५५०–७० च्या दरम्यान उदयास आले व ते 'अष्टछाप' या नांवानें प्रसिद्ध आहेत. त्यांचा व्रजभाषेवर मोठा अधिकार दिसून येतो. यांचीं नांवें कृष्णदास पे अहारी, सूरदास, परमानंददास, कुभानदास, चतुर्भुजदास, चित्रस्वामी, नंददास आणि गोविंददास होत. यांत सूरदास हा फार प्रसिद्ध होता. सूरदास हा चंदघराण्यांतील होता. तो आंधळा असून महा कृष्णभक्त होता. त्याचीं भजनें एकत्र केलीं असून त्यांना सूरसागर असें नांव आहे, व यांत ६००० गाणीं आहेत. व्रजभाषेंतील भक्तिकाव्यांची ही परमकोटी आहे असें मानण्यांत येतें. याशिवाय सूरदासानें भागवतपुराणाचें पद्यात्मक काव्य हिंदीमध्यें केलें आहे; व नलदमयन्ती काव्यहि केलें आहे.

पण तुलसीदास म्हणजे मध्ययुगाचा अलंकार आहे. यानें व सूरदासानें काव्यांच्या सर्व अंगांत कौशल्य दाखविलें आहे. हें वाङ्मयोत्कर्षाचें युग एलिझाबेथ कालीं असावें हें साधर्म्य आश्चर्यकारक नव्हे कां?

या दोन कविश्रेष्ठांनंतर तत्त्वज्ञान व साहित्यशास्त्रावर बरेंच वाङ्मय तयार झालें. काव्य कसें असावें, कोणत्या काव्यांत कोणता रस असावा वगैरेबद्दल नियम ठरूं लागले. या ग्रंथकारांपैकीं केशवदास ब्राह्मण हा प्रसिद्ध होता. हा अकबराच्या कारकीर्दीच्या शेवटीं उदयास आला. याचे ग्रंथ रसिकप्रिया, कविप्रिया, (ओरछाची प्रसिद्ध वेश्या परबीनराय पातुरि हिला अर्पण केलेली) रामचंद्रिका, विग्यानगीता, हे होत. साहित्यशास्त्राचा नमुनेदार, व अप्रतिम मासला विहारीलालाच्या 'सत्सई' या काव्यांत पहावयास सांपडतो.

राम आणि कृष्णविषयक भक्तिवाङ्मयाबरोबरच संतचरित्रविषयक वाङ्मयहि अस्तित्वांत येऊं लागलें. यामध्यें सर्वांत प्रसिद्ध वाङ्मय म्हणजे नारायणदासाची भक्त माला ही होय. नारायदासालाच नाभाजी असें म्हणतात. हा दाक्षिणेंत राहणारा डोंब होता. यानें तुळसीदासाला पाहिलें होतें. व हा स्वत: १७१० मध्यें उदयास आला. छप्पाई छंदांत त्याचें १०८ श्लोकी काव्य आहे; व प्रत्येक पद्यांत एका संताचें चरित्र आहे. याची भाषा कठीण आहे. हें काव्य बहुतेक १५८५–१६२३ मध्यें लिहिलें गेलें असावें. त्याच्यावर टीकात्मक काव्य, प्रियदासानें १७१३ मध्यें लिहिलेलें आहे. याच्यांत भर घालून लछमन नांवाच्या एका अर्वाचीन साधूनें भक्तसिंधु नांवाचा टीकाग्रंथ लिहिला. यावरून आपणाला संतांची माहिती मुख्यत्वेंकरून मिळते. या भक्तमालेच्या अगोदरचा 'चौरासी वार्ता' नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यांत फक्त वल्लभाचार्यांच्या अनुयायांचीं चरित्रें दिलीं आहेत. हा ग्रंथ १५५१ सालीं वल्लभाचार्यांचा नातु गोकुलनाथ यानें लिहिला असें म्हणतात.

अकबराच्या कारकीर्दीपासून शहाजहानच्या कारकीर्दीपर्यंतच्या अवधींत जे अनेक ग्रंथकार होऊन गेले

त्यांची नांवनिशी देणें कंटाळवाणें काम होईल. यांपैकीं कोणीहि सूरदार, बिहारीलाल अगर तुळसीदास यांच्या योग्यतेचे झाले नाहींत. त्यांच्या ग्रंथांत नाविन्य आढळून येत नाहीं. ग्रंथांची व ग्रंथकारांची यादी १८८९ सालच्या जर्नल ऑफ धी रॉयल एशियाटिक सोसायटीमध्यें छापलेली आहे. छत्रसाल व बांदाचे राजे हे कवींचे आश्रयदाते होते; व मोंगल लोक देखील अनेक कवी आपल्या दरबारीं ठेवीत असत.

अशा रीतीनें थोडक्यांत हिंदी वाङ्मयाची माहिती देतां येईल. लोकप्रियतेच्या व धर्माच्या पायावर हें वाङ्मय उभारलें आहे. हें पद्यमय आहे. यामध्यें निरनिराळे भाषावैचित्र्याचे मासले दिसून येतात व विविध मनोभावनांचेंहि प्रतिबिंब नजरेस येतें. याचा अभ्यास अधिक व्हावयास पाहिजे. ज्या थोड्या लोकांनीं या हिंदी वाङ्मयाचा अभ्यास केला आहे ते सर्व याला नंदन वनाची उपमा देतात. हें वाङ्मय अगदीं अज्ञान जातींत सुद्धां पसरलेलें आहे. रजपूत शौर्याच्या स्तुतिपर पोवाडे, कबीराचे दोहरे, तुलशीदासाचें रामायण, सूरदासाचीं भजनें हीं यात्रेकरू भक्तांमार्फत जिकडे तिकडे पसरलीं गेलीं व जात आहेत.

ऊर्दू वाङ्मय:—ऊर्दू वाङ्मय भाषा केव्हां अस्तित्वांत आली हें अनिश्चित आहे. १३९८ सालीं तैमूरच्या स्वारीमुळें ही भाषा हिंदुस्थानांत आली असें एक मत आहे. कांहींच्या मतें याच्या पूर्वी ही भाषा इकडे आली असावी. ११ व्या शतकाच्या अखेरीस मसूद यानें रेख्ता वृत्तांमध्यें दिवाण अथवा कवितासंग्रह प्रसिद्ध केला होता व १३ व्या शतकाच्या पूर्वार्धांत अमीर खुश्रु व शिराजच्या सादीनें कांहीं कविता केल्या होत्या. असे या विधानास आधार देतां येतील. परंतु हीं कारणें बरोबर नाहींत. मुसुलमानांच्या प्राचीन अंमलांत महंमदी ग्रंथकारांनीं हिंदी भाषेचाच उपयोग केला. हिंदी भाषेंत फारसी शब्दांचा भरणा दिसून येतो. व तो चंद व कबीर यांच्या काव्यांतहि दिसून येतो अशा रीतीनें या ऊर्दु भाषेचें वाङ्मयदृष्ट्या मूळ शोधून काढणें थोडें कठिण आहे.

भाषाशास्त्राच्या दृष्टीनें ऊर्दू भाषेमध्यें व हिंदी भाषेमध्यें तुसऱ्या प्रकारांत भिन्नता आहे. व्याकरण व पुष्कळसा शब्दसमूह सारखाच आहे. पण मुख्य भेद छंदांत दिसून येतो. कोणतेंहि एक हिंदी वृत्त ऊर्दु वृत्ताशीं जुळत नाहीं. हिंदी वृत्तांत मात्रापद्धति अनुसरली जाते पण ऊर्दूत ऱ्हस्व व दीर्घ अक्षरांवरून वृत्त बनतें.

तर मग प्रश्न असा आहे कीं, हिंदी वाङ्मय ऊर्दू वृत्तांतून केव्हां लिहिलें जाऊं लागलें? कारण ज्यावेळेस ऊर्दू वृत्तें प्रचारांत आलीं त्यावेळींच ऊर्दू काव्याला आरंभ झाला. अशा रीतीनें उर्दू वृत्तांत लिहिण्याची पद्धत १६ व्या शतकाच्या शेवटीं शेवटीं सुरू झाली असावी. एवढ्या अवधींत हिंदी भाषेंत पुष्कळसे ऊर्दू शब्द व म्हणी आलेल्या होत्या. अकबरानें संस्कृत ग्रंथांचें फारसींत भाषांतर करण्यास उत्तेजन दिल्यामुळें ह्या दोन्ही वाङ्मयांचा संपर्क होऊं लागला. मुसलमानांच्या राजधानीच्या आसपासच्या हिंदी भाषेवर फारसी भाषेचा परिणाम होऊं लागला आणि अकबराच्या दक्षिणेकडील विजयामुळें तिकडेहि मुसुलमानी राज्यें स्थापलीं जाऊन तेथील दरबारी भाषा फारशीच होऊं लागली.

ऊर्दू वाङ्मयाला उत्तेजन, मुसुलमानांच्या राजधानींतून मिळालें. हें वाङ्मय इराणांतील काव्यवाङ्मयाचें अनुकरण होतें. कासिडा अथवा स्तोत्र (ओड), गझल अथवा प्रणयगीत, मार्सिया अथवा शोकगीत, मसनवी अथवा ऐतिहासिक काव्य, हिजा अथवा औपरोधिक काव्य, रुबाई अथवा निंदाकाव्य, हे सर्व प्रकार इराणांतूनच घेतले. इराणी लोकांनीं, तेच तेच विषय पुन:पुन्हां घेतल्यामुळें त्यांच्या काव्यांत विषयवैचित्र्य दिसून येत नाहीं. यामुळें जातिवैचित्र्य, शब्दवैचित्र्य, भाषावैचित्र्य यांच्यावर काव्याची योग्यता ठरूं लागली. ऊर्दूची तशीच स्थिति झाली. अर्वाचीन ऊर्दू वाङ्मयांतच थोडें थोडें नावीन्य दिसून येतें. पण पूर्वीच्या ऊर्दू वाङ्मयांत प्रास, यमक, कल्पना याशिवाय दुसरें कांहींच दिसून येत नाहीं. कांहीं विद्वानांनीं ऊर्दू वाङ्मयाचे वर्ग पाडले आहेत पण ऊर्दू वाङ्मयांत वर्ग पाडण्याइतकें विषयवैचित्र्य दिसून येत नाहीं.

अमीर खुश्रु नंतरचा कवि म्हणजे शुजाउद्दिन न्यूरी हा होय. हा गुजराथचा रहाणारा होता. गोवळकोंड्याचा सुलतान अबुलहसन कुतुबशाहा याच्या मुलाचा हा गुरु होता. कुलीकुतुबशहा व त्याच्यानंतर गादीवर बसणारा अबदुल्ला कुतुबशहा यांनीं प्रणयकाव्यें, शोकगीतें इत्यादि बऱ्याच कविता केलेल्या आहेत. तसेंच अबदुल्ला कुतुबशहाच्या कारकीर्दींत इब्न निशाती यानें 'तुतीनाम' व 'फुलबन' नांवाचे दोन प्रसिद्ध काव्यग्रंथ लिहिले आहेत. यानें पहिलें काव्य १६३९ मध्यें लिहिलें. हें इराणी कवि नक्षाबी याच्या काव्याचें रूपांतर असून त्यांत

शुकसप्तति नावांच्या संस्कृत काव्यांतून बराचसा भाग उचलला आहे. या 'तुतीनाम' काव्यावरून त्याच्यांतील भाग घेऊन अनेक काव्यें झालेलीं आहेत. महमद हैदर बक्ष हैदरीनें १८०१ सालीं जो 'तोता कहानी' म्हणून एक उत्कृष्ट ग्रंथ लिहिला तो याच्यावरूनच होय. फुलबन हें पर्शियन 'बसातीन' या काव्याचें भाषांतर आहे. आणखी एक प्रसिद्ध काव्य याच वेळीं लिहिलें गेलें, तें म्हणजे तहसिनुद्दिनचें 'कामरूप आणि कला' हें होय. याचा लेखक मुसलमान असून यांतील पात्रें हिंदी आहेत हें यांत विशेष होय. कामरूप हा अयोध्येच्या राजाचा मुलगा आहे व कला ही सिलोनच्या राजाची मुलगी आहे. या काव्यांतील संविधानक 'एक हजार एक रात्री' (अरेबियन नाइट) यामधील संविधानकाप्रमाणेंच आहे. अनेक धाडसानंतर शेवटीं नायक-नायिकेचें लग्न होतें.

विजापुरचा दरबार देखील कवींबद्दल प्रसिद्ध होता. इब्राहीम आदिलशहानें (१५७९–१६२६) संगीतावर 'नवर' या नांवाचा काव्यग्रंथ हिंदींत लिहिला व या ग्रंथाच्या तीन प्रस्तावना मौला झुहूरीनें ऊर्दूंत भाषांतरिल्या असून त्या भाषेबद्दल फार प्रसिद्ध आहेत. यानंतर अल्ली आदिलशहाच्या पदरीं नस्रती नांवाच्या एका ब्राह्मणानें 'गुलशन् इ–इश्क' नांवाचें एक अद्भुत काव्य लिहिलें. यानेंच 'अलिनामा' नांवाचें त्या वेळच्या बादशहाच्या स्तुतिपर असें मोठें ऐतिहासिक काव्य लिहिलें.

या वरील कवींनीं ही काव्याची चळवळ सुरू केली. पण काव्याला निश्चित स्वरूप देण्याचें काम औरंगाबादचा वली व त्याचा समकालीन आणि त्याच गांवांत रहाणारा सिराज यांनीं केलें. वलीला 'बाबा–इ–रेख्ता' म्हणजे रेख्ताचा जनक असें म्हणतात व त्याच्याच प्रयत्नमुळें व उत्तेजनामुळें १८ व्या शतकांतील ऊर्दू वाङ्मयाची वाढ झाली याबद्दल सर्वांचें ऐकमत्य आहे. याचें चरित्र फारसें उपलब्ध नाहीं. औरंगझेबाच्या कारकीर्दीच्या शेवटीं हा दिल्लीस गेला असावा असें दिसतें व शहागुलशानपासून त्याला काव्याचें ज्ञान मिळालें होतें असें म्हणतात. याचे समग्र ग्रंथ गार्सिन डी टासीनें भाषांतरिलेले आहेत.

दिल्ली येथें झालेल्या कविमालेंतील पहिला कवि झुहुरुद्दिन हातीम(१६९९–१७९२)हा होय. महमदशहाच्या कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षांत वलीचें 'दिवाण' दिल्लींत मिळूं लागलें व तेथें मोठी खळबळ उडून गेली. त्याचें उत्तरेकडे ऊर्दू भाषेंत अनुकरण करणारा पहिला कवि हातीम हा होय, व त्याचेंच पुढें नाझी महमूद व अब्रू यांनीं अनुकरण केलें. हातीमनें केलेले दोन दिवाण उपलब्ध आहेत. त्यानें आपली एक शाखाच स्थापिली व त्याचा एक शिष्य रफियस सौदा हा उत्तर हिंदुस्थानचा प्रसिद्ध कवि होऊन गेला. खान अर्झु(१६८९–१७५६) हा उत्तरेकडील ऊर्दू वाङ्मयाच्या जनकांपैकीं एक मानला गेला. याचा फारसी भाषेचा व्यासंग दाडगा असून त्यानें फारसी शब्दकोश तयार केला. पण त्याचीं ऊर्दू काव्येंहि बरींच प्रसिद्ध आहेत. सौदाच्या खालोखाल अतिशय प्रख्यात असणाऱ्या कवींचा हा गुरु होता. अर्झु हा लखनौ येथें नादिरशहाच्या जाळपोळीनंतर राहिला असतां वारला. दुसरा प्रख्यात कवि म्हणजे इन आम उल्लाखान हा होय. हा२९वर्षांचा असतांनाच मेला. तसेच शहागुलशानचा शिष्य मीर दार्द हाहि प्रसिद्ध होऊन गेला. याचे दिवाण फार मोठाले लांब नसले तरी लोकप्रिय आहेत. म्हातारपणीं हा दरवेशी झाला होता. १७९३ सालीं हा मेला.

सौदा आणि मीरताकी हे सर्वांत मोठे कवी होऊन गेले. सौदा हा अठराव्या शतकाच्या आरंभीं जन्मला. यानें हातीमच्या देखरेखीखालीं अभ्यास केला. दिल्लीची जाळपोळ झाल्यानंतर त्यानें दिल्ली सोडली व तो लखनौ येथें आला; व तेथें नबाब असफउद्दवला यानें त्याला ६००० रुपयांची वार्षिक जहागीर करून दिली. येथेंच तो १६८० त मेला. त्यानें अनेक कविता केल्या असून त्यांत ऊर्दु भाषेचे सर्व प्रकार आले आहेत. तरी पण त्यांतल्यात्यांत औपरोधिक काव्याबद्दल त्याची फार प्रसिद्धि आहे. मीरताकी हा आग्रा येथें जन्मला आणि नंतर दिल्ली येथें अर्झूच्याजवळ त्यानें अभ्यास केला. १७८२ मध्यें तो लखनौ येथें आला; व त्याला देखील सौदाप्रमाणेंच पेन्शन मिळत असे. त्यानें प्रचंड ग्रंथ लिहिले. त्याचे सहा दिवाण आहेत. प्रणयगीतांत व ऐतिहासिक काव्यामध्यें मीर यास सौदापेक्षां श्रेष्ठ मानतात. अर्वाचीन प्रसिद्ध लेखक सय्यद अहमद यानें मीरविषयीं असे उद्गार काढले आहेत कीं "मीरची भाषा इतकी शुद्ध आहे आणि मीरचे शब्दप्रयोग इतके मार्मिक व उचित आहेत कीं सर्वत्रांनीं त्याची एकमुखानें स्तुति केली आहे. मीर हा इतर बाबतींत सौदापेक्षां थोडा कमी असला तरी भाषापद्धतींत तो फार श्रेष्ठ आहे."

नादीरशहानें (१७३९), अहमदशहा दुराणीनें (१७५६) आणि मराठ्यांनीं (१७५९) दिल्लीवर जीं

विलक्षण संकटें आणलीं त्या संकटांमुळें दिल्ली हें वाङ्मयाचें केंद्र न राहतां लखनौ हें वाङ्मयाचें केंद्र बनलें. अझ्र्, सौदा आणि मीर यांसारखे कविवर्य तेथें येऊन राहिले हें वर सांगितलेंच आहे. त्यांच्या इतकेच प्रसिद्ध कवी तेथें त्यांनां मिळाले. मीरहसन, मीरसाझ आणि कालंदर बक्ष जुरत कवी हेहि प्रथम दिल्लीहूनच इकडे आले होते. मीरहसन हा मीरदर्दचा मित्र होता. तो प्रथम फैजाबाद येथें राहिला व नंतर लखनौस आला. ह्याला सौदाच्या व मीरच्या खालोखाल मान देतात. 'सिन्हुल बयान' नांवाची त्यानें जी अद्भूत आणि प्रणयकविता लिहिली आहे त्यामुळें तो फार प्रसिद्ध आहे. तसेंच त्याचीं दुसरी एक कविता 'गुलझार-इ-इराम' हीहि फार प्रसिद्ध आहे. मीरमहंमद सॉझ हा रेख्ता वृत्तांत सुंदर काव्यें केल्याबद्दल फार प्रसिद्ध होता. तो पुढें दरवेशी झाला. जूरात हाहि पुष्कळ कवितांचा कर्ता होता. पण सौदाप्रमाणेच तो थोडासा अश्लील व कोट्या करणारा कवि होता. औरोधिकपणामध्यें त्यानें सौदाचें अनुकरण केलें होतें. हिंदी भाषेचाहि त्यानें अभ्यास केला होता. त्यानें दोहरे व कांहीं कविता केल्या आहेत. मस्किन हा शोकगीतांबद्दल फार प्रसिद्ध आहे. एक मुसलमान व त्याचे दोन मुलगे यांच्या मृत्यूवर त्यानें लिहिलेलें शोक गीत फार प्रसिद्ध आहे. लखनौ येथील कवींची शाखा १८५६ पर्यंत म्हणजे वझीदअल्ली हा शेवटचा राजा पदच्युत होईतों भरभराट पावत होती. प्रणयगीतें लिहिण्यांत अर्वाचीन ऊर्दू कवि अताश आणि नाशिख हे फार प्रसिद्ध होते. मीरहसनचा नातू मीरअनीस आणि त्याचाच समकालीन असणारा डबीर हे शोकगीतांबद्दल फार प्रसिद्ध आहेत. रजब अली बेग सुरूर (मृ. १८६८) हा 'फिसाना ए अजाइब' हें गद्यकाव्य लिहिल्याबद्दल फार प्रसिद्ध आहे. पदच्युत झालेला वजीरअल्ली हा स्वतः कवि होता. त्यानें तीन दिवाण प्रसिद्ध केले व त्यांतील पुष्कळ कविता अयोध्येच्या खेडवळ भाषेंत आहेत.

अशा रीतीनें सुप्रसिद्ध कवींनीं जरी दिल्ली सोडली होती तरी तेथें अगदींच काव्यें हांत नव्हतीं असें नाहीं. शेवटच्या मोगल राजांमध्यें कित्येक राजे स्वतःच कवी होते. शहाअलम यानें 'आफताब' या टोपण नांवाखालीं आपली कविता लिहिली. 'मनझूम-इ-अकदास' हें अद्भूत काव्य व दिवाण लिहिल्याबद्दल तो प्रसिद्ध आहे. त्याचा मुलगा सुलैमान शुको हा इतर कवींप्रमाणें लखनौ येथें गेला होता. पण १८१५ सालीं तो परत दिल्ली येथें आला. त्यानेंहि एक दिवाण लिहिलें आहे. तसेंच बहादुरशहानें 'झाफर' या नांवाखालीं पुष्कळ कविता केल्या तो कवितेमध्यें शेख इब्राहीम झक या प्रसिद्ध लेखकाचा शिष्य होता. यानें पुष्कळ कविता लिहिलेल्या आहेत. नवीन स्थापित झालेल्या पंथाचा मशफी हा आद्य चालक होता. हा मूळचा लखनौ येथील रहाणारा असून हा १७७७ मध्यें दिल्लीला आला व यानें कविसंमेलनें भरवलीं. त्यानें ५ दिवाण लिहिलेले आहेत; 'ताझकिरा' अथवा ऊर्दू कवींचीं चरित्रें, 'शहानामा' अथवा शहाअलम राजाच्या कारकीर्दीपर्यंतच्या सर्व राजांचा इतिहास इत्यादि ग्रंथ त्यानें लिहिले आहेत. या कविमंडळांत केम नांवाचा एक कवि होता. हा १७९२ त मेला. याचींहि बरींच सुंदर काव्यें आहेत. शेवटच्या मोगल राजाचा राजकवि घालिब हा अर्वाचीन कवींत श्रेष्ठ होता. हा १८६९ सालीं मेला. हा नेहमीं फारसी भाषेंत लिहीत असे; तरी पण याचे ऊर्दू दिवाण लहान असूनहि त्यामुळें त्याची कीर्ति चोहोंकडे पसरली. याच कालचा मीरवली महमद नाझीर यानें काव्यावर कीर्ति मिळवली. जोगीनामा, कौडिनामा, बंजारेनामा आणि बुढापेनामा आणि शिवाय त्याचे दिवाण हे फार लोकप्रिय आहेत. त्याची भाषा इतर ऊर्दू कवींप्रमाणें बोजड नाहीं. त्याच्या कांहीं कविता नागरीमध्यें छापल्या असून त्याहि लोकप्रिय झाल्या आहेत.

अर्वाचीन काल.—वरीलप्रमाणें, दिल्ली, लखनौ व दक्षिणेकडील हिंदी वाङ्मयाच्या शाखांचा इतिहास आहे. पण याच वेळेस कलकत्त्यास फोर्ट विल्यम कॉलेजमध्यें चवथी शाखा निर्माण झाली होती; व या शाखेनें ऊर्दू गद्य वाङ्मयाला चांगलें चालन दिलें. १९ व्या शतकाच्या सुरवातीला या कॉलेजचा डॉ. गिल ख्राईस्ट हा मुख्य होता; व यूरोपियन लोकांनां व अधिकाऱ्यांनां ऊर्दू शिकण्याला सोपीं व उत्तम टेक्स्टबुकें काढण्यासाठीं त्यानें फार प्रयत्न केले. त्यानें कलकत्त्याला त्यावेळचे सर्व ऊर्दू विद्वान जमविले व त्या विद्वानांनीं त्याच्या उत्तेजनानें जे ग्रंथ लिहिलेले आहेत ते भाषेच्या दृष्टीनें व इतर बाजूंनीहि सुंदर व नमुनेदार आहेत. या शाखेचे मुख्य जनक हैदरी, हुसेनी, मीरअलदफ, हाफीझुद्दिन अहमद, शेरअल्ली अफसोस, निहालचंद, कॉझीम अल्ली जवान, लल्लूलाल कवि, मझार अल्ली, आणि इत्तम अल्ली हे होत.

हैदरी हा १८२८ त मरण पावला. त्यानें तोता खनानी (१८०१) नांवाचा एक गद्यग्रंथ लिहिला. तसेंच हातीमताईच्या साहसासंबंधीं अरैश हि महमल; मुसलमानी साधूंचीं चरित्रें अथवा दहमन्लिस, स्त्रियांच्या चातुर्यासंबंधीचा एक फारसी ग्रंथ आहे त्याच्यावरून लिहिलेला गुलजार–इ–दानिश, नादीरशहाच्या फारसी भाषेंतील इतिहासाचें भाषांतर-तारीख-इ-नादिरी इत्यादि ग्रंथ त्यानें लिहिले. हुसेनीनें नस्त्र–इ–बेनाझीर व 'अखलख–इ–हिंदी' हे ग्रंथ लिहिलेले आहेत. हितोपदेशाचें फारसी भाषेंत जें भाषांतर झालेलें आहे त्या भाषांतराचें पुन: 'अखलक–इ–हिंदी' हें ऊर्दूत रूपांतर आहे. मीर अमीन हा दिल्लीचा मूळ राहणारा पण पुढें तो पाटण्यास गेला व नंतर पुन: तो कलकत्त्यास आला. त्यानें फारसी भाषेंतील 'चहार दरवेशी' या ग्रंथाच्या आधारें 'बाग ओ बहार' (१८०१–२) हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथांतलि भाषेची फार स्तुति केली जाते; आणि याच्या असंख्य प्रती निघालेल्या आहेत. अमाननें हुसेन सय्यद काशिफीच्या अखलाख–इ–मुशिनी या ग्रंथाचें भाषांतर केलें. प्रो. हाफीजुद्दिन अहमद यानें १८०३ सालीं अबूल फजलच्या 'इयारी दानिश'चें 'खिराद अफ्रोज' या नांवाखालीं भाषांतर प्रसिद्ध केलें. अफ्सास हाहि फोर्ट विल्यम कॉलेजचा एक विद्वान प्रोफेसर होता. हा दिल्लीचा मूळचा रहाणारा असून यानें बंगालचा नबाब कासीम अल्लीखान याच्या पदरीं नोकरी धरली होती. नंतर तो हैद्राबादेस व नंतर लखनौस आला. तो लखनौस मीर हसन, मीर सोझ, व मीर हैदर अल्ली हैराण यांचा शिष्य होता. तो १८०० मध्यें फोर्ट विल्यम कॉलेज येथें आला. त्यानें एक प्रसिद्ध दिवाण लिहिलें आहे. पण त्याची कीर्ति, सुजनरायच्या खुलाशतु–त तवारीख या ग्रंथाच्या भाषांतरामुळें व तसेंच सादीच्या गुलिस्तानचें भाषांतर–बाग–इ–ऊर्दू–या ग्रंथामुळें आहे. निहालचंद यानें गुल–इ–बकावली या ग्रंथाच्या आधारें मझाब-इ-इष्क हा ग्रंथ गद्यांत व पद्यांत लिहिला. जवान हा प्रथम दिल्लीचा रहाणारा असून नंतर तो लखनौस गेला व नंतर तो कलकत्त्यास १८०० त आला. त्यानें ऊर्दूत शकुंतला नाटक लिहिलें. त्यानें 'बारा मास' व दस्तुर इ-हिंद या नांवाचे ग्रंथ लिहिले. रसैक् इखवानीस साफा या पुस्तकांतील तिसरा भाग इखवान् स-साफा या नांवाखालीं इक्रमअल्लीनें भाषांतर केला. यांतील ऊर्दूभाषा फारच सुंदर आहे.

श्री. लल्लूलाल हा गुजराथेंतील ब्राह्मण असून तो उत्तरहिंदुस्थानांत गेला होता. इतर वरील विद्वानांनीं मिळून जेवढें ऊर्दू भाषेचें कार्य केलें तेवढें या एकट्यानें हिंदीं भाषेसाठीं केलें असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. त्याला श्रेष्ठ हिंदीचा जनक असें म्हणणें योग्य आहे. त्याचे प्रेमसागर व राजनीति हे गद्य ग्रंथ फारच सुंदर आहेत. प्रेमसागर हें भागवतपुराणाचें १० व्या भागाचें भाषांतर आहे व राजनीति हा हितोपदेश व पंचतंत्रांतील कांहीं भाग यावरून रचलेला आहे. याशिवाय त्यानें 'लताइफ-इ-हिंद्', 'सभाविलास', काव्यगुच्छ, 'सप्तशतिका' व इतर ग्रंथ लिहिलेले आहेत. त्यानें व जवाननें मिळून सिंहासनबत्तिशी लिहिली; व त्यानें शकुन्तलानाटकाच्या कामीं जवानला मदत केली. वेतालपंचविशी या ग्रंथामध्यें माझर अल्लीनिस्ला यानें याला मदत केली. आणि उलट यानें विलाला 'माधोनलची गोष्ट' या ग्रंथलेखनांत साहाय्य केलें.

हे वरील ग्रंथ जरी डॉ. गिल(ख्राईस्ट)व इतर यूरोपीयनांच्या नजरेखालीं प्रकाशिले जात होते व जरी प्रथम हे यूरोपियनांनां ऊर्दू शिकण्यासाठींच म्हणून लिहिलेले होते तरी हे ग्रंथ जिकडे तिकडे प्रसिद्ध होऊन यांची कीर्ति १९ व्या शतकाच्या मध्यभागापर्यंत अबाधित राहिली.पण याच वेळीं आणखी एक लाट उसळली व ती लाट म्हणजे धार्मिक पुनरुज्जीवनाची होय. व यावर जे अनेक वादविवाद झाले त्यामुळें ऊर्दू वाङ्मयाचा जिकडे तिकडे फैलाव झाला. हें काम सय्यदअहमद व त्याच्या अनुयाय्यांनीं केलें.

सय्यदअहमद हा १७८२ मध्यें जन्मला, आणि त्याचें शिक्षण दिल्ली येथें झालें. कुराणावर सुप्रसिद्ध टीका लिहिणारा शहाअब्दुल अझीझ व ऊर्दूमध्यें कुराणाचा पहिला भाषांतरकार अब्दुल कादीर हे त्याचे गुरू होते. त्यानें वहाबी पंथाचा अंगीकार करून आपल्या भोंवतीं इस्माइल हाजीसारखे अनेक उत्साही शिष्य जमविले व त्यांनां उत्तम प्रकारची धर्माची माहिती करून देऊन,तो १८२० सालीं कलकत्त्यास आला.१८२२ मध्यें तो मक्केच्या यात्रेला गेला व तेथून तो कॉन्स्टांटिनोपल येथें गेला. तेथें त्याला बरेच शिष्य मिळाले. सहा वर्षेपर्यंत तो तुर्कस्तान, अरबस्तान इत्यादि ठिकाणीं हिंडला. त्याठिकाणीं त्याला धर्मांतील चैतन्य दृष्टीस पडलें व हिंदुस्थानांत चैतन्य नाहीं असें वाटून त्यानें हिंदुस्थानांत येऊन बरीच चळवळ सुरू केली. त्यानें मुसुलमानी धर्मांतील

भोळ्या समजुतींचा तिरस्कार केला व शिखांच्याविरुद्ध जिहाद (धर्मयुद्ध) करण्याचा उपदेश केला. १८२८ मध्यें पेशावर येथें येण्यास निघाला त्यावेळीं त्याच्या बरोबर एक लाख लोक होते. १८२९ सालीं त्यांनीं शिखांच्या विरुद्ध बंड केलें आणि पेशावर काबीज केलें. पण त्याच्या बाजूचे अफगाण लवकरच त्याच्या पासून फुटले. तो सिंधूच्या पलीकडे पळाला व पखली व घमतोलच्या डोंगरांचा त्यानें आश्रय घेतला; पण तेथेंहि त्याला एक शीख लोकांची तुकडी भेटली व तिच्याशीं झालेल्या लढाईत तो व हाजी इस्माइल हे मारले गेले. पण या त्याच्या मरणानें त्याचा पंथ मात्र नामशेष झाला नाहीं. सध्यां वहाबी पंथाचीं तत्त्वें दृढमूळ होऊं लागलीं आहेत.

अबदुल कादरनें केलेलें कुराणाचें भाषांतर १८२९ सालीं हुगळी येथें सय्यद अहमदच्या शिष्यानें प्रसिद्ध केलें. १८३० मध्यें अबदुलनें सय्यद अहमदचा 'तम्बिदुल इगाफिलिन' हा फारसी ग्रंथ प्रसिद्ध केला. 'ताक्रियातुल अमीन' या नांवाचा ऊर्दू टीकाग्रंथ हाजी इस्लायल यानें लिहिला. तारीख-इ-महमदीया या नवीन पंथांच्या (सय्यद अहमदाच्या पंथाचें नांव) अनुयायांनीं तरघिब-इ जिहार, हिदायतुल मुम्मिम, मुझीदुल कबैर व लबिदाल नशीहातु-ल-मुस्लीमिन आणि मियात मसेल हे ग्रंथ लिहिले.

१८ व्या शतकाच्या अखेरीपासून फोर्टविल्यम कॉलेज मधून देशीं पुस्तकें बाहेर पडत होतीं. पण तीं छापविण्याला फार खर्च येत असल्याकारणानें जितका या ग्रंथांचा प्रसार व्हावा तितका झाला नाहीं. १८३७ सालीं एक शिलाप्रेस दिल्लीमध्यें स्थापन झाला; व त्यामुळें निरनिराळीं पुस्तकें लिहिलीं जाऊं लागलीं व जुनीं पुस्तकेंहि भराभर छापलीं जाऊं लागलीं. १८३२ मध्यें फारसी भाषेऐवजीं ऊर्दु भाषा दरबारांत प्रविष्ट झाल्यापासून, ऊर्दू फारच लोकप्रिय झाली. तसेंच पाश्चात्त्य शिक्षणाचा प्रसार झाल्यामुळें ऊर्दू भाषेचा शब्दकोश वाढूं लागला. शिवाय वर्तमानपत्रांचा धंदा अस्तित्वांत आल्यापासून नव्या नव्या कल्पना आपल्या देशी भाषेंतून जोरदार रीतीनें मांडण्याचीहि कला लेखकांच्या अंगीं येऊं लागली.

हे सर्व फेरफार १८५७ सालच्या सुमारास घडून येत होते. १८६० पासून हे फेरफार जलद होऊं लागलेले दिसतात. दर वर्षी या शिळाप्रेसमुळें शेकडों हिंदी व ऊर्दू पुस्तकें बाहेर पडत आहेत. क्रमिक पुस्तकें खंडोगणती निघत आहेत. आणि अनेक पुस्तकांची भाषांतरें होत आहेत. हिंदी व उर्दू वर्तमानपत्रें २०० वर आहेत. त्यांपैकीं पुष्कळ संयुक्तसंस्थानांत व आग्रा, अयोध्या, पंजाब या ठिकाणीं निघत असून कांहीं मद्रास, हैद्राबाद, बंगलोर इत्यादि ठिकाणीं निघत आहेत. यामध्यें अनेक प्रकारचे विषय येत असतात. बहुतेक लेख, वाङ्मयाच्या अगर भाषेच्या दृष्टीनें वाखाणण्यासारखे नसतात हें खरें पण पुढेंमागें ते तसें होण्याचा संभव आहे.

ही नवीन वाङ्मयस्फूर्ति देशामध्यें उत्पन्न झाल्यापासून तिचे परिणामहि दिसूं लागलेले आहेत. त्यांपैकीं महत्त्वाचा परिणाम म्हटला म्हणजे काव्याचा अस्त होय. नवीन युग भावनात्मक अगर काल्पनिक भराऱ्या मारणारें नसून निव्वळ व्यावहारिक आहे. आधिभौतिक अगर राजकीय सुधारणेकडे या युगाचें लक्ष आहे. या युगांत इतर युगाप्रमाणें राजेरजवाडयांकडून आश्रय मिळत नाहीं. झाक, गालीब, अनीस आणि दाबीर यांच्या मृत्यूनंतर काव्याचें प्रस्थ वाढण्यास सुरुवात झाली. हैद्राबादमध्यें मात्र परवां परवांपर्यंत कवि पदरीं ठेवण्याची चाल होती; व मिरझाखान डागा (१८३१-१९०५). याची कीर्ति काव्यकौशल्याबद्दल फार होती.

पण गद्य वाङ्मय व भौतिक सुधारणा एवढयावरच लोकांचें लक्ष खिळून राहिलें नाहीं. इस्लामधील कल्पनांचें खूळ मोडून टाकून त्यामध्यें सुधारणा करण्याचा सय्यद अहमदनें जो प्रयत्न केला त्याचेंच कार्य पानिपतचा सय्यद अलतफ हुसेन यानें केलें. याला हाली असें नांव असे. हाली हा तरुणपणीं गालिबाचा चेला होता. व आपल्या गुरूचें चरित्र व त्याच्या ग्रंथावर टीकाहि त्यानें लिहिलेली आहे. वयाच्या ४० व्या वर्षी तो सय्यद अहमदखान या सुधारकाच्या वर्चस्वाखालीं आला. व त्या वेळेपासून आपली काव्यस्फूर्ति त्यानें आपल्या धर्मासाठीं खर्च केली. यानें पुष्कळ कविता केली आहे, व त्यांतील एक नमुना रूबेरीच्या प्रतींत इंग्लिश भाषांतरासहित सांपडेल. यामध्यें कवितेला उद्देशूनच एक कविता लिहिलेली आढळून येते. तो एका नवीन शाखेचा प्रवर्तक झाला आहे यांत शंका नाहीं. त्याच्या लेखांत, उत्साह व आशावादित्व दिसून येतें.

हालीचें सर्वांत प्रसिद्ध काव्य म्हणजे 'इस्लाम धर्माची उन्नति व अवनति' हें होय, व याचा परिणाम मुसुलमानांमधील धर्मजागृतींत झाला. या काव्यामध्यें सुंदर,

सरळ आणि मार्मिक भाषेमध्यें इस्लामनें पूर्वी मिळविलेले जय व इस्लामी धर्माचीं तत्त्वें प्रामुख्यानें मांडलीं आहेत आणि नंतर धर्माची अवनति कशी झाली याचेंहि सुंदर वर्णन दिलें आहे. आपल्याच जातभाईवर त्यांच्या दुर्गुणाबद्दल स्पष्ट शब्दांत हालीइतका निषेध क्वचितच इतरांनीं दाखविला असेल. त्यानेंच आपल्या प्रस्तावनेंत आपण बराच काळ कांहींहि न करतां उगाच भटकत राहिल्यावर सय्यद महमदखानाच्या स्फूर्तीनें ही कविता लिहिली असें सांगितलें आहे. हालीनें नुकतेच सय्यद अहमदखानाचें चरित्र केलें आहे.

काव्यासंबंधी व काव्यपद्धतीसंबंधी गद्यांत लिहिणारा दुसरा ग्रंथकार म्हणजे मौलवी हुसेन महमद अझाद हा होय. यानें स्वत: फारशी कविता लिहिलेल्या नाहींत पण ऊर्दू कविचरित्रपर जो ग्रंथ लिहिला आहे तो फार नांवाजलेला आहे. हा झाकचा शिष्य असून हा लाहोरमधील सरकारी कॉलेजमध्यें अरबी भाषेचा प्रोफेसर होता. त्याचे दुसरे ग्रंथ म्हणजे किसास इ हिंद, नैरंग–इ–खयाल आणि दरबार–इ–अकबरी, हे होत.

सर सय्यद अहमदखान याचें चरित्र व कामगिरी येथें समग्र देणें अशक्य आहे. 'आसारस सनादीद' नांवाचा त्याचा ग्रंथ फार प्रसिद्ध असून त्याच्या अनेक प्रती निघाल्या आहेत. त्याशिवाय त्यानें अनेक विषयावर लेख व निबंध लिहिलेले आहेत. त्याचा कुराणावरील मोठा टीकाग्रंथ अर्धाच झाला आहे. यानें ऊर्दू भाषेला अत्यंत जोरदार व मार्मिक वळण दिलें.

दुसरा एक चांगला लेखक म्हणजे दिल्लीचा शमसुल उलमा मौलवी नाझीर अहमद हा होय. यानें सामाजिक, नीतिपर अशा अनेक कादंबऱ्या लिहिलेल्या आहेत व त्याच्या प्रती अनेक खपत आहेत. विशेषत: बायकांमध्यें या कादंबऱ्यांचा खप विशेष आहे. या कादंबऱ्यांचीं नांवें मीर आतुल अरुरु (वधूंचा आदर्श), तौबातुन नसुह (नसुहाचा पश्चात्ताप), बनातुन नाश (सप्तर्षि), इब्नल वक्स (युगपुत्र), अयामा (विधवा) वगैरे होत. पण नाझीर हा फक्त कादंबरीकार होता असें नव्हे तर तो अनेकांगी होता. कादंबऱ्या लिहिण्याच्या अगोदर त्यानें इंडियन पीनल कोडाचें फारच सुंदर भाषांतर केलें होतें; आणि त्यानें कुराणचें सुंदर भाषांतर केलें आहे. सामाजिक विषयावर तो सुंदर व्याख्यानें देत असे. म्हातारपणीं त्यानें कविता लिहिल्या. म्हातारपणीं सय्यद महमदखानाशीं त्याचा फार स्नेह होता.

आधुनिक ऊर्दू वाङ्मयामध्यें कादंबरी ही एक नवीन चीज आहे. हिंदुस्थानांत अद्भुत व प्रणयी कथांचा सुकाळ नाहीं. पण सत्य स्थितीचें वर्णन, सामाजिक परिस्थिति वगैरे वर्णन करणाऱ्या कादंबऱ्या आपल्याकडे नाहींत. ऊर्दू कादंबरींत उत्तम कादंबरी पंडित रतननाथ सरशार याची फिसान ए आसाद ही होय. ही कथा फार मोठी असून मोठ्या कौशल्यानें लिहिलेली आहे; आणि त्यांत लखनौ येथील समाजस्थितीचें फारच सुंदर वर्णन दिलेलें आहे. दुसरा मोठा कादंबरीकार म्हणजे मौलवी अबदुल हलीम शारर हा होय. हा दिल गुदाझ या पत्राचा संपादक होता. यानें यांत यूरोपियन पद्धतीवर अनेक विषयांवर निबंध लिहिलेले आहेत व याच पत्रांत स्कॉटच्या धर्तीवरच्या त्याच्या कादंबऱ्या प्रसिद्ध झालेल्या आहेत. अझीझ आणि नूर्जीना, मन्सूर आणि मोहिना या उत्कृष्ट कादंबऱ्या आहेत.

ऊर्दू ही जरी मुख्यत्वेंकरून मुसुलमानांची भाषा आहे तरी तिचा उपयोग हिंदी लोकांनींहि केला आहे. अतिशय लोकप्रिय कादंबरीकार लल्लूलाल हा हिंदु होता. तसेंच ८० ऊर्दू वर्तमानपत्रांपैकीं २९ पत्रें हिंदूंनीं चालविलीं आहेत व पंजाबमध्यें४८ पैकीं२० पत्रें हिंदूंनीं चालविलीं आहेत. ऊर्दू नाट्याचा उदय व वृद्धि यांचा इतिहास 'नाट्यशास्त्र' लेखांत दिला आहे.

ऊर्दूनें ज्याप्रमाणें सर्व विषयाच्या बाबतींत नवीन पेहराव चढविला आहे त्याप्रमाणें 'श्रेष्ठ हिंदी' भाषेचें नाहीं. ही भाषा मुख्यत्वेंकरून हिंदी शाळांतून शिकविली जाते. पण निरनिराळ्या शास्त्रांतील शब्दांनां हिंदी भाषेंत संस्कृत शब्द योजले आहेत व ते पंडितांशिवाय इतर लोकांनां कळत नाहींत. संयुक्तप्रांतामध्यें ३७ हिंदी व ४ हिंदी ऊर्दू वर्तमानपत्रें आहेत पण त्यापैकीं बहुतेक धर्मपरच आहेत. अवधी आणि व्रजभाषा या काव्याशिवाय उपयोगांत आणीत नाहींत.

१९ व्या शतकाच्या मध्यभागानंतरचे प्रसिद्ध ग्रंथकार म्हणजे काशीचे बाबू हरिश्चंद्र आणि राजा शिवप्रसाद हे होत. बाबू हरिश्चंद्र हे लहानपणींच मरण पावले तरी ते जुन्या काव्यकलेचे उद्धारक होते. सुंदरीतिलक पत्रामध्यें त्यांनीं उत्तर हिंदी कविता व कविवचनसुधा प्रसिद्ध केल्या, आणि हरिश्चंद्रिका मासिकांत जुने ग्रंथ प्रसिद्ध केले. त्यांनीं यूरोपीय हिंदू व इतर कित्येक मोठमोठ्या पुरुषांचीं चरित्रें प्रसिद्ध केलीं; व वाङ्मयात्मक आणि व ऐतिहासिक निबंध लिहिले. इतिहासांतील गूढ प्रश्न

त्यांनीं सोडवून ऐतिहासिक संशोधनाची दिशा आंखून दिली. काश्मीरकुसुम या ग्रंथांत त्यांनीं आपल्या शेंकडों ग्रंथांची यादी दिली आहे. हिंदी नाटकांचे ते जनक होते. राजा शिवप्रसाद (१८२३–९५) हे शिक्षण खात्यांत काम करीत होते व त्यांनीं शालोपयोगी कित्येक पुस्तकें लिहून हिंदी भाषा सुंदर करण्याचें काम केलें आहे. हरिश्चंद्रांच्या मृत्यूपासून काशीच्या नागरीप्रचारिणी सभेनें हिंदी पुस्तकें छापण्याचें स्तुत्य काम चालू ठेवलें आहे.

**हिंदी वाङ्मयाचे कांहीं विशेष.**—प्राचीन काळापासून तों अर्वाचीन काळापर्यंतच्या हिंदी वाङ्मयाचें स्थूल परीक्षण केल्यानंतर पुनरुक्तीचा दोष पत्करूनसुद्धां या वाङ्मयांतील मुख्य विशेष कोणते आढळून येतात याचें पर्यालोचन करणें जरूरीचें आहे.

(१) हिंदी वाङ्मयाच्या स्वतंत्र रीतीनें विकास व भरभराट पावलेल्या काळांत जो पहिला विशेष आढळून येतो तो म्हणजे त्या काळचें वाङ्मय मुख्यत्वेंकरून धर्मविशिष्ट होतें. जवळ जवळ अर्ध्याहून अधिक अशा वाङ्मयाचें मूळ तत्कालीन भक्तिमार्गाच्या चळवळींत होतें. उरलेलें अर्धें वाङ्मय साहित्यविषयक होतें तरी पण त्यांत सुद्धां उदाहरणादाखल जे श्लोक घेण्यांत येत असत ते या भक्तिमार्गाच्या चळवळीशीं संलग्न असणारे असत. तसेंच भाटांच्या काव्यावर देखील या धर्माची छटा पडलेली होती.

(२) १९व्या शतकाच्या आरंभापर्यंत जवळ जवळ सर्व वाङ्मय पद्यमय होतें. याला अपवादात्मक असे थोडे ग्रंथ आहेत. गोरखनाथानें एक गद्य ग्रंथ लिहिला होता. त्यानंतर सोळाव्या शतकांत विठ्ठलनाथाचा 'मंडन' ग्रंथ आणि गोकुळनाथाचा 'चौरासी वार्ता' हा ग्रंथ, तसेच १७ व्या शतकांत दामोदरदासकृत मार्कंडेय पुराणाचें भाषांतर इत्यादि ग्रंथ गद्यांत होते. याशिवाय जे टीकाग्रंथ निर्माण झाले त्यांतील कांहीं ग्रंथ गद्यात्मक होते. बाकी सर्व वाङ्मय पद्यात्मक होतें. ही पद्यरचना फार क्लिष्ट असे तरी पण पुष्कळांनां पद्यांत लिहिणें सोईचें वाटत असे. ज्यावेळीं प्रथमतः ग्रंथकार गद्यांत लिहूं लागले त्यावेळीं त्यांनां देखील प्रथम प्रथम फार जड गेलें. त्यावेळचे शालिहोत्र, ज्योतिःशास्त्र इत्यादि विषयावरील शास्त्रीय ग्रंथ देखील पद्यात्मकच असत.

(३) सोळाव्या शतकाच्या मध्यापासून म्हणजे केशवदासाच्या काळापासून साहित्यशास्त्र व छंदःशास्त्रविवेचक असे पुष्कळ ग्रंथ निर्माण झाले. पद्यरचनेच्या खालोखाल ग्रंथकारांचा आवडता विषय साहित्य आणि छंदःशास्त्राचा होता. द्व्यर्थी शब्द अथवा कूट आणि अन्योक्तिवाचक श्लोक जितके अधिक एखादा ग्रंथकार वापरील त्या मानानें तो ग्रंथकार अधिक कुशल असें मानण्यांत येत असे; म्हणजे अंतरंगापेक्षां बहिरंगाकडेच पहाण्याची त्यावेळची दृष्टि असे आणि अद्यापिहि थोड्या फार प्रमाणांत ती आढळून येते. पण या साहित्यशास्त्र विवेचकांमध्यें देखील कांहीं ग्रंथकारांनीं फार सुंदर कविता केली आहे व त्यामुळें हिंदी काव्याची शोभा व योग्यता वृद्धिंगत झाली आहे यांत शंका नाहीं.

(४) हिंदी वाङ्मयांतील उपमा अगर रूपकें जीं आढळून येतात तीं अगदीं रूढ अशीं असतात. पण त्याच त्याच उपमा व तींच तींच रूपकें काव्यांतून वारंवार आढळून येतात. उदाहरणार्थ, चक्रवाक वियोग, चातकाचें मेघाविषयीं औत्सुक्य, चकोराला वाटणारें चंद्रापासून सौख्य इत्यादि ठरीव दृष्टान्त पदोपदीं आढळून येतात. तथापि तुळसीदास व इतर कांहीं कवींच्या काव्यांमध्यें सृष्टिनिरीक्षणविषयक उपमाहि आढळून येतात.

(५) हिंदी वाङ्मयामधील आणखी एक विशेष म्हणजे 'ठरीव कथानकें' हा होय. राम व कृष्ण यांचीं कथानकें घेऊन त्यावर अनेक कवींनीं काव्यें केलीं आहेत. त्याच त्याच हकीकती थोड्या फार भेदानें आढळून येतात. या व्यतिरिक्त जीं कथानकें आढळून येतात तीं देखील कांहीं ठराविक कथानकांतलींच असतात. तीं कथानकें म्हणजे गुरूचा महिमा; भक्तिचें माहात्म्य; पुनर्जन्मापासून तोटा; मायामोह; जगाची नश्वरता; इत्यादि होत. या काव्यांत मानवी प्रेमाचीं कथानकें फारच थोडीं आढळतात. कांहीं कांहीं काव्यांत शृंगारिक कथानकें असतात, पण तीं सुद्धां शुद्ध मानवी प्रेमासंबंधींचीं नसतात. याचीं कारणें बालविवाह, स्त्रीवर्गाची मागसलेली स्थिति इत्यादि होत आणि ज्या वेळेस प्रेमासंबंधीचें कथानक असतें त्या वेळीं वेश्याप्रेमासंबंधीचीं वर्णनेंहि आढळून येतात. पण यालाहि अपवादात्मक आणि शुद्धप्रेमदर्शक अशीं कथानकेंहि कांहीं कांहीं आढळतात आणि तीं म्हणजे पद्मावतीची पतिनिष्ठा; सीतेचें रामावरील प्रेम इत्यादि होत. अशा रीतीनें अगदीं ठराविक व संकुचित क्षेत्रांतच कवींनीं आपलें काव्य रचलेलें आहे.

(६) तरी पण विषयामध्यें संकुचितपणा असून सुद्धां हिंदी काव्यानें आपल्या अलौकिक गुणामुळें कायमचें

स्थान पटकावलें आहे. हिंदी वाङ्मय हें खरोखरचें 'नंदनवन' आहे. काव्यामध्यें इतकें रचनाचातुर्य छंदोनैपुण्य, विकारांची उत्कटता, उमदेपणा, विचारमाधुर्य व शुद्ध सौंदर्य आढळतें कीं तितकें जगांतील इतर भाषांतील काव्यांमधून क्वचितच आढळून येतें. शिवाय तें काव्य फारच लोकप्रिय होतें. तें प्रचारांतील भाषेंत लिहिलेलें होतें. व त्यामुळें लोकांचें लक्ष त्यानें आपल्याकडे वेधून घेतलें. त्यांतील विचार, म्हणी ह्या पुष्कळांच्या कायमच्या परिचयाच्या बनल्या आहेत; व हिंदी लोकांचे खरे आचारविचार काय आहेत हें पहावयाचें असल्यास या काव्यांचा व वाङ्मयाचा फार उपयोग होईल यांत शंकाच नाहीं.

**हिंदी वाङ्मयाची सद्यःस्थिति व भविष्यत्काल.**—अशा रीतीनें हिंदी वाङ्मयांत आढळून येणाऱ्या विशेषांचें पर्यालोचन केल्यावर आपण हिंदी वाङ्मयाची सद्यःस्थिति काय आहे तें पाहूं. तसेंच भविष्यत्कालीन वाङ्मयाची वाढ कोणत्या दिशेनें होईल तेंहि आपण पाहूं.

प्रथमतः आपल्याला ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे इतर वाङ्मयाप्रमाणेंच हिंदी वाङ्मयापुढें कांहीं विघ्नें आहेत. आज जिकडे तिकडे इंग्रजी भाषेचें वर्चस्व असल्याकारणानें देशी भाषेचा जितका उपयोग व्हावा तितका होत नाहीं; मोठमोठे ग्रंथकार आपले विचार इंग्रजींतून मांडतात; अशी स्थिति आहे. त्याचप्रमाणें हिंदी गद्यवाङ्मयाचे नियम अद्यापि ठरलेले नाहींत हीहि एक मोठी अडचण आहे. हिंदी गद्यवाङ्मय अगदीं अलीकडे निर्माण झालें व तन्निमित्त उपयोगांत आणली जाणारी भाषा देखील नुकतीच बनत चालली आहे. मागील, आदर्शभूत असे गद्य ग्रंथहि नाहींत. व हल्लींच्या वाङ्मयाची स्थिति दररोज पालटत आहे. कांहीं ग्रंथकार संस्कृतप्रचुर नवीन हिंदी भाषा वापरतात तर दुसरे ग्रंथकार अरबी अगर फारसी शब्द प्रचुर भाषा वापरतात; कांहीं ग्रंथकार आंग्ल भाषेंतून भाषांतरिलेले शब्द वाङ्मयांत गोवतात. अशी स्थिति असल्याकारणानें कांहीं तरी नियम असणें जरूरीचें झालें आहे.

अशा रीतीनें हल्लींच्या हिंदी गद्यवाङ्मयाची कृत्रिम भाषा असल्यानें काव्यासाठीं तिचा उपयोग केला जात नाहीं. अशा प्रकारें गद्यवाङ्मयाच्या व पद्यवाङ्मयाच्या भाषेंत अंतर असणें हें हानिकारक आहे. पण आजकालच्या कवींमध्यें या कृत्रिम भाषेचा काव्यामध्यें उपयोग करण्याची प्रवृत्ति दिसून येत आहे.

अशा प्रकारच्या अडचणी हिंदी वाङ्मयापुढें असल्या तरी कांहीं फायदेहि हिंदी वाङ्मयाला होत आहेत, सक्तीचें शिक्षण झाल्यामुळें वाङ्मयाचा व ज्ञानाचा प्रसार झपाटयानें होण्याचा चांगला संभव आहे. तसेंच मतदारीचे हक्क पुष्कळांनां देण्यांत येणार असल्यामुळें त्या मतदारांनां सर्व तऱ्हेची सामाजिक, राजकीय व औद्योगिक विषयासंबंधाची माहिती असणें जरूर आहे. आणि यामुळें अर्वाचीन नूतन वाङ्मयाचा झपाटयानें विकास होईल यांत शंका नाहीं.

हिंदी वाङ्मयाच्या प्रसारार्थ ज्या संस्था निघालेल्या आहेत त्यांचाहि या वाङ्मयाच्या वाढीच्या कामीं फार उपयोग होण्यासारखा आहे. काशी येथील नागरी प्रचारिणी सभा या कामीं फार मेहनत घेत आहे. जुन्या हस्तलिखित प्रती शोधून काढण्याकरतां ही संस्था जारीनें प्रयत्न करीत आहे. शिवाय उत्तम प्रकारचे नवीन ग्रंथ तिच्यामार्फत बाहेर पडत आहेत. सुंदर आंग्ल ग्रंथांचें भाषांतर या संस्थेमार्फत होत असतें. तसेंच या सभेमार्फत हिंदी कोशाचेंहि काम चालू आहे. अशाच प्रकारच्या इतर संस्थांमार्फतहि चांगले चांगले इतर ग्रंथ बाहेर पडत आहेत. पाश्चात्य ज्ञानाचा फायदा हिंदी लोकांनां मिळण्यासाठीं निरनिराळ्या विषयांवरील ग्रंथ निघत आहेत. साहित्यसंमेलन नांवाची अलाहाबाद येथें स्थापन झालेली संस्था हिंदी वाङ्मयांतील परीक्षा घेऊन विद्यार्थ्यांनां पदव्या देत असते व तिचा उद्देश उत्तर व मध्य हिंदुस्थानांत हिंदी शाळा उघडण्याचा आहे.

या संस्थांप्रमाणेंच 'नार्थ इंडिया ट्रॅक्ट सोसायटी सारख्या इतर ख्रिश्चन संस्था देखील उत्तम कार्य करीत आहेत. या संस्थेमधून धार्मिक, चरित्रात्मक, कथामय असें वाङ्मय बाहेर पडत आहे. जुन्या जुन्या विषयांवर निरनिराळीं काव्यें लिहिण्याचा पूर्वीचा प्रघात कमी होत चालला आहे; व व्यापक क्षेत्रांत वाङ्मयाचें पाऊल पडलेलें आहे. अर्थातच या कामांत हिंदी वाङ्मयावर मोठाच बोजा पडणार आहे व तो यथायोग्य रीतीनें उचलण्यास वाङ्मयाच्या भक्तांनीं तयार झालें पाहिजे.

**हिंदी छंदःशास्त्र**—इतर कोणत्याहि भाषेपेक्षां हिंदी भाषेंतील छंदःशास्त्राची वाढ कमी नाहीं. संस्कृतमधील छंदःशास्त्रापासूनच या भाषेंतील छंदःशास्त्राचा उगम

झालेला आहे. सर्व भाषांतील कवितांप्रमाणेंच यांतहि यमक साधलेला असतो. पण हिंदी भाषेमध्यें प्रत्येक चरणांत नुसत्या एका शेवटच्या अक्षराचा यमक साधल्यानें भागत नाहीं तर निदान दोन अक्षरांचा तरी यमक साधला पाहिजे. हिंदींत शुद्धलेखन व व्याकरण या बाबतींत कदाचित दुर्लक्ष केलेलें आढळेल पण छंदःशास्त्रांतील गुंतागुंतीचे नियम पाळण्यांत तसें नाहीं. कुशल कवीच्या कौशल्यामुळें जो यमक साधला जातो तो फारच मनोहर वाटतो. हिंदी छंदःशास्त्रामधील वृत्तांची संख्या पुष्कळच आहे. त्यांतील अगदीं थोड्या प्रमुख वृत्तांचा येथें उल्लेख केला पाहिजे. दोहा किंवा दोहरा नांवाचें एक वृत्त असून त्याचे दोन चरण असतात व प्रत्येक चरणांत २४ मात्रा असतात व या मात्रा ठराविक रीतीनें विभागिल्या जातात. दोहऱ्याचा उपयोग हिंदी पद्य वाङ्मयांत फारच केला जातो. दोहरा उलट केला असतां सोरठा होतो. चौपाई देखील दोहऱ्याप्रमाणेंच लोकप्रिय आहे. चौपाईचे चार चरण असून प्रत्येक चरणांत १६ मात्रा असतात. याशिवाय इतर वृत्तें म्हणजे कुण्डलीय, छप्पाई, काव्य, सनह्य आणि कविता हीं होत. कांहीं गाण्याचीं वृत्तेंहि आहेत व त्यांचाहि पुष्कळ वेळां उपयोग केला जातो. [संदर्भग्रंथ–George A Grerson–The Modern verneculer litereture or Hindostan; मिश्रबंधू–मिश्रबंधूविनोद (हिंदी); मिश्रबंधू–हिंदी नवरत्न (हिंदी); रामनरेश त्रिपाठी (साहित्यसंमेलन, अलाहाबाद)–कविताकौमुदी; बेल्व्हेडीयर स्टीम प्रिंटिंग प्रेस, अलाहाबाद–संतवाणिसंग्रह; ए. ब्रिटानिका; इं. गॅझेटीयर ऑफ इंडिया, पु. २;ग्रीयरसन–लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया; एसनयक्लो. रिलिजन अँड एथिक्स].

याप्रमाणें हिंदुस्थानी वाङ्मयाचें थोडक्यांत निरीक्षण केलें. याठिकाणीं फक्त हिंदुस्थानी वाङ्मय घेतलें याचें कारण हिंदुस्थानी ही अखिल भारतीय भाषा होऊं पहात आहे व ती बोलणारांची संख्या सर्वांत मोठी (सुमारें ९॥ कोटी) आहे. हिंदुस्थानांतील गुजराथी, कानडी, बंगाली वगैरे भाषा व त्यांतील वाङ्मय याचें वर्णन मुख्य ज्ञानकोशांत शरीरखंडांत त्या त्या नांवाखालीं केलेलेंच आहे. फक्त हिंदुस्थानी या विभागाकरितां ठेवलें होतें त्याचा येथें परामर्ष घेतला. मराठी भाषावाङ्मयाचें असेंच विवेचन महाराष्ट्रखंडांत येईल.

---

## प्रकरण ५ वें.

## हिंदुस्थानची राज्यव्यवस्था.

प्राचीन.–वेदकालीन हिंदुस्थानांत एकसत्ताक राज्यपद्धति अस्तित्वांत असावी. राजा हा वंशपरंपरागत असे. राजाची कधीं निवडणूकहि होई. राज्यक्रांत्या अपरिचित नसत (निरुक्त २. १०; अथर्व. ३. ३४; काठक सं. २८, इत्यादि). ब्राह्मण व क्षत्रियवर्गाला कर द्यावा लागत नसे असें दिसतें. फौजदारी न्याय राजा स्वतः देत असावा. कायदे करण्याचा अधिकार राजाकडे वेदोत्तर कालांतल्या इतका दिसत नाहीं. राजा हा जमीनीचा मालक होता कीं नव्हता याबद्दल संशय आहे. त्यावेळेस पंचायतपद्धति अस्तित्वांत होती असा संशय 'मध्यमशी' शब्दावरून येतो. मध्यमशी हा खासगी पंच दिसतो. लोकसभेंत न्यायनिवाडा करण्याकरितां सभासद–पंच असत. ग्रामणी हा सभेचा किंवा पंचायतीचा अध्यक्ष असावा. समिति व सभा हे दोन शब्द समानार्थक दिसतात. या बैठकींतून कायदे करणें, न्याय देणें यांसारख्या राज्यकारभाराच्या गोष्टी घडत असाव्यात. वेदकालांत एकापेक्षां एक श्रेष्ठ राजे असावेत असें राज्य साम्राज्य, भौज्य, स्वाराज्य, वैराज्य, पारमेष्ठ्य, माहाराज्य व आधिपत्य या नांवांवरून दिसतें. अथर्ववेदांत राजहितविषयक अनेक मंत्र आहेत. वैदिक राज्यपद्धतीची कल्पना वैदिक शब्दसृष्टीकडे नजर पुरविल्यास येईल [ज्ञानकोश विभाग ३, प्र. ९; विशेषतः राजकीय शब्द (पृ. ४९१–९०) पहा].

महाभारतकालीं हिंदुस्थानांत लहान लहान पण स्वतंत्र अशीं शेंकडों राज्यें होतीं. प्रत्येक राज्यावर एक सर्व मुखत्यार असा राजा असे; पण तो वेळोवेळीं लोकसभा भरवून प्रजेचें मत घेई. कांहीं थोडीं प्रजासत्ताक राज्येंहि होतीं. तसेंच सर्व राजांना अंकित ठेवणारीं साम्राज्येंहि नांदत होतीं. राजाच्या अधिकारांस मर्यादा घालण्याचें काम आर्य तत्त्ववेत्ते ईश्वराच्या नांवानें करीत. दंडनीतिशास्त्र, धर्मशास्त्रें व स्मृती यांतून राजाचे अधिकार विवेचिलेले असत त्यांप्रमाणें राजा चाले. राजानें प्रजेचें त्यांच्या धर्माप्रमाणें रक्षण करून त्यांच्या शत्रूंचें शासन करावें आणि याकरितां प्रजेनें त्यास कर द्यावा अशा तऱ्हेचा राजा आणि प्रजा यांमध्यें करार असे. शांति पर्वाच्या १२१–२२ अध्यायांत राजाचें दंडस्वरूप वर्णन केलें आहे. महाभारतांत इतर अनेक ठिकाणीं

राजधर्माची व्याख्या केलेली दिसेल. राज्यव्यवहाराचीं निरनिराळीं खातीं करून त्यांवर मंत्री नेमलेले असत. धार्मिक बाबींत सल्ला देण्यास एक पुरोहित असे. हेराचेंहि एक स्वतंत्र खातें होतें. ग्रामाधिपति हा कनिष्ठ मुलकी अंमलदार असून त्याच्यावर दहागांवचा, वीसगांवचा, शंभरगांवचा असे वरिष्ठ अधिकारी असत. या सर्वांवर एक मुख्य फडणीस असे. राज्याचा मुख्य महसूल म्हणजे जमीन व व्यापारी माल यांवरील कर होय. जमीनीवरील कर ⅙ असे (जमाबंदी, जमीनमहसूल पहा). व तो धान्याच्या रूपानें द्यावयाचा असे. अफू, दारू व जंगल या उत्पन्नाच्या बाबी त्याकाळीं तरी नसाव्यातसें दिसतें. पोलीस, पाटबंधारे, तकवी व फौजा या खर्चाच्या मुख्य बाबी होत्या. न्यायदान आधुनिक बेंच व ज्यूरी यांसारख्या पद्धतीनें होत असे. प्रथम राजाच कांहीं सल्लागारांच्या मदतीनें निवाडा करी पण पुढें न्यायाधीश किंवा अमात्य याकामीं नेमण्यांत येऊं लागले. राजाजवळ एक परराष्ट्रमंत्री असावा; तो होतां होईतों इतर राष्ट्रांशीं सामाचें धोरण ठेवी. भेदनीतीहि अवलंबिली जाई. रा. चिं. वि. वैद्य यांनीं महाभारताचा उपसंहार या ग्रंथांत 'राजकीय परिस्थिति' (प्र. ९) या सदराखालीं या काळाच्या राज्यव्यवस्थेची उत्तम चर्चा केलेली आहे.

मौर्यकालीन राज्यव्यवस्था अतिशय नमुनेदार व आधुनिक पाश्चात्य राज्यपद्धतीच्या धर्तीची होती. राज्याचीं निरनिराळीं खातीं पाडलीं असून त्यांवर एकेक अध्यक्ष (सुपरिंटेंडेंट) असे. त्यांकरितां नियम घालून दिलेले असत. कौटिलीय अर्थशास्त्रावरून आपणाला या काळच्या राजशासनाचें अत्युत्तम ज्ञान मिळूं शकतें. इतक्या प्राचीन काळींहि इतकी कार्यक्षम व प्रगत राज्यपद्धति हिंदुस्थानांत होती हें निःसंशय भूषणावह आहे. यासंबंधीं सविस्तर विवेचन 'अर्थशास्त्र' या लेखांत व 'बुद्धोत्तरजग' प्र. १२ पृ. २४६–९१ यांत केलेलें आढळेल. गुप्तकालीन व हर्षकालीन राजकीय परिस्थिति फाहिआन व ह्युएनत्संग या चिनी प्रवाश्यांच्या माहितीवरून लक्षांत येते. बाणाचें हर्षचरित्र व तत्कालीन शिलालेख व ताम्रपट हींहि या कामीं चांगलीं उपयोगी पडतील. गुप्तकालीं फौजदारी कायदा सौम्य होता, फांशीची शिक्षा बहुतेक कधींच होत नसे. सरकारी अधिकाऱ्यांचे पगार ठरावीक असत व त्यांनां रयतेवर जुलूम करूं देत नसत. अबकारी उत्पन्न मुळींच नसे. भुक्ति, वाड किंवा मंडळ (जिल्हा), विषय, नाड किंवा आहार (तालुका), व ग्राम असे देशा (राज्या)चे घटक असत. ग्रामव्यवस्था फारच उत्कृष्ट असे. अक्षपटलिक (पाटील) व करणिक (कुळकर्णी) हे ग्रामाधिकारी असत. मुख्य वसूलअधिकाऱ्याला महाक्ष पटलिक म्हणत. जमीनीची मोजणी करून उद्रंग (कर) ठरवीत. उपरिकर हा जमीनीवरील धान्यांखेरीज जिन्नसांवरचा कर असे दर गांवीं सभा (धर्मशाळा), सत्र (अन्नछत्र), प्रपा (पाणपोई) आणि प्राग्वंश (यज्ञशाळा) सरकारी असत. चौरोद्धरनिक (फौजदार) व दंडनायक (मॅजिस्ट्रेट) दर विषयावर असत. लहान खटले ग्रामपंचायतीकडे व मोठे न्यायसभांकडे जात. सरकारी अहवाल ठेवण्याचीहि पद्धत असे. वलभींची राज्यपद्धति अशीच होती, त्याविषयीं सविस्तर माहिती मुंबई गेझेटियर मालेतील गुजराथचा इतिहास या पुस्तकांत आढळेल. राजस्थानीय हा परराष्ट्रमंत्री किंवा जिंकलेल्या प्रांतावरचा सुभेदार असावा. शौल्किक हा जकातखात्याचा अध्यक्ष व अनुत्पन्नधनसमुद्ग्राहक हा थकलेल्या धान्याची वसुली करणारा अधिकारी होता. भोगिक किंवा भोगोधरणिक हा जमीन महसूल घेत असे.

मोंगली राज्यपद्धति हिंदुस्थानाबाहेरच्या खिलाफती धर्तीवरच होती; तथापि देशकालमानानें तींत फेरबदल केला होता. प्राचीन हिंदु ग्रामव्यवस्था मोंगल बादशहांनीं फारशी बदलली नव्हती. अकबराची राज्यव्यवस्था फार सुव्यवस्थित असे (अकबर पहा). तीच पुढें औरंगझेब व त्याचे मांडलिक हिंदु मुसलमान राजे यांनीं कायम ठेविली होती. आजहि ती बऱ्याच संस्थानांतून दृष्टोत्पत्तीस येते. एकंदर हिंदुस्थानच्या राज्यपद्धतींत प्रथम मोंगलांनींच एकसूत्रीपणा आणला. सारखीं नाणीं, एकच सरकारी भाषा (फारशी), सर्व प्रांतांतील विशिष्ट सरकारी नोकरांचें एक बादशाही खातें, प्रांतांचे सारखे विभाग व अधिकार यांमुळें साम्राज्यांत राजकीय संघटना दिसून येई. मोंगली सत्ता लष्करी सामर्थ्यावर अधिष्ठित झाली असल्याकारणानें प्रत्येक अधिकाऱ्याचें नांव लष्करी पटावर असे. त्याला ठरावीक मनसब दिलेली असे. जमीनमहसुलाची पद्धत पूर्वीचीच कायम ठेवून त्या खात्यांत हिंदु कामगार नेमलेले असत. सरकारला लागणारें सर्व सामान सरकारी कारखान्यांतच तयार होई. ठेक्याची पद्धत आस्तित्वांत नव्हती. सरकारी दप्तर फार मोठें असे. या मोंगली राज्यपद्धतीच्या धोरणाची

चर्चा प्रो. जदुनाथ सरकारनीं आपल्या 'मुघल ॲडमिनिस्ट्रेशन' या ग्रंथांत कागदपत्रांच्या आधारें केलेली आहे (तिचा गोषवारा ज्ञानकोश विभाग ४ था यांत पृष्ठं ४ वर दिलेला आढळेल).

शिवाजीनेंहि हीच मोंगलपद्धति स्वीकारली. शिवाजीनें स्थापिलेली 'अष्टप्रधान' संस्था फारच उपयुक्त व कार्यक्षम अशी होती (अष्टप्रधान पहा). या प्रधानांत एकंदर कामाची वांटणी केलेली असे. नवीन कामें निघाल्यावर पुढें या प्रधानांच्या संख्येंत कांहीं भर पडली. पेशवाईत हे अष्टप्रधान मनसबदार बनले. मराठ्यांचें अर्थशास्त्रीय धोरण त्यांच्या चंचल राज्यवृद्धीमुळें प्रजेला फारसें हितकर होऊं शकलें नाहीं. परकीय पाश्चात्त्याविषयींच्या साशंक वृत्तीमुळें मराठ्यांचें व्यापारी धोरण संकुचित दिसत असलें तरी व्यापारामुळें देश समृद्ध होतो हें तत्त्व त्यांनां पूर्ण अवगत होतें यांत शंका नाहीं ('अर्थशास्त्र' ज्ञानकोश वि. ७ पृ. [अ]४४७–५० पहा). राष्ट्रीय कर्जाची कल्पनाच मराठेशाहींत नव्हती. त्यामुळें राज्यव्यवस्थेंत फार अडथळे आलेले दिसतात. सरंजामी पद्धतीचे दोष दिसत असूनहि ती पेशव्यांनां अंगिकारावी लागली. मुलकी व्यवस्था मात्र चांगली असे. दिवाणी व फौजदारी कायद्याची अंमलबजावणी नीट होत असे. जमीनमहसुलाखेरीज निरनिराळ्या धंद्यांवर कर असत. मोंगल सरकाराप्रमाणें मराठे सरकारहि आपले कारखाने ठेवी. सरकारी व खाजगी टांकसाळी असत. अबकारी उत्पन्न केवळ नांवाचेंच असे. प्रजेंत विद्यावृद्धि करणें हें मागील राज्यांतल्याप्रमाणें मराठी राज्यांतहि सरकारचें आवश्यक कर्तव्य समजलें जात नसे. विद्येची बाब धार्मिक समजली जाऊन धर्मादाय खात्यांतून विद्वानांनां दक्षिणा, देणग्या वगैरे मिळत.

**ब्रिटिश राज्यपद्धति.**—हिंदुस्थानांत सतराव्या शतकाच्या आरंभीं लंडनमधील कांहीं व्यापाऱ्यांनीं ईस्ट इंडिया कंपनी स्थापन केल्यापासून इंग्लंडचा पाय हिंदुस्थानांत पडला असें म्हणण्यास हरकत नाहीं. या कंपनीनें प्रथमतः शतक दीडशतक हिंदुस्थानांत व्यापारी वर्चस्व मिळविण्याकरितां हॉलंड व फ्रान्स या दोन राष्ट्रांशीं झगडा केला. नंतर हिंदुस्थानचा सर्व व्यापार कंपनीच्या हातीं आल्यानंतर तिनें हळू हळू आपलें व्यापारी धोरण सोडून हिंदुस्थानच्या राजकारणांत लक्ष घालण्यास सुरुवात केली व एतद्देशीय राजांशीं लढाया करून अगर अन्यमार्गांचा अवलंब करून कंपनीनें हिंदुस्थानांत बराचसा मुलूख मिळविला. प्रथमतः प्लासीच्या लढाईमुळें कंपनीला बंगालची पुनर्घटना करण्याचें काम अंगावर घ्यावें लागलें व कंपनीचे मूठभर व्यापारी लोक बादशहाच्या नांवानें एका मोठ्या प्रांताच्या वसुलाचा कारभार पाहूं लागले. तथापि कंपनीचा कारभार अव्यवस्थितपणाचा व घोंटाळ्याचा होऊं लागल्यामुळें ब्रिटिश पार्लमेंटला कंपनीच्या कारभारामध्यें हात घालणें भाग पडलें व पुढें १८५७ सालापर्यंत कंपनी व पार्लमेंट या दोहोंनीं हिंदुस्थानांतील आपल्या मुलुखांवर राज्यकारभार चालविल्यानंतर १८५८ सालीं पार्लमेंटनें हिंदुस्थानचा राज्यकारभार पूर्णपणें आपल्या जबाबदारीवर चालविण्याचें धोरण जाहीर केलें व त्यावेळेपासून ब्रिटिश हिंदुस्थानावर पार्लमेंटची सत्ता कायम झाली असें म्हणावयास हरकत नाहीं.

लंडन येथील मूठभर व्यापाऱ्यांनीं हिंदुस्थानाशीं व्यापार करण्याच्या निमित्तानें ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना केल्यापासून तों सर्व हिंदुस्थान पार्लमेंटच्या ताब्यांत जाईपर्यंतचा इतिहास स्थूलमानानें सांगितल्यानंतर या कंपनीचा व ब्रिटिश पार्लमेंटचा हिंदुस्थानांतील कारभार कसा व कोणत्या धोरणावर चालविला जात असे व जातो याकडे लक्ष देणें आवश्यक आहे. १६९८ सालीं ईस्ट इंडिया कंपनीचें लिमिटेड कंपनीमध्यें रूपांतर झालें. या कंपनीचा विलायतेंतील कारभार अनुक्रमें कोर्ट ऑफ प्रोप्रायटर्स व कोर्ट ऑफ डायरेक्टर्स या दोन मंडळांमार्फत होत असे. कोर्ट ऑफ डायरेक्टर्स मध्यें भागीदारांनीं निवडून दिलेले चोवीस सभासद असत. या मंडळाकडे कंपनीच्या अंतर्व्यवस्थेचें काम असे. कोर्ट ऑफ डायरेक्टर्स हे आपल्या कारभाराबद्दल कोर्ट ऑफ प्रोप्रायटर्सनां जबाबदार असत. कंपनीचा हिंदुस्थानांतील कारभार चालविण्याकरितां खास व्यवस्था करण्यांत आली होती. मद्रास, मुंबई व कलकत्ता या टापूंतील आपल्या वखारींची सर्व व्यवस्था पहाण्याकरतां प्रत्येक टापूवर एक प्रेसिडेंट व त्याच्या मदतीला एक कौन्सिल नेमण्यांत आलें होतें. प्रेसिडेंटच्या ताब्यांतील मुलुखास प्रेसिडेन्सी असें नांव पडलें.

जोंपर्यंत या कंपनीचें धोरण फक्त व्यापार करण्याचें होतें तोंपर्यंत प्रेसिडेंट व त्याचें मंडळ यांनां काम करणें फारसें कठिण जात नसे पण प्लासी व बक्सारच्या लढायांनंतर कंपनीनें ज्यावेळीं राजकीय उलाढालींत प्रत्यक्षपणें भाग घेण्यास सुरुवात केली त्यावेळेपासून तिच्या

कामाचा व्याप वाढला. युद्धाकरतां पैसा खर्च झाल्यामुळें व त्यामुळें व्यापाराकडे दुर्लक्ष होऊं लागल्यामुळें कंपनी डबघाईस येऊं लागली. कंपनीच्या कारभारांत सावळागोंधळ माजला; १७६५ सालीं बंगाल, बिहार व ओरिसा या तीन प्रांतांची दिवाणी सनद म्हणजे वसूल गोळा करण्याचा हक्क कंपनीला मिळाला व फौजदारी अधिकार नवाबाकडे राहिला. अशा रीतीनें या प्रांतावर दुहेरी राज्यपद्धति सुरू झाली. या दुहेरी राज्यपद्धतीनें कंपनीवर पुः संकट ओढवलें. कंपनीच्या नोकरांनां त्यावेळीं थोडा पगार मिळत असे पण ते खाजगी व्यापार करून गबर होत व इंग्लंडमध्यें परत येऊन एखाद्या नवाबाप्रमाणें डामडौलानें रहात. पण वास्तविक कंपनीची स्थिति मात्र हलाखीची झाली होती. वॉरन हेस्टिंग्जच्या कारकीर्दींत तर कंपनीची स्थिति फारच बिघडली व वॉरन हेस्टिंग्जच्या वागण्याच्या पद्धतीवर टीका होण्यास सुरुवात झाली. याच सुमारास कंपनीनें पार्लमेंटकडे कर्ज मिळण्याबद्दल विनंति केली. या संधीचा फायदा घेऊन कंपनीच्या कारभारांत आपला पार्लमेंटनें हात शिरकावून घेतला.

या वेळीं लॉर्ड नॉर्थ हा इंग्लंडचा मुख्य प्रधान होता. त्याचें धोरण कंपनीला सर्वस्वी प्रतिकूल होतें. त्यानें प्रथमतः एक ठराव करून कंपनीनें हिंदुस्थानांतील व्यापारामुळें जो फायदा कमावला असेल त्यावर पार्लमेंटची सत्ता आहे असें ठरविलें व कंपनीला कर्जबाजारीपणांतून मुक्त करण्याकरितां पार्लमेंटमध्यें एक कायदा पास करून घेतला. या कायद्यानें पार्लमेंटचा हिंदुस्थानाशीं प्रथमतः संबंध जडला असें म्हणावयास हरकत नाहीं.

रेग्युलेटिंगॲक्ट ( १७७३ ).–१७७३ सालीं नॉर्थनें कंपनीच्या राज्यकारभारासंबंधीं जो कायदा केला त्याला ' रेग्युलेटिंग ' असें नांव आहे. या कायद्यानें कंपनीच्या घटनेंत महत्त्वाचे फेरफार झाले. पूर्वी कंपनीचा हिंदुस्थानांतील कारभार पाहण्याकरितां प्रेसिडेंट व त्याचें कौन्सिल नेमण्यांत येई. त्याबदलीं बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांचा सर्व अधिकार एक गव्हर्नर जनरल व त्याला सल्ला देण्याकरितां चार इसम यांच्या हातांत देण्यांत आला. या कायद्यापूर्वी मद्रास, मुंबई व कलकत्ता हे इलाखे परस्परांपासून स्वतंत्र होते पण या कायद्यानें कलकत्त्याच्या गव्हर्नर जनरलची हुकमत मुंबई व मद्रास इलाख्यांवर चालू लागली. पूर्वी कंपनीचें कलकत्त्यास मेयरचें कोर्ट असे त्या जागीं एक वरिष्ठ न्यायकचेरी स्थापण्यांत आली व या सुप्रीम कोर्टांत एक मुख्य न्यायाधीश व तीन दुय्यम न्यायाधीश विलायतेंतून आणून नेमण्यांत यावे व त्यांचा अधिकार गव्हर्नर जनरल व त्याचें कौन्सिल याशिवाय बाकी सर्व लोकांवर सर्व बाबतींत चालावा असें ठरविण्यांत आलें. नोकर लोकांनां भरपूर पगार देऊन लांचलुचपतीचे प्रकार बंद करण्याचा प्रयत्न करण्यांत आला. कंपनीच्या ताब्यांतील मुलुखासंबंधीं जरूर ते कायदे करण्याचा अधिकार गव्हर्नरजनरल व त्याचें मंडळ यांस देण्यांत आला. पण हे कायदे बादशहाला पसंत न पडल्यास ते रद्द म्हणून समजावेत असें ठरविण्यांत आलें. शिवाय गव्हर्नर जनरलनें व त्याच्या कौन्सिलनें केलेले कायदे वरिष्ठ न्यायकोर्टांत रजिस्टर करण्यांत यावेत व ते सुप्रीम कोर्टाच्या संमतीनें प्रसिद्ध करण्यांत यावेत असेंहि कलम त्यांत घालण्यांत आलें.

अशा रीतीनें या कायद्यानें कंपनीचा राज्यकारभार अर्धवट आपल्या हातांत घेऊन तो सुरळीत चालण्याची योजना केली तरी या कायद्यांत बरेच दोष होते. गव्हर्नर जनरल व त्याचें कौन्सिल यांनीं केलेले कायदे वरिष्ठ न्यायकोर्टांत नोंदण्यांत यावेत असें जें कलम होतें त्यामुळें कोर्ट व कौन्सिल यांच्यामध्यें परस्परांच्या श्रेष्ठतेविषयीं भांडण होऊं लागलें. कौन्सिलमधील सभासदांच्या मताधिक्यानें कंपनीचा कारभार हिंदुस्थानांत गव्हर्नर जनरलनें चालविला पाहिजे या कलमानें गव्हर्नर जनरलचा अधिकार मर्यादित करण्यांत आला होता व गव्हर्नर जनरलच्या विरुद्ध जर कौन्सिलांत सभासद असतील तर त्यामुळें गव्हर्नरमध्यें व त्याच्या कौन्सिलमध्यें बेबानाव उत्पन्न झाल्याशिवाय रहात नसे. यामुळें या कायद्यानें बऱ्याच भानगडी उपस्थित होऊं लागल्या व त्यांचें निराकरण करण्यासाठीं पार्लमेंटला नवीन कायदा करणें भाग पडलें. तथापि रेग्युलेटिंग ॲक्टानें जी महत्त्वाची गोष्ट घडवून आणली ती म्हणजे हिंदुस्थानांतील कंपनीच्या राज्यकारभारावर पार्लमेंटचा अंशतः अंमल स्थापन होऊन कंपनीच्या कारभाराचें केंद्र विलायतेंतून उठून कलकत्त्यास आलें हीं होय.

पिट्स इंडिया ॲक्ट(१७८४):–रेग्यूलेटिंग ॲक्टामध्यें जे दोष होते त्या दोषांचा परिणाम थोडक्याच दिवसांत दिसूं लागला. तशांतच वारन हेस्टिंग्जच्या स्वैर कारभारामुळें तर कंपनीच्या कारभाराकडे पार्लमेंटचें लक्ष जोरानें

वेधलें गेलें. लॉर्ड नॉर्थ व फॉक्स यांचें प्रधान मंडळ अधिकारारूढ झाल्यावर फॉक्सनें या बाबतींत एक बिल आणलें. या बिलाचा उद्देश कंपनीचे राजकीय बाबतींतील अधिकार काढून घेण्याचा होता. पण फॉक्सचें बिल नापास झालें. त्यानंतर पिट हा इंग्लंडचा प्रधान झाल्यानंतर त्यानें कंपनीच्या कारभारांत सुधारणा करणारें आपलें बिल पुढें मांडलें; व तें पासहि झालें. या बिलानें पार्लमेंटमधील सहा समासदांचें एक मंडळ स्थापण्यांत येऊन त्याला बोर्ड ऑफ कंट्रोल हें नांव देण्यांत आलें. या नियामक मंडळांत इंग्लंडचा चॅन्सेलर ऑफ एक्सचेकर, एक सेक्रेटरी ऑफ स्टेट व चार पार्लमेंटचे सभासद असावयाचे होते. या नियामक मंडळाचें काम कंपनीच्या व्यवस्थापकमंडळाच्या कामकाजावर नजर ठेवण्याचें होतें. या नियामक मंडळाला जरूर असेल तेव्हां व्यवस्थापक मंडळाच्या परोक्ष गुप्त खलितें हिंदुस्थानांत पाठविण्याचा अधिकार देण्यांत आला व यासाठीं एक गुप्त कमिटि नेमण्यांत आली. गव्हर्नरजनरलच्या कौन्सिलांत सभासदांची संख्या चाराच्या ऐवजीं तीन करण्यांत आली व त्यांत सेनापति हा सभासद असला पाहिजे असें ठरविण्यांत आलें. मुंबई व मद्रास येथील गव्हर्नरांच्या मदतीसहि तीन सभासदांचें मंडळ देण्यांत आलें. गव्हर्नरजनरलची मद्रास व मुंबई येथील गव्हर्नरांवरील हुकमत अधिक व्यापक करण्यांत आली.

सारांश, या नवीन ॲक्टानें रेग्युलेटिंग ॲक्टमधील दोष काढून टाकण्याचा प्रयत्न केला. या ॲक्टानें कंपनीच्या ताब्यांतून राजकीय सत्ता जाऊन ती पार्लमेंटच्या ताब्यांत गेली व फक्त व्यापारी सत्ता मात्र कंपनीच्या ताब्यांत राहिली; व त्यामुळें हिंदुस्थानांतील कंपनीच्या मुलुखावर कंपनी व पार्लमेंट यांचा दुहेरी कारभार सुरू झाला. कंपनीच्या ताब्यांत हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांच्या नेमणुका करण्याचा अधिकार तेवढा राहिला.

अशा रीतीनें १७८४ च्या पिटच्या बिलानें जी द्विदलराज्यपद्धति अस्तित्वांत आली ती १८५८ सालीं पार्लमेंटची हिंदुस्थानावर संपूर्ण सत्ता प्रस्थापित होईतोंपर्यंत कायम राहिली. १७८४ सालच्या बिलानें हिंदुस्थानांत अधिक मुलूख मिळविण्याचा प्रयत्न करण्याला अगर राज्यविस्तार करण्याला बंदी केली होती. तथापि तिचा कांहींच उपयोग झाला नाहीं. लार्ड कार्नवालीस व लार्ड वेलस्लीच्या कारकीर्दींत कंपनीच्या ताब्यांत अधिकाधिक मुलूख येत गेला त्यामुळें पार्लमेंटलाहि कंपनीच्या राज्यकारभारासंबंधीं बरेच कायदे करावे लागले.

सन १७८६ च्या कायद्यान्वयें गव्हर्नरजनरलला आणीबाणीच्या वेळीं त्याच्या कौन्सिलच्या बहुमताविरुद्ध वागण्याची परवानगी देण्यांत आली. तसेंच गव्हर्नरजनरलच्या हातांतच सेनापतीचा अधिकार देण्यांत आला. १७७३ सालच्या ॲक्टानें दर वीस वर्षांनीं कंपनीच्या सनदेची मुदत वाढवावयाची असें ठरविलें होतें. १७९३ सालीं ज्यावेळीं कंपनीला नवीन सनद करून देण्याचा प्रश्न पुढें आला त्यावेळीं पिट हाच प्रधान असल्यानें कंपनीला आणखी २० वर्षें सनद मिळाली. १८०७ च्या ॲक्टान्वयें मुंबई व मद्रास येथील कौन्सिलांनां कायदे करण्याचा अधिकार मिळाला. पण हे कायदे सुप्रीम कोर्टानें मंजूर केल्याशिवाय त्यांनां कायद्याचें स्वरूप येऊं नये असें ठरविण्यांत आलें. १८१३ सालीं पुन्हां कंपनीला नवीन सनद देतांना पार्लमेंट कंपनीच्या कारभाराची कसून चौकशी करीत असे. यावेळीं कंपनीच्या कारभारांत बराच गोंधळ झाल्यामुळें पार्लमेंटनें अधिक कसून चौकशी केली. ही चौकशी करण्याकरतां नेमलेल्या कमिटीनें आपल्या रिपोर्टांत अशी शिफारस केली कीं, हिंदुस्थानाशीं व्यापार करण्याकरतां सर्व यूरोपियन व्यापाऱ्यांनां मोकळीक देण्यांत यावी. पार्लमेंटनें त्या शिफारशीला अनुसरूनच ठराव केला. कंपनीकडे फक्त चीनमधील चहाचा व्यापार व अफूचा व्यापार करण्याचेच तेवढे हक्क राहिले. पुढें १८३३ सालीं पुन्हां कंपनीची मुदत वाढविण्याचा प्रश्न आला. व पार्लमेंटनें आणखी २० वर्षेंपर्यंत कंपनीला सनद दिली. पण ही सनद देतांना पार्लमेंटनें कंपनीच्या कारभारांत महत्त्वाचे फेरफार केले. यावेळीं इंग्लंडमध्यें उदारमतवादीपक्ष अधिकारारूढ होता. हिंदुस्थानांत वेलस्लीच्या चढाईच्या धोरणामुळें व हेस्टिंग्जच्या कारकीर्दीतील लढायांमुळें कंपनीला बराच अधिक मुलूख मिळाला, व त्यामुळें राज्यकारभारामध्यें नित्य नवे घोटाळे उत्पन्न होत. १८३३ सालच्या ॲक्टानें पार्लमेंटनें जो महत्त्वाचा फरक केला तो म्हणजे कंपनीची व्यापारी सत्ता पूर्णपणें संपुष्टांत आली व हिंदुस्थानचा व्यापार सर्वांस खुला झाला. तसेंच कंपनीच्या सर्व मुलुखांवर इंग्लंडच्या राजाचा मालकी हक्क असून राजाच्या वतीनें राज्यकारभार चालविण्याचा कंपनीला हक्क देण्यांत आला आहे असें कलम या ॲक्टांत घालण्यांत आलें. अशा रीतीनें

सुमारें सव्वा दोनशें वर्षें व्यापार केल्यानंतर कंपनी पूर्णपणें राजकीय संस्था बनली. या अॅक्टानें बंगालचा गव्हर्नर जनरल हा हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल झाला व त्याच्या ताब्यांत दिवाणी, मुल्की व लष्करी अधिकार देण्यांत आले. गव्हर्नरांचीं कौन्सिलें मोडण्यांत येऊन व त्यांचे कायदे करण्याचे अधिकार काढून घेण्यांत येऊन ते गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलांत कायदेपंडित म्हणून चौथ्या सभासदाची नेमणूक करण्यांत आली. तसेंच या कायद्यानें असेंहि ठरविलें कीं, सर्व हिंदी कायदे व नवीन नेमणूक झालेल्या लॉ-कमिशनर्सचे रिपोर्ट पार्लमेंटपुढें मांडण्यांत यावेत.

सारांश या कायद्यानें कंपनीच्या राज्यकारभारांत बरेच महत्त्वाचे फेरफार घडवून आणले. लॉर्ड मोर्ले यांनीं म्हटल्याप्रमाणें पिटच्या अॅक्टानंतर व १८५७ सालीं कंपनीचा राज्यकारभार पार्लमेंटच्या हातांत जाईतोंपर्यंत एवढा महत्त्वाचा कायदा झाला नाहीं म्हटलें तरी चालेल.

पुन्हां वीस वर्षांनीं ज्यावेळीं कंपनीला नवीन सनद करून देण्याची वेळ आली त्यावेळीं पार्लमेंटनें नेहमींप्रमाणें कंपनीची सनद वीस वर्षेंपर्यंत वाढविली नाहीं. पार्लमेंट दुसरी कांहीं तरी व्यवस्था ठरवीपावेतों कंपनीनें इंग्लंडच्या राजाची ठेव या नात्यानें हिंदुस्थानचा राज्यकारभार पहावा असा मोघम उल्लेख करण्यांत आला होता. त्यामुळें कंपनीची सद्दी संपत आल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं व थोडक्याच दिवसांत तीं खरीहि ठरलीं. याशिवाय या नवीन अॅक्टानें जे फेरफार घडवून आणिले ते म्हणजे बंगालवर स्वतंत्र लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्यांत आला, १८३३ च्या कायद्यानें कायदेपंडिताला कायद्याच्या प्रश्नापुरताच कौन्सिलच्या कामकाजांत भाग घेतां येत असे तो आतां त्याला सर्रास कौन्सिलच्या कामकाजांत भाग घेतां येऊं लागला. गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलमधील सभासदांची कायदे करण्यापुरती वाढ करण्यांत येऊन या नव्या कायदेमंडळांत गव्हर्नर जनरल, मुख्य सेनापति, बंगालचे सर न्यायाधीश, साधारण न्यायाधीश व चारी प्रांतांचे चार प्रतिनिधी इतके सभासद घेण्यांत यावे असें ठरविण्यांत आलें.

१८५४ सालचा सनद देण्याचा हा शेवटचाच कायदा ठरला. या कायद्यामध्येंच कंपनीच्या राज्यकारभाराची मुदत अनिश्चित ठेवण्यांत आली होती व अवघ्या चार वर्षांतच कंपनीचें आयुष्य शेवटास गेलें.

नवीन मनूला सुरुवात:–१८५७ सालच्या बंडानें हिंदुस्थानांत नवीन मनूलाच सुरुवात झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. या बंडानें कंपनीच्या राज्यकारभाराचा शेवट होऊन ब्रिटिश पार्लमेंटनें हिंदुस्थानचा राज्यकारभार आपल्या ताब्यांत घेतला. त्यामुळें दुहेरी राज्यपद्धतीचा शेवट झाला आणि एकमुखी सत्ता स्थापन झाली. जी सत्ता पूर्वी कोर्ट ऑफ डायरेक्टर्स (व्यवस्थामंडळ) व पार्लमेंटरी बोर्ड ऑफ कंट्रोल (पार्लमेंटनें नेमलेलें नियामक मंडळ) यांच्या ताब्यांत होती ती पार्लमेंटला जबाबदार असणाऱ्या स्टेटसेक्रेटरी उर्फ भारतमंत्र्यांच्या ताब्यांत गेली आणि त्यांच्या मदतीसाठीं एक कौन्सिल देण्यांत आलें. भारतमंत्र्यांना वरील दोन्ही मंडळांना असणारे अधिकार प्राप्त झाले. प्रत्यक्ष हिंदुस्थानांत राज्यकारभार चालविण्याकरितां व्हॉईसराय, गव्हर्नर, लेफ्टनंट गव्हर्नर, कमिशनर इत्यादि अधिकारी नेमण्यांत आले. अशा रीतीनें हिंदुस्थानावर ब्यूराक्रसी उर्फ नोकरशाही पद्धत अंमलांत आली.

सन १८६१ चा कायदा–१८५८ मध्यें पार्लमेंटनें आपल्या ताब्यांत हिंदुस्थानचीं राज्यसूत्रें घेतल्यानंतर पार्लमेंटला लौकरच असें आढळून आलें कीं, हिंदुस्थानच्या राज्यकारभारासंबंधीं कायदे करण्याच्या बाबतींत लोकमताचें पाठबळ असणें जरूरीचें आहे. तसेंच लॉर्ड डलहौसीनें कायदेमंडळामध्यें ज्या सुधारणा केल्या होत्या त्या समाधानकारक व पुरेशा नव्हत्या, बंगालकडे अद्यापि जो अधिकार होता तो मुंबईच्या आणि मद्रास सरकारच्या डोळ्यांत खुपत होता. सबंध हिंदुस्थानच्या कारभारासाठीं एकट्याच कौन्सिलनें कायदे करणें हें अत्यंत कठिण काम झालें होतें. कौन्सिलचें स्वरूप छोट्याशा पार्लमेंटसारख्या प्रतिनिधिसभेप्रमाणें होऊन त्यामध्यें तक्रारींचा विचार करून त्या तक्रारी मिटविण्याचें काम कौन्सिलनें अंगावर घेतलें होतें तेंहि बरोबर नाहीं असें पार्लमेंटला वाटूं लागलें. १८५७ सालच्या बंडामुळें तर हिंदुस्थानविषयक कायदे करण्याच्या बाबतींत हिंदी लोकांशी सहकारिता करून त्यांची कायदे करण्याच्या बाबतींत मदत घेणें आवश्यक आहे अशी खात्री पटूं लागली. १८६० मध्यें बॉटलें फ्रियरनीं लिहिलेल्या एका लेखामध्यें असें स्वच्छ म्हटलें होतें कीं, 'आपल्या (सरकारच्या) कायद्यांसंबंधीं येथील हिंदी

रहिवाश्यांचें मत कसें काय आहे व या कायद्यांचा देशी समाजावर कसकसा परिणाम होणार आहे हें अप्रत्यक्षपणें समजण्याचें कमी होत चालल्यानें हिंदी लोकमताचा शिरकाव कायदेमंडळांत होणें जरूर आहे असें माझें मत आहे'. अशा रीतिनें १८३३ व ५३ सालच्या कायद्यांमध्यें सुधारणा होणें अत्यंत आवश्यक आहे असें खुद्द अधिकाऱ्यांचें मत बनत चाललें होतें. तत्कालीन व्हाईसरॉय लॉर्ड कॅनिंग यासहि मुंबई व मद्रास प्रांतांनां स्वतंत्र कायदेकौन्सिल असावें व त्यांना कांहीं मर्यादित हक्क देण्यांत यावे असें वाटूं लागलें. अशा प्रकारच्या परिस्थितींत १८६१ चा कौन्सिल ॲक्ट करण्यांत आला. हा ॲक्ट होण्याचें तत्कालीन कारण म्हणजे प्राप्तीच्या करासंबंधानें मद्रास सरकार व वरिष्ठ सरकार यांच्यामध्यें झालेला बेबनाव होय. तथापि हें तत्कालीक कारण असलें तरी त्याच्या पूर्वीच १८३३ च्या ॲक्टांत सुधारणा करण्याची आवश्यकता भासूं लागली होती हें निर्विवाद होय.

१८६१ च्या 'दि इंडियन कौन्सिल ॲक्टा' नें बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टी घडवून आणल्या. मुंबई व मद्रास सरकारची कायदे करण्याची सत्ता जी १८३३ च्या कायद्यानें काढून घेण्यांत आली होती ती एका महत्त्वाच्या फरकासह १८६१ च्या कायद्यानें परत देण्यांत आली. तो फरक म्हणजे पूर्वी स्थानिक कौन्सिलांनीं केलेल्या कायद्यांनां गव्हर्नर जनरलची संमति घेण्याची आवश्यकता नसे ती या नवीन कायद्यानें कांहीं विशिष्ट बाबींसंबंधाच्या कायद्यांच्या बाबतींत आगाऊ घेणें भाग पडूं लागलें; व बाकीच्या सर्व कायद्यांनां गव्हर्नरच्या पसंतीनंतर गव्हर्नरजनरलची पसंति घेण्याची पद्धत अंमलांत आली. अशा रीतीनें गव्हर्नर जनरल हा ब्रिटिश हिंदुस्थानासंबंधीं कायदे करण्याच्या बाबतींत सत्ताधीश झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. तसेंच या नव्या कायद्यानें, इतर प्रांतांमध्येंहि कायदेमंडळें स्थापण्याची परवानगी मिळाली; व त्याप्रमाणें पंजाब, संयुक्तप्रांत, बंगाल इत्यादि ठिकाणीं प्रांतिक कायदे-मंडळें स्थापन झालीं; आणि त्यामुळें कायदे करण्याच्या सत्तेमध्यें विभागणी झाली. तसेंच या कायद्यानें गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलमध्येंहि फेरफार घडवून आणले. या कायद्यानें गव्हर्नरजनरलच्या कौन्सिलांत पांच साधारण व सेनापति हा असाधारण असे सहा सभासद असावयाचे व त्याशिवाय सहापेक्षां कमी नाहींत व बारापेक्षां अधिक नाहींत इतके सरकारनियुक्त जादा सभासद असावयाचे असें ठरविण्यांत आलें. या सभासदांची नेमणूक दोन वर्षेपर्यंत असावयाची असें ठरलें. तसेंच गव्हर्नर जनरल व त्याचें कौन्सिल यांचा कायदे करण्याचा अधिकार वाढविण्यांत आला. या अधिकारांत महाराणी सरकारच्या ताब्यांत आलेल्या प्रदेशांमधील हिंदी ब्रिटिश व परदेशीय लोक व त्या टापूंतील न्यायकोर्टें, सर्व प्रदेश, स्थावरजंगम वस्तू, राजेरजवाडे इत्यादींवर गव्हर्नर जनरलचाच अधिकार आहे असें समजण्यांत आलें. नॉन रेग्युलेशन प्रांतांसंबंधीं कायद्यांत आवश्यक असे फेरफार करून सुधारलेल्या कायद्यांनां कायदेशीर स्वरूप देण्यांत आलें. व्हॉईसरायला सहा महिनेपर्यंत टिकणारे ऑर्डिनन्सेस (खास वट हुकूम) काढण्याचा अधिकार देण्यांत आला. नवीन कौन्सिलांनां फक्त कायदे करण्याचाच अधिकार देण्यांत आला. मुंबई व मद्रास येथील कार्यकारी मंडळें पूर्वीप्रमाणेंच कायम ठेवून त्यांच्या मदतीस प्रत्येक प्रांतांत ॲडव्होकेट जनरल व चार ते आठ जादा सभासद घेण्याविषयींचें कलम घालण्यांत आलें. या जादा सभासदांपैकीं निम्मे तरी बिन अधिकारी असावेत असें ठरविण्यांत आलें. या कायद्यानें कार्यकारी मंडळाची सत्ता मर्यादित करण्यांत आली.

१८६१ सालच्या कायद्याला पुढें १८६९-७०-७१ सालीं पुरवण्या जोडण्यांत आल्या. १८६९ सालच्या पुरवणीनें हिंदुस्थानाबाहेरील हिंदी प्रजाजनांना कायदा लागू करण्याचा अधिकार व्हॉईसराय यास मिळाला. १८७० च्या पुरवणी कायद्यानें व्हॉईसरायला, लायक व योग्य हिंदी इसमांची सिव्हिल सर्व्हिसमध्यें नेमणूक करण्याचा अधिकार देण्यांत आला व १८७१ च्या दुरुस्तीनें प्रांतिक कायदेमंडळांना कांहीं कायदे रद्द करण्याचा अगर त्यांत दुरुस्ती करण्याचा अधिकार मिळाला.

सारांश, १८६१ सालच्या कायद्यानें बरेच महत्त्वाचे फेरफार घडवून आणले, तथापि या कायद्यांत बरेच ढोबळ दोष होते असें म्हणावयास हरकत नाहीं. या कायद्यानें जरी जादा सभासद कौन्सिलमध्यें घेण्याचा उपक्रम करण्यांत आला तथापि हे जादा सभासद लोकांनीं निवडून द्यावयाचे नसून सरकारनें नेमावयाचे होते म्हणजे अद्यापि लोकांनां निवडणुकीचा हक्क देण्यांत आला नव्हता.

१८९२ चा दि इंडियन कौन्सिल्स ॲक्टः-थोड्याच काळांत १८६१ चा कायदा हिंदी जनतेला

अपुरा वाढूं लागला. सुशिक्षित हिंदी लोकांची संख्या वाढूं लागल्यामुळें हिंदुस्थानच्या राज्यकाभारांत आपल्याला हात घालण्यास अवसर मिळावा अशी आकांक्षा हिंदी लोकांमध्यें उत्पन्न झाली होती. हिंदी विश्वविद्यालयें स्थापन झाल्यामुळें लोकांत उच्च शिक्षणाचा फैलाव वाढत्या प्रमाणांत होत होता. १८८५ सालीं हिंदी लोकांचें मुख्य अशी राष्ट्रीय सभा स्थापन झाली होती व तिनेंहि कौन्सिलांमध्यें हिंदी लोकांनां अधिक हक्क मिळावे एतदर्थ ठराव केले होते. याचा परिणाम कांहीं उदार ब्रिटिश मुत्सद्यांच्या मनावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. लॉर्ड डफरीननें कौन्सिलमध्यें सुधारणा करण्याचा प्रश्न हातीं घेतला; व त्यामुळें हा प्रश्न नेटास लागून शेवटीं १८९२ सालीं 'दि इंडियन कौन्सिल्स ॲक्ट्स' पास झाला. पार्लमेंटांत हें बिल मांडण्यांत आलें त्या वेळीं लॉर्ड कर्झन यानें या बिलाचा उद्देश 'राज्यकारभाराचा पाया विस्तृत करणें व बिन अधिकारी व एतद्देशिय हिंदी सुशिक्षित लोकांनां राज्यकारभारामध्यें अधिक भाग घेऊं देणें' असा आहे असें सांगितलें.

१८९२ च्या कायद्यांत आठ कलमें आहेत पण त्यांतील कांहीं कलमें राजकीय प्रगतीच्या दृष्टीनें महत्त्वाचीं आहेत. पहिल्या कलमानें वरिष्ठ कायदेमंडळांतील जादा सभासदांची संख्या दहा ते सोळापर्यंत व प्रांतिक कायदेमंडळांतील सभासदांची संख्या आठ ते वीसपर्यंत करण्यांत आली. दुसऱ्या कलमानें सभासदांनां प्रश्न विचारण्याचा व अंदाजपत्रकावर कांहीं ठराविक बाबी वगळून वादविवाद करण्याचा अंशत: अधिकार मिळाला. कौन्सिलच्या बाबतींत निवडणुकीचें तत्त्व लागू करावें कीं नाहीं यासंबंधीं बरीच चर्चा झाली. लॉर्ड क्रास हे त्यावेळीं भारतमंत्री होते. त्यांनीं 'कौन्सिलमध्यें लोकमताची बाजू मांडण्यासाठीं निवडणुकीच्या तत्त्वाचा आश्रय केला पाहिजे' ही सूचना नापसंत केली. पण लॅन्सडौनच्या सरकारनें ज्या ठिकाणीं एकंदर परिस्थिति अनुकूल असेल तेथें निवडणुकीच्या तत्त्वाचा प्रसार करण्याचा प्रतिबंध नसावा असें आपलें मत दिलें. व नेमणुकीनें अगर निवडणुकीनें जादा सभासद नेमण्याचा नियम करण्याचा अधिकार मागितला. शेवटीं त्याचें मागणें कबूल करण्यांत आलें व 'किंबर्ले क्लॉज' नांवाचें एक कलम कायद्यांत घालण्यांत आलें. या कलमानें जादा सभासदांच्या नेमणुकीला काय अटी असाव्यात हें निश्चित करण्याविषयीं नियम करण्याचा अधिकार भारतमंत्री व त्याचें कौन्सिल यांच्या अनुमतीनें व्हॉईसरॉय व त्याचें कौन्सिल यांस असावा असें ठरविलें. यामुळें प्रत्यक्ष कायद्यांत जरी निवडणुकीचें तत्त्व उघडपणें मान्य केलेलें दिसत नाहीं तथापि अप्रत्यक्षपणें तें सर्वांनीं कबूल केल्यासारखें झालें व त्याची वहिवाटहि सुरू झाली. या कायद्यानें व्यापारीमंडळें, विश्वविद्यालयें, म्युनिसिपालिटया, लोकलबोर्डें वगैरे संस्थांतर्फे प्रतिनिधि निवडले जात व नंतर सरकारच्या पसंतीनें त्यांची नेमणूक होत असे. अशा रीतीनें अप्रत्यक्षपणें कां होईना निवडणुकीचें तत्त्व अंमलांत आलें व प्रत्यक्ष निवडणुकीचें तत्त्व अंमलांत येण्याचा मार्ग सुकर झाला.

१९०९ चा इंडियन कौन्सिल्स ॲक्ट:—१८९२ च्या कायद्यानें व पुढें त्यामध्यें झालेल्या थोड्या फार फरकानें हिंदु लोकांचा जरी सरकारच्या राज्यकारभारांत थोडा फार हात शिरला होता तरी तेवढ्यावर हिंदी लोकांचें समाधान होणें शक्य नव्हतें. १८९२ पासून १९०२ सालापर्यंत हिंदी राष्ट्रीय सभेनें कायदेमंडळाविषयीं दर वर्षी ठराव करण्याचें काम चालविलेंच होतें. तथापि १९०२ नंतर यासंबंधीं अधिक नेटानें चळवळ सुरू झाली. या चळवळीला ज्या कारणांनीं सुरवात झाली तीं अंशत: अंतर्गत व अंशत: बाह्य स्वरूपाचीं होतीं. एकीकडे हिंदुस्तानांतील पुढारी व वृत्तपत्रें कौन्सिलमध्यें व राज्यकारभारामध्यें अधिक सुधारणा झाल्या पाहिजेत असें प्रतिपादन करीत होतीं तर त्याबरोबरच बाह्य परिस्थितीहि या चळवळीला अनुकूल होत चलली होती. दक्षिण आफ्रिकेंतील युद्ध, रूसो—जपानी, युद्ध इत्यादींमुळें हिंदु लोकांमध्यें उत्तरोत्तर अधिकाधिक जागृति होऊं लागली होती. १९०४ सालचा युनिव्हर्सिटी ॲक्ट व लॉर्ड कर्झनची बंगालची फाळणी यांनीं त्यांत भर घातली. १९०६ सालीं दादाभाई नौरोजी यांनीं कलकत्ता येथें 'स्वराज्य हें आमचें ध्येय आहे' असें जाहीर प्रतिपादन केलें. अशा रीतीनें हिंदुस्थानची परिस्थिति अधिकाधिक असमाधानकारक बनत चालली होती. त्यांतच इंग्लंडमध्यें लिबरल प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें व त्यामुळें हिंदुस्थानच्या भारतमंत्र्याच्या जागीं मोर्ले याची नेमणूक झाली व लॉर्ड मिंटो हा हिंदुस्थानचा व्हाईसराय झाला. लिबरल प्रधानमंडळ अधिकारारूढ झाल्यानें हिंदुस्थानच्या लोकांनां आपल्या मागण्यांनां फल येण्याचा संभव आहे अशी आशा उत्पन्न झाली. इतक्या सर्व गोष्टी जुळून आल्यामुळें कायदेकौन्सिलांमध्यें कांहीं तरी प्रगति

होणें साहजिकच होतें. १९०७ मध्यें लॉर्ड मिंटोनें आपण होऊनच लॉर्ड मोर्ले यांच्या संमतीनें पुढील सुधारणा कोणत्या तत्त्वावर देण्यांत याव्या व किती द्याव्या यासंबंधीं विचार करण्याकरतां कौन्सिलांच्याच सभासदांची एक कमिटी नेमली. प्रांतिक सरकारांकडून या विषयीं अभिप्राय मागविण्यांत आले व त्यावर एक खलिता तयार करून तो मोर्ले साहेबांकडे पाठविण्यांत आला. मोर्ले यांची त्याला संमति मिळाल्यानंतर त्यासंबंधीं पार्लमेंटांत बिल येऊन १९०९ सालीं त्याला बादशहांची संमति मिळाली. या कायद्याला '१९०९चा दि इंडियन कौन्सिल्स ॲक्ट' असें नांव असून मोर्ले–मिंटो सुधारणा या नांवानें या सुधारणा ओळखल्या जातात.

या सुधारणाकायद्यानें ज्या प्रमुख गोष्टी घडून आल्या त्या येणेंप्रमाणें:–

(१) या कायद्यानें कायदेमंडळें अधिक विस्तृत करण्यांत येऊन त्यांनां संकुचित स्वरूपांत कां होईना प्रातिनिधिक स्वरूप प्राप्त झालें व पूर्वीच्या कायद्याप्रमाणें सर्व सभासद जे सरकारनियुक्तच असावयाचे ती पद्धत बंद करून लोकांनां प्रतिनिधि प्रत्यक्षपणें निवडण्याचा हक्क देण्यांत आला व वरील कायदेमंडळाशिवाय बाकीच्या मंडळांतून बिन अधिकारी लोकांचें बहुमत ठेवण्यांत आलें. हिंदुस्थानामध्यें अनेक प्रकारचे हितसंबंध व नाना प्रकारचीं मतें अस्तित्वांत असल्यानें हितसंबंधांच्या दृष्टीनें व वर्गवारीच्या पद्धतीनें कौन्सिलांमध्यें प्रतिनिधि घेणें मोर्ले–मिंटो यांनां अधिक सोईस्कर वाटलें व त्यांनीं तशा प्रकारची योजना जाहीर केली. इलाख्याच्या म्युनिसिपालिटया, विश्वविद्यालयें, व्यापारी संघ अगर मळेवाले अशा मर्यादित हितसंबंधांचे स्वतंत्र मतदारसंघ बनविणें फारसें अवघड नव्हतें. पण जमीनदार, धंदेवाले वर्ग अगर मुसुलमानांसारख्या अगर शीखांसारख्या अल्पसंख्याकांच्या व जातींच्या अमर्याद हितसंबंधांचे प्रश्न पुढें आले त्यावेळीं अडचणी उत्पन्न झाल्या. मुसुलमानांच्या सवत्या मतदारसंघानें मुसुलमान प्रतिनिधी निवडून द्यावे असा मुसुलमानांनीं आग्रह धरला व मिंटोपासून तसें वचनहि घतलें. तसेंच मोठमोठया जमीनदारांसाठींहि स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करण्यांत आले. प्रांतिक कौन्सिलाकरतां इतर मतदार संघ–म्हणजे ज्यामधून सर्वसाधारण जनतेचे प्रतिनिधि येणार–त्यांचा समावेश म्युनिसिपालिटया व जिल्हाबोर्डें यांचा गट करून बनविण्यांत आले.

## १९०९ च्या सुधारणाकायद्यान्वये कायदेमंडळांची रचना.

| कौन्सिलर | सरकारनियुक्त | | लोकानियुक्त | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | एक्सऑफिशिओ | अधिकारी | बिनअधिकारी | कार्पोरेशन | म्युनिसिपालिटी व जिल्हाबोर्ड | विश्वविद्यालय | जमीनदार | मळेवाले | मुसुलमान | हिंदुजनता | व्यापारीमंडळ | इतर | एकंदर |
| मद्रास | ४ | १६ | ५ | १ | ९ | १ | ५ | १ | २ | १ | १ | ० | ४६ |
| मुंबई | ४ | १४ | ७ | १ | ८ | १ | ३ | ० | ४ | २ | २ | ० | ४६ |
| बंगाल | ३ | १६ | ४ | १ | १० | १ | ४ | १ | ५ | १ | २ | ३ | ५१ |
| बिहार ओरिसा | ३ | १५ | ४ | ० | १० | ० | ५ | १ | ४ | ० | ० | १ | ४३ |
| संयुक्तप्रांत | ० | २० | ६ | ० | १३ | १ | २ | ० | ४ | ० | १ | ० | ४७ |
| पंजाब | ० | १० | ६ | ० | ६ | १ | ० | ० | ० | ० | १ | ० | २४ |
| ब्रह्मदेश | ० | ६ | ८ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | १ | ० | १५ |
| आसाम | ० | ९ | ४ | ० | ४ | ० | २ | ३ | २ | ० | ० | ० | २४ |
| मध्यप्रांत | ० | १० | ७ | ० | ५ | ० | २ | ० | ० | ० | ० | ० | २४ |

तात्पर्य, मोठया प्रांतामध्यें कायदेमंडळांतील जादा सभासदांची जास्तींत जास्त मर्यादा ५० व छोटया प्रांतांत ३० ठरविण्यांत आली व या जादा सभासदांच्या नेमणुकीच्या वेळीं सरकारी आणि बिनसरकारी पण सरकारनें नेमलेले अशांचें लोकनियुक्तांहून थोडें बहुमत होईल अशी योजना करण्यांत आली. फक्त बंगालमध्यें मात्र लोकनियुक्तांचें उघड बहुमत असे. वरील कायदेकौन्सिलांतील जादा सभासदांची संख्या अधिकांत अधिक ६० ठरविण्यांत आली. त्यांपैकीं २८ पर्यंत सरकारी अधिकारी असत. तीन विशिष्ट जातींचे

प्रतिनिधी म्हणून तीन सभासद नेमण्याचा अधिकार व्हॉईसरॉयला असे. आणखी दोन सभासद याशिवाय नेमण्याचाहि त्याला हक्क असे. इतर प्रतिनिधींची निवडहि हितसंबंधांच्याच दृष्टीनें करण्यांत यावी असें ठरविण्यांत आलें.

(२) कार्यकारी मंडळांतून हिंदी इसमांची योजना करण्याची वहिवाट सुरू झाली.

(३) सार्वजनिक बाबींसंबंधानें वादविवाद करण्याचा, सूचना पाठविण्याचा व प्रश्न व पुरवणीप्रश्न विचारण्याचा अधिकार सभासदांनां मिळाला.

(४) १८९२ च्या कायद्यान्वयें द्रव्यविषयक वादविवादानंतर मतें घेण्याचा जो प्रतिबंध होता तो नाहींसा झाला.

(५) उपाध्यक्ष निवडण्याचा अधिकार व्यापक करण्यांत आला.

अशा रीतीनें मोर्लेमिंटो सुधारणाकायद्यानें जरी बरेच अधिकार मिळाले तरी पण हिंदुस्थानांतील लोकांनां त्यायोगें स्वराज्याचे खरेखुरे हक्क प्राप्त झाले नाहींत. मॉंटेग्यूचेम्सफोर्ड रिपोर्टांत म्हटल्याप्रमाणें या सुधारणामुळें सार्वजनिक प्रश्नांच्या निर्णयामध्यें लोकांनां सरकारबरोबर सहकार्य करण्याला थोडासा अधिक अवसर मिळाला. या सुधारणांनीं जबाबदार राज्यपद्धतीला सुरवात झाली असें कोणालाहि म्हणतां येण्यासारखें नव्हतें. या सुधारणा क्रांतिकारक नसून 'पूर्वी असलेल्या राज्यपद्धतीचा झालेला सहजविकास' या स्वरूपाच्या होत्या. वसाहतींनां ज्याप्रमाणें जबाबदार राज्यपद्धति मिळाली आहे तशा प्रकारची राज्यपद्धति या कायद्यानें हिंदुस्थानाला मिळाली नाहीं एवढेंच नव्हे तर पार्लमेंटरी राज्यपद्धति देण्याला हिंदुस्थान पात्र नाहीं असें मोर्ले यांनीं बोलूनहि दाखविलें. गव्हर्नर जनरल अगर गव्हर्नर यांच्या ताब्यांत पूर्वीप्रमाणेंच अनियंत्रित सत्ता होती, कार्यकारीमंडळ लोकमताला जबाबदार करण्यांत आलें नव्हतें, मतदान व मतदानपद्धति संकुचित होती, अर्थात या सुधारणाकायद्यामुळें हिंदी लोकांची राजकीय भूक मुळींच भागण्यासारखी नव्हती.

मॉंटेग्यूचेम्सफर्ड सुधारणाः—१९१९ च्या गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टानें हिंदुस्थानच्या शासन पद्धतींत महत्त्वाचे फेरफार घडून आले. १९१७ सालीं ऑगस्ट महिन्याच्या २० व्या तारखेस ब्रिटिश पार्लमेंटनें भारतमंत्र्याच्या तोंडून जें हिंदुस्थानविषयक धोरण वदविलें त्या धोरणाला अनुसरून हा नवीन ॲक्ट रचण्यांत आला आहे. मोर्ले—मिंटो सुधारणाकायद्यानें कायदेमंडळांतील लोकनियुक्त प्रतिनिधींची संख्या वाढविली होती. तथापि कायदेमंडळाची कार्यकारी मंडळावर सत्ता नसल्यामुळें प्रत्यक्ष राज्यकारभारांत लोकांचा हात फारच थोडा होता पण या नवीन ॲक्टानें ही स्थिति पालटून हिंदी लोकांनां राज्यकारभाराच्या यंत्रावर थोडी कां होईना पण सत्ता प्राप्त झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. भारतमंत्री मॉंटेग्यू यांनीं हिंदुस्थानांत येऊन परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करून पार्लमेंटला जो रिपोर्ट सादर केला त्या रिपोर्टामध्यें थोडयाफार सुधारणा करून हा ॲक्ट बनविण्यांत आला आहे. मॉंटेग्यू चेम्सफोर्ड रिपोर्टांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, हिंदुस्थानला जबाबदारीचें स्वराज्य हप्त्याहप्त्यानीं देण्यांत आलें पाहिजे व त्याचा पहिला हप्ता शक्य तितक्या लवकर हिंदुस्थानला देण्यांत असा पाहिजे. हिंदुस्थान हा अद्यापि स्वराज्याला पात्र नसून तशी पात्रता त्याच्यामध्यें उत्पन्न करण्याची तजवीज करण्यांत आली पाहिजे असाहि इशारा या रिपोर्टांत देण्यांत आला आहे. एवढा इषारा दिल्यानंतर हिंदुस्थानाला कोणत्या सुधारणा देण्यांत आल्या पाहिजेत यांची योजना या रिपोर्टांत मांडण्यांत आली आहे.

मॉंटेग्यू चेम्सफोर्ड रिपोर्ट बाहेर पडल्यानंतर १९१८-१९ सालीं लॉर्ड साउथबरो याच्या अध्यक्षतेखालीं फंक्शन्स कमिटी व फ्रँचाइज कमिटी अशा दोन कमिट्या नेमण्यांत आल्या. फंक्शन्स कमीटिकडे, कोणतीं खातीं लोकप्रतिनिधींस देण्यांत यावींत व कोणतीं खातीं सरकारनें आपल्या ताब्यांत राखून ठेवावींत यासंबंधींच्या प्रश्नांचा विचार करण्याचें काम देण्यांत आलें आणि दुसऱ्या कमिटीकडे मतदारांच्या प्रश्नासंबंधीं विचार करण्याचें काम देण्यांत आलें. या दोन्हीं कमिट्यांनीं आपापले रिपोर्ट भारतमंत्र्यांनां सादर केले. त्याचप्रमाणें मॉंटेग्यू चेम्सफोर्ड रिपोर्टावर हिंदुस्थान सरकार व स्थानिक सरकार यांचेहि अभिप्राय मागविण्यांत आले. त्यानंतर मॉंटेग्यू यांनीं आपलें सुधारणाकायद्याचें बिल हॉऊस ऑफ कॉमन्सपुढें मांडलें. या बिलाचें दुसरें वाचन झाल्यानंतर तें सिलेक्ट कमीटिकडे विचाराकरतां सोंपविण्यांत आलें. या कमीटींत हॉऊस ऑफ कॉमन्स व हॉऊस ऑफ लॉर्ड्स या दोन्ही सभांतील सभासद असून या कमिटीचा लॉर्ड सेलबोर्न हा

अध्यक्ष होता. या कमिटीनें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या पक्षांच्या शिष्टमंडळाच्या साक्षी घेऊन मांटेग्यू-चेम्सफोर्ड रिपोर्टावर आपला रिपोर्ट पार्लमेंटास सादर केला. या रिपोर्टावर वादविवाद होऊन हाऊस ऑफ कॉमन्समध्यें सुधारून तयार केलेलें मांटेग्यूचें बिल पसार झालें व त्याला हॉऊस ऑफ लॉर्ड्स सभेची व बादशहाची संमति मिळून या बिलाचें १९१९ च्या गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टांत रूपांतर झालें.

१९१९ च्या गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टाचें स्वरूप.-१९१९ चा गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्ट हा १९१५ च्या गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टांत दुरुस्ती करण्याचा ॲक्ट आहे. या ॲक्टाच्या शेड्यूलमध्यें १९१५ च्या ॲक्टांतील कलमें १९१९ च्या ॲक्टांत कोठें घालावी यासंबंधींची माहिती दिलेली आहे. या नवीन ॲक्टाचीं एकंदर ४७ कलमें असून त्याचे सहा विभाग करण्यांत आले आहेत; पहिल्या भागांत एकंदर १६ कलमें असून हीं कलमें प्रांतिक सरकारासंबंधींची आहेत. या कलमांत प्रांतिक व मध्यवर्ती विषयांचें वर्गीकरण, प्रांतिक सरकारचे कर्ज काढण्याबद्दलचे अधिकार, प्रांतिक सरकारांची पुनर्रचना, प्रांतिक कायदेमंडळांची रचना, कायदेकौन्सिलसंबंधींचे नियम, कौन्सिलचे अधिकार, कामकाज करण्याची पद्धति इत्यादि संबंधांचें विवेचन आहे. दुसऱ्या भागांत हिंदुस्थान-सरकारासंबंधींच्या कलमांचा अंतर्भाव होतो. हीं कलमें १३ असून त्यांमध्यें मुख्यत: मध्यवर्ती कायदेमंडळाची कौन्सिल ऑफ स्टेट व लेजिस्लेटिव्ह असेंब्ली अशा दोन भागांत विभागणी, या दोन्ही सभांची रचना, त्यांची कामकाजाबद्दलची पद्धति, गव्हर्नर जनरलच्या कार्यकारी मंडळाची रचना इत्यादि विषयांचें प्रतिपादन आहे. तिसऱ्या भागांत स्टेटसेक्रेटरी व त्याचें मंडळ यासंबंधींचीं ६ कलमें असून स्टेटसेक्रेटरीचे अधिकार, इंडियाकौन्सिलची रचना, हिंदुस्थानातर्फे हायकमिशनरची योजना इत्यादि विषयांचा उपन्यास करण्यांत आला आहे. चौथा भाग हिंदुस्थानांतील मुलकी व दिवाणी नोकऱ्यांसंबंधीचा आहे. पांचव्या भागांत एकच कलम असून त्यांत दर सहा वर्षांनीं परिस्थितीचा विचार करून त्यावर अभिप्राय देण्याकरितां म्हणून चौकशी-मंडळ नेमण्यासंबंधीची योजना आहे. सहावा भाग 'सर्वसाधारण' या नांवानें संबोधण्यांत आला असून त्यांत या ॲक्टाचें स्वरूप व त्याची व्यवस्था यासंबंधीं कलमें आहेत.

आविष्करण:-१९१७ सालीं बादशहांनीं जें हिंदुस्थानविषयक धोरण भारतमंत्री मॉंटेग्यू यांच्या तोंडून वदविलें त्याला अनुसरूनच हा कायदा बनविण्यांत आला आहे. बादशाहांनीं आपल्या धोरणांत तीन तत्त्वांचा जाहीर उच्चार केला होता. पहिलें तत्त्व म्हणजे हिंदुस्थानला साम्राज्याचा घटक या नात्यानें जबाबदारीचें स्वराज्य देणें; दुसरें तत्त्व त्याची अंमलबजावणी हप्त्याहप्त्यानें करणें व तिसरें तत्त्व पहिला हप्ता तावडतोब देणें; अशीं हीं तीन तत्त्वें होतीं. पण हें जबाबदारीचें स्वराज्य हिंदुस्थानला द्यावयाचें त्याचा उपक्रम कोठून करावयाचा? हा प्रश्न पुढें आला. त्या प्रश्नासंबंधीं विचार करून मॉंट--फर्ड रिपोर्टानें असें ठरविलें कीं याचा उपक्रम खालून वर अशा दिशेनें करावयाचा. त्याप्रमाणें प्रांतिक कारभारामध्यें हिंदी लोकांनां थोडेसें कां होईना पण जबाबदारीचें स्वराज्य देण्याची मॉंट-फर्ड रिपोर्टानें शिफारस केली व ती नवीन ॲक्टान्वयें मान्य करण्यांत आली. नवीन ॲक्टानें जें कांहीं विशेष घडवून आणलें तें म्हणजे प्रधान प्रांतांमध्यें द्विदलराज्यपद्धतीची स्थापना होय. पण ही राज्यपद्धति अंमलांत आणण्यापूर्वी जी प्रमुख गोष्ट करावी लागली ती म्हणजे हिंदुस्थानांतील सर्व प्रांत समान पद्धतीचे करण्यांत आले ही होय. १९१९ पूर्वी हिंदुस्थानांतील प्रांतांचे प्रधान व गौण असे दोन प्रकार होते. प्रधान प्रांतांनां 'गव्हर्नर्स' प्रॉव्हिन्सेस अशी संज्ञा असे. म्हणजे प्रधान प्रांतांनां प्रांताचा राज्यकारभार चालविण्यासाठीं गव्हर्नर व त्याचें कार्यकारी मंडळ असे. पण गौण प्रांतांनां अगर कमिशनराधिकृत प्रांतांनां कार्यकारी मंडळ देण्यांत आलें नव्हतें. या नवीन ॲक्टानें सर्व प्रांतांनां गव्हर्नर नेमण्यांत येऊन त्यांच्या दिमतीला कार्यकारी मंडळ देण्यांत आलें. तथापि जुन्या गव्हर्नर्स प्रॉव्हिन्सेसमध्यें व नवीन गव्हर्नर्स प्रॉव्हिन्सेसमध्यें अद्यापिहि दर्जाच्या दृष्टीनें थोडासा फरक ठेवण्यांत आलेलाच आहे. जुन्या प्रधान प्रांतांच्या गव्हर्नरांची नेमणूक खास बादशहाकडून होते तर नवीन प्रधान प्रांताच्या अधिपतीची नेमणूक गव्हर्नर जनरलच्या सल्ल्यानें करण्यांत येते व शिवाय त्यांचा पगारहि जुन्या प्रांतांच्या गव्हर्नरांहून कमी असतो. अशा रीतीनें सर्व प्रांत सारख्या प्रकारचे केल्यानंतरची पुढची पायरी मध्यवर्ती सरकारचें व प्रांतिक सरकारांचें क्षेत्र आंखून देणें ही होय. या दृष्टीनें या ॲक्टान्वयें सर्व खात्यांचे मध्यवर्ती व प्रांतिक असे दोन वर्ग पाडण्यांत

आले आहेत.मध्यवर्ती खातीं वरिष्ठ सरकारच्या ताब्यांत देण्यांत आलीं असून प्रांतिक खातीं प्रांतिक सरकारच्या स्वाधीन करण्यांत आलीं आहेत. याशिवाय ज्या कांहीं खात्यांचा प्रांतिक खात्यांत समावेश करण्यांत आलेला नाहीं त्यांच्यावर मध्यवर्ती सरकारचा ताबा ठेवण्यांत आला आहे. मध्यवर्ती खात्यांमध्यें, हिंदुस्थानचें संरक्षण, लष्करी, नाविक व यानिक सैन्याबद्दलच्या सर्व बाबी, परराष्ट्रीय संबंध, हिंदी संस्थानिकांशीं संबंध वाहतुकीचीं साधनें, मुख्य बंदरें, तारायंत्रें, इत्यादि चलनी नाणें व नोटा, सेव्हिंग बँक्स, राष्ट्रीय कर्ज, कंट्रोलर व ऑडिटर जनरलचें खातें, खानेसुमारी, पुराणवस्तुसंशोधन, खाणी, आयातनिर्गत, दिवाणी–फौजदारी कायदेकानू, इत्यादि खात्यांचा अंतर्भाव होतो. स्थानिक स्वराज्य, मेडिकल खातें, सार्वजनिक आरोग्य, शिक्षण, ठराविक बांधकामें, ठराविक जमीनमहसुलासंबंधीचा अधिकार, शेतकी खातें, जंगलें, अबकारी, गुरांचे दवाखाने, दुष्काळनिवारण, प्रांतिक कोर्टें, तुरुंग, छापखाने, ठराविक जलमार्ग, पोलीस खातें, औद्योगिक खातें, इत्यादि अनेक खात्यांची व्यवस्था प्रांतिक सरकाराकडे देण्यांत आली आहे. अशा रीतीनें मध्यवर्ती खातीं व प्रांतिक खातीं अलग करण्यांत आल्यानंतर आर्थिक बाबींतहि मध्यवर्ती सरकारचा व प्रांतिक सरकारचा संबंध निश्चित करण्यांत आला आहे. सुधारणाकायद्यामुळें प्रांतिक व मध्यवर्ती खातीं असा भेद होऊन प्रांतिक खात्यांचें उत्पन्न प्रांतिक सरकारकडे जाऊं लागल्यामुळें मध्यवर्ती सरकारच्या उत्पन्नांत बरीच तूट पडण्याचा संभव दिसूं लागला. त्यामुळें ही तूट भरून काढण्यासाठीं प्रांतिक सरकारांनीं मध्यवर्ती सरकारला ठराविक खंडणी देण्याचें ठरविण्यांत आलें. यासंबंधीची चौकशी करण्याकारितां मेस्टन, रॉबर्ट्स व यंग या तिघांचें मंडळ नेमण्यांत आलें व या मंडळानें सर्व चौकशी करून कोणत्या प्रांतानें किती खंडणी वरिष्ठ सरकारला द्यावयाची तें ठरविलें. या कमिटीनें ठरविल्याप्रमाणें प्रांतिक सरकारांकडून एकंदर ९८३ लक्ष रुपये वरिष्ठ सरकारला खंडणी म्हणून मिळावयाचे आहेत. तथापि ही खंडणी कमी कमी करण्यांत येऊन थोडक्याच वर्षांत प्रांतिक सरकारांनां कोणत्याहि तऱ्हेनें खंडणी देण्यास भाग पडूं नये अशा प्रकारें वरिष्ठ सरकारनें आपल्या खर्चांत फेरफार करावा अशी शिफारस वरील मंडळानें केली आहे. याशिवाय निकडीची वेळ आल्यास, स्टेट-सेक्रेटरीच्या संमतीनें व ते सांगतील त्या अटीवर खंडणीच्यापेक्षां अधिक रक्कम प्रांतिक सरकारांनां देण्यास लावण्याचा वरिष्ठ सरकारला हक्क देण्यांत आला आहे. त्याचप्रमाणें प्रांतिक सरकारनें राखून ठेवलेल्या शिलकींतून खर्चासाठीं कांहीं रक्कम काढून घेतांना वरिष्ठ सरकारला तें अयोग्य वाटल्यास तसें न करण्यास सांगण्याचा अधिकार आहे. प्रत्येक प्रांतिक सरकारनें दर वर्षी दुष्काळनिवारणार्थ तरतूद म्हणून ठराविक रक्कम शिल्लक टाकिलीच पाहिजे असा निर्बंध घालण्यांत आला आहे. त्याचप्रमाणें कांहीं ठराविक बाबींवर गव्हर्नर जनरलच्या संमतीशिवाय कर बसविण्याचा प्रांतिक कायदेमंडळांनां अधिकार देण्यांत आला आहे. तसेंच नवीन ॲक्टाच्या दुसऱ्या कलमाप्रमाणें प्रांतिक सरकारांनां प्रांतिक करांच्या जामीनकीवर कर्ज उभारण्याचा अधिकारहि देण्यांत आला आहे.

नवीन ॲक्ट व प्रांतिक कायदेमंडळें:–मध्यवर्ती सरकारचे आणि प्रांतिक सरकारचे, खात्यासंबंधीं आणि आर्थिक बाबींसंबंधींचे संबंध निश्चित करण्यांत आल्यानंतर प्रांतिक कायदेमंडळाकडे ॲक्ट वळला आहे. या ॲक्टानें प्रांतिक कायदेमंडळांनां बरेच अधिकार दिले आहेत. प्रांतिक कारभारांत शक्य ती स्वायत्तता हिंदी लोकांनां देणें हें मॉट–फर्ड योजनेचें मुख्य उद्दिष्ट असल्यानें त्या धोरणानुसार प्रांतिक कायदेमंडळामध्यें बऱ्याच सुधारणा करणें अपरिहार्यच होतें.त्यामुळें मॉट–फर्ड योजनेनें, कायदेमंडळाचा विस्तार करून त्यांत लोकनियुक्त प्रतिनिधींचें बरेंच आधिक्य असावें असें ठरविलें व तें ठरवितांना जातवार प्रतिनिधित्वाचें तत्त्व आवश्यक तेथें लावावयाचें निश्चित केलें. या योजनेप्रमाणें कायदेमंडळांच्या सभासदांची संख्या बरीच वाढली. उदाहरणार्थ, सुधारणाकायदा अंमलांत येण्यापूर्वी प्रधान प्रांतांच्या कायदेमंडळांतील सभासदांची संख्या जास्तींत जास्त ५० होती तर आतां ती त्याच्या दुप्पट करण्यांत आली आहे. मद्रासच्या कायदेमंडळांतील सभासदांची संख्या १२७ तर मुंबईच्या कायदेमंडळाची संख्या १११ व बंगालची १३९ अशी आहे.

### कायदेमंडळांतील प्रांतवार सभासद

| प्रांत | एकंदर | सरकारनियुक्त | लोकनियुक्त |
|---|---|---|---|
| मद्रास | १२७ | २९ | ९८ |
| मुंबई | १११ | २५ | ८६ |
| संयुक्तप्रांत | १२३ | २३ | १०० |
| पंजाब | ९३ | २२ | ७१ |
| बिहारओरिसा | १०३ | २७ | ७६ |
| मध्यप्रांत | ७० | १६ | ५४ |
| आसाम | ५३ | १४ | ३९ |
| बंगाल | १३९ | २६ | ११३ |

लोकनियुक्त सभासदांचे खास मतदारसंघांनीं निवडलेले, जातवार मतदारसंघांनीं निवडलेले व सर्वसाधारण मतदारसंघानी निवडलेले असे भेद आहेत; त्यांचें कोष्टक पुढील प्रमाणें:–

| | लोकनि. संख्या. | खास मतदार. | | | जातवार मतदार. | | | | | साधारण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | विद्यापीठें | जमीनदार | व्यापारी | मुसलमान | युरोपियन | ॲंग्लोइंडियन | इंडियन–ख्रिस्ती | शीख | बिगरमुसलमान |
| मद्रास | ९८ | १ | ६ | ६ | १३ | १ | १ | ५ | ० | ६५ |
| मुंबई | ८६ | १ | ३ | ७ | २७ | २ | ० | ० | ० | ४६ |
| बंगाल | ११३ | १ | ५ | १५ | ३९ | ५ | २ | ० | ० | ४६ |
| संयु.प्रांत | १०० | १ | ६ | ३ | २९ | १ | ० | ० | ० | ६० |
| पंजाब | ७१ | १ | ४ | २ | ३२ | ० | ० | ० | १२ | २० |
| बिहार ओरिसा | ७६ | १ | ५ | ३ | १८ | १ | ० | ० | ० | ४८ |
| मध्यप्रांत | ५४ | १ | ३ | ३ | ७ | ० | ० | ० | ० | ४० |
| आसाम | ३९ | ० | ० | ६ | १२ | ० | ० | ० | ० | २१ |

सरकारनियुक्त सभासदांचे सरकारी व बिनसरकारी असे दोन पोटभेद आहेत. एकंदर सभासदांच्या एकदशांश बिनसरकारी सभासद नेमण्याचा प्रांतिक सरकारला अधिकार आहे, व हे सभासद नेमतांनाहि विशिष्ट जातींतूनच सभासद नेमण्याकडेहि लक्ष देण्याकडे शिफारस करण्यांत आली आहे. लोकनियुक्त सभासदांचें प्रमाण शेंकडा ७० व सरकारनियुक्त सभासदांचें प्रमाण शेंकडा ३० असें ठरविण्यात आलें आहे.

**सभासद निवडण्याची पद्धतिः**–सुधारणाकायदा अंमलांत येण्यापूर्वी सभासदनिवडणुकीची पद्धति संकुचित होती, प्रथमतः मतदारसंघाची संख्या फार मर्यादित होती व त्याशिवाय मतदान अप्रत्यक्ष रीतीनें दिलें जाई. त्यामुळें मतदार व त्यानें मत द्यावयाचा प्रतिनिधि यांच्यामध्यें प्रत्यक्ष संबंध फारच क्वचित येत असे. ही पद्धत फारच गैरसोईची होती. त्यामुळें ही बदलण्याचें काम मॉंट–फर्ड योजनेनें हातीं घेतलें. यासाठीं साउथबरोच्या अध्यक्षतेखालीं एक स्वतंत्र कमीटी नेमण्यांत येऊन या कमिटीनें मतदारसंघ व मतदान यासंबंधी नियम तयार केले व त्या नियमांना ॲक्टानें मान्यता दिली. खेडेगांवांतील मतदारसंघासाठीं जिल्हा हा मुख्य मानण्यांत आला व ज्यां त्या जिल्ह्याच्या लोकसंख्येप्रमाणें ज्या त्या जिल्ह्याला प्रतिनिधी निवडण्याचा हक्क देण्यांत आला. मोठीं शहरें अगर औद्योगिक शहरें यांच्यासाठीं स्वतंत्र प्रतिनिधि देण्यांत आले. जुन्या कौन्सिलाच्या बाबतींत 'खेडेगांव व शहरें' असा भेद करण्यांत आला नव्हता पण या नवीन ॲक्टानें तो करण्यांत येऊं लागला याशिवाय विशिष्ट जातींचे व विशिष्ट हितसंबंध असणाऱ्यांचेहि स्वतंत्र मतदारसंघ पाडण्यांत आले. यासंबंधींची कल्पना पुढील कोष्टकावरून येईल.




याशिवाय कांहीं अल्पसंख्याक समूहांचेहि मतदारसंघ तयार करण्यांत येऊन त्यासहि खास जागा देण्याचें ठरविण्यांत आलें आहे. मतदानाची पात्रता जिंदगीच्या तत्त्वावर ठरविण्यांत आली असून मतदानपद्धति 'प्रत्यक्ष' करण्यांत आली आहे.

**कायदेमंडळाचें स्वरूपः**–मोर्ले–मिंटो सुधारणेनें जरी कायदेकौन्सिलांच्या सभासदांमध्यें लोकनियुक्त प्रतिनिधींचें प्रमाण वाढविलें गेलें तथापि कायदेमंडळाचे हक्क फारच संकुचित होते. नवीन कायद्यानें याहि बाबतींत प्रगति केली आहे. १९१९ पूर्वी गव्हर्नर हा कायदेमंडळाचा अध्यक्ष. असे पण नवीन कायद्यान्वयें प्रांतिक कायदेमंडळाचा अध्यक्ष गव्हर्नर नसून, पहिलीं चार वर्षे गव्हर्नरानें नेमलेला व त्यानंतर कायदेमंडळानें निवडलेला अध्यक्ष असावयाचा. उपाध्यक्षाची निवड कायदेमंडळानें करावयाची असून निवडलेल्या इसमाच्या नेमणुकीला गव्हर्नराची पसंति असली पाहिजे. उपाध्यक्षाला अध्यक्षाच्या गैरहजेरींत अध्यक्ष होतां येतें.

गव्हर्नर हा कायदेमंडळाचा यापुढें अध्यक्ष नसला तरी कायदेमंडळापुढें भाषण करण्याचा व त्यासाठीं सभासदांनां हजर ठेवण्याचा त्याला हक्क आहे. प्रत्येक कायदेमंडळाची मुदत तीन वर्षें असून ही मुदत कमी करणें अगर एक वर्षभर वाढविणें याबद्दल अधिकार गव्हर्नरला आहे.

कायदेमंडळाचे कायदे करण्याचे हक्कः—१९१९ पूर्वीच्या कौन्सिलवर कायदे करण्याबाबत फार अतिशय कडक निर्बंध होते ते नवीन कायद्यानें ढिले झाले आहेत. तसेंच जुन्या कायदेमंडळानें केलेले ठराव गव्हर्नरला बंधनकारक नव्हते पण या बाबतींत बरेच नव्या कायदेमंडळांला अधिकार देण्यांत आले आहेत. तथापि अद्यापिहि गव्हर्नरला या बाबतींत बरेच अधिकार आहेत. गव्हर्नर जनरलच्या आगाऊ संमतीशिवाय कांहीं बाबींसंबंधीं कायदे करण्याचा प्रांतिक कायदेमंडळांनां अधिकार नाहीं. या बाबींचा निर्देश या ॲक्टाच्या दहाव्या कलमांत केला आहे. या बाबींतील (१) गव्हर्नरजनरलनें बसविलेला कर अगर जकात अगर राष्ट्रीय कर्ज, (२) लष्करी, नाविक आणि यानिक सैन्याच्या शिस्तीसंबंधीं अगर स्थैर्यासंबंधीं बाधक कायदा करणें, (३) विदेशी संस्थानिक अगर राष्ट्रें यांच्या असलेल्या संबंधांना बाधक कायदा करणें, (४) मध्यवर्ती खात्यांत ढवळाढवळ करणें इत्यादि बाबी प्रमुख होत. याशिवाय नवीन कायदेमंडळांनां अंदाजपत्रकावर मत देण्याचा व त्यांत दुरुस्ती सुचविण्याचा महत्त्वाचा अधिकार मिळालेला आहे. जुन्या कायदेमंडळांनां अंदाजपत्रकावर नुसती चर्चा करण्यापलीकडे हक्क नव्हता. पण नवीन कायदेमंडळांनां तो हक्क प्राप्त झाला आहे. ॲक्टाच्या ११ व्या कलमांत असें म्हटलेलें आहे कीं 'वार्षिक जमाखर्चाचें अंदाजपत्रक खुलाशासह कायदेमंडळापुढें ठेवण्यांत आलें पाहिजे व त्यांतील कलमांसंबंधीं मतें घेण्यांत आलीं पाहिजेत. कायदेमंडळानें सरकारी मागण्या मान्य कराव्यात'. अगर नाकाराव्यात, कमी कराव्यात किंवा अजीबात वगळाव्यात, तथापि हा हक्क देतांना गव्हर्नरच्या हातांतहि या हक्काला पायबंद घालण्यासाठीं महत्त्वाचे हक्क ठेवले आहेत. उदाहरणार्थ, दर वर्षी द्यावी लागणारी खंडणी, कर्जावरील व्याज व गंगाजळी, कायद्यानें निर्दिष्ट केलेल्या रकमेचा खर्च, बादशहांनीं किंवा सेक्रेटरीनीं नेमलेल्या नोकरांचा पगार इत्यादि बाबी कायदेमंडळापुढें मांडण्याची आवश्यकता नाहीं. तसेंच प्रांतांची शांतता अगर स्वास्थ्य कायम ठेवण्यास एखादा खर्च करणें जरूर असल्यास गव्हर्नरला कायदेमंडळाच्या संमतीशिवाय तो करण्याचा हक्क आहे. एखादी मागणी राखींव खात्यासंबंधीं असल्यास व गव्हर्नरनें ती आवश्यक आहे अशी शिफारस केल्यास ती कायदेमंडळानें मान्य केली आहे असें धरून चालण्यास प्रांतिक सरकारला अधिकार आहे. एखादें बिल प्रांताच्या शांततेस धोका आणणारें आहे या सबबीवर त्या बिलावरील चर्चा थांबविण्याचा गव्हर्नरला अधिकार आहे. राखींव खात्यासंबंधीं कायदा करण्यास प्रांतिक कायदेमंडळानें नाकारल्यास व गव्हर्नरनें त्या कायद्याची आवश्यकता आहे अशी शिफारस केल्यास तो कायदा बंधनकारक समजला जाण्याचा अधिकार ॲक्टानें दिला आहे. तसेंच प्रांतिक कायदेमंडळानें एखादा कायदा केल्यास त्याला मान्यता देणें अगर न देणें हें सर्वस्वीं गव्हर्नराच्या मर्जीवर अवलंबून ठेवलें आहे व पुनर्विचारार्थ साठीं परत कायदेमंडळाकडे पाठवण्याचा त्याला अधिकार आहे.

कार्यकारीमंडळः—प्रांतिक सरकारामध्यें गव्हर्नर, त्याचें कार्यकारी मंडळ व कायदेमंडळ या तिघांचा समावेश होतो. नवीन ॲक्टानें ज्याप्रमाणें कायदेमंडळाच्या बाबतींत सुधारणा घडवून आणली तशीच, किंबहुना त्यापेक्षांहि महत्त्वाचे फेरफार कार्यकारी मंडळाच्या घटनेंत घडवून आणले. प्रांतिक कारभारांत हिंदु लोकांनां अधिकाधिक भाग घेतां यावा अशा तऱ्हेचें धोरण मॉंट—फर्ड सुधारणाकर्त्यांचें होतें; पण एकदम सर्व प्रांतिक कारभार लोकांच्या हातीं देणें त्यांनां इष्ट वाटलें नाहीं. यासाठीं मॉंट—फर्ड सुधारणेनें नवीन प्रकारची योजना पुढें मांडली. या नव्या योजनेप्रमाणें प्रांतिक खात्याचे राखींव व सोंपिव असे दोन भाग करण्यांत येऊन सोंपीव खात्याचा कारभार गव्हर्नरानें लोकनियुक्त सभासदांमधील एकाला मंत्री निवडून त्याच्या ताब्यांत द्यावा व राखींव खात्यांचा कारभार गव्हर्नरकडे असावा असें ठरविण्यांत आलें. ही योजना ॲक्टांत मान्य करण्यांत आली आहे. नवीन ॲक्टानें प्रांतिक सरकारच्या कार्यकारीमंडळाचे दोन गट पडले आहेतः राखींव खात्याचा कारभार चालविणारें कार्यकारीमंडळ व सोंपीव खात्याचे दिवाण हे ते दोन गट होत. गव्हर्नर या दोन्ही गटांचा मुख्य असतो. सोंपिव खात्याच्या दिवाणांची नेमणूक गव्हर्नरनें कार्यकारीमंडळाच्या

सभासदांव्यतिरिक्त व सरकारी नोकरांव्यतिरिक्त दुसऱ्या इसमाची करावयाची असून ती नेमणूक गव्हर्नरची मर्जी असेतोंपर्यंत कायम राहील. गव्हर्नरनें या दिवाणांच्या सल्ल्यानें सोंपीव खात्याचा कारभार केला पाहिजे. तथापि योग्य कारण दिसून आल्यास दिवाणांचा सल्ला अमान्य करण्याचा गव्हर्नरला अधिकार आहे. दिवाणांचा पगार ठरविण्याचा हक्क कायदेमंडळाला आहे. कार्यकारीमंडळावर कायदेमंडळाचा अधिकार नाहीं. कार्यकारीमंडळाचे सभासद बादशहाकडून नेमण्यांत येतात व त्यांची सर्वसाधारणतः पांच वर्षें नेमणूक असते. गव्हर्नराचें कार्यकारीमंडळ व दिवाण यांच्या कामकाजाचें क्षेत्र अगदीं स्वतंत्र ठेवण्यांत आलें आहे. गव्हर्नर हा या दोहोंमधील दुवा आहे. बंदरें, फॅक्टरी, न्याय व प्रांतिक महसूल इत्यादि खातीं राखीव ठरविण्यांत आलीं असून सार्वजनिक आरोग्य, स्थानिक स्वराज्य, अबकारी खातें, शिक्षण इत्यादि खात्यांचा सोंपीव खात्यांत अंतर्भाव करण्यांत आला आहे. प्रांतिक उत्पन्नांची या दोन भागांमध्यें वांटणी करण्यांत यावी किंवा नाहीं व करावयाची ठरल्यास ती कशी करावी यासंबंधीं बरीच भवति न भवति बरेच दिवस चालली होती. खुद्द हिंदुस्थान सरकार हें स्वतंत्र तिजोरीच्या मताचें होतें तर 'संयुक्ततिजोरी'च्या मताचेहि पुष्कळच लोक होते. जॉइंट कमिटीनें या प्रश्नाचा विचार करून 'जॉइंट पर्स' उर्फ 'संयुक्त तिजोरी' च्या मताचा पुरस्कार केला. संयुक्त तिजोरींतून सोंपीव खात्याला किती वांटणी मिळावयाची व राखीव खात्याला किती मिळावयाची हें परस्परांनीं आपापसांत ठरवून घ्यावयाचें आहे व त्यामध्यें भानगड उपस्थित झाल्यास गव्हर्नर जनरलनें पंच नेमून ती वांटणी करावी असें ठरण्यांत आलें आहे. दिवाण किती असावे हें ठरविण्याचा अधिकार गव्हर्नरला आहे. पण दिवाणांची संख्या चारपेक्षां जास्त व दोहोंपेक्षां कमी नसते. कार्यकारीमंडळांतील एका सभासदाकडे 'फायनॅन्स' खात्याचा अधिकार असतो. प्रत्येक प्रांताचें स्वतंत्र फडणीसखातें असावें असें ठरविण्यांत आलें आहे.

मॉंटेग्यू-चेम्सफोर्ड योजनेंत प्रांतिक कारभारांतच हिंदी लोकांनां जबाबदारीचें स्वराज्य देण्याचा उपक्रम करण्यांत यावा अशी शिफारस करण्यांत आल्यामुळें, हिंदुस्थानसरकारच्या कायदेमंडळांत व कार्यकारीमंडळांत किरकोळ फेरफार करण्यापलीकडे या ॲक्टानें अधिक कांहींच केलें नाहीं. पण हे फेरफार करतांना वरिष्ठ कायदेमंडळांतील लोकनियुक्त सभासदांची संख्या वाढविणें, दोन सभांची स्थापना करणें व कार्यकारीमंडळांत हिंदी माणसांची अधिकाधिक निवड होणें या तीन गोष्टी डोळ्यांपुढें ठेवलेल्या दिसतात. १९१९ च्या कायद्यानें जी नवीन गोष्ट केली ती म्हणजे पूर्वी वरिष्ठ कायदेमंडळ ही जी एकच सभा होती त्याच्या जागीं लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट अशा दोन सभा निर्माण केल्या. जुन्या अमदानींत वरिष्ठ कायदेमंडळांतील सभासदांची संख्या ६८ असून त्यांत ३२ च बिनसरकारी सभासद होते व त्यांतहि कांहीं सरकारनें निवडलेले असत. म्हणजे वरिष्ठ कायदेमंडळांत सरकारचें वर्चस्व होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. नवीन ॲक्टानें कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें ६० सभासद घ्यावयाचे ठरवून त्यांपैकीं ३३ लोकनियुक्त व २७ सरकारनियुक्त असावयाचे असें ठरविलें आहे. लेजिस्लेटिव्ह असेंब्लींतील सभासदांची संख्या १४४ असून त्यांपैकीं १०३ लोकनियुक्त असले पाहिजेत असें ॲक्टानें ठरविलें आहे. प्रत्येक प्रांताला लेजिस्लेटिव्ह असेंब्लीकरतां व कौन्सिल ऑफ स्टेटकरतां किती सभासद निवडण्याचा हक्क आहे व सभासद कसे निवडावयाचे यासंबंधीं नियम करण्यांत आले आहेत त्याचें कोष्टकः—

## लेजिस्लेटिव्ह असेंब्ली

| | सरकारनियुक्त | | लोकनियुक्त | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | सरकारी | बिनसरकारी | सर्वसाधारण | मुसुलमान | शीख | जमीनदार | युरोपियन | इंडियनव्यापारी | एकंदर |
| हिंदुस्थान सरकार | १२ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | १२ |
| मद्रास | २ | २ | १० | ३ | ० | १ | १ | १ | २० |
| मुंबई | २ | ४ | ७ | ४ | ० | १ | २ | २ | २२ |
| बंगाल | २ | ३ | ६ | ६ | ० | १ | ३ | १ | २२ |
| संयुक्तप्रांत | २ | १ | ८ | ६ | ० | १ | १ | ० | १९ |
| पंजाब | १ | १ | ३ | ६ | २ | १ | ० | ० | १४ |
| बिहार-ओरिसा | १ | १ | ८ | ३ | ० | १ | ० | ० | १४ |
| मध्यप्रांत | १ | ० | ४ | १ | ० | १ | ० | ० | ७ |
| आसाम | १ | ० | २ | १ | ० | ० | १ | ० | ५ |
| ब्रह्मदेश | १ | ० | ३ | ० | ० | ० | १ | ० | ५ |
| वऱ्हाड | ० | २ | ० | ० | ० | ० | ० | ० | २ |
| अजमीर | ० | १ | ० | ० | ० | ० | ० | ० | १ |

### कौन्सिल ऑफ स्टेट

| | सरकारी | | लोकनियुक्त | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | सरकारी | बिनसरकारी | साधारण | मुसुलमान | शीख | युरोपियन व्यापारी | एकंदर |
| हिंदुस्थान सरकार | १२ | ० | ० | ० | ० | ० | १२ |
| मद्रास | १ | १ | ४ | १ | ० | ० | ७ |
| मुंबई | १ | १ | ३ | २ | ० | १ | ८ |
| बंगाल | १ | १ | ३ | २ | ० | १ | ८ |
| संयुक्तप्रांत | १ | १ | ३ | २ | ० | ० | ७ |
| पंजाब | १ | २ | १ | १॥ | १ | ० | ६॥ |
| बिहार-ओरिसा | १ | ० | २॥ | १ | ० | ० | ४॥ |
| ब्रह्मदेश | ० | ० | १ | ० | ० | १ | २ |
| मध्यप्रांत | ० | ० | २ | ० | ० | ० | २ |
| आसाम | ० | ० | ॥· | ॥· | ० | ० | १ |
| दिल्ली | १ | ० | ० | ० | ० | ० | १ |

प्रांतिक कायदेमंडळाप्रमाणेंच लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या सभासदांची निवडणूक 'प्रत्यक्ष' पद्धतीनें केली जाते. जिल्हा हा जसा प्रांतिक कायदेमंडळांतील सभासद निवडून देण्याकरतां परिमाण (स्टँडर्ड) ठरविण्यांत आला आहे तसा असेंब्लीकरतां जिल्हासंघ ठरविण्यांत आला आहे.

प्रांतिक कायदेमंडळाप्रमाणेंच सामान्यत: लेजिस्लेटिव्ह असेंब्लीची घटना आहे. असेंब्लीच्या पहिल्या बैठकीपासून चार वर्षेपर्यंत असेंब्लीचा अध्यक्ष गव्हर्नर जनरलनें नेमावयाचा व त्यानंतर सभासदांनीं निवडलेला व गव्हर्नर जनरल यानें पसंत केलेला असावयाचा. डेप्युटी अध्यक्षाची निवड लोकनियुक्त सभासदांनीं करावयाची असें ठरविण्यांत आलें आहे. कौन्सिल ऑफ स्टेटचा अध्यक्ष मात्र गव्हर्नर जनरलनेंच नेमावयाचा आहे. असेंब्लीची मुदत तीन वर्षें व कौन्सिल ऑफ स्टेटची पांच वर्षें आहे. प्रांतिक कायदेमंडळाप्रमाणेंच याहि मंडळापुढें भाषण करण्याचा व सभासदांनीं हजर रहावें म्हणून हुकूम करण्याचा व्हॉईसरॉय यास अधिकार आहे.

असेंब्लीचे अधिकार:—प्रश्न विचारण्याच्या बाबतींत व सार्वजनिक हिताच्या बाबींवर वादविवाद करण्याच्या बाबतींत पूर्वीच्या वरिष्ठ कौन्सिलास जे अधिकार होते तेच याहि कायदेमंडळाला आहेत. फक्त नवीन फरक म्हणजे या अॅक्टान्वयें वाटेल त्या सभासदाला पुरवणीवजा प्रश्न विचारण्याचा हक्क व अध्यक्षाच्या संमतीनें सभेचें कामकाज तहकूब ठेवण्याची सूचना मांडण्याचा हक्क असे दोन किरकोळ हक्क असेंब्लीला देण्यांत आले आहेत. कायदे करण्याच्या बाबतींत मात्र महत्त्वाचे फेरफार झाले आहेत व ते मुख्यत: दुरंगी मंडळाच्या अस्तित्वामुळें करण्यांत आलेले आहेत. कोणत्याहि (असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट) सभासदाला वाटेल तो ठराव आगाऊ सूचना देऊन मांडण्याचा हक्क आहे. पण तो ठराव दोन्ही सभांनीं मंजूर केल्याशिवाय कायदा बनूं शकत नाहीं हे सर्व ठराव गव्हर्नर जनरलला शिफारशीच्या रूपानें मांडावयाचे असतात. कांहीं ठराविक बाबींसंबंधानें गव्हर्नर जनरलच्या परवानगीशिवाय एखादा ठराव सभासदाला आणतां येत नाहीं. गव्हर्नरप्रमाणेंच गव्हर्नर जनरललाहि बरेच जादा हक्क देण्यांत आले आहेत. दोन्ही सभांनीं एखादें बिल नापास केलें असल्यास,गव्हर्नर जनरलला तें बिल शांततेच्या व स्वास्थ्याच्या सबबीवर पसार करून घेण्याचा अधिकार आहे. तसेंच एखादें बिल सभेपुढें मांडूं न देण्याचाहि त्याला अधिकार आहे. कायदेमंडळांप्रमाणेंच असेंब्लीपुढें व कौन्सिल ऑफ स्टेटपुढें जमाखर्चाचें अंदाजपत्रक मांडण्यांत येतें. त्यापैकीं कांहीं खर्चाच्या बाबींवर मतें देण्याचा असेंब्लीला अगर कौन्सिल ऑफ स्टेटला अधिकार नाहीं. अशा अपवादात्मक बाबी म्हणजे कर्जावरील व्याज, गंगाजळी, बादशहांनीं अगर स्टेट सेक्रेटरी व त्याचें मंडळ यांनीं नेमलेल्या इसमांचे पगार अगर पेन्शन, चीफ कमिशनर अगर ज्यूडिशल कमीशनर यांचे पगार, धार्मिक, राजकीय व संरक्षक खात्यावर गव्हर्नर जनरल व त्याचें मंडळ यांनीं केलेला खर्च या होत. वरील बाबींशिवाय सर्व खात्यांच्या खर्चावर असेंब्ली अगर कौन्सिल ऑफ स्टेट यांनां मतें देण्याचा, त्या बाबी नाकारण्याचा अगर कमी करण्याचा अधिकार आहे. तथापि असेंब्लींत मतें घेतलेल्या सर्व मागण्या गव्हर्नर जनरल व त्याचें मंडळ यांच्यापुढें ठेवण्यांत आल्यावर, अशा मागण्यांपैकीं कांहीं मागण्या जरी असेंब्लीनें नाकारल्या असल्या तरी त्या गव्हर्नर जनरलला आवश्यक वाटल्यास त्या मंजूर करण्याचा त्यास पूर्ण अधिकार आहे.

स्टेटसेक्रेटरी व त्याचें मंडळ:–१९१९ च्या सुधारणा कायद्यापूर्वी स्टेटसेक्रेटरीचा हिंदुस्थानच्या राज्यकारभारावर बऱ्याच बाबतींत ताबा असे. हिंदुस्थानच्या राज्यकारभारावर देखरेख ठेवणें, कारभाराचें धोरण आंखून देणें व त्यावर ताबा ठेवणें इत्यादि अधिकार त्याला असत. या नवीन कायद्यान्वयें, स्टेटसेक्रेटरीचे अधिकार बरेच कमी झालेले आहेत. खास राजकीय विषयाशिवाय कर्ज उभारणें, पेन्शन खातें इत्यादि कामाची जबाबदारी स्टेटसेक्रेटरीवरच होती. नवीन कायद्यान्वयें 'एजन्सी' स्वरूपाचे जे स्टेटसेक्रेटरीचे अधिकार होते ते हिंदुस्थानतर्फे एक हाय कमिशनर नेमून त्याच्या हवाली करण्यांत आले आहेत. त्यामुळें स्टेटसेक्रेटरी व त्याचें मंडळ यांच्याकडे फक्त राज्यकारभारविषयक सत्ता उरली आहे. नवीन ॲक्टाच्या ३३ व्या कलमांत असें म्हटलें आहे कीं 'या कायद्याचा हेतु सिद्धीस नेण्याकरतां स्टेटसेक्रेटरी व त्याचें कायदेमंडळ यांनीं मुख्य कायद्यानें (१९१९) दिलेला ताबा, तपासणी व ताकीद याबद्दलचे अधिकार इष्ट अगर आवश्यक वाटल्यास कमी करावेत.' या कलमाला अनुसरून स्टेटसेक्रेटरीच्या अधिकारांत फेरबदल करण्यांत आला आहे. सोंपीव खात्याच्या कारभारावरील स्टेटसेक्रेटरीचा अधिकार कांहीं बाबी वगळून उरलेला नाहीं, स्टेटसेक्रेटरीचा पगार इतके दिवस हिंदुस्थानच्या तिजोरींतून दिला जात होता तो यापुढें पार्लमेंटच्या पिशवीमधून दिला जाणार आहे. हिंदुस्थानच्या राज्यकारभारासंबंधीं नियम करण्याचा स्टेटसेक्रेटरीला अधिकार आहे. तथापि सोंपीव खात्याव्यतिरिक्त इतर खात्यांसंबंधानें नियम करण्यापूर्वी सदर नियमांचा मसुदा पार्लमेंटच्या दोन्ही सभांपुढें मांडण्यांत आला पाहिजे व त्यांची मंजूरी घेण्यांत आली पाहिजे. इंडिया कौन्सिलच्या सभासदाची मुदत सात वर्षांची पांच वर्षें करण्यांत आली आहे; व त्यांत हिंदी लोकांचे प्रमाण वाढविण्यांत आलें आहे.

पब्लिक सर्व्हिस:–प्रांतिक सरकारच्या कारभारांत कायदेमंडळाला जबाबदार असणाऱ्या प्रधानांची नेमणूक होऊं लागल्यानें पब्लिक सर्व्हिसमधील नोकरांचे हक्क व त्यांचा दर्जा यांना कदाचित धक्का बसण्याचा संभव आहे. अशा दृष्टीनें पब्लिक सर्व्हिसमधील नोकरांच्या संरक्षणासाठीं या ॲक्टाच्या चौथ्या भागांत मुद्दाम कलमें घालण्यांत आलीं आहेत. या कलमांन्वयें हा कायदा अंमलांत येण्यापूर्वी आपल्या मंडळाच्या संमतीनें स्टेट सेक्रेटरीनें नेमलेल्या प्रत्येक नोकराच्या विद्यमान अगर भावी हक्कास कोणत्याहि तऱ्हेनें बाध येणार नाहीं असें जाहीर करण्यांत आलें आहे. तसेंच पब्लिक सर्व्हिसमधील भरती व तिजवरील ताबा यासंबंधीं पांचजणांपेक्षां जास्त नाहींत अशांचें एक पब्लिक सर्व्हिस स्थापन करण्याचें या ॲक्टानें ठरविलें आहे. त्याचप्रमाणें हिंदुस्थानाकरतां एक मुख्य हिशेबतपासनीस सेक्रेटरीनें आपल्या मंडळाच्या संमतीनें नेमला पाहिजे असें या ॲक्टानें ठरविलें आहे.

चौकशीमंडळ:–ॲक्टाच्या ४१ व्या कलमानें हा कायदा अंमलांत येऊन दहा वर्षे झाल्यानंतर पार्लमेंटच्या दोन्हीहि सभांच्या संमतीनें स्टेटसेक्रेटरीनें एक चौकशीमंडळ नेमलेंच पाहिजे असें ठरविलें आहे. या चौकशीमंडळानें हिंदुस्थानांत मागील दहा वर्षांतील शिक्षणाचा फैलाव, प्रातिनिधिक संस्थांची वाढ आणि शासनपद्धतीची अंमलबजावणी या तदनुषंगिक बाबींची चौकशी करावयाची असून जबाबदार राज्यपद्धतीचें तत्त्व हिंदी राज्यकारभारांत प्रस्थापित करणें इष्ट आहे किंवा कसे, इष्ट असल्यास कोणत्या प्रमाणांत तें प्रस्थापित करण्यांत यावें अगर अस्तित्वांत असलेल्या तत्त्वाची व्याप्ति वाढविली, बदलली अगर संकुचित केली पाहिजे कीं काय, त्याचप्रमाणें प्रांतिक कायदेमंडळांत दुसरी सभा स्थापन करणें इष्ट आहे किंवा नाहीं याबद्दल या मंडळानें लेखी अभिप्राय कळविला पाहिजे.

हिंदुस्थानची कारभारपद्धति:–ब्रिटिश साम्राज्यामध्यें अनेक वसाहती, संरक्षित राष्ट्रें व परतंत्र राष्ट्रें यांचा समावेश होतो व या तिहींच्या शासनपद्धती परस्परांहून भिन्न आहेत. हिंदुस्थानचा परतंत्र राष्ट्रामध्यें समावेश होतो, व त्याची शासनपद्धति वसाहतींच्या शासनपद्धतीहून भिन्न आहे. बादशाही वसाहती सोडून दिल्या तरी बहुतेक सर्व वसाहतींना साम्राज्यान्तर्गत स्वराज्य मिळालें आहे म्हणजे वसाहतींनां आपल्या मुलुखांतील अंतःस्थ कारभार वाटेल तसा चालविण्यास स्वातंत्र्य आहे. पण हिंदुस्थानची तशी स्थिति नाहीं. हिंदुस्थानला स्वतःच्या अंतःस्थ कारभारांत स्वातंत्र्य मिळालेलें नाहीं. बादशहा व पार्लमेंट यांनीं नेमलेल्या नोकरांकडून हिंदुस्थानचा कारभार चालविला जातो. म्हणजे हिंदुस्थानामध्यें नोकरशाही शासनपद्धति अस्तित्वांत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. अलीकडे मॉंटेग्यू–चेम्सफोर्ड सुधारणांमुळें हिंदुस्थानला थोडे फार हक्क मिळाले

आहेत पण वसाहतींच्या शासनपद्धतीची फार झालें तर ती पहिली पायरी होय असें म्हणतां येईल. अद्यापि नोकरशाहीचीच सत्ता हिंदुस्थानावर पूर्णपणें चालू आहे.

वर सांगितलेंच आहे कीं हिंदुस्थानचा कारभार इंग्लंडचा राजा व हिंदुस्थानचा बादशहा व पार्लमेंट यांच्या हुकुमानें भारतमंत्री व गव्हर्नरजनरल हे चालवितात. या दोघांच्या हाताखालीं राज्यकारभार चालविण्याकरतां दुय्यम नोकरांचें जाळें निर्माण करण्यांत आलें आहे. या नोकरांकडून अखिल हिंदुस्थानचा सर्व कारभार चालविला जातो. तात्पर्य, बादशहा व पार्लमेंट यांचीच हिंदुस्थानवर पूर्ण सत्ता आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

पार्लमेंट हिंदुस्थानावर मुख्यत: तीन मार्गांनीं आपली सत्ता गाजवितें:–(१) कायदे करणें, (२) वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या नेमणुका करणें, (३) वारंवार कमिशनें नेमून राज्यकारभाराची चौकशी करणें.

१८५८ सालीं पार्लमेंटनें हिंदुस्थानचा राज्यकारभार आपल्या जबाबदारीवर चालविण्याची जोखीम घेतली. त्यावेळीं पार्लमेंटानें भारतमंत्रि या नांवाचा एक अधिकारी नेमून त्याच्या हातीं हिंदुस्थानच्या कारभाराची सत्ता दिली. हिंदुस्थानविषयक एक स्वतंत्र खातें निर्माण करून तें याच्या ताब्यांत आलें. या खात्याला इंडिया ऑफिस असें नांव आहे.

भारतमंत्री व त्याचे अधिकार:–१८५८ च्या कायद्यान्वयें कंपनीच्या अमदानींत व्यवस्थापकमंडळ व नियामकमंडळ यांच्या हातांत जी सत्ता होती ती भारतमंत्र्याच्या हातीं आली व त्याच्या मदतीस एक कौन्सिल देण्यांत आलें असें वर सांगण्यांत आलेंच आहे. भारतमंत्री हा पार्लमेंटचा सभासद असून तो आपल्या व हिंदुस्थानसरकारच्या कृत्याबद्दल पार्लमेंटला जबाबदार असतो. पार्लमेंटांत जो पक्ष अधिकारारूढ असतो त्या पक्षापैकीं तो असतो व त्याची नेमणूक मुख्य प्रधानाच्या संमतीनें बादशहा करतो. अधिकारारूढ पक्षाच्या पाडावाबरोबर यालाहि आपलें पद सोडावें लागतें. तो प्रिव्ही कौन्सिलचा सभासद असतो. हिंदुस्थानविषयक सर्व प्रश्नांवर बादशहाला व पार्लमेंटला सल्ला देण्याचें काम भारतमंत्र्याचें असतें. राज्यकारभाराचें धोरण ठरविणें, वरिष्ठ व प्रांतिक सरकार यांच्यासाठीं मार्गदर्शक नियम वेळोवेळीं करणें इत्यादि महत्त्वाचीं कामें त्याला करावीं लागतात. पार्लमेंटशीं सर्व पत्रव्यवहार याच्या मार्फतच करावा लागतो. पार्लमेंटला तो जबाबदार असल्यानें हिंदुस्थानसरकारवर त्याची पूर्ण सत्ता असते. लढाई पुकारणें अगर तह करणें, अगर एखादा कायदा करणें या बाबतींत हिंदुस्थानसरकारला भारतमंत्र्याची संमति घ्यावी लागते. मॉंटेग्यू-चेम्सफोर्ड सुधारणा अंमलांत येण्यापूर्वी भारतमंत्र्याच्या हातीं अनियंत्रित सत्ता असे व त्या सत्तेचा कित्येकवेळां तो दुरुपयोगहि करीत असे. तथापि नवीन अ‍ॅक्टान्वयें (१९१९) त्याची सत्ता थोडीशी मर्यादित करण्यांत आली आहे. उदाहरणार्थ, ज्या प्रश्नांवर हिंदुस्थानसरकार व कायदेमंडळ यांचें ऐकमत्य असेल त्या बाबतींत भारतमंत्र्यानें ढवळाढवळ करूं नये असें या नवीन अ‍ॅक्टानें ठरविलें आहे. त्याच प्रमाणें प्रांतिक सरकारच्या बाबतींतहि तोच नियम लागू आहे. कायदेमंडळें व सरकार यांच्यामध्यें मतभेद उत्पन्न झाल्यास मात्र भारतमंत्र्याला मध्यें पडण्याचा अधिकार आहे. तसेंच यांत्रिक माल खरेदी व इतर व्यापारी कामकाज पहाणें यासाठीं स्वतंत्र हायकमिशनर नेमण्यांत आल्यानें भारतमंत्र्याकडे आतां फक्त राजकीय बाबतींतच अधिकार गाजविण्याचें काम उरलें आहे. पूर्वी भारतमंत्र्याचा पगार हिंदुस्थानसरकारच्या तिजोरींतून देण्यांत येत असे. पण हल्लीं तो पार्लमेंटच्या तिजोरींतून दिला जातो त्यामुळें भारतमंत्र्याच्या कामाकडे पार्लमेंटचें पूर्वीपेक्षां अधिक लक्ष वेधूं लागलें आहे. नवीन अ‍ॅक्टानें जरी भारतमंत्र्याची सत्ता थोडी फार मर्यादित करण्यांत आली असली तरी अद्यापिहि त्याची सत्ता बरीच मोठी आहे यांत संशय नाहीं.

हिंदुस्थानविषयक सर्व कारभारावर देखरेख ठेवणें, आणि त्याबद्दल पार्लमेंटला जबाबदार राहणें, पार्लमेंटला हिंदुस्थानविषयक प्रश्नांवर वेळोवेळीं सल्ला देणें इत्यादि बहुविध कामें भारतमंत्र्याला करावीं लागत असल्यानें, त्याला मदत करण्याकरतां एक कौन्सिल देण्यांत आलें आहे. त्याशिवाय त्याच्या हाताखालीं दोन मदतनीस देण्यांत आले आहेत. त्यांपैकीं एक दुय्यममंत्री कायम असतो व त्याच्याकडे कचेरीचें कामकाज असतें. दुसरा दुय्यममंत्री हा पार्लमेंटांतील अधिकारारूढ पक्षाचा असतो व अधिकारारूढ पक्षाच्या नाशा बरोबर त्यालाहि राजीनामा द्यावा लागतो. साधारणत: भारतमंत्री जर कॉमन्स सभेंतील असेल तर लॉर्डांच्या सभेंतून दुय्यममंत्री नेमला जातो व भारतमंत्री लॉर्डांच्या सभेंतला असेल तर कॉमन्स सभेंतील इसमाची दुय्यम

मंत्र्याच्या जागीं नेमणूक होते. याशिवाय असिस्टंट अंडर सेक्रेटरी नांवाच्या अधिकाऱ्याकडे इंडिया ऑफीसचें कारकुनी काम असतें. या सर्वांचा खर्च व इंडिया आफीसचा खर्च हल्लीं ब्रिटिश तिजोरीवर पडतो. तसेंच प्रत्येक खात्यागणिक एक चिटणीस, दुय्यम चिटणीस व त्यांच्या हाताखालीं नोकरवर्ग असतो. याशिवाय प्रत्येक खात्याचे स्वतंत्र अधिकारी असतात त्यांचाहि पगार ब्रिटिश तिजोरींतूनच दिला जातो.

भारतमंत्र्याचें सल्लागार मंडळ:—भारतमंत्र्याला मदत करण्याकरतां व हरएक बाबतींत सल्ला देण्याकरतां एक सल्लागार मंडळ देण्यांत आलेलें असतें. या कौन्सिलांत हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचा प्रत्यक्ष अनुभव असलेले सभासद असतात. भारतमंत्र्याला प्रत्यक्ष हिंदुस्थानविषयक कांहींच माहिती नसल्याकारणानें त्याला या कौन्सिलच्या सल्ल्यावर बरेंच विसंबून राहावें लागतें. त्यामुळें कौन्सिलमधील सभासद ज्या मताचे असतील त्या मताचें प्रतिबिंब भारतमंत्र्याच्या धोरणांत दिसून येत असे. १९०८ सालपर्यंत कौन्सिलच्या सभासदांत अँग्लोइंडियन नोकरांचाच भरणा असे व त्यामुळें हिंदी लोकांचें मत भारतमंत्र्याला योग्य तऱ्हेनें समजण्यास मार्गच उरत नसे. पण मोर्ले साहेबांनीं कौन्सिलामध्यें हिंदी इसमाची नेमणूक करण्याचा उपक्रम केल्यानें कौन्सिलमध्यें हिंदी लोकांचें मत मांडलें जाईल असें वाटतें. १९१९ च्या कायद्यान्वयें तीन हिंदी गृहस्थांची कौन्सिलमध्यें नेमणूक करण्याचा प्रघात पडला आहे. या गृहस्थांची नेमणूक भारतमंत्र्याकडून केली जाते. १९१९ च्या पूर्वी या कौन्सिलमधील सभासदांची संख्या १० ते १४ याच्या दरम्यान असे. पण नवीन कायद्यानें ही मर्यादा ८–१२ केली आहे. त्यांची मुदत पूर्वी सात वर्षे असे पण हल्लीं नवीन कायद्यानें तीं पांच वर्षें करण्यांत आली आहे. यांतील निम्म्यापेक्षां अधिक सभासद दहा वर्षें हिंदुस्थानच्या नोकरींत असलेले व निवडणुकीच्या आधीं ९ वर्षांपेक्षां अधिक दिवस न झालेले असले पाहिजेत. या सभासदांशिवाय इतर तज्ज्ञांनांहि स्वतंत्रपणें या कौन्सिलमध्यें नेमण्याचा भारतमंत्र्याला अधिकार आहे. इंडिया कौंसिलांतील प्रत्येक सभासदाला वर्षाला १२०० पौंड पगार मिळतो; व हा सर्व खर्च ब्रिटिश तिजोरींतून मिळतो.

भारतमंत्री या इंडिया कौन्सिलचा अध्यक्ष असतो. याशिवाय इंडिया कौन्सिलमधील एका सभासदाची उपाध्यक्षाच्या जागीं नेमणूक करण्यांत येते. भारतमंत्र्याच्या गैरहजेरींत उपाध्यक्ष हा सभेचें काम चालवितो. पूर्वी दर आठवड्यास या कौन्सिलची बैठक भरत असे पण नवीन कायद्यानें महिन्यांतून एकदां तरी बैठक भरली पाहिजे असा निर्बंध घालण्यांत आला आहे.

राज्यकारभाराच्या सोयीसाठीं कौन्सिलच्या सभासदांच्या पोटकमिट्या बनविलेल्या असतात व दर एक कमिटीकडे हिशेब, लष्कर, राजकीय, मुलकी, सार्वजनिक, न्याय, भांडार वगैरे खात्यांपैकीं एकेक खातें सोंपविण्यांत येतें. ज्या त्या कमिटीचा मुख्य, ज्या त्या खात्यापुरता स्वतंत्र असतो. आपापल्या खात्यांतील प्रश्नांसंबंधीं स्टेट सेक्रेटरीला हा मुख्य अधिकारी आपलें मत कळवितो व स्टेट सेक्रेटरीला तें पसंत पडल्यास तो प्रश्न निकालांत निघतो. तसें नसल्यास व प्रश्न महत्त्वाचा असल्यास स्टेट सेक्रेटरी सर्व कौन्सिलची सभा बोलावतो व कौन्सिलरांचा सल्ला घेऊन मग त्यांच्या बहुमतानें तो प्रश्न निकालांत काढतो. स्टेट सेक्रेटरीला जादा मत देण्याचा अधिकार असतो. कौन्सिलच्या बैठकीला निदान पांच तरी सभासद हजर असले पाहिजेत, नाहीं तर बैठक तहकूब ठेवण्यांत येते.

इंडियाकौन्सिलचे अधिकार:—हें कौन्सिल मुख्यत्वेंकरून सल्लागारमंडळ असल्याकारणानें भारतमंत्री प्रत्येक बाबीवर सर्वसाधारणपणें या मंडळाचा सल्ला घेतो. तथापि कौन्सिलचा सल्ला भारतमंत्र्यानें ऐकलाच पाहिजे असें नाहीं. १९१९ पूर्वी या कौन्सिलला भारतमंत्र्यावर नियंत्रण घालतां येईल अशा प्रकारचे मुळींच अधिकार नव्हते पण या नवीन कायद्यानें त्यांनां थोडीशी सत्ता देण्यांत आली आहे. उदाहरणार्थ, हिंदुस्थानच्या मिळकतीसंबंधानें आणि त्या मिळकतींतून खर्च करण्याच्या बाबतींत भारतमंत्र्याला या कौन्सिलच्या बहुमताप्रमाणें वागावें लागतें. तसेंच भारतीय सनदी नोकरांकरतां राखून ठेवलेल्या जागांवर हिंदी इसमांची नेमणूक करणें, १९१९ च्या कायद्यानें स्थापन झालेल्या पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या कामासंबंधीं, तसेंच सिव्हिल सर्व्हिससंबंधींचे नियम करणें, सनदी नोकरांच्या परीक्षेचे नियम करणें व त्यांच्या नेमणुका करणें, गव्हर्नराच्या कार्यकारी मंडळामध्यें तात्पुरत्या नेमणुका करणें, सिव्हिल सर्व्हिसमधल्या इसमांचा पगार, पेन्शन इत्यादि विषयांत फेरबदल करणें इत्यादि बाबतींत भारतमंत्र्याला या कौन्सिलची संमती घ्यावी लागते तथापि हे किरकोळ हक्क

सोडून दिल्यास इंडियाकौन्सिल हें केवळ सल्लागारमंडळच आहे व भारतमंत्र्याला या मंडळाचें मत वाटेल त्यावेळीं धाब्यावर बसवितां येतें असें म्हणावयास हरकत नाहीं.

इंडियाकौन्सिल हें अशा रीतीनें केवळ सल्लागार मंडळच असल्यानें त्याचा भारतमंत्र्याच्या अनियंत्रित सत्तेवर आळा घालण्याच्या कामीं उपयोग होतो असें जें मत आहे तें खोटें होय. त्यामुळें हें कौन्सिल मोडून टाकण्यांत यावें एतदर्थ हिंदी पुढाऱ्यांनीं अनेक सूचना केल्या होत्या. कै. ना. गोखले यांनींहि हें कौन्सिल मोडण्यांत यावें अशा प्रकारचें मत प्रतिपादन केलें होतें. राष्ट्रीयसभा व मास्लेम लीग या सभांनींहि हें कौन्सिल मोडण्यांत येऊन भारतमंत्र्याचा अधिकार व हिंदुस्थानसरकारशीं त्याचा संबंध इतर वसाहतींच्या स्टेटसेक्रेटरीप्रमाणें असावा व त्याच्या मदतीला दोन इसम देण्यांत यावे व त्यापैकीं एक हिंदी असावा अशी मागणी केली होती. वरिष्ठ कायदेकौन्सिलच्या १९सभासदांनीं जो चेम्सफोर्ड साहेबाकडे मागण्यांचा अर्ज पाठविला होता, त्यांत देखील या कौन्सिलच्या अनुपयुक्ततेसंबंधीं व तें मोडण्यासंबंधीं मागणी केली होती. इंडिया ऑफिसच्या कारभारासंबंधींची चौकशी करण्याकरतां नेमलेल्या क्रयू कमिशननें हें कौन्सिल मोडण्यांत यावें अशी शिफारस केली होती पण इतक्या सगळ्यांच्या शिफारसीप्रमाणें न वागतां ब्रिटिश मुत्सद्यांनीं हें कौन्सिल अद्यापि कायम ठेवलेंच आहे. ब्रिटिश लोक जात्या काँझर्व्हेटिव्ह असल्यानें १८५८ सालापासून आज सुमारें ६०।७० वर्षे अस्तित्वांत असलेल्या कौन्सिलला एकदम अर्धचंद्र देणें म्हणजे त्यांनां चमत्कारिक वाटूं लागलें. इल्बर्ट अगर चेम्बर्लेन साहेबांनीं हें कौन्सिल ठेवण्यांत यावें असें मत प्रदर्शित केलें होतें आणि जाईंट कमिटीनेंहि तें तसेंच चालू ठेवावें असें मत दिलें. भारतमंत्र्याला हिंदी प्रश्नावर आपला सल्ला देण्याकरतां अद्यापि कांहीं कालपर्यंत तरी असलें सल्लागार मंडळ असणें जरूर आहे असें जॉईंट कमिटीनें आपल्या रिपोर्टांत म्हटलें आहे. त्यामुळें हें कौन्सिल अद्यापिहि ठेवण्यांत आलें आहे. फक्त कौन्सिलच्या घटनेमध्यें व कामकाजपद्धतीमध्यें थोडासा फेरफार करण्यांत येऊन या कौन्सिलच्या हातीं थोडेसे अधिकार देण्याचें तेवढें काम या नवीन सुधारणांनीं केलें आहे.

वरिष्ठ सरकारः—हिंदुस्थानच्या शासनपद्धतींत सर्वांत वरिष्ठ संस्था पार्लमेंट होय व पार्लमेंटच्या व बादशहाच्या वतीनें भारतमंत्री हा हिंदुस्थानचा राज्यकारभार इंग्लंडमध्यें बसून चालवितो. पण प्रत्यक्ष हिंदुस्थानांत हिंदुस्थानचा राज्यकारभार जाग्यावर राहून पाहणारा असा कोणी तरी अधिकारी असणें अत्यंत आवश्यक होतें. त्यामुळें हिंदुस्थानचा राज्यकारभार प्रत्यक्ष हिंदुस्थानांत राहून चालविण्याकरतां एक वडा अधिकारी नेमण्यांत येऊं लागला व त्याच्या मदतीसाठीं कार्यकारी मंडळ व अधिकारी वर्ग देण्यांत आले. या बड्या अधिकाऱ्याला गव्हर्नर जनरल उर्फ व्हॉइसरॉय असें म्हणतात; व गव्हर्नर जनरल, त्याचें कार्यकारीमंडळ, कायदेकौन्सिल इत्यादि मिळून हिंदुस्थानसरकार होतें. हिंदुस्थानसरकारलाच हिंदुस्थानांतील 'वरिष्ठ सरकार' असें नांव आहे. मध्यवर्ती सरकार असेंहि याला संबोधण्यांत येतें.

गव्हर्नर जनरल उर्फ व्हॉईसरॉयः—१७७३ पूर्वी ईस्ट इंडिया कंपनी ही हिंदुस्थानांतील आपल्या प्रदेशाचा कारभार प्रेसिडंट वत्याचे मदतनीस यांच्याकडून चालवीत असे. मद्रास, मुंबई, व कलकत्ता या तीन भागांवर तीन प्रेसिडेंट असत व त्यावरूनच प्रेसिडेंट शासित टापूला प्रेसिडेन्सी उर्फ इलाखा असें नांव पडलें. १७७३ सालीं रेग्यूलेटिंग अॅक्ट पास होऊन बंगालचा गव्हर्नर यास गव्हर्नर जनरल ऑफ बंगाल करण्यांत येऊन त्याच्या सत्तेखालीं मुंबई व मद्रास येथील प्रेसिडेंट उर्फ गव्हर्नरांनीं काम करावें असें ठरलें. १८३३ सालीं पास झालेल्या चार्टर अॅक्टानें गव्हर्नर जनरल ऑफ बंगाल याला गव्हर्नर जनरल ऑफ इंडिया करण्यांत आलें. लॉर्ड बुइल्यम बेंटिंक हा या कायद्यान्वयें पहिला 'गव्हर्नर जनरल ऑफ इंडिया' झाला. तथापि १८९३ सालापर्यंत गव्हर्नर जनरल ऑफ इंडियाला बंगालचा राज्यकारभार व शिवाय हिंदुस्थानचा राज्यकारभार पहावा लागे. त्यामुळें त्याच्यावर कामाचा बोजा फार पडत असे. १८९३ सालच्या चार्टर अॅक्टानें बंगालच्या राज्यकारभाराची जबाबदारी त्याच्यावरून काढून घेण्यांत येऊन बंगालवर स्वतंत्र लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्यांत आला व त्यामुळें गव्हर्नर जनरलकडे ब्रिटिश हिंदुस्थानच्या राज्यकारभारावर देखरेख करण्याचें तेवढें काम राहिलें. १८५८ सालीं पार्लमेंटनें हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची धुरा आपल्या मानेवर घेतल्यापासून, त्याला व्हॉइसरॉय उर्फ बादशहाचा प्रतिनिधि असें संबोधण्यांत येऊं लागलें. तथापि पार्लमेंटच्या हिंदुस्थानविषयक कायद्यांमध्यें व कागदोपत्रीं अद्यापि त्याचा 'गव्हर्नर

जनरल ऑफ इंडिया' असाच उल्लेख करण्यांत येतो. लॉर्ड कॅनिंग हा हिंदुस्थानचा पहिला व्हॉईसरॉय होय.

लायकी व नेमणूक:–१७७३ ते १८१३ सालापर्यंत गव्हर्नरजनरलची नेमणूक कंपनीच्या डायरेक्टर्सकडून होत असे. १८१३ सालच्या चार्टर ॲक्टानें या नेमणुकीला इंग्लंडच्या राजाची संमति असली पाहिजे असें ठरविण्यांत आलें. १८९८ सालापासून बादशहा हा मुख्य प्रधानाच्या सल्लयानें याची नेमणूक करतो. साऱ्या ब्रिटिश साम्राज्यांत हिंदुस्थानाएवढा अफाट प्रदेश नाहीं. अर्थात एवढया अफाट प्रदेशाचा राज्यकारकार हिंदुस्थानांत राहून पहाणें म्हणजे मानाचें व तितकेंच जबाबदारीचें असणार हें उघड आहे. त्यामुळें असल्या जबाबदारीच्या जागीं माणूस नेमावयाचा तो इंग्लंडमध्यें कर्तृत्वाविषयीं व मुत्सद्देगिरीमध्यें नाणावलेला असाच नेमला जाणार यांत नवल नाहीं. अशाच प्रकारच्या माणसाची नेमणूक व्हाईसरायच्या जागेवर करण्यांत येते. लॉर्ड कॉर्नवालिसनें आपल्या 'कारकीर्दीच्या अखेरीस असे उद्गार काढले होते कीं, हिंदुस्थानच्या गव्हर्नरजनरलच्या जागेवर जो इसम नेमण्यांत येईल तो नोकरींत नसलेला पाहिजे, व सरकारच्या नोकरींत असलेल्या इसमापेक्षां त्याचा दर्जा उच्च असला पाहिजे व त्याच्या नेमणुकीला इंग्लंडच्या प्रधानमंडळाचा पूर्णपणें दुजोरा असला पाहिजे. सर जॉन लॅरेन्सशिवाय बाकीचे सर्व व्हाईसरॉय याच धोरणानें नेमण्यांत आले आहेत. व्हाईसरॉयच्या जागेवर राजघराण्यांतील एखाद्या माणसास नेमण्यांत यावें अशी सूचना पुढें आली होती पण तिचा त्याग करण्यांत आला. अशा प्रकारें इंग्लंडच्या राजकारणांत मुरलेले व हिंदुस्थानविषयीं पूर्वग्रहानें दूषित नसलेले व स्वतंत्र वातावरणांत वाढलेले असे उमराव अगर प्रसिद्ध इसम यां जागेवर नेमण्यांत आल्यामुळें हिंदुस्थानचा फायदा होण्याचा संभव असतो. व्हाईसरॉयची नेमणूक पांच वर्षांची असते; व ती राजाच्या शिक्कामोर्तबानें करण्यांत येते.

व्हाईसरॉयचे अधिकार व कर्तव्यें:–हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयची सत्ता तिहेरी आहे असें रॅम्से मॅकडोनल्ड यानें म्हटलें आहे. बादशहाचा खास प्रतिनिधि म्हणून तो हिंदुस्थानांत राज्यकारभार पाहण्यासाठीं आलेला असतो. तसेंच तो पार्लमेंटच्या वतीनें नेमण्यांत आलेला असतो व हिंदुस्थानांतील राज्यकारभाराचा तो मुख्य अधिकारी असतो. या तिहेरी सत्तेचें त्याच्यामध्यें केंद्रीकरण झालेलें असतें व त्यामुळें त्याचीं कर्तव्यें व अधिकारहि तिहेरी स्वरूपाचे असतात. बादशहाचा हिंदुस्थानांतील प्रत्यक्ष प्रतिनिधि या नात्यानें बादशहाचे जे अधिकार असतात ते हिंदुस्थानामध्यें व हिंदुस्थानापुरते त्याला प्राप्त होतात. या अधिकारांत त्याला नजराणे स्वकारणें, आशियाखंडांतील राष्ट्रांशीं तहनामे करणें, हिंदुस्थानांतील संस्थानिकांवर हुकमत चालविणें, त्यांच्या राज्यकारभारांत त्यांनां जरूर ती सल्ला देणें, संस्थान खालसा करणें अगर खालसा केलेलें परत देणें, संस्थानच्या हद्दींत शांतता व सुव्यवस्था राखण्याची खबरदारी घेणें, बादशाही कर्ज सर्वांच्या अगोदर वसूल करून घेणें, गुन्हेगारांची शिक्षा माफ करणें, जमीनमहसूल गोळा करणें इत्यादि गोष्टी त्याला करतां येतात. पार्लमेंटच्या व भारतमंत्र्याच्या वतीनें तो हिंदुस्थानांत राज्यकारभार चालवीत असल्यामुळें पार्लमेंट जें धोरण आंखून देईल अगर भारतमंत्री जे हुकूम सोडील यांची अंमलबजावणी त्याला हिंदुस्थानांत करावी लागते. हिंदुस्थानांतील राज्यकारभारावर देखरेख ठेवणारा सर्वांत वरिष्ठ अधिकारी तो असल्यानें, आपल्या हाताखालील गव्हर्नरांचा व त्यांच्या ताब्यांतील मुलुखांचा राज्यकारभार व्यवस्थित रीतीनें चालला आहे किंवा नाहीं हें पहाणें; लष्करी, मुलकी व दिवाणी कारभाराला योग्य वळण लावणें इत्यादि अनेक प्रकारचीं कामें त्याला पहावीं लागतात. हीं कामें व्यवस्थित रीतीनें पार पाडण्याकरतां जरूर ते सर्व अधिकार याला देण्यांत आलेले असतात. लेफ्टनंट गव्हर्नराची नेमणूक करणें, आपल्या कार्यकारी मंडळाची घटना करणें, उपाध्यक्ष निवडणें, कामकाजाचे नियम करणें, इत्यादि अधिकार त्याला आहेत. त्यानें आपल्या अधिकाराच्या कक्षेत केलेल्या कोणत्याहि कृत्याबद्दल, न्यायकोर्टापुढें त्याला ओढतां येत नाहीं. याशिवाय कायदे करणें, जादा हुकूमनामे सहा महिन्यांच्या अवधीपुरते काढणें, इत्यादि बाबतींतहि त्याला बरेच अधिकार असतात.

व्हाईसरॉयच्या व स्टेटसेक्रेटरीच्या परस्पर संबंधाच्या बाबतसिंबंधानें अनेक प्रकारचे आक्षेप घेण्यांत आले आहेत. स्टेटसेक्रेटरीचा व्हाईसरॉयवर किती अधिकार आहे अगर असावा यासंबंधीं मुख्यत: दोन पक्ष उपस्थित झाले आहेत. विशेषत: लार्ड मोर्लेनें हिंदुस्थानसरकार हें भारतमंत्र्याचें एजंट आहे असें विधान केल्यापासून यासंबंधीं विशेष चर्चा सुरू झाली आहे. वास्तविक हा वाद याच्याहि पूर्वीपासूनचा आहे. तथापि

मोर्लेसाहेबांच्या विधानामुळें त्याला तोंड लागलें. १८५८ च्या कायद्यान्वयें हिंदुस्थानसरकारला कोणतेंहि बिल पुढें आणण्याचा अधिकार मिळाला होता व स्टेटसेक्रेटरीला तो कायदा, वाटल्यास नामंजूर करतां येत असे. १८६१ च्या कायद्यांतहि गव्हर्नरला आपल्या प्रांतिक कारभारासंबंधांत एखादा कायदा करण्यापूर्वी व्हाईसरायची संमति घेतली पाहिजे असें स्पष्ट शब्दांत म्हटलें आहे. त्यांत स्टेट सेक्रेटरीच्या संमतीच्या आवश्यकतेचा मुळींच उल्लेख नाहीं. तथापि १८७० सालीं 'पंजाब कॅनाल्स ॲक्ट'च्या बाबतींत त्यावेळचा स्टेटसेक्रेटरी ड्यूक ऑफ अर्गाइल व व्हाईसराय लॉर्ड मेयो यांच्यामध्यें वाद उपस्थित झाला. त्यावेळीं स्टेटसेक्रेटरींनीं एक खलिता पाठवून त्यांत स्टेटसेक्रेटरीला, व्हाईसरॉयनें केलेल्या कायद्याला नामंजूरी देणें एवढाच मर्यादित अधिकार नसून त्याच्यापेक्षांहि त्याला व्हॉईसरॉयला आपले हुकूम पाळावयास लावण्याचा अधिकार आहे असें स्पष्ट रीतीनें कळविलें. पुढें १८७४ सालीं भारतमंत्री लॉर्ड सॅलिसबरी यानें, गव्हर्नर जनरलनें कोणतेंहि बिल कायदेमंडळांत मांडण्यापूर्वी स्टेटसेक्रेटरीला तसें बिल आपण आणीत असल्याचें कळविलें पाहिजे असें त्यावेळेचा व्हॉईसराय नॉर्थब्रुक यास कळविलें. सेक्रेटरीसाहेबांच्या या हुकूमाचा अवलंब केल्यास १८६१ च्या कायद्यानें गव्हर्नर जनरलला दिलेला अधिकार निष्फळ ठरेल असें स्टेटसेक्रेटरीला व्हॉईसरॉयनें कळविलें पण त्याचा उपयोग झाला नाहीं. १८७९ सालीं कापसाच्या आयाती वर जकात बसविण्याचा कायदा नॉर्थब्रूकनें स्टेटसेक्रेटरीला आगाऊ न कळवितां जरूरीच्या सबबीवर पास केला. पण स्टेटसेक्रेटरीनें तो रद्द केला. त्यामुळें नॉर्थब्रूकनें राजीनामा दिला. अशा रीतीनें सॅलिसबरीनें व्हॉईसरॉय हा स्टेटसेक्रेटरीचा गुमास्ता अगर अंमलबजावणी करणारा कामगार होय असें ठरवून टाकलें. लॉर्ड कर्झन यालाहि, हिंदुस्थानच्या सेनापतीच्या दर्जाच्या प्रश्नावर त्याचें मत स्टेटसेक्रेटरीला पसंत न पडल्यामुळें राजीनामा द्यावा लागला होता. पुढें या वादाला मोर्लेसाहेबांच्या कारकीर्दीत रंग चढला. मोर्लेसाहेबांच्या वर दिलेल्या विधानावर हिंदुस्थानच्या लोकांनां पूर्ण परिचयाचा झालेल्या चिरोलनें आपल्या 'इंडियन अनरेस्ट' पुस्तकांत टीका केली. त्याला मोर्लेनें 'नाइंटींथ सेंचरी व आफ्टर' या मासिकांत उत्तर दिलें. या दोहोंच्या वादांतील मुद्दे पुढीलप्रमाणें होते.

हिंदुस्थानसरकारच्या बाजूनें पुढें मांडण्यांत आलेले मुद्दे:—व्हाईसराय हा बादशहाचा खास प्रतिनिधि असल्यानें, तो स्टेटसेक्रेटरीचा गुमास्ता आहे असें म्हणणें योग्य नाहीं. शिवाय हिंदी लोकमत दिवसानुदिवस जोरदार होत चालल्यानें कित्येक बाबतींत व्हाईसरायला लोकमताला मान वांकवावी लागणार व अशा स्थितींत लोकमताला न जुमानतां स्टेटसेक्रेटरीच्या मताप्रमाणेंच त्यानें वागणें म्हणजे त्याची स्थिति चमत्कारिक होण्याचा संभव आहे. उत्तरोत्तर हिंदी लोकमताच्या इच्छेप्रमाणें वागणारें होणें अत्यंत इष्ट व आवश्यक आहे.

स्टेटसेक्रेटरीच्या बाजूची कैफीयत:—व्हाईसरायचा दर्जा, बादशहाचा खास प्रतिनिधि या नात्यानें जरी मोठ्या मानाचा असला तरी तेवढ्यावरून त्याच्यावर वरिष्ठ सत्तेचा ताबा असूं नये असें म्हणणें वाजवी नाहीं. शिवाय कंपनीसरकारच्या अमदानींत जी सत्ता नियामकमंडळ व व्यवस्थापकमंडळ यांच्या हातांत होती ती १८५८ च्या कायद्यानें भारतमंत्र्याकडे सोंपविण्यांत आली आहे. रेग्युलेटिंग ॲक्टान्वयें गव्हर्नर जनरलला व्यवस्थापक मंडळाचे हुकूम पाळावे लागत असत. पिटच्या बिलानें त्याला नियामक मंडळाच्या हुकुमाची अंमलबजावणी करावी लागे व या दोन्ही मंडळांची सत्ता ज्याच्या हातांत देण्यांत आली आहे त्याच्या हुकुमाप्रमाणें गव्हर्नर जनरलनें वागलेंच पाहिजे. शिवाय १८५८ सालीं व्हाईसराय नेमतांना त्याच्या अधिकाराला 'सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या हुकुमान्वयें व नियमान्वयें' अशी मर्यादा घातली आहे व प्रत्येक नवा व्हाईसराय नेमतांना जो राजशिक्का व मोर्तब त्याला देण्यांत येतो त्यांतहि अद्यापि वरील शब्द वापरण्यांत येतात.

वरील दोन्ही बाजूंचें म्हणणें विचारांत घेतल्यास असें आढळून येतें कीं, कायद्याच्या दृष्टीनें स्टेटसेक्रेटरीची सत्ता गव्हर्नर जनरलवर निःसंशय रीतीनें आहे. तथापि ती कशी व किती वापरावी हें ज्या त्या प्रसंगावरून ठरवावें लागेल. त्यांतल्यात्यांत स्टेटसेक्रेटरीची हुकमत आपल्यावर नेहमीं चालूं देणें किंवा न देणें हें ज्या त्या व्हाईसरॉयच्या अंगच्या कर्तृत्वावर अवलंबून राहील असें जें सर जॉन स्ट्रेचीचें म्हणणें आहे त्यांतहि बरेंच तथ्य आहे यांत शंका नाहीं. ज्या मानानें हिंदी लोकमत आपलें वजन हिंदुस्थानच्या राज्यकारभारावर अधिकाधिक पाडीत जाईल त्या मानानें स्टेटसेक्रेटरीची अनियंत्रित सत्ता कमी होईल व पार्लमेंटच्या सार्वभौमत्वाला

बाध न येतां सेक्रेटरी ऑफ स्टेटची सत्ता जवळजवळ नामधारीहि होईल असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं.

वरिष्ठ कार्यकारी मंडळ:–गव्हर्नर जनरलला हिंदुस्थानचा राज्यकारभार चालविण्याच्या कामीं मदत व सल्ला देण्याकरितां कार्यकारीमंडळ देण्यांत आलें आहे. १७७३ च्या रेग्युलेटिंग अॅक्टान्वयें पहिला गव्हर्नर जनरल–वॉरन हेस्टिंग्ज–याला मदतनीस म्हणून हें कार्यकारी मंडळ स्थापन करण्यांत आलें. त्यावेळीं या कार्यकारी मंडळांत चार सभासद असत. या कौन्सिलच्या संमतीनें गव्हर्नर जनरलनें राज्यकारभार करावयाचा असा निर्बंध घालण्यांत आला होता. गव्हर्नर जनरलला जादा मताशिवाय अधिक अधिकार नव्हता. त्यामुळें गव्हर्नर जनरलला कौन्सिलच्या बहुमताप्रमाणें राज्यकारभार करावा लागे म्हणजे त्यावेळीं एक प्रकारें 'कमिटीगव्हर्नमेंट'च देण्यांत आलें असें म्हणावयास हरकत नाहीं. पण हेस्टिंग्ज व त्याचे कौन्सिलर्स यांच्यामध्यें वारंवार खटके उडूं लागल्यामुळें राज्यकारभारांत व्यत्यय येऊं लागल्यानें कमिटीगव्हर्नमेंटचे तोटे कंपनीच्या अधिकाऱ्यांनां समजून आले व १७८४ सालीं पिटच्या अॅक्टानें गव्हर्नर जनरलला कांहीं बाबतींत कौन्सिलच्या बहुमताला धाब्यावर बसवून आपल्या मताप्रमाणें वागण्याचा अधिकार दिला. तसेंच या अॅक्टानें कौन्सिलमध्यें तीन सभासद असावेत असें ठरविलें. १८३३ च्या कायद्यानें या कौन्सिलमध्यें एका कायदेपंडिताची नेमणूक करण्यांत येऊन फक्त कायदे अगर नियम करण्याच्या वेळेपुरतेंच त्यानें बैठकीला हजर रहावें असा निर्बंध घालण्यांत आला. १८५३ सालच्या अॅक्टानें त्याची इतर सभासदांप्रमाणेंच गणना होऊं लागली, म्हणजे कौन्सिलच्या सर्व बैठकींत भाग घेण्यास त्याला अधिकार देण्यांत आला. १८५८सालपर्यंत कौन्सिलच्या सभासदांची नेमणूक व्यवस्थापक मंडळाकडून करण्यांत येई पण १८५८ सालानंतर स्टेटसेक्रेटरीच्या शिफारशीनें बादशहाकडून नेमणूक करण्यांत येऊं लागली. १८५९ सालीं फडणिशीच्या कामांत तज्ज्ञ असलेल्या इसमाची कौन्सिलमध्यें नेमणूक करण्याचा अधिकार मिळाला. १८७४ सालीं सार्वजनिक कामांच्या खात्याची व्यवस्था पहाण्यासाठीं एक खास सभासद या मंडळामध्यें नेमण्याचा गव्हर्नर जनरल इन कौन्सिलला हक्क प्राप्त झाला. १९०५ सालीं सार्वजनिक कामाचें खातें मोडण्यांत आलें व त्याच्या जागीं व्यापार व उद्योगधंद्यांचें खातें निर्माण करण्यांत आलें व त्याच्या ताब्यांत सार्वजनिक कामांच्या खात्याच्या बऱ्याच बाबी देण्यांत आल्या व पाणीपुरवठा इत्यादि कामें रेव्हेन्यू व शेतकी खात्याच्या सभासदांच्या हवालीं करण्यांत आलीं. १९०९सालीं सेनापतीच्या हातांत सेनाखातें देण्यांत आलें व १९१० सालीं शिक्षणखातें निर्माण करण्यांत येऊन त्याची व्यवस्था पहाण्यासाठीं एक स्वतंत्र सभासद कौन्सिलमध्यें घेण्यांत आला. १९१९ पर्यंत व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळामध्यें सहा साधारण व सेनापति हा जादा सभासद असे सात सभासद व व्हाईसरॉय हा आठवा, असे आठ सभासद असत. याशिवाय ज्या प्रांतांत कार्यकारी मंडळाची बैठक होईल त्या प्रांताच्या गव्हर्नरला या मंडळाच्या बैठकींत भाग घेतां येत असे. १९१५ सालच्या कायद्यानें गव्हर्नर जनरलच्या कार्यकारी मंडळांत पांच साधारण आणि एक असाधारण असे सहा सभासद असावेत असें ठरविलें होतें पण १९१९ च्या नवीन कायद्यानें सभासदांच्या संख्येवरील निर्बंध काढून टाकण्यांत आला आहे म्हणजे व्हाइसरॉयला आपल्याला जरूर असतील तितके सभासद कार्यकारीमंडळांत घेतां येतील. मॉंटेग्यू–चेम्सफोर्ड रिपोर्टांतील शिफारशीला अनुसरूनच हा निर्बंध काढून टाकण्यांत आला. व सर शंकर नायर यांनीं वरिष्ठ सरकारचा प्रांतिक सरकारच्या सोंपीव खात्याच्या बाबतींत ढवळाढवळ करण्याचा अधिकार वरिष्ठ कायदेमंडळाला जबाबदार असलेल्या प्रधानाकडे देण्यांत यावा व तसें शक्य नसल्यास वरिष्ठ कार्यकारी मंडळांत तीन हिंदी सभासद नेमण्यांत यावेत अशी शिफारस केली होती. राष्ट्रीय सभेनें कार्यकारी मंडळांत निम्मे सभासद हिंदी असावेत अशी मागणी केली होती. पण त्याचा कांहीं उपयोग न होतां, नवीन कायद्यानें कार्यकारी मंडळाच्या सभासदांची संख्या अनिर्बंध केली. तथापि सभासदांच्या लायकीमध्यें मात्र फेरफार करण्यांत आला नाहीं. म्हणजे १९१५ च्या कायद्यांत सभासदांच्या लायकीसंबंधाचें जें कलम आहे तेंच कायम राहिलें.

सभासदांची लायकी:–कौन्सिलच्या सभासदांपैकीं तीन सभासद हिंदुस्थानांत दहा वर्षें नोकरी केलेले असले पाहिजेत, एक दहा वर्षांपेक्षां जास्त अनुभव असलेला विलायतेंतील अगर हिंदुस्थानांतील हायकोर्टवकील असला पाहिजे व बाकीच्याबद्दल असा नियम नव्हता. वास्तविक १९१५ च्या कायद्यांत अमुकच सभासद हिंदी

असावेत असा उल्लेख नाहीं. पण हिंदी सभासद कार्यकारी मंडळांत नसावा असेंहि म्हटलेलें नाहीं. याचा फायदा घेऊन लॉर्ड मोर्ले व मिंटो यांनीं १९१० सालीं एका हिंदी सभासदाची कार्यकारी मंडळांत नेमणूक केली. पण सुधारणाकायद्यानें कार्यकारी मंडळांत तीन हिंदी सभासद असावे असें ठरविलें आहे व जाइंट पार्लमेंटरी कमिटीनें ही हिंदी सभासदांची संख्या हळू हळू वाढविण्यांत यावी अशी शिफारस केली आहे. ही सभासदांची नेमणूक पांच वर्षांची असते.

कामकाजाची पद्धतिः—या मंडळाचा अध्यक्ष गव्हर्नर जनरल हा असतो. मंडळाच्या सभासदांपैकींच एकाची उपाध्यक्षाच्या जागीं निवड करण्यांत येते. कामकाज कसें चालावें यासंबंधीं नियम करण्यांत आले आहेत. या सभेंत मंजूर झालेली बाब गव्हर्नर जनरल इन कौन्सिलचा हुकूम म्हणून प्रसिद्ध केली जाते. सभासदांच्या बहुमताप्रमाणें गव्हर्नर जनरलला वागावें लागतें. सारखीं मतें पडल्यास गव्हर्नर जनरलला जादा मत देण्याचा अधिकार आहे. गव्हर्नर जनरलचें धोरण सभासदांनां पसंत नसल्यास आपलें म्हणणें भारतमंत्र्यापुढें ठेवण्यास सभासदांनां हक्क आहे.

१८९८ पूर्वीं हिंदुस्थानसरकारचीं सर्वच कामें गव्हर्नर जनरल पहात असे पण त्या योगानें गोंधळ उडूं लागला. तेव्हां कॅनिंगनें आपल्या कामांचीं खातीं पाडून एकेक खातें एकेका सभासदाच्या ताब्यांत दिलें. कॅनिंगनें केलेल्या खात्यांमध्यें पुढें थोडे फार फरक करण्यांत आले. हल्लीं हिंदुस्थानसरकारचीं एकंदर आठ खातीं आहेत तीं:—

(१)परदेशखातें:—हें व्हाईसरायनें आपल्याकडे ठेवलें आहे. या खात्यांत पुढील कामांचा अंतर्भाव होतो:— अफगाणिस्तान, इराण, अरबस्तान, तिबेट, चीन, सयाम इत्यादि देशांशीं संबंध ठेवणें, एतद्देशीय संस्थानांसंबधींचें कामकाज पहाणें. अजमीर—मेवाड, वायव्यसरहद्दीवरील प्रांत, ब्रिटिश बलुचिस्तान, या प्रांतांची व्यवस्था पहाणें, सरहद्दीवरील जातींवर देखरेख ठेवणें, इंपीरियल सर्व्हिस ट्रूप्स, इंपीरियल कॅडेट कोअर व राजकुमार कॉलेजें यांच्यावर देखरेख ठेवणें.

(२)कायदाखातें:—हें कायदेमंत्र्याकडे सोंपविण्यांत आलें आहे. या खात्याचीं कामें—कायदेशीर मुद्यासंबंधीं सरकारला सल्ला देणें, कायद्यांमध्यें फेरफार सुचविणें, नवीन कायदे व नियम करणें, कायद्यांचा अर्थ सांगणें, कायद्यांचे मसुदे करणें व ते कायदेमंडळापुढें मांडणें वगैरे हें खातें १८३३ सालीं निर्माण करण्यांत आलें.

(३) लष्करखातें:—हें खातें सेनापतीच्या ताब्यांत असतें. लष्करसंबंधीं सर्व व्यवस्था पहाण्याचें काम या खात्याचें आहे.

(४) शिक्षणखातें:—या खात्याच्या कामांत शिक्षण, आरोग्य, जंगल, शेतसारा दुष्काळ कामें वगैरे येतात. स्थानिक स्वराज्यसंस्थांची व्यवस्थाहि याच खात्यांच्या कार्यक्षेत्रांत येते. यापैकीं बहुतेक खातीं नवीन सुधारणाकायद्यानें प्रांतिक सरकारच्या ताब्यांत येत असल्याकारणानें या खात्यांच्या प्रांतिक कारभारावर देखरेख ठेवणें वगैरे कामेंहि शिक्षणखात्याच्या मंत्र्याला करावीं लागतात.

(५)गृहखातें:—देशांतील राज्यव्यवस्था व त्यासंबंधींचीं कामें, न्याय, कायदा, पोलीस वगैरेसंबंधींचीं कामें, खानेसुमारी इत्यादि कामांची व्यवस्था या खात्याकडून करण्यांत येते.

(६) आर्थिक खातें:—वरिष्ठ व प्रांतिक सरकारच्या जमाखर्चावर देखरेख ठेवणें, चलनी नाणें, टांकसाळ, पेढ्या, प्रांतीवरील कर इत्यादि कामें या खात्यांत अंतर्भूत होतात. अधिकारी लोकांचा पगार, रजा देणें, पेन्शन इत्यादि कामें या खात्याकडेच आहेत. या खात्याच्या मंत्र्याकडे अंदाजपत्रक कायदेमंडळापुढें मांडण्याचें काम आहे.

(७) व्यापार व रेल्वे खातें:—व्यापाराच्या व दळणवळणाच्या अगर इतर वाहतुकीच्या साधनांसंबंधाची सर्व व्यवस्था पहाणें, बंदरें, गोद्या इत्यादींची तपासणी करणें, व्यापारासंबंधींचे आंकडे प्रसिद्ध करणें, आयात—निर्गती संबंधीं नियम करणें इत्यादि कामें या खात्याकडे सोंपविण्यांत आलीं आहेत.

(८) उद्योगधंदे व मजूरखातें:—उद्योगधंद्यांसंबंधींच्या सर्व कामांची व्यवस्था पहाणें, मजुरांच्यासंबंधींचे कायदे करणें व त्यांच्या हितासंबंधीं व्यवस्था पहाणें, टपाल, तारं पाटबंधारे इत्यादि कामांवर देखरेख इत्यादि कामांचा या खात्यांत अंतर्भाव होतो.

वर दिलेल्या प्रत्येक खात्यावर एक एक कायदेकौन्सिलाचा सभासद मुख्य असतो. त्याच्या हाताखालीं दुय्यम मंत्री असतो, शिवाय प्रत्येक खात्याचा चिटणीस, दुय्यम चिटणीस व पुष्कळ नोकर असतातच. चालचलाऊ कामें चिटणीस आपल्या अधिकारांत निकालांत काढतो. महत्त्वाचीं कामें मंत्र्याकडे पाठविण्यांत येतात आणि तीं त्याच्या अभिप्रायासह गव्हर्नरजनरलकडे पाठविण्यांत

येतात. गव्हर्नरजनरलचें व मंत्र्याचें मत जुळलें तर काम निकालांत निघतें पण न जुळल्यास तें काम सर्व मंडळांपुढें विचाराकरतां ठेवण्यांत येतें. प्रत्येक खात्याच्या दुय्यम मंत्र्याचें काम आपापल्या खात्यांतील कामकाजाची माहिती कार्यकारी मंडळाला पुरविण्याचें असतें.

कार्यकारी मंडळ व कॅबिनेटः–व्हाईसरायाच्या कार्यकारी मंडळाची इंग्लंडच्या प्रधानाच्या कॅबिनेटशीं तुलना करण्यांत येते. स्ट्रॅची साहेब आपल्या पुस्तकांत म्हणतात कीं, जरी "हिंदुस्थानसरकारच्या कार्यक्षेत्राची खातेविभागणी इंग्लंडमधील विभागणीइतकी संपूर्ण आणि व्यवस्थित नसली व प्रत्येक खात्याच्या प्रधानाची सत्ता इंग्लंडमधील खातेमंत्र्याच्या सत्तेहून कमी असली तरी एकंदरीनें व्हाईसरायाचें कार्यकारीमंडळ हें इंग्लंडच्या कॅबिनेटसारखेंच आहे असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं." स्ट्रॅची साहेबाचे हे उद्गार मुळींच बरोबर नाहींत.कारण वरवर जरी व्हाईसरायच्या कार्यकारी मंडळाचें व कॅबिनेटचें साम्य दिसत असलें तरी दोहोंच्या स्वरूपामध्यें आणि सत्तेमध्यें महत्त्वाचे फरक आहेत. ते असे.–

(१) इंग्लंडमधील कॅबिनेट हें पार्लमेंटच्या कायद्यानें प्रस्थापित झालेलें नाहीं. व्हाईसरायचें कार्यकारीमंडळ कायद्यानें प्रस्थापित झालें आहे, कॅबिनेटचें कामकाज कागदावर टिपण्यांत येत नाहीं पण कार्यकारीमंडळाचें सर्व काम टिपण्यांत येतें.

(२) इंग्लंडमध्यें (पक्षपद्धति) पार्टीसिस्टीम अस्तित्वांत असल्यामुळें कॅबिनेटमध्यें एकाच पक्षाचे महत्त्वाचे लोक असतात, त्यामुळें त्यांच्यांत एकोपा असतो. अधिकारारूढ पक्ष अधिकारच्युत झाला कीं,त्याचें कॅबिनेट उठल्या जातें. कॅबिनेटमधील प्रत्येक प्रधानाला आपल्या अधिकारांत स्वतंत्रपणें एखादी गोष्ट करतां येते. व्हाईसरायचें कार्यकारीमंडळ एका विशिष्ट पक्षाचें नसतें. त्यांतील एखाद्या सभासदानें राजीनामा दिला तरी दुसरे सभासद कायमच असतात. कार्यकारी मंडळांतील सभासदानें आपल्या खात्यांच्या कामकाजाबद्दल सोडलेले हुकूम गव्हर्नर जनरल इन कौन्सिलचे हुकूम म्हणून सोडण्यांत येतात. कार्यकारी मंडळाच्या सभासदांमध्यें एकोपा नसतो. व व्हाईसरायच्या धोरणासंबंधींची नापसंति कोणत्याहि सभासदाला स्टेटसेक्रेटरीकडे कळविण्याचा अधिकार आहे. व्हाईसराय हा बहुतेक हिंदी परिस्थितीविषयीं अनभिज्ञ असतो तर इंग्लंडचा प्रधान हा साम्राज्यविषयक परिस्थितीविषयीं पूर्ण माहितगार असतो.

(३) इंग्लंडचें कॅबिनेट हें पार्लमेंटला जबाबदार असतें तर व्हाईसरायचें कार्यकारीमंडळ हें हिंदी कायदेमंडळांनां जबाबदार नसून स्टेटसेक्रेटरीला व पार्लमेंटला जबाबदार असतें.

तात्पर्य, व्हाईसरॉयच्या कार्यकारीमंडळाची कॅबिनेटशीं तुलना करणें हास्यास्पद आहे. कर्झन साहेबाचे या बाबतींतील उद्गार मननीय आहेत. ते म्हणतात "हिंदुस्थानसरकारचा राज्यकारभार एका व्यक्तीकडून चालविला जात नसून एका कमिटीकडून चालविला जातो. कमिटीच्या बहुमताच्या संमतीशिवाय त्याला कोणतेंहि महत्त्वाचें कार्य करतां येत नाहीं". त्याच्या हातांत जरी अनियंत्रित सत्ता असली तरी त्याच्या कृत्याचा निषेध करण्याचा अधिकार कौन्सिलला आहे व तो निषेध कौन्सिलांतील सभासदास स्टेटसेक्रेटरीला खलिता पाठवून व्यक्त करतां येतो.

व्हाईसरायचें अधिकारीमंडळ व इंडिया कौन्सिलः– या दोन मंडळांमध्यें तुलना केल्यास आपल्याला असें आढळून येतें कीं, इंडिया कौन्सिलला जरी विस्तृत अधिकार असले तरी स्टेटसेक्रेटरीच्या मनांत आल्यास कौन्सिलच्या बहुमताला तो सहज फेंटाळूं शकतो. फक्त कांहीं ठराविक बाबतींतच त्याला कौन्सिलच्या मताप्रमाणें चालावें लागतें. याच्या उलट अगदीं जरूरीच्या प्रसंगीं जरी व्हाईसरायला आपल्या कार्यकारी कौन्सिलच्या मताला फेंटाळून लावतां येतें तरी बहुतेक सर्व बाबतींत त्याला कौन्सिलच्या तंत्रानें चालावें लागतें. तसेंच कार्यकारीमंडळापासून व्हाईसरायला कोणतीहि गोष्ट लपवून ठेवतां येत नाहीं, त्याच्या उलट स्टेटसेक्रेटरीला प्रत्येक बाब कौन्सिलरांनां सांगावीच लागते असें नाहीं आणि जरी स्टेटसेक्रेटरीनें आपल्या कौन्सिलचा एखाद्या प्रश्नावर सल्ला घेतला तरी त्या सल्ल्याप्रमाणें वागलेंच पाहिजे असें त्याच्यावर बंधन नसतें.

प्रांतिक कारभारः–राज्यकारभाराच्या सोयीसाठीं हिंदुस्थानचे प्रादेशिक विभाग करण्यांत आले आहेत त्यांनां प्रांत अशी संज्ञा आहे. या प्रांतांचेहि पुन्हां पोट विभाग पाडण्यांत आले असून त्यांनां 'जिल्हा' असें नांव आहे. १९१९ च्या सुधारणाकायद्यापूर्वी हिंदुस्थानचे राज्यव्यवस्थेच्या सोईसाठीं १५ प्रांत करण्यांत आले होते. ते म्हणजे मुंबई, मद्रास, बंगाल, संयुक्तप्रांत, पंजाब, ब्रह्मदेश, बहार व ओरिसा, मध्यप्रांत, आसाम, वायव्य सरहद्दीवरील प्रांत, दिल्ली, ब्रिटिश बलुचिस्तान,

अजमीर मेरवाड, कुर्ग, व अंदमान बेटें. हे जे प्रांत पाडण्यांत आले ते एकाच वेळीं पाडण्यांत आलेले नाहींत; तर जसजसे कंपनीसरकार व पुढें सार्वभौम सरकार यांच्या ताब्यांत मुलुखापाठीमागून मुलुख येऊं लागले तसतसे सोईप्रमाणें त्यांच्या राज्यकारभारासाठीं भाग पाडण्यांत आले. याचा एक परिणाम असा झाला कीं, या सर्व प्रांतांचा दर्जा सारखा राहिला नाहीं व त्यामुळें त्या प्रांतांच्या राज्यव्यवस्थेच्या घटनेंतहि भिन्नता राहिली.

कंपनीसरकारच्या अव्वल अमदानींत मद्रास, बंगाल, व मुंबई हे तीन इलाखे (प्रेसिडेन्सीज) होते. वास्तविक मद्रास हा जरी सर्वांत प्रथमचा कंपनीच्या व्यापाराचा प्रदेश होता तरी १७६९ सालीं बंगालच्या दिवाणगिरीची कंपनीला प्राप्ति झाल्यापासून मद्रासपेक्षां बंगालला अधिक महत्त्व प्राप्त झालें. १७७३ सालीं बंगालच्या गव्हर्नरला गव्हर्नरजनरल करण्यांत येऊन बंगाल प्रांताचें इतर दोन इलाख्यांवर वर्चस्व स्थापण्यांत आलें. १८३३ सालीं बंगालच्या गव्हर्नर जनरलला इंडियाचा गव्हर्नर जनरल करण्यांत आलें. बंगालवर दिवाणी अधिकार कंपनीला मिळाल्यानंतर पुढें कंपनीला पुष्कळ मुलुख मिळत गेला व विशेषत: बंगाल प्रांतामध्यें फार मोठ्या मुलुखांचा समावेश होऊं लागला, त्यामुळें त्याची विभागणी करणें भाग पडलें. १८३५ सालीं वायव्यसरहद्द प्रांताकरतां एक लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्यांत आला, व बाकीचा बंगालचा भाग गव्हर्नरजनरलच्याच ताब्यांत राहिला. वायव्यप्रांतामध्यें पुढें १८७७ सालीं औध सामील करण्यांत आलें व पुढें या प्रांताला संयुक्तप्रांत असें नांव देण्यांत आलें. १८५३ सालीं बंगालसाठीं एक स्वतंत्र लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्यांत आला. याची नेमणूक गव्हर्नरजनरलकडून होत असे. १९०५ सालीं कर्झन साहेबांनीं बंगालची फाळणी करून पूर्वबंगाल आसामशीं जोडण्यांत येऊन त्याच्यावर एक लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्याची योजना अमलांत आणली. पण वंगभंग चळवळीचा परिणाम होऊन अगर अन्य कारणांनीं १९१२ सालीं कर्झन साहेबांची फाळणी रद्द करण्यांत आली व लेफ्टनंट गव्हर्नरास गव्हर्नर करण्यांत आलें. १८४९ सालीं पंजाब ब्रिटिश अमलाखालीं आला व १८५९ सालीं त्याच्यावर लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्यांत आला. १८९७ सालीं ब्रह्मदेशावर लेफ्टनंट गव्हर्नरची नेमणूक करण्यांत आली. १८४३ सालीं सिंधप्रांत मुंबई इलाख्यास जोडण्यांत आला. १८५४ सालीं नागपूरकर भोंसल्याचें राज्य वारसाच्या अभावीं खालसा करण्यांत आलें. व १८६१ सालीं त्याच्यावर चीफ कमिशनरची नेमणूक करण्यांत येऊन त्याला मध्यप्रांत असें नांव देण्यांत आलें. १९०३ सालीं निजामकडून मिळालेला वऱ्हाडप्रांत मध्यप्रांतास जोडण्यांत आला. १९०१ सालीं वायव्यसरहद्दीवरील प्रांत निर्माण करण्यांत आला. व तो गव्हर्नरजनरलच्या देखरेखीखालीं ठेवण्यांत आला. १८७६ सालीं आसाम चीफ कमिशनरच्या ताब्यांत देण्यांत आला. पुढें १९०५ सालीं पूर्वबंगाल व आसाम हे लेफ्टनंट गव्हर्नरच्या ताब्यांत आले पण १९१२ सालीं पुन्हां आसाम स्वतंत्र रीतीनें चीफ कमिशनराच्या ताब्यांत देण्यांत आला. ब्रिटिश बलुचिस्तान प्रांत १८७७ सालीं निर्माण करण्यांत येऊन त्यावर चीफ कमिशनर नेमण्यांत आला. अजमीर-मेरवाडचा मुलुख गव्हर्नरजनरलच्या मार्फत एजंटाच्या ताब्यांत देण्यांत आला आहे. १८२९ सालीं कुर्ग खालसा करण्यांत आला व म्हैसूरचा रेसिडेंट त्यावर नेमण्यांत आला.

तात्पर्य, १९१९ सालापूर्वी प्रांतांची व्यवस्था व त्यांचा दर्जा पुढील प्रमाणें होता.

| प्रांत | सरकार | | |
|---|---|---|---|
| मुंबई, मद्रास, बंगाल | गव्हर्नर, | कायदेमं. | कार्यकारीमं. |
| बिहार, ओरिसा | लेफ्ट. गव्हर्नर | ,, | ,, |
| संयु.प्रांत, पंजाब, ब्रह्मदेश | ,, | ,, | ,, |
| आसाम, मध्यप्रांत | चीफकमिशनर | ,, | ,, |
| ब्रिटिशबलुचिस्तान वायव्यसरहद्दप्रांत, दिल्ली, अंदामन वगैरे | ,, | ,, | ,, |

तात्पर्य, हिंदुस्थानामध्यें तीन गव्हर्नरशासितप्रांत; चार लेफ्टनंटगव्हर्नरशासित प्रांत व आठ चीफ कमिशनरशासित प्रांत होते. मुंबई, मद्रास व बंगाल हे वरिष्ठ प्रकारचे प्रांत असून त्यांनां गव्हर्नर देण्यांत आला होता. व त्याच्या मदतीला कार्यकारी मंडळ व कायदेमंडळ देण्यांत आलें आहे. गव्हर्नराची नेमणूक बादशाहाकडून करण्यांत येत असे. लेफ्टनंटगव्हर्नर हा गव्हर्नरपेक्षां कमी दर्जाचा असतो. याची नेमणूक स्टेट सेक्रेटरीकडून होत असे. बिहार वओरिसाच्या लेफ्टनंट गव्हर्नरलाच तेवढें कार्यकारी मंडळ देण्यांत आलें होतें. बाकीच्यांनां फक्त कायदेमंडळें देण्यांत आलीं होतीं.

लेफ्टनंट गव्हर्नराहून खालच्या दर्जाचा अधिकारी चीफ कमिशनर होय. याची नेमणूक हिंदुस्थानसरकारकडून होते. याच्या मदतीला, कोणतेंच मंडळ नसतें पण अलीकडे आसाम व मध्यप्रांताच्या चीफ कमिशनरांनां कायदेमंडळ देण्यांत आलें होतें.

१९१९ च्या सुधारणानंतरः—नवीन सुधारणाकायद्यान्वयें प्रांतिक घटनेंत फार महत्त्वाचे फेरफार घडून आले आहेत. प्रांतांच्या विभागणीमधील महत्त्वाचा फरक म्हटला म्हणजे सर्व मोठ्या प्रांतांनां समान दर्जाचे करण्यांत येऊन त्यांनां गव्हर्नर देण्यांत आला आहे व बाकीचे कनिष्ठ प्रांत चीफ कमीशनरांच्या ताब्यांत देण्यांत आले आहेत. त्याप्रमाणें मुंबई, मद्रास, बंगाल, बहार-ओरिसा, संयुक्तप्रांत, पंजाब, आसाम, ब्रह्मदेश, व मध्य-प्रांत या नऊ प्रांतांनां गव्हर्नरशासित प्रांत बनविण्यांत आलें आहे व बाकीचे वाव्यव्यसरहद्दीवरील प्रांत, बलुचिस्तान, कुर्ग, अजमीर–मेरवाड, अंदमान, व दिल्ली हे चीफ कमीशनरांच्या ताब्यांत देण्यांत आले असून त्यांनां गौण प्रांत म्हणून मानण्यांत येतें. अशा रीतीनें नऊ प्रांतांनां गव्हर्नर देण्यांत येऊन जरी त्यांचा दर्जा समान करण्यांत आला आहे तथापि थोडा फार फरक त्यांच्यात्यांच्यांत ठेवण्यांत आलेलाच आहे. उदाहरणार्थ, मुंबई, मद्रास व बंगाल हे सर्वांत जुने व गव्हर्नरशासित प्रांत असल्यामुळें त्यांचें विशेष महत्त्व आहे व त्यामुळें त्या प्रांतांवरील गव्हर्नरांची नेमणूक भारतमंत्र्याच्या शिफारशीवरून इंग्लंडमधील बादशहा हा मुत्सद्यांमधून करतो; तर इतर प्रांतांच्या गव्हर्नरांच्या नेमणुका, गव्हर्नरजनरलच्या शिफारशीनें येथील सनदी नोकरांमधूनच होतात. या भेदामुळें वरील तीन प्रांतांच्या गव्हर्नरांचा दर्जा अधिक असणार हें उघडच आहे. त्यांचे पगार इतर गव्हर्नरांपेक्षां जास्ती ठेवण्यांत आले आहेत.त्यांनां अधिक कारभारस्वातंत्र्य देण्यांत आलें आहे. गव्हर्नर-जनरलविरुद्ध त्यांनां दाद मागण्याचा अधिकार पोहोंचतो. त्यांचें कार्यकारीमंडळ इतर गव्हर्नरांच्या कार्यकारीमंडळापेक्षां मोठें असतें. तीन इलाख्यांच्या गव्हर्नराशिवाय बाकीच्या प्रांतांचे गव्हर्नर हे हिंदुस्थानसरकारच्या सल्ल्यानें स्टेटसेक्रेटरी नेमीत असल्यानें साहजीकच हिंदुस्थानसरकारची म्हणजे गव्हर्नरजनरलची त्यांच्यावर अधिक हुकमत असते. या गव्हर्नरांनां भारत-मंत्र्याशीं पत्रव्यवहार करावयाचा झाल्यास तो गव्हर्नर-जनरल मार्फत करावा लागतो.

१९१९ च्या नवीन अॅक्टानें जी दुसरी महत्त्वाची सुधारणा घडवून आणली ती म्हणजे गव्हर्नराच्या कारभाराची केलेली फाळणी होय. १९१९ च्या अॅक्टानें राज्यकारभाराच्या खात्यांचे राखीव व सोंपीव असे दोन भाग करण्यांत आले असून, त्यांपैकीं सोंपीव खात्याचा कारभार कायदेमंडळांतील प्रमुख सभासदाच्या अगर सभासदांच्या हातीं देण्यांत आला असून अशा सभासदास अगर सभासदांनां प्रधान अशी संज्ञा देण्यांत आली आहे. अर्थात राखीव व सोंपीव अशा दोन्ही खात्यांवर गव्हर्नराची सारखीच सत्ता चालणार हें उघड आहे. तथापि लोकनियुक्त सभासदांमधून गव्हर्नरनें दिवाण नेमण्याची ही तऱ्हा नवीन व महत्त्वाची आहे. मॉंटेग्यू–चेम्सफोर्ड साहेबांच्या शिफारशीवरूनच ही द्विदलराज्यपद्धति अंमलांत आली आहे व याचा उद्देश प्रांतिक कारभारांत जबाबदारीचें स्वराज्य हिंदी लोकांनां देणें हा आहे.

प्रांतिक खात्यांची विभागणी, राखीव खातीं:—जमीन महसूल, इतर वसूल, न्याय, पोलीस, तुरुंग, कालवे, पाटबंधारे, दुष्काळ-कामें वगैरे. सोंपीव खातीं:-शिक्षण, सार्वजनिक आरोग्य, स्थानिक स्वराज्य, शेतकी,सहकारी पेढ्या, जंगल, वैद्यक, नोंदणी, अबकारी वगैरे. वरील विभागणी सर्व प्रांतांत सारख्या तऱ्हेची नाहीं. उदाहरणार्थ, जंगलखातें मुंबईशिवाय इतर प्रांतांत राखीव आहे. आसाममध्यें अबकारी खातें राखीव आहे.

गव्हर्नरः -प्रांतिक कारभाराचा मुख्य या नात्यानें गव्हर्नरला बरेच अधिकार आहेत. १९१९ च्या कायद्यानें ते थोडेफार मर्यादित झाले असले तरी ते विस्तृत आहेत यांत शंका नाहीं. गव्हर्नरची प्रांतिक कारभाराच्या दोन्ही प्रकारच्या खात्यांवर सारखी देखरेख चालते. सोंपीव खात्यांच्या दिवाणाला वेळप्रसंगीं कमी करून, कायदेमंडळ मोडण्याचाहि त्याला अधिकार आहे.

कार्यकारी मंडळः—गव्हर्नरजनरलप्रमाणेंच गव्हर्नरच्या मदतीला कार्यकारीमंडळ व नोकरवर्ग दिलेला असतो. सुधारणाकायद्यापूर्वी कार्यकारी मंडळांत साधारणपणें तीन सभासद असत, त्यापैकीं दोघे निदान बारा वर्षें तरी हिंदुस्थानांत काम केलेले सनदी नोकर असत. १९०९ सालापासून तिसऱ्या सभासदाच्या जागीं हिंदी इसम नेमण्यांत येऊ लागला. नवीन अॅक्टानें कार्यकारी मंडळांत श्रेष्ठ प्रांतांत चार व कनिष्ठ प्रांतांत दोन सभासद असतात यांपैकीं निम्मे सभासद हिंदुस्थानच्या

सरकारी नोकरींतील अनुभविक गृहस्थ असून उरलेले निम्मे प्रांतामध्यें पुढाकार घेणाऱ्यांपैकीं असतात. कार्यकारी सभासदांची नेमणूक स्टेटसेक्रेटरीच्या सल्ल्यानें बाद शहांच्या कडून करण्यांत येते. त्यांची नेमणूक पांच वर्षें पर्यंत असते. त्याशिवाय सोंपीव खात्यांची व्यवस्था पहाण्याकरतां दिवाण नेमण्यांत आलेले असतात. त्यांची संख्या प्रांतांच्या दर्जाप्रमाणें अगर खात्यांच्या कमीअधिक कामाप्रमाणें बदलते. ही संख्या इलाख्यामध्यें तीन तर इतर प्रांतांत दोन असते. या दिवाणांचा पगार प्रांतिक मंडळांनीं ठरवावयाचा असतो. पण कार्यकारी मंडळाचा पगार मात्र १९१९ च्या कायद्यानें ठरविण्यांत आला असून त्यांत ढवळाढवळ करण्याचा अधिकार कायदेमंडळाला नसतो.

सारांश, नवीन कार्यकारी मंडळांमध्यें कार्यकारी मंत्री व दिवाण असे दोन प्रकार आहेत. मुंबई, मद्रास व बंगाल या इलाख्यांत ४ कार्यकारी मंत्री व तीन दिवाण, बिहार व ओरिसामध्यें तीन कार्यमंत्री व दोन दिवाण, व इतर प्रांतांमध्यें दोन कार्यकारी मंत्री व दोन दिवाण अशी हल्लींच्या कार्यकारी मंडळांची स्थिति आहे.

कार्यपद्धतिः—राज्यकारभाराच्या खात्याचे दोन भाग असून एकावर कार्यमंत्र्यांचा व दुसऱ्यावर दिवाणांचा ताबा असतो. साधारणपणें आपापल्या ताब्यांतील खात्यांचा कारभार प्रत्येकानें स्वतंत्र रीतीनें पहावयाचा असतो व त्यांचे हुकूम राखींव खात्यांच्या बाबतींत, गव्हर्नर इन कौन्सिल व सोंपीव खात्यांच्या बाबतींत गव्हर्नर इन कन्सल्टेशन विथ मिनिस्टर्स या नांवानें सुटतात. महत्त्वाच्या प्रश्नावर मात्र सर्व कार्यकारी मंडळानें एकत्र जमून परस्पर विचारविनिमय करावयाचा असतो. अशा रीतीनें विचारविनिमय झाल्यानंतर दिवाणांनां व कार्यमंत्र्यांनां आपल्या मर्जीप्रमाणें मत देण्याला मोकळीक असते.

राखीव खात्यांत व सोंपीव खात्यांत जे जे प्रश्न उद्भवतील त्यांचा निकाल गव्हर्नरनें बहुमताप्रमाणें द्यावयाचा असतो. तथापि कांहीं जरूरीच्या प्रसंगीं गव्हर्नरला बहुमत फेंटाळण्याचा अधिकार देण्यांत आला आहे. दिवाणांनां योग्य तो सल्ला देऊन त्यांचें धोरण योग्य तऱ्हेनें राहील अशी खबरदारी घेणें हें गव्हर्नरचें काम आहे; त्याच्या उलट दिवाणांनांहि लोकमत काय आहे हें गव्हर्नरला समजून सांगितलें पाहिजे. तथापि याहि उपर जर एखाद्या प्रश्नावर दिवाण व गव्हर्नर यांच्यामध्यें तीव्र मतभेद झाला तर दिवाण राजीनामा देतो अगर दिवाणास राजीनामा देऊन काढून टाकण्याचा जादा अधिकार गव्हर्नरास देण्यांत आला आहे. अशी परिस्थिति प्राप्त झाल्यास, दुसरा दिवाण तात्पुरता नेमावयास अगर दुसरा कोणी दिवाणाचें काम करण्यास न मिळाला तर स्वतः सोंपींव खात्याचा कारभार पाहण्याचा अधिकार गव्हर्नरला आहे. तथापि दिवाणांनां अशा तऱ्हेनें राजीनामा देण्यास भाग पाडणें हें बिकट काम असल्यानें अगदीं निकडीच्याच प्रसंगीं गव्हर्नरला तें धोरण स्वीकारावें लागतें. पण पुन्हां जर कायदेमंडळानें तेच सभासद दिवाण म्हणून निवडून दिले तर मात्र गव्हर्नरला त्यांचें म्हणणें स्वीकारणें भाग पडतें.

दिवाणाची ही स्थिति मोठ्या जबाबदारीची असते. कायदेमंडळानें त्याला आपल्या विश्वासाचा म्हणून निवडून दिलेलें असल्यामुळें कायदेमंडळांतील सभासदांचें बहुमत गव्हर्नरपुढें त्याला स्पष्ट रीतीनें मांडावें लागतें. तात्त्विक दृष्ट्या जरी तो कायदेमंडळाला जबाबदार असतो तरी व्यावहारिक दृष्ट्या कायदेमंडळाला त्यानें जबाबदार असलेंच पाहिजे असें नाहीं. शिवाय त्याला गव्हर्नरच्या तंत्रानेंहि थोडें बहुत वागावें लागतें. अशा रीतीनें दोन मालकांनां खूष ठेवून पुन्हां लोकमताप्रमाणें चालण्याची दुहेरी जबाबदारी त्याच्यावर असते. याच्या उलट कार्यमंत्री हा कायदेमंडळाला मुळींच जबाबदार नसतो.

एखाद्या महत्त्वाच्या प्रश्नावर जर कार्यमंत्र्यामध्यें व दिवाणामध्यें मतभेद झाला तर गव्हर्नर हा मध्यस्थी करून ते मतभेद मिटविण्याचा प्रयत्न करतो व तसें शक्य न झाल्यास गव्हर्नरला आपलें म्हणणें कबूल करविण्यास भाग पाडतां येतें. अशा स्थितींत दिवाणानें राजीनामा न देतां जर तो निकाल मान्य केला तर कायदेमंडळांत त्याचें मंडन करण्याचें काम त्याच्या शिरावर पडतें. गव्हर्नरनें तो निकाल स्वीकारण्यास आपल्याला भाग पाडलें अशी सबब त्याला सांगतां येत नाहीं.

आपल्या खात्याची व्यवस्था पाहण्यासाठीं कार्यमंत्र्याला व दिवाणाला, मदतीदाखल चिटणीस व नोकर वर्ग दिलेला असतो. चिटणीसांचें काम आपल्या खात्यांतील सर्व माहिती दिवाणाला अगर कार्यमंत्र्याला पुरविणें हें आहे. तसेंच दिवाणाचे हुकूम अगर कार्यमंत्र्याचे हुकूम अंमलांत आणण्याचें काम चिटणीसाला करावें लागतें. आपापल्या खात्यांतील अधिकाऱ्यांच्या

नेमणुका करण्याचा अधिकार दिवाणाला अगर कार्यमंत्र्याला आहे.

वरिष्ठ सरकार व प्रांतिक सरकार यांचे संबंधः— सुधारणाकायद्यापूर्वी, प्रांतिक सरकारावर वरिष्ठ सरकारचें अनेक तऱ्हेनें नियंत्रण असे. मोर्ले-मिंटो सुधारणा अंमलांत आल्यानंतरहि हें नियंत्रण कायमच होतें. पण नवीन सुधारणाकायद्यानें प्रांतिक कारभारांत लोकांनां थोडीशी जबाबदारी देण्याचें ठरविल्यानें, वरिष्ठ सरकारचा प्रांतिक कारभारावरील दाब ढिला करणें जरूरीचें होतें. अर्थात हा दाब ढिला करण्यासाठीं जे उपाय योजण्यांत आले त्यांपैकीं मुख्य म्हणजे हिंदुस्थान सरकारच्या खात्यांचे मध्यवर्ती व प्रांतिक असे दोन भाग करणें हा होय. प्रांतिक खात्यांवर देखरेख ठेवण्याचा जरी हिंदुस्थान सरकारला वरिष्ठ सरकार या नात्यानें हक्क असला तरी जोंपर्यंत प्रांतिक सरकारचा प्रांतिक खात्याचा कारभार हिंदुस्थान सरकारला बाधक न होतां चालत असेल तोंपर्यंत हिंदुस्थान सरकारला प्रांतिक खात्यांच्या कारभारांत हात घालण्याचा अधिकार नाहीं. त्यांतल्यात्यांत प्रांतिक सरकारच्या सोंपीव खात्यांत तर हिंदुस्थान सरकारला ढवळाढवळ करण्याचे हक्क फारच मर्यादित आहेत. जर मध्यवर्ती खात्यांचा कारभार सुरक्षितपणें चालण्यासाठीं प्रांतिक व त्यांतील सोंपीव खात्यांमध्यें हात घालणें असेल तर व जर दोन प्रांतांमध्यें परस्परांत कांहीं भानगडीचे प्रश्न उपस्थित होतील व ते प्रश्न परस्परांच्या विचारानें मिटणार नाहींत तर त्यांत हिंदुस्थानसरकारला हात घालण्याचा अधिकार आहे. याशिवाय इतर बाबतींतहि हिंदुस्थानसरकारचा प्रांतिक कारभारावरील दाब कमी करण्यांत आला आहे. प्रांतिक सरकारांनां आपलें अंदाजपत्रक स्वतंत्र रीतीनें करण्याची परवानगी मिळाली आहे. प्रांतिक खर्चावरील दाब कमी करण्यांत आला आहे; व इतर किरकोळ बाबतींतहि हें नियंत्रण शिथिल करण्यांत आलें आहे. स्टेटसेक्रेटरीचाहि प्रांतिक कारभारावरील दाब अशाच तऱ्हेनें कमी करण्यांत आला आहे.

प्रांतांची रचनाः—हिंदुस्थानचे राज्यकारभारासाठीं जे प्रांत पाडण्यांत आले आहेत ते एखाद्या ठराविक तत्त्वाबरहुकूम पाडण्यांत आले नसून त्या त्या वेळीं राज्यकारभाराच्या सोयीप्रमाणें ते भाग पाडण्यांत आले आहेत. त्यामुळें ही प्रांतांची रचना अत्यंत सदोष झाली आहे. एक मुंबई इलाखाच घेतला तर त्यांत सिंध, कर्नाटक, महाराष्ट्र इत्यादि विविध हितसंबंधांचे प्रदेश एकत्र करण्यांत आले आहेत. यामुळें भिन्नभिन्न लोकांचे हितसंबंध पूर्णपणें राखले जाणें फार कठिण जातें. याला उत्तम उपाय म्हणजे प्रांताची भाषावर रचना करणें हा होय. राष्ट्रीय सभेनें ही मागणी १९२० सालापासूनच केली आहे. पण त्या मागणीकडे दुर्लक्ष करण्यांत आलें आहे.

कायदेमंडळें:—ब्रिटिशांचा पाय ईस्ट इंडिया कंपनीच्या द्वारां हिंदुस्थानांत पडल्यापासून त्यांनीं हळूहळू मुलूख कसकसा जिंकला, वाढविला व त्याचा कारभार कसा चालविला यासंबंधींची त्रोटक माहिती शासनपद्धतीचा इतिहास देतांना सांगण्यांत आलीच आहे. त्याठिकाणीं कायदेमंडळाच्या परिवर्तनासंबंधींहि स्थूल मानानें विवेचन आलेंच आहे. याठिकाणीं त्याचाच अधिक विस्तृत रीतीनें उपन्यास करावयाचा आहे.

ईस्ट इंडिया कंपनी स्थापन होण्यापूर्वीचा हिंदुस्थानचा कायदा वैयक्तिक स्वरूपाचा होता. तो हिंदूंच्या बाबतींत शास्त्रग्रंथांतून व मुसलमानांच्या बाबतींत कुराणामधून निघाला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. याशिवाय रूढीमुळें अस्तित्वांत आलेला कायदाहि प्रचारांत होताच. ईस्ट इंडिया कंपनी स्थापन झाल्यापासूनच कंपनीला आपला कारभार सुरळितपणें चालविण्यासाठीं इंग्लंडमधील कायद्यांनां अविरोधी असे कायदेकानू करण्याचा अधिकार मिळाला होता असें कंपनीला इलिझाबेथ राणीनें जी सनद दिली त्यावरून दिसून येतें. त्यानंतर स्टुअर्ट राजांनींहि ते अधिकार चालविले होते. १७२६ मध्यें पहिल्या जॉर्जनें कंपनीला जी सनद दिली होती तींत तिन्ही इलाख्यांच्या गव्हर्नरांनां आपल्या इलाख्यांचा कारभार सुव्यवस्थित रीतीनें चालविण्यासाठीं कायदे करण्याचा अधिकार दिलेला आढळतो. १७७३ च्या रेग्युलेटिंग ॲक्टान्वयें गव्हर्नरजनरल आणि त्याचें मंडळ यांनां ब्रिटिश मुलुखासंबंधानें कायदे करण्याचा अधिकार देण्यांत आला. हिंदुस्थानामधील हें पहिलें कार्यकारीमंडळ होय असें म्हणावयास हरकत नाहीं. तसेंच याच ॲक्टान्वयें मुंबई व मद्रास येथील गव्हर्नरांच्या कार्यकारी मंडळाच्या संमतीनें गव्हर्नरनें गव्हर्नरजनरलच्या मंजुरीनें कायदे करावेत असें ठरविण्यांत आलें पण गव्हर्नरजनरलनें केलेले कायदे वरिष्ठ कोर्टांत नोंदणें जरूर पडत असे. १७८० सालच्या डेक्लेरेटरी ॲक्टानें एतद्देशीय लोकांनां त्यांचेच मूळचे कायदेकानू

लागू करावेत असें ठरविलें. १७८१ सालच्या अॅमेंडिंग अॅक्टानें वरिष्ठ कोर्टाला न विचारतां, प्रांतिक कोर्टांची व्यवस्था करण्यास लागणारे नियम करण्याचा महत्त्वाचा अधिकार हिंदुस्थानसरकारला देण्यांत आला. १७९३सालीं तत्पूर्वी करण्यांत आलेल्या सर्व नियमांचा संग्रह लॉर्ड कॉर्नवालीसनें केला व अशाच प्रकारचे नियमसंग्रह मद्रासरकारनें १७९९ व मुंबईसरकारनें १८०१ सालीं केले. त्याचप्रमाणें नॉन रेग्युलेशन प्रांतांसंबंधींहि वेळो-वेळीं नियम प्रसिद्ध करण्यांत येतच असत. १८१३सालीं तिन्ही इलाख्यांच्या कौन्सिलांचे अधिकार वाढविण्यांत आले व त्यावरोबरच इंग्लंड सरकारचा त्यावरील ताबा वाढविण्यांत आला. १८३३ सालापर्यंत कंपनीच्या कायदे करण्याच्या पद्धतींत अत्यंत घोटाळे माजले होते. कारण एक कायदा करतांना तो इंग्लिश कॉमन लॉ, हिंदु कायदा, मुसुलमानांचा कायदा इत्यादि सर्व कायद्यांना विरोधी नाहीं अशा दृष्टीनें तो करावा लागे. अशा स्थितींत १८३३ चा कायदा करण्यांत येऊन त्या काय-द्यानें तत्पूर्वीच्या कायदे करण्याच्या पद्धतींतील घोटाळे कमी करण्याचा प्रयत्न करण्यांत आला. या कायद्यानें मुंबई व मद्रास येथील सरकारचे कायदे करण्याचे हक्क काढून घेण्यांत आले व गव्हर्नर जनरल व त्याचें मंडळ यांनां सर्व ब्रिटिश हिंदुस्थानाला लागणारे कायदे कर-ण्याचा अधिकार देण्यांत आला. न्यायकोर्टाचा कारभार सुरळीत चालावा म्हणून व कायद्यांची नीट जुळणी करण्याच्या उद्देशानें एक इंडियन लॉ कमिशनर्सचें मंडळ बसविण्यांत आलें. तसेंच गव्हर्नरच्या कौन्सिलमध्यें एका स्वतंत्र कायदेपंडिताची मदतनीस म्हणून नेमणूक कर-ण्यांत आली. १८३३ सालापर्यंत ब्रिटिश हिंदुस्थाना-संबंधीचे कायदे गव्हर्नर जनरल व कार्यकारी मंडळ करीत असे पण १८३३ च्या कायद्यानें कार्यकारीमंड-ळाची कायदे करण्याची सत्ता मर्यादित झाली. १८५३ सालीं कंपनीला नवी सनद देण्याच्या वेळीं कायदे कर-ण्याच्या पद्धतीविषयीं बऱ्याच अधिकाऱ्यांनीं तक्रारी केल्या. गव्हर्नर जनरलच्याच हातीं सर्व इलाख्यांच्या-संबंधींचे कायदे कायदेपंडितांच्या सल्ल्यानें करण्याची जी पद्धत अस्तित्वांत आली होती ती सदोष आहे अशी कुरकुर करण्यांत आली. यामुळें १८५३ च्या काय-द्यानें बरेच महत्त्वाचे फेरफार करण्यांत आले. या काय-द्यानें कायदेपंडिताला कार्यकारी मंडळाच्या सर्व बैठकींत भाग घेतां येऊं लागला. पण त्याहीपेक्षां महत्त्वाची सुधारणा म्हणजे कायदे करण्यासाठीं म्हणून कायदेपंडि-ताशिवाय सहा जणांचें कायदेमंडळ नेमण्यांत आलें. त्यांत चार प्रांताचे चार इसम, एक सरन्यायाधीश व एक न्यायाधीश असावा असें ठरलें. सारांश, १८५३ सालच्या कायद्यानें अस्तित्वांत आलेल्या पहिल्या कायदे-मंडळांत, एकंदर १२ सभासद होते. यांत गव्हर्नरजन-रल व त्याचें कार्यकारी मंडळ, सेनापति व सहा खास कायदे करणारांचें मंडळ असे सभासद असत. या वेळे-पासून या मंडळानें केलेलें कामकाज सरकारी रीतीनें प्रसिद्ध करण्याचीहि पद्धत अंमलांत आली. अशा रीतीनें १८५३ च्या कायद्यानें हिंदुस्थानचे कायदे करण्यासाठीं स्वतंत्र मंडळी व स्वतंत्र मार्ग निर्माण करण्यांत येऊन तें हिंदुस्थानसरकारचें कर्तव्य आहे असें समजण्यांत येऊं लागलें.

तथापि १८५३ च्या अॅक्टामध्येंहि महत्त्वाचे दोष होते. इंग्लिश कायदे वाढत्या प्रमाणांत लागू करण्यांत येत होते. मुंबई व मद्रास सरकारवर गव्हर्नरजनरलचें व त्याच्या कायदेमंडळाचें वर्चस्व प्रस्थापित झाल्यानें तें त्या त्या प्रांतांच्या सरकारच्या डोळ्यांत खुपत होतें. एवढ्या अफाट प्रदेशासंबंधीं एकाच कौन्सिलनें कायदे करणें कठिणच काम होत चाललें होतें. कायदेमंडळ म्हणजे छोटेसें पार्लमेंटच बनलें होतें व कायदे करण्या-शिवाय इतरहि अनधिकृत कामांत हें मंडळ ढवळा-ढवळ करूं लागलें होतें. हिंदी लोकांची कायदे करण्याच्या कामांत मदत घेण्यांत येत नव्हती. अशा प्रकारचे अनेक दोष आतांपर्यंतच्या कंपनीच्या कायदे करण्याच्या पद्धतींत होते. १८५७ सालच्या बंडानें या पद्धतींतले दोष ठळक रीतीनें नजरेस आले. हिंदी लोकांची, हिंदु-स्थानसंबंधीं कायदे करण्याच्या कामीं सहकारिता घेतली पाहिजे असें या बंडामुळें अधिकाऱ्यांनां कळून आलें. १८५८ सालीं पार्लमेंटनें हिंदुस्थानचा राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. तेव्हां यासंबंधांत सुधारणा कर-ण्याचा प्रश्न प्रामुख्यानें पुढें उभा राहिला. त्यावेळीं दोन सूचना प्रामुख्यानें पुढें आल्या होत्या: लॉर्ड एलेनबरो याची अशी सूचना होती कीं लोकांचे म्हणणें ऐकून घेऊन नंतर कार्यकारीमंडळानें कायदे करावेत. त्याच्या उलट हिंदुस्थानासंबंधीं कायदे करण्यासाठीं सरकार-तर्फेचे व हिंदी लोकांच्या तर्फेचे सभासद घेतलेली एक सभा असावी अशी दुसरी सूचना होती. त्यापैकीं पहिली सूचना त्यावेळचे स्टेटसेक्रेटरी वुड व व्हाईसरॉय कॅनिंग

यांनीं नापसंत केली; व दुसऱ्या सूचनेमध्यें, हिंदी अगर बिनसरकारी सभासदांनां आपल्या कायदेमंडळांत दोन वर्षें मुदतीनें नेमून घ्यावेत असा फरक करून ती मान्य केली. १८६१ चा कायदा कायदेमंडळाच्या वाढीमधील संक्रमणात्मक कायदा होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. या १८६१ च्या कायद्यानें मद्रास व मुंबई सरकारनां कायदे करण्याचे अधिकार देण्यांत आले व त्यांच्या दिमतीला कायदेमंडळ असल्याचें मान्य करण्यांत आलें. कायदे करण्यासाठीं गव्हर्नरजनरलला एक कायदेमंडळ देण्यांत येऊन, त्यांत त्याच्या ६ कार्यकारी सभासदांशिवाय ६ ते १२ पर्यंत जादा सभासद दोन वर्षें नेमण्याचा अधिकार त्याला देण्यांत आला. या जादा सभासदांत निदान निम्मे सभासद तरी बिनसरकारी असावेत असें ठरलें. १८६१ च्या कायद्यानें जें स्थित्यंतर घडवून आणलें त्यासंबंधीची माहिती प्रास्ताविक विवेचनांत दिलेली आहे.

यापुढचें पाऊल १८९२ सालच्या कायद्यानें पडलें. वास्तविक १८६१ च्या कायद्यामध्यें जो अपुरेपणा राहिला होता त्यासंबंधीं १८७० सालापासूनच असंतोष व्यक्त होण्यास सुरवात झाली होती. उदाहरणार्थ, सरकारचें अंदाजपत्रक भर सभेंत आणून त्यावर चर्चा व्हावी असें मत लॉर्ड मेयो यांनीं प्रतिपादिलें होतें पण त्यावेळचे स्टेटसेक्रेटरी यांनीं तें फेटाळून लावलें. पुढें लॉर्ड डफरिन, लॉर्ड लॅन्सडौन इत्यादिकांनीं तोच प्रश्न हातीं घेतला. त्यावेळीं अंडर सेक्रेटरीच्या जागेवर असलेले लॉर्ड कर्झन यांनींहि बजेटवर वादविवाद होणें फायद्याचें आहे असें सांगितलें. १८९२ च्या कायद्यानें जे मुख्य फेरफार झाले ते म्हणजे, बजेटवरील चर्चेला मोकळीक, प्रश्न विचारण्याला कायदे मंडळाला मिळालेली मोकळीक व कायदेमंडळाचें विस्तृत स्वरूप हे होत. अप्रत्यक्ष निवडणुकीचें तत्त्वहि मान्य करण्यांत आलें. अशा रीतीनें १८७२ च्या कायद्यानें कायदेमंडळाचें पाऊल पुढें पडलें.

१९०९ सालच्या मोर्ले-मिंटो सुधारणांनीं तर याहि पुढें आघाडी मारली. अर्थात या सुधारणा घडवून आणण्याला, सुशिक्षित हिंदु लोकांचें वाढतें प्रमाण, व त्यांची राज्यकारभारांत भाग घेण्याची वाढती आकांक्षा, रूसो-जपानी युद्ध, वर्तमानपत्रकारांनीं स्वराज्याबद्दल चालविलेली चळवळ, वंगभग इत्यादि अनेक गोष्टी कारणीभूत झाल्या. पण कोणत्याहि कारणानें कां होईना पण १९०९ सालच्या कायद्यानें कायदेमंडळाचें पाऊल थोडेसें पुढें पडलें याबद्दल वाद नाहीं. १९०९ च्या कायद्यानें कायदे मंडळांतील सभासदांची संख्या वाढली, अप्रत्यक्ष निवडणुकीचें तत्त्व अंमलांत आलें, सरकारी सभासदांचें बहुसंख्याकत्व वरिष्ठ कायदेमंडळांतच तेवढें ठेवण्यांत येऊन बिनसरकारी सभासदांचें आधिक्य प्रांतिक कायदेमंडळांनां देण्यांत आलें. मतदारसंघ स्थूल स्वरूपांत निर्माण करण्यांत आले व मतदानाचा हक्क मर्यादित स्वरूपांत लोकांनां देण्यांत आला, अल्पसंख्याकांचे हित संबंध त्यांच्यासाठीं स्वतंत्र सभासद देण्यांत येऊन राखण्यांत आले, जातवार प्रतिनिधित्वाचें तत्त्व अंमलांत आलें, बजेटवर तपशीलवार चर्चा करण्याचा अधिकार कायदेमंडळांनां मिळाला पण त्यावर मत देण्याचा मात्र अधिकार देण्यांत आला नाहीं. राज्यकारभारासंबंधीचे ठराव मांडण्याची परवानगी सभासदांनां देण्यांत आली. तसेंच पुरवणी प्रश्न विचारण्याचीहि परवानगी देण्यांत आली.

पण हिंदु लोकांच्या वाढत्या आकांक्षा या कायद्यानें तृप्त होणें शक्यच नव्हतें. अर्थात लवकरच या सुधारणा अपुऱ्या आहेत असें पुढाऱ्यांकडून जाहीर रीतीनें प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें. हिंदुस्थानला जबाबदार पद्धतीचें स्वराज्य देण्याची वेळ आली आहे असा ध्वनि सर्वत्र उमटूं लागला, होमरूलची चळवळ निघाली, महायुद्धानें स्वयंनिर्णयाचें तत्त्व प्रामुख्यानें पुढें आलें व हिंदी लोकांनीं त्याचा फायदा घेण्यास सुरवात केली. १९०९ ते १९१८ पर्यंतच्या नऊ वर्षांच्या अवधींत राजकीय चळवळ जोरानें फैलावली, व महायुद्धांत हिंदी लोकांनीं निरपेक्ष रीतीनें हिंदुस्थानसरकारला मदत केल्यामुळें त्यांनां कांहीं तरी हक्क दिले पाहिजेत अशी जाणीव राज्यकर्त्यांच्या मनांत उत्पन्न झाली व याचा परिणाम म्हणजे १९१९ सालचा इंडियन ॲक्ट होय. या कायद्यानें अनेक बाबतींत पूर्वींच्या राज्यकारभारपद्धतींत निःसंशय पुढें पाऊल टाकलें आहे. त्याचें विवेचन प्रास्ताविक भागांत करण्यांत आलेलें आहे. कायदेकौन्सिलमध्येंहि त्यानें महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणल्या. विशेषतः प्रांतिक व वरिष्ठ कौन्सिलमध्यें बिन सरकारी नव्हे तर लोकनियुक्त दिवाणांचा ताबा, प्रत्यक्ष निवडणुकीचें तत्त्व, अंदाजपत्रकावर मतें देण्यास परवानगी इत्यादि हक्क मिळालेले आहेत.

हिंदुस्थानांतील कायद्यांचे प्रकारः—हिंदुस्थानांतील कायद्यांचे पुढील प्रकार आहेतः—पार्लमेंटनें हिंदुस्थानाकरतां म्हणून केलेले कायदे, वरिष्ठ आणि प्रांतिक

कायदेमंडळांनीं केलेले कायदे, गव्हर्नर जनरलनें आपल्या अधिकारांत काढलेले वटहुकूम, मागसलेल्या प्रांतांकरतां केलेले नियम व वेळप्रसंगीं पुकारण्यांत येणारे लष्करी कायदे.

हिंदुस्थानांत १९१९ च्या पूर्वी वरिष्ठ आणि प्रांतिक अशीं दोनच प्रकारचीं कायदेमंडळें होतीं. पण १९१९ सालच्या कायद्यानें हिंदुस्थानसरकारच्या कारभारांत दोन मंडळें निर्माण केलीं. (१)कौन्सिल ऑफ स्टेट;(२) लेजिस्लेटिव्ह असेंब्ली. अशा रीतीनें जोडसभेची राज्यपद्धति अंमलांत आली.

कौन्सिल ऑफ स्टेटः—या सभेंत नवीन कायद्याप्रमाणें एकंदर ६० सभासद असतात. त्यांपैकीं ३३ लोकनियुक्त व २७ सरकारानियुक्त सभासद असतात. सरकारनियुक्त सभासदांपैकीं २० पेक्षां जास्त, अधिकारीवर्गापैकीं असूं नयेत असा निर्बंध घालण्यांत आला आहे. उरलेल्या सातांमध्यें सहा सरकारनियुक्त बिनसरकारी सभासद व एक वऱ्हाडतर्फे असतो. लोकनियुक्त सभासदांमध्यें मद्रास ५, बंगाल ६, मुंबई ६, संयुक्तप्रांत ५, पंजाब ४, बिहार—ओरिसा ३, ब्रह्मदेश २, मध्यप्रांत २ व आसाम १ अशी वांटणी आहे. हे सभासद विवक्षित मतदारसंघामार्फत निवडले जातात. हे मतदारसंघ पुढीलप्रमाणें आहेत.

जहागीरदार अथवा सरदार वर्गापैकीं दरसाल २००० रुपये शेतसारा भरणारा.

३० हजार रुपये उत्पन्नावर कर देणारा.

वरिष्ठ अगर प्रांतिक कायदेकौन्सिलचा सभासद.

कोणत्याहि विश्वविद्यालयाचा फेलो.

कोणत्याहि म्युनिसिपालिटीचा अगर जिल्हाबोर्डाचा बिन सरकारी अध्यक्ष अगर उपाध्यक्ष.

शमस-उल्-उलेमा अगर महामहोपाध्याय पदवी धारण करणारा इसम.

याशिवाय सर्वसामान्य मतदाराच्या अटीहि त्याला लागू आहेतच.

कौन्सिल ऑफ स्टेट हें इंग्लंडांतील हॉउस ऑफ लॉर्ड्सच्या धर्तीवर आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. यामध्यें विशेषतः वरच्या दर्जाचे लोक असल्यामुळें व लोकमताचा वारा कोणीकडे झुकतो आहे याविषयीं साधारणतः हे लोक बेपर्वा असल्यामुळें, स्वतःचे हितसंबंध जपणाऱ्यांची व जुन्या मतानें शक्य तोंवर चालण्याची इच्छा करणाऱ्यांची ही पोक्त सभा आहे असें म्हणतां येईल. सरकारला, लोकमताचें प्रतिबिंब ज्यांत उमटतें अशा लेजिस्लेटिव्ह असेंब्लीवर एक प्रकारचें दडपण ठेवण्याची इच्छा होती व त्यासाठीं हें मंडळ निर्माण करण्यांत आलें आहे. या सभेंत ३३ लोकनियुक्त सभासद आहेत हें खरें पण त्यांचा फारसा उपयोग होत नाहीं. कौन्सिल ऑफ स्टेट निर्माण करण्यानें सरकारच्या दृष्टीनें असा फायदा झाला आहे कीं, असेंब्लीमध्यें एखादें बिल लोकनियुक्त सभासदांनीं आपल्या बहुमताच्या जोरावर पास करून घेतलें तर कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें तें पास झाल्याशिवाय त्याला कायद्याचें स्वरूप प्राप्त होत नसल्यानें, सरकारी दृष्टीनें या सभेंत या बिलाची चर्चा होते व त्यामुळें सरकारला आपल्या धोरणाचा कायमपणा राखण्यास मदत होते.

कौन्सिल ऑफ स्टेटचा अध्यक्ष गव्हर्नर जनरलनें नेमावयाचा असतो. पूर्वी गव्हर्नर जनरल हाच वरिष्ठ कायदेमंडळाचा अध्यक्ष असे पण नवीन कायद्यानें गव्हर्नर जनरल हा अध्यक्ष असावयाचा नाहीं असें ठरविलें आहे. गव्हर्नर जनरल यास वाटेल त्या वेळेला कौन्सिल ऑफ स्टेटपुढें भाषण करण्याचा व सभासदांना हजर रहाण्यास भाग पडण्याचा अधिकार आहे. अध्यक्ष गव्हर्नर जनरलनेंच नेमावयाचा असल्यानें ही जागा आतांपर्यंत सरकारी इसमासच मिळाली आहे.

कौन्सिल ऑफ स्टेटचे अधिकारः—या मंडळाला कायदे करण्याचे पूर्ण हक्क देण्यांत आले आहेत. प्रत्येक बिलाला या मंडळाची संमति मिळाल्याशिवाय कायद्याचें स्वरूप प्राप्त होऊं शकत नाहीं. या मंडळांतील प्रत्येक सभासदाला १५ दिवसांच्या मुदतीनें बिल आणण्याचा, कोणत्याहि प्रश्नासंबंधीं माहिती विचारण्याचा, पुरवणी प्रश्न विचारण्याचा, वगैरे सर्व प्रकारचे हक्क आहेत. तथापि गव्हर्नर जनरलला एखादा प्रश्न अगर पुरवणी प्रश्न लोकहिताच्या दृष्टीनें धोक्याचा वाटत असल्यास तो प्रश्न विचारूं न देण्याचा त्यास पूर्ण अखत्यार आहे. परकीय मुलुख अगर एतद्देशीय संस्थानें यांच्याशीं सरकारचे जे हितसंबंध आहेत त्यासंबंधीं मात्र प्रश्न विचारण्याचा सभासदांना हक्क नाहीं.

कौन्सिल ऑफ स्टेटचे महसूल, जमाबंदी अगर पैका यासंबंधीं पुढील प्रमाणें अधिकार आहेतः—असेंब्लीपुढें ज्या दिवशीं अंदाजपत्रक मांडण्यांत येतें त्याच प्रमाणें ह्याच दिवशीं कौन्सिल ऑफ स्टेटपुढेंहि बजेट सादर करण्यांत येतें. सरकारच्या आर्थिक धोरणावर

चर्चा करण्याचा, तसेंच अंदाजपत्रकांच्या तपशीलावर चर्चा करण्याचाहि या सभेला पूर्ण अधिकार आहे. असेंब्लीइतकेच या सभेलाहि कायदे करण्याचे अधिकार असल्यामुळें, करासंबंधांच्या सर्व सूचनांसंबंधीं, त्या फेटाळण्याचा, व त्यांत फेरबदल करण्याचा या सभेला हक्क आहे. पण अमुक एका बाबीसाठीं इतकी रक्कम मंजूर करण्यांत यावी अशा प्रकारच्या मागण्या असेंब्लींत ज्यावेळीं मंजुरीकरतां मांडण्यांत येतात त्यावेळीं असेंब्लीला त्या मागण्या मंजूर करणें न करणें, त्यांत काटकसर सुचविणें इत्यादिसंबंधीं जसे अधिकार आहेत तसे या सभेला मात्र अधिकार नाहींत. गेल्या पांचसहा वर्षांचा कायदेमंडळाचा इतिहास पाहिल्यास, कौन्सिल ऑफ स्टेट व असेंब्ली यांच्या दृष्टिकोनामध्यें बहुतेक वेळीं विरोध असल्याचेंच आढळून येतें. उदाहरणार्थ, मिठावरील करासंबंधींच्या प्रश्नावर लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें मीठावरील करवाढीला एकजात विरोध केला तर कौन्सिल ऑफ स्टेटनें त्याला आपली संमति दिली. प्रिन्सेस प्रोटेक्शन बिलाच्या बाबतींतहि तोच प्रकार आढळून आला. तात्पर्य, या सभेनें अडीअडचणींच्या प्रसंगीं प्रत्येक वेळीं सरकारचीच बाजू उचलून धरली असें दिसून येतें. किंबहुना ही सभा निर्माण करण्यांत सरकारचा आपलें धोरण सनदशीर रीतीनें हिंदुस्थानच्या जनतेवर लादण्याचा हेतु होता असें मानण्यास जागा आहे. या सभेच्या सभासदत्वाच्या लायकीचें मान फार उंच्च आहे व त्यामुळें लोकपक्षीयांचा यांत जितका भरणा असावा तितका होऊं शकत नाहीं, व या सभेच्या घटनेप्रमाणें, लोकनियुक्तांचें प्रमाणहि यांत थोडें आहे. तात्पर्य, या सभेच्या निर्मितीमुळें असेंब्लीच्या वाटेंत एक प्रकारचा अडथळाच सरकारनें निर्माण केला आहे असा जो आक्षेप घेण्यांत येतो त्यांत बरेंचसें तथ्य आहे यांत संशय नाहीं.

लेजिस्लेटिव्ह असेंब्ली:—हिंदुस्थान सरकारच्या ज्या दोन कायदेकारी सभा आहेत त्यांपैकीं असेंब्ली ही दुसरी कायदेसभा होय. या वरीष्ठ कायदेमंडळांत १४४ सभासद असून त्यांपैकीं १०३ लोकांनीं निवडलेले व ४१ सरकारनें नेमलेले असे असतात. या ४१ पैकीं २५ सरकारी सभासद व उरलेले बिनसरकारी सभासद असतात. १०३ सभासदांची निरनिराळ्या प्रांतांमध्यें वांटणी करून देण्यांत आली आहे. सभासदांची प्रांतवार वांटणी पुढीलप्रमाणें आहे:–बंगाल१७, मुंबई १६, मद्रास १६, संयुक्तप्रांत १६, पंजाब, बिहार ओरिसा प्रत्येकीं १२, मध्यप्रांत ६, आसाम ४, ब्रह्मदेश ४, व दिल्ली १. असेंब्लीच्या मतदारांची लायकी निरनिराळ्या प्रांतांत थोडीफार भिन्न आहे. सर्वसामान्यत: मतदाराची लायकी अशी आहे–(१) प्राप्तीवरील कर देणारा, (२) सालीना ७५ रुपये सारा भरणारा पण रत्नागिरी, अपरसिंध फ्रॉंटियर, पंचमहाल इत्यादि ठिकाणीं सालीना २७॥ रुपये सारा देणारा, (३) विशिष्ट वर्गाचा अगर संघाचा सभासद, (४) स्थानिक स्वराज्यसंस्थांचा सभासद. सारांश, कौन्सिल ऑफ स्टेटच्या मतदाराच्या लायकीपेक्षां या सभेच्या मतदाराच्या लायकीचें मान कमी मर्यादित अगर विस्तृत आहे. या १०३ सभासदांपैकीं ९८ सभासदांची ठराविक मतदारसंघाकडून निवड होत असते व उरलेले ५ सभासद मुंबई व बंगालमधील खास (स्पेशल) मतदारसंघाकडून निवडण्यांत येतात. या कायदेमंडळाची मुदत तीन वर्षांची आहे. असेंब्लीच्या सभासदांनां एम, एल. ए. असें म्हणतात.

अध्यक्ष:—असेंब्लीचा अध्यक्ष पाहिलें चार वर्षे गव्हर्नरजनरलनें कायदेमंडळांतील सभासदांपैकीं निवडावयाचा व नंतर सभासदांनीं आपल्या मर्जीस येईल अशा आपल्यापैकींच एका सभासदाला निवडून द्यावयाचें असें १९१९ च्या ॲक्टानें ठरविलें आहे. अध्यक्षाच्या गैरहजेरींत असेंब्लीचें काम चालविण्याकरतां उपाध्यक्षाची निवड सभासदांनीं गव्हर्नर जनरलच्या पसंतीनें करावयाची असते. या कायदे मंडळाचे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष व्ही. जे. पटेल हे होत. अध्यक्षाचा व उपाध्यक्षाचा पगार असेंब्लीच्या सभासदांनीं ठरवावयाचा असतो. यांनां अध्यक्षाच्या जागेवरून बडतर्फ करण्याचा अधिकार असेंब्लीच्या सभासदांनां आहे. असेंब्लीचा सभासद असेतोंपर्यंतच याची अध्यक्ष म्हणून निवड होऊं शकते.

असेंब्लीचे अधिकार:—ब्रिटिश हिंदुस्थानच्या अंतर्व्यवस्थेसंबंधीं, तसेंच हिंदी प्रजेसंबंधीं कोणत्याहि प्रकारचे कायदे–पार्लमेंटनें केलेल्या कायद्यांनां विरोधी न होतां–करण्याची परवानगी आहे. तथापि या विस्तृत कायदे करण्याच्या हक्काला कांहीं बाबी अपवादात्मक आहेत. उदाहरणार्थ, राष्ट्रीय कर्ज, गव्हर्नरजनरलचा वटहुकूम, परराष्ट्रीय राजकारण, लष्कर, आरमार, ब्रिटिश प्रजेच्या कोणत्याहि वर्गाचे धार्मिक विधी व आचार, हिंदुस्थानचा जमीनमहसूल इत्यादि बाबींसंबंधाचें ठराव गव्हर्नरजनरलच्या संमतीशिवाय पुढें मांडण्याची परवानगी

सभासदांनां नाही. बाकी सर्व बाबतींत ठराव मांडण्याला सभासदांनां परवानगी आहे. कोणतेंहि बिल असेंब्लींत पास झाल्याशिवाय तें कायदा होऊं शकत नाहीं. प्रत्येक सभासदाला, ठराव आणणें, प्रश्न आणि पुरवणी प्रश्न विचारणें, अनुकूल, प्रतिकूल मत देणें, ठराव अगर मंडळाची बैठक पुढें ढकलण्याची सूचना करणें इत्यादि अधिकार आहेत. जमाखर्च व पैका या बाबतींत असेंब्लीचे अधिकार कौन्सिल ऑफ स्टेट-पेक्षांहि अधिक आहेत. फायनॅन्स मेंबर हा अंदाजपत्रक असेंब्लीपुढें मांडतो आणि मग त्याच्यावर प्रत्येक सभासदाला वाटेल त्या प्रकारची चर्चा करण्याचा, ह्या बाबतींत ठराव मांडण्याचा वगैरे अधिकार आहे पण १९१९ च्या अक्टानें ह्या बाबतींत जो महत्त्वाचा हक्क असेंब्लीला दिला आहे तो म्हणजे अंदाजपत्रकांतील कोणतीहि मागणी मंजूर करण्याचा अगर नामंजूर करण्याच्या मतदानाचा अधिकार सभासदांनां देण्यांत आला हा होय तथापि हा अधिकार मर्यादित स्वरूपांत देण्यांत आला आहे. उदाहरणार्थ, कर्जावरील व्याज अगर सिंकिंगफंड, कायद्यानें ठरविण्यांत आलेली खर्चाची रक्कम,स्टेटसेक्रेटरीनें नेमलेल्या इसमांचा पगार व पेन्शन, चीफ कमिशनर्स अगर ज्युडिशियल कमिशनर्स यांचे पगार इत्यादि बाबींवर सभासदांनां ठराव करण्याचा अगर सूचना करण्याचा अधिकार नाहीं.सारांश, अंदाजपत्रकांतील महसूल अगर पैका यांचे दोन भाग पडतात: ज्याच्यावर मत देण्याचा सभासदांनां अधिकार आहे असा एक भाग व ज्याच्यावर मत देण्याचा अधिकार नाहीं असा दुसरा भाग. दुसऱ्या भागांत वर सांगितलेल्या अपवादात्मक गोष्टींचा अंतर्भाव होतो. एखादा सुचविलेला खर्च वरील अपवादात्मक खात्यासंबंधींच्या सदरांत पडतो अगर न पडतो हें ठरविण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलचा आहे. व तो देईल तो निकाल अखेरचा समजला जावयाचा आहे. वरील अपवादात्मक खात्यांशिवाय इतर खात्यांच्या खर्चाबद्दलच्या सूचनांवर असेंब्लीला संमति अगर नकार देण्याचा सभासदांनां पूर्ण अधिकार आहे.

याशिवाय असेंब्लीला एक फायनॅन्स स्टँडिंग कमिटी नेमणें, मत देण्याला योग्य अशा नवीन बाबींच्या खर्चासंबंधींच्या सूचनांची चौकशी करणें, खर्चांत काटकसरीच्या सूचना करणें व वेळोवेळीं फायनॅन्स खात्याला सल्ला देणें या बाबतींतहि पूर्ण अधिकार आहेत. फायनॅन्स कमिटी साधारणत: दहा जणांची असते. त्याशिवाय दर वर्षारंभीं सार्वजनिक जमाखर्चाच्या बाबींतहि सुमारें बारा लोकांची एक कमिटी निवडण्यांत येते. यांत साधारणत: $\frac{2}{3}$ सभासद असेंब्लीनें निवडलेले असतात. या कमिटीकडे खर्चतपासणीचें काम असतें.

कामकाजाची पद्धत.—कोणत्याहि सरकारी अगर बिनसरकारी सभासदाला असेंब्लीपुढें बिल आणतां येतें. त्या बिलाची नोटीस मात्र ठराविक रीतीनें द्यावी लागते व तें बिल पुढें आणण्याबद्दल असेंब्लीची रीतसर परवानगी घ्यावी लागते. जर एखाद्या बाबतींत गव्हर्नर जनरलची संमति मिळवणें अवश्य असेल तर ती घेण्यांत आली पाहिजे व तसें असेंब्लीला कळविण्यांत आलें पाहिजे.अशा रीतीनें परवानगी मिळाल्यानंतर तें बिल सरकारी गॅझेटमध्यें प्रसिद्ध करण्यांत येतें. नंतर त्या बिलाच्या पहिल्या वाचनाच्या वेळीं त्यावर स्थूलमानानें चर्चा होते अगर तें बिल, एका निवडक मंडळाकडे विचारासाठीं सोंपविण्यांत येतें. नंतर हें मंडळ त्या बिलाची, त्या बिलावर आलेल्या सूचना, उपसूचना, दुरुस्त्या इत्यादिसह चर्चा करतें. यानंतर तिसऱ्या वाचनाकरतां बिल असेंब्लीपुढें मांडण्यांत येतें व नंतर असेंब्लींतील सभासद तें फेटाळून लावतात, मंजूर करतात अगर दुरुस्ती करूनहि मंजूर करतात. नंतर हें बिल कौन्सिल ऑफ स्टेटपुढें विचारासाठीं मांडण्यांत येतें. कोणतेंहि बिल दोन्ही सभांमधून पास झाल्याशिवाय व नंतर त्याला गव्हर्नर जनरलची संमति मिळाल्याशिवाय त्याला कायद्याचें स्वरूप प्राप्त होत नाहीं. एखादें बिल विशेष महत्त्वाचें असल्यास तें दोन्ही सभांतील निवडक मंडळीकडे विचारासाठीं सोंपविण्यांत येतें. त्यावर त्यांचें ऐकमत्य न झाल्यास गव्हर्नर जनरलला दोन्ही सभांनां एकत्र बोलावून त्या बिलाचा निकाल लावतां येतो. तसेंच एखादें बिल एका सभेंत मंजूर झालें व सहा महिन्यांच्या आंत दुसऱ्या सभेकडून तें मंजूर झालें नाहीं तर वरील प्रमाणेंच एकत्र सभा बोलावून गव्हर्नर जनरलला त्याचा निकाल करावा लागतो. अंदाजपत्रकाच्या दोन अवस्था आहेत: पहिल्या अवस्थेंत अंदाजपत्रकावर स्थूलमानानें चर्चा होते व दुसऱ्या अवस्थेंत प्रत्येक खात्यासंबंधींच्या खर्चाच्या मागण्या तपशीलवार विचारांत घेण्यांत येऊन त्या मंजूर अगर नामंजूर करण्यांत येतात. पहिल्या अवस्थेंत अंदाजपत्रकासंबंधीं ठराव आणतां येत नाहीं. फक्त त्या विषयीं चर्चा करण्यांत

येते व फायनॅन्स मेंबर त्याला उत्तर देतो. एखाद्या मागणीच्या पैशांत वाढ करणें अगर करांत वाढ करणें या बाबतींत हॉऊस ऑफ कॉमन्सप्रमाणेंच असेंब्लीला अधिकार नाहीं.

एखादें बिल दोन्ही सभांत मंजूर झालें व त्याला गव्हर्नर जनरलची रीतसर मंजुरी मिळाली तरी पार्लमेंटला तें संमत नसल्यास तें नामंजूर करण्याचा स्टेट सेक्रेटरीला अधिकार आहे; अगर एखाद्या आक्षेपार्ह बिलाचा विचार चालू असतांनाच त्यांतील आक्षेपार्ह भाग गाळून टाकण्याची सूचना स्टेट सेक्रेटरी गव्हर्नर जनरलला करूं शकतो.

गव्हर्नर जनरलचे सर्टिफिकेशनचे अधिकारः—एखादें बिल दोन्ही सभांत मंजूर झालें असलें व तें पास करणें गव्हर्नर जनरलला लोकहिताच्या दृष्टीनें अगर शांततेच्या दृष्टीनें धोक्याचें वाटत असलें तर गव्हर्नर जनरलला त्याला संमति न देण्याचा अधिकार आहे व तशी संमति त्यानें दिली नाहीं कीं, तें बिल आपोआपच गळून पडतें. याच्या उलट एखादें बिल जोडसभेनें नामंजूर केलें व गव्हर्नर जनरलला तें लोकहिताच्या दृष्टीनें पास करण्याची आवश्यकता वाटली तर त्या बिलास 'सर्टिफाय' करून तें पास करून घेण्याचा जादा अधिकार गव्हर्नर जनरलला आहे. तथापि अशा प्रकारचें बिल पास करून घेतल्याबद्दलचें कारण व तें बिल हीं गव्हर्नर जनरलला पार्लमेंटपुढें मंजूरीकरतां मांडावीं लागतात. मिठावरील करवाढीच्या बाबतींत तत्संबंधीचें बिल असेंब्लीनें दोनदां नामंजूर केलें असतांहि गव्हर्नर जनरलनें तें आपल्या खास अधिकाराचा उपयोग करून पास करून घेतलें. एखादें बिल दोन्ही सभा व गव्हर्नर जनरल यांनीं मंजूर केलें तरी त्याच्यावर पार्लमेंट अगर बादशहांच्या पसंतीचा शिक्का मिळाल्याशिवाय त्याला कायद्याचें स्वरूप प्राप्त होत नाहीं.

कार्यकारीमंडळ व कायदेमंडळ यांचा परस्परसंबंधः—देशांत लोकशाही अस्तित्वांत आहे किंवा नाहीं. हें ठरविण्यास मुख्य गमक म्हणजे त्या देशांतील कार्यकारी सरकार आणि कायदेमंडळ यांच्यांतील परस्परसंबंध काय आहेत हें पहाणें होय. ज्या देशांत कार्यकारी मंडळावर कायदेमंडळाचा पूर्ण अधिकार असतो त्या देशांत लोकसत्ताक राज्यपद्धति अस्तित्वांत आहे असें मानण्यास हरकत नाहीं. इंग्लंडमध्यें अशा प्रकारची लोकसत्ताक राज्यपद्धति आहे; म्हणजे इंग्लंडमधील कार्यकारीमंडळावर पार्लमेंटची पूर्ण हुकमत चालते. हिंदुस्थानांत मात्र तशा प्रकारची राज्यपद्धति अद्यापिहि अस्तित्वांत आलेली नाहीं. अगोदर मुळीं हिंदुस्थानांत कायदेमंडळेंच फार उशीरानें अस्तित्वांत आलीं व त्यांनां हळू हळू अधिकार देण्यांत आले. तरी कार्यकारीमंडळाच्या अनियंत्रित कारभारावर या कायदेमंडळांनां अधिकार गाजविण्याचे हक्क देण्यांत आलेले नाहींत. १९०९ सालच्या सुधारणाॲक्टानें हिंदुस्थानच्या कायदेमंडळांनां विस्तृत स्वरूप देण्यांत आलें व एक प्रकारें पार्लमेंटरी राज्यपद्धति अस्तित्वांत आणण्याचा उपक्रम करण्यांत आला अशी लोकांची क्षणभर समजूत झाली. पण या ॲक्टानें पार्लमेंटरी राज्यपद्धतीचा उपक्रम करण्यांत आला आहे अशी जर कोणाची समजूत असेल तर ती चुकीची होय असें खुद्द सेक्रेटरी मोर्ले यांनींच सांगितल्यामुळें लोकांचे डोळे उघडले. राज्यकारभारांत हिंदी लोकांची अधिक सहकारिता संपादन करावी एवढ्याच उद्देशानें हें बिल करण्यांत आलें होतें. १९०९ सालच्या कायद्यानें कायदेमंडळांनां कार्यकारीमंडळावर ताबा ठेवण्याचा कोणताहि अधिकार देण्यांत आला नाहीं. १९०९ च्या सुधारणाकायद्यानें जरी इतर बाबतींत महत्त्वाचे फेरफार घडवून आणले तथापि या बाबतींत या नवीन कायद्यानें पूर्वीच्या धोरणांत कांहींच फरक घडवून आणला नाहीं. कोणतेंहि बिल जोडसभांनीं मंजूर केलें तरी तें नापास करण्याचा गव्हर्नरजनरलला अधिकार आहे. त्याच्या कार्यकारीमंडळाला राजीनामा देण्यास भाग पाडण्याचा कायदेमंडळाला मुळींच अधिकार नाहीं. कार्यकारीमंडळाच्या सभासदांचे पगार, भत्ता वगैरे ठरविणेंहि कायदेमंडळाच्या कक्षेबाहेरचें आहे. अशा प्रकारें तात्त्विक दृष्टीनें तरी कायदेमंडळाला कार्यकारीमंडळावर कोणत्याहि प्रकारची हुकमत चालवितां येत नाहीं.

तथापि प्रत्यक्ष व्यवहारांत अप्रत्यक्ष रीतीनें कां होईना कायदेमंडळाची हुकमत थोड्या प्रमाणांत तरी कार्यकारी मंडळावर प्रस्थापित झाली आहे असें दिसून येतें. उदाहरणार्थ, जरी कार्यकारीमंडळांतील सभासदांनां हुसकून लावण्याचा अधिकार कायदेमंडळांनां नाहीं तथापि कार्यकारी मंडळानें खर्चासंबंधीं केलेल्या मागण्या नामंजूर करून अप्रत्यक्ष दाब कार्यकारी मंडळावर बसविण्याचें साधन या नवीन कायद्यानें कायदेमंडळांनां मिळालें आहे. अशा स्थितींत व्हाइसरायच

'सर्टिफिकेशन'चा अधिकार हेंच कार्यकारीमंडळाच्या रक्षणाचें साधन होय. पण हें साधन वारंवार उपयोगांत आणणें गव्हर्नर जनरलला शक्य व इष्ट नसतें. याशिवाय प्रश्न, व पुरवणीप्रश्न विचारण्याचाहि अधिकार कायदेमंडळाला मिळाल्यानें कार्यकारीमंडळाच्या अरेरावी वर्तनावर एक प्रकारें दडपण बसतें. तथापि हे सर्व अप्रत्यक्ष परिणाम होत. जोंपर्यंत कायदेमंडळाचें कार्यकारीमंडळावर पूर्णपणें वर्चस्व प्रस्थापित झालें नाहीं, तोंपर्यंत हिंदुस्थानांत जबाबदार राज्यपद्धतीचा आरंभ या कायद्यानें सुरू केला असें म्हणणें जाणूनबुजून वस्तुस्थितीचा विपर्यास करण्यासारखेंच होय, असें म्हटल्यास मुळींच वावगें होणार नाहीं.

प्रांतिक कायदेमंडळें:—वरिष्ठ कायदेमंडळांसंबंधीचें विवेचन केल्यानंतर प्रांतिक कायदेमंडळांचा प्रश्न विचारांत घेऊं. नवीन कायद्यानें गव्हर्नरच्या प्रत्येक प्रांताला एकेक कायदेमंडळ देण्यांत आलें आहे. फक्त हिंदुस्थानसरकारच्या क्षेत्रांतच दोन कायदेसभा स्थापन करण्यांत आल्या आहेत. प्रांतिक कारभारांत जबाबदार राज्यपद्धतीचा उपक्रम सुरू करण्यांत आल्यामुळें प्रांतिक कायदेमंडळानें या नवीन कायद्याच्या साहाय्यानं बरेच महत्त्वाचे फरक घडवून आणले आहेत.

प्रांतिक कायदेमंडळाचा इतिहास:—प्रांतिक सरकारांनां कायदे करण्याचा अधिकार प्रथमतः १८०७ सालीं देण्यांत आला. पण १८३३ सालीं तो हक्क काढून घेण्यांत आला. त्यावेळेपासून प्रांतिक सरकारांनां जर आपल्या प्रांतांसंबंधीं एखादा कायदा करावयाचा असेल तर त्याचा मसूदा बंगालसरकारकडे पाठवावा लागे पण ब्रिटिश हिंदुस्थानासंबंधींचे कायदे करणें वगैरे भानगडी एकटा बंगाला गव्हर्नर जनरल व त्याचें कायदेमंडळ यांच्या हातून योग्य तऱ्हेनें होणें शक्य नसल्यानें १८९३ सालीं प्रत्येक प्रांताचे प्रतिनिधि गव्हर्नरजनरलच्या मंडळांत घेण्यांत येऊं लागले. १८६१ सालीं पुन्हां प्रांतिक सरकारांनां व त्यांच्या मंडळांनां आपापल्या प्रांतापुरते कायदे करण्याचे अधिकार प्राप्त झाले. पण नव्हर्नर जनरलला व त्याच्या मंडळालाहि प्रांतासंबंधीं कायदे करण्याचा हक्क देण्यांत आला. १८९२ सालच्या कायद्यानें प्रांतिक सरकारच्या मंडळांत बिनसरकारी सभासद कायदे करण्यासाठीं घेण्यांत येऊं लागले. १९०९ सालीं हीं कौन्सिलें विस्तृत करण्यांत येऊन अंदाजपत्रकावर चर्चा करणें, प्रश्न विचारणें इत्यादि अधिकार प्रांतिक कायदेमंडळांनां देण्यांत आले, तथापि प्रांतिक कायदेमंडळांनां प्रत्यक्ष राज्यकारभारांत कोणताहि हक्क देण्यांत आला नव्हता. १९१९ च्या कायद्यानें तो मर्यादित स्वरूपांत देण्यांत आला हाच महत्त्वाचा फरक होय.

प्रांतिक कायदेमंडळाची घटना:—निरनिराळ्या प्रांतांच्या कायदेमंडळांत निरनिराळ्या सभासदांची संख्या पुढील प्रमाणें आहे:—बंगाल १२९, मद्रास ११८, मुंबई १११, संयुक्तप्रांत ११८, पंजाब ८३, बिहार—ओरिसा ९८, मध्यप्रांत ७०, आसाम ५३, ब्रह्मदेश १०३.

मुंबई कायदे मंडळाची घटना पुढीलप्रमाणें:—

लोकनियुक्त सभासद ८६

| | |
|---|---|
| ग्रामिक मुसलमान | २२ |
| शहरवासी मुसलमान | ५ |
| ग्रामिक मुसलमानेतर | ३५ |
| शहरवासी मुसलमानेतर | ११ |
| यूरोपीयन | २ |
| जमीनदार | ३ |
| व्यापारी व धंदेवाले | ७ |
| विश्वविद्यालय | १ |

मुसलमानेतर सभासदांत ७ मराठे किंवा तत्सम असावयाचे असून बाकीच्या २९ सरकारनियुक्त सभासदांत २० सरकारी व ९ बिनसरकारी सभासद असावयाचे आहेत. प्रांतिक कायदेमंडळाच्या सभासदांपैकीं शेंकडा ७० सभासद लोकनियुक्त असावेत असें ठरलें आहे.

मतदाराची लायकी:—मतदारसंघ निर्माण करतांना जिल्हा हा यूनिट ठरविण्यांत आला आहे. प्रांतांतील मोठ्या शहरांनां स्वतंत्र मतदारसंघ देण्यांत आले आहेत. व्यापार व उद्योगधंदे यांचे स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करण्यांत आले आहेत. मतदारसंघ शक्य तों व्यापक करण्यांत आला आहे व त्यासाठीं मतदानाची लायकी फार कमी करण्यांत आली आहे. उदाहरणार्थ, मुंबई प्रांतामध्यें, मुंबई शहराच्या बाहेर ३६ रुपयांहून कमी नाहीं इतकें व मुंबई शहरांत १२० रुपयांहून कमी नाहीं इतकें आणि कराचींत ६० रुपयांहून कमी नाहीं इतकें ज्याचें वार्षिक भाडें येत असेल असें घर किंवा इमारत यांचा भाडेकरी म्हणून अगर मालक म्हणून जो उपभोग घेत असेल अशा इसमास अगर बाहेर गांवच्या शहरांतील मतदारसंघांत जेथें घरपट्टी नसेल तेथें ज्याची १५०० रुपयांहून कमी किंमत नसेल असें घर किंवा इमारत यांचा जो उपभोग घेत असेल

अशा इसमास, प्राप्तीवरील ठराविक कर भरत असेल त्याला मत देण्याचा अधिकार आहे.

मुंबई कायदेमंडळाची घटना व मतदारसंघः–यासंबंधीं हिंदुस्थान व मुंबईसरकारनें पुढीलप्रमाणें नियम केले आहेत.

कायदेमंडळाची घटना:–(१) कार्यकारी मंडळाचे सभासद. (२) हे सभासद धरून पंचवीस होतील इतके सरकारनियुक्त सभासद. या सभासदांपैकीं १६ पेक्षां जास्त सरकारी नोकर नसावेत. उरलेल्यापैकीं पांच तरी बिनसरकारी सभासद, आंग्लो इंडियन, नेटिव्ह खिस्ती, मजूरवर्ग, अस्पृश्य वर्ग व कापसाचे धंदेवाले या वर्गांचे प्रतिनिधि असावेत. (३) ८६ लोकनियुक्त सभासद. एकूण मुंबई कायदेमंडळाचे १११ सभासद असावेत.

## मतदारसंघ व लोकप्रतिनिधींची संख्या.

| मतदारसंघाचें नांव | मतदारसंघाचा वर्ग | त्याची व्याप्ति | सभासदांची संख्या | राखीव जागा |
|---|---|---|---|---|
| मुंबई (उत्तरभाग) | बिगर मुसलमान नागरिक संघ | म्यु. वार्ड बी, इ, एफ्, जी. | ३ | १ |
| मुंबई (दक्षिणभाग) | ,, | म्यु. वार्ड ए. सी. डी. | ३ | ० |
| कराची | ,, | कराची शहर, लष्कर व पोर्टट्रस्टची हद्द. | १ | ० |
| अहमदाबाद शहर | ,, | शहर व लष्कर आणि कंकेरिया, आसर्वा, एलिस ब्रिज व साबरमती. | १ | ० |
| सुरत | ,, | म्युनिसिपालिटीची हद्द. | १ | ० |
| सोलापूर | ,, | ,, | १ | ० |
| पुणें | ,, | शहर, सबर्बन म्युनिसिपालिटी, खडकी व पुणें लष्कर यांची हद्द. | १ | ० |
| अहमदाबाद जिल्हा | बिगर मुसलमान ग्रामसंघ | वरील नागरिक संघाची हद्द वगळून बाकीचा जिल्ह्याचा भाग. | २ | ० |
| भडोच | ,, | जिल्हा भडोच. | १ | ० |
| खेडा | ,, | ,, खेडा. | २ | ० |
| पंचमहाल | ,, | ,, पंचमहाल. | १ | ० |
| सुरत | ,, | शहरशिवाय बाकीचा जिल्हा. | २ | ० |
| ठाणें, मुंबई सबर्बन जि. | ,, | जिल्ह्याची हद्द. | २ | १ |
| अहमदनगर | ,, | ,, | २ | १ |
| पूर्वखानदेश | ,, | ,, | ३ | ० |
| नाशिक | ,, | ,, | २ | १ |
| पुणें | ,, | नागरिक संघाची हद्द वगळून बाकीचा जिल्ह्याचा भाग. | २ | १ |
| सातारा | ,, | जिल्ह्याची हद्द. | ३ | ० |
| बेळगांव | ,, | ,, | २ | ० |
| विजापूर | ,, | ,, | १ | ० |
| धारवाड | ,, | ,, | २ | ० |
| कानडा | ,, | ,, | १ | ० |
| रत्नागिरी | ,, | ,, | २ | १ |
| पूर्वसिंध | ,, | हैद्राबाद, थर,पारकर, नवाबशहा जिल्हे. | १ | ० |

| मतदारसंघाचें नांव | मतदारसंघाचा वर्ग | त्याची व्याप्ति | सभासदांची संख्या | राखीव जागा |
|---|---|---|---|---|
| पश्चिमसिंध | बिगर मुसुलमान संघ | कराची, लारखाना, सक्कर, उत्तरसिंध. | १ | ० |
| सोलापूर जिल्हा | ,, | सोलापुर शहर सोडून बाकीचा भाग. | १ | १ } आंग्लोइंडियन |
| कुलाबा | ,, | जिल्ह्याची हद्द. | १ | १ } आंग्लोइंडियन |
| पश्चिम खानदेश | ,, | ,, | १ | १ } आंग्लोइंडियन |
| मुंबई | मुसलमान नागरिक संघ | मुंबई शहर. | २ | ० |
| कराची | ,, | शहर व कराचीमनोरा आणि पोर्टट्रस्टच्या लष्कराची हद्द. | १ | ० |
| अहमदाबाद व सुरत | ,, | सुरत व अहमदाबाद शहर व लष्कर कंकेरिया आसर्वा, एलिस, ब्रिज व साबरमती यांची हद्द. | १ | ० |
| उत्तरभाग | मुसलमान खेडेगांवी संघ | अहमदाबाद, खेडा, भडोच पंचमहाल सुरत, ठाणें व मुंबई सबर्बन जिल्हा यांतील नागरिक मतदारसंघाची हद्द वगळून. | ३ | ० |
| मध्यभाग | ,, | पूर्व—पश्चिमखानदेश, पुणें, नाशिक, सातारा, सोलापूर, अहमदनगर यांतील नागरिक संघाची हद्द वगळून. | ३ | ० |
| दक्षिणभाग | ,, | बेळगांव, विजापूर, धारवाड, कानडा, कुलाबा व रत्नागिरी. | ३ | ० |
| हैद्राबाद जिल्हा | ,, | जिल्ह्याची हद्द. | २ | ० |
| कराची | ,, | नागरिक संघाची हद्द वगळून जिल्ह्याचा बाकीचा भाग. | २ | ० |
| लारखाना | ,, | जिल्ह्याची हद्द. | ३ | ० |
| सक्कर | ,, | ,, | २ | ० |
| थर व पारकर | मुसलमान नागरिक संघ | ,, | २ | ० |
| नवाबशहर | ,, | ,, | १ | ० |
| उत्तरसिंध सरहद्दीवरचा जि. | ,, | ,, | १ | ० |
| मुंबई | यूरोपीयन संघ | शहराची हद्द. | १ | ० |
| मुंबई इलाखा | ,, | मुंबई शहर व एडनवजा इलाख्याचा भ.ग. | १ | ० |
| दक्षिणेंतील सरदार, इनामदार | जमीनदार संघ | मध्यभाग व दक्षिणभाग. | १ | ० |
| गुजराथेंतील सरदार, इनामदार | ,, | उत्तरभाग. | १ | ० |
| सिंधमधील जहागीरदार व इनामदार | ,, | सिंध. | १ | ० |
| मुंबई विश्वविद्यालय | विश्वविद्यालय | मुंबई इलाखा | १ | ० |
| मुंबई व्यापारसंघ | व्यापार व उद्योगधंदे | ,, | २ | ० |
| कराची | ,, | ,, | १ | ० |
| मुंबई ट्रेड्स असोसिएशन | ,, | ,, | १ | ० |
| मुंबई गिरणीवाले | ,, | ,, | १ | ० |
| अहमदाबाद गिरणीवाले | ,, | ,, | १ | ० |
| इंडियन मर्चंट्स चेंबर ब्यूरो | ,, | ,, | १ | ० |
| | | एकूण | ८६ | ७ |

टीपः–(१) सोलापूर, कुलाबा व पश्चिमखानदेश या जिल्ह्यांना दिलेली जागा राखीव समजून पहिल्या निवडणुकीच्या खेपेस सोलापूर, दुसऱ्या खेपेस कुलाबा व तिसऱ्या खेपेस पश्चिम खानदेश यांस देण्यांत आली आहे असें समजावें.

(२) एखाद्या मतदारसंघाचा प्रतिनिधि मराठा निवडून आलेला असेल किंवा कोणीच मराठा उमेदवार उभा राहिलेला नसेल तर ती राखीव जागा म्हणून समजण्यांत येऊं नये.

(३) ८६ जागांपैकीं मुंबई १४, सिंध १९, उत्तरभाग १८, मध्यभाग २१, दक्षिणभाग १२, मुंबई विश्वविद्यालय व मुंबई इलाखा यूरोपियन संघ २ अशी वांटणी करण्यांत आली आहे. त्यांत ८६ पैकीं २७ मुसुलमान व २ यूरोपियन आहेत. म्हणजे मुसुलमानांचे शेंकडा ३१.९ प्रमाण पडतें. तसेंच मतदारसंघाच्या दृष्टीनें नागरिक संघ १७, बिगर नागरिक संघ ५७ व ठराविक हद्द नसलेले संघ १२ अशी जागांची वांटणी आहे.

तात्पर्य, सभासदांच्या संख्येमध्यें वाढ, व्यापक मतदारसंघ, लोकनियुक्तांचें संख्याबाहुल्य इत्यादि फरक या नवीन सुधारणाॲक्टानें घडवून आणले आहेत.

अध्यक्षः—नवीन कायद्यान्वयें होणाऱ्या पहिल्या बैठकीपासून तों पहिलीं चार वर्षेंपर्यंत प्रांतिक कायदेमंडळाचा अध्यक्ष गव्हर्नरनें नेमलेला असावयाचा असून त्यानंतर मंडळानें निवडलेला व गव्हर्नरनें पसंत केलेला असावा लागतो. उपाध्यक्ष मात्र पहिल्यापासूनच लोकनियुक्त असावा लागतो. त्यांचें कायदेमंडळाचें सभासदत्व नष्ट होतांच अध्यक्ष व डेप्युटी अध्यक्ष यांचें अध्यक्षत्व व उपाध्यक्षत्व नाहींसें होईल. कायदेमंडळाच्या बहुमतानें आणि गव्हर्नरच्या संमतीनें त्यांना कामावरून दूर करण्याचा अधिकार कायदेमंडळांना आहे. अध्यक्षाचा व उपाध्यक्षाचा पगार प्रांतिक कायदेमंडळांनीं कायद्यानें ठरवावयाचा आहे.

मुदतः—प्रांतिक कायदेमंडळाची मुदत तीन वर्षें आहे पण ती मुदत एक वर्षपावेतों वाढविण्याचा अगर कमी करण्याचा अधिकार गव्हर्नरला आहे. पण कौन्सिल मोडल्यानंतर सहा महिन्याच्या आंत व स्टेटसेक्रेटरीची मंजुरी मिळाल्यास नऊ महिन्यांच्या आंत नवीन निवडणूक झालीच पाहिजे. कौन्सिलच्या बैठकी ठरविणें व वेळा ठरविणें हें गव्हर्नरचें काम आहे. नवीन सुधारणा ॲक्टानें गव्हर्नर हा कायदेमंडळाचा सभासद असतो. तथापि त्याला कायदेमंडळापुढें भाषण करण्याचा व त्यासाठीं सभासदांना हजर ठेवण्याचा हक्क आहे.

प्रांतिक कायदेमंडळांचे अधिकारः–प्रांतांतील शांतता व सुव्यवस्था राखण्यासाठीं योग्य कायदे करण्याची सत्ता प्रांतिक कायदेमंडळांना आहे. कायदेमंडळाव्यतिरिक्त इतर अधिकारी संस्थेनें केलेला कायदा रद्द करण्याचा अगर त्यांत बदल करण्याचा अधिकार कायदेमंडळाला आहे. या विस्तृत सत्तेला कांहीं अपवाद घालण्यांत आले आहेत. उदाहरणार्थ, खालील बाबींसंबंधीं गव्हर्नर जनरलच्या मंजुरीशिवाय कायदे करण्याचा अधिकार कायदेमंडळांना नाहीं. त्या बाबी अशाः– (१) आपल्या अधिकारांत नसलेला कर कमी अगर जास्त करणें अगर नवीन कर बसविणें, (२) हिंदुस्थान सरकारनें बसविलेला अगर चालू असलेला कर अगर जकात अथवा राष्ट्रीय कर्ज, (३) लष्करी, नाविक, अगर यानिक सैन्याच्या शिस्तीस बाध आणणें, (४) मध्यवर्ती खात्यांत ढवळाढवळ करणें, (५) मध्यवर्ती कायदेमंडळांच्या कक्षेतील प्रांतिक खात्यांत फेरफार करणें, (६) एखाद्या कायद्यानें गव्हर्नर जनरलच्या हातांत राखून ठेवण्यांत आलेल्या अधिकारास बाध आणणें, (७) पार्लमेंटच्या एखाद्या कायद्यास बाध येईल असा कायदा करणें.

कायदेमंडळाचें कामकाज व पद्धतिः–प्रांतिक कारभारासंबंधीं कोणत्याहि प्रकारचा कायदा करण्याचा अधिकार कायदेमंडळाला आहे. प्रांतिक कारभारावर तीन प्रकारांनीं कायदेमंडळाला दाब ठेवतां येतो. (१) ठराव आणून.—ठराव आणण्याला गव्हर्नरची संमति घ्यावी लागते, (२) प्रश्न व पुरवणी प्रश्न विचारून, (३) बैठक तहकूब ठेवण्याची सूचना आणून अगर, (४) निषेधपर ठराव पास करून आर्थिक बाबतींतहि कायदेमंडळाला बरेच अधिकार आहेत. वार्षिक जमाखर्चाचें अंदाजपत्रक खुलाशासह कायदेमंडळापुढें ठेवण्यांत येतें आणि त्यांतील कलमांवर मतें देणें, त्यांतील सरकारी मागण्या कमा जास्त करणें, मंजूर अगर नामंजूर करणें इत्यादि बाबतींत कायदेमंडळाला पूर्णपणें अधिकार आहे. या अधिकारांतून पुढील गोष्टी वगळण्यांत आल्या आहेत–(१) हिंदुस्थानसरकारला द्यावी लागणारी खंडणी, (२) गंगाजळी व कर्जावरील व्याज, (३) बादशहांनीं अगर भारतमंत्र्यानें नेमलेल्या

नोकरांचे पगार अगर पेन्शन, (४) प्रांतांतील हायकोर्ट जज्जांचा अगर ॲडव्होकेट जनरलचा पगार. खर्चाची एखादी बाब या अपवादात्मक भागांत पडते कीं नाहीं हें ठरविण्याचा अधिकार गव्हर्नरला आहे. कामकाजाची पद्धति स्थूलमानानें वरिष्ठ कायदेमंडळासारखीच आहे.

गव्हर्नरचे जादा अधिकार:—गव्हर्नरजनरलप्रमाणेंच गव्हर्नरलाहि कांहीं खास अधिकार या कायद्यान्वयें देण्यांत आले आहेत. प्रांताची शांतता अगर संरक्षण यांना बाधक असलेले एखादें बिल नामंजूर करण्याचा अधिकार गव्हर्नरला आहे. प्रांतिक कायदेमंडळांत एखादा मसुदा पसार झाल्यास तो मान्य किंवा अमान्य करण्याऐवजीं आपल्याला इष्ट वाटेल त्या दुरुस्त्या करून तो परत कायदेमंडळापुढें पुनर्विचारासाठीं पाठवण्याचा अगर गव्हर्नरजनरलकडे पाठवून देण्याचा अधिकारहि आहे. गव्हर्नरजनरलनें त्याला संमत्ति दिली तर त्याला कायद्याचें स्वरूप प्राप्त होतें. पण सहा महिन्यांच्या आंत त्याची संमति न मिळाल्यास तें बिल मुदतीबाहेर जातें, व तो मसुदा आपोआपच गळून जातो. कायदेमंडळानें पसार केलेलें कोणतेंहि बिल नामंजूर करण्याचा अधिकार गव्हर्नरला आहे. एखाद्या राखीव खात्यासंबंधीं गव्हर्नरच्या शिफारशीप्रमाणें कायदा करण्याचें कायदेमंडळानें नाकारलें तर तें आपल्या जादा अधिकारांत शेरा मारून पास करून घेण्याचा अधिकार गव्हर्नरला आहे.

प्रांतिक कायदेमंडळ व कार्यकारी मंडळ:—कार्यकारी मंडळाचे नवीन कायद्यान्वयें दोन भाग पाडण्यांत आले आहेत हें मागें सांगितलेंच आहे. प्रांतिक खात्याचे राखीव व सोंपीव असे दोन भाग करण्यांत येऊन राखीव खात्याचा कारभार गव्हर्नर हा कार्यमंत्र्याच्या समवेत चालवितो व सोंपीव खात्याचा कारभार गव्हर्नर हा दिवाणांच्या समवेत चालवितो असेंहि मागें सांगण्यांत आलें आहे. या दोन्ही शाखांचे व कायदेमंडळाचे परस्परसंबंध काय आहेत हें पाहूं. हिंदुस्थानसरकारच्या कार्यकारी मंडळावर कायदेमंडळांचा कोणताहि प्रत्यक्ष ताबा नाहीं हें मागें पाहिलेंच आहे. प्रांतिक कारभारांत मात्र या दृष्टीनें थोडेसें पुढें पाऊल पडलेलें दिसतें. उदाहरणार्थ सोंपीव खात्यांतील दिवाणाच्या कारभारावर व दिवाणावर, कायदेमंडळाची पूर्ण सत्ता आहे. कायदेमंडळाला दिवाणाला राजीनामा देण्यास भाग पाडण्याचा अधिकार आहे. सोंपीव खात्यांतील कारभाराचें धोरण दिवाणास आंखून देण्याचा अधिकार कायदेमंडळाला आहे. त्यामुळें दिवाणाला कायदेमंडळाच्या तंत्रानें चालणें भाग पडतें. अर्थात अगदीं जरूरीच्या वेळीं दिवाणाचें संरक्षण गव्हर्नर करूं शकतो पण तो अपवाद होय. ही स्थिति राखीव खात्याच्या बाबतींत मात्र आढळून येत नाहीं. कायदेमंडळाचा राखीव खात्यावर आणि कार्यमंत्र्यावर कोणताहि ताबा नाहीं आणि कार्यमंत्री आपल्या कोणत्याहि कृत्याबद्दल कायदेमंडळाला जबाबदार नाहींत. त्यांची नेमणूक, पगार हें ठरविणें कायदेमंडळाचें काम नाहीं. यद्यपि प्रश्न, आणि पुरवणीप्रश्न विचारून कार्यमंत्र्यांचीं बिंगें बाहेर काढण्याचा अधिकार कायदेमंडळांनां आहे तथापि प्रत्यक्ष असा ताबा कार्यमंत्र्यावर कायदेमंडळाचा नाहीं व गव्हर्नरला तर कायद्यानें सर्टीफिकेशनच सुलतानी अधिकार देऊन ठेवलेलेच आहेत. सारांश, प्रांतिक कायदेमंडळाचा व कारभारी मंडळाचा परस्पर संबंध इतर स्वतंत्र देशांतल्याप्रमाणें येथें नाहीं व जबाबदारीचें स्वराज्य देण्याचा उपक्रम प्रांतिक राज्यकारभारांत करण्यांत आलेला असला तरी तो फार संकुचित आहे असें ह्टल्यास वावगें होणार नाहीं.

विभाग व जिल्हे यांची राज्यव्यवस्था, प्रास्ताविक:—राज्यव्यवस्थेच्या सोईखातर ब्रिटिश हिंदुस्थानचे ज्याप्रमाणें प्रांत पाडण्यांत आले आहेत तद्वतच प्रांताप्रांतांचा कारभार सुरळीत चालण्यासाठीं प्रांताचेहि जिल्ह्यामध्यें तुकडे करण्यांत आले आहेत. तसेंच पांच सहा जिल्ह्यांचे गट करून त्यांनां विभाग अशी संज्ञा देण्यांत आली आहे. उदाहरणार्थ, मुंबई इलाख्याचे मध्यभाग, उत्तरभाग, दक्षिणभाग व सिंध असे चार भाग करण्यांत आले आहेत व चार भागांवर एक एक कमिशनर नेमण्यांत आला आहे. ज्या इतर प्रांतांत अशा प्रकारचे विभाग नाहींत त्याठिकाणीं बोर्ड ऑफ रेव्हेन्यू उर्फ प्रांताच्या वसुलाचीं मंडळें निर्माण करण्यांत आलीं आहेत. या विभागकमिशनरचें काम त्याच्या ताब्यांत असलेल्या जिल्ह्यावर देखरेख ठेवण्याचें असतें. जमीनसाऱ्याबावत कलेक्टरच्या निकालावर याच्याकडे दाद मागतां येते. याशिवाय दुष्काळांत रयतेला साऱ्याची सूट देणें, सारातहकुबी देणें इत्यादि अधिकारहि त्याच्याकडे देण्यांत आले आहेत. सर्वसाधारणपणें कमिशनर हा कलेक्टर व प्रांतिक सरकार यांच्यामधील दुवा आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कलेक्टरचा प्रांतिक सरकारशीं पत्रव्यवहार याच्यामार्फत चालतो.

कमिशनर हा बहुधां सिव्हिलसर्व्हिसमधील असतो. वास्तविक कमिशनरची योजना आवश्यक आहे. कलेक्टरचा प्रांतिक सरकारशीं एकदम व्यवहार चालविण्यास हरकत नाहीं. त्यामुळें कमिशनर्स हे फुकट खाऊ नोकर आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. मुंबईशिवाय इतर प्रांतांमध्यें वसूलमंडळें स्थापन करण्यांत आलीं असून त्यांच्याकडे जमीनमहसुलाचें काम असतें. सिंधमधील कमिशनरला जमीनमहसुलीच्या अधिकाराशिवाय अंमलबजावणीचेहि कांहीं अधिकार देण्यांत आले आहेत.

कलेक्टरः—तथापि प्रांतिक सरकारच्या खालोखाल जिल्हासरकार हेंच प्रमुख होय. प्रांताचे निरनिराळे जिल्हे पाडण्यांत आले असून प्रत्येक जिल्ह्यावर एकेक कलेक्टर नेमण्यांत आला आहे. प्रत्येक जिल्ह्याचें क्षेत्रफळ सारखें नाहीं. मॉंटेग्यू चेम्सफोर्ड रिपोर्टांत प्रत्येक जिल्ह्याचें सरासरी क्षेत्रफळ ४४३० मैल असतें असें म्हटलें आहे. प्रांतिक राज्यकारभारांत जिल्हा हा घटक असल्यानें त्याचें महत्त्व फार आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांत एकंदर २६७ जिल्हे आहेत. या जिल्ह्यांचा कारभार कलेक्टरमार्फत चालतो. जिल्ह्यांतील अधिकारीवर्गांत हा सर्वश्रेष्ठ अधिकारी होय. हा बहुधां इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधील यूरोपियन अधिकारी असतो. त्याच्या हाताखालीं असिस्टंट कलेक्टर, डेप्युटी कलेक्टर इत्यादि अधिकारी नेमलेले असतात.

कलेक्टरचीं कर्तव्यें:—ब्रिटिश सरकारचा प्रतिनिधि या नात्यानें कलेक्टर हा जिल्ह्याचा कारभार पहातो. कलेक्टर व मॅजिस्ट्रेट अशा दोन स्वरूपाचे अधिकार असतात. कलेक्टर या नात्यानें त्याच्याकडे जमीन, स्टँप, इत्यादि सर्व बाबींचा वसूल गोळा करण्याचें काम असतें. जमीनीच्या वांटण्या, हक्कनोंदणी, विक्री, जमीनदार, कुळें वगैरे संबंधींच्या सर्व बाबती याच्याकडे असतात. वर्षांतील बरेच दिवस त्याला तालुक्यांतून व खेड्यांतून लोकांच्या स्थितीची चौकशी करण्याकरतां व आपल्या ताब्यांतील प्रदेशाची व्यवस्था सुरळितपणें चाललेली आहे किंवा नाहीं हें पहाण्याकरतां हिंडावें लागतें.

मॅजिस्ट्रेट या नात्यानें त्याच्याकडे गुन्हेगारांची चौकशी करणें, या बाबतींत निकाल देणें, आपल्या हद्दींतील फौजदारी कोर्टांवर व पोलीस खात्यावर अंमल चालविणें, म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, वगैरे स्थानिक स्वराज्य संस्थांचें धोरण ठरविणें व त्यांच्यावर ताबा चालविणें इत्यादि कामें असतात. अलीकडे म्युनिसिपालिट्यावरील त्याचें नियंत्रण कमी करण्यांत आलें आहे.

जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणीं याचें वास्तव्य असतें. जिल्ह्यांतील सर्व प्रकारचीं कामें याला पहावीं लागत असल्यामुळें या कामांचीं निरनिराळी खातीं पाडण्यांत आलीं आहेत. व त्या त्या खात्यांवर कलेक्टरच्या हाताखालीं स्वतंत्र अधिकारी नेमण्यांत आले आहेत. पोलीस, शिक्षण, वैद्यक, आणि आरोग्य, पब्लिक वर्क्स, जंगलखातें, शेतकीखातें, उद्योगधंदे, कारखाने सहकारी पतपेढ्या, इत्यादि अनेक प्रकारचीं खातीं आहेत. यांच्यावर प्रत्यक्ष देखरेख डिस्ट्रिक्ट ऑफिसरची असते. डिस्ट्रिक्ट ऑफिसर हा इतके दिवसपर्यंत जिल्हा बोर्डाचा अध्यक्ष असे पण अलीकडे तो अध्यक्ष असतोच असें नाहीं.

कलेक्टरकडे न्याय देणें व त्याची अंमलबजावणी करणें असे दोन्ही अधिकार असतात. हे दोन्ही अधिकार एकाच्याच हातांत असणें लोकहिताच्या दृष्टीनें अत्यंत गैर आहे असें लोकांचें मत आहे व तें यथार्थ आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. जिल्ह्यांतील सर्व सत्ता याच्या ताब्यांत असते तरी त्याच्या कारभाराचें सामान्य धोरण प्रांतिक सरकार आंखून देत असल्यानें त्याला त्याच्या अनियंत्रित अधिकाराचा दुरुपयोग करतां येत नाहीं.

तालुकाः—जिल्ह्याचे पुन्हां पोटविभाग पाडण्यांत आले आहेत. त्यांनां तालुके अगर तहशीली म्हणतात. यांवर मामलेदार अगर तहशीलदार नांवाचा प्रमुख अधिकारी असतो. याला तालुक्यापुरते कलेक्टरसारखेच सर्व अधिकार असतात. कांहीं जिल्ह्यांचे मिळून जसे विभाग करण्यांत आले आहेत तद्वत कांहीं तालुक्यांचे मिळून भाग पाडण्यांत आले आहेत व या भागांवर कमिशनर प्रमाणें असिस्टंट अगर डेप्युटी कलेक्टर याची नेमणूक करण्यांत येते. हे अधिकारी सामान्यतः प्रॉव्हिन्शियल सर्व्हिसमधून निवडण्यांत आलेले असतात. याची तालुक्याच्या मामलेदारावर व तहशीलदारावर देखरेख असते. मामलेदाराला फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार असतात.

खेडीं:— प्रत्येक तालुक्यांत पुष्कळ खेडीं असतात. खेडेगांव हें फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानच्या राज्यपद्धतींत महत्त्वाचा घटक मानलें जातें. व अद्यापिहि त्याचें महत्त्व बरेंच आहे. खेड्याचा मुख्य अधिकारी पाटील असून त्याच्याकडे खेड्यांतील जमीनीचा

वसुल करणें, व खेडेगांवची शांतता व व्यवस्था राखणें हीं कामें असतात. कांहीं ठिकाणीं त्याला लहान सहान खटलेहि चालवितां येतात. त्याच्या हाताखालीं कुलकर्णी नांवाचा अधिकारी देण्यांत आलेला असतो. त्याच्याकडे हिशेब ठेवणें, जमीनीवरील हक्कपत्रकें तयार करणें इत्यादि कामें असतात. चौकीदार हा खेड्यांतील पोलीस अधिकारी असतो. खेड्यांतील या अधिकाऱ्याच्या जागा पूर्वीपासून वंशपरंपरागत असत. पण अलीकडे ही पद्धति बदलण्याचा उपक्रम झाला असून, लायकीवर अधिकाराच्या जागा देण्याकडे प्रवृत्ति बळावत चालली आहे. कुलकर्ण्याची जागा तर अलीकडे लायकीवरच देण्यांत येऊं लागली आहे.

स्थानिक स्वराज्यः—राज्यव्यवस्थेच्या इतिहासांत स्थानिक स्वराज्याचें अत्यंत महत्त्व आहे. स्थानिक स्वराज्याच्या संस्था जरी ब्रिटिश अमदानींत निर्माण झाल्या तथापि त्यांतील मूलभूत तत्त्व हें हिंदु लोकांच्या हाडींमांसी पूर्वापार खिळलेलें दिसून येतें. स्थानिक स्वराज्य याचा अर्थ, स्थानविषयक कारभाराची व्यवस्था पहाण्याचा हक्क असा होतो. ज्याप्रमाणें, हिंदुस्थानचा राज्यकारभार हिंदुस्थान सरकार पहातें, प्रांताचा व जिल्ह्याचा कारभार प्रांतिक सरकार व जिल्हा सरकार हीं अनुक्रमें चालवितात त्याप्रमाणें स्थानिक कारभार पहाण्याचें काम स्थानिक सरकार करतें स्थानिक स्वराज्यसंस्था म्हणजे विवक्षित स्थानाचा कारभार पाहणारें सरकारच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. लोकांनां देशाच्या राज्यकारभारांत योग्य तऱ्हेनें भाग घेतां यावा म्हणून स्थानिक स्वराज्यसंस्था निर्माण करण्यांत आली. तथापि फार प्राचीन काळापासूनच स्थानिक स्वराज्याचा कारभार योग्य तऱ्हेनें प्राचीन हिंदु पार पाडीत असत. पूर्वीच्या हिंदु राज्यपद्धतींत खेडें हा फार महत्त्वाचा व स्वतंत्र घटक म्हणून मानला जाई. तत्कालीन मध्यवर्ती सरकार खेड्याच्या अंतर्व्यवस्थेंत मुळींच ढवळाढवळ करीत नसे. त्यामुळें मध्यवर्ती सरकारांत जरी फेरबदल झाले, राजघराण्यांमध्यें उलथापालथ झाली तरी ग्रामव्यवस्था कित्येक शतकें पूर्ववत अबाधित चालू राहिली.

तथापि ब्रिटिशांची सत्ता हिंदुस्थानावर स्थापन झाल्यापासून पूर्वीची खेडेगांवांची स्वतंत्रता नष्ट झाली. पूर्वी एखाद्या गोष्टीसंबंधी न्याय देण्याकरतां गांवांतील शिष्टांची पंचायत असे पण त्याऐवजीं न्यायकोर्टें स्थापन झालीं. खेडेगांवांतील गुन्हेगारांची टेहेळणी करण्याचें काम आतां पोलीसमार्फत होऊं लागलें. असे जरी फेरफार घडून आले तरी अद्यापिहि खेडें हा राज्यव्यवस्थेंतील अत्यंत लहान पण महत्त्वाचा घटक म्हणून मानण्यांत येतो. पूर्वीची ग्रामपंचायतपद्धति जरी अव्वल ब्रिटिश अमदानींत मोडली तरी तिच्या पुनरुज्जीवनाची आवश्यकता अलीकडे भासूं लागली आहे. अधिकारविभागणी बाबत जें रॉयल कमिशन बसविण्यांत आलें होतें त्या कमिशननें ग्रामपंचायती पुन्हां स्थापन करण्यांत येऊन त्यांनां कांहीं हक्क देण्यांत यावेत अशी शिफारस केली आहे. या कमिशनच्या शिफारशींनां अनुसरून १९१२ सालीं पंजाबमध्यें ग्रामपंचायतीबाबत अॅक्ट पास करण्यांत आला. तथापि एकंदरींत या बाबतींत सरकारनें जितकें लक्ष्य द्यावयास पाहिजे होतें तितकें दिलेलें नाहीं व अद्यापिहि त्या बाबतींत सरकार हयगय करीत आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. तथापि समाधानाची गोष्ट एवढीच कीं मॉंट-फर्ड रिपोर्टनें स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या बाबतींत शक्य तितकी लोकसत्ता जास्त असली पाहिजे व राजसत्तेचा दाब शक्य तितका कमी करण्यांत आला पाहिजे हें तत्त्व मान्य केलें आहे.

स्थानिक स्वराज्यामध्यें म्युनिसिपालिट्या, जिल्हा बोर्डें व तालुका लोकलबोर्डें, ग्रामपंचायती इत्यादिकांचा समावेश होतो. इलाख्यांतील मुख्य शहरांतील म्युनिसिपालिट्यांनां कार्पोरेशन असें नांव आहे. जिल्ह्यांतील मुख्य शहराच्या म्युनिसिपालिटीला जिल्हाम्युनिसिपालिटी असें म्हणतात. या संस्थांचीं मुख्य कामें आपल्या हद्दींतील लोकांच्या सुखसोई पहाणें, सडका बांधणें, दिवाबत्ती करणें, पाणीपुरवठा, दवाखाने काढणें, वाचनालयें काढणें इत्यादि विविध प्रकारचीं असतात.

म्युनिसिपालिटीः—स्थानिक स्वराज्यांतील प्रमुख संस्था म्युनिसिपालिटी होय. म्युनिसिपालिटी अगर जिल्हाबोर्डें यांचा प्रचार ब्रिटिशसरकारनेंच हिंदुस्थानांत केला. कंपनीसरकारच्या अमदानींतच इलाख्याच्या राजधानींच्या शहरांनां म्युनिसिपालिट्या दिल्या होत्या. १६८७ सालीं मद्रासमध्यें म्युनिसिपल कार्पोरेशन स्थापन करण्यांत आलें होतें. १७२६ सालीं मुंबई, कलकत्ता, या शहरांच्या व्यवस्थेसाठीं मेयर्सकोर्टें स्थापन झालीं होतीं व त्यांच्याकडे शहरांतील कांहीं गुन्ह्यांचा अगर फिर्यादींचा निकाल देण्याचा अधिकार देण्यांत आला होता. त्याचप्रमाणें रेग्युलेटिंग अॅक्टानें त्यांनां स्थानिक कारणासाठीं मर्यादित स्वरूपांत कर बसविण्याचा हक्कहि

मिळाला होता. १८४२ सालीं बंगालमध्यें म्युनिसिपालिटया स्थापन करण्याचा कायदा झाला. पण त्याचा तादृश उपयोग झाला नाहीं. १८५० सालीं सर्व ब्रिटिश हिंदुस्थानासंबंधीं म्युनिसिपालिटयांच्या बाबतींत एक ॲक्ट करण्यांत आला. या कायद्यान्वयें, बऱ्याच ठिकाणीं म्युनिसिपालिट्या स्थापन झाल्या व त्यांच्यावर कमिशनर नेमण्यांत येऊन त्यांच्याकडे शहरव्यवस्था पहाण्याचे व तत्कार्यार्थ कर बसविण्याचे हक्क देण्यांत आले. हे अधिकारी सरकारनियुक्त असल्यानें लोकांना त्यांत मुळींच भाग घेतां येत नसे. १८७० च्या ॲक्टनें लॉर्ड मेयो यानें या संस्थांनां थोडेसें स्वातंत्र्य दिलें व लोक जे कर देत असत त्यांची विल्हेवाट कशी करण्यांत येते हें पहाण्याचा अधिकार लोकांना देण्यांत आला. १८७१ ७४ या सालांच्या दरम्यानच्या ॲक्टांनीं म्युनिसिपालिटींत लोकनियुक्त सभासद फारच थोडया प्रमाणांत घेण्यांत येऊं लागले. तथापि, स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या बाबतींत सरकारचें आणि लोकांचें खरें लक्ष १८८२ सालापासून लागण्यास सुरुवात झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. पुढें लॉर्ड रिपननें १८८२ सालीं व्यवस्थित पद्धतीवर स्थानिक स्वराज्यसंस्थांचें धोरण आंखण्याचा प्रयत्न केला. १८८३-८४ सालीं जे म्युनिसिपल ॲक्ट करण्यांत आले त्या योगानें म्युनिसिपलिटयांची घटना, हक्क व कार्यक्षेत्र यांच्यामध्यें महत्त्वाचे फेरफार झाले. निवडणुकीच्या तत्त्वाला स्पष्टपणें मान्यता देण्यांत आली. पुष्कळ म्युनिसिपालिटयांत खाजगी नागरिकांनां चेअरमन होतां येऊं लागलें, म्युनिसिपालिटयांचें उत्पन्न वाढविण्याची योजना करण्यांत आली. प्रांतिक महसुलापैकीं कांहीं बाबी म्युनिसिपालिटीकडे सोपविण्यांत आल्या. तथापि लॉर्ड रिपनच्या या उदार धोरणाचा फारसा परिणाम घडून आला नाहीं. विशेषतः लॉर्ड कर्झनच्या अमदानींत अधिकारकेंद्रीकरणाचें तत्त्व अंमलांत आल्यामुळें स्थानिक स्वराज्याच्या संस्थांनां जे उदार हक्क मिळाले होते ते एका हातानें काढून घेण्यांत येऊं लागले. पण कर्झन साहेबांच्या या घातक तत्त्वाचे दुष्ट परिणाम लवकरच हिंदुस्थान सरकारच्या नजरेस आल्यामुळें १९०९ सालच्या अधिकारविभागणीकमिशननें अधिकारविभागणीची योजना तयार केली व त्यामुळें पुन्हां स्वराज्याच्या संस्थांनां थोडे फार हक्क मिळाले. १९०८ सालीं स्थानिक स्वराज्याचें स्वतंत्र खातें हिंदुस्थानसरकारनें निर्माण केलें व या संस्थांवर देखरेख ठेवण्याकरतां एक स्वतंत्र सभासद वरिष्ठ कार्यकारी मंडळांत घेण्यांत आला. मॉंटेग्यूचेम्सफोर्ड रिपोर्टामध्यें स्थानिक स्वराज्यसंस्थांमध्यें लोकांनां शक्य तितके अधिक हक्क व जबाबदारी देण्यांत आली पाहिजे असें तत्त्व नमूद करण्यांत आलें आहे. १९१७ चा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यानंतर १९१८ सालीं चेम्सफोर्डनें एक ठराव करून, म्युनिसिपालिटी व इतर स्वराज्यसंस्थांमध्यें लोकमताचें वर्चस्व स्थापन करण्याचा प्रयत्न केला. त्या ठरावानें म्युनिसिपालिटयांचें कार्यक्षेत्र वाढलें, सरकारी नियंत्रण पुष्कळच कमी करण्यांत आलें, लोकनियुक्त सभासदांची संख्या ¾ व सरकारी सभासदांची संख्या ¼ करण्यांत आली बहुतेक म्युनिसिपलिटयांनां लोकनियुक्त अध्यक्ष नेमण्याचा हक्क मिळाला. सुधारणांनंतर स्थानिक स्वराज्याचें खातें दिवाणांच्या ताब्यांत सोंपीव खातें म्हणून देण्यांत आलें व त्यामुळें दिवाणांनीं या खात्यांत बऱ्याच महत्त्वाच्या सुधारणा करण्याचा उपक्रम केला आहे. पंजाब सरकारनें संयुक्तप्रांतसरकारनें व बहुतेक कायदेमंडळांनीं या बाबतींत नवीन कायदे पास केले आहेत. बंगाल कौन्सिलनें आपल्या प्रांतांतील म्युनिसिपालिटया व कलकत्ता कार्पोरेशनची पुनर्घटना करण्याबाबत एक कायदा पास केला आहे.

लोकलबोर्डें:-म्युनिसिपलिट्यांप्रमाणेंच लोकलबोर्डें देखील ब्रिटिश अमदानींतच निर्माण झालीं. १८७० पूर्वी हिंदुस्थानांत लोकलबोर्डें अस्तित्वांत नव्हतीं. पण लॉर्ड मेयोनें जी अधिकारविभागणी केली त्यामुळें आपापल्या स्थानिक हद्दींतील व्यवस्था पहाण्यासाठीं स्थानिक संस्था निर्माण करण्यांत आल्या. रिपनच्या कारकीर्दींत यांची पुनर्घटना करण्यांत आली. जिल्हाबोर्डेंहि स्थापन करण्यांत येऊन त्यांच्याकडे जिल्ह्यांतील स्थानिक स्वराज्याची व्यवस्था सोंपविण्यांत आली. या बोर्डांमध्यें लोकनियुक्तांचें बाहुल्य असावें असेंहि ठरविण्यांत आलें. सुधारणाकायद्यानंतर यांच्यांतहि महत्त्वाच्या सुधारणा झाल्या. पंजाबसरकारनें ग्रामंमंडळें निर्माण करण्याचा कायदा प्रसार केला. व या बोर्डांमध्यें लोकनियुक्तांचें पूर्ण वर्चस्व स्थापन केलें. बंगालच्या कायदेमंडळानें 'व्हिलेज सेल्फ गव्हर्नमेंट' नांवाचा कायदा पास केला. ग्रामपंचायतीचें पुनरुज्जीवन करण्याचाहि बऱ्याच प्रांतिक सरकारांनीं प्रयत्न सुरू केला आहे.

म्युनिसिपलिटया:—१९२० सालीं हिंदुस्थानांत एकंदर ७५१ म्युनिसिपालिटया होत्या. मुंबई, कलकत्ता, व

मद्रास येथील म्युनिसिपालिटयांना कार्पोरेशन अशी संज्ञा आहे. म्युनिसिपालिटीमध्यें लोकनियुक्त, सरकारी अधिकारी आणि सरकारनें नेमलेले असे तीन प्रकारचें सभासद असतात. सर्वसाधारणतः म्युनिसिपालिटयांतील सभासदांपैकीं निम्याहून अधिक लोकनियुक्त असतात. व ही संख्या उत्तरोत्तर अधिकच वाढत आहे. कांहीं मागासलेल्या भागांतील म्युनिसिपालिट्या वगळल्यास बहुतेक म्युनिसिपलिट्यांचा अध्यक्ष लोकनियुक्त असतो व म्युनिसिपालिट्यावरील सरकारचा दाबहि अलीकडे कमी झाला आहे. तथापि कमिशनर, कलेक्टर यांना, म्युनिसिपालिटीवर देखरेख ठेवण्याचा त्यांच्या जमाखर्चाची तपासणी करण्याचा, तसेंच म्युनिसिपालिटीच्या खर्चास मंजुरी देण्याचाहि अधिकार आहे. म्युनिसिपालिट्यांचें कार्यक्षेत्र, आपल्या हद्दींतील सार्वजनिक शांतता राखणें; सार्वजनिक आरोग्य, वाहनांची सोय, व शिक्षण इत्यादिकांची व्यवस्था करण्याचें असतें. त्या कामांनिमित्त लागणारा खर्च भागविण्यासाठीं म्युनिसिपालिट्यांना कर बसविण्याचा हक्क देण्यांत आला आहे. म्युनिसिपालिटयांच्या ताब्यांतील मालमत्तेचें उत्पन्न व सरकारकडून मिळणारी मदत यांचें उत्पन्न व करापासून होणारें उत्पन्न अशा तीन प्रकारच्या उत्पन्नांच्या साहाय्यानें म्युनिसिपालिट्यांचा खर्च चालतो. हिंदुस्थानांतील म्युनिसिपॉलिटयांचें वार्षिक उत्पन्न १२.९६ कोटी रुपये आहे. त्यापैकीं शेकडा ४० टक्के कार्पोरेशनचेंच आहे. साधारणतः कर पुढील बाबींवर बसविण्यांत आले आहेतः— घरपट्टी, वाहनावरील कर, पाणीपट्टी, मंडई व बाजारभाडें, जकात, उद्योगधंद्यावरील व वाहनांवरील कर म्युनिसिपालिटीच्या खर्चाच्या तपशीलांत पब्लिक वर्क्स डिपार्टमेंट, शहरसंरक्षण, पाणीपुरवठा, व ड्रेनेज या कामावर अधिक खर्च होतो. शिक्षणावर शेकडा ८ टक्केच खर्च करण्यांत येतो. तथापि, मुंबई इलाख्यांत मात्र हा खर्च शेकडा २१ आहे.

कार्पोरेशन.—हिंदुस्थानांत एकंदर ४ कार्पोरेशनें आहेत. मुंबई, मद्रास, कलकत्ता, रंगून. मुंबई कार्पोरेशनमध्यें १०६ सभासद असून त्यापैकीं ७६ लोकनियुक्त असतात. अध्यक्ष लोकनियुक्त असतो. मद्रासमध्यें सभासदांची संख्या ५० असून त्यापैकीं ३० लोकनियुक्त असतात. कलकत्ता कार्पोरेशनमध्यें ८९ सभासद असून त्यांपैकीं ६३ लोकनियुक्त असतात. रंगूनच्या कार्पोरेशनमध्यें ३४ सभासद असतात. मुंबई, मद्रास व कलकत्ता कार्पोरेशनंवर देखरेख ठेवण्याकरितां सरकारनें एक कमिशनर नेमलेला असतो. कार्पोरेशननें आपलें काम चालविण्याकरितां प्रत्येक खात्यासाठीं एकेक कमिटी नेमलेली असते. मुंबई म्युनिसिपालिटी सर्व हिंदुस्थानांत पहिल्या प्रकारची असून तिचें उत्पन्न १९२३ सालीं २८० लाख रुपये होतें.

स्थानिक बोर्डें:—यांमध्यें जिल्हाबोर्डें, तालुकाबोर्डें व ग्रामपंचायती यांचा अंतर्भाव होतो. जिल्हाबोर्डाच्या खालीं दोन अगर अधिक तालुकाबोर्डें असतात. हिंदुस्थानांत सुमारें २१९ जिल्हाबोर्डें व ५४३ तालुकाबोर्डें आहेत. त्यांशिवाय ८०० संघ—मंडळें आहेत. आसाम प्रांतांत मात्र जिल्हाबोर्डें मुळींच नाहींत. या बोर्डांमध्यें लोकनियुक्त सभासदांचें प्रमाण शेकडा ९० वर आहे. या बोर्डांचें वार्षिक उत्पन्न सुमारें ११ कोटी रुपये होतें. बोर्डांचें कार्यक्षेत्र जवळजवळ म्युनिसिपालिट्यांच्या कार्यक्षेत्रासारखेंच असतें. बोर्डांना पुढील बाबींवर कर बसवितां येतोः—जमीनपट्टी, घरपट्टी, वाहनपट्टी, जगात, पाणीपट्टी, रोशनाईपट्टी, स्थानसंरक्षण, स्वच्छता व आरोग्य यांच्यावरील पट्टी. बोर्डांचें मुख्य उत्पन्न जमीनपट्टीचें असतें. तालुक्याची व्यवस्था पहाण्याचें काम तालुकाबोर्डाचें असतें.

ग्रामपंचायतः—खेडेगांवांतील प्रत्येक जातीतर्फे, एकेक शिष्ट निवडून या सर्वांमिळून जें मंडळ होई त्यास पंचायत अशी संज्ञा असे, या संस्थेकडे जमीनसारा गोळा करणें, खेड्याची शांतता राखणें, न्याय देणें वगैरे कामें असत. घरपट्टी, मालमत्तेवरील उत्पन्न व सरकारी मदत हें या संस्थांचें उत्पन्न असे. ग्रामपंचायतीच्या पुनरुज्जीवनाला १९०८ च्या अधिकारविभागणी कमिशनपासून सुरुवात झाली. बंगालमध्यें अशा संस्थांची संख्या ६७०० आहे. मुंबई इलाख्यांत एकंदर ३०० पंचायती होत्या.

नोटीफाईड एरियाः—अगदीं लहान शहरासाठीं सरकारनियुक्त मंडळ नेमण्यांत आलेलें असतें. आणि त्याचें काम म्युनिसिपालिटीप्रमाणेंच असते.

सनदी नोकरः—ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानामध्यें आपला व्यापार सुरू केल्यावर आपल्या व्यापाराचें कामकाज पहाण्यासाठीं व्यापारी फॅक्टर्स व कारकून यांच्या नेमणुका करण्यास सुरवात केली. या लोकांच्या नेमणुका करण्याचा व त्यांच्यासंबंधीं जरूर ते नियम करण्याचा अधिकार इलिझाबेथच्या सनदेनें कंपनीला दिलेला

होता,व त्यानंतर दिलेल्या सनदांनींहि तो कायम ठेवला होता. पुढें कंपनीनें आपलें व्यापाराचें धोरण टाकून राजकीय बाबतींत भाग घेण्यास सुरुवात केली त्यावेळीं कंपनीच्या नोकरांनां आपल्या हाताखालच्या लोकांकडून पैसे उकळण्याची संधि सांपडली. १७६९ सालीं बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांताचे दिवाणी हक्क कंपनीला मिळाले व १७७२ सालीं या प्रांतांचा कारभार कंपनीनें हातीं घेतला त्यावेळीं वॉरन हेस्टिंग्जनें या प्रांताची जमाबंदी करण्यासाठीं यूरोपियन नोकर ठेवण्यास सुरुवात केली. पण त्यावेळच्या नोकरांचे पगार अल्प असल्याकारणानें या नोकरांनीं प्रांतांतील लोकांवर हरतऱ्हेचे जुल्म करून पैसे उकळण्यास सुरुवात केली. त्यामुळें या नोकरांविरुद्ध बरीच हकाटी सुरू झाली तथापि लॉर्ड कॉर्नवालिस हा गव्हर्नर जनरल होईपर्यंत ही अनिष्ठ स्थिति चालूच राहिली. कॉर्नवालिसनें प्रथमत: या नोकरवर्गाची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न केला. ईस्ट इंडिया कंपनीच्या पदरीं जो नोकरवर्ग होता त्याचें त्यानें 'दि कॉव्हेनंटेड सर्व्हिस ऑफ दि ईस्ट इंडिया कंपनी' असें नांव ठेवलें. या नोकरीवाल्यावर्गासंबंधीं त्यानें तीन नियम केले. ते असे (१) प्रत्येक सनदी नोकरानें आपण नोकरींत असेतोंपर्यंत व्यापार करणार नाहीं, एतद्देशीयाकडून नजर स्वीकारणार नाहीं व पेन्शनफंडाला आपल्या पगारांतला ठराविक अंश देऊं अशी शर्त लिहून दिली पाहिजे. याचा मोबदला कंपनीनें या नोकरांनां चांगलें वेतन देण्याचें, त्यांत ठराविक कालानें वाढ करण्याचें व त्यांच्या सुखाकडे पहाण्याचें काम आपल्या शिरावर घेतलें. अशा प्रकारचा करार लिहून देणाऱ्यांसाठीं कांहीं ठराविक अधिकाराच्या जागा राखून ठेवण्याचीहि कंपनीनें व्यवस्था केली. कॉर्नवालीनें केलेला हा नियम अद्यापिहि कायम आहे. (२) अशा सनदी नोकराच्या प्रथम नेमणुका इंग्लंडांतील कंपनीच्या व्यवस्थापक मंडळानें कराव्या पण त्यानंतरच्या या नोकरांच्या बदल्य, त्यांच्या पगारांतील वाढ इत्यादि संबंधींची सर्व व्यवस्था हिंदुस्थानांतील कंपनीच्या अधिकाऱ्याकडे असावी. (३) या सनदी नोकरांनां राज्यकारभाराचें शिक्षण देण्याची व्यवस्था करण्यांत यावी. अशा रीतीनें या वर्गासंबंधीं नियम करून कॉर्नवालिसनें या नोकरीवाल्या वर्गामध्यें जी अनीति माजली होती ती सुधारण्याचा प्रयत्न केला. तसेंच मोठमोठ्या अधिकाराच्या जागा इंडियन्सनां न मिळतां यूरोपियन लोकांनां मिळण्याची त्यानें व्यवस्था केली. त्याच्या शिफारशीला अनुसरून कलकत्ता येथें या नोकरांनां कायदा व हिंदी भाषा वगैरेचें शिक्षण देण्यासाठीं १८०६ सालीं एक कॉलेज उघडण्यांत आलें इंग्लंडांतील कंपनीचें व्यवस्थापकमंडळ ज्यांनां निवडील अशानांच या कॉलेजमध्यें प्रवेश मिळत असे व या कॉलेजांत दोन वर्षें शिक्षण पुरें केल्यानंतर परीक्षेंत पास झालेल्या उमेदवारांनां अधिकाराच्या जागा देण्यांत येत असत.

कॉर्नवॉलिसनें अंमलांत आणलेल्या तत्त्वान्वयें १८३० पर्यंत कंपनी आपले नोकर नेमीत असे. त्यामुळें बहुतेक सर्व अधिकाराच्या जागा यूरोपियनांनांच मिळत असत. पण १८३३ सालच्या कायद्यानें कंपनीच्या नोकर नेमण्याच्या बाबतींत, धर्म, जात, अगर वर्ण यासंबंधीं विचार करण्यांत येणार नाहीं असे जाहीर केलें. यानंतर १८५३ च्या कायद्यानें नोकरीच्या जागा सर्वच ब्रिटिश नागरिकांकरितां खुल्या ठेवण्यांत आल्या. त्यावेळेपर्यंत अधिकाराच्या जागेकरितां,इंग्लंडमधील व्यवस्थापकमंडळ लायक इसम निवडीत असे पण ही पद्धत १८५३ सालीं रद्द करण्यांत आली. तथापि जरी अधिकाराच्या जागा सर्व ब्रिटिश नागरिकांकरितां खुल्या ठेवण्यांत आल्या तरी अधिकाराच्या जागा मिळण्याकरितां उमेदवारांनां जी परीक्षा द्यावी लागत असे ती इंग्लंडमध्यें असल्याकारणानें हिंदी लोकांनां इंग्लंडमध्यें जाणें अत्यंत अवघड होतें. त्यामुळें १८७१ सालापर्यंत अवघ्या एका हिंदी इसमानेंच या परीक्षेंत यश मिळविलें होतें आणि त्याला सरकारी नोकरींत घेण्यांत आलें होतें. १८५३ सालीं हें जें सर्व ब्रिटिश नागरिकासाठीं खुल्या चढाओढीचें तत्त्व जाहीर करण्यांत आलें तेंच १८५८ सालीं राणीच्या जाहीरनाम्यांत घालण्यांत आलें. १८७० सालीं सनदी नोकरांसंबंधींच्या नियमामध्यें महत्त्वाचा फरक करण्यांत आला. या कायद्यानें, ज्या हिंदी गृहस्थांनीं नोकरीमध्यें आपली कर्तबगारी व लायकी सिद्ध केली असेल त्यांची, त्यांनां इंग्लंडास परीक्षा देण्यासाठीं जाण्याची जरूरी न पडतां, सिव्हिलसर्व्हिसमध्यें नेमणूक करण्यांत यावी असें ठरविण्यांत आलें. यासंबंधीचे नियम, गव्हर्नरजनरल यांनीं स्टेटसेक्रेटरीच्या संमतीनें करावेत असें ठरविण्यांत आलें. १८७० सालीं हा कायदा करण्यांत आला. तथापि १८७९ सालापर्यंत या कायद्याची अंमलबजावणी झाली नाहीं. १८७९ सालीं गव्हर्नरजनरलनें हे नियम जाहीर केले व त्या नियमान्वयें

$\frac{1}{6}$ जागा हिंदी लोकांच्यासाठीं राखून ठेवण्याचें निश्चित झालें. अशा रीतीनें सनदी नोकरीमध्यें शिरण्यासाठीं दोन मार्गांचें अवलंबन करतां येऊं लागलें एक मार्ग इंग्लंडमधलि चढाओढीची परीक्षा; या परीक्षेला इंग्लिश व हिंदी अशा दोन्ही जातींच्या इसमांनां बसण्याची परवानगी होती. दुसरा मार्ग १८७० च्या कायद्यानें अस्तित्वांत आणलेला; या कायद्यानें फक्त हिंदी गृहस्थांचीच, त्यांची लायकी पाहून, परीक्षेशिवाय, सनदी नोकरींत नेमणूक करण्याचें ठरलें. पण १८७० सालचा कायदा असावा तितका समाधानकारक नव्हता व त्यामुळें या कायद्यामध्यें बदल करण्याची आवश्यकता भासूं लागली. १८७९–१८८९ या दरम्यान या कायद्यान्वयें अवघ्या ६० जागांवरच हिंदी गृहस्थांची नेमणूक झाली होती. १८८६ सालीं या प्रश्नाचा सांगोपांग विचार करण्याकरतां त्यावेळचे स्टेटसेक्रेटरी किंबर्ले यानीं एक कमिशन नेमलें. या कमिशननें हिंदुस्थानांतील सनदी नोकरीच्या प्रश्नासंबंधानें पूर्ण विचार करून सनदी नोकरीमध्यें हिंदु लोकांनां कोणत्या उपायानें अधिकाधिक प्रवेश मिळत जाईल त्यासंबंधींची एक संपूर्ण योजना करावयाची होती. या कमिशनमध्यें १९ सभासद होते. व या कमिशनचें अध्यक्षस्थान पंजाबचा लेफ्टनंट गव्हर्नर ऐचिन्सन यास देण्यांत आलें होतें. तसेंच या १९ सभासदांपैकीं सहा हिंदी लोक होते. या कमिशननें हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांना भेट देऊन प्रत्येक प्रांतांतील राज्यकारभाराच्या खात्यांतील नोकरांच्या साक्षी घेतल्या. तसेच प्रमुख पुढाऱ्यांच्याहि साक्षी घेतल्या व त्यानंतर एकमतानें आपला अभिप्राय सरकारला सादर केला. या कमिशनचें नांव 'एचिन्सन कमिशन' असें आहे. कमिशनच्या रिपोर्टांतील शिफारशींनां अनुसरून सनदी नोकरांच्या नियमांमध्यें हिंदुस्थानसरकारनें फरक घडवून आणले.

या कमिशनच्या शिफारशीप्रमाणें सनदी नोकरांचे तीन वर्ग करण्यांत आले: (१) इंडियन सिव्हिल सर्व्हिस, (२) प्रॉव्हिन्शियल सर्व्हिस व (३) सबॉर्डिनेट सर्व्हिस. १८८९ पर्यंत सनदी नोकरांचे कॉर्नवालीसनें भाग केल्याप्रमाणें 'करारी सनदी नोकर' व 'बिनकरारी सनदी नोकर' असे दोनच भेद होते. पण या कमिशननें या सनदी नोकरांचे वरील तीन वर्ग पाडले. या तीन वर्गांत इंडियन सिव्हिल सर्व्हिस हा सर्वांत वरच्या दर्जाचा वर्ग होय. या नोकरींत इंग्लंडमधील चढाओढीच्या परीक्षेंत पास झालेल्या उमेदवारांनांच द्यावयाचें अशी कमिशननें शिफारस केली. ज्या जागा मिळण्यासाठीं परीक्षेंत पास व्हावें लागे अशा सर्व जागा व अगदीं वरच्या अधिकाराच्या जागा पहिल्या वर्गांतील नोकरांसाठीं ठेवण्यांत आल्या. चढाओढीची परीक्षा इंग्लंडमध्यें व हिंदुस्थानामध्यें दोन्हीं ठिकाणीं ठेवण्यांत यावी अशी कित्येकांकडून सूचना करण्यांत आली होती पण कमिशननें ती मान्य केली नाहीं. या इंडियन सिव्हिल सर्व्हिसखालीं राखून ठेवण्यांत आलेल्या जागापैकीं $\frac{1}{6}$ जागा प्रॉव्हिन्शियल सर्व्हिसमधून वर चढविण्यांत आलेल्या हिंदी इसमांनां द्यावयाचें ठरलें. दुसऱ्या वर्गांत म्हणजे प्रॉव्हिन्शियल सर्व्हिसमध्यें प्रांतांमधील सुशिक्षित लोकांनां, नेमणुकीनें परिक्षा घेऊन अगर सबॉर्डिनेट सर्व्हिसमधील नोकरांपैकीं कांहीं लोकांनां बढती देऊन, द्यावयाचें ठरलें. सबॉर्डिनेट सर्व्हिस ही खालच्या जागांवरील नोकरांसाठीं ठेवण्यांत आली. यामध्यें, निरनिराळ्या सरकारी खात्यांतील नोकरांचा समावेश होत असे. ही वर्गवारी खुद्द अंमलबजावणीच्या खात्यांतील आणि न्यायखात्यांतील नोकरांसंबंधींच होती पण इतर सरकारी सार्वजनिक खात्यांतील नोकरांचेहि अशाच तऱ्हेनें इंपीरियल, प्रॉव्हिन्शियल व सबॉर्डिनेट असे तीन वर्ग करण्यांत आले. इंपीरियल सर्व्हिसमधील नोकरांची नेमणूक स्टेट सेक्रेटरीकडून होत असे. यामध्यें बहुतेक इंग्लिश लोकांचीच भरती करण्यांत येत असे. प्रॉव्हिन्शियल सर्व्हिसमध्यें हिंदी इसम घेण्यांत येत असत. उदाहरणार्थ, पब्लिक वर्क्स खात्याच्या इंपीरियल शाखेंत रॉयल इंजिनीयर्स मधून अथवा इंग्लंडमध्यें ज्यांनीं इंजिनियरिंगचें शिक्षण घेतलें अशा इसमांमधून स्टेट सेक्रेटरी नोकर नेमीत असे. हिंदुस्थानांतील चार एंजिनियरिंग कॉलेजांमधून पास झालेल्या इसमांनां प्रॉव्हिन्शियल सर्व्हिसमधील जागा मिळूं शकत. तीच स्थिति थोड्या फार फरकानें तार खातें, शिक्षण खातें, पोलीसखातें यामध्यें असे.

१८८६ सालच्या एचिन्सन कमिशननें ज्या सुधारणा घडवून आणल्या त्यांनीं तात्पुरतें जरी लोकांचें समाधान झाल्यासारखें दिसलें तथापि, इंडियन सिव्हिलसर्व्हिसमध्यें हिंदी लोकांचें प्रमाण अत्यल्प राहिल्यामुळें त्याविरुद्ध हांकाटी सुरू झाली. १८९३ सालीं पार्लमेंटनें, इंडियन सिव्हिलसर्व्हिसची परिक्षा एकसमयावच्छेदेंकरून इंग्लंडमध्यें व हिंदुस्थानामध्यें घेण्यांत यावी असा कायदा

केला. पण हिंदुस्थानसरकारनें तो कायदा अंमलांत आणण्याच्या कामीं दुर्लक्ष केल्यामुळें तो कायदा निष्फळच ठरला. इंग्रजी शिक्षणाचा फैलाव वाढत्या प्रमाणांत होऊं लागल्यामुळें हिंदी लोकांनां हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत प्रत्यक्ष भाग घेतां यावा अशी आकांक्षा उत्पन्न झाली. तसेंच लॉर्ड मोर्ले साहेबानें इंडिया कौन्सिलमध्यें दोघां हिंदी इसमांची नेमणूक केल्यामुळें व प्रांतिक कार्यकारी मंडळांत एकएका हिंदी इसमाची नेमणूक करण्यांत येऊं लागल्यामुळें या आकांक्षेला उत्तेजन मिळालें. जर एवढ्या महत्त्वाच्या जागा हिंदी इसमांना मिळूं शकतात व त्या जागांची जबाबदारी हिंदी इसम योग्य तऱ्हेनें पार पाडूं शकतात तर इंडियन सिव्हिलसर्व्हिसमध्यें हिंदी लोकांनां अधिकाधिक जागा कां देण्यांत येऊं नयेत असें सुशिक्षित हिंदी लोक सरकारला रोखठोक विचारूं लागले. इंडियन सिव्हिल सर्व्हिसमध्यें हिंदी इसमांनां जागा दिल्या असतां ब्रिटिशांच्या हिंदुस्थानांतील वर्चस्वाला धोका येण्याची भीति आहे अशी जी लंगडी सबब पुढें करण्यांत येत असे तीहि, अर्धशतकांतील हिंदी लोकांच्या साम्राज्यसरकारशीं असलेल्या राजनिष्ठ वर्तनानें खोटी ठरली. अशी स्थिति सुमारें २५ वर्षें चालली. १९१० सालापर्यंत या सनदी नोकरीमध्यें हिंदी लोकांचें काय प्रमाण होतें हें पुढील कोष्टकांवरून कळून येईल.

**एक हजार रुपयांहून कमी पगार असणारे नोकर**

| वर्ष | यूरोपीयन | यूरेशियन | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|---|---|
| १८६७ | ४१२८ | २६२९ | ५०७८ | ९४८ |
| १८७७ | ४७०६ | ३४४३ | ७४३२ | ११७५ |
| १८८७ | ५१४७ | ४१६४ | ९७३३ | १३८८ |
| १८९७ | ५०१७ | ४९६५ | १२२४९ | १८३२ |
| १९०३ | ५२०५ | ५४२० | १४१३१ | २१५२ |

**एक हजार रुपये अगर त्याहून अधिक पगार असणारे नोकर**

| वर्ष | यूरोपीयन | युरेशियन | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|---|---|
| १८६७ | ६३२ | ४ | १२ | १ |
| १८७७ | ९९५ | ५ | १८ | १ |
| १८८७ | १००० | ० | २४ | ३ |
| १८९७ | १२२७ | ११ | ५६ | १३ |
| १९०३ | १२६३ | १५ | ७१ | २१ |
| १९१० | १७२१ | | १३४ | २७ |

तात्पर्य, दर एक हिंदी माणसास १० यूरोपीयन असें प्रमाण होतें. अर्थातच ही स्थिति अत्यंत असमाधानकारक होती; व लोकांची त्याविरुद्ध चळवळ सुरू झाल्यामुळें सरकारला या प्रश्नाचा विचार करण्याकरतां एक पब्लिक सर्व्हिस कमिशन नेमण्याची जरूर भासूं लागली.

इस्लिंग्टन कमिशन (१९१२):-इस्लिंग्टन कमिशनपुढें जे महत्त्वाचे प्रश्न होते ते म्हणजे (१) नोकरभरती व सनदी नोकरांच्या शिक्षणाची व उमेदवारांची पद्धति, (२) सनदी नोकरांची स्थिति, त्यांचा पगार, रजा, पेन्शन इत्यादि व (३) यूरोपीयनेतर इसमांनां सनदी नोकरींत शिरण्याला भासणाऱ्या अडचणी हे होत. हें कमिशन १९१२ सालीं बसलें. त्यांत तीन हिंदीं सभासदांची (ना. गोखले, सर एम्. चौबळ, व न्यायमूर्ती अबदुल रहीम) नेमणूक झाली होती. या कमीशननें इंग्लंड व हिंदुस्थान या दोन्ही देशांतील परिस्थितीची चौकशी केली, व आपला रिपोर्ट हिंदुस्थान सरकारला १९१४ सालीं सादर केला. तथापि त्याच वेळीं महायुद्ध सुरू झालें असल्यामुळें हा रिपोर्ट तसाच पडून राहिला व शेवटीं १९१७ च्या जानेवारींत तो प्रसिद्ध झाला.

वास्तविक इस्लिंग्टन कमिशननें ज्या फिकारशी केल्या त्या विचारांत घेण्याचेंहि कारण नाहीं. १९१७ सालीं ज्यावेळीं त्या प्रसिद्ध झाल्या त्यावेळीं त्या परागतिकारक स्वरूपाच्या आहेत अशी सर्व लोकांची समजूत झाली व ती अनाठायीं नव्हती. त्या शिफारशी ज्यावेळीं प्रसिद्ध करण्यांत आल्या त्यावेळीं हिंदी जनतेच्या आकांक्षांचा सूर इतका चढला होता कीं या शिफारशी म्हणजे हिंदी लोकांच्यातोंडावर टाकलेला शिळ्या, आंबुसलेल्या भाकरीचा तुकडा असेंच हिंदीं पुढाऱ्यांनां वाटलें. तथापि सनदी नोकऱ्यांच्या प्रश्नासंबंधीं विचार करतांना या कमिशनच्या शिफारशी विचारांत घेणें जरूरीचें आहे. कमिशननें पुढीलप्रमाणें शिफारशी केल्या. (१) सर्व नोकऱ्यांचे तीन वर्ग करण्यांत यावे. पहिल्या वर्गांत म्हणजे आय् सी. एस्. आणि पोलीस यांमधील जागांच्या बाबतींत यूरोपियन लोकांचें आधिक्य असणें अत्यंत आवश्यक आहे. दुसऱ्या वर्गामध्यें म्हणजे शिक्षण, लष्कर, जमाबंदी, वैद्यक, पब्लिक वर्क्स, तारखातें व रेल्वे इत्यादि खात्यांत हिंदी व यूरोपियन यांचें प्रमाण जवळजवळ सारखें असावें. तिसऱ्या वर्गांत म्हणजे शास्त्रीय व धंदेखात्यांत हिंदी लोकांसाठीं ठराविक

जागा राखून ठेवण्यांत याव्या. फक्त कस्टम खात्यांत कांहीं यूरोपियन लोकांची नेमणूक करण्यांत यावी. या वर्गीकरणाविरुद्ध मुख्य आक्षेप म्हणजे तिसऱ्या वर्गांत हिंदी लोकांच्यासाठीं फारच थोडया जागा राखून ठेवण्यांत आल्या आहेत. पहिल्या वर्गांत हिंदी लोकांनां अजीबाद स्थान नाहीं हें अत्यंत गैर आहे. (२) हिंदुस्थानांत व इंग्लंडमध्यें एकसमयावच्छेदेंकरून परीक्षा घेण्यांत येऊं नयेत. (३) परीक्षेला बसणाऱ्या उमेदवारांची वयोमर्यादा २२–२४ च्या ऐवजी १७–१९करण्यांत यावी. शेंकडा २९ जागा (१८९ जागा) हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांतील प्रॉव्हिन्शियल सर्व्हिस, वकील व प्रत्यक्ष निवडणुकीनें भराव्यात. प्रत्यक्ष निवडणूक म्हणजे ७ जागा लोकलगव्हर्नमेंटनें निवडलेल्या उमेदवारांपैकीं परीक्षेंत पास होणाऱ्यांनां व २ जागा बादशहांच्या कॅडेट मधून होणाऱ्यांनां द्याव्या. या तिसऱ्या कलमाविरुद्ध मुख्य आक्षेप म्हणजे वयोमान फार कमी ठेवण्यांत आलें हा होय.

इस्लिंग्टन कमिशनच्या शिफारशी १९१७ सालीं बाहेर पडण्यापूर्वींच महायुद्धानें हिंदुस्थानच्या परिस्थितींत फरक घडून आला होता व आय्. सी. एस्. परीक्षेला ज्यांनां बसतां आलें असतें अशांपैकीं बरेचसे उमेदवार लढाईवर गेले होते. त्यामुळें १९१५ च्या आक्टोबरमध्यें पार्लमेंटनें इंडियन सिव्हिल सर्व्हिससंबंधीं एक तात्पुरतें बिल पास केलें. त्या बिलान्वयें असें ठरविण्यांत आलें कीं, स्टेटसेक्रेटरींनें सिव्हिलसर्व्हिस कमिशनर्सच्या शिफारशीनें महायुद्धाच्या अमदानींत व तदुत्तर दोन वर्षेंपर्यंत इंडियन सर्व्हिलसर्व्हिसच्या नियमान्वयें लायक असलेल्या ब्रिटिश नागरिकांपैकीं ठराविक इसमांनां परीक्षा न घेतां नोकरीमध्यें घ्यावें, महायुद्धानंतर दोन वर्षें झाल्यानंतर या नोकरांपैकीं ½ नोकरांनांच इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधील जागेवर राहतां येईल. या बिलावर हिंदी लोकांनीं झणझणीत टीका केली. या बिलानें हिंदी लोकांची संख्या वाजवीपेक्षां फाजील मर्यादित करण्यांत आली होती. तथापि हें बिल तात्पुरतें असल्यामुळें या बिलासंबंधीं अधिक चर्चा झाली नाहीं. महायुद्धाच्या अमदानींत हिंदुस्थानमध्यें राजकीय चळवळ जास्त झाल्यामुळें पार्लमेंटला १९१७ त जाहीरनामा काढणें भाग पडले व मॉंटेग्यू–चेम्सफोर्ड रिपोर्टानें हिंदुस्थानच्या कारभारांत जबाबदारीच्या स्वराज्याचें तत्त्व लागू करण्यासाठीं हिंदी लोकांनां कारभारांत अधिक नोकऱ्या देणें जरूर आहे अशी शिफारस केली. सनदी नोकरवर्गाचें हिंदीकरण अधिकाधिक झालें पाहिजे असें सुधारणाकर्त्यांनीं आपलें मत स्पष्टपणें नमूद केलें. मॉंटेग्यू–चेम्सफोर्ड सुधारणांनीं व त्यानंतरच्या १९१९ च्या ॲक्टानें सनदी नोकरांच्या बाबतींत महत्त्वाचे फेरफार घडवून आणले असें म्हणण्यास हरकत नाहीं.

सुधारणानंतरः–१९१९ च्या ॲक्टान्वयें सनदी नोकरांसंबंधीं स्वतंत्र प्रकरण घालण्यांत आलें आहे. त्यांतील मुख्य कलमें खालीलप्रमाणें आहेत.

कलम ३६:–(१)हिंदुस्थानांतील दिवाणी नोकरींतील प्रत्येक इसमाची नोकरी बादशहाच्या मर्जीवर सर्वस्वी अवलंबून राहील व त्याला योग्य अधिकारी सांगतील ती नोकरी करावी लागेल परंतु त्याची नेमणूक करणाऱ्या अधिकाऱ्यांपेक्षां कमी दर्जाच्या अधिकाऱ्यास,त्याला नोकरीवरून काढून टाकण्याचा अधिकार नाहीं. एखाद्या गव्हर्नराच्या प्रांतांतील स्टेटसेक्रेटरी व त्याचें मंडळ यांनीं नेमलेल्या नोकरांची तक्रार आपल्या वरिष्ठाच्या हुकुमाविरुद्ध असेल व वरिष्ठानें त्या नोकराच्या अर्जाची दाद घेतली नाहीं असें त्याला आढळून येईल तर त्याच्या तक्रारीचा निकाल गव्हर्नरानें केला पाहिजे. (२) हिंदुस्थानांतील दिवाणी नोकऱ्यांचें वर्गीकरण, त्यांच्या भरतीची पद्धत,नोकरीच्या शर्ती, पगार,भत्ता, शिस्त व वर्तन या बाबतींत स्टेटसेक्रेटरीनें आपल्या मंडळाच्या अनुमतीनें नियम करावेत, वाटल्यास हा अधिकार प्रांतिक सरकारें अगर गव्हर्नर जनरल व त्यांचें मंडळ अगर प्रांतिक व मध्यवर्ती कायदेमंडळांनांहि देण्यांत यावा. या कायद्यापूर्वीं नेमलेल्या अधिकाऱ्यांच्या हितसंबंधास या कायद्यानें बाध येणार नाहीं व आल्यास त्याला नुकसानभरपाई दिली जाईल. सन १७८४ च्या ईस्ट इंडिया ॲन्युइटि फंड्स ॲक्टाप्रमाणें या नोकरांनां जें जें प्राप्त करून घेण्याचा हक्क आहे त्यास या कलमाचा बाध येणार नाहीं.

कलम३७:–मुख्य कायद्याच्या(१९१९च्या) ९७ व्या कलमांत कांहींहि लिहिलेलें असलें तरी स्टेटसेक्रेटरींनां अगर योग्य अधिकाऱ्यांनां हिंदी लोकांच्या नेमणुकींत इंडियन सिव्हिल सर्व्हिसमध्यें फरक करतां येईल.

कलम ३८:–पांचापेक्षां अधिक नाहींत अशा इसमांचें पब्लिक सर्व्हिस कमिशन हिंदुस्थानांत स्थापन करण्यांत येईल. त्याचा चेअरमन स्टेटसेक्रेटरीनें नेमलेला असेल. प्रत्येक सभासदाची मुदत पांच वर्षांची असेल. पब्लिक सर्व्हिसमधील भरती आणि तिजवरील ताबा याबाबत

स्टेटसेक्रेटरी व त्याचें मंडळ जे अधिकार देतील ते या कमिशनला बजावितां येतील.

मँटेग्यू–चेम्सफोर्ड सुधारणा मधील शिफारशी व १९१९च्या ॲक्टांतील दिवाणी नोकरासंबंधींचीं कलमें यामुळें इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधील नोकरांची थोडी फार चमत्कारिक स्थिति झाली यांत शंका नाहीं. १९१८ सालापर्यंत इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधील नोकरांच्या हातीं मोठी सत्ता असे. ते सांगतील तें धोरण अंमलांत येत असे. स्टेट सेक्रेटरीलाहि या नोकरांच्या चुटीविरुद्ध कांहींहि करतां येत नसे. पण सुधारणानंतर या बाबतींत त्यांचा अधिकार नष्ट झाला. जसजसें जबाबदारीचें स्वराज्य हिंदी लोकांनां अधिक मिळत जाईल, व कार्यकारीमंडळाला कायदेमंडळाच्या इच्छेप्रमाणें चालावें लागेल तसतसें या नोकरांच्या हातीं धोरण आंखण्याचें काम न रहातां फक्त सल्ला देणें अगर आपलें काम योग्य रीतीनें बजावणें व तें तसें बजावल्याची दिवाणांनां अगर कायदेमंडळांनां खात्री पटवून देणें एवढेंच काम त्यांचें राहील हें निःसशय आहे. १९१९ च्या ॲक्टानें प्रांतिक सरकारांत लोकांचा हात शिरला व लोकमताला जबाबदार अशा दिवाणांच्या हाताखालीं या सिव्हिल सर्व्हिसमधील नोकरांनां काम करण्याचा प्रसंग प्राप्त आला. लगेच त्यांनीं कोल्हेकुई करण्यास सुरवात केली. या नोकरांच्या गाऱ्हाण्यांकडे लक्ष्य देऊन त्यांच्यावरील दिवाणांची हुकमत कमी करणें म्हणजे एका हातानें दिवाणांनां दिलेला अधिकार दुसऱ्या हातानें काढून घेण्यासारखेंच होतें. तशा प्रकारची ढवळाढवळ करण्याचें पार्लमेंटनें नाकारलें. तथापि या नोकरांचे हितसंबंध रक्षण करण्याकरतां १९१९ च्या ॲक्टांत स्वतंत्र कलमें घालण्यांत आलीं. हीं कलमें वर देण्यांत आलीं आहेतच. या कलमांनीं जरी या नोकरींतील नोकरांनां ज्या जागेवर व ज्याच्या हाताखालीं नेमण्यांत आलें असेल तेथें राहिलेंच पाहिजे असें नमूद करण्यांत आलें असलें तरी त्यांच्या हितसंबंधांचें रक्षणहि या ॲक्टानें केलें आहे. सारांश, इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधील नोकरांची स्थिति अशी होती कीं, प्रांतांतील राखीव खात्यांतील नोकरावर गव्हर्नर इन कौन्सिलचा ताबा होता व सोंपीव खात्यांतील नोकरावर गव्हर्नर व दिवाणांचा ताबा होता. या नोकरांनां ॲक्टनें जें संरक्षण दिलें आहे त्याउप्परहि जर दिवाणांमध्यें व या सर्व्हिसमधील नोकरांमध्यें बेबनाव उत्पन्न झाला तर गव्हर्नरनें शक्य तितका तो मिटविण्याचा प्रयत्न करावा, त्या नोकरांना दुसरीकडे बदलावें, अगर शेवटीं त्याला नोकरींतून कमी करून त्यांनां योग्य तें पेन्शन देण्यांत यावें असें ठरविण्यांत आलें प्रॉव्हिन्शियल सर्व्हिसमध्यें व त्यांच्या दर्जामध्यें या ॲक्टानें फारसा फरक केला नाहीं. या सर्व्हिसमधील नेमणुका स्थानिक सरकारकडून व्हावयाच्या आहेत व त्यांच्यावर गव्हर्नर इन कौन्सिलचा ताबा रहावयाचा आहे.

मुडिमन साहेबाच्या अध्यक्षतेखालीं जी सुधारणाचौकशी कमिटी बसली होती तिनें, सुधारणाकायद्यानें व सिव्हिल सर्व्हिसमध्यें कोणते फेरफार झाले व तिचें कामकाज कसें चाललें आहे याबद्दलचा आपला रिपोर्ट प्रसिद्ध केला. या रिपोर्टाचे रिपोर्ट मेजॉरिटी व मायनॉरिटी रिपोर्ट दोन असे भाग आहेत. मेजारिटीच्या रिपोर्टनें नवीन राज्यकारभारांत सिव्हिल सर्व्हिसच्या नोकरांनीं दिवाणाशीं आस्थापूर्वक सहकारिता केली असें म्हटलें आहे तर मायनॉरिटीनें लिहिलेल्या रिपोर्टांत, पूर्वी सिव्हिल सर्व्हिसमधील नोकर जसे राज्यकारभारांत आस्थापूर्वक भाग घेत असत त्याप्रमाणें सुधारणाकायद्यानंतर ते घेईनासे झाले आहेत व त्यांनां आपल्या दर्जाविषयीं किंतु उपस्थित झाला आहे असें नमूद केलें आहे; व या आपल्या मताच्या सिद्ध्यर्थ यू. पी. व सी. पी. सरकारच्या खलित्यांतील उतारे दिले आहेत. याहि पुढें जाऊन या अल्पसंख्याकांनीं आपल्या रिपोर्टांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, सुधारणाकायद्याच्या हेतूशीं इंडियन सिव्हिल सर्व्हिस बाबतच्या ॲक्टांतील नियम विसंगत आहेत. त्यांच्या मतें या सर्व्हिसवर लोकमताला जबाबदार असलेल्या कायदेमंडळाचाच ताबा रहाणें इष्ट व आवश्यक आहे.

ली कमिशन:—नवीन कायद्यानें बदललेल्या परिस्थितीच्या प्रकाशांत इंडियन सिव्हिल सर्व्हिसच्या प्रश्नाचा विचार करण्याकरतां ली साहेबाच्या अध्यक्षतेखालीं कमिशन नेमण्यांत आलें. या कमिशनच्या नेमणुकीला लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें विरोध केला पण त्या विरोधाला न जुमानतां सरकारनें आपला हट्ट तडीस नेला. ली कमिशननें ज्या शिफारशी केल्या त्यांपैकीं बऱ्याचश्या सरकारनें अंमलांत आणल्या आहेत. कमिशननें ज्या शिफारशी केल्या त्या येणेंप्रमाणें:—प्रांतिक सरकारच्या राखीव खात्यांत काम करणाऱ्या ऑल इंडया सर्व्हिसमधील नोकरांवर सेक्रेटरी ऑफ स्टेटचा ताबा असावा व त्याच्यासंबंधींचे नियम त्यानें करावेत. या

नोकरांनीं प्रांतिक व मध्यवर्ती सरकारशीं स्वतंत्र करारनामे करून घ्यावेत. व यासंबंधींची तक्रार पब्लिक सर्व्हिस कमिशनकडे गुदरावी. सोंपीव खात्यांतील नोकरांनीं आपला ऑल इंडिया सर्व्हिसमधील दर्जा कायम ठेवावा अगर प्रांतिक सरकारशीं नवीन करार करावे अगर पेन्शन घेऊन मोकळें व्हावें. पब्लिक सर्व्हिस कमिशन विलंब न लावतां तावडतोब नेमण्यांत यावें. इंडियन सिव्हिल सर्व्हिसमध्यें यूरोपीयन व इंडियन नोकरांचें प्रमाण सारखें असावें. इंडियन पोलीस सर्व्हिसमध्यें हेंच प्रमाण असावें. त्यांपैकीं देखील शेंकडा ३० लोक प्रत्यक्ष भरतीनें व शेंकडा २० लोक प्रॉव्हिन्शियल सर्व्हिसमधून निवडण्यांत यावे. इंडियन फॉरेस्ट सर्व्हिसमध्यें शेंकडा ७५ हिंदी व २५ यूरोपीयन असें नोकरांचें प्रमाण असावें. सेंट्रल सर्व्हिसमध्यें हिंदी लोकांचें प्रावल्य असावें इत्यादि सूचना करण्यांत आल्या होत्या; त्यासंबंधीं कमिशनच्या शिफारशी अशा आहेत:—राजकीय खातें:—२५ टक्के हिंदी लोकांनां घेण्यांत यावें; व त्यांची निवड मुख्यत: इंडियन सिव्हिल सर्व्हिस, प्रॉव्हिन्शियल सिव्हिल सर्व्हिस व इंडियन आर्मी, यांमधून करण्यांत यावी. वरिष्ठ कस्टम खात्यांत पूर्वीप्रमाणेंच नेमणुका व्हाव्या. सुपीरियर टेलिग्राफ व वायरलेस खात्यांत ७५ हिंदी व २५ यूरोपीयन असें प्रमाण असावें. स्टेटरेल्वे इंजीनीयर व सुपीरियर रेव्हेन्यू एस्टाब्लिशमेंट इत्यादि खात्यांत वरीलप्रमाणेंच प्रमाण असावें. याशिवाय इंडिया सिव्हिल सर्व्हिसमधील नोकरांचा पगार, भत्ता, पेन्शन, प्रवासखर्च इत्यादि अनेक बाबतींत कमिशननें बरीच सढळ दृष्टी ठेवली आहे. हिंदी लोकांच्या मागण्यांपैकीं एकच मागणी या कमिशननें मान्य केली व ती म्हणजे सोंपीव खात्यांत यापुढें भरती करण्याचा व त्या नोकरांवर ताबा ठेवण्याचा हक्क दिवाणांनां दिला ही होय.

ली कमिशननें केलेल्या शिफारशी हिंदी लोकांनां मान्य होण्यासारख्या नव्हत्या यांत आश्चर्य नाहीं. विशेषत: पगारवाढ व पेन्शन इत्यादि संबंधानें कमिशननें ज्या शिफारशी केल्या आहेत त्यांच्यायोगानें हिंदुस्थानच्या तिजोरीवर सुमारें कोटी–दीड कोटीची जादा धाड येणार आहे. तथापि १९१९ च्या ॲक्टानें या नोकऱ्यांमध्यें हिंदी लोकांचें प्रमाण जास्त होत जावें असें जें तत्त्व प्रतिपादिलें आहे त्यामुळेंच थोडीफार समाधानाला जागा राहिली आहे. सिव्हिल सर्व्हिसच्या प्रश्नासंबंधीं हिंदी लोकांची पहिल्यापासूनच कुरकूर आहे. या नोकरांचा पगार इतर कोणत्याहि देशांतील नोकरांच्या पगाराहून अधिक असतो; आणि तो हिंदुस्थानच्या तिजोरीवर लादला जातो. यामुळें हिंदी लोकांनीं याविरुद्ध तक्रार केल्यास त्यांत मुळींच वावगें नाहीं. शिवाय या नोकरांनां आपल्या अधिकाराचा इतका मद चढलेला असतो कीं, त्यामुळें लोकमताला पायाखालीं तुडविण्यास यांनां बिलकूल पर्वा वाटत नाहीं. अलीकडे ही स्थिति थोडीफार पालटत चालली आहे. तथापि आतांपर्यंत ही सर्व्हिस म्हणजे बेपर्वा अधिकाऱ्यांचें रान होतें यांत शंका नाहीं. याचा परिणाम कै. गोखले यांनीं म्हटल्याप्रमाणें हिंदी लोकांच्या मनावर फार वाईट रीतीनें झाला आहे. यावर रामबाण उपाय म्हणजे या नोकरीमध्यें हिंदी लोकांचें जास्तींत जास्त प्रमाण करणें हा होय यांत शंका नाहीं.

राष्ट्राची जमा व खर्च:–हिंदुस्थानच्या जमाखर्चाच्या पद्धतीच्या इतिहासाचे स्थूलमानानें तीन भाग पडतात: (१) १८३३–१८७० पर्यंतची पद्धत, (२) १८७०–१९१९ पर्यंतची पद्धत व (३) सुधारणा कायद्यानंतरची पद्धत. १८३३ पूर्वीची जमाखर्चाची पद्धत अशी मुळींच नव्हती व त्यामुळें जमाखर्चाच्या बाबतींत कंपनीचा कारभार अत्यंत घोटाळ्याचा होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. कंपनीचें इंग्लंडमधील कोर्ट ऑफ प्रोपायटर्सचें मंडळ हें व्याजाकडे टक लावून बसलेलें असे. उत्पन्न वाढविणें व खर्च कमी करणें हें आद्य धोरण या मंडळाचें होतें. इकडे कंपनीनें तर वेलेस्ली, हेस्टिंग्ज इत्यादि गव्हर्नरजनरलाच्या अमदानींत मुलुखगिरीचा सपाटा चालविला होता व त्यामुळें कंपनीला युद्धाच्या पायीं अतोनात खर्च करावा लागत असे व तो भरून काढण्यासाठीं जितांकडून पैसे उकळणें व शेवटीं कर्ज काढणें या गोष्टी कंपनीच्या नेहमींच्याच होऊन बसल्या होत्या. वास्तविक कंपनीची दर वर्षी जमा फुगत होती पण खर्चाची रक्कम त्याच्या किती तरी अधिक पट फुगत होती. उदाहरणार्थ, कॉर्नवालीसच्या वेळीं कंपनीचें उत्पन्न ८० लक्ष पौंड होतें तर वेलेस्ली व हेस्टिंग्जच्या वेळीं अनुक्रमें १४० लक्ष व २१० लक्ष पौंड होतें. पण खर्चाचें प्रमाण वाढत्या प्रमाणावर होतें. १८३३ सालीं कंपनीला १७ दशलक्ष पौंड कर्ज होतें. १८३३–५३ सालांमध्यें हें कर्ज ४० दशलक्षांवर गेलें; व ५७ सालच्या बंडामुळें हें आणखी २ दशलक्ष वाढलें. अशी स्थिति चालू देणें मुळींच

इष्ट नव्हतें. यासाठीं १८५८ सालीं पार्लमेंटनें आपल्या ताब्यांत हिंदुस्थानचा राज्यकारभार घेतल्यावर, जमाखर्चाची स्थिति सुधारण्याकरतां १८६० सालीं विल्सन नांवाच्या इसमास हिंदुस्थानसरकारचा फडणीस म्हणून पाठविण्यांत आलें; व त्यानें या बाबतींत थोड्याफार सुधारणा केल्या.

१८३३–७० च्या अमदानींत हिंदुस्थानसरकारचा तात्त्विक दृष्ट्या हिंदुस्थानच्या सर्व जमाखर्चावर ताबा होता. हा ताबा १८३३ सालच्या अॅक्टानें देण्यांत आला होता व १८५४ व १८५८ सालच्या कायद्यानें तो दृढतर करण्यांत आला होता. प्रांताचें उत्पन्न जरी प्रांतिक सरकारांच्या खजिन्यांतच रहात असे तरी तें खर्च करण्याचा अधिकार हिंदुस्थानसरकारकडे होता व हिंदुस्थानसरकारच्या मर्जीप्रमाणें प्रांतिक सरकारला खर्च करावा लागे. पण ही परिस्थिति फार जाचक होत चालली. त्यावेळच्या परिस्थितीचें वर्णन रिचर्ड स्ट्रची यानें लिहून ठेवलें आहे. तो म्हणतो कीं, 'हिंदुस्थानांतील सार्वजनिक उत्पन्नाची प्रांतिक सरकारांमध्यें जी वाटणी होत असे ती म्हणजे एकप्रकारचा सावळागोंधळच असतो. जो प्रांत अधिक अधिक ओरडाओरड करील त्या प्रांताला अधिक पैसे मिळत. खरी गरज कोणाला अधिक आहे याची चौकशी देखील होत नसे'. अशी अंदाधुंदी असल्यामुळें सार्वजनिक उत्पन्नांच्या बाबी वाढविण्याची प्रवृत्तीहि नाहींशी होत चालली व त्याचे अनिष्ट परिणाम होऊं लागले.

मेयोच्या सुधारणा:–ही दु:स्थिति नाहींशी करून जमाखर्चाच्या पद्धतींत कांहीं व्यवस्थितपणा आणण्याचा उपक्रम प्रथमत: मेयोनें आपल्या कारकीर्दींत केला असें म्हणण्यास हरकत नाहीं.यानें प्रांतिक सरकारवर प्रांतिक जमाखर्चाची जबाबदारी सोंपविण्याच्या पद्धतीचा पाया घालण्याचा प्रयत्न केला. कांहीं ठराविक खात्यांची बडदास्त ठेवण्याकरतां, प्रांतिक सरकारांनां ठराविक रकमा देण्यांत येऊं लागल्या. या ठराविक खात्यांमध्यें पोलीस, तुरुंग, शिक्षण, वैद्यकीय, छपाई, रस्ते इत्यादि खातीं होती. या खात्यांनां प्रत्येकी किती रक्कम द्यावयाची ती ठरविण्याचा अधिकार प्रांतिक सरकारांनां मात्र देण्यांत आला. एवढेंच नव्हे तर जादा खर्च आल्यास तो भागविण्यासाठीं कांहीं स्थानिक कर बसविण्याची परवानगीहि त्यांनां देण्यांत आली.

लिटननें केलेल्या सुधारणा:–मेयोच्या पुढें जाऊन लिटननें या बाबतींत आणखी एक पाऊल पुढें टाकलें. त्यामुळें बरेच फेरफार घडून आले. प्रांतिक सनदी नोकऱ्यांसंबंधानें जो खर्च करावयाचा असतो त्यासंबंधींचा नियंत्रित अधिकार सरकारच्या हातीं देण्यांत आला व पूर्वी मेयोच्या अमदानींत ज्या कांहीं ठराविक रकमा खर्चासाठीं प्रांतिक सरकारांत देण्यांत येत त्यांऐवजीं त्यांच्या ताब्यांत उत्पन्नाच्या बाबीच अंशत: अगर पूर्णपणें देण्यांत येऊं लागल्या. स्थूलमानानें या वेळेपासून हिंदुस्थान सरकारचीं खातीं व प्रांतिक सरकारचीं खातीं असा भेद पडण्यास सुरवात झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. पूर्वींच्या खात्यांबरोबर, जंगल जकाती, स्टांप, रॅजिस्ट्रेशन, कायदे, न्याय, शिक्षण इत्यादि खातीं प्रांतिक सरकाराकडे सोंपविण्यांत आलीं. याशिवाय जादा जमीनमहसुलापैकीं कांहीं अंश हिंदुस्थानसरकारकडून यांनां देण्यांत येई.अशा रीतीनें ही जी वांटणी करण्यांत आली ती पांच वर्षेपर्यंत करण्यांत आली. १८८२ सालीं, रिपननें या बाबतींत अधिक सुधारणा घडवून आणली.पूर्वी हिंदुस्थानसरकार प्रांतिक सरकारला जी ठराविक रक्कम देत असे त्याच्या बदली हिंदी मुलकी खात्यांचें सर्व उत्पन्न प्रांतिक सरकारला देण्याचें त्यानें ठरविलें. अशा रीतीनें दर पांच वर्षांनीं थोडे फार फरक होत जाऊं लागले व त्यामुळें प्रांतिक सरकारांनां आर्थिक बाबतींत अधिकाधिक स्वातंत्र्य मिळूं लागलें. १९०४ सालीं लॉर्ड कर्झननें या बाबतींत नवीनच उपक्रम केला. इतके दिवसपर्यंत जी अनिश्चित वांटणी होई व जिच्यामध्यें पांच वर्षांनीं थोडे फार फेरफार होत असत तशी ती वांटणी अनिश्चित स्थितींत न ठेवतां कर्झननें तिला अर्धवट कायमचें वांटणीचें स्वरूप दिलें. फक्त त्यांत एकच अट त्यानें घातली, ती ही कीं, जर आणीबाणीच्या प्रसंगीं, अगर प्रांतांनां दिलेली रक्कम अयोग्य आहे असें दिसून आलें तर, मध्यवर्ती, सरकारला त्यामध्यें हात घालण्याची परवानगी होती. तथापि ही अट असली तरी कर्झननें या बाबतींत जी सुधारणा घडवून आणिली ती इष्टच होती. कारण त्यामुळें दर पांच वर्षांनीं वांटणी होण्याच्या वेळीं मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकार यांच्यामध्यें जी कुरबुर होई ती यामुळें नाहींशी झाली व आपल्या स्वत:च्या उत्पन्नाची योग्य तऱ्हेनें विल्हेवाट लावण्याची सत्ता प्रांतिक सरकारांनां मिळाली. १९०८ सालच्या अधिकारविभागणी कमिशननें या बाबतींत कांहींच महत्त्वाचे फेरफार सुचविले नाहींत. तथापि १९१२ सालीं हार्डिंजनें या बाबतींत आणखी थोडी प्रगति केली.ती म्हणजे

त्यानें अर्ध--कायम वांटणीला कायमच्या वाटणीचें स्वरूप दिलें, प्रांतांच्या वाढत्या उत्पन्नाबरोबर त्यांनां वाढती वांटणी देऊन त्यांत सुधारणा घडवून आणली व त्याच्याहि पुढें जाऊन प्रांतिक सरकारच्या अंदाजपत्रकामध्यें ढवळाढवळ करण्याचें कमी करण्याचें ठरविलें. प्रांतिक सरकार आपल्या उत्पन्नांतून जी शिल्लक ठेवीत असे ती पूर्वी वेळ पडल्यास हिंदुस्थानसरकार स्वाहा करण्यास मागें पुढें पहात नसे पण याउप्पर तसें न करूं देण्याचें व उलट हिंदुस्थान सरकारच्याच शिलकेंतून प्रांतांनां कांहीं ठराविक वांटा देण्याचें हार्डिंजनें ठरविलें. या नवीन सुधारणांनीं जमाखर्चाच्या खात्याचे वरिष्ठ, प्रांतिक, व समाइक असे तीन भेद पाडण्यांत आले. अफू, मीठ, जकात, टांकसाळ, रेल्वे, पोस्ट, तारा लष्कर, खंडणी इत्यादि बाबींचें उत्पन्न हिंदुस्थान सरकारला मिळूं लागलें व त्यांचा खर्च व त्यांच्या जोडीला स्टेटसेक्रेटरीच्या ऑफीसचा खर्च व कर्जावरील व्याज यांची जबाबदारी हिंदुस्थान सरकारवर पडली,प्रांतिक सरकारच्या ताब्यां - तील जमीनमहसूल, अबकारी, दस्तऐवज नोंदणी हीं खातीं समाईक करण्यांत येऊं लागलीं, व जंगल, पोलीस, शिक्षण, वैद्यक, कोर्ट, तुरुंग हीं सर्वस्वी प्रांतिक खातीं बनलीं.

अशा रीतीनें सुधारणापूर्वीचा जमाखर्चपद्धतीचा इतिहास होता. जरी प्रांतिक सरकारांनां बऱ्याच बाबतींत आर्थिक स्वातंत्र्य देण्यांत आलें होतें तरी हिंदुस्थानसरकारचा प्रांतिक सरकारावर प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें आर्थिक बाबतींत बराच ताबा होता. पण सुधारणा ॲक्टानें जी महत्त्वाची कामागिरी केली ती म्हणजे ही खातेवांटणीची पद्धत बंद करून प्रांतिक सरकारांनां आपापल्या प्रांतांच्या उत्पन्नाच्या व खर्चाच्या बाबतींत बरेंच आर्थिक स्वातंत्र्य दिलें. त्यामुळें जमीनमहसूल, पाटबंधारे, अबकारी हीं खातीं पूर्णपणें प्रांतिक सरकारच्या ताब्यांत आलीं. स्टँपाचें खातेंहि प्रांतिक सरकारकडेच सोंपविण्यांत आलें. याशिवाय पूर्वी जीं खातीं प्रांतिक सरकारकडे सोंपविण्यांत आलीं होतीं तीं त्यांच्याकडेच राहिलीं. वरिष्ठ अगर मध्यवर्ती सरकारकडे संस्थानिकांकडून मिळणारी खंडणी, जकात, प्राप्तीवरील कर, अफू, मीठ, रेल्वे, इत्यादि खातीं राहिलीं. ही खातेविभागणी करण्याचें काम तत्प्रीत्यर्थ नेमण्यांत आलेल्या मेस्टन कमीटीनें केलें. या खातेविभागणीमुळे हिंदुस्थानसरकारचें उत्पन्न कमी होईल या भीतीनें या कमीटीनें असें ठरविलें कीं, प्रांतिक सरकारनें हिंदुस्थान सरकारला दर वर्षी ठराविक खंडणी द्यावी व ती प्रत्येक प्रांतानें किती द्यावयाची याचें प्रमाणहि या कमीटीनें निश्चित केलें. त्याची माहिती मागें देण्यांत आली आहेच. तात्पर्य, नवीन ॲक्टानें जमाखर्चाच्या बाबतींत जे फेरफार घडवून आणले ते येणेंप्रमाणें:--(१) पूर्वीची समाईक पद्धति नष्ट करण्यांत येऊन जमाखर्चाच्या खात्यांचे मध्यवर्ती व प्रांतिक असे दोनच भाग पाडण्यांत आले. (२) प्रांतिक सरकारांनां पूर्वी कर्ज उभारण्याची बंदी असे पण या नवीन ॲक्टानें कर्ज उभारण्याचा प्रांतिक सरकारांनां अधिकार मिळाला आहे. तथापि हें कर्ज लोकोपयोगी कृत्याकडेच खर्च करण्यांत यावें असें ठरविण्यांत आलें आहे. (३) प्रांतिक सरकार जी सालोसाल बचत करीत असे ती हिंदुस्थानसरकार सुधारणा ॲक्टापर्यंत बेधडक काढून घेऊन वापरूं शकत असे पण पुढें ही पद्धति बंद करण्यांत येऊन प्रांतिक सरकारांनां आपली शिल्लक वाटेल तशी वापरण्याची परवानगी मिळाली आहे. (४) दुष्काळनिवारणखातें प्रांतिक सरकारकडे या नवीन ॲक्टानें सोंपविण्यांत आलें आहे व त्यानिमित्त प्रांतिक सरकारला ठराविक रक्कम दर वर्षी अलाहिदा काढून ठेवावी लागते. (५) नोंदणी, चैनीचे पदार्थ व करमणुकीचीं साधनें यांच्यावर कर बसविण्याचा प्रांतिक सरकारांनां अधिकार देण्यांत आला आहे.

१९२२ च्या अंदाजी बजेटांत ९ कोटी रुपयांची जी तूट येईल असा अजमास होता त्याऐवजीं सुमारें १७ कोटींची तूट आली. तेव्हां खर्चाच्या खात्यांत काटकसर कशी करतां येईल हें ठरविण्याच्या उद्देशानें इंचकेप कमिटी बसविण्यांत आली. इंचकेप कमिटीनें असें ठरविलें कीं हिंदुस्थानच्या संरक्षणासाठीं म्हणून जो खर्च लष्करावर हिंदुस्थानसरकार करतें तो वाजवीपेक्षां फार फाजील असून त्यांत बरीच काटकसर होणें अत्यंत आवश्यक आहे. खर्चातून एकंदर १९½ कोटी रुपयांची बचत करण्याची कमिटीनें सूचना केली होती. लष्कर १०.५ कोट, रेलवे ४.५ कोट, पोष्ट--तार खातें. १. कोट व सामान्य कारभार ०.५ कोट अशी वरील प्रत्येक खात्यांत काटकसर सुचविली होती. तेव्हां १९२३-२३ सालापासून जमेंत बचत होऊं लागली. ती १९२४-२५ सालीं ४ कोटीपर्यंत गेली होती.

## वरिष्ठ सरकारचा जमाखर्च

( १९२४-२५ )

( आंकडे हजारांचे आहेत )

### जमा

| | |
|---|---|
| जकात | ४४७६४४ |
| प्राप्तीवरील कर | १६४७२६ |
| मीठ | ७७३७८ |
| अफू | ३६८३० |
| इतर करांचें उत्पन्न | २०८२१ |
| रेल्वे नक्त उत्पन्न | ३४१९३७ |
| पाटबंधारे | ८९१ |
| पोस्ट व तारा | ९११४ |
| व्याज बाब | ३७९९९ |
| मुलकी खातीं | ७०७० |
| चलन, टांकसाळ इत्यादि | ३९४९३ |
| सार्वजनिक कामें | १२१२ |
| किरकोळ | ३३९० |
| लष्करी मिळकत | ४१६९६ |
| प्रांतिक खंडणी | ९२९१६ |
| जादा जमा | २९९८ |
| एकूण जमा | १३४८२२६ |

### खर्च

| | |
|---|---|
| वसुलाचा खर्च | ९४९६२ |
| जंगल व इतर | २१११ |
| रेल्वेच्या कर्जावरील व्याज | २८९९०२ |
| पाटबंधारे | २१९४ |
| पोस्ट व ताराखातें | --६२ |
| कर्जाबाबत | १७९२०४ |
| मुलकी कारभार | १०२६८७ |
| चलन, टांकसाळ हुंडणावळ | ७३२० |
| इमारती, रस्ते इत्यादि | १९३२७ |
| लष्करी खर्च | ६०४९९६ |
| किरकोळ | ४४७९९ |
| वरिष्ठ व प्रांतिक सरकार यांमधील करारान्वयें खर्च | ९६३२ |
| एकूण खर्च | १३०८२६८ |
| शिल्लक | ३९९५८ |

## प्रांतिक ( मुंबई ) जमाखर्च (१९२४-२५)

( आंकडे हजारांचे आहेत )

| खातीं | जमा | खर्च |
|---|---|---|
| जमीनमहसूल | ५१६१३ | ६२२२ |
| अबकारी | ४४२९८ | ४०३९ |
| स्टँप | १७८०६ | २८२ |
| जंगल | ७३०८ | ४३८२ |
| नोंदणी | १२४९ | ६९७ |
| यादींत नमूद केलेले कर | ९०३ | १८ |
| पाटबंधारे | ५३२८ | ९०७९ |
| व्याज | १३२६७ | १९०४० |
| सिंकिंगफंड | .... | ११९२ |
| न्यायखातें | १५१४ | ७२८१ |
| तुरुंग वगैरे | ४५९ | २६१२ |
| पोलीस | ५०० | १७१२१ |
| शिक्षण | ११२१ | १८५६९ |
| वैद्यक | ६२५ | ४५४० |
| सार्वजनिक आरोग्य | ५६५ | २२९० |
| शेतकी | ३३७ | २६९० |
| उद्योगधंदे | ४ | १९ |
| किरकोळ खातीं | २१२ | ५२० |
| मुलकी कामें | १५४२ | ९४९२ |
| भत्ता, पेन्शन | १८०४ | ५५६२ |
| स्टेशनरी, छपाई | २४४ | १२५८ |
| किरकोळ | ७२६ | २२७१ |
| सामान्य कारभार | .... | २२३५३ |
| बंदर व वाहतुकी | .... | २० |
| शास्त्रखातीं | .... | ६५ |
| दुष्काळ व विमा | .... | ५७७२ |
| एकूण | १५१४२५ | १४७३८६ |

वरील मुंबई प्रांताच्या जमाखर्चाच्या तक्त्याकडे पाहिल्यास आपल्याला असें आढळून येतें कीं, प्रांताच्या कांहीं खात्यांच्या खर्चामध्यें काटकसर करणें अशक्य आहे. तेव्हां जमाखर्चाची तोंडमिळवणी करावयाची व त्याशिवाय शेतकी, शिक्षण इत्यादि खात्यांमध्यें सुधारणा करावयाची म्हटल्यास जादा कर बसविणें, प्रांतिक खंडणी देण्याचें रद्द करणें अगर इतर कांहीं खात्यांत कांहींहि करून काटकसर करणें याशिवाय गत्यंतर नाहीं. तेव्हां मेस्टन कमिटीनें ही जी नवीन सुधारणा घडवून

आणली ती अत्यंत अन्याय्य होय असें म्हणावयास हरकत नाहीं.

ब्रह्मदेशः--मांटेग्यू--चेम्सफोर्ड द्वयानें आपल्या दृष्टीमधून ब्रह्मदेश वगळला होता, कारण त्यांच्यामतें ब्रह्मदेश हा हिंदुस्थानचा घटक नव्हता; व खुद्द ब्रह्मी लोक व त्यांचें सरकार यांच्याकडून या दिशेनें प्रयत्न झाल्याशिवाय त्यांच्या राज्यकारभाराच्या बाबतींत सुधारणा सुचविण्याचें कांहीं कारण नव्हतें. तथापि मांटेग्यू चेम्सफोर्ड सुधारणांचा अहवाल प्रसिद्ध होतांच लगेच ब्रह्मदेशच्या सरकारनें आपल्या राज्यकारभारांत कोणत्या सुधारणा होणें इष्ट आहे या बाबतींत कच्चा खर्डा तयार करून तो जनतेपुढें विचाराकरतां ठेवला. तत्पूर्वीच सरकारनें १९१९ सालीं हिंदुस्थानसरकारला एक खलिता सादर करून मांटेग्यूचेम्सफोर्डनें शिफारस केलेल्या सुधारणा ब्रह्मदेशला लागू करण्यांत येऊं नयेत असें त्यांत प्रतिपादन केलें. ब्रह्मदेश सरकारचें म्हणणें असें होतें कीं, अद्यापि ब्रह्मी लोक हे राज्यकारभारांत जबाबदारी घेण्यास योग्य नाहींत व त्यामुळें जर सुधारणाकायदा ब्रह्मदेशाला लागू करण्यांत येईल तर त्यायोगें राज्यकारभारांत घोंटाळा उडण्याचा संभव अधिक. तेव्हां इतका मोठा हप्ता देण्याऐवजीं तत्पूर्वीचा एक छोटासा हप्ता ब्रह्मदेशाला देऊं करावा. त्यासंबंधीं त्या सरकारनें आपली योजनाहि पुढें मांडली; ती अशी:--हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांमध्यें ज्याप्रमाणें द्विदलराज्यपद्धति अस्तित्वांत यावयाची होती त्याप्रमाणें ब्रह्मदेशाच्या बाबतींत अस्तित्वांत न आणतां, ब्रह्मदेशांतील प्रांतांच्या सरकारला मदतनीस म्हणून एकेक मंडळ देण्यांत यावें. या बोर्डाचा अध्यक्ष बिनसरकारी अधिकारी असून तो गव्हर्नरनें नेमावा व त्याचप्रमाणें त्याच्या मदतीला एकदोन अधिकारी देण्यांत यावे. या मंडळाकडे प्रांताच्या राज्यकारभाराचीं कामें देण्यांत यावी व मंडळाच्या सभासदांमध्यें एखाद्या प्रश्नावर मतभेद झाला तर त्या प्रश्नावर गव्हर्नरनें निर्णय द्यावा. हें मंडळ कायदेमंडळाला जबाबदार असूं नये. सोंपीव व राखीव असे खात्यांचे भेद पाडण्यांत येऊं नयेत; व कायदेमंडळाला अंदाजपत्रकावर शिफारसवजा ठराव आणण्याची तेवढी परवानगी देण्यांत यावी, मंजुरी--नामंजुरीचे अधिकार त्यांना नसावेत.

हिंदुस्थानसरकारनें एकच फेरफार करून ही ब्रह्मदेशसरकारची योजना भारतमंत्र्याकडे रवाना केली. तो फेरफार म्हणजे, गव्हर्नराच्या मदतीस मंडळ देण्याऐवजीं तीन सरकारी अधिकारी व तीन बिनसरकारी अधिकारी असें सहा लोकांचें अधिकारीमंडळ देण्यांत यावें हा होय.

इकडे अशा रीतीनें सरकारी तऱ्हेनें या प्रश्नासंबंधीं विचार चालला असतां, ब्रह्मी लोकांनीं हिंदुस्थानांतील लोकांप्रमाणेंच आपल्यालाहि राज्यकाभारांत हक्क न देणें म्हणजे ब्रह्मी लोकांनां खालच्या दर्जाचे मानण्यासारखें आहे असें मत प्रतिपादन करण्यास व हक्कप्राप्तीची चळवळ करण्यास सुरवात केली होती. त्यामुळें भारतमंत्र्यानें हिंदुस्थानसरकारच्या खलित्याला संमति न देतां सुधारणाअॅक्ट ब्रह्मदेशाला लागू करण्याचें ठरविलें. हिंदुस्थान सरकारनें आपलें प्रतिकूल मत पुन्हां भारतमंत्र्याला कळविलें. पुढें १९२१ च्या मार्च महिन्यांत ब्रह्मदेशाला १९१९ चा सुधारणाअॅक्ट लागू करण्यांत यावा अशा अर्थाचें एक बिल भारतमंत्र्यानें पार्लमेंटमध्यें आणिलें. पण त्याच्या दुसऱ्या वाचनाच्या वेळीं तें बिल पूर्ण विचाराकरतां पुढें ढकलण्यांत आलें; पण तेवढ्या अवधींत भारतमंत्र्यानें त्या बिलाचा विचार करण्याकरतां हिंदुस्थानच्या कामकाजाचा विचार करणाऱ्या स्टँडिंग कमिटीकडे तें बिल सोंपविलें. स्टँडिंग कमिटीनें हिंदुस्थान सरकार व भारतमंत्री यांच्या सूचनांमधून तिसरीच तोड काढण्याचा प्रयत्न केला. पण या अवधींत ब्रह्मी लोकांनीं आपली चळवळ इतकी नेटानें चालविली होती कीं त्यामुळें नवीन सुधारणाअॅक्ट लागू न करण्याचा ब्रह्मदेश सरकार व हिंदुस्थान सरकारचा निश्चय बदलला व स्टँडिंग कमिटीच्या सूचनांचा विचार न होतां १९१९ चा अॅक्ट ब्रह्मदेशाला लागू केल्याचें पार्लमेंटनें जाहीर केलें.

## हिंदुस्थानचें सैन्य.

इ ति हा स.--हें सैन्य, जे लोक सैन्यामध्यें स्वखुषीनें नोकरी पत्करतात अशा इसमांचें बनलेलें आहे (लष्करी शिक्षण किंवा नोकरी सक्तीची नाहीं). तें पुढील पलटणींचें मिळून झालेलें आहे (अ) रेग्युलर ब्रिटिश फोर्सेस; (आ) रेग्युलर इंडियन फोर्सेस; (इ) ऑक्झिलियरी फोर्सेस; (ई) इंडियन टेरिटोरियल फोर्स (आय्. टी. एफ.); (उ) इंडियन आर्मी रिझर्व्ह; (ऊ) इंडियन स्टेट फोर्सेस. हीं नांवें अगदीं अलीकडे देण्यांत आलीं असून ऑक्झिलियरी फोर्स व इंडियन टेरिटोरिअल फोर्स यांनां आरंभ १९२० सालीं झाला. इंडियन आर्मी रिझर्व्ह हा प्रकार १८८७ पर्यंत नव्हता. या एकंदर सैन्याच्या वाढीच्या

इतिहासाचे कालविभाग येणेंप्रमाणें–(१) १६०० ते १७०८:–ईस्टइंडिया कंपनीचे निरनिराळ्या ठाण्यांमध्यें असलेले पृथक् पृथक् लष्करी लोक. (२) १७०९–ते १८५७:–कंपनीसरकारच्या सत्तेखालीं प्रत्येक प्रांतांत असलेल्या प्रेसिडेन्सी आर्मीज. (३) १८५८ ते १८९४:–ब्रिटिशसरकारच्या प्रेसिडेन्सी आर्मीज. (४) १८९५–१९२० प्रेसिडेन्सी आर्मीजची पद्धति रद्द करून केलेलें एकत्रीकरण आणि (५) १९२१:–दृढीकरण.

१६०० ते १७०८:—आजच्या हिंदुस्थानच्या सैन्याचा मूळ आरंभ ईस्ट इंडिया कंपनीच्या वखारींच्या संरक्षणार्थ ठेवलेल्या रखवालदार (गार्ड) व पट्टेवाले (प्यून) यांच्यापासून झाला. १६०० मध्यें स्थापन झालेल्या 'ईस्ट इंडीजबरोबर व्यापार करणाऱ्या लंडनच्या व्यापाऱ्यांच्या कंपनी'नें १६१२ सालीं मोंगल बादशहाचें फर्मान मिळवून प्रथम सुरतेस वखार स्थापली. नंतर १६२९ मध्यें मच्छलीपट्टण येथें व नंतर आर्मगांव येथें आणि १६३४ मध्यें बंगाल्यांतील पिपली येथें व १६४० त मद्रासेस वखारी स्थापल्या. या वखारींच्या संरक्षणार्थ ठेवलेले रखवालदार यूरोपियन व पट्टेवाले हिंदी असत. हे सैनिक नसून केवळ चौकीदार शिपाई होते, व त्यांचें काम वखारींचें व त्यांतील मालाचें संरक्षण करणें हें होतें. खऱ्या अर्थानें ज्याला सैन्य म्हणतां येईल त्याचा आरंभ मुंबईस झाला. मुंबई बेट १६६८ मध्यें १० पौंड वार्षिक भाडयानें कंपनीला इंग्लंडच्या दुसऱ्या चार्लस राजानें दिलें. त्याबरोबर मुंबईच्या संरक्षणार्थ तेथें असलेलें सैन्य राजाच्या नोकरीऐवजीं कंपनीच्या नोकरींत शिरलें. ह्या मुंबईच्या शिबंदींत दोन तोफा डागणारे व २१ तोफा, पांच लष्करी अधिकारी, १३९ नॉन–कमिशन्ड अधिकारी व सैनिक आणि ५४ टोपसे होते. टोपसेखेरींज बाकी सर्व यूरोपियन होते (टोपसे म्हणजे पोर्तुगीजांपासून झालेली मिश्र जात). हिंदुस्थानच्या सैन्याचा मुंबईची उपरिनिर्दिष्ट शिबंदी हा मूळ आरंभ होय; कारण त्यावेळीं मद्रास व बंगाल येथें सैनिक मुळींच नव्हते म्हटलें तरी चालेल. बंगाल्यांत फक्त ३० यूरोपियन शिपाई होते.

वरील सैन्यांत १६८३ सालीं रजपुतांच्या २ कंपन्या नोकरीला ठेवून भर घालण्यांत आली. ही प्रत्येक कंपनी १०० शिपायांची असून तिच्यावरील अधिकारी रजपूतच होते. हा इंडियन आर्मीचा आरंभ होय. पण पुढें १७ व्या शतकाच्या अखेरीस काटकसर करण्याचें ठरून कंपनीनें कांहीं सैनिक, कांहींचा भत्ता व कांहीं अधिकाऱ्याच्या जागा कमी केल्या. १६९८ मध्यें व्यापार करणारी एक नवी प्रतिस्पर्धी 'इंग्लिश कंपनी' निघाली. या दोन कंपन्यांची स्पर्धा फार वाढून अखेर दोन्ही मिळून एक कंपनी १७०८ मध्यें 'ईस्ट इंडीजबरोबर व्यापार करणारी इंग्लंडच्या व्यापाऱ्यांची 'युनैटेड कंपनी' या नांवानें कायम झाली. या कंपनीनें मुंबई मद्रास, व कलकत्ता येथें त्या त्या भागांतील वखारींवर मुख्य अधिकारी (प्रेसिडेंट) नेमला व याप्रमाणें तीन प्रेसिडेन्सी स्थापिल्या व प्रत्येक प्रेसिडेन्सीमधील सैन्याचा मुख्य अधिकारी (कमांडर–इन–चीफ) प्रेसिडेंट यासच केलें. याप्रमाणें तीन इलाख्यांतील फौजा एकत्र होऊन 'प्रेसिडेन्सी आर्मीज' या पद्धतीचा पाया घातला गेला. या सैन्यांत कांहीं खुद्द इंग्लंडांतून आलेले यूरोपियन, कांहीं गोंव्याकडील टोपसे व कांहीं हिंदी इसम असत.

१७०९ ते १८५७:--आरंभीं या तीन प्रेसिडेन्सी आर्मी मिळून सुद्धां एकंदर सैनिकांची संख्या थोडीच असे, त्यामुळें कंपनीला देश्य राजांच्या राजकीय भांडणांत भाग घेणें शक्य नव्हतें. मुंबई येथील फौजेची वाढ मात्र हळू हळू होत होती. १७४१ मध्यें मुंबईचें सैन्य २६ ब्रिटिश अधिकारी, १६६ नेटिव्ह अधिकारी १२७६ सैनिक व २७ इतर इतकें असून शिवाय ७०० मुलकी शिपाई (प्यून किंवा चपरासी) होते. १७४४ मध्यें यूरोपांत फ्रान्स व इंग्लंड यांमध्यें युद्ध सुरू होतांच हिंदुस्थानांत या दोघांनीं सैन्य वाढविण्यास सुरवात केली. १७४६ मध्यें फ्रेंचांनीं मद्रास इंग्रजांपासून जिंकून घेतलें. १७४८ मध्यें कंपनीच्या डायरेक्टरांच्या बोर्डानें यूरोपीय पद्धतीवर तोफखान्याची रचना करण्याचें ठरविलें. तत्पूर्वी आर्मगांवास १२, मुंबईस २१ आणि फोर्ट सेंट जॉर्ज व फोर्ट वुइल्यम येथें थोडया तोफा होत्या. तोफा डागण्याचें काम पायदळांतील सैनिक व जहाजांवरील लढाऊ लोकच करीत असत. ही गैरव्यवस्था नाहींशीं करून प्रत्येक प्रेसिडेन्सींत एकेक तोफखान्याची कंपनी व तींत पुढील इसम नेमले.

ब्रिटिश ऑफिसर:–१ सेकंड कॅप्टन; १ कॅप्टन लेफ्टनंट; १ फर्स्ट लेफ्टनंट; १ फायरवर्कर; १ सेकंड फायरवर्कर. ब्रिटिश रँक अँड फाईल:–४ सार्जंट बंबार्डिअर; ४ कार्पोरल बंबार्डिअर; १ ड्रुमर; १०० गनर.

या तिन्ही आर्टिलरी कंपन्यांवर मिळून कॅप्टन व इंजिनिअर हीं दोन्ही कामें करणारा एक मुख्य अधिकारी

नेमण्यांत आला. शिवाय तिन्ही रेसिडेन्सी आर्मीवर मिळून हुकमत चालविणारा कमांडर–इन–चीफ हा अधिकारी नवीन नेमण्यांत आला. याचें नांव मेजर स्ट्रिंजर लॉरेन्स असें होतें. यानें कंपनीच्या सैन्याची लष्करीदृष्ट्या चांगली व्यवस्था केली. सीनिऑरिटीच्या नियमाप्रमाणें सैन्यास बढती देण्याचा सक्त नियम ठरला. सैन्यांत युरोपियन व इंडियन अशा पृथक् कंपन्या असत. मुंबईच्या सैन्यांत मात्र 'बॅटेलियन पद्धति' स्वीकारली होती. इंडियन कंपनींत अधिकारी उच्च कुळांतले व दर्जाचे हिंदी इसमच नेमले जात शिवाय इंग्लंडमधून रॉयल रेजिमेंटें इकडे पाठविण्यांत येत. अशांपैकीं ३९ वी फूट रेजिमेंट १७५४ मध्यें हिंदुस्थानांत आली. तेव्हांपासून पुढें १०० वर्षे राजाचें सैन्य, कंपनीचें युरोपियन सैन्य आणि कंपनीचें इंडियन सैन्य असे तीन प्रकार होते. १७४८मध्यें युद्ध थांबल्यावर इंग्रज व फ्रेंच या दोघांनीं आपापलें सैन्य वाढविण्यास सुरवात केली. इंग्लंडमधील व फ्रान्समधील सर्व सैन्य यूरोपांतच ठेवणें जरूर असल्यामुळें हिंदुस्थानांत हिंदी इसमांची फलटणें वाढविण्याचा दोघांनीं उपक्रम केला. १७५४ मध्यें फ्रेंचांबरोबर पुन्हां युद्ध सुरू झालें. त्यांत लॉरेन्स, क्लाईव्ह व आयरकूट यांच्या पराक्रमामुळें फ्रेंचांचा पूर्ण मोड झाला. यावेळीं मद्रासच्या सैन्याच्या मदतीला मुंबईहून ७५० सैन्य पाठविलें गेलें. याप्रमाणें तीन प्रेसिडेन्सी सैन्यांनीं एकमेकांस मदत करण्याचा क्रम सुरू केला. टोपसे लोक यापुढें सैन्यांत घेण्याचें बंद झालें त्याचें कारण मागील १०० वर्षांच्या अनुभवानें ते लोक कमकुवत असल्याचें सिद्ध झालें होतें.

प्लासीच्या लढाईच्या पूर्वी क्लाईव्हनें हिंदी शिपायांची बॅटेलियन ब्रिटिश आफिसरांच्या हुकमतीखालीं तयार केली. शिपायांनां हत्यारें व पोषाख कांहींसा युरोपियन शिपायांच्या पद्धतीचा देण्यांत आला. तिला 'लाल पलटन' असें नांव दिलें. तींत १ कॅप्टन, २ सबअल्टर्न, १ सार्जंट मेजर, कांहीं सार्जंट, १ कमांडंट, १ अॅडज्यूटंट. १० सुभेदार, ३० जमादार, ९० हवलदार, ४० नाईक, २० ड्रमर (ड्रमपडघम वाजविणारे), १० ब्यूगलर (बिगुल, तुतारी वाजविणारे) व ७०० शिपाई होते. या बॅटेलियनमध्यें १० कंपन्या होत्या आणि ३ ब्रिटिश ऑफिसर, कांहीं ब्रिटिश नॉन–कमिशन्ड ऑफिसर व ४२ इंडियन ऑफिसर होते. क्लाईव्हची ही व्यवस्था विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. तत्पूर्वी हिंदी सैन्याच्या कंपनीवर हिंदी ऑफिसर असत. ब्रिटिश ऑफिसर थोडे तरी असले पाहिजेत असें क्लाईव्हचें ठाम मत झालें होतें म्हणून त्यानें वरीलप्रमाणें पद्धति सुरू केली. ती १८९७ च्या बंडापर्यंत आणि अद्यापहि सॅपर्स अॅंड मायनर्स कोअरमध्यें चालू आहे. क्लाईव्हच्या पूर्वी बॅटेलियनवर इंडियन कमांडंट असत. पण क्लाईव्हनें बॅटेलियनचे कमांडंट आणि कंपन्यांचे कमांडर ब्रिटिश नेमण्याचा नियम सुरू केला.

प्लासीच्या लढाईनंतर महत्त्वाचीं युद्धें म्हैसूरच्या हैदर व टिप्पू या राजांबरोबर झाल्यामुळें मद्रासचें सैन्य बरेंच वाढवावें लागलें. १७९३ सालीं ही संख्या ३ रॉयल इंफंट्री बॅटेलियन, १ यूरोपियन रेजिमेंट, ४ नेटिव्ह कॅव्हलरी रेजिमेंट आणि २१ नेटिव्ह इंफंट्री बॅटेलियन अशी होती. हिंदी सैन्यांत नेमावयाचें ब्रिटिश ऑफिसर यूरोपियन रेजिमेंटांच्या अधिकाऱ्यांतून नेमले जात. या ब्रिटिश सीपॉय ऑफिसरांनां हुद्दे (रँक) नसल्यामुळें किंग्ज ट्रुपच्या ज्यूनियर ऑफिसरांपेक्षां त्यांनां कमी दर्जाचे ठरवीत असत. याबद्दल तक्रारी होऊन १७९६ सालीं सैन्यपद्धतीची पुनर्घटना करण्यांत आली. या सालीं ब्रिटिश सैनिक १३००० (राजाचे व कंपनीचे मिळून) आणि हिंदी सैनिक बंगाल २४०००, मद्रास २४००० व मुंबई ९००० इतकें एकंदर सैन्य होतें या पुनर्नघटनेच्या वेळीं हिंदी बॅटेलियनमध्यें १ लेफ्टनंट-कर्नल, १ मेजर, ४ कॅप्टन, ११ लेफ्टनंट व ५ एन्साईन मिळून २२ ब्रिटिश ऑफिसर नेमण्याचें ठरलें व त्यांची बढती रजा व पेन्शन यासंबंधीं ब्रिटिश रेजिमेंट ऑफिसराप्रमाणें नियम करण्यांत आले. यामुळें हिंदी ऑफिसरांचा दर्जा व अधिकार क्लाईव्हच्या सुधारणेमुळें कमी झाला होता त्याहूनहि अधिक कमी झाला.

१७९७ ते १८९७ पर्यंत कंपनीचीं युद्धें व तिच्या सत्तेखालील मुलूख यांचा विस्तार वाढतच गेला. त्यामुळें सैन्य पुष्कळ वाढवावें लागलें. १७९८ सालीं आलेला गव्हर्नर जनरल मार्क्विस ऑफ वेलस्ली यानें फ्रेंचांचें वजन पार नाहींसें करण्याचें ठरविलें. म्हैसूरच्या टिप्पूचे गुप्त पत्रव्यवहार फ्रेंचांशीं चालू होते आणि ग्वाल्हेरच्या शिंद्यांच्या सैन्यांत फ्रेंच लष्करी अधिकारी असत त्यांत पेरॉन हा एक होता. वेलस्लीनें टिप्पूशीं व मराठ्यांशीं युद्धें करून दोन्ही सत्ता हतबल केल्या. पुढें नेपाळबरोबर युद्ध (१८१४), ब्रह्मदेशाबरोबर युद्धें (१८१४ व १८), मराठ्यांबरोबर चें शेवटचें युद्ध (१८१८), पेंढाऱ्यांबरोबर युद्ध(१८१८),अफगाण युद्ध(१८३९, व शिखांबरोबर युद्धें

(१८४५-४६ व १८४८) झालीं शिवाय हिंदुस्थानाबाहेर कांहीं मोहिमा झाल्या त्यांत फ्रेंचांपासून बोर्बोन, डच लोकांपासून सीलोन व मसाल्याचीं बेटें (स्पाईस आयलंडस्) व जावा बेट हा मुलुख जिंकण्यांत आला. या काळांतील दुसरा एक महत्त्वाचा प्रकार म्हणजे कंपनीच्या नोकरांतीलच हिंदी सैनिकांचीं बंडें हा होय. याचीं कारणें हिंदी शिपायांच्या बाबतींत यूरोपियन पद्धतीचा पोशाख, केशरचना वगैरेसंबंधीं नियम, शिपायांचा कमी केलेला भत्ता, हिंदी आफिसरांचा कमी केलेला दर्जा आणि अधिकार, कंपनीचें हिंदी राज्यें भराभर खालसा करण्याचें धोरण वगैरे होतीं. १७६४ व १७६६ मध्यें बंगालच्या सैनिकांनीं, १८०६ मध्यें मद्रासच्या शिपायांनीं, १८०९ मध्यें मद्रासच्या यूरोपियन अधिकाऱ्यांनीं, १८२४ मध्यें पुन्हां बंगालच्या सैनिकांनीं बराकपूर येथें वगैरे बंडाळ्या केल्या. अशा बंडाळ्यांपैकीं वेल्लोरच्या (मद्रास) शिपायांची बंडाळी (१८०६) विशेष महत्त्वाची होती.

१८२४ मध्यें महत्त्वाचे फरक करण्यांत आले. हिंदी राजांच्या सैन्यांत घोडदळ बरेंच असे. या देश्य घोडेस्वारांनां कंपनीनें आपल्या नोकरींत घेऊन घोडदळ बरेंच वाढविलें. सैन्यामध्यें घोडदळाचें पायदळाशीं प्रमाण १७९६ सालीं १ : ७$\frac{1}{2}$, १८२४ सालीं १ : ९$\frac{1}{3}$, १९१४ ते १८ सालीं १ : ३$\frac{1}{2}$, आणि १९२३ सालीं १ : ६$\frac{1}{2}$ असें होतें. याच सालीं कांहीं 'इरेग्युलर यूनिटस्' या प्रकारचें सैन्य ठेवण्यांत आलें. याला 'शिलेदार पद्धति' हें देश्य राजांच्या सैन्यांतलें नांवच देण्यांत आलें. ही पद्धति अनेक वर्षें चालून अखेर १९२१ सालीं बंद करण्यांत आली; पण अलीकडे तिचा पुन्हां स्वीकार करण्यांत येत आहे, या शिलेदार सैन्याला 'इरेग्युलर कॅव्हेलरी रेजिमेंट' म्हणत आणि त्यांतील अधिकारीहि बहुतेक हिंदी इसम असत.

हिंदुस्थानचा निरनिराळा मुलूख जिंकण्याच्या वेळीं प्रत्येक प्रेसिडेन्सी सैन्याला दुसऱ्या प्रांतांत लढाईवर जावें लागे; व पुढें तो मुलुख जिंकल्यावर त्याच्या संरक्षणाकरितां तेथेंच राहण्याचा प्रसंग येई. त्या परप्रांतांत राहण्यास सैनिक खूष नसत. बंगाली सैन्यामध्यें उच्च जातीचे लोक असत व ते बायकामुलें बरोबर बाळगीत नसत. उलटपक्षीं मुंबईचें सैन्य व मद्रासी सैन्य हलक्या जातीच्या शिपायांचें असे; आणि मुंबईच्या सैन्यांत कांहींचीच बायकामुलें बरोबर बाळगण्याची सोय असे आणि मद्रासी सैन्यांत ही सोय सर्वांचीच असे. त्यामुळें मद्रासी सैन्य परप्रांतांत किंवा समुद्रापलीकडील देशांतहि जाण्यास तयार असे. यामुळेंच ब्रह्मदेशाबरोबरच्या युद्धांत मद्रासी सैन्य होतें व पुढेंहि तें त्या प्रांतांत कायम राहिलें. सिंध व पंजाब प्रांत जिंकण्यास बंगाली सैन्य गेलें होतें. पण नंतर तेथें कायम रहाण्यास ते सैनिक तयार नव्हते व त्यामुळें दोन्ही प्रांतांत त्यांनीं बंडाळी केली. या अडचणीस्तव पुढें नवीन जिंकलेल्या प्रांतांत संरक्षणाकरितां त्याच प्रांतांतील लोकांचें सैन्य तयार करण्याची पद्धत सुरू झाली. याप्रमाणें पंजाबांत पंजाब इरेग्युलर फोर्स तयार करण्यांत आला व त्यालाच पुढें पंजाब फ्रँटियर फोर्स हें नांव मिळालें. याप्रमाणें या कालविभागाच्या शेवटीं हिंदुस्थानच्या सैन्यांत ब्रिटिश इंपीरियल आर्मीज (किंग्ज रॉयल ट्रूप्स), 'प्रेसिडेंसी आर्मीज' आणि 'लोकल फोर्सेस अँड कॉंटिंजंट्स' असे तीन प्रकार होते. सैन्याची एकंदर संख्या बंगाली सैन्यांत २१००० ब्रिटिश व हिंदी १३७०००; मद्रासी सैन्यांत ८००० ब्रिटिश व ४९००० हिंदी आणि मुंबई सैन्य ९००० ब्रिटिश व ४५००० हिंदी अशी होती. ब्रिटिश सैन्याच्या मानानें हिंदी सैन्य अधिक होतें. ही गोष्ट सुरक्षिततेच्या दृष्टीनें योग्य नव्हती. १८५७ सालीं अनेक कारणांनीं मोठें बंड झालें. तें मोडल्यावर अनेक बाबतींत फेरफार झाले.

१८५८-१८९४ता. १नोव्हेंबर१८५८ रोजीं व्हिक्टोरिया राणीचा जाहीरनामा प्रसिद्ध होऊन हिंदुस्थानचा राज्यकारभार राणीनें आपल्या हातीं घेतला आणि ईस्ट इंडिया कंपनी नष्ट झाली. यावेळीं सैन्याच्या रचनेंत अनेक फेरफार झाले. पहिला प्रश्न इंपीरियल ब्रिटिश आर्मी व इंडियन ब्रिटिश आर्मी असा फरक असावा किंवा नसावा हा होता, व अखेर हिंदुस्थानांतील ब्रिटिश आर्मी हा इंपीरियल ब्रिटिश आर्मीचाच भाग असावा असें ठरलें. आणि 'रॉयल ट्रूप' व 'कंपनीचे यूरोपियन ट्रूप्स' हा फरक नष्ट झाला. मुंबई, मद्रास व बंगालचा यूरोपियन तोफखाना (आर्टिलरी) रॉयल आर्टिलरीमध्यें सामील करण्यांत आला. ब्रिटिश सैन्य हिंदुस्थानांत ८०००० हून अधिक असूं नये असें ठरलें, हिंदी सैन्यांत फेरफार करण्यांत आले. कांहीं घोडदळ व कांहीं पायदळ कमी करण्यांत येऊन हिंदी तोफखाना बहुतेक सर्वच कमी करण्यांत आला. दुसरी तक्रार आफिसरांच्या अपुऱ्या संख्येबद्दल व पगारवाढीबद्दलची होती. प्रत्येक रेजिमेंटमध्यें यासंबंधीं नियम निरनिराळे होते. हा अन्याय दूर

करण्याकरतां 'थ्री प्रेसिडेन्सी स्टाफ कोअर' पद्धति १८६१ मध्यें सुरू करण्यांत आली. प्रत्येक प्रेसिडेन्सी आर्मीमध्यें आफीसरांची संख्या पुरेशी ठेवून सगळ्यांनां नोकरीच्या मुदतीनुसार पगारवाढ देण्याचें ठरलें. इंग्लंडांतील व ब्रिटिश साम्राज्याच्या निरनिराळ्या भागांतील सर्व ब्रिटिश सैन्याचा अन्तर्भाव 'इंपीरियल ब्रिटिश आर्मी' मध्यें करण्याचें ठरल्यामुळें या सर्व सैन्याची पुनर्घटना करण्याकरितां कार्डवेल याची योजना १८७२ मध्यें अमलांत आली. पूर्वीच्या 'ब्रिगेड डिस्ट्रिक्ट्स'च्या पद्धतीऐवजीं 'रेजिमेंटल' पद्धति सुरू करून ब्रिटिश आर्मीमधील इंफंट्री यूनिट्स नांवांत फेरबदल करण्यांत आला.

१८७८–८० च्या अफगाणयुद्धांत हिंदुस्थानांतील लष्करी व्यवस्थेंतले कित्येक दोष व्यक्त झाले. म्हणून १८७९ मध्यें लार्ड लिटननें लष्करी खर्चांत काटकसर व लष्करी सामर्थ्यांत वाढ करण्याचे उपाय सुचविण्याकरतां 'आर्मी ऑर्गनायझेशन कमिशन' नेमलें. या कमिशननें हिंदी घोडदळ व पायदळ रेजिमेंटमध्यें एक ब्रिटिश आफिसर अधिक नेमण्याची, ४ हिंदी घोडदळ रेजिमेंटें व १८ हिंदी पायदळ रेजिमेंटें कमी करण्याची, आणि प्रत्येक घोडदळ रेजिमेंटांत ४९९ ऐवजीं ५५० आणि पायदळ रेजिमेंटांत ७१२ ऐवजी ८३२ इसम नेमण्याची सूचना केली. या कमिशनची सर्वांत महत्त्वाची सूचना 'प्रेसिडेन्सी आर्मीज'ची पद्धतीच बंद करण्याबद्दलच होती पण पूर्ण विचार होऊन ती सूचना अमलांत येण्यास आणखी १६ वर्षें लागलीं. मध्यंतरी इतर कित्येक सुधारणा झाल्या. सर्व हिंदुस्थानांतील सैन्याला लागू करण्याचे 'कॉमिसरीएट रेग्युलेशन्स' तयार करण्यांत आले; एका बॅटेलियन मधून दुसऱ्या बॅटेलियनमध्यें शिपायांची बदली जरूरीच्या वेळीं करण्याचा नियम झाला. १८८६-८७ मध्यें 'इंडियन आर्मी रिझर्व्हची' पद्धति सुरू झाली. पूर्वी पेन्शनला नोकरीची मुदत ४० वर्षें असे त्याऐवजीं २०ते४० वर्षें असावी असें ठरलें व या नियमाप्रमाणें पेन्शनमध्यें गेलेल्या इसमांचें रिझर्व्ह सैन्य उभारावयाचें ठरलें. अशा रिझर्व्ह सैन्याला दरसाल एक महिना ट्रेनिंग द्यावें व त्या महिन्याचा पुरा पगार द्यावा असें ठरलें. प्रथम ही रिझर्व्ह सैन्यपद्धति पायदळास व नंतर घोडदळ, तोफखाना व सॅपर्स अँड मायनर्स यांनांहि लागू करण्यांत आली.

१८९५–१९२०:—या कालविभागांतील पहिली महत्त्वाची गोष्ट ही कीं, १८९५ मध्येंच 'प्रेसिडेन्सी आर्मीज' ची पद्धति बंद करून त्याऐवजीं पंजाब (वायव्यसरहद्द व पंजाबसरहद्द सैन्य धरून), बंगाल, मद्रास (ब्रह्मदेशासह), आणि मुंबई (सिंध, क्वेटा व एडन यांसह) अशा चार 'कमांड' ठरविण्यांत आल्या. प्रत्येक कमांडवरचा मुख्य अधिकारी लेफ्टनंट—जनरल हा असून त्या सर्वांवरचा अधिकारी कमांडर-इन-चीफ हा होय. प्रत्येक कमांडचे दोन किंवा तीन फर्स्ट क्लास डिस्ट्रिक्ट व दोन ते सहा पर्यंत सेकंड क्लास डिस्ट्रिक्ट करण्यांत आले. याशिवाय स्थानिक फौज होती ती:—(१) हैद्राबाद कॉंटिंजंट; (२) सेंट्रल इंडिया हॉर्सची दोन रेजिमेंटें; (३) माळवा भिल्ल कोअर; (४) भोपाळ बॅटेलियन; (५) देवळाली इरेग्युलर फोर्स; (६) एरिन पुरा इरेग्युलर फोर्स; (७) मेरवाड भिल्ल कोअर आणि (८) मेरवाड बॅटेलियन. वरील सुधारणेचा हेतु सर्व सैन्याचें एकत्रीकरण करणें हा होता, पण तो फारसा साधला नाहीं; कारण एका कमांडचा दुसऱ्या कमांडशीं किंवा एका डिस्ट्रिक्टचा दुसऱ्या डिस्ट्रिक्टशीं संबंध येत नसे. म्हणून आणखी महत्त्वाचे फेरफार करणें जरूर होतें. १९०२ मध्यें कमांडर-इन-चीफच्या जागीं नेमला गेलेल्या लॉर्ड किचनरनें आणखी सुधारणा केल्या. ब्रह्मदेश ही स्वतंत्र कमांड ठरविली, इंडियन आर्मीमधील यूनिट्सनां नवीं नांवें व अनुक्रमनंबर देण्यांत आले, हैद्राबाद कॉंटिंजंट मोडण्यांत आली, व इतर कित्येक सुधारणा करण्यांत आल्या. पुन्हां १९०३ सालीं पुढील महत्त्वाचीं तत्त्वें अमलांत आणण्याचें ठरलें:—(१) हिंदी सैन्याचें मुख्य काम हें कीं वायव्यसरहद्दीचें, बाहेरील शत्रूचा हल्ला न होईल अशा रीतीनें संरक्षण करणें; (२) युद्धाच्या वेळीं युनिट्सनां ज्या क्रमानें रणक्षेत्रावर पाठविणें असेल तदनुसार शांततेच्या वेळीं त्यांची व्यवस्था व शिक्षण ठेवणें. (३) अंतर्गत शांतता राखण्याची योजना अशी असावी कीं युद्धाच्या वेळीं सर्व लढाऊ सैन्य रणांगणावर पाठवितां येईल. (४) प्रत्येक यूनिटमधील निरनिराळ्या प्रकारचें सैन्य युद्धांत आपापलें काम योग्य प्रकारें बजावूं शकेल अशा रीतीनें त्यांनां शिक्षण व लढाईचा अनुभव देण्याची व्यवस्था करावी. सैन्याच्या विभागणीपद्धतींत दोन तीन वेळां बदल करून १९०८ सालीं फक्त दोन मुख्य विभाग (नॉर्दर्न आर्मी व सदर्न आर्मी) करण्यांत येऊन त्यांचे एकंदर १० डिव्हिजन केले; व शिवाय कोहट, बन्नू व डेराजान ब्रिगेड्स आणि एडन ब्रिगेड ठेवण्यांत आल्या. ही योजना पूर्ण अंमलांत येण्यापूर्वीच १९१४ चें महायुद्ध सुरू झालें.

१९२१:–महायुद्धाच्या वेळीं हिंदी सैन्याच्या योजनेंत कांहीं महत्त्वाचे दोष नजरेस आल्यामुळें पुन्हां १९२१ सालीं नवी पुनर्घटना सुरू झाली. ते दोष येणें प्रमाणें: (१) सैन्यांतील अधिकाऱ्यांनां सैन्याच्या इतर व्यवस्थेचें काम बरेंच असल्यामुळें त्यांनां युद्धोपयोगी लष्करी शिक्षण देण्यास भरपूर वेळ नसे. (२) युद्धाच्या वेळीं रणक्षेत्रावर सैन्य गेल्यावर अन्तर्गत शांतता राखण्यास पुरेसें सैन्य ठेवण्याची व्यवस्था नव्हती. (३) लढाऊ सैन्याला साहाय्यभूत होणाऱ्या (ॲसिलरी) कामकरी शाखा मुळीच नव्हत्या किंवा भरपूर नव्हत्या. (४) लढाऊ हत्यारें व युद्धसाहित्य जुन्या प्रकारचें होतें. (५) एअर फोर्स व मेकॅनिकल ट्रॅन्सपोर्ट या लष्कराच्या शाखा अस्तित्वांतच नव्हत्या. (६) सामान्यतः युद्धांतील सर्व प्रकारचीं यांत्रिक साधनें, मशीनगन्स, आर्टिलरी, लष्करी हॉस्पिटलें व दवाखाने वगैरे सर्व यूरोपीयन सैन्यांतील साधनांच्या मानानें फार कमी प्रतीचीं होतीं. (७) रिझर्व्ह सैन्याची योजना फार अपुरी होती. (८) नव्या सैन्यभरतींतील अशिक्षित सैनिकांनां लष्करी शिक्षण देण्याची भरपूर व्यवस्था नव्हती. (९) सर्वांत शेवटचा पण फार महत्त्वाचा दोष म्हणजे युद्धसाहित्य तयार करण्याचीं साधनें देशांत तयार नसल्यामुळें हत्यारें, दारूगोळा वगैरे सर्व साहित्याकरितां परदेशांतून येणाऱ्या मालावर अवलंबून राहावें लागे.

सांप्रतची रचना: प्रमुख लष्करी अधिकारी:–हिंदुस्थानांतील लष्करी व्यवस्थेवरचा सर्वांत वरिष्ठ अधिकारी स्टेट सेक्रेटरी हा असून त्याला सल्ला देण्याकरतां इंडिया कौन्सिलमधील मिलिटरी डिपार्टमेंटचा सेक्रेटरी व त्याच्या मदतीला एक फर्स्ट ग्रेड स्टाफ ऑफिसर असतो. हे दोघेहि हिंदुस्थानांतील सैन्यांत काम केलेले इसम असतात. शिवाय इंडिया कौन्सिलांत पेन्शन घेतलेल्या वरिष्ठ लष्करी अधिकाऱ्यांपैकीं इसम सभासद नेमला जातो. हिंदुस्थानांत व्हाईसराय व त्याचें एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल हें इतर खात्यांप्रमाणें लष्करी खात्यांवर देखरेख व नियंत्रण ठेवितें. त्याच्याखालीं कमांडर–इन–चीफ हा अधिकारी असून एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलांत लष्करी खातें त्याच्या हातीं असतें. हिंदुस्थानसरकारनें ठेविलेलें लष्करी धोरण अमलांत आणणें, लष्कराची प्रत्येक शाखा उत्तम कार्यकर्ती राखणें आणि लष्करी हालचालींचे बेत ठरविणें हे अधिकार या एकट्याच्या हातांत असतात. त्याला सल्ला देणारें एक मिलिटरी कौन्सिल असतें; त्यांत जनरल स्टाफचा चीफ ॲडज्यूटंट–जनरल, क्वॉर्टर मास्टर जनरल, आर्मी डिपार्टमेंटचा सेक्रेटरी व फायनॅन्स डिपार्टमेंटपैकीं मिलिटरी फायनान्सियल ॲडव्हायझर इतके सभासद असतात परंतु या कौन्सिलचा निर्णय कमांडर–इन–चीफवर बंधनकारक नसतो व लष्करी कारभाराबद्दल एकटा कमांडर–इन–चीफच जबाबदार असतो.

लष्करी कारभाराच्या मुख्य ठिकाणीं (आर्मी हेडक्वार्टर्स) (१) जनरल स्टाफचा चीफ, (२) ॲडज्युटंट–जनरल व (३) क्वार्टर मास्टर–जनरल हे तीन मुख्य अधिकारी असतात. याशिवाय (४) मिलिटरी सेक्रेटरी, (५) आर्डनन्सचा डायरेक्टर–जनरल, (६) एंजिनिअर–इन–चीफ आणि (७) मेडिकल सर्व्हिसेसचा डायरेक्टर हेहि इतर लष्करी शाखांचे वरिष्ठ अधिकारी असतात. आर्मी डिपार्टमेंटमध्यें एक सेक्रेटरी, एक डेप्युटी सेक्रेटरी, एक एस्टाब्लिशमेंट ऑफिसर आणि दोन ॲसिस्टंट सेक्रेटरी असतात. आर्मी डिपार्टमेंट हें सर्व सैन्याची, व त्याबरोबरच रॉयल इंडियन मरीनची आणि हिंदुस्थानांतील रॉयल एअर फोर्सची व्यवस्था पाहतें. लष्करी कारभाराचा जबाबदार स्टेटकौन्सिलमध्यें आर्मी मेंबर (कमांडर–इन–चीफ) आणि लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें आर्मीसेक्रेटरी सभासद असतो.

हिंदुस्थानचे लष्करी विभाग:–हे विभाग (१) नॉर्दर्न कमांड (मुख्य ठिकाण मरी), (२) सदर्न कमांड (पुणें), (३) ईस्टर्न कमांड (नैनीताल) आणि (४) वेस्टर्न कमांड (क्वेटा) असे चार असून प्रत्येक कमांडमध्यें १४ डिस्ट्रिक्टस आहेत. प्रत्येक कमांडवरचा मुख्य अधिकारी जनरल ऑफिसर कमांडिंग–इन–चीफ हा असतो. याखेरीज वझिरीस्तान व बर्मा डिस्ट्रिक्ट आणि एडन ब्रिगेड हीं या लष्करी खात्याच्याच ताब्यांत असतात. येथील सैन्याचे (१) कव्हरिंग ट्रूप्स, (२) फील्ड आर्मी व (३) इंटर्नल सिक्युरिटी आर्मी असे तीन प्रकार आहेत. कव्हरिंग ट्रूप्सचें काम सरहद्दीवरील किरकोळ बंडाळ्या मोडणें व युद्धाच्या वेळीं रणांगणावर लष्करी जमवाजमव करतां यावी म्हणून पडद्याप्रमाणें उपयोगी पडणें. हें सैन्य १२½ इंफंट्री ब्रिगेड्स असतें. फील्ड आर्मीमध्यें ४ डिव्हिजन्स व ५ कॅव्हलरी ब्रिगेडस असतात. मोठ्या युद्धांत हें सैन्य शत्रूबरोबर लढतें.

लष्करी अधिकारी:–हे तीन प्रकारचे असतात: (१) जनरल स्टाफच्या शाखेमधील अधिकारी हिंदुस्थानच्या

अंतर्गत व बाह्य संरक्षणाकरतां सैन्याच्या हालचालींसंबंधीं योजना तयार ठेवून प्रत्यक्ष युद्धाच्या वेळीं त्याप्रमाणें अंमल करतात.(२) ॲडज्यूटंट—जनरल; या शाखेंतील अधिकारी सैन्यभरती करणें, त्याला लष्करी शिक्षण वगैरे देणें व शांततेच्या काळांत निरनिराळ्या ठाण्यांत त्याची विभागणी करणें वगैरे कामें करतात. (३) 'क्वार्टर मास्टर जनरल; या शाखेमधील अधिकारी सैन्याला खाद्यपदार्थ, जनावरांनां घास दाणा, वैरण व कपडे, हत्यारें, दारूगोळा वगैरे साहित्य पुरविण्याचें काम करतात. याशिवाय (४) मिलिटरी सेक्रेटरी अधिकाऱ्यांच्या नेमणुका, बढती, पेन्शन वगैरेसंबंधीं हुकुमांची अंमलबजावणी करतो (५) ऑर्डनंसचा डायरेक्टर जनरल तोफखान्याच्या फॅक्टरींची व्यवस्था पाहतो. याशिवाय आर्मी हेडक्वार्टर्सच्या ठिकाणीं (६) रॉयल एंजिनिअरवरील मुख्य अधिकारी एंजिनिअर—इन—चीफ, (७)कॅव्हलरीचा मेजर—जनरल व (८) रॉयल आर्टिलरीचा मेजर—जनरल हे अधिकारी असतात.

हिंदुस्थानांतील रेग्युलर ब्रिटिश सैन्य:—हिंदुस्थानांतील ब्रिटिश घोडदळ व ब्रिटिश पायदळ इंग्लंडांतील ब्रिटिश सैन्याचा भाग असून या भागांतील कोणाहि इसमास हिंदुस्थानांत कायम रहावें लागत नाहीं. हिंदुस्थानांत ब्रिटिश घोडदळाचीं सहा रेजिमेंटें असून प्रत्येक रेजिमेंटमध्यें २७ आफीसर म्हणजे एकूण १६२ ऑफीसर व प्रत्येक रेजिमेंटमध्यें ५७१ इतर म्हणजे एकूण ३४२६ इतर इतकी संख्या असते. ब्रिटिश पायदळाचीं ४५ बॅटेलियनें असून प्रत्येक बॅटेलियनमध्यें २८आफीसर म्हणजे १२६० आफीसर व प्रत्येकीं८८२इतर म्हणजे एकूण ३९६९० इतर आहेत. १९२१ पासून मशीनगनकोअर बंद करून अशी व्यवस्था करण्यांत आली आहे कीं, आठ यांत्रिक तोफा प्रत्येक ब्रिटिश बॅटेलियनमध्यें ठेवण्यांत आल्या आहेत आणि एक हिंदी आफीसर व ४१ हिंदी सैनिक अशी पलटण (प्लॅटून) जोडून देण्यांत आली.

रॉयल आर्टिलरी(तोफखाना)पैकीं रॉयल हॉर्स आणि फील्ड आर्टिलरी आणि मध्यम प्रतीच्या बातेऱ्यांत हिंदी इसम ड्रायव्हर व आर्टिफिशर असतात; आणि पॅक आर्टिलरींत ड्रायव्हर, गनर व आर्टिफिशर हिंदी असतात. फ्रॉंटियर गॅरिसन आर्टिलरींत गनर व आर्टिफिशर आणि इंडियन कोस्ट आर्टिलरींत फक्त गनर हिंदी असतात. शांततेच्या काळांत हल्लीं तोफखान्याची व्यवस्था पुढीलप्रमाणें आहे:—

रॉयल हार्स आर्टिलरी:—तीन बातेऱ्या व तीन अम्युनिशन कॉलम आणि हेडक्वार्टर्स मिळून झालेली एक ब्रिगेड आणि अन्‌ब्रिगेडेड बातेरी व अम्युनिशन कॉलम इतकी सामुग्री आहे. प्रत्येक बातेरींत १३ पौंडी सहा तोफा असतात.

फील्ड रॉयल आर्टिलरी हायर व लोअर एस्टाब्लिशमेंट ब्रिगेड:—हायर एस्टाब्लिशमेंटवर प्रत्येकी हेडक्वार्टर्स व ४ बातेऱ्या असलेल्या सात ब्रिगेड्स असतात आणि लोअर एस्टाब्लिशमेंटवर प्रत्येकी हेडक्वार्टर्स व चार बातेऱ्या असलेल्या तीन ब्रिगेड असतात. हायर एस्टाब्लिशमेंटवरील ७ ब्रिगेडपैकीं चार ब्रिगेडांत प्रत्येकीं सहा १८ पौंडी तोफा असलेल्या दोन बातेऱ्या आणि प्रत्येकी सहा ४॥ इंची हावित्झर तोफा असलेल्या दोन बातेऱ्या असतात. तीन ब्रिगेडांत प्रत्येकींत १८ पौंडी सहा तोफा असलेल्या तीन बातेऱ्या व सहा ४॥ इंची हावित्झर तोफा असलेली एक बातेरी असते. लोअर एस्टाब्लिमेंशटवरील तीन ब्रिगेडांपैकीं दोन ब्रिगेडांत प्रत्येकीं १८ पौंडी सहा तोफा असलेल्या तीन बातेऱ्या आणि सहा ४॥ इंची हावित्झर तोफा असलेली एक बातेरी आहे. आणि एक ब्रिगेडांत प्रत्येकी १८ पौंडी सहा तोफा असलेल्या दोन बातेऱ्या असतात. प्रत्येक बातेरींत दोन तोफा अव्वल असतात.

रॉयलफील्ड आर्टिलरी, कुमकेची ब्रिगेड:—या ब्रिगेडींत प्रत्येकीं चार १८-पौंडी तोफा असलेल्या तीन बातेऱ्या आणि चार ४॥ इंच हावित्झर तोफा असलेली एक बातेरी असते. ही ब्रिगेड युद्धाच्यावेळीं ३ ऱ्या डिव्हिजन ॲम्युनिशन कालममध्यें सामील करतां येईल.

रॉयल फील्ड आर्टिलरी, आम्युनिशन कालम:—पहिल्या आणि दुसऱ्या डिव्हिजनच्या तोफखान्याकरतां दोन डिव्हिजन आम्युनिशन कालम तयार ठेवतात आणि एक ब्रिगेड आम्युनिशन कालम सरहद्दीवरील कव्हरिंग फोर्स ब्रिगेडकरितां असतो.

पॅक आर्टिलरी:—यांत सहा ब्रिगेड्स आहेत. प्रत्येक ब्रिगेडमध्यें हेडक्वार्टर्स, एक ब्रिटिश व तीन हिंदी बातेऱ्या आणि एक अन ब्रिगेडेड बातेरी व एक सेक्शन असतें. एक ब्रिटिश आणि दोन हिंदी बातेऱ्यांत प्रत्येकी चार ३॥ इंची हावित्झर तोफा आणि बाकीच्या बातेऱ्यांत चार २·७५ इंच तोफा असतात.

मीडियम आर्टिलरी:—यांत दोन ब्रिगेडी असून प्रत्येक ब्रिगेडींत घोड्यांनीं ओढण्याची एक व लोखंडी

दांड्यांनीं ओढण्याच्या दोन बातेऱ्या असतात. शिवाय दांड्यांनीं ओढण्याच्या बातेऱ्या आणखी असतात. त्यांपैकीं दोन बातेऱ्यांना ६ इंची हावित्झर तोफा असतात. व एकींत ६०-पौंडी तोफा असतात. प्रत्येकींत एकच सेक्शन फिरता असतो.

कोस्ट आर्टिलरी:-मुंबई व कराची येथें एक हेडक्वार्टर्स व दोन कंपन्या आहेत, आणि कलकत्त्यास एक स्वतंत्र कंपनी आहे.

फ्रॉंटियर गॅरिसन आर्टिलरी:-यांत एक कोअर असून पुढील बारा ठिकाणीं हा तोफखाना विभागला आहे. तीं ठिकाणें:-कोहट, समन, थल, चमन, बन्नू, दर्दोनी, पेशावर, हिंदुबाघ, मलकंद, शागाई, चकदर, फोर्ट-संडेमन. या ठिकाणांच्या संरक्षणाकरितां ठेवलेल्या युद्धसाहित्याला गोलंदाज पुरविण्याची जबाबदारी या कोअरवर आहे.

इंडियन कोस्ट आर्टिलरी:-यांत एक कोअर असून मुंबई व कराची या किनाऱ्यावरील संरक्षक ठाण्यांत तुकड्या आहेत. मुंबई व कराची यांच्या संरक्षणाकरितां असलेल्या रॉयल गॅरिसन आर्टिलरीच्या कंपन्यांनां किनाऱ्याच्या संरक्षणाच्या कामीं मदत करण्याचें काम या कोअरकडे आहे. मुंबईनजीकच्या समुद्रांतील किल्ल्यांकरितां लॉंच व होड्या चालविण्याचें काम हेडक्वार्टर्समधील एका तुकडीकडे असतें.

तोफखान्याच्या शिक्षणाचीं ठिकाणें:-हॉर्स, फील्ड व मीडियम आर्टिलरीमधील हिंदी इसमांनां शिकविण्याकरितां एक वेगळें ठिकाण आहे पॅक आर्टिलरीमधील हिंदी इसमांनां शिक्षण देण्याकरितां निराळें ठिकाण आहे. हीं ठिकाणें तोफखान्याकरितां लागणाऱ्या हिंदी इसमांची भरती करण्याकरितां आणि त्यांनां शिक्षण देण्याकरितां आहेत.

लष्करी इंजिनिअरिंग खातें:-एंजिनियर-इन-चीफ:-हिंदुस्थानांतील रॉयल एंजिनियर्सच्या कोअरचा मुख्य अधिकारी कमांडर-इन-चीफला प्रत्यक्ष जबाबदार असतो. एंजिनिअर-इन-चीफ हा स्टाफ आफिसर नसून लष्करी एंजिनिअरिंगच्या सर्व प्रकारच्या कामांत कमांडर-इन-चीफला सल्ला देणारा तज्ज्ञ असतो. त्याच्यावर पुढील जबाबदारी असते:-(१) युद्धाच्या व शांततेच्या काळांत एंजिनिअरिंग संबंधीं कामें व त्याला लागणारीं माणसें. (२) युद्धाच्या वेळेकरितां या कामांच्या माणसांची तयारी ठेवणें. (३) युद्ध व शांतता या दोन्ही वेळीं लागणारें एंजिनियरिंगचें सामान पुरविणें. (४) सर्व प्रकारची लष्करी एंजिनियरिंगचीं कामें करणें व तीं कामें चांगल्या दुरुस्त स्थितींत राखणें. (५) त्यानें सादर केलेल्या सर्व योजनांत बिनचुकपणा, काटकसर व लायकपणा असणें.

संघटना:-लष्करी एंजिनियरिंग खात्याच्या दोन शाखा आहेत; एक 'सॅपर्स अँड मायनर्स' व 'पायोनिअर्स', आणि दुसरी मिलिटरी एंजिनियर सर्व्हिसेस. सॅपर्स अँड मायनर्सच्या कोअरमध्यें पुढीलप्रमाणें तुकड्या समाविष्ट होतात:-किंग जॉर्जेस ओन बेंगाल सॅपर्स अँड मायनर्स; यांचें मुख्य ठिकाण रुरकी येथें आहे. क्वीन व्हिक्टोरियाज ओन मद्रास सॅपर्स अँड मायनर्स; यांचें मुख्य ठिकाण बंगलोर येथें आहे आणि रॉयल बॉम्बे सॅपर्स अँड मायनर्स; यांचें मुख्य ठिकाण खडकी येथें आहे. बर्मा सॅपर्स अँड मायनर्स; यांचें मुख्य ठिकाण मंडाले येथें आहे.

या एंजिनियरिंग कोअरमध्यें रॉयल एंजिनियर ऑफीसर, व्हाईसरायचें कमिशन मिळालेले हिंदी ऑफीसर आणि कांहीं नॉन-कमिशन ब्रिटिश ऑफीसर आणि इतर दर्जाचे हिंदी आफीसर आहेत. पहिल्या तीन कोअरवरचा वरिष्ठ अधिकारी लेफ्टनंटकर्नल असून त्याच्या मदतीला दोन मेजर, एक अॅडज्यूटंट, एक क्वार्टरमास्तर, दोन सुभेदार-मेजर, एक जमादार अॅडज्यूटंट आणि एक जमादार क्वार्टरमास्तर इतके अधिकारी असतात. बर्मा सॅपर्स अँड मायनर्सच्या अधिकाऱ्यांची संख्या या मानानें कमी आहे.

फील्ड ट्रूप्स हे घोडेस्वार असून घोडदळाबरोबर फिरण्याचें शिक्षण त्यांनां दिलेलें असतें. त्यांच्या बरोबर झटपट पूल बांधण्याचीं, मोडण्याचीं व पाणी-पुरवठा करण्याचीं साहित्य-साधनें असतात. फील्ड कंपन्यांनां पायदळाबरोबर फिरण्याचें शिक्षण दिलेलें असतें. डिव्हिजनल हेडक्वार्टर्स कंपन्यांमध्यें फार उच्च शिक्षण मिळालेले इसम असतात व ते फील्ड वर्कशॉपमध्यें यांत्रिक काम करतात. आर्मी ट्रूप्स कंपन्या फील्ड कंपन्यांपेक्षां लहान असतात, आणि त्यांनां सैन्याच्या मागें राहून चीफ इंजिनियरांच्या हुकुमांखालीं मोठाले पूल, पाणी पुरवठ्याचीं मोठीं कामें आणि विजेचीं व यांत्रिक कामें करावीं लागतात. ब्रिजिंग ट्रेनमध्यें बरेचसे तरते पूल बांधण्याला पुरेशा होड्या असतात.

लष्करी एंजिनियरिंग खात्याच्या तीन शाखा असतातः इमारती व सडका, विजेसंबंधीं व यांत्रिक, आणि स्टोअर्स. इमारती व सडका या शाखेंतील एका पोटशाखेवर सब-डिव्हिजनल ऑफिसर व सब-ओव्हरसीयर हे कामगार असून दुसऱ्या दोन किंवा अधिक पोटशाखा मिळून सर्वांवर गॅरिसन एंजिनियर हा अधिकारी असतो. इलेक्ट्रिकल व मेकॅनिकल या पोटशाखेंत पॉवर स्टेशन, आईस फॅक्टरी, पाणी-पुरवठा, रोड-रोलर व वर्कशाप इतक्या गोष्टींचा समावेश होतो. यांपैकीं एक किंवा अनेक यूनिट सब-डिव्हिजनल ऑफीसरच्या ताब्यांत असून सर्वांवर देखरेख गॅरिसन एंजिनियरची असते, स्टोअर्सच्या शाखा एंजिनियरिंगचें सामान व बराकींतील सामानसुमान यांची व्यवस्था पाहते. प्रत्येक सब-डिस्ट्रिक्टच्या स्टोअरवर एकेक स्टोअरकीपर आणि बराकीच्या सामानसुमानाच्या व्यवस्थेकरितां बरॅकमास्तर, ॲसिस्टंट बरॅक मास्तर, आणि दोन किंवा अधिक बरॅक सार्जंट असतात.

लष्करी एंजिनियर आफिसरांच्या ताब्यांत हिंदुस्थान, ब्रह्मदेश, इराणी आखात व एडन येथील सर्व लष्करी एंजिनियरिंगचीं कामें असतात. शिवाय रॉयल एअर फोर्स व रॉयल इंडियन मरीन यांचीं सर्व बांधकामें याच अधिकाऱ्यांच्या ताब्यांत असतात. शिवाय वायव्य सरहद्दप्रांत आणि बलुचिस्तान, बंगलोर व एडन येथील मुल्की बांधकामेंहि यांच्याच ताब्यांत आहेत.

कायमचें (रेग्युलर) हिंदीसैन्य, हिंदी घोडदळ:- हल्लीं हिंदी घोडदळाचीं २१ रेजिमेंटे आहेत. त्यांचे तीन रेजिमेंटांचा एक असे सात समुच्चय आहेत. हिंदुस्थानांत अंतर्गत सुरक्षितता राखण्याकरतां सात कायमचीं ठाणीं असून प्रत्येक ठाण्यास एकएक समुच्चय ठेवलेला आहे. १९१४ सालीं हिंदी लष्करांत ३९ रेजिमेंटें होतीं, याशिवाय व्हाईसराय व गव्हर्नर यांचे बॉडीगार्ड तुकडया निराळ्याच. सैन्यव्यवस्थेकरितां एक शिलेदारी व दुसरी बिन शिलेदारी अशा पद्धती होत्या. महायुद्धानंतर शिलेदारी पद्धत बंद केली; व सैन्यहि कमी केलें.

शांततेच्या काळांत हिंदी घोडदळाच्या रेजिमेंटांत पुढील नोकर असतातः—१४ ब्रिटिश ऑफिसर; १८ हिंदी ऑफिसर; ५१४ हिंदी नॉन कमिशन्ड ऑफिसर;व इतर इसम.

हिंदी पायदळ आणि पायोनिअर सैन्यः—हिंदी पायदळाची रचना पुढील प्रमाणें आहे.—

| दलाचें नांव | बॅटेलिअन |
|---|---|
| २० पायदळ रेजिमेंटें | १०७ |
| ३ पायोनिअर रेजिमेंटें | १२ |
| १ इंडिपेंडंट पायोनिअर बॅटेलिअन (चौथें हजारा पायोनिअर्स) | १ |
| १० गुरखा रेजिमेंटें | २० |
| एकूण ३४ | एकूण १४० |

युद्धकाळीं सदरहू सैन्य रणांगणावर गेल्यावर त्याची जागा भरून काढण्यास पुरेल आणि लढाई सुरू झाल्यापासून पहिल्या आठ महिन्यांत होणारी मनुष्यहानि भरून काढण्यास पुरेल इतकें रिझर्व सैन्य ठेवावें लागतें. १९२३ सालीं नवीन रिझर्व सैन्य ठेवण्यासंबंधानें जे नियम झाले ते येणेंप्रमाणें:—

(अ) रिझर्व सैन्यांत दोन प्रकार आहेतः ए क्लास आणि बी क्लास.

(आ) रिझर्वमध्यें नोकरी करणें सक्तीचें केलें आहे.

(इ) ए क्लासमधल्या रिझर्व सैनिकांनां दरसाल जास्तींत जास्त एक महिना लष्करी शिक्षण घ्यावें लागतें व बी क्लासमधील इसमांनां दोन वर्षांत एक महिना शिक्षण घ्यावें लागतें. या शिक्षणाच्या काळांत या सैनिकाला प्रत्यक्ष कायमच्या नोकरींतल्या सैनिकाइतका पगार मिळतो.

(ई) शिक्षणाच्या महिन्याखेरीज इतर महिन्यांत रिझर्व सैनिकाला पुढीलप्रमाणें पगार मिळतो:—ए क्लास; दरमहा रु. ७; बी क्लास; दरमहा रु. ४.

(उ) रिझर्व सैनिकाची १९ वर्षांनंतर नोकरींतून सुटका होईल आणि त्याला दरमहा रु. तीन प्रमाणें पेन्शन मिळेल किंवा त्याची इच्छा असल्यास पेन्शनच्या ऐवजी ३०० रुपये ग्रॅच्युइटी मिळेल. अजारीपणामुळें एखादा रिझर्व सैनिक नोकरीला नालायक झाल्यास त्याला तीन पासून सहा महिन्यांच्या पगाराइतकी ग्रॅच्युइटी देण्यांत येते. आणि शिवाय चांगल्या वागणुकीबद्दल कांहीं महिन्यांचा पगार बक्षीस म्हणून देण्यांत येतो.

रिझर्व पायदळ सैन्यांत हल्लीं पुढीलप्रमाणें भरती केलेली आहे:—पायदळ २६४४८, गुरखा सैन्य २०००, पायोनिअर सैन्य १३९९, इंडिपेंडंट पायोनिअर्स ८१, एकूण २९९२४.

निशाणदार सैनिक (सिग्नल सर्व्हिस):—या सैन्यशाखेंत लष्कराच्या मुख्य ठिकाणीं सैन्यभरती केली जाते आणि शिक्षण दिलें जातें. या सैन्यावरील मुख्य अधिकाऱ्याला सिग्नल ऑफिसर—इन्—चीफ असें म्हणतात.

आणि तो जनरल स्टाफ ब्रँचला जोडलेला असतो. हिंदी लष्कराच्या मुख्य ठिकाणीं तो राहतो आणि निशाणासंबंधाच्या सर्व प्रश्नांवर तज्ज्ञ या नात्यानें त्याचा सल्ला घेतला जातो. सर्व ठिकाणांच्या निशाणांवर देखरेख ठेवण्याची जबाबदारी त्याच्यावर असते. याशिवाय प्रत्येक आर्मी-कमांडच्या कचेरींत एकेक चीफ सिग्नल ऑफिसर असतो. सिग्नल ट्रेनिंग सेंटर आणि डेपो हल्लीं जबलपूर येथें आहे. तेथें एक लेफ्टनंट कर्नल हा मुख्य अधिकारी असून त्याच्या हाताखालीं इतर ब्रिटिश आणि हिंदी नोकर असतात.

निशाणदळाचे निरनिराळे प्रकार पुढीलप्रमाणें आहेत.

| | | |
|---|---|---|
| कॅव्हलरी ब्रिगेड सिग्नल ट्रुप्स | युनिट्स | ४ |
| डिव्हिजनल सिग्नल्स | ,, | ७ |
| कोअर सिग्नल्स | ,, | २ |
| सिग्नल पार्क्स | , | २ |

याशिवाय एक आर्मीसिग्नलस्कूल असून एक वायरलेस ट्रेनिंग सेक्शन आहे.

रॉयल टँक कोअरः—१९२१ सालीं चिलखती गाड्यांच्या सहा कंपन्या हिंदुस्थानांत आल्या आणि आणखी दोन कंपन्या १९२४-२५ सालीं आल्या. याप्रमाणें हल्लीं चिलखती गाड्यांच्या आठ कंपन्या आहेत. टँककोअरचें मुख्य ठिकाण अहमदनगर येथें असून टँक कोअरमधील इसमांनां तेथेंच शिक्षण दिलें जातें. दोन चिलखती गाड्या मिळून एक पोटभाग आणि दोन पोटभाग मिळून एक भाग होतो व एका भागाचा अधिकारी एक कॅप्टन किंवा सब् ऑल्टर्न हा असतो. तीन भाग (सेक्शन) मिळून एक कंपनी बनते. कंपनीवरचा मुख्य अधिकारी मेजर हा असतो. प्रत्येक चिलखती गाडींत एक व्हिकर्स मशीनगन असतें.

| अधिकारी | टँककोअर सेंटर | आर्मर्ड कार कंपनी |
|---|---|---|
| ब्रिटिश ऑफिसर | १९ | १२ |
| ब्रिटिशेतर नोकर | ४९ | १४४ |
| अनुयायी | १९ | ३७ |
| मोटारगाड्या | १ | २ |
| मोटारं सायकली | ४ | ६ |
| चिलखती गाड्या | ९ | १६ |
| लॉरीज | १२ | १० |

मेडिकल सर्व्हिसः—हिंदुस्थानांतील लष्करी मेडिकल सर्व्हिसमध्यें पुढील प्रकारची व्यवस्था आणि नोकर आहेत.—(अ) हिंदुस्थानांत काम करणारे रॉयल आर्मी मेडिकल कोअरचे अधिकारी आणि इतर नोकर. (आ) लष्करी नोकरींतअसलेले इंडियन मेडिकल सर्व्हिसमधील अधिकारी. (इ) इंडियन मेडिकल डिपार्टमेंट; याच्या दोन शाखा आहेतः (१) आसिस्टंट सर्जन्स (२) सबआसिस्टंट सर्जन्स, (ई) हिंदुस्थानाकरितां असलेली क्वीन अलेक्झांड्रा मिलिटरी नार्सिंग सर्व्हिस. (उ) इंडियन ट्रुप्स मेडिकल सर्व्हिस. (ऊ) इंडियन हॉस्पिटल कोअर.

या यादीपैकीं रॉयल आर्मी मेडिकल कोअरचे अधिकारी आणि नोकर, इंडियन मेडिकल डिपार्टमेंटचे असिस्टंट सर्जन आणि हिंदुस्थानाकरितां असलेल्या क्वीन अलेक्झांड्रा मिलिटरी नर्सिंग सर्व्हिसमधील नोकर यांचें काम ब्रिटिश सैन्यामधील लोकांनां वैद्यकीय उपचार करण्याचें असतें, आणि इंडियन मेडिकल सर्व्हिस मधील अधिकारी, इंडियन मेडिकल डिपार्टमेंट मधील सब् असिस्टंट सर्जन आणि इंडियन ट्रुप्स नर्सिंग सर्व्हिसमधील नोकर यांचें काम हिंदी सैनिकांनां वैद्यकीय उपचार करण्याचें असतें. इंडियन हॉस्पिटल कोअर वरील दोन्ही शाखांनां मदत करते.

इंडियन आर्मी सर्व्हिस कोअर आण मेकॅनिकल-ट्रान्स्पोर्ट सर्व्हिसः—इंडियन आर्मी सर्व्हिस कोअर हा ब्रिटिश सैन्यांतील रॉयल आर्मी सर्व्हिस कोअरचा पूरक भाग आहे. ह्या भागाची वाढ पूर्वकाळांतील कॉमिसरीएट डिपार्टमेंटमधून झाली आहे. याच्या पूर्वी हेंच काम सप्लाय अँड ट्रान्स्पोर्ट कोअर या नांवाच्या खात्याकडून होत असे. इंडियन आर्मी सर्व्हिस कोअरची व्यवस्था कार्टर मास्तर जनरल हा अधिकारी पाहतो, आणि तो कार्टर मास्तर जनरलच्या डिपार्टमेंटपैकीं एक मुख्य अधिकारी असतो.

इंडियन आर्मीसर्व्हिसकोअरच्या मुख्य दोन शाखा आहेत (अ) सप्लाय, आणि (आ) ॲनिमल ट्रान्स्पोर्ट. व तिच्या मदतीला मेकॅनिकल ट्रान्स्पोर्ट सार्व्हिस. सप्लाय शाखेमध्यें पुढीलप्रमाणें नोकर असतात.—किंग्ज कमिशनचे ऑफिसर १४१, हिंदी ऑफिसर २०, इतर दर्जाचे ब्रिटिश नोकर ३३१, सिव्हिलिअन ६७९, अनुयायी (फॉलोअर्स) २८९५, एकूण ४०६६.

ह्या शाखेमध्यें सर्व डेपो आणि एडन, काश्मीर व इराणी आखात येथील तुकड्या धरून एकंदर खेंचरांची संख्या १८४४३, उंटांची संख्या १२४८० आणि घोड्यांची संख्या ७५० आहे.

ॲनिमल ट्रॅन्स्पोर्ट यूनिट्समध्यें नोकरांची वर्गवारी पुढीलप्रमाणें आहे:— किंग्ज कमिशनचे ऑफिसर ७९, इतर दर्जाचे ब्रिटिश नोकर ७९, हिंदी ऑफिसर १९६, सिव्हिलिअन १४२, शिलेदार सारवान २५६०, हिंदी नॉन कमिशन्ड ऑफिसर व ड्रायव्हर १३९२४, आर्टिफिशर आणि फॉलोअर २१६२, एकूण १८७३८.

मेकॅनिकल ट्रॅन्स्पोर्ट शाखेमध्यें पुढील सामान असतें:— मोठया लॉरी:- चार सर्व्हिस सेक्शन म्हणजे युद्धाच्या वेळीं ६ केडर सेक्शन रणभूमीवर नेण्यास पुरतील इतक्या. हलक्या लॉरी—७ सर्व्हिस सेक्शन, ७ केडर सेक्शन.

लष्करी सामान वाहून नेण्याकरितां वाहनें पुरविण्याखेरीज आर्मर्ड कार कंपन्या, टँक कोअर सेंटर, सॅपर्स अँड मायनर्स, सिग्नल कोअर, हॉस्पिटलें आणि फील्ड मेडिकल यूनिट्स करितां मोटार अँब्यूलन्स कन्व्हॉय, आणि इतर किरकोळ कामाकरितां वाहनें पुरविण्याचें काम मेकॅनिकल ट्रॅन्स्पोर्ट सर्व्हिसच करतें. याशिवाय मीडियम आर्टिलरीमधील तोफा ओढण्याकरितां व इतर कामें करण्याकरितां मेकॅनिकल ट्रॅन्स्पोर्ट कंपन्या व सेक्शन्स असतात. शिवाय या शाखेचें एक सेंट्रल ट्रेनिंग स्कूल, सेंट्रल स्टोअर्स डेपो, मोबाईल रिपेअर युनिट्स आणि वर्कशॉप इतक्या गोष्टी असतात. यांपैकीं सर्वांत महत्त्वाचें मोठाल्या दुरुस्तीचें काम करणारें वर्कशॉप महायुद्धानंतर चकला येथें बांधण्यांत आलें आहे. इंडियन आर्मीसर्व्हिस कोअरप्रमाणें मेकॅनिकल ट्रॅन्स्पोर्ट सर्व्हिस या शाखेची व्यवस्था सप्लाय अँड ट्रॅन्स्पोर्टचा डायरेक्टर हा अधिकारी पाहतो आणि त्याच्यावर नियंत्रण क्वार्टर मास्टर जनरलचें असतें. मोटार सायकली शिवाय हल्लीं या शाखेंत एकंदर १८५८ वाहनें आहेत. त्यांपैकीं १०८८ शांततेच्या काळांत सुद्धां उपयोगांत आणली जातात आणि ७७० वाहनें जादा रिझर्व म्हणून ठेविलेलीं आहेत.

हल्लीं मेकॅनिकल ट्रॅन्स्पोर्ट ही शाखा इंडियन आर्मी सर्व्हिस कोअरचा प्रत्यक्ष भाग मानली जात नाहीं. या शाखेमधील अधिकारी मुख्यत: रॉयल आर्मी सर्व्हिस कोअरमधून नेमले जातात. कारण मेकॅनिकल ट्रॅन्स्पोर्ट या शाखेंतील कामाचें शिक्षण देण्याची सोय हिंदुस्थानांत नाहीं. तथापि या शाखेंतील ऑफिसरांत इंडियन आर्मीमधील किंग्जकमिन्शड ऑफिसरमधून कांहीं इसम नेमले जातात. दुय्यम दर्जाचे ब्रिटिश नोकर रॉयल आर्मी सर्व्हिस कोअरमधून नेमले जातात. शिवाय व्हॉइसरॉयच्या कमिशनचे कांहीं हिंदी अधिकारी असतात, आणि ड्रायव्हर वगैरे इतर कामें करणारे लोक हिंदीच असतात. शिवाय आर्टिफिशर व फॉलोअर म्हणून बिन लढाऊ हिंदी लोक पुष्कळ असतात. या शाखेंतील नोकरांचे प्रकार व संख्या पुढीलप्रमाणें आहे. किंग्ज कमिशनचे ऑफिसर १४९, इतर दर्जाचे ब्रिटिश नोकर ५३३, हिंदी, ऑफिसर व इतर दर्जाचे नोकर २१०९,सिव्हिलियन ३२५ हिंदी आर्टिफिशर १२५३, अनुयायी(फॉलोअर)१०६३, एकूण ५४२८.

ऑर्डनन्स सर्व्हिसेस:—याचा अर्थ सैन्याला लढाईकरतां लहान हत्यारें (स्मॉल आर्म्स) तोफा, दारूगोळा व इतर लढाऊ सामान पुरविणारी शाखा असा आहे. शिवाय अलीकडे या शाखेला कपडे आणि इतर सामान्य स्टोअर्स (इंजिनिअरिंग स्टोअर्सखेरीज) पुरविण्याचें काम करावें लागतें.

रीमाऊंट आणि व्हेटेरिनरी सर्व्हिसेस:—रीमाउंट शाखेंतील नाकरांनां पुढील महत्त्वाचीं कामें करावीं लागतात. (१) हिंदी घोडदळाला घोडे वगैरे सामान पुरविणें, (२) उंठ व बैल पुरविणें,(३) ६८३४४जनावरांची खाण्यापिण्याची वगैरे निगा राखणें,(४) सर्व हिंदुस्थानांत युद्धाच्या वेळीं वाहतुकीच्या कामाला उपयोगी पडण्यासारख्या सर्व जनावरांची मोजदाद ठेवणें, (५) युद्धाच्या वेळीं सैन्याच्या सर्व शाखांनां लागणाऱ्या वाहतुकीच्या जनावरांची जमवाजमव करणें, (६) युद्धाच्या व शांततेच्या दोन्ही वेळीं वाहतुकीचीं सर्व जनावरें चांगल्या स्थितींत राखण्याची खबरदारी घेणें, (७) १९२२ सालीं तयार केलेल्या रीमाऊंट स्क्वाड्रनची व्यवस्था ठेवणें, (८) जनावरांच्या निपजेसंबंधीं व्यवस्था ठेवणें व घोडयांच्या निपजेकरतां नवें ठिकाण तयार करणें.

या शाखेची व्यवस्था युनायटेड किंगडममधील रीमाउंट सर्व्हिस शाखेंतील व्यवस्थेच्या पद्धतीवरच केलेली आहे. त्यांत पुढीलप्रमाणें अधिकारी आहेत: एक डायरेक्टर आणि एक डेप्युटी डायरेक्टर मिळून रीमाउंट डायरेक्टरेट आर्मी हेडक्वार्टर्समध्यें असते. प्रत्येक कमांडच्या हेडक्वार्टर्समध्यें ४ रीमाउंट इन्स्पेक्टर असतात. सर्कल्समधील रीमाउंट्सकरतां डेप्युटी असिस्टंट डायरेक्टर असतात. रीमाऊंट डेपोकरतां ४ सुपरिंटेंडेंट असतात. घोडयांची निपज करण्याचीं जीं ठिकाणें आहेत त्यांच्याकरतां ६ डिस्ट्रिक्ट रीमाऊंट ऑफिसर असतात.

१५ असिस्टंट रीमाऊंट ऑफिसर आणि ९ व्हेटेरिनरी ऑफिसर असतात.

आर्मी व्हेटेरिनरी कोअर, हिंदुस्थान:-या खात्याकडे युद्धाच्या व शांततेच्या वेळीं ब्रिटिश घोडदळांतील व हिंदी घोडदळ आणि तोफखाना यांतील जनावरांची शुश्रूषा करण्याचें काम असतें. या शाखेमध्यें रॉयल आर्मी व्हेटेरिनरी कोअरचे ऑफिसर असतात. याशिवाय व्हेटेरिनरी असिस्टंट्स आणि आर्मी व्हेटेरिनरी सर्व्हिसमधील कारकुनीचें काम करणारे नोकर असतात.

हिंदुस्थानांतील आर्मी व्हेटेरिनरी कोअरचे १२ भाग आहेत. एकेक भाग कांहीं महत्त्वाच्या लष्करी ठाण्यांतील व्हेटेरिनरी हॉस्पिटलमध्यें ठेवलेला असतो.

नोकरीच्या अटी:-इंडियन आर्मीमधील अटी पुढील प्रमाणें आहेत:-घोडदळ-सैन्यांत चार वर्षें नोकरी. तोफखाना-सैन्यांत चार वर्षें नोकरी. सॅपर्स अँड मायनर्स कोअर सैन्यांत चार वर्षें नोकरी, इंडियन सिग्नल कोअर-सैन्यांत चार वर्षें नोकरी. पायदळ आणि पायोनिअर्स (गुरखासमूह-चौथे हजारा पायोनिअर आणि पायदळांतील सरहद्दीपलीकडील इसम खेरीजकरून)-सैन्यांत पांच वर्षें नोकरी आणि रिझर्व सैन्यांत दहा वर्षें. गुरखातुकडया, चौथे हजारा पायोनिअर आणि पायदळांतील सरहद्दीपलीकडील सैनिक- ४ वर्षें सैन्यांत नोकरी. इंडियन आर्मी सर्व्हिस कोअरमधील ॲनिमल ट्रॅन्स्पोर्ट शाखेंतील नोकर (मॅकॅनिकल ट्रॅन्स्पोर्टचे ड्रायव्हर आणि आर्मी व्हेटेरिनरी कोअरमधील सर्व लढाऊ लोक)- ६ वर्षें सैन्यांत नोकरी आणि ४ वर्षें रिझर्व सैन्यांत. वर्क्स कोअरमधील सर्व लढाऊ इसम- २ वर्षें सैन्यांत नोकरी. बँड्स मेन (म्यूझीशिअन ट्रंपेट; ड्रमर, ब्यूगलर, फाइफर व पाइपर) १० वर्षें सैन्यांत नोकरी. वर्क्समध्यें ज्यांचें नांव नोंदलें आहे आणि जे बिनलढाऊ इसम आहेत त्यांच्याखेरीज सर्व स्कूलमास्तर, क्लार्क, आर्टिफिशर, आर्मरर, इंजिन ड्रायव्हर, फेरिअर, सुतार, शिंपी, बूट करणारे चांभार यांची १० वर्षें सैन्यांत नोकरी.

सैन्यांत नोकरी करण्यासंबंधानें जी मुदत दिली आहे ती वाढवितां येते. लढाऊ लोकांचीं रिझर्व सैन्यामध्यें नांवें नोंदतां येतात. रिझर्व सैन्यांत रहाण्यासंबंधाच्या मुदतीचे नियम ठरलेले आहेत.

फ्रांटियर मिलीशिआ आणि लेव्ही कोअर:-हीं मुलकी (सिव्हिल) स्वरूपाचीं सैन्यें आहेत. म्हणजे त्यांची व्यवस्था मुलकी अधिकारी पाहतात आणि पगारीह तेच देतात, सैन्यांतील अधिकारी देत नाहींत. तथापि या सैन्यावरील अधिकारी रेग्यूलर इंडियन आर्मीमधील ऑफिसर असतात. हें सैन्य वायव्यसरहद्दीवरील लढाऊ कामाच्या उपयोगाकरितां तयार करण्यांत आलें. हल्लीं त्यांत पुढील प्रकारांचा समावेश होतो:-कुरम मिलीशिया, टोची स्काऊट्स, गिलगिट स्काऊट्स, दक्षिण वझिरिस्तान स्काऊट्स, चित्रळ स्काऊट्स, झोब लेव्ही कोअर, आणि मेकटन लेव्ही कोअर.

आक्झिलियरी फोर्स:-महायुद्धानंतर हिंदुस्थानांतील यूरोपियन ब्रिटिश प्रजाजनांनां लष्करी शिक्षण देण्याचा प्रश्न निघाला, तथापि सक्ति नसावी असें ठरलें. हिंदुस्थानांत भरपूर ऑक्झिलियरी सैन्य असणें जरूर असल्यामुळें ऐच्छिक तत्त्वावर भरती करून बऱ्या प्रकारचें लष्करी शिक्षण देण्याची व्यवस्था करण्याकरितां १९२० मध्यें हिंदुस्थानांतच उपयोग करण्याच्या उद्देशानें आक्झिलियरी फोर्स तयार करण्याचा कायदा पास करण्यांत आला. या फोर्समध्यें फक्त यूरोपियन ब्रिटिश प्रजाजनांनांच घेतात, व त्यांच्या शिक्षणादिकांबद्दल स्पष्ट नियम केलेले आहेत. शिक्षण वयोमानानें कमजास्त देतात. तरुणांनां अधिक प्रमाणावर शिक्षण देऊन जास्त वयाच्या इसमांनां फक्त बंदूक मारण्याचें शिक्षण देतात. या सैन्याकडून काम कोणत्या प्रकारचें घ्यावयाचें तें स्थायिक परिस्थितीनुरूप स्थानिक लष्करी अधिकारी एका ॲडव्हायसरी कमिटीच्या सल्लयानुसार ठरवितात. ॲक्झिलियरी सैन्यांत घोडदळ, पायदळ, तोफखाना व एंजिनियर या सर्व शाखांचा समावेश केलेला आहे. रेल्वे बॅटेलिअन, मशीन गन कंपन्या आणि आर. ए. एस्. सी. सेक्शन्स त्यामध्यें आहेत. या सैन्यावर स्थानिक लष्करी अधिकाऱ्यांची हुकमत चालते व अडचणीच्या प्रसंगीं कामगिरीवर बोलावण्याचा अधिकार त्यांनां असतो. शिक्षण सर्व वर्षभर चालू असतें व शिक्षणाच्या प्रत्येक दिवसाचा पगार ठराविक दरानें मिळतो; शिवाय बोनस मिळतो. कोणाहि सैनिकास चार वर्षें पुरीं झाल्यावर किंवा वयाचीं ४५ वर्षें भरल्यावर सैन्यांतून नांव कमी करतां येतें. त्याशिवाय ॲडव्हायसरी कमिटीच्या शिफारशीवरून केव्हांहि नांव कमी करतां येतें.

इंडियन टेरिटोरियल फोर्स:-लष्करी नोकरींत हिंदी लोकांची भरती करण्याचें जें धोरण आहे त्या धोरणाचें एक अंग टेरिटोरिअल फोर्स हें आहे. ज्या लोकांचा

लष्करी नोकरी हा परंपरागत धंदा नाहीं अशा लोकांनां लष्करी नोकरींत शिरण्याची जी आकांक्षा असते ती पुरी करण्याकरितां वरीलप्रकारचें सैन्य उभारण्याचें ठरविण्यांत आलें आहे. रेग्युलर हिंदी सैन्याला मदत म्हणून या प्रकारचें सैन्य तयार करण्याचें ठरलें आहे. हा उद्देश असल्यामुळें केवळ स्थानिक उपयोगाकरितां किंवा हिंदुस्थानच्या रक्षणाकरितां लढण्यापेक्षां अधिक कामगिरी करण्याची जबाबदारी या सैन्यावर आहे. जरूरीच्या प्रसंगीं हिंदुस्थानाबाहेर समुद्रापलीकडे लढाईवर जाण्याचा प्रसंग या फौजेवर येईल. महायुद्धाच्या वेळीं इंडियन डिफेन्स फोर्स म्हणून जें सैन्य तयार करण्यांत आलें होतें त्याच हिंदी सैन्याचें शांततेच्या काळांतल इंडियन टेरिटोरिअल फोर्स हें स्वरूप आहे. या सैन्याची उभारणी इंग्लंडांतील जुन्या मिलीशिआ सैन्याच्या पद्धतीवर केली आहे. वर्षांतून कांहीं काळपर्यंत असें लष्करी शिक्षण अनेक वर्षें देत राहणें ही या पद्धतींतली महत्त्वाची गोष्ट आहे. या पद्धतीनें इंडियन टेरिटोरिअल फोर्सच्या युनिट्सनां शांततेच्या काळांत भरपूर शिक्षण मिळून पुढें युद्धाच्या वेळीं रेग्युलर सैन्याप्रमाणें त्यांचा लढाईच्या कामीं उपयोग करून घेतां येईल.

इंडियन टेरिटोरिअल फोर्समध्यें हल्लीं दोन प्रकार आहेत: एक प्रॉव्हिन्शिअल बॅटेलिअन्स आणि दुसरा युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कोअर बॅटेलिअन्स. या दुसऱ्या प्रकारामध्यें हिंदुस्थानांतील युनिव्हर्सिट्यांमधील नोकर व विद्यार्थी घेतल जातात. त्यांचा लष्करी शिक्षणक्रम ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या देखरखीखालीं वर्षभर चालू असतो. युनिव्हर्सिटीपासून त्याचा संबंध तुटला कीं या सैन्यांतूनहि त्यांचें नांव कमी करण्यांत येतें. युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कोअरच्या बॅटेलिअनमधील लोकांनां प्रत्यक्ष लष्करी नोकरी करण्यास भाग पाडण्याचा उद्देश नाहीं. या लष्करी शिक्षणाचा उद्देश तरुणांनां शिस्त लागून लष्करी बाणा त्यांच्या स्वभावांत यावा येवढाच आहे. तथापि प्रॉव्हिन्शिअल बॅटेलिअन्समध्यें सैनिक व अधिकारी म्हणून पुरवठा होण्याला याचा उपयोग व्हावा असाहि एक दुय्यम हेतु आहे.

प्रॉव्हिन्शिअल बॅटेलिअन्समधील इसमांनीं लष्करी नोकरी केली पाहिजे अशी जबाबदारी त्यांनीं पत्करलेली असते. प्रथम अशा प्रकारचीं सात बॅटेलिअनें तयार करण्यांत आलीं. तेव्हांपासून ही संख्या हल्लीं वीसपर्यंत वाढली आहे. आणि अशा रीतीनें या प्रयत्नाला कल्पनेपेक्षां अधिक यश आलेलें आहे. या सैन्याला साहाय्यभूत म्हणून आणखी कांहीं युनिट्स तयार करून अशा सैन्याची संख्या आणखी वाढविण्याचा विचार आहे. हल्लीं हें सैन्य फक्त पायदळ जातीचेंच आहे. पण घोडदळ, तोफखाना वगैरे शाखाहि या सैन्याला जोडण्याचा विचार आहे.

प्रॉव्हिन्शिअल बॅटेलिअन्समध्यें लोक सहा वर्षांच्या मुदतीनें नांवें नोंदवितात. कांहीं इसमांनां ही मुदत चार वर्षांचीच असते. पहिली मुदत संपल्यावर पुन्हां तितक्याच मुदतीपर्यंत नांव चालू ठेवतां येतें. या सैन्यांतील इसमाला पहिल्या वर्षीं २८ दिवस प्राथमिक शिक्षण मिळतें आणि पुढें प्रत्येक वर्षीं नियतकालिकपणें २८ दिवस शिक्षण देण्याचा क्रम चालू राहतो.

इंडियन स्टेट फोर्स (हिंदी संस्थानिकांचें सैन्य):—याला पूर्वी इंपीरिअल सर्व्हिस ट्रूप्स हें नांव होतें. हें सैन्य जमविणें आणि राखणें हें काम हिंदी संस्थानिक स्वतःच्या खर्चानें स्वतःच्या संस्थानांतच करतात. अडचणीच्या प्रसंगीं हें संस्थानी सैन्य हिंदुस्थानसरकारच्या मदतीला पाठविण्यांत येतें व अशा या सैन्याची पुष्कळ प्रसंगीं मोठी महत्त्वाची लष्करी मदत ब्रिटिश सरकारला झालेली आहे. तथापि अशा तऱ्हेची मदत करणें ही गोष्ट पूर्णपणें हिंदी संस्थानिकांच्या आणि राजांच्या युक्तायुक्त बुद्धीवर अवलंबून असते. ब्रिटिश सरकारनें हिंदी संस्थानिकांनां लष्करी शिक्षण देऊन सैन्य तयार करण्याच्या बाबतींत सल्ला व मदत देण्याकरितां मिलिटरी ॲडव्हायसर व असिस्टंट मिलिटरी ॲडव्हायसर या नांवाच्या ब्रिटिश अधिकाऱ्यांची कायमची योजना केलेली असते. महायुद्ध संपल्यानंतर ब्रिटिश सरकारप्रमाणें हिंदी संस्थानिकांनींहि आपल्या फौजेची पुनर्रचना करण्याचें काम हातीं घेऊन त्याप्रमाणें बऱ्याचशा सुधारणा घडवूनहि आणल्या आहेत. या सुधारणांपैकीं एक महत्त्वाची बाब अशी आहे कीं हिंदी संस्थानी सैन्यामध्यें पुढील तीन प्रकार करण्याचें ठरलें आहे: ए क्लास:—या क्लासमधील सैन्य हल्लीं इंडियन आर्मीच्या पद्धतीप्रमाणें तयार केलेलें असून त्याला हत्यारेंहि रेग्युलर इंडियन आर्मीमधील हत्यारांप्रमाणेंच दिलेलीं असतात. बी क्लास.—या प्रकारचें सैन्य लष्करी शिक्षण आणि शिस्त यांच्या बाबतींत ए क्लासमधील सैन्यापेक्षां जरा कमी प्रतीचें असतें. त्याची रचना महायुद्धपूर्वकालीन पद्धतीप्रमाणें

असून त्याचीं युद्धसाधनेंहि कमी दर्जाचीं असतात. सी क्लासः—या क्लासमध्यें मुख्यतः मिलीशिया पद्धतीची फौज असते. हें सैन्य कायम नोकरींत नसतें. याचें शिक्षण, शिस्त आणि हत्यारें बी क्लासाप्रमाणेंच असतात.

हिंदी संस्थानी सैन्याची एकंदर संख्या १९२३ च्या आक्टोबरमध्यें पुढीलप्रमाणें होतीः—घोडदळ ७४९९, पायदळ १५४६४, तोफखाना ७१८, सॅपर्स ८३१, उष्ट्रदळ (कॅमल कोअर) ७३४, ट्रेन्सपोर्ट कोअर १७८४, एकूण २७०३०.

लष्करी अधिकारीः—हिंदी सैन्यामध्यें अधिकाऱ्यांचे मुख्य दोन प्रकार आहेतः एक किंग्ज कमिशन मिळालेले अधिकारी आणि दुसरा प्रकार व्हॉइसरॉयचें कमिशन मिळालेले अधिकारी. दुसऱ्या प्रकारांत सर्व अधिकारी हिंदी असतात. त्यांचे अधिकार आणि दर्जा मर्यादित स्वरूपाचा असून ते इंडियन आर्मी ॲक्ट या कायद्यानें आण त्या कायद्याला धरून केलेल्या नियमाप्रमाणें ठरलेले आहेत. पूर्वीं किंग्ज कमिशनें मिळण्याला हिंदी लोक लायक समजले जात नसत पण हल्लीं ही नालायकी दूर करण्यांत आलेली आहे.

हिंदी सैन्यामध्यें राजाचें कमिशन मिळालेल्या अधिकाऱ्यांची दोन मार्गांनीं भरती होतेः एक सँढर्स्ट येथील रॉयल मिलिटरी कॉलेजमध्यें परीक्षा पास झालेल्या कॅडेटमधून आणि दुसरी ब्रिटिश फौजेमधील अधिकाऱ्यांची हिंदी फौजेंत केलेली बदली. सँढर्स्ट कॉलेज हेंच अधिकाऱ्यांचें भरती करण्याचें मुख्य साधन आहे. परंतु त्या कॉलेजांतील कॅडेटमधून भरपूर अधिकारी न मिळाल्यास वरील दुसऱ्या साधनानें भरती केली जाते. सँढर्स्ट कॉलेजमधील परीक्षा पास झाली आणि त्याला राजाचें कमिशन मिळालें म्हणजे त्याची प्रथम हिंदुस्थानांतील ब्रिटिश बॅटेलिअन किंवा रेजिमेंटमध्यें एक वर्षाच्या मुदतीनें नेमणूक होते, आणि अनॲटेच्ड लिस्टमध्यें त्याचें नांव दाखल करण्यांत येतें. एक वर्षानंतर हिंदी सैन्याच्या रेजिमेंटमध्यें किंवा बॅटेलिअनमध्यें कंपनी ऑफिसर किंवा स्क्वाड्रन ऑफिसर या जागीं त्याची नेमणूक होते. सैन्याचीं मुलकी स्वरूपाचीं कामें करणाऱ्या खात्यामध्यें प्रत्यक्ष लढाईचा अनुभव असलेल्या अधिकाऱ्यांचीच नेमणूक होते. कारण त्या खात्यांतील अधिकाऱ्यांना लढाईचा प्रत्यक्ष अनुभव असणें जरूर असतें. राजाचें कमिशन मिळालेल्या इसमांना सैन्यामध्यें लेफ्टनंट कर्नलच्या जागेपर्यंतचे निरनिराळे हुद्दे नोकरीच्या मुदतीच्या मानानें (टाइम स्केल) मिळत जातात. तथापि या बढतीलाहि कांहीं लष्करी कामाच्या परीक्षा द्याव्या लागतात. सामान्यपणें लेफ्टनंट कर्नलची जागा सैन्यामध्यें २६ वर्षें नोकरी झाल्यानंतर मिळते. यापुढील वरिष्ठ दर्जाच्या जागा विशेष लायकीप्रमाणें निवड करून दिल्या जातात.

हिंदी अधिकारीः—गेल्या महायुद्धामुळें जे कित्येक महत्त्वाचे निर्णय लागले त्यांपैकीं एक निर्णय असा आहे कीं, सैन्यामध्यें राजाचें कमिशन मिळण्याला हिंदी इसमहि लायक समजले जावे. हिंदी इसमांना राजाचीं कमिशनें पुढील तीन मार्गांनीं मिळावीं असें सुचविण्यांत आलें: (१) सँढर्स्ट येथील रॉयल मिलिटरी कॉलेजमध्यें शिकून कॅडेट ही पदवी मिळाल्यानें, (२) हिंदी रेजिमेंट्समध्यें जमादाराच्या हुद्यापासून चढत आलेल्या हिंदी नॉन कमिशन्ड अधिकाऱ्यांच्या लायकीप्रमाणें निवड करून व (३) ज्यांनीं प्रत्यक्ष युद्धामध्यें चांगली कामगिरी बजावली आहे, पण ज्यांना राजाचें कमिशन मिळण्यास लागणारें वय व शिक्षणविषयक लायकी नाहीं अशा हिंदी अधिकाऱ्यांना सन्मानादाखल राजाचीं कमिशनें दिल्यानें. व्हॉइसरायचें कमिशन मिळालेले जे हिंदी अधिकारी असतात त्यांच्यांपैकीं कांहींना हल्लीं दरसाल राजाचें कमिशन सन्मानार्थ देण्याची पद्धत सुरू झाली आहे. वरीलपैकीं दुसरा मार्ग हल्लीं बहुतेक बंद पडलेला आहे. वरील तीन मार्गांपैकीं पहिल्या मार्गानें मात्र हिंदी इसमांना ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या बरोबरीनें लष्करी हुद्दे प्राप्त करून घेण्याची महत्त्वाकांक्षा पुरी करून घेण्याला भरपूर संधि मिळते. प्रथम असें ठरविण्यांत आलें कीं, तूर्त सँढर्स्ट कॉलेजमध्यें दहा जागा हिंदी इसमांकरितां राखून ठेवण्यांत याव्या.

यानंतर सरकारनें एक आणखी अशी योजना केली आहे कीं, ज्या हिंदी इसमांना सँढर्स्ट कॉलेजमध्यें जाऊन राजाचें कमिशन मिळविण्याची लायकी संपादावयाची असेल त्यांना प्राथमिक लष्करी शिक्षण घेण्याकरितां डेहराडून येथें प्रिन्स ऑफ वेल्सचें रॉयल इंडियन मिलिटरी कॉलेज ही सरकारी संस्था स्थापन केली आहे. हल्लीं या डेहराडून कॉलेजमध्यें जास्तींत जास्त ७० विद्यार्थी ठेवण्याची सोय असून तेथील शिक्षणक्रम ६ वर्षांचा आहे. डेहराडूनच्या या सोयीमुळें सँढर्स्ट कॉलेजांतून दरसाल दहा जागा भरण्याची सोय झाली आहे. १९२३ सालीं असें ठरविण्यांत आलें कीं, हिंदी सैन्यापैकीं पुढील

दहा यूनिट्समध्यें सर्व अधिकारी हिंदी इसम नेमण्यांत यावे; ७ वी लाइट कॅव्हलरी, १६ वी लाईट कॅव्हलरी, २।१ ली मद्रास पायोनीयर्स; ४।१९ वी हैद्राबाद रेजिमेंट; ९ वी रॉयल बॅटोलियन; ९ वी मराठा लाइट इन्फंट्री; १।७ वी रजपूत रेजिमेंट (क्यू. व्ही. ओ. एल्. आय्.); १।१४ वी पंजाब रेजिमेंट; २१ वी पंजाब रेजिमेंट.

लष्करी शिक्षण संस्था:—लष्करी नोकरांनां उच्च शिक्षण देण्याकरितां आणि युनिटस्नां लष्करी शिक्षण देण्याचें काम करणारांनां शिक्षण देण्याकरितां हिंदुस्थानांत पुढील शिक्षण संस्था आहेत:—स्टाफ कॉलेज (क्वेटा); सीनियर आफिसर्स स्कूल (बेळगांव); स्कूल ऑफ आर्टिलरी (कक्कूल); इक्विटेशन स्कूल (सागर); दोन स्मॉल आर्म्स स्कूल्स (पंचमढी व सातारा); स्कूल ऑफ फिजिकल ट्रेनिंग (अंबाला); मशीनस्कूल, (अहमदनगर); आर्मीसिग्नलस्कूल, (पुणें); रॉयल टँक कोअर स्कूल (अहमदनगर); ब्रिटिश आर्मी स्कूल ऑफ एज्यूकेशन (बेळगांव); इंडियन आर्मी स्कूल ऑफ एज्यूकेशन (वेलिंग्टन); आर्मी स्कूल ऑफ कुकरी (पुणें); दोन आर्मी व्हेटेरिनरी स्कूल्स (अंबाला व पुणें); इंडियन आर्मी सर्व्हिस कोअर ट्रेनिंग एस्टाब्लिशमेंट (रावळपिंडी). या संस्थांचा उद्देश असा आहे कीं, सैन्यामध्यें वॉरंट आफिसर, नॉन कमिशन्ड आफिसर, व इतर नोकरांच्या जागांकरितां अगदीं आजतागायतच्या सुधारणासह पूर्ण असें लष्करी शिक्षण मिळालेल्या इसमांचा भरपूर पुरवठा व्हावा.

हिंदुस्थानांतील सरकारी विमानदळ (रॉयल एअर फोर्स):—हिंदुस्थानांतील रॉयल एअरफोर्सवर हिंदुस्थानच्या कमांडर—इन—चीफचा ताबा असतो. या विमानदळाचा उपयोग हिंदी साम्राज्याच्या संरक्षणाकरितां करतात. या विमानदळाच्या खर्चाचें अंदाजपत्रक हिंदुस्थानच्या एकंदर लष्करी अंदाजपत्रकांतच सामील केलेलें असतें. विमानदळाचा मुख्य अधिकारी एअर व्हाईस-मार्शल या नांवाचा असतो. त्याचा दर्जा सैन्यांतील मेजर-जनरलच्या बरोबरीचा असतो. विमानदळाची मुख्य कचेरी हिंदी लष्कराच्या मुख्य कचेरीच्या ठिकाणींच म्हणजे हिंदुस्थानच्या राजधानीच्या ठिकाणीं असते. विमानदळाच्या मुख्य अधिकाऱ्याच्या हाताखालीं कामगारांच्या तीन शाखा असतात; (१) एअर स्टाफ, (२) टेक्निकल, (३) स्टोअर्स. या शाखांतील नोकर लष्करांतील नोकरांप्रमाणेंच असतात. मुख्य ठाण्याखेरीज इतर ठाणीं पुढीलप्रमाणें आहेत. (१) वुइंग कमांड्स, (२) एअर क्रॅफ्ट डेपो व (३) एअर क्रॅफ्ट पार्क.

वुइंग कमांड्स:—ह्या पेशावर, रिसालपूर आणि क्वेटा अशा तीन ठिकाणीं आहेत. वुइंग कमांडर हा अधिकारी लष्करांतील लेफ्टनंट कर्नलच्या दर्जाचा असतो. त्याच्या हाताखालीं इतर अधिकारी असतात. प्रत्येक वुइंगच्या ठाण्यांत सात अधिकारी आणि चाळीस इतर दर्जाचे नोकर असतात.

स्क्वाड्रन्स:—विमानदळाची एकंदर सहा स्क्वाड्रन्स आहेत; त्यांपैकीं पांच क्वेटयापासून रिसालपूरपर्यंत पसरलेलीं आहेत, आणि एक स्क्वॉड्रन अंबाला येथें ठेविलेलें आहे. एका स्क्वाड्रनमध्यें तीन फ्लाइट्स असतात, आणि एका फ्लाइट्समध्यें चार विमानें असतात. याप्रमाणें प्रत्येक स्क्वाड्रनमध्यें शांततेच्या काळांत बारा विमानें असतात. प्रत्येक स्क्वाड्रनच्या ठाण्याला त्या स्क्वाड्रनला लागणारे सर्व अधिकारी आणि खालच्या दर्जाचे नोकर राहतात. तसेंच तेथें एक वर्कशॉप, आर्मरी आणि इक्विपमेंट स्टोअर्स असतात. सहा स्क्वाड्रन्सपैकीं दोन स्क्वाड्रन्समध्यें 'डी हॅव्हीलँड ९ ए' या प्रकारचीं विमानें असतात. त्यांचें काम दूरवर टेहेळणी करणें आणि बॉंब गोळ्यांचा मारा करणें हें असतें. बाकीच्या चार स्क्वाड्रनमध्यें ब्रिस्टल फाइटर या जातीचीं विमानें आहेत. त्यांचें काम लष्करच्या कामांत मदत करणें हें आहे. प्रत्येक स्क्वाड्रनच्या कचेरींत सहा अधिकारी असतात, आणि दुसरे पंधरा अधिकारी विमानें चालविण्याच्या कामावर असतात. या योजनेमुळें प्रत्येक फ्लाईटमध्यें एक रिझर्व अधिकारी असतो.

एअर क्रॅफ्ट डेपो:—या डेपोमध्यें रॉयल एअर फोर्सला लागणाऱ्या सर्व सामानसुमानाचा साठा ठेवलेला असतो. विमानदळाला लागणारें यांत्रिक सामान युनायटेड किंग्डममधून हिंदुस्थानांत येतें आणि तें प्रथम या डेपोमध्यें साठवून ठेवतात. तसेंच मुख्य वर्कशॉप आणि रिपेअर शॉप याच ठिकाणीं असून यंत्रांच्या सर्व प्रकारच्या दुरुस्त्या आणि विमानांच्या सर्व प्रकारच्या दुरुस्त्या येथेंच करण्यांत येतात. हा डेपो कराची येथें स्थापिलेला आहे. यास कराचीचें हें ठिकाण निवडण्याचें कारण कराचीची हवा अशी आहे कीं, त्याठिकाणीं यूरोपियन कारागिरांनां एका वर्षापैकीं बहुतेक दिवस राहून चांगल्या प्रकारें काम करतां येतें, आणि दुसरें कारण असें आहे कीं कायरो—बगदाद—हिंदुस्थान असा जो विमानमार्ग आंखण्याची योजना चालू आहे तो मार्ग हिंदुस्थानांत कराची येथें शिरणार. ही विमानमार्गाची योजना

सफळ झाल्यास कराची येथें विमानदळाचें मोठें ठाणें असणें जरूर आहे.

एअर क्रॅफ्ट पार्कः–हें एअर क्रॅफ्ट डेपो आणि स्काड्रन्स यांनां जोडणारें मध्यस्थ ठिकाण आहे. डेपोमध्यें आलेला माल एअर क्रॅफ्ट पार्कच्या मार्फत प्रत्येक स्काड्रनकडे पोंचविला जातो. शांततेच्या काळांत एअर क्रॅफ्ट पार्क लाहोर येथें स्थापिलेलें आहे. युनायटेड किंग्डममधून आलेल्या नवीन विमानांचे सुटे भाग जोडून तीं उभीं करण्याचें काम येथें करण्यांत येतें. तसेंच किरकोळ दुरुस्त्याहि येथेंच करतात. मोठ्या दुरुस्तीचें काम मात्र येथें करीत नाहींत.

विमानदळांतील नोकरः–हिंदुस्थानांतील विमानदळामध्यें युनायटेड किंग्डमच्या रॉयल एअर फोर्समधील अधिकारी, नॉन कमिशन्ड अधिकारी आणि एअरमेन असतात. शिवाय हिंदी आर्टिफिशर्स आणि मेकॅनिक्स असतात. हे अधिकारी या खात्याच्या व्यवस्थेचें, विमानें चालविण्याचें आणि यांत्रिक स्वरूपाचीं सर्व कामें करितात, पण प्रत्येकाला विमान चालविण्याचें काम येणें आवश्यक असतें. नॉन कमिशन्ड ऑफिसरांनां पायलटचें काम सांगावें असा विचार चालू आहे, पण हल्लीं नॉन कमिशन्ड अधिकारी आणि एअरमेन यांत्रिक कामच करतात. नॉन कमिशन्ड ऑफिसर स्काड्रनमध्यें, एअर क्रॅफ्ट डेपोमध्यें आणि पार्कमध्यें कामावर असतात. यांत्रिक काम करणारे हिंदी नोकर डेपो व पार्क यांमध्यें असतात. त्यांच्यामध्यें सुतार, फिटर, हत्यारें दुरुस्त करणारे, मशिनिस्ट, फॅब्रिक वर्कर वगैरे प्रकारचे लोक असतात. हिंदुस्थानांतील रॉयल एअर फोर्समध्यें २१८ ऑफिसर, १७९७ ब्रिटिश नॉन कमिशन्ड ऑफिसर आणि एअरमेन आणि १३८ हिंदी इसम असतात. याशिवाय युनायटेड किंग्डममधीलप्रमाणें हिंदुस्थानांतल्या विमानदळाला जोडून एक वैद्यकीय (मेडिकल) नोकरवर्गहि आहे.

हिंदुस्थानांतील सैन्याकरितां रिझर्व्ह ऑफिसरः–महायुद्धापूर्वी अशा प्रकारचे रिझर्व ऑफिसर मृत्यूमुळें रिकाम्या झालेल्या अधिकाऱ्यांच्या जागीं नेमण्याकरितां ठेवलेले असत. परंतु महायुद्धांत सदरहू संख्या पुरेशी नव्हती असें आढळून आलें, म्हणून १९२२ मध्यें रिझर्व ऑफिसरांसंबंधानें पुढील नियम करण्यांत आले–(अ) पुढील इसमांनां रिझर्व ऑफिसर म्हणून कमिशन देण्याचें ठरलें: (१) राजाचीं कमिशनें मिळालेले पण सैन्यांतील नोकरीची मुदत संपली असलेले अधिकारी. (२) हिंदुस्थानसरकारच्या लष्करी नोकरींत असलेले माजी लष्करी अधिकारी. (३) हिंदुस्थानांत राहणारे खासगी गृहस्थ. (आ) ज्यांनां रेग्युलर आर्मीमध्यें आय्. ए. आर. ओ. किंवा आय्. डी. एफ्. मध्यें कमिशन मिळालेलें नाहीं अशा लोकांनां रिझर्व कमिशनें देऊं नयेत. (इ) अशा रिझर्व ऑफिसरांनीं सरसाल तीस दिवस ऑक्झिलिअरी फोर्समध्यें किंवा रेग्युलर सैन्यामध्यें शिक्षण घ्यावें. (ई) अशा अधिकाऱ्यांनां तीस दिवसांच्या शिक्षणाबद्दल पगार आणि भत्ता यांच्या ऐवजीं ७५० रुपये मिळावे.

हिंदी लढाऊ जातीः–महायुद्धापर्यंत हिंदी सैन्यांत फक्त उत्तर हिंदुस्थानांतील लोकांचीच भरती करण्यांत येत असे परंतु गेल्या महायुद्धांतील अनुभवानें इतर प्रांतांतील लोकांची लढवय्येपणासंबंधी योग्यता सरकारला कळून आली, आणि त्यामुळें अलीकडे अनेक जातींचे लोक सैन्यांत घेण्यांत आले आहेत. महायुद्धापूर्वी घोडदळ आणि पायदळ या दोहोंमध्यें शीख लोकांचा भरणा विशेष असे आणि गुरखे लोकहि पुष्कळ असत. हल्लीं या दोन जातींचीच संख्या अधिक आहे. शिवाय घोडदळ आणि पायदळ या दोहोंमध्यें निरनिराळ्या मानववंशांतील मुसुलमानांची संख्या पुष्कळ आहे. हे मुसुलमान लोक उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांतील, तसेच सरहद्दीपलीकडीलहि आहेत. हे अत्यंत लढवय्ये आणि काटक असतात. मुसुलमानांचें घोडदळ पौरस्त्य देशांतील इतर कोणत्याहि जातीपेक्षां अधिक श्रेष्ठ ठरतें. कारण हे लोक घोड्यावर बसण्यांत आणि हत्यारें वापरण्यांत फार वाकबगार असतात. शीख व मुसुलमान यांच्या खालोखाल नेपाळच्या गुरखे लोकांची संख्या आहे. महायुद्धाच्या सुरवातीच्या सुमारास २० बॅटेलिअनें गुरखे लोकांचीं होतीं. हल्लीं ही संख्या बरीच वाढली आहे. लढवय्येपणांत वायव्य सरहद्दीवरील पठाणांपेक्षांहि गुरखे लोक अधिक सरस ठरतात. हिंदुस्थानांतील लढाऊ जात म्हणून रजपूत लोक फार प्राचीनकाळापासून प्रसिद्ध आहेत. हे लोक शरीरानें बळकट व देखणे असून जुन्या बंगाल आर्मीमध्यें मुख्य भरणा यांचाच होता. रजपूत लोकांचीं पुष्कळ बॅटेलिअनें आहेत. गढवाली हें नांव डोंगराळ मुलुखांत रहाणाऱ्या रजपूत लोकांनां आहे. हे लोकहि मोठे शूर असतात. जाट लोक ही हिंदूपैकींच एक लढाऊ जात आहे. व ते दिल्ली व रोहटक या जिल्ह्यांत आणि त्यांच्या आसपासच्या प्रदेशांत

राहतात. हे लोक यूरोपांतील रणभूमीवरहि उत्तम सैनिक असल्याचें सिद्ध झालें आहे. डोग्रा हे लोक पंजाबांतील डोंगराळ मुलुखांत राहतात. त्यांनीं फ्लँडर्स व मेसापोटेमिया येथील लढायांत चांगली कामगिरी केली. गेल्या महायुद्धांत ज्यांनीं चांगली संस्मरणीय कामगिरी बजाविली अशा लोकांपैकीं दक्षिण व कोंकण यामधील मराठे हे एक आहेत. त्यांनीं गेल्या युद्धांत आपली लायकी सिद्ध केल्यामुळें त्यांची यापुढें सैन्यांत मोठ्या प्रमाणांत भरती केली जाईल. याशिवाय दक्षिण व इतर हिंदुस्थानच्या भागांतील हलक्या जातींचे लोक पायोनियर रेजिमेंट्स आणि सॅपर्स व मायनर्स या सैन्यशाखांत घेण्यांत आले होते. त्यांनीं ज्या मोहिमांत भाग घेतला होता त्या सर्वांत त्यांनीं चांगली कामगिरी बजाविली.

महायुद्धांतील हिंदुस्थानच्या कामगिरीचा सारांश:— १९१९ सालीं कमांडर इन चीफनें जो खलिता प्रसिद्ध केला त्यांत हिंदी सैन्यानें महायुद्धांत बजाविलेल्या एकंदर कामगिरीचें सिंहावलोकन केलें आहे. त्यामध्यें हिंदुस्थाननें मनुष्यबळ किती पुरविलें याचे आंकडे पुढीलप्रमाणें आहेत:—महायुद्धाच्या सुरवातीस हिंदी सैन्य रिझर्व सैन्य धरून १९४००० होतें. महायुद्धकालीं सर्व लष्करी शाखा मिळून नवी भरती ७९१००० इसमांची करण्यांत आली. आणि सर्व मिळून एकंदर संख्या ९८५००० झाली. या संख्येपैकीं ५५२००० लोक हिंदुस्थानाबाहेर समुद्रापलीकडे पाठविण्यांत आले होते. महायुद्धापूर्वी सैन्यांतील बिनलढाऊ लोकांची संख्या ४५ हजार होती. त्यामध्यें ४२७००० लोकांची आणखी भर घालण्यांत आली आणि त्यांपैकीं ३९१००० इसम समुद्रापलीकडे कामगिरीवर पाठविण्यांत आले होते. येणेंप्रमाणें लढाऊ व बिनलढाऊ मिळून हिंदी लोकांची एकंदर संख्या १४५७००० होती त्यापैकीं ९४३००० लोक समुद्रापलीकडे कामगिरीवर गेले होते. यापैकीं १०६५९४ लोक निकामी झाले. त्यापैकीं ३६६९६ इसम एकंदर सर्व कारणानीं मिळून मरण पावले.समुद्रापलीकडे पाठविलेल्या जनावरांची संख्या १७५००० होती.

## लढाऊ आणि इतर नोकरवर्ग

| | लढाऊ इसम (रॉयल एअर फोर्ससह) | इतर नोकर |
|---|---|---|
| ब्रिटिश ऑफिसर्स | ४४६७ | २३६५ |
| इतर ब्रिटिशदर्जा | ६६०७८ | ५०८९ |
| हिंदीं ऑफिसर्स व इतर हिंदी दर्जे | १४४६१७ | २५८९३ |
| इतर | २०४९० | ३८५५७ |
| एकूण | २३५६५२ | ७१९०४ |

राष्ट्रसंरक्षणार्थ लागणाऱ्या खर्चाच अंदाजपत्रक:— हिंदुस्थानच्या रक्षणाकरितां जो खर्च लागतो त्यांपैकीं कांहीं भाग इंग्लंडमध्यें खर्च होतो. ती रक्कम सैन्य मरीन व लष्करी कामें यांच्या खर्चासंबंधीच्या पुढील कोष्टकावरून दिसून येईल (एप्रिल १९२० पासून दोन शिलिंगाचा एक रुपया हा हुंडणावळीचा भाव धरलेला आहे.

## संरक्षक सैन्याच्या खर्चाचें वर्गीकरण

### हिंदुस्थानमधील खर्च

| | १९२२-२३ पक्के हिशेब | १९२३-२४ दुरुस्त अंदाज | १९२४-२५ अंदाज |
|---|---|---|---|
| [अ.] खडें सैन्य. | | | |
| (१) इफेक्टिव्ह सर्व्हिसेस— | | | |
| खडें सैन्य खर्च. | ३०२९९४ | २९११४८ | २६४०४६ |
| शिक्षण, दवाखाने डेपो वगैरे खर्च | ९४०६९ | ९२४५२ | ८२७२० |
| आर्मी हेडक्वार्टर्स कमांड्सचे अधिकारी. | २१४४० | २०४०३ | २०५१९ |
| स्टॉक अकाउंट. | –२९८६४ | –३५४९९ | –१४७३८ |
| स्पेशल सर्व्हिसेस. | ५४५८२ | २१६४१ | ५७९५ |
| संकीर्ण खर्चाच्या बाबी. | १९४७८ | १३३७५ | १८३८६ |
| अन् ॲड्जस्टेड खर्च | –२४८४ | ... | .... |
| एकूण इफेक्टिव्ह सर्व्हिसेस. | ४६०१७५ | ४०३५२० | ३९६७२८ |
| (२)नॉन इफेक्टिव्ह सार्व्हिसेस— | | | |
| नॉन इफेक्टिव्ह चार्जेस. | ५९२७५ | ५६४९७ | ५३८८६ |
| [आ] ऑक्झिलिअरी व टेरिटोरिअल फोर्सेस— | | | |
| इफेक्टिव्ह. | ९५४६ | १०१८७ | १११९५ |
| [इ] रॉयल एअर फोर्स—इफेक्टिव्ह. | ११०५५ | १३२५८ | १२९९७ |
| नॉन इफेक्टिव्ह. | .... | ६२ | ५ |
| एकूण— | | | |
| इफेक्टिव्ह. | ४८०७७६ | ४२६९६५ | ४२०९२० |
| नॉन इफेक्टिव्ह. | ५९२७५ | ५९५५९ | ५३८९१ |
| एकूण | ५४००५१ | ४८३५२४ | ४७४८२१ |

### इंग्लंडमधील खर्च

| | १९२२-२३ पक्के हिशेब | १९२३-२४ दुरुस्त अंदाज | १९२४-२५ अंदाज |
|---|---|---|---|
| [अ.]खडें सैन्य:– (१) इफेक्टिव्ह सर्व्हिसेस:– | | | |
| खडे सैन्य, खर्च. | ३१९६८ | २९७३५ | २६९४५ |
| शिक्षण, दवाखाने वगैरे खर्च. | २३५० | २५२६ | १९६५ |
| आर्मीहेड्क्वार्टर्स.– कमांड्सचे अधिकारी. | ५१२ | ४२० | ४२० |
| स्टॉक अकाऊंट. | १८१३४ | ११६०५ | १५७५९ |
| स्पेशल सर्व्हिसेस. | ४५३६ | ८००० | १०५०० |
| संकीर्ण खर्चाच्या बाबी. | ७४०१ | ७२८८ | ६३८० |
| एकूण इफेक्टिव्ह सार्व्हिसेस. | ६४९०१ | ५९५७४ | ६१९६९ |
| (२)नॉन इफेक्टिव्ह सर्व्हिसेस:– | ३४२२५ | ३६२४८ | ३७४८२ |
| [आ] रॉयल एअर फोर्स:— इफेक्टिव्ह. | ७८८३ | ५७०६ | ४५४८ |
| एकूण | १०७००९ | १०१५२८ | १०३९९९ |
| एकूण सैन्याचा खर्च– | | | |
| इफेक्टिव्ह. | ५५३५६० | ४९२२४ | ४८७४३७ |
| नॉन इफेक्टिव्ह. | ९३५०० | ९२८०७ | ९१३७३ |
| एकूण | ६४७०६० | ५८५०५२ | ५७८८१० |

### संरक्षणखर्चाचा ठोकळ आढावा

| | १९२२-२३ पक्के हिशेब | १९२३-२४ दुरुस्त अंदाज | १९२४-२५ अंदाज |
|---|---|---|---|
| सैन्य. | ६४७०६० | ५८५०५२ | ५७८८१० |
| मरीन. | १३९९९ | ९८६५ | ९१६८ |
| लष्करी कामें. | ४९००० | ४४४५५ | ४२०३८ |
| एकूण | ७१००५९ | ६३९३७२ | ६३००१६ |

ईस्ट इंडीज स्क्वॉड्रन:–१९०३ पासून रॉयल नेव्हीचें एक स्क्वॉड्रन ‘ ईस्ट इंडीज स्क्वॉड्रन ’ या नांवानें हिंदी महासागरांत ठेवण्यांत आलें आहे. त्यांतील लढाऊ जहाजांची संख्या वेळोवेळीं कमजास्त होते. १९०३ सालीं या स्क्वॉड्रनमध्यें एक सेकंडक्लास व तीन त्याहून लहान क्रूझरें आणि चार स्लूप्स किंवा गनबोटी होत्या. १९०६ मध्यें ही संख्या कमी करण्याचें ठरल्यामुळें दोन सेकंडक्लास व दोन थर्डक्लास क्रूझरेंच फक्त ठेवण्यांत आलीं व हीच संख्या १९१० पर्यंत कायम होती. त्या सालीं एक सेकंडक्लास क्रूझर परत नेऊन त्याऐवजीं दोन लहान जहाजें ठेवण्यांत आलीं आणि भूमध्यसमुद्रामधील जहाजांपैकीं ३ क्रूझरें इराणी आखातांतील हत्यारांचा व्यापार बंद करण्याकरितां मदतीस पाठविण्यांत आलीं. १९१३ मध्यें ईस्ट इंडीज स्क्वॉड्रनची सुधारणा करण्यांत आली. स्विफ्टशुअर नांवाचें बॅटलशिप सेकंडक्लास क्रूझरच्या ऐवजीं ठेवण्यांत आलें, आणि पार्सिअसऐवजी एक अलीकडील सेकंडक्लास क्रूझर ठेवण्यांत आलें.

१९२३ मधील स्क्वॉड्रन:–अगदीं अलीकडे या स्कॉड्रनमध्यें पुढीलप्रमाणें जहाजें आहेत:–साऊदॅम्टन ( फ्लॅग ), लाईट क्रूझर–५४०० टन; कोलंबो लाईट क्रूझर–४१९० टन. कायरो लाईटक्रूझर–४१९० टन. स्लूप्स-क्रोकस व सीक्लॅमेन. स्पेशल सार्व्हिस व्हेसल–ट्रायड ( एस्. एन्. ओ. पर्शियन गल्फ ).

ब्रिटिश साम्राज्यांतील डोमिनियन्सनीं आरमारी खर्चाकरितां पुढीलप्रमाणें खर्च सोसला आहे. हिंदुस्थान–१००००० पौंड, इंडियन ट्रूप्स सर्व्हिस करितां खर्च ३४०० पौंड आणि इराणी आखातांतील बंदोबस्ताकरितां खर्च ६४०० पौंड. डोमीनियन ऑफ कानडा–१०८०० पौंड. आस्ट्रेलियन कामनवेल्थ -४९३००पौंड. डोमिनियन ऑफ न्यूझीलंड–१००००० पौंड. साऊथ आफ्रिकन यूनियन–८५००००पौंड. न्यूफौंडलंड–३००० पौंड.

रॉयल इंडियन मरीन:–या हिंदुस्थान सरकारच्या ताब्यांतील आरमाराचा मूळ उगम १६१२ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीनें सुरतेस वखार घातली तेव्हांपासून डच व पोर्तुगीज लोकांपासून व हिंदी चांचे लोकांपासून ब्रिटिश व्यापाराचें व ठाण्यांचें संरक्षण करण्याकरितां झाला. प्रथम ड्रेगन व होसींडर हीं दोन लढाऊ जहाजें कॅप्टन बेस्ट याच्या हुकमतीखालीं इंग्लंडांतून पाठविण्यांत आलीं. तेव्हांपासून निरानिराळ्या नांवांखालीं हें आरमार हिंदुस्थानसरकारनें कायम राखलें

आहे तीं नांवें:—नामदार ईस्ट इंडिया कंपनीचें आरमार (१६१२ ते १६८६); बॉम्बे मरीन(१६८६ ते १८३०); इंडियन नेव्ही मरीन(१८३० ते १८६३); बॉम्बे मरीन (१८६३ ते १८७७); एच्. एम्. इंडियन मरीन (१८७७ ते१८९२) व तेव्हांपासून रॉयल इंडियन मरीन.

या आरमाराची युद्धविषयक कामगिरी:—१६१२ ते १७१७ पर्यंत हें आरमार डच, पोर्तुगीज व हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील चांचे लोक यांच्याशीं लढत होतें. इ. स. १७४४ मध्यें फ्रान्सबरोबरच्या युद्धांत या आरमारानें फ्रेंचांचीं जहाजें व चंद्रनगर हें शहर काबीज केलें. यानें इ. स. १७५६ मध्यें घेरिआचा किल्ला घेऊन १७७४ त मराठायुद्धामध्यें ठाणें शहरहि काबीज केलें. पुढें १८ व्या शतकांत या आरमाराचें फ्रेंचांशीं व डच लोकांशीं युद्ध होऊन पाँदिचेरी, त्रिंकोमाली, जाफनापाटम, कोलंबो वगैरे शहरें काबीज करण्यांत आलीं. इ. स. १८०१ मध्यें वरील आरमार सर रॅल्फ ॲबरक्रॉंबी याच्या हाताखालीं होतें. १८०३ मध्यें पुन्हां फ्रान्सशीं युद्ध झालें. इ. स. १८१० त मॉरिशस बेट काबीज करून कांहीं फ्रेंच जहाजें या आरमाराकडून लुइस बंदरीं पकडलीं गेलीं. १९ व्या शतकाच्या प्रारंभाला, पर्शिअन आखातांतील जोवास्मी चांचे लोकांचा बंदोबस्त करण्यांत आला. १८११ मध्यें तारा शहर काबीज केलें. १८१३ मध्यें सांबरच्या सुलतानाविरुद्ध स्वारी. १८१७–१८ मध्यें मराठायुद्ध होऊन सुवर्णदुर्ग किल्ले काबीज केले. १८१९ मध्यें चांचेगिरी करणाऱ्या लोकांनां हांकलून देण्याकरितां पर्शिअन आखातावर स्वारी केली. १८२० मध्यें मोचा शहर काबीज केलें. १८२१ मध्यें बेनि-बू-अलिआरब याच्यावर स्वारी करण्यांत आली. १८२४ २९ मध्यें पहिलें ब्रह्मीयुद्ध झालें. १८२७ मध्यें बेरबेरा आणि सोमाली कोस्ट यांनां वेढा घातला. १८३९ त बेनियस पिरॅटर याचा पराभव झाला. १८३८ मध्यें अफगाणिस्तानवर स्वारी केली व कराची काबीज केलें. १८३८ त एडन शहर घेतलें. चीनमध्यें १८४० ते ४२ पर्यंत युद्ध चालू होतें. १८४३ मध्यें शिंद्यांशी युद्ध, मिआनी येथील लढाई व हैद्राबाद शहर काबीज केलें. न्यूझीलंडमध्यें १८४५ ते ४६ पर्यंत मौरी युद्ध चालू होतें. १८४८ ते ४९ त पंजाबांतील युद्ध होऊन मुलतान शहरास वेढा घातला. १८५२ सालीं दुसरें ब्रह्मीयुद्ध होऊन त्यांत रंगून, मार्ताबान, बस्सीन, प्रोम आणि पेरू हीं शहरें काबीज केलीं. १८५५ मध्यें पर्शिअन युद्ध झालें व त्यांत बुशायर, मुहामेरा आणि अहवाझ हीं शहरें घेतलीं. १८५६ ते ५७ पर्यंत चीनमध्यें युद्ध चालू होतें. १८५७-५९ हिंदुस्थानांत बंडाळी चालू होती. १८५९ मध्यें बेयट बेट काबीज केलें. १८६० मध्यें कँटन, टाकू किल्ले, फाटसन आणि पेकिन या ठिकाणीं चीनमध्यें युद्ध झालें. १८७१ त ॲबिसीनियन युद्ध होऊन १८८२ त ईजिप्तवर मोहीम केली. १८८५ त ईजिप्तवर मोहीम झाली व ब्रह्मी लोकांशीं तिसरें युद्ध झालें. १८८९ त चीनलशाई व १८९६ त सुआकिन यांवर स्वाऱ्या झाल्या. इमतिबें व मोंबासा या पूर्व आफ्रिकेंतील दोन शहरांवर १८९७ त स्वारी केली. १८९९ ते १९०२ पर्यंत दक्षिण आफ्रिकेंत युद्ध चालू होतें. १९००-१९०१ या अवधींत बॉक्सरचें बंड झालें व पेकिन शहराचा वेढा उठविला. १९०२ ते १९०४ मध्यें सोमालीलँडवर स्वारी व १९१२-१४ मध्यें इराणी आखातांतील हत्यारें करणाऱ्या कारखान्यांनां बंदी केली.

रॉयल इंडियन मरीनची महायुद्धांतील (१९१४–१८) कामगिरी:—ब्रिटिश सैन्याच्या आणि आरमाराच्या मानानें हें नाविक दळ लहान असलें तरी गेल्या महायुद्धांत यानें फार महत्त्वाची कामगिरी बजावली. महायुद्धप्रारंभापासून १९१८ च्या फेब्रुवारीपर्यंत या दळावरील मुख्य अधिकारी कॅप्टन (हल्लीं रिअर-ॲडमिरल) डब्ल्यू. लुम्सडेन हा होता व नंतर कॅप्टन विल्सन हा नेमला गेला. या दळाची पहिली कामागिरी मुंबई, कलकत्ता, एडन, कराची व रंगून येथें लष्करी तपासणी करणें ही होय. रॉयल इंडियन मरीनच्या मोठाल्या जहाजांपैकीं बहुतेकांस सशस्त्र बनवून रॉयल नेव्हीच्या ताब्यांत ऑक्झिलियरी क्रूझरें म्हणून दिलीं. या जहाजांवर पूर्वीचेच हिंदी व यूरोपीय इसम नोकरींत कायम ठेवण्यांत आले व त्यांनीं प्रत्यक्ष लढाईंत भाग घेतला (१९१५). यांपैकीं हार्डिंज या क्रूझरनें सुवेझ कालव्याच्या संरक्षणकार्यांत मदत केली, त्यावेळीं एक तुर्की ८ इंची गोळा या जहाजावर पडून त्याचा कांहीं भाग खराब झाला. कॉमेट नांवाचें क्रूझर तुर्कांनीं १९१६ मध्यें टेसिफोनच्या लढाईंत बुडविलें; आणि लॉरेन्स क्रूझरनें तैग्रीस नदीकांठचें कुर्ना हें ठिकाण घेण्यांत मदत केली.

पण याहून महत्त्वाची कामगिरी समुद्रावरील वाहतूक करण्याची होय. सैन्य, जनावरें व सामानसुमान ईजिप्त मेसापोटेमिया, फ्रान्स व पूर्व आफ्रिका या युद्धक्षेत्रांत

वाहून नेण्याच्या कामांत २६० जहाजें गुंतलीं होतीं, व हें काम रॉयल इंडियन मरीननें उत्तम प्रकारें केलें. तिसरी कामगिरी युद्धांत पकडलेल्या शत्रूच्या जहाजांसंबंधी होय. या जहाजांवरील शत्रुपक्षीय इसम काढून त्यांच्या जागीं आपले नोकर नेमून त्यांचा उपयोग वाहतुकीकडे, युद्धकैदी व जखमी सैनिक नेण्याकडे आणि हॉस्पिटल शिप्स म्हणून करण्यांत आला. खाजगी मालकीचीं व्यापारी जहाजें महायुद्धकाळांत सरकारी सैन्यवाहतुकीच्या कामाला घेतल्यानंतर व्यापारी माल नेण्याआणण्याचें काम कांहीं काळ या शत्रुपक्षीय जहाजांकडूनच घेण्यांत आलें.

हल्लीं रॉयल इंडियन मरीनच्या ताब्यांत डफरिन (८२६० टन), हार्डिंज (६३५०टन), नॉर्थब्रुक(६१००), डलहौसी(२१९५टन), क्लाईव्ह (२१००), मिंटो(११९२), लॉरेन्स (११९२), कॅनिंग (१३१६),स्लेडन (३६०टन). वगैरे जहाजें आहेत.गुदस्ता हिंदुस्थानला स्वतंत्र आरमार देण्याचें सरकारनें जाहीर केलें व त्याचें बिलहि पार्लमेंटांत पास झालें. पण या हिंदी आरमाराचा हिंदुस्थानला खरा उपयोग होईल कीं, नाहीं याविषयीं लोक साशंक आहेत.

लष्कर व सुशिक्षित वर्ग:–हिंदुस्थानच्या सुशिक्षित वर्गांत आपणांस लष्करी शिक्षण हवें अशाबद्दल अलीकडे जागृति उत्पन्न झाली आहे.हिंदुस्थानच्या लोकांनां लष्करी सत्ता मिळाल्याशिवाय राजकीय उन्नति व्हावयाची नाहीं. हिंदी लोकांनां शासनसंस्थाविषयक जबाबदारी घ्यावयाची आहे.तेव्हां लष्करी शिक्षणाची व लष्कराच्या हिंदीकरणाची आवश्यकता फार आहे. सरकारला हीं तत्त्वें मान्य आहेत. पण या गोष्टी अमलांत आणण्याची गति मात्र अगदीं मंद आहे. सैन्याचे कमिशन्ड रँक्समध्यें दोन भाग आहेत: एक म्हणजे व्हाइसरॉयच्या कमिशन्ड रँक्स व दुसरा भाग राजाच्या कमिशन्ड रँक्स, त्यांपैकीं व्हाइसरॉयच्या कमिशन्ड रँक्समध्यें हिंदी लोकांनां जागा मिळत. युद्धानंतर राजाच्या कमिशन्ड रँक्समध्यें सुद्धां हिंदी लोकांनां क्वचित जागा मिळूं लागल्या. राजाच्या कमिशन्ड रँक्समध्यें शिरण्यास सँढर्स्ट कॉलेजमध्यें शिक्षण घ्यावें लागतें व व्हाइसरॉयच्या कमिशन्ड रँक्समध्यें जे ऑफिससे आहेत ते ओळीनें खालपासून वरपर्यंत एकेक पायरी चढत आले आहेत, त्यांचें सँढर्स्ट कॉलेजमध्यें शिक्षण झालें नसलें तरी चालतें. सँढर्स्ट कॉलेजमध्यें हिंदी लोकांकरितां दहा जागा राखून ठेवल्या असून डेहराडूनला एक लष्करी कॉलेज उघडण्यांत आलें आहे आणि तेथील अभ्यासक्रम सहा वर्षांचा आंखण्यांत आला आहे.

परंतु हिंदुस्थानच्या लोकांनां हिंदुस्थानांत सँढर्स्ट कॉलेजच्या धर्तीवरचें कॉलेज पाहिजे. लष्करी शिक्षणाच्या प्रश्नावर वरिष्ठ कायदेमंडळांत कडाक्याचा वादविवाद झाला. तेव्हां सरकारनें या प्रश्नाचा विचार करण्याकरतां एक कमिटी नेमण्याचें कबूल केलें. यानें हिंदी पुढाऱ्यांचेंहि समाधान न होऊन वरिष्ठ कायदेमंडळांत लष्करी कॉलेज काढण्याबद्दल ठरावहि पास केला गेला.

लष्कराचें हिंदीकरण करण्याबद्दल हिंदी लोकांचा आग्रह आहे. हिंदुस्थानसरकारनें आठ युनिट्सचें हिंदीकरण करण्याचें काम सध्यां हातीं घेतलें आहे. परंतु हिंदी लोकांचें म्हणणें असें कीं, लष्कराचें हिंदीकरण यापेक्षां झपाट्यानें झालें पाहिजे व सरकारचें म्हणणें असें कीं, हिंदी लोकांची लायकी वाढली पाहिजे, त्यांच्या हातांत एकदम जबाबदारीच्या जागा देतां येत नाहींत.

टेरिटोरियल फोर्समध्यें २० प्रांतिक पलटणी हिंदीकरणाकरितां राखून ठेवल्या आहेत. व कांहीं पलटणींतील जागा भरावयाच्या राहिल्या आहेत. बऱ्याच पूर्ण भरल्या आहेत. यांत एकंदर १२००० लोक आहेत. या पलटणींकरतां चांगले सुशिक्षित हिंदी लष्करी अधिकारी मिळणें आवश्यक आहे. अशा तऱ्हेचे लायक अधिकारी मिळावे म्हणून कांहीं लोकांनां ठराविक काळपर्यंत निरनिराळ्या पलटणींत ठेवण्यांत येतें. शिवाय टेरिटोरियल फोर्सचा अधिकारीवर्ग तयार होण्याकरतां मुद्दाम कांहीं कोर्सेस ठरविले आहेत व नॉन कमिशन्ड लोकांकरतांहि कांहीं कोर्सेस ठरविले आहेत. याशिवाय युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कोर आहेतच. मुंबई, कलकत्ता, अलाहाबाद, लाहोर, मद्रास, आणि रंगून येथें अशा ६ पलटणी आहेत व त्यांत जाण्याकडे विद्यार्थीवर्गाची प्रवृत्ति दिसून येते. याशिवाय दिल्ली व पाटणा येथें दोन वेगळाले भाग आहेत. आणखी कांहीं दिवस या सैन्याची बळकटी दिसून येण्यास वाट पाहिली पाहिजे.

आक्झिलिअरी कोर्स म्हणजे वेळ पडेल त्या वेळेस कामास येणारें सैन्य; अशा सैन्यांत येणाऱ्यांनां त्यांच्या रिकाम्या वेळेंत म्हणजे उन्हाळ्याच्या सुट्टींत वगैरे शिक्षण मिळण्याची व्यवस्था असते. १९२४ सालीं वरिष्ठ कायदेमंडळांत ऑक्झिलिअरी व टेरिटोरियल सैन्याचें एकत्रीकरण करण्यासंबंधीं एक ठराव आला, व त्यावर चर्चा

झाली.त्या चर्चेच्या वेळीं हिंदी सैनिकांचा दर्जा वाढविण्याकरतां व त्यांची वाढ करण्याकरतां काय उपाय योजावेत याबद्दल तपास करून अहवाल तयार करण्याकरतां एक कमिटी नेमली. त्या कमिटीवर सर जान शी हा अध्यक्ष होता. त्या कमिटीनें अहवाल तयार केला. त्यांत युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कोअरमधील शिक्षण हें लष्करी प्राथमिक शिक्षण समजलें जावें अशी एक शिफारस केली व टेरिटोरियल फोर्सचें शिक्षण हा भावी सैन्याचा पाया होय असें सुचविलें. लष्करी शिक्षणाबाबत कोणावर सक्ति केली जाऊं नये अशीहि शिफारस केली; व युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कोअरमध्यें कॉलेजांतील विद्यार्थीवर्ग व अध्यापक वर्गासहि शिरतां यावें, टेरिटोरियल फोर्सच्या यूनिट्स हिंदी सैन्याप्रमाणेंच केल्या पाहिजेत, आणि ऑक्झिलिअरी फोर्सची रचना ब्रिटिश युनिट्च्या धर्तीवर केली पाहिजे, टेरिटोरियल व ऑक्झिलिअरी सैन्य हिंदुस्थानांत अगर हिंदुस्थानाबाहेर काम करण्यास तयार असलें पाहिजे; टेरिटोरियल फोर्समध्यें दोन भाग केले पाहिजेत; एका भागांत सुशिक्षित लोकांचा व दुसऱ्या भागांत अशिक्षित लोकांचा भरणा व्हावा; आणि सुशिक्षित लोकांच्या भागांत ज्यांनीं पूर्वी युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कोअरमध्यें शिक्षण घेतलें आहे अशांचाच समावेश व्हावा. पहिल्या वर्षी कमीतकमी तीन महिने आणि पुढें दर वर्षास दोन महिने शिक्षण झालें पाहिजे. अशा रीतीनें प्रांतिक पलटणी उत्तमपैकीं तयार झाल्यावर शक्य झाल्यास एखादी घोडेस्वाराची पलटण तयार करावी व तीस पहिल्या वर्षी सहा महिने व पुढें तीन तीन महिने शिक्षण द्यावें. टेरिटोरियल सैन्याची तयारी दुसऱ्या लाइनफोर्सच्या पुढें मुळींच होऊं नये आक्झिलिअरी सैन्याच्या शिक्षणाची मजल वर सांगितल्याच्या पुढें जाऊं नये, याशिवाय पगाराच्या बाबतींत व ॲडव्हायसरी कमिटी नेमण्याच्या बाबतींत कांहीं सूचना कमिटीनें केल्या होत्या. या कमिटीचा अहवाल लोकांस कांहींसा समाधानकारक वाटला. पण व्हाईसरायनें या नियमांस अजून मान्यता दिली नाहीं, व म्हणून ते नियम अजून अमलांत यावयाचे आहेत.

यावरोबरच हिंदी लोक नाविक शिक्षणाची मागणी करीत आहेत. मर्कंटाईल कमिटीपुढील साक्षींत देखील हिंदी लोकांनीं हेंच सांगितलें होतें. हिंदुस्थानाकरितां एक स्वतंत्र आरमार पाहिजे त्याकरतां हिंदी आरमारी अधिकारीवर्ग तयार झाला पाहिजे व तो तयार होण्याकरितां मुंबईस एक वर्ग काढावा व तेथें दोन बोटी ठेवून त्यांवर हिंदी लोकांस शिक्षण द्यावें व रॉयल इंडियन मरीन सर्व्हिस सुरू करावी. कित्येक लोकांचें असें म्हणणें आहे कीं, प्रथमतः सँढर्स्ट कॉलेजमध्यें लष्करी शिक्षण घेऊन मग नाविक शिक्षणास आरंभ करावा व हें नाविक शिक्षण ब्रिटिश आरमारांत द्यावें. या एक दोन बाबतींत थोडे फार मतभेद आहेत.

ब्रिटिश पार्लमेंटमध्यें यासंबंधीं नुकतेंच एक बिल पास झालें असून हिंदी नाविक दळ स्थापन करावयाचें निश्चित झालें आहे. हिंदी लोकांनां आरमार म्हणजे अगदीं अभूतपूर्व वाटेल अशांतला भाग मुळींच नाहीं. वैदिक कालापासून भारतीय नौकानयन व युद्ध यांचे उल्लेख सांपडतात. मोंगलांचें व मराठ्यांचें आरमार उत्कृष्ट होतें याविषयीं पाश्चात्यांनां देखील शंका वाटत नव्हती. भारतीय आरमाराचा इतिहास 'आरमार' लेखांत सांपडेल. यापुढील एका प्रकरणांत भारतीय नौकानयनाविषयीं माहिती दिलेली आढळेल.

आतांपर्यंत ब्रिटिश अमदानींतील सैन्याविषयीं विवेचन केलें. आजची हिंदुस्थानांतील सैन्यव्यवस्था त्यावरून कळून येईल. ब्रिटिश कालापूर्वीच्या लष्करासंबंधीं माहिती मूळ ज्ञानकोशांत 'युद्ध' [भारतीय युद्धकला (य) ४८], 'आरमार', 'तोफखाना', 'दारूगोळा' या नांवाखालीं दिली आहे. तेव्हां याठिकाणीं ती पुन्हां देण्याची जरूरी नव्हती.सैन्याच्या हिंदीकरणाबद्दल नुकत्याच स्कीनकमिटीनें केलेल्या सूचना अंमलांत आणावयाचें ठरलें आहे. तेव्हां कांहीं वर्षांत सैन्यांत मोठमोठाल्या अधिकारांवर हिंदी लोकांचें बरेंच प्रमाण आढळून येईल व तसेंच कॉलेजांतूनहि लष्करी शिक्षण सक्तीचें होईल असें वाटतें.

---

## प्रकरण ६ वें.

## हिंदुस्थानचे शासनसत्तात्मक विभाग

## अथवा प्रांतवर्णन.

हिंदुस्थानच्या शासनसत्तात्मक विभागांत हिंदुस्थानसरकारचे (ब्रिटिश) प्रांत, हिंदुस्थान सरकारच्या अंकित असलेलीं संस्थानें, इतर यूरोपियन राष्ट्रांचे प्रांत व सरहद्दीवरील प्रदेश येतील. मुंबई, मद्रास, बंगाल वगैरे ब्रिटिश सरकारच्या प्रांतांसंबंधीं सामान्य माहिती त्या त्या प्रांतनामाखालीं शरीरखंडांत दिलेलीच आहे. फक्त

प्रत्येक प्रांताच्या घटनेचा किंवा रचनेचा इतिहास येथें द्यावयाचा आहे, तो ओळीनें प्रांतवार देऊं.

**मुंबई,** इ ति हा स.–प्राचीन काळीं आर्य लोक सिंधुनदाच्या कांठीं वस्ती करून रहात होते. त्यावेळीं द्रविड लोक पश्चिमकिनाऱ्यावर किल्ल्यांत व खेड्यांत रहात असत. त्यांनां नेहमीं लागणाऱ्या घरगुती धंद्यांचे ज्ञान होतें. ते भूतपिशाचपूजक होते. त्यांच्या मुख्य देवतेचें नांव 'को' असें होतें. खिस्तपूर्व १००० या सुमारास आफ्रिका व बाबिलोन या भागांशीं येथील लोकांनीं व्यापारसंबंध ठेविला होता. इराणच्या आखाताच्या मार्गानें त्यांनां विटा करणें, ब्राह्मी मुळाक्षरें, राशी, नक्षत्रें वजनें वगैरे यांचें उपयुक्त ज्ञान प्राप्त झालें असें संशोधकांचें मत आहे. इराणी लोकांनीं जेव्हां सिंधुनदाच्या लगतचा प्रदेश जिंकला, त्यावेळेस पाषाणशिल्प, नाणीं पाडणें या कला या देशांत आल्या असाव्यात.

मौर्यवंशीय अशोकाच्या सत्तेखालीं म्हैसूरपर्यंत सर्व मुलूख होता. त्यावेळीं पश्चिमभाग उज्जनीच्या सुंभ्याकडे होता. या वेळीं पश्चिमभागांत आर्यसंस्कृतीची छाप लोकांच्या चालीरीतींत दिसून येत होती व येथील लोक हिंदु झाले होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. याच काळीं ग्रीक साम्राज्याशीं हिंदुस्थानचा व्यापार चालू होता. अशोकमागून "बॅक्ट्रीयन, ग्रीक, अपोलोडोटस व मिन्यांडर यांचें राज्य सिंध व काठेवाडांत असावें असा इतिहासकारांचा तर्क आहे. मौर्यामागून पैठणच्या (गोदावरीच्या काठीं) सातवाहनांच्या राज्यांत नाशिक व पश्चिमघाटापर्यंतचा मुलूख मोडत असे (खिस्तपूर्व १९०). हे राजे आंध्र या नांवानें प्रसिद्ध आहेत. खिस्तपूर्व २०० च्या सुमारास सातवाहनांचें राज्य फार भरभराटींत होतें. याच सुमारास सिथियन लोक उत्तर व पश्चिम हिंदुस्थानांत आले.

इ. स. ४० च्या सुमारास रोम शहराशीं पश्चिम हिंदुस्थानाचा व्यापार सुरू झाला. इ. स. १२० ते ३०० पर्यंत गुजराथेंत व उज्जनी येथें क्षत्रपांचें राज्य होतें. ह्यांच्यांत रुद्रदामन् नामक एक प्रसिद्ध राजा होऊन गेला. त्याच्या राज्याचा विस्तार सिंधुनदाच्या मुखापासून तों दमणगंगेच्या मुखापर्यंत होता व अंत:प्रदेशांत मुलतानपासून भेलसापर्यंत त्याच्या राज्याची सरहद्द पसरली होती. दक्षिणेंत दमणगंगेपासून तों बनवासीपर्यंत व पूर्व किनाऱ्यापासून तों पश्चिम किनाऱ्यापर्यंत सातवाहनांचें राज्य होतें. त्याचा लय २१० च्या सुमारास झाला. यावेळीं या राज्यांत धरणकटक (सध्यांचें धर्णीकोट), तेर व पैठण हीं प्रसिद्ध शहरें होतीं. क्षत्रप व सातवाहन यांचें जों पर्यंत सख्य होतें तों पर्यंत जिकडे तिकडे शांतता नांदत होती व व्यापाराची भरभराट होत होती. याच वेळीं मोठमोठ्या रस्त्यांवर लेणीं कोरण्यांत आलीं. क्षत्रप हे जरी परकीय लोक होते तरी त्यांनीं ब्राह्मणी विद्येस अतिशय उत्तेजन दिलें. सातवाहनांनीं प्राकृत भाषेस आश्रय दिला होता. पैठणच्या घराण्याचा ऱ्हास झाल्यावर भडोच हें यूरोपाशीं चालणाऱ्या व्यापाराचें केंद्रस्थान झालें व क्षत्रपांनीं आपल्या राज्याचा विस्तार कल्याणपर्यंत नेऊन भिडविला. २७३ सालीं यूरोपमधील पालमायरा शहराचा नाश झाला व ३०० सालीं क्षत्रपांचें राज्य लयाला गेलें. त्या वेळेपासून यूरोपियन देशाशीं चालू असणाऱ्या व्यापारास उतरती कळा लागली.

चवथ्या शतकापासून पुढें सुमारें १५० वर्षांचा इतिहास बरोबर माहीत नाहीं. गुजराथेंत क्षत्रपांचीं लहान लहान राज्यें होतीं त्यांचा ऱ्हास होऊन मगधचे गुप्त वंशांतले राजे राज्य करूं लागले. देशावर व कोंकणांत अशींच लहान लहान राज्यें असावींत असें तज्ज्ञांचें अनुमान आहे. पांचव्या शतकाच्या उत्तरार्धांत श्वेतहूणांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या व नर्मदेपर्यंतचा सर्व प्रदेश त्यांनीं व्यापिला. काठेवाडांत गुप्तांचें राज्य मोडून तेथें वलभी घराण्यानें आपली सत्ता स्थापन केली (५०० ते ७७०). अगदीं दाक्षिणेंत त्रैकुटांचें राज्य होतें. हे नवीन लोक पुढें हिंदूंमध्यें मोडूं लागले. ब्राह्मण धर्माचें वर्चस्व होऊन बौद्ध धर्माच्या ऱ्हासास सुरवात झाली. इराणी व अरबी संस्कृतीचा ठसा या देशांतील संस्कृतीवर युरोपियन संस्कृतीपेक्षां अधिक उठूं लागला. उत्तरकोंकणांत मौर्य राज्य या कालीं पुरी (मुंबईजवळ) येथें भरभराटींत होतें. दाक्षिणेंत किनाऱ्यावरच्या भागीं बनवासीचे कदंब होते. दाक्षिण महाराष्ट्रांत चालुक्यवंशीय राजे व राष्ट्रकूट यांच्यामध्यें झगडा चालला होता. गुर्जर लोक हूणांबरोबर आले असावेत. त्यांनीं पंजाब, राजपुताना, काठेवाड हे प्रांत जिंकून (५७५–७४०) भडोच येथें राज्य स्थापिलें. हे रजपुतांचे पूर्वज होत असें कांहींचें म्हणणें आहे. कनोजच्या हर्षवर्धन (६०६–४०) राजाचा अंमल सर्वत्र बसण्याचा रंग दिसूं लागला पण हर्षाच्या मृत्यूमुळें तसें घडलें नाहीं. इ. स. ६०० च्या सुमारास चालुक्यांनीं राष्ट्रकूटांचा व त्रैकूटांचा पराभव करून आपल्या राज्याचा विस्तार

वाढविला. यांच्या ताब्यांत ७ व्या शतकांत घाटावरचा प्रदेश (दक्षिण पठार) व कोंकण हे भाग होते. यांच्या धाकट्या पातीचें राज्य कृष्णेच्या मुखाजवळ "वेंगी" येथें होतें.

चालुक्य जरी शिव व विष्णुपूजक होते तरी दक्षिणेंत जैन धर्म चालू होता. वेरूळ व अजिंठा येथें बौद्धसंघ होते. ८ व्या शतकांत मुसुलमानांनीं हिंदुस्थानांत प्रवेश केला (७११). ७५० मध्यें चालुक्यांच्या राज्यास उतरती कळा लागली. मुसुलमानांनीं गुजराथेंत स्वारी करून (७७०) वल्लभी शहराचा नाश केला. या धामधुमींत चावडा रजपुतांनीं अनहिलवाड येथें राज्य स्थापन केलें. त्यांस गुजराथच्या भिनमालांची मदत होती. गुर्जरांनीं राजपुताना—माळवा आपल्या कबज्यांत घेऊन कनोज येथें आपली राजधानी स्थापन केली. या राज्याचीं शकलें होऊन, अजमीर येथें चव्हाणांचें, धार येथें परमारांचें आणि अनहिलवाड येथें चावडांचें अशीं स्वतंत्र संस्थानें झालीं. गुजराथेंत वाङ्मयाचीहि वृद्धि झाली.

राष्ट्रकूटांनीं चालुक्यांचा पाडाव करून (७५०) गुर्जरांच्या तोडीचें नवें राज्य निर्माण केलें. हीं दोन्हीं राज्यें २०० वर्षें अस्तित्वांत होतीं (७५०-९५०). चालुक्यांचा पराभव झाल्यावर ते म्हैसूर प्रांतांत गेले. राष्ट्रकूटांनीं मालखेड (सोलापूर जिल्ह्यांतील) येथें आपली राजधानी केली. राष्ट्रकूट हे शैवमतानुयायी होते. अरब लोकांनां यांच्यांतील वल्लभ राजाची माहीती होती. हा राजा महाराष्ट्रांत अमोघवर्ष या नांवानें प्रसिद्ध होता. या अमदानींत इराणच्या आखातालगतच्या मुलुखाशीं पुन्हां व्यापार सुरू झाला. ७७५ सालीं पार्शी लोक हिंदुस्थानांत आले. ९४१ अथवा ९६१ च्या सुमारास मूळराज सोळंकी नामक गुर्जराधिपतीनें अनहिलवाडचें राज्य आपल्या ताब्यांत घेतलें. ९७३ च्या सुमारास दक्षिण हिंदुस्थानांत राज्यक्रांति झाली. त्यांत चालुक्यांनीं राष्ट्रकूटांचा पाडाव करून कल्याण ही राजधानी करून तेथें आपलें राज्य स्थापन केलें. या कामीं तैल या चालुक्यवंशीय पुरुषानें पुढारीपणा स्वीकारला होता. याच्या बारप्पा नामक अनुयायानें दक्षिण गुजराथेंत राज्य स्थापन केलें.

गुजराथेंत मूळराजाच्या वंशजांनीं अनहिलवाड येथें ११०३ पर्यंत राज्य केलें. हे शैवमतानुयायी असून सोमनाथ हें त्यांचें दैवत होतें. गिरनारचे चूडासमा (९४०—११२५) हे त्यांचे शत्रू होत. अजमीरच्या चव्हाणांनीं यांस बराच त्रास दिला. ११३४ त मूळराजाच्या वंशांतील जो सिंधुराज त्यानें परमारांचा पराभव करून उज्जनी आपल्या ताब्यांत घेतली. त्यांचें व चालुक्यांचें कांहीं काल भांडण झाल्यावर सख्य झालें. १०२६ सालच्या महमद गझनीच्या स्वारीनें यांचा नाश होतो कीं काय अशी भीति वाटत होती पण त्या स्वारीचा चिरस्थायी असा परिणाम झाला नाहीं.

महाराष्ट्रांत ९७३ ते ११५९ पर्यंत कल्याणीचे चालुक्य राजे राज्य करीत होते. यांनीं प्रत्येक प्रांतावर जो सुभा नेमिला त्याजकडे तो प्रांत वंशानुवंश ठेवण्याची पद्धत स्वीकारल्यामुळें हे सुभेदार बलिष्ठ होऊन चालुक्यांच्या राज्यास उतरती कळा लागली. यांनीं माळव्याच्या परमारांचा पराभव केला व जबलपूर नजीकच्या त्रिपुरीच्या कल्चुरी राजांस जिंकिलें. यांच्या दरबारीं कवी व पंडित होते. यांनीं मुसुलमानांस सवलती दिल्या व व्यापार करण्यास उत्तेजन दिलें. ११२० च्या सुमारास म्हैसूरचा सुभेदार फार बलिष्ट झाला व त्यानें चालुक्याशीं स्पर्धा करण्यास सुरवात केली. ११५९ नंतर चालुक्यांचें कल्चुरी राज्याशीं युद्ध सुरू झालें. कल्चुरी राजा हा त्यांचा मांडलिक होय. याच वेळेस म्हैसुरांत होयसळ राजा स्वतंत्र झाला. उत्तर महाराष्ट्रांत यादवांचें प्रस्थ माजलें. होयसळ वंशांतील राजपुरुषांनीं कल्चुरी व चालुक्यांचा पराभव करून नंतर यादवांचा पाडाव केला. यादवांच्या सिंघण राजानें म्हैसूराधिपतीचा पराभव करून महाराष्ट्राचें आधिपत्य मिळविलें (१२१२). मूलराजाच्या वंशांतील राजे आपणास सोळंकी म्हणवीत असत. त्यांनीं सुभे नेमण्यांत चालुक्यांची रीत स्वीकारली. त्यांच्या राज्यास ११५९ पासून उतरती कळा लागण्यास सुरवात झाली. मूल राजाच्या वंशाचा क्षय झाल्यावर गुजराथचें राज्य धोलक्याच्या वाघेल्यांकडे आलें. धोलक्याचे वाघेले हे सोळंकी वंशांतील होते. पूर्वीच्या राज्याचा विस्तार आकुंचित होऊन या नवीन घराण्याकडे फक्त गुजराथचा कांहीं भाग व पूर्वेकडचा काठेवाडांतील मुलुख राहिला. यांनां यादव राजांशीं तह करणें भाग पडलें. हीं सर्व राज्यें कमकुवत झालीं होतीं, तरी पण देवळें बांधण्याचें काम चालू होतें व दरबारीं भाटांचा भरणा पूर्ववत् होताच. १२९८ त अल्लाउद्दीनाच्या भावानें म्हणजे आलफखानानें एका स्वारींत हें राज्य जिंकून घेतलें. थोड्याच अवधींत यादवांच्या सत्तेचा अंत झाला. यादवांचें राज्य बरेंच भरभराटलें होतें. अल्लाउद्दीन खिलजीनें १२९४ सालीं रामचंद्र यादव राजाचा पराभव

करून त्यास खंडणी देण्यास भाग पाडिलें. १३१८ त यादव कुळाचा समूळ नाश होऊन दख्खनच्या भागांत मुसुलमानांचें प्राबल्य माजलें.

गुजराथ व काठेवाडः–गुजराथवर राज्य करण्यासाठीं दिल्लीहून सुभे येत असत. त्यावेळीं या राज्यांत पाटण, बडोदें, खंबायत, तापी व भडोचच्या लगतचा मुलूख मोडत होता. या राज्यांत त्यावेळीं मोंगलांच्या व काठेवाडांतील हिंदु राजांच्या धामधुमीमुळें शांतता नव्हती. दिल्लीची सत्ता जेव्हां कमकुवत झाली तेव्हां येथील जाफरखान नामक सुभेदारानें स्वातंत्र्य जाहीर करून तो गुजराथचा राजा बनला (१४०७). हें राज्य १४०७ पासून तो १५७२ पर्यंत अस्तित्वांत होतें. १५७२ सालीं अकबर बादशहानें तें जिंकून घेतलें. अकबरानें हें राज्य जिंकण्यापूर्वी व ऐन भरभराटीच्या काळांत यांत उत्तर गुजराथ (अबूपासून तों नर्मदेपर्यंत), काठेवाड, तापीच्या लगतचा मुलूख व सुरतेपासून मुंबईपर्यंतचा भाग (घाट व समुद्र यांमध्यें असलेला) हा सर्व प्रदेश येत असे.

अहमद–बिन–तुघ्लखानें दख्खन जिंकून राज्यकारभाराच्या सोयीसाठीं त्याचे ४ भाग केले. राज्यव्यवस्थेकरतां मुसुलमान कामगार त्यानें नेमिलें होते. सैन्यावर मोंगल व अफगाण कामगार असत. सैन्यावरच्या अधिकाऱ्यांनीं बंड उभारून ब्राह्मणी राज्याची स्थापना केली. याचा पहिला सुलतान हसनगंगु बहामनी हा होता. या राज्याचा मोड १५२६ सालीं झाला खरा पण राजकीय दृष्ट्या याचें महत्त्व १४८२ सालीं नाहींसें झालें. या राज्यांत मोठमोठे वीर, मंत्री आणि राज्यकार्यधुरंधर पुरुष उत्पन्न झाले, राज्यांत शांतता नांदत होती, या राज्याच्या सत्तेचें आगर दौलताबाद व कलबुर्गा यांमधील प्रदेशांत होतें. या राज्याची सीमा १४७२ त बंगालच्या उपसागरापर्यंत गेली होती. कृष्णेच्या दक्षिणेस लहान लहान हिंदु राज्यें होतीं, त्यांत विजयानगरचें राज्य मुख्य होतें. कोंकणांत मुसुलमानी अमलाचा जम चांगला बसला नाहीं,त्यांच्या ताब्यांत फक्त कांहीं डोंगरी किल्ले होते. १५ व्या शतकाच्या अखेर बहामनी राज्याचीं चार शकलें झालीं. तीं विजापूर, गोवळकोंडा, बेदर व अहमदनगर हीं होत. अहमदनगरच्या निझामशाहीचा उगम ब्राह्मणापासून झाला असल्यामुळें त्यांत ब्राह्मणांचा फार भरणा होता. चौल हें त्यांचें बंदर होतें. गोदावरीच्या पाणवठ्याचा प्रदेश नांदेडपर्यंत त्यांत मोडत असे. सध्यांच्या नाशिक, सोलापूर, पुणें, नगर या जिल्ह्यांच्या बऱ्याच भागाचा त्यांत समावेश होत असे. या सुलतानांचें आपसांत भांडण चालत असे व ते विजयानगरच्या राजाची मदत घेत असत. पण १५२६ सालीं या सुलतानांनीं एकी करून पुढें १५६५त विजयानगरचा नाश केला. अहमदनगरच्या सुलतानानें १५७२ त वऱ्हाड घेतलें व विजापूरकरांनीं दक्षिण जिंकण्यास सुरवात केली. या सुलतानांची आपसांत युद्धें नेहमीं चालत असत. १५९९ सालीं मोंगलांनीं खानदेश घेतला व १६०० मध्यें अहमदनगर काबीज केलें. पंधराव्या शतकाच्या अखेरीस पोर्तुगीज लोकांनीं दक्षिण किनाऱ्यावर पाऊल ठेवण्यास आरंभ केला. त्यांनीं अंजदीव, दिव १५३९, गोवा (१५३०), चौल (१५३१), बसई (१५३४), हीं आपल्या कबज्यांत घेतलीं व हिंदी महासागरावर आपली सत्ता कायमची स्थापित केली.

१६ व्या शतकाच्या अखेर, सिंध, गुजराथ व खानदेश यांचा मोंगलांच्या राज्यांत समावेश होत होता. राज्यकारभारांत शिस्त चांगली नव्हती. जमिनीच्या वसुलापैकीं ⅓ भाग कर म्हणून सरकारांत जमा होत असे. गुजराथेंत १७०७ पर्यंत शांतता होती. या प्रांतांतून मोंगलास दोन कोट रुपये उत्पन्न होत असे.

१७०५ पासून नर्मदेच्या उत्तरभागांत मराठ्यांनीं स्वाऱ्या करण्यास आरंभ केला. चंपानेर (१७२३) व बडोदें (१७३४) येथें त्यांनीं आपली सत्ता स्थापित केली. पुढें मराठ्यांनीं चौथाई व सरदेशमुखीचा हक्क या भागांत शाबीत केला. यावेळेस (१७४८) या भागांत अतिशय अंदाधुंदी माजली होती. जुनागड (१७३८) बालासिनोर (१७२९) व खंबायत (१७३०) या भागांत लहान लहान राज्यें अस्तित्वांत आलीं. १७३७ मध्यें गायकवाडास या भागाचें अर्धे उत्पन्न मिळूं लागलें. गायकवाडांनीं १७३८त अहमदाबाद मोंगलांच्या सुभ्यासह व्यापला.

अहमदनगर मोंगलांनीं घेतल्यावर मलिकंबरानें खडकी (औरंगाबाद) येथें निझामशाही स्थापन केली व व हें राज्य मलिकच्या मृत्यूपर्यंत दख्खनच्या प्रदेशांत अबाधित राहिलें. १६३० त निजामशाही कायमची बुडविण्यांत आली. याचा विजापूरकरानीं फायदा घेऊन आपल्या ताब्यांत भीमा व नीरा यांमधील मुलूख व उत्तरकोंकण घेतलें. १६३३ ते १६५६ पर्यंत मोंगलांनीं आपली सत्ता दक्षिणेंतील जिंकलेल्या भागांत दृढ

करण्याचे प्रयत्न केले. या धामधुमीच्या काळांत मराठ्यांनां राजकारणाचें व शिपाईगिरीचें शिक्षण मिळालें. त्यांनां शिवाजीसारखा पुढारी मिळाल्याबरोबर त्यांनीं राज्य स्थापन करण्यास सुरुवात केली. शिवाजीनें (१६४६ ते १६४८) भीमा व नीरा यांमधील मुलूख घेतला, मोंगलांच्या व विजापूरकरांच्या मुलुखांत स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. आदिलशहाच्या मरणानंतर सातारा, फोंडा व पन्हाळा हा भाग आपल्या राज्यास जोडिला, कारवार व अंकोला (१६७२ ते ७६) सर केला. कोपळ व बल्लारी आपल्याकडे घेतली (१६७६ ते १६७७). मोंगलांनीं स्वारी करून सोलापूर व त्यालगतचा मुलूख विजापूरकरांकडून आपल्या राज्यास जोडिला.

शिवाजीचा अंत होतांच दक्षिण जिंकण्याची संधि आली आहे असें औरंगझेबास वाटलें. तो मराठ्यांची व विजापूरकरांची सत्ता कमी होण्याची वाट पहात होता. त्यानें १६८६ त गोवळकोंडा व १६८७त विजापूर सर करून हीं राज्यें बुडविलीं व १६८९ त संभाजीचा वध केला. पण याचा परिणाम फार विपरीत झाला. मराठे लोकांनीं जिकडे तिकडे धुमाकूळ घालण्यास आरंभ केला. १६९९ ते १७०५ या अवधींत औरंगझेबानें मराठ्यांच्या डोंगरी किल्ल्यांस वेढा घालून ते सर करण्याचे प्रयत्न केले. इकडे मराठ्यांनीं आपले घोडेस्वार गुजराथेंत व माळव्यांत पाठविले. मराठ्यांनीं गनिमी काव्याचा आश्रय केला व सर्व किल्ले पुन्हां परत मिळविले. औरंगझेब १७०७ सालीं मरण पावला व लागलीच सर्व मोंगल सैन्य दिल्लीस परत बोलावण्यांत आलें. कोल्हापूर व सातारा येथें दोन राज्यें स्थापन झालीं.

बाळाजी विश्वनाथ शाहूचा पेशवा झाला त्यानें मोंगल बादशहापासून भीमेच्या दक्षिणेचा पंढरपुरापर्यंतचा मुलूख मराठ्यांच्या राज्यास जोडला व दाक्षिणेंतील इतर मुलुखांत चौथाई व सरदेशमुखीचे हक्क मिळविले. मराठ्यांची सत्ता पश्चिम भागांत दिवसेंदिवस प्रबळ होत चालली. इंग्रजांनीं १७७२ सालीं भडोच घेतलें. १७४० सालीं बाळाजी बाजीराव पेशवा झाला. निजाम १७४८ मध्यें मरण पावला. पेशव्यांनीं त्याच्या एका मुलापासून तापी व गोदावरी यांमधील वऱ्हाडच्या पश्चिमेस असलेला मुलूख घेतला. लवकरच अहमदनगर पेशव्यांकडे आलें (१७६३–१७६६). या अवधींत पेशव्यांस विजापूर सुभा व मोंगलांनीं दक्षिणेंत जिंकून घेतलेला मुलूख मिळाला. १७६१ सालीं पानपतच्या पराभवानें मराठ्यांच्या राज्यास मोठा धक्का बसला. १७६४ सांत म्हैसूरांत हैदर प्रबळ झाला. निजामास आपला मराठ्यांकडे असलेला कांहीं मुलूख मिळविण्यास अवसर सांपडला (१७६१ ते १७७२). माधवराव पेशव्याच्या कारकीर्दींत पेशव्यांच्या राज्यास पुन्हां बळकटी आली. यावेळीं मराठ्यांचें उत्पन्न २८० लाख रु. होतें.

इंग्रजांची व पेशव्यांची पहिली सलामी १७६४ त झाली. इंग्रजांनीं राघोबाचा पक्ष स्वीकारला होता म्हणून त्यांचें पेशव्यांशीं युद्ध सुरू झालें. या युद्धाचा निकाल सालबाईच्या तहानें लागला. यामुळें इंग्रजांस साष्टी मिळाली व इंग्रजांनीं राघोबाचा पक्ष सोडला.

सन १७८० ते १८०३:–या अवधींत मराठे आणि इंग्रज यांमध्यें युद्धें झालीं. या कालांत मराठ्यांची जूट फुटली. गायकवाड इंग्रजांच्या आश्रयास गेले, शिंदे उत्तर हिंदुस्थानांत स्वतंत्र झाले. १८०० मध्यें इंग्रजांनीं सुरत घेतलें. १७९० सालच्या म्हैसूरच्या युद्धांत पेशव्यांस वर्धा नदीच्या उत्तरेचा मुलुख मिळाला. १७९६ सालीं बाजीराव पेशवा झाला. बाजीरावाचें शिंदे आणि होळकर यांशीं वांकडें होतें. १८०२सालीं पेशव्यानें वसईचा तह केला व या वेळेपासूनच पेशव्यांची इतिश्री होण्यास सुरवात झाली. यावेळीं मुंबई इलाखा फारच लहान होता. यांत साष्टी, सुरत व बाणकोट हीं शहरें, मुंबई बेट व बंदर यांचा समावेश होत होता. मुंबई शहराचा इतिहास मुंबई या लेखांत (वि. १८) आलाच आहे. त्यावरून त्याची वाढ कसकशी होत गेली तें दिसून येईल. इ. स. १८०३ ते १८२७ या कालाच्या दरम्यान या इलाख्याच्या सरहद्दी आंखण्यात आल्या. गुजराथ १८०५ सालीं मुंबई सरकारकडे आला व त्याचा १८१८ सालीं विस्तार करण्यांत आला. हळू हळू पेशव्यांचें राज्य या इलाख्यांत सामील झालें. काठेवाड व महिकांठा या इलाख्यास जोडला (१८०७–१८२०). १८१८ सालीं बाजीरावानें पेशवाईचें उदक इंग्रजांच्या हातावर सोडलें. तेव्हां त्यांतून कांहीं भाग साताऱ्च्या राजास व दोन परगणे कोल्हापूरकरांस दिले व बाकीच्या भागावर कमिशनर नेमण्यांत आला. माउंट स्टुअर्ट एलफिन्स्टनच्या कारकीर्दींत ही व्यवस्था पुरी झाली. त्यानें नव्या शाळा घातल्या व सदर कोर्टें स्थापन करून न्यायखात्यास व्यवस्थित स्वरूप दिलें.

एल्फिन्स्टनच्या कारकीर्दीनंतर सुधारणेची गति मंद झाली. संस्थानें खालसा करून त्यांचा समावेश इंग्रजी मुलुखांत करण्यांत आला.एडन(१८३९), सिंध(१८४७) हे या इलाख्यांत सामील झाले. १८९३ सालीं पंच-महालचा मुलुख ठेक्यानें मुंबई सरकारनें आपल्याकडे घेतला. १८४७ सालीं जमीनमहसूल आकारण्याचीं तत्त्वें जाहीर करण्यांत आलीं. इनाम व जहागीर यांची चौकशी करण्यासाठीं कमिशन बसविण्यांत आलें.बराच मुलुख खालसा केल्यामुळें१८५७सालचें बंड झालें. १८६२ सालीं अमेरिकेंत युद्ध सुरू झाल्यामुळें यूरोपांत हिंदुस्थानांतील कापसास फार मागणी आली व व्यापाऱ्यांच्या हातांत पैसा फार खेळूं लागला.पुष्कळ कंपन्या अस्तित्वांत आल्या व पुढें त्या बुडाल्यामुळें लोकांचें फार नुकसान झालें. १८६८ त अवर्षण पडलें. १८७६, १८७७ व १८७८ या वर्षी दुष्काळ पडला. तेव्हां दुष्काळ टाळण्यासाठीं आगगाडीच्या रस्त्यांची वाढ जारीनें करण्यांत आली. पुढें सुमारें १० वर्षें सुबत्ता होती. पण १८९१ त अवर्षणास सुरवात झाली. याच सुमारास संमतिवयाचा कायदा प्रसार करण्यांत आला. गोवधासंबंधानें हिंदु व मुसलमान यांमध्यें दंगे झाले. १८९५-९६ सालीं पुन्हां दुष्काळ पडला १८९६ सालीं आगस्ट महिन्यांत मुंबईंत प्लेग प्रथम सुरू झाला. प्लेगच्या उत्पत्तीसंबंधानें बरोबर माहिती नसल्यानें प्रथम अगदीं कडक असे प्रतिबंधक उपाय योजण्यांत आले. त्यासंबंधानें लोकांत तीव्र असंतोष माजला व पुण्यांत दोन खून झाले. या वेळीं उद्योगधंद्यांची स्थिति बरीच खालावली.

अ व शे ष.—प्रास्तरायुधयुगाचे अवशेष हिंदुस्थानच्या या भागांत नाहींत. फक्त कांहीं दगडांच्या उभारणी व अशोकाचे शिलालेख (ख्रिस्तपूर्व २५०) सांपडतात. भाजें (ख्रिस्तपूर्व २००),भेलसा (ख्रिस्तपूर्व १००), कारलें (ख्रिस्तपूर्व ९०), जुन्नर (इ. स. १००), नाशिक (ख्रिस्तपूर्व १०० ते इ. स. २००), कान्हेरी (इ. स. १०० ते ५००) हीं प्राचीन काळचीं लेणीं आहेत.

हिंदु व जैन लोकांनींहि बौद्ध पद्धतीचीं लेणीं कोरिलीं. हिंदूंचीं उत्तम लेणीं निझामच्या राज्यांत व घारापुरी व बदामी येथें आढळतात. अगदीं प्राचीन तऱ्हेचीं हिंदु देवळें विजापूर जिल्ह्यांत आहेत. यांखेरीज हेमाडपंती म्हणून प्रसिद्ध असलेलीं देवळें द्रविड लोकांचीं असावींत असा संशोधकांचा तर्क आहे. हेमाडपंत हा देवगडच्या रामचंद्र राजाचा प्रधान होता (१२७१) गुजराथेंत जैन पद्धतीचीं देवळें आहेत. अंबरनाथ हें इंडो-आर्यन् पद्धतीचें देऊळ आहे असें तज्ज्ञ म्हणतात. खंबायत येथें १३२५ सालची एक मशीद आहे. अहमदाबाद, महमुदाबाद आणि चंपानेर येथें हिंदु कारागिरांनीं बांधलेल्या मशिदी आहेत. १४ व्या शतकापासून पुढें हिंदूंनीं कलाकौशल्याची साक्ष पटणाऱ्या अशा मोठ्या इमारती बांधिलेल्या दिसत नाहींत.

**मद्रास,** इ ति हा स.—दक्षिण हिंदुस्थानचे मूळचे रहिवासी जंगलांत राहणारे असून दगडांच्या वस्तू करून पोट भरीत असत. त्यांचा प्राथमिक इतिहास दंतकथानुसार बनविलेला आहे. रामानें या भागांतून प्रवास करून सिंहलद्वीप गांठलें व रावणाला मारून सीता परत आणिली यासारखा इतिहास प्राचीन होय.मुसुलमान दक्षिणेंत येऊन मुलुख जिंकण्यापूर्वीचा विश्वसनीय इतिहास बहुधा मुळींच मिळत नाहीं म्हटल्यास चालेल. मध्यंतरीच्या बौद्धकालांतील शिलालेख, ताम्रपट, स्तूप व कांहीं भव्य बौद्ध मंदिरें त्याकाळची प्रत्यक्ष साक्ष पटवितात. गंजम व बल्लारी जिल्ह्यांत अशोक राजानें बांधलेलीं मंदिरें अजून अस्तित्वांत आहेत. अगदीं दक्षिणेस मदुरा येथें पांड्यांचें राज्य, त्यांच्या उत्तरेस चोलराजे, व पश्चिमेस केरळ होते.अशोकानंतर कांहीं काल कांजीवरम् येथें पल्लव राजे प्रबल असून त्यांची राज्यमर्यादा ओरिसापर्यंत पसरलेली होती. उत्तर भागांत मौर्यांच्या मागून आंध्र राजे राज्य करूं लागले. ते बौद्धधर्मीय होते. इ. सनाच्या ५ व्या शतकांत चालुक्यांनीं आपली सत्ता उत्तर भागांत स्थापन केली. ७ व्या शतकांत चालुक्यांच्या पूर्व व पश्चिम अशा दोन शाखा झाल्या. पूर्वचालुक्यांनीं वेंगी देशाच्या पल्लव राजांना जिंकलें. पल्लवांचा पराभव कदंब राजांनीं केला. राष्ट्रकूट नांवाचा वंश पुढें आला. तेराव्या शतकांत पांड्य, चोल,होयसळ हीं तीन राजघराणीं दक्षिण हिंदुस्थानांत होतीं. १४ व्या शतकांत हि दिल्लीहून मुसुलमान लोक दक्षिणेंत उतरले. यासुमारास हंपी येथील विजयानगरचें राज्य कायतें मुसुलमानांना अडथळा करण्यासारखें होतें.सन १५०९-१५३० पर्यंत विजयानगरचा अभ्युदय कळसास पोंचला होता. त्यावेळीं कृष्णा नदीपासून तों कन्याकुमारीपर्यंत विजयानगरच्या राज्याचा विस्तार होता.यावेळीं येथें कृष्णदेव नांवाचा राजा होता. विजयानगरचा मोठा शत्रु म्हणजे बहामनी वंशांतले सुलतान होत. यांच्यांत वारंवार लढाया होत. शेवटीं १५६५ सालीं तालिकोटच्या

लढाईंत विजयानगरचा पूर्ण पराभव झाला. त्यामुळें मांडलिक राजे स्वतंत्र होऊं लागले व जिकडे तिकडे बेबंदशाही माजली. यामुळें नायक अथवा पाळेगार लोक प्रजेला निर्दयपणें वागवीत.यांत मदुरेचे नायक स्वतंत्र असून बाकीचे विजापूर,गोवळकोंडा येथील सुलतानांच्या सत्तेखालीं होते. याच सुमारास मराठे उदयास आले. १६८१ त दिल्लीहून औरंगझेब मोठें सैन्य घेऊन दक्षिणेंत आला. त्यानें विजापूरचें व गोवळकोंड्याचें राज्य हस्तगत केलें. परंतु त्याला मराठ्यांचा मोड करतां आला नाहीं. १७२४ सालीं मोंगल सुभेदार असफजाह यानें हैद्राबाद येथें स्वतंत्र गादी स्थापिली. याच्या वंशजांनां हैद्राबादचे निजाम म्हणतात. कर्नाटकांत जे नबाब सुभेदार होते ते हैद्राबादचे मांडलिक होते. त्यांनां अर्काटचे नवाब म्हणत. मध्यंतरीं म्हैसूर येथें एक हिंदुराज्य उदयाला आलें. विजयानगरचा नाश झाल्यादिवसापासून तें राज्य उत्तरोत्तर वाढतच चाललें. हैदरअल्ली हा साधारण शिपाई होता परंतु पुढें म्हैसूरचा नाईक बनला. यानंतर इंग्रज, मराठे, निजाम व हैदरअल्ली यांच्या धुमाकुळीस १८ व्या शतकाच्या मध्यांत आरंभ होऊन शेवटीं इंग्रज यशस्वी झाले. पोर्तुगीज व फ्रेंच लोकांनीं कांहीं दिवस या इलाख्यांत वसाहत केली होती. १७ व्या शतकांत डच लोकांनीं पुलिकत घेऊन पोर्तुगीजांनां हांकलून दिलें. १७४१ त डुप्ले पांडिचेरीचा गव्हर्नर झाला. इंग्रजांची वसती त्यावेळेस विझगापट्टम्, व मच्छलीपट्टमला होती. त्यांनीं १६२० त मराठ्यांपासून कुडालोर नजीक फोर्ट सेंट डेव्हिडची जमीन खरेदी केली. आणि १७ व्या शतकाच्या शेवटीं मद्रास इलाख्यांत इंग्रजांच्या वसाहती पोर्ट नोव्हो, भद्रपोलम्, विझगापट्टम्, अंजेंगो, वेलिचरी व कालिकत इत्यादि ठिकाणीं होत्या. दुसऱ्या इंग्रज–फ्रेंच युद्धांत इंग्रजांनीं कंडोर येथें फ्रेंचांचा पराभव करून मच्छलीपट्टम् घेतलें. आणि पुढें जिंजी, अर्काट, आणि इतर किल्ले इंग्रजांस अनायासें फ्रेंचांपासून मिळाले. १७६३ सालीं यूरोपांत फ्रेंच व इंग्रज यांमध्यें तह झाल्यापासून फ्रेंचांनीं वर डोकें काढलें नाहीं. पण पुढें हैदर, मराठे, इंग्रज व निजाम यांच्यांत लढाया सुरू झाल्या.तिसऱ्या म्हैसूरयुद्धांत कॉर्नवालीसनें टिप्पूचा पराभव केला तेव्हां इंग्रजांस सालेम आणि मलबार जिल्हे आणि दिंदिगलच्या आसपासचा प्रांत मिळाला. श्रीरंगपट्टण येथें टिप्पू पडल्यावर म्हैसूर संस्थान इंग्रज सत्तेखालीं आलें व कंपनीला कानडा, कोइमतूर व वैनाड हे जिल्हे मिळाले. १७९९ त तंजावरच्या मराठा राजानें कंपनीशीं तह करून सर्व राज्यव्यवस्था कंपनीच्या स्वाधीन केली. निजामाकडून कांहीं भाग आला. त्याला 'सीडेड डिस्ट्रिक्ट्स' असें म्हणत. यांत बल्लारी, अनंतपूर, कडाप्पा व कर्नूल या जिल्ह्यांचा समावेश होतो. अशा रीतिनें इंग्रजांनीं कन्याकुमारीपासून उत्तरसरकारपर्यंतचा मुलूख मिळविला. १८४५ सालीं डेन्स लोकांपासून ट्रांकीबार विकत घेतलें. १८६२ सालीं उत्तरकानडा मुंबई इलाख्यांत वर्ग केला. कर्नूलच्या नबाबानें इंग्रजांविरुद्ध कांहीं कारस्थानें केलीं म्हणून त्याचाहि प्रांत त्याजजवळून काढिला. पाळेगार लोकांचा त्रास अद्याप होताच. परंतु हळू हळू तो कमी होत गेला.

अ व शे ष.–१८८२ मध्यें मद्रास इलाख्याची पहाणी करावयाची व ठिकठिकाणच्या प्रसिद्ध इमारती, कोरीव लेणीं, शिलालेख वगैरे पाहून त्यांचें वर्णन व भाषांतर करून घ्यावें या उद्देशानें दोन अधिकारी नेमण्यांत आले. पौराणिक क्षेत्रें या इलाख्यांत बरींच आहेत. कृष्णाकांठचा अमरावती येथील बौद्ध लोकांचा स्तूप, पल्लव राजांच्या गुहा, चिंगलपट येथील सात देवालयें, मुडविद्रि येथील जैन देवालय, कारिकल व यत्तूर येथील प्रचंड पुतळे हीं प्रसिद्ध आहेत. मुसुलमानांचे अवशेष मद्रास इलाख्यांत फारसे नाहींत. हिंदु इतिहासावशेष बल्लारी व गंजम जिल्ह्यांत बरेच आढळतात. मदुरा, रामेश्वर, तंजावर, कांजीवरम्, श्रीरंगम्, चिदंबरम्, तिरुवन्नमलाय, वेलोर व विजयानगर येथील इमारतींचीं कामें १६।१७ व्या शतकांत झालेलीं असल्यामुळें त्या कालाला 'सुवर्णकाल' म्हणणें सयुक्तिक आहे.

म द्रा स श ह र.–इतिहासः–१६३९ सालीं मद्रास शहराची स्थापना झाली. त्यावेळेस इंग्लंडांत पहिला चार्लस राजा गादीवर होता. कारोमांडल किनाऱ्यावर मच्छलीपट्टण नांवाचें बंदर कंपनीचें मुख्य स्थळ होतें. विजयानगरचें राज्य रसातळास गेल्यावर तेथील राजे चंद्रगिरीस रहात होते व नायकांच्या मार्फत सत्ता चालवीत असत. १६३९ त मद्रासपट्टम् येथें किल्ला बांधण्याची परवानगी फ्रान्सिस डे नांवाच्या इंग्रज इसमानें मिळवून किल्ला बांधण्यास सुरुवातहि केली. मद्रासचें जुनें नांव चेनम्माप्पापट्टण असेंहि होतें. नाईकांनीं किल्ला बांधण्यास परवानगी दिली होती म्हणून मद्रासचें नांव चेनम्माप्पापट्टण ठेविलें. कारण नाईकाच्या बापाचें नांव चेनम्माप्पा होतें. १६४१ सालीं कंपनीचें

मुख्य ठाणें मद्रासला नेलें. फोर्टसेंट जार्ज किल्ल्याला पुष्कळ हल्ले सोसावे लागले. १६७२ त फ्रेंचांनीं ट्रिप्लि-केनला वेढा दिला. १६७४ त डच लोकांनीं त्यांनां हांकलून लाविलें. १६८७ त औरंगझेबानें किल्ल्याला शह दिला. १७३९ सालीं त्याभोंवतीं मराठे घिरट्या घालूं लागले. १७४६ सालीं लाबरदोने यानें किल्ल्यावर मोर्चा लाविला. तेथील गव्हर्नर मार्स याला लाबरदोनेनें पांडिचेरींत नेलें. १७५२ पर्यंत कंपनीचें ठाणें फोर्टसेंट डेव्हिड येथें होतें. फोर्टसेंट जार्ज किल्ला फ्रेंचांच्या ताब्यांत १७४९ पर्यंत होता. पुढें एक्सलाशापेल येथील तहानें किल्ला इंग्रजांनां परत मिळाला. पुन्हां इंग्रज व फ्रेंच यांमध्यें लढाई सुरू झाली. या एकंदर घालमेलींत किल्ल्याचा बराच भाग मोडकळीस आला होता. १७६३ सालीं त्याची कांहीं डागडुजी केली. १६९३ सालीं एग्मोर, पुरसवाकम् भाग इंग्रजांनां मिळाला. एग्मोर १७०८ मध्यें व १७४२ त पुदुपाकम् व पेरांबूर हातीं आले. किल्ल्याच्या नैर्ऋत्येस सांप्रत जो शहराचा अत्युत्तम भाग आहे तेथें त्यावेळेस मोकळी जागा होती. व सध्यां ज्या ठिकाणीं सरकारी कोठी आहे तेथें त्यावे-ळेस साधारण यूरोपियन लोकांचीं घरें होतीं.

**बंगाल, बिहार व ओरिसा,** इतिहास.–बंगाली लोकांच्या शरीराच्या बांध्यावरून ते पुढील द्रविडी, मंगोलियन व आर्यन् या तीन निरनिराळ्या मानववंशां-पासून आले असावे. पूर्व व पश्चिम सरहद्दीशिवाय चोहोंकडे द्रविडी लोक आहेत; तथापि खुद्द बंगालमध्यें मंगोलियन बीज आहे व बिहारमध्यें आर्य रक्ताच्या मिश्रणानें द्रविडांच्या स्वरूपांत थोडा फरक झाला आहे. द्रविडी लोक वायव्येकडून अरबस्तानांतून आले असा-वेत. द्रविडी भाषा छोटानागपुरांत ओरावन, माले व इतर जाती बोलतात. द्रविडी लोकांनंतर बहार व छोटा नागपूरपर्यंत 'मोन–अनाम' अथवा 'मोन ख्मेर' नांवानें माहीत असलेल्या भाषा बोलणारे लोक आहेत; या भाषा अद्याप पेगू, कांबोडिया व कोचीन–चीनमध्यें आहेत. ह्या जाती बहुतकरून पूर्वेकडून 'पातकाई खिंड' मधून व ब्रह्मपुत्रेजवळच्या प्रदेशांतून आल्या असाव्यात. आसामांत या वर्गाची भाषा 'खांसी' म्हणून एकच आहे. बंगालमध्यें त्याचा एकहि नमुना राहिला नाहीं; तथापि या भाषेचें अस्तित्व 'मुंडा' वर्गाच्या भाषेवरून कळूं शकतें. या लोकांनंतर वायव्येकडूनच 'तिबेटी–ब्रह्मी' वर्गाची भाषा बोलणारे हजारों लोक आले. यापैकीं प्रथम आलेले लोक पूर्वबंगाल्यांतील चांडालांचे व मध्यभगांतील पाडांचे पूर्वज होते. या पाड व चांडाल लोकांनीं बऱ्याच काळापासून आपली भाषा सोडून दिली आहे; शेवटीं शेवटीं आलेले त्यांच्याचपैकीं लोक कोच, मेख व गारो हे होत; हे अद्याप तशाच प्रकारची भाषा बोलतात. हे मंगोलियन वर्गाचे लोक ईशान्ये-कडून बंगाल्यांत येत असतांना आर्यन् लोकांनीं वायव्ये-कडून बंगाल्यावर स्वारी केली. आर्यन् राजांनीं बिहार-मध्यें राज्य स्थापिलें परंतु खुद्द बंगालमध्यें हे लोक फारसे आले नाहींत. आर्यन् लोक आल्यानंतर लोकांचें लक्ष शौर्याकडून कलांकडे वेधलें. आर्यन् लोकांनीं बंगाल्यां-तील लोकांवर चांगलाच पगडा बसविला.

बिहार.–बिहार प्रांताचा इतिहास पहिल्यापासून ज्ञात आहे. हल्लींचे पाटणा, गया, व शहाबाद जिल्हे या भागांत प्राचीन मगधराज्य होतें. त्याची राजधानी राज-गृह (राजगीर) ही होती; हें गांव गयेच्या ईशान्येस ३० मैलांवर आहे. गंगेच्या उत्तरभागांत विदेह अथवा मिथिला प्रांत होता; मिथिला हें संस्कृत विद्येचें आगर होतें व त्यांत हल्लींच्या दरभंगा, चंपारण्य व उत्तर मुझफरपूर जिल्ह्याचा समावेश होतो. उत्तर मुझफरपूरच्या दक्षिणेस वैशालीचें राज्य होतें. पूर्वेस अंग प्रांत होता व त्यांत मोंगीर, भागलपूर व पूरणिया यांचा महानदीपर्यंत समावेश होतो. ह्या सर्व देशांचा महाभारतांत उल्लेख आला आहे. मगधाचा उल्लेख ऋग्वेदांत कीकट या नांवानें करण्यांत आला आहे, व मिथिलेचा उल्लेख शतपथ ब्राह्मणांत आहे. मगधामध्येंच बुद्धानें आपला धर्म व महावीरानेंहि आपला धर्म स्थापन केला. बुद्धाच्या मृत्यू-नंतर थोड्याच काळांत नंदानें क्षत्रिय राजांजवळून राज्य घेऊन नवीन घराणें स्थापन केलें. त्यानें शोण व गंगा या नद्यांच्या संगमावर आपली राजधानी केली. तिला पाटणा म्हणतात. हा राजा मेल्यावर अलेक्झांडर दि ग्रेटच्या वेळेच्या चंद्रगुप्तानें मगध देशाच्या धेमानंद राजा-वर स्वारी केली, व त्याचा पराभव करून त्यास ठार मारिलें व पाटलीपुत्राच्या गादीवर बसून हळू हळू त्यानें आपलें राज्य उत्तरहिंदुस्थानांत पुष्कळ वाढविलें. इ. स. २७२ त चंद्रगुप्ताचा नातू अशोक हा गादीवर आला व २८१ मध्यें त्यानें आपल्या राज्यास कलिंग जोडिलें.

इ. स. चवथ्या शतकांत गुप्तवंशाकडे सत्ता आली. त्यांची पाटणा शहर ही राजधानी होती, व त्यांचें वर्चस्व बंगाल्यांतील वेगवेगळ्या देशच्या राजांनीं कबूल

केलें होतें. त्यांचा धर्म हिंदु होता. सातव्या शतकांत (ह्युएनत्संगाच्या वेळेस) उत्तर बिहारचे महानंदानदी-पर्यंत व्रीजी व वैशाली असे भाग झाले. गंगेच्या दक्षिणेस हिरण्य परवण (मोंगीर) व चंपा (दाक्षिण भागलपूर, संताळ परगणे व बिरभूम) होतें. या दोहोंचे राजे बहुतकरून माल वंशाचे खैतोरी असावे. नवव्या शतकांत गोपालानें स्थापिलेल्या बौद्ध राजवंशाच्या मुलखांत बिहारचा समावेश होत होता. या वंशांतील शेवटच्या राजाचा ११९७ त महमद–इ–बखत्यार खिलजीनें पराभव केला व त्याच्या सैन्यानें ओदंतपुरी राजधानीचा नाश करून तेथील सर्व बौद्ध भिक्षूंची कत्तल केली.

पाल वंशाच्या उदयापर्यंत खुद्द बंगालची माहिती उपलब्ध नाहीं. महाभारतकालीं प्राग्ज्योतिष राज्यांत उत्तर व पूर्वबंगाल आणि आसाम समाविष्ट होत होते. याला कामरूप म्हणत व याचा राजा भगदत्त हा कुरुक्षेत्रांतील युद्धाच्या वेळेस एक प्रमुख होता. हें राज्य करतोया नदीपर्यंत होतें. येथें मंगोलियन वंशाचे राजे ७ व्या शतकापर्यंत राज्य करीत होते व त्यांची चांगली भरभराट होती. करतोया व महानंदा नद्यांमध्यें प्राग्ज्योतिषाच्या नैर्ऋत्येस पाड लोकांचा देश पुंड्र अथवा पौंड्रवर्धन होता; यालाच हल्लीं पबना म्हणतात. याची राजधानी करतोया नदीच्या उत्तर तीरावरील महास्थान अथवा मालयेजवळ पादुआ ही असावी. हें राज्य इ. स. तिसऱ्या शतकांत अस्तित्वांत होतें, व अशोकाचा भाऊ येथें बुद्ध भिक्षूच्या वेषानें राहिला होता. ह्युएनत्संग सातव्या शतकांत आला तेव्हां याची भरभराट होती व आठव्या शतकांतहि हें बलाढ्य राष्ट्र होतें ११ व्या शतकांत हें यात्रेचें ठिकाण बनलें होतें. भागीरथीच्या पूर्वेस व पुंड्राच्या दक्षिणेस 'वंग' अथवा 'समतत' होतें. या भागांत हल्लीं राहणाऱ्या चांडाल लोकांचे पूर्वज येथें यावेळीं असावेत. भागीरथीच्या पश्चिमेस कर्ण–सुवर्ण (बरद्वान, बांकुरा, मुर्शिदाबाद व हुगळी) होतें; त्याचा राजा 'शशांक अथवा नरेंद्र'–गुप्तांचा शेवटचा राजा-शिवाचा कट्टा भक्त होता; यानें मगधावर स्वारी करून सातव्या शतकाच्या आरंभीं पवित्र 'बोधि' वृक्ष कापून टाकिला. मुर्शिदाबाद जिल्ह्यांत रंगामातीजवळ याची राजधानी असावी. शिवाय सुम्ह अथवा ताम्रलिप्ती राज्य होतें. यामध्यें हल्लींच्या मिदनापूर व हावरा जिल्ह्याचा समावेश होतो. या देशाचे राजे कैवर्त असावेत.

नवव्या शतकांत अंग देशांत पाल वंशाच्या राजांचा अभ्युदय झाला व त्यांचें राज्य बिहारवर व उत्तर-बंगालवर हळू हळू वाढलें. पाल राजे बुद्धधर्मी होते. तथापि ते हिंदूंशीं चांगले वागत. बंगालमधून ११ व्या शतकाच्या आरंभीं सेन घराण्यांतील विजयसेन राजानें त्यांस हांकून दिलें, तथापि त्यांनीं पुढें कांहीं दिवस बिहारमध्यें राज्य केलें. दहाव्या शतकाच्या शेवटीं पूर्वेस सेनांची सत्ता वाढली व पश्चिमेस महानंदा व भागीरथीपासून करतोयापर्यंत व पूर्वेस ब्रह्मपुत्रेपर्यंत बंगालचा बहुतेक भाग त्यांच्या ताब्यांत होता. सेन राजे हिंदु होते तेव्हां साहजिकच बुद्ध धर्म कमी होत गेला. या वंशाचा प्रसिद्ध राजा बल्लाळसेन होता; त्यानें चातुर्वर्ण्याची पुनर्घटना केली. यानेंच बंगालचे ४ भाग केले असें म्हणतात; ते असेः-(१) भागीरथीच्या पश्चिमेस राढ; हा बहुतेक कर्णसुवर्णाच भाग असावा; (२) महानंदा व करतोयामधील बरद्र; हाच पुंड्र प्रदेश होय. (३) बागडी अथवा दक्षिण बंगाल; व (४) बंग अथवा पूर्व बंगाल. बल्लाळसेनानें मिथिला जिंकून आपल्या राज्यास जोडली. त्याचा मुलगा लक्ष्मण सेन हा गादीवर बसला त्या वेळेस सुरू झालेला शक अद्याप तेथें चालू आहे, बाराव्या शतकाच्या शेवटीं महमद–इ–बखत्यारच्या स्वारीच्या वेळेस नवद्वीप येथें लक्ष्मणसेन गादीवर होता तो ओरिसांत पळून गेला. तथापि त्याच्या वंशजांनीं पूर्वबंगाल्यांत बरीच सत्ता स्थापन केली व पुढें १२० वर्षें राज्य केलें; त्यांची राजधानी डाक्का जिल्ह्यांत विक्रमपूर येथें होती.

ओ रि सा.–ऐतिहासिक कालाच्या प्रारंभापासून ओरिसांत कलिंगांचें मोठें राज्य होतें; तें गंगेच्या मुखापासून गोदावरीच्या मुखापर्यंत होतें. हें अशोकानें जिंकून घेतलें, परंतु ख्रिस्तपूर्व १५० त पुन्हां कलिंग राजांनीं तें घेतलें. यावेळेस जैन धर्म पसरत होता; परंतु इ. स. च्या दुसऱ्या शतकांत बौद्ध धर्म फैलावला. सातव्या शतकांत त्याचा प्रसार बराच होता. नंतर कलिंग राजांची सत्ता नाहीशी होत चालली व ओरिसा स्वतंत्र झालें. ६१० मध्यें मगध देशाचा राजा शशांक याच्या राज्याचा हा भाग होता असें त्याच्या खोदीव लेखांवरून कळतें. ६४० त कनोजच्या हर्षवर्धनानें तें जिंकिलें. दहाव्या व अकराव्या शतकांत ओरिसा केसरी राजांच्या ताब्यांत असावें. यांच्या नंतर कलिंगनगरच्या चोडगंगानें स्थापिलेल्या रामवंशाकडे ही सत्ता गेली. हे राजे वैष्णव असून यांनीं पुरी

येथें जगन्नाथाचें व कोनारक येथें एक मोठें देऊळ बांधिलें. यांचे मुसुलमानांशीं वारंवार तंटे होऊन लढाया होत, व १३६१ च्या सुमारास फिरोजशहा बादशहानें स्वतः ओरिसांत स्वारी केली. १४३४ मध्यें सूर्यवंशी कपिलेश्वर देवानें गादी बळकाविली. त्यानें आपलें राज्य दक्षिणेकडे पेन्नार नदीपर्यंत वाढविलें, परंतु त्याच्या वंशजांपासून गोवळकोंड्याच्या मुसुलमान राजांनीं हा प्रदेश पुन्हां हळू हळू हस्तगत करून घेतला. उत्तरेकडे सुद्धां मुसलमान लोक जास्त हल्ले करूं लागले; व शेवटीं १५६८ त आपसांत यादवी सुरू होऊन मुकुंददेव नांवाचे उपरी राजाचा पराभव सुलेमान कररानीच्या काळापहाड नामक सेनापतीनें केला, व त्यांची सत्ता नष्ट झाली.

महमद-इ-बख्त्यार खिलजी नांवाचा एक मुक्त झालेला तुर्की गुलाम होता; यानें महमद घोरीची सत्ता कबूल करून ११९७ च्या सुमारास बिहार जिंकलें. पुढें दोन वर्षांनीं त्यानें बंगालवर स्वारी करून गौर व नवद्वीप घेतलें. बंगालचा बहुतेक भाग मुसलमान सुभेदारांच्या ताब्यांत हळू हळू आला; हे सुभेदार गौर अथवा लखनौती येथून या प्रांताची व्यवस्था पहात व दिल्लीच्या तक्ताधिपतीस फारसे जुमानीत नसत.

बंगालचे पहिले सुभेदारः—मदमद-इ-बखत्यार खिलजी [१२०२].इझ्-उद्दीन महमद शिराण[१२०५].अल्लाउद्दीन मर्दन [१२०८].घियास उद्दीन इवाझ [१२११]. नाशिर उद्दीन महमद–अल्तमश बादशहाचा मुलगा [१२२६]. अल्लाउद्दीन जानी [१२२९]. सेफ उद्दीन ऐबक [१२२९]. इझ उद्दीन ताघल तघ्रल [१२३३]. कमर-उद्दीन तमर [१२४४].इख्त्यार-उद्दीन युझबक [१२४६]. जलालुद्दीन मसूद[१२५८].इझुउद्दीन बलबन[१२५८].हा नंतर बादशहा झाला. महमद असर्मन तातरखात[१२६०].शेरखान [१२६०]. अमीर खान [१२६०]. मुगिस उद्दीन तुघ्रिल[१२७७]. नाशिर-उद्दीन बुघ्रा (बलबनचा मुलगा). [१२८२]. रुक्नउद्दीन कैकौस(बुघ्राचा मुलगा)[१२९१]. शमसुद्दीन फिरोज (बुघ्राचा मुलगा) [१३०२]. शाहाब उद्दीन बुघ्र (बुघ्राचा मुलगा–पश्चि. बंगाल) [१३१८]. घियास उद्दीन बहादूर- फिरोजचा मुलगा, (पूर्व बंगाल,) [१३१०]. घियास उद्दीन बहादूर (सर्व बंगाल)[१३१९]. नाझिर उद्दीन (फिरोजचा मुलगा–लखनौती) [१३२३-२८]. बहादूर (बहरामसह परत आलेला) [१३२४-३०]. बहराम [१३३०-३८]. कादरखान (लखनौती) [१३३९ ३८]. इझ उद्दीन (सातगांव) [१३२३-३९].

१३३८ त फक्र–उद्दीन मुबारकनें महमद बिन तघलक विरुद्ध बंड केलें व स्वतः स्वतंत्र झाला.

बंगाल्यांतील स्वतंत्र मुसुलमानी राजेः—फक्र उद्दीन मुबारक (पूर्व बंगाल) [१३३८–४९]. इख्त्यार-उद्दीन गाझी (पूर्व बंगाल) [१३४९-५२]. अल्लाउद्दीन अल्ली (पश्चिम बंगाल) [१३३९--४५]. शमसुद्दीन इलियास (गौरमध्यें) [१३४५],पहिला सिकंदर[१३५८]. घियास उद्दीन अझाम (पूर्वेकडे) [१३८९]. सफेउद्दीन हमझा[१३९६]. शमसुद्दीन[१४०६].शहाब-उद्दीन बायझिद शहा राजा कंस (गणेश) यासह[१४०९]. जलाल-उद्दीन महंमद [१४१४]. शमसुद्दीन अहमद [१४३१]. नाशिर उद्दीन महमद [१४४२]. रुक्न–उद्दीन बारबक [१४५९]. शमसुद्दीन युसफ [१४७४]. दुसरा शिकंदर [१४८१]. जलाल उद्दीन फतेह [१४८१]. शहाजादा बारबक हबशी [१४८६]. सेफ उद्दीन फिरोज [१४८६].नाशिर उद्दीन महमद[१४८९].शमसुद्दील मुझफर [१४९०].अल्लाउद्दीन हुसेन [१४९३]. नासिरुद्दीन नस्रत[१५२३]. अल्लाउद्दीन फिरोज [१५३२].घियास उद्दीन महमदशहा (बंगालचा शेवटचा सत्ताधीश राजा) [१५३२]. हुमायूननें जिंकलें [१५३७]. शीरशहा (दिल्लीचा सुलतान) [१५३९]. इस्लाम शहा (दिल्लीचा सुलेतान) [१५४५]. शमसुद्दीन महमद सूर [१५५२]. बहादुर [१५५४]. घियास उद्दीन जलाल [१५६०]. सुलेमान कररानी [१५६३]. बायझिद [१५७२].दाऊद [१५७३].

१३३० त दक्षिणबिहार बंगाल्यांतून काढून दिल्लीस जोडला होता. उत्तरबिहार यापुढें थोडे दिवस बंगालमध्यें होता. १३९७ त सगळा बिहार जोनपूरच्या राज्याचा भाग झाला परंतु शंभर वर्षांनीं दिल्लीच्या बादशहांनीं पुन्हां तो ताब्यांत घेतला; तो त्यांच्याच ताब्यांत पुष्कळ काळ राहिला; मात्र कांहीं दिवस बंगालचा राजा अल्लाउद्दीन हुसेन व त्याचा मुलगा नासिरुद्दीन नस्रत यांच्या ताब्यांत गंगेच्या उत्तरेकडील प्रदेश होता. मोंगलांच्या वेळेस या प्रदेशाची राजधानी पाटणा जिल्ह्याच्या दक्षिणेकडील बिहार शहर येथें होती, व या शहरावरून या प्रांताचें नांव बिहार पडलें. १४ व्या शतकाच्या मध्यापासून तों १६ व्या शतकाच्या मध्यापर्यंत

उत्तरबिहारचा पुष्कळसा भाग ब्राह्मणराजवंशाकडे होता. ते पठाणांस खंडणी देत असत. दुसरें हिंदु घराणें—कदाचित् त्यांचेंच संबंधी—पंधराव्या शतकांत चंपारण्यांत व गोरखपुरांत राज्य करीत होतें.

१३३८ पासून १५३९ पर्यंत वर नांवें दिलेल्या राजांनीं बंगाल्यांत राज्य केलें; हे राजे वेगवेगळ्या वंशाचे होते, तथापि त्यांत पठाण व तुर्क पुष्कळ होते. कांहीं हबशी खोजे होते व एक राजा कंस अथवा दिनाजपूरचा गणेश हा हिंदु होता; त्याचा मुलगा (गादीवर बसलेला) पुढें मुसलमान झाला.

बाबरनें दिल्लीच्या अफगाण राजांचा पाडाव केल्यावर बिहारच्या अफगाण राजांवर स्वारी केली. १५२८ व १५२९ त त्यानें त्यांचा दोनदां पराभव केला. बाबरच्या मृत्यूनंतर बिहारच्या अफगाणांनीं दिल्लीच्या शेवटच्या लोदी सुलतानचा आश्रय केला, परंतु लखनौजवळच्या चकमकींत १५३१ त हुमायूननें त्यांचा पराभव केला. यावेळेस शेरशहा बिहारच्या अफगाण राजांचा प्रधान झाला होता; व त्यानें चुनार येथें आपली सत्ता प्रस्थापित केली होती. पण हुमायूननें त्याचा पाडाव केला नाहीं व त्याचा परिणाम असा झाला कीं, पुढें सहा वर्षांत हुमायून दुसरीकडे गुंतला असतां शेरशहा बंगालच्या सरहद्दीवर बलाढ्य झाला. १५३७ त हुमायूननें स्वारी केली व ६ महिनेपर्यंत वेढा देऊन चुनारचा किल्ला घेतला.शेरशहा बंगालमध्यें रोठस गडावर छपून बसला व त्यानें हुमायूनास पुढें पुढें येऊं दिले, परंतु जेव्हां शेरशहानें दिल्लीची हकीकत व रसद येण्याचा मार्ग बंद केला असें त्यास कळलें तेव्हां तो परत फिरला; शेवटीं बक्सार येथें शेरशहानें गांठून त्याचा पराभव केला. शेरशहानें गौरच्या सुभेदारास हांकून दिलें, व स्वतःस बंगाल व बिहारचा राजा म्हणून जाहीर केलें. पुढें एका वर्षानें त्यानें हुमायूनचा कनोज येथें पराभव केला व तो दिल्लीचा राजा झाला. शेरशहा १५४५ त मेला. दहा वर्षांनीं हुमायूननें त्याच्या पुतण्यापासून दिल्लीचें राज्य घेतलें, परंतु बंगालच्या अफगाण सुभेदारास कोणी जिंकिलें नाहीं. सुलेमान करानीचा सेनापति राजू (हा काळापहाड म्हणून विशेष प्रसिद्ध आहे)यानें अकबराचें वर्चस्व कबूल केलें, परंतु तो खरोखर स्वतंत्र होता व १५६८ त त्यानें ओरिसा जिंकला. नंतर त्यानें मोंगल बादशहाविरुद्ध बंड केलें, परंतु त्यांत तो पराभूत झाला. यानंतर बंगाल मोंगलांच्या राज्यास जोडण्यांत आला, व तो औरंगझेबाच्या मृत्यूनंतर त्याच्या राज्याचें तुकडे होईपर्यंत तसाच राहिला, व शेवटीं ईस्ट इंडिया कंपनीच्या ताब्यांत गेला.

दिल्लीच्या बादशहांचे बंगालवरील सुभेदारः— खान जहान [१५७६]. मुझफरखान [१५७९]. राजा तोडरमल्ल [१५८०]. खान अझीम [१५८२]. शहबाझ खान [१५८४]. राजा मानसिंग [१५८९]. कुतुबुद्दीन कोका तुश [१६०६]. जहांगीर कुली [१६०७]. शेख इस्लाम खान [१६०८]. कासीम खान[१६१३]. पहिला इब्राहीम खान [१६१८]. शहाजहान [१६२२]. खान झाड खान [१६२५]. मुकरम खान [१६२६]. फिदाई खान [१६२७]. कासीम खान जाबुनी [१६२८]. अझाम खान[१६३२].इस्लाम खान माशहदी [१६३७]. सुलतान सुजा [१६३९]. मीर जुमला[१६६०].शाहिस्ता खान [१६६४]. फिदाई खान [१६७७]. सुलतान महमद अझीम[१६७८]. शाहिस्ता खान (पुन्हां)[१६८०]. दुसरा इब्राहीम खान[१६८९].अझीम उश्शान[१६९७]. मुरशिद-कुलीखान[१७०४].सुजा-उद्दीन-खान[१७२५]. सर्फराज खान [१७३९]. अलीवर्दी खान [१७४०]. सिराज उद्दवला [१७५६]. मीर जाफर [१७५७]. मीर कासीम अलीखान[१७६०]. मीर जाफर(पुन्हां)[१७६३]. निजाम—उद्दवला [१७६५].

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर बंगालचा सुभेदार मुरशिद कुलीखान होता; हा मूळचा ब्राह्मण असून मुसुलमान झाला होता. तो उत्तम प्रकारचा राज्यकर्ता असून दिल्लीस तंटे चाललेले पाहून स्वतः स्वतंत्र झाला. त्यावेळेपासून मोंगल राजांचा अधिकार नांवाचाच बंगालच्या सुभेदारांवर होता. उत्तरबंगाल्यांत वेगवेगळ्या मंगोलियन जातींच्या ताब्यांत सत्ता आळीपाळीनें जात होती. पंधराव्या शतकाच्या शेवटीं जेव्हां अल्लाउद्दीन हुसेनन तिकडे स्वारी केली तेव्हां नीलांबर राजा राज्य करीत होता; हा सेन घराण्यांतील होता. नंतर थोडयाच दिवसांनीं विश्वसिंगानें नवें घराणें स्थापन केलें. त्याचें राज्य करतोया नदीपासून मध्य आसामपर्यंत होतें;व १६६१ त गोलपारा पर्यंतचा प्रदेश मीरजुमलानें जिंकीपर्यंत बंगालच्या सुभेदाराच्या ताब्यांत आलें नाहीं. सतराव्या शतकाच्या आरंभीं चितागांग भाग टिप्पेरा किंवा माघ यांच्या पैकींच कोणाच्या तरी ताब्यांत होता; व डाक्का ही राजधानी झाल्यावर हा प्रदेश हळू हळू बंगालच्या सुभ्यास जोडण्यांत आला.

ओरिसा (मिदनापूर सह) कालापहाडनें हिंदु राजापासून हिसकावून घेतल्यापासून १५९२ पर्यंत अफगाणांच्याच ताब्यांत राहिलें; नंतर मानसिंगानें तें आपल्या प्रांतास जोडून घेतलें व त्यावर वेगळा सुभेदार नेमिला, परंतु नंतर मिदनापूर व बाळासोर हे बंगालमध्यें समाविष्ट झाले. १७५१ त अलीवर्दीखाननें नागपूरच्या भोंसल्यांस तो प्रांत दिला व त्यांच्याच ताब्यांत १८०३ मध्यें इंग्रजांनीं जिंकून घेई पर्यंत तो राहिला.

छोटानागपूर व ओरिसांतील मांडलिक (ट्रिब्युटरी) संस्थानें धरून छोटानागपुरास अकबरनाम्यांत 'झार खंड' असें म्हटलें आहे. ह्या प्रदेशांत वेगवेगळ्या जातींच्या नायकांनीं आपली सत्ता गाजवून मुलुख ताब्यांत ठेवला. पलामूमध्यें चिरो मुख्य होते; रांचीमध्यें मुंडा व ओरिसा संस्थानांत भुई व गोंड मुख्य होते. अकबरानें आपल्या राज्यास छोटानागपूरचा दक्षिण भाग जोडला होता, व पलामा शहाजहाननें जोडिलें. यानंतरचे नायक अठराव्या शतकाच्या शेवटीं त्यांनां मराठे जिंकीपर्यंत स्वतंत्र होते.

इंग्रज अमदानींतील बंगालचा इतिहास हिंदुस्थानच्या सामान्य इतिहासाचा एक भाग आहे. बंगालमध्यें प्रथम यूरोपमधून पोर्तुगीज लोक व्यापाराकरतां आले; ते १५३० च्या सुमारास चितागांग व सातगांव येथें आले. १५८६ मध्यें राल्फफिच देशांतून हिंडत असतां ते हुगळी येथें स्थायिक झाले होते. ईस्टइंडिया कंपनीतील कांहीं लोक आग्र्याच्या मार्गानें सुरतेहून १६२० त पाटणास आले. १६२५ च्या सुमारास ओरिसाच्या उत्तरेस पिप्ली येथें व चिनसुरास डच लोकांनीं वसाहत केली. १६४२ च्या सुमारास या प्रांतांत ईस्ट इंडिया कंपनीचा पहिला कारखाना बालासोर येथें स्थापन झाला. १६५० त हुगळी येथें एक कारखाना सुरू झाला, व १६५१ त कंपनीच्या बाउटन नांवाच्या सर्जननें शहाजहान बादशहापासून फरमान मिळविल्यावर इंग्रजांचा व्यापार सारखा वाढत चालला. नंतर लवकरच कासिम बझार व पाटणा येथें व थोड्या वर्षांनीं डाक्का येथें पांचवा कारखाना सुरू करण्यांत आला. बंगाल्यांतील या वसाहतींचा कारभार मद्रासच्या फोर्ट सेंट जार्ज येथून पाहण्यांत येत होता, परंतु १६८१ त बंगालचे कारखानदार स्वतंत्र रीतीनें आपला कारभार पाहूं लागले. कंपनीचा मुख्य उद्देश व्यापाराचाच होता; तथापि स्थानिक अधिकारी व नबाब हे त्यांच्याकडून वाटेल तसे पैसे काढीत असल्यामुळें कंपनीमध्यें व त्यांच्यामध्यें तंटे होत. हल्लींच्या कलकत्त्याचा उत्तरभाग सुतानुती हा जॉब कारनॉक यानें १६८६ त तात्पुरता घेऊन तेथें मुख्य ठाणें केलें व १६९० मध्यें तें कायम केलें. १७१० पर्यंत फोर्टविल्यम किल्ला बांधून तयार झाला. १६९८ त कलकत्ता, सुतानुती व गोविंदपूर हीं तीन खेडीं १३०० रुपयास कंपनीस विकत मिळालीं; १७१७ त ८१२१ रु. उत्पन्नाचीं ३८ खेडीं विकत मिळालीं.

१६८८ मध्यें फ्रेंचांनीं चंद्रनगर येथें वसाहत केली होती; व त्यांच्या भीतीनें इंग्रज लोक परवानगीशिवाय कलकत्त्याची दुरुस्ती करीत आहेत असें पाहून बंगालचा नबाब शिराजउद्दवल्यानें कलकत्त्यावर स्वारी केली व व तें हस्तगत केलें. त्यावेळेस कुप्रसिद्ध अंधारकोठडीचा प्रकार झाला. लगेच मद्रासेहून क्लाईव्ह (१७५७) मुर्शिदाबादेस आला. त्याची व नबाबाची लढाई प्लासी मुक्कामीं झाली; व तींत नबाबाचा पराभव झाला. मीरजाफर नबाब झाला; परंतु त्यालाहि लवकरच काढून टाकून त्याचा जांवई मीरकासीम यास कंपनीनें नबाब केलें. कंपनीचे नोकर मीरकासीमपासून सपाटून पैसे काढीत असल्यामुळें त्याचें कंपनीशीं वैमनस्य आलें व लढाई सुरू झाली. कंपनीच्या नोकरांनीं दोनदां त्याचा पराभव केला. तेव्हां कासीमनें पाटणा येथील इंग्रज कैद्यांस ठार मारून अयोध्या प्रांतांत पलायन केलें. अयोध्येच्या नबाबानें त्याला आश्रय दिला; परंतु त्या दोघांच्या सैन्याचा १७६४ मध्यें बक्सार येथें मेजर मनरोनें पराभव केला व बंगाल, बिहार आणि ओरिसा या प्रांतांचा दिवाणी अधिकार शहा अलम बादशहापासून ईस्ट इंडिया कंपनीनें मिळविला. याचा परिणाम असा झाला कीं ब्रिटिशांचें मुख्य ठिकाण मद्रासेहून कलकत्त्यास आलें. १७७४ पासून १८५४ पर्यंत बंगालचा गव्हर्नर हाच हिंदुस्थानांतील कंपनीच्या सर्व मुलुखाचा गव्हर्नरजनरल होता.

१७६५ त क्लाईव्हनें द्विसत्ताक राज्यपद्धति सुरू केली. मीरजाफर यास नबाब केलें; परंतु त्याच्यापासून एक रोखा लिहून घेतला; त्यांत सर्व वसूल कंपनीस देण्याचें त्यानें कबूल केलें होतें व कंपनीनें त्याच्या प्रांतांत फौज ठेवून प्रजा रक्षण करण्याचें काम स्वीकारलें. कंपनीनें नबाबास ठराविक रक्कम देऊन त्यानें सर्व राज्यव्यवस्था पहावी असें ठरलें होतें. नयाब किंवा दुय्यम नबाब वसूल गोळा करीत. या राज्यपद्धतीमुळें चोहोंकडे असंतोष उत्पन्न झाला व लोकांस फार जाच

होऊं लागल्यामुळें वसूल कमी होऊं लागला. १७६९–७० च्या दुष्काळामुळें व नबाबाच्या गैरव्यवस्थेमुळें सरासरी ⅓ लोक मेले. यानंतर राज्यपद्धति सुधारण्याकरतां दुसरे उपाय केल्यानंतर वारनहेस्टिंग्जनें एक अगदीं नवीन पद्धत सुरू केली त्यानें बंगालचे १४ भाग करून प्रत्येक जिल्ह्यावर एक कलेक्टर नेमिला व त्याकडे वसुलीचें काम दिलें. या कलेक्टरांनां 'दिवाणी अदालत' किंवा दिवाणी कोर्टावर नेमिलें व त्यांच्या हाताखालीं अनुभविक हिंदी कामगार नेमिले. फौजदारी अदालत किंवा गुन्ह्यांचे खटले चालविणारीं कोर्टें मुसलमान अधिकाऱ्यांच्या ताब्यांत दिलीं, परंतु सर्व साक्षीदारांच्या साक्षी झाल्या किंवा नाहीं व न्याय योग्य व निःपक्षपातीपणानें दिला जातो किंवा नाहीं हें पहाण्याचें काम कलेक्टरकडे सोपवलें होतें. स्थानिक दिवाणी व फौजदारी खटल्यांचीं अपीलें कलकत्त्यांतील दोन वरिष्ठ कोर्टांनीं ऐकावयाचीं असत. पुढें यूरोपियन कलेक्टरांच्या ऐवजीं देशी 'आमील' नेमले, व कलकत्ता, वरद्वान, डाक्का, मुर्शिदाबाद, दिनाजपूर व पाटणा या सहा प्रांतिक कौन्सिलांकडे जमाखर्चाच्या देखरेखीचें काम ठेविलें. दिवाणी खटले 'आमील' चालवीत व फौजदारी खटले चालविण्याकरितां देशी अधिकारी नेमिले होते. यापुढें पुन्हां कांहीं फरक करण्यांत आले; परंतु जेव्हां १७८६त लॉर्ड कॉर्नवालीस गव्हर्नरजनरल झाला, तेव्हां त्यानें वारन हेस्टिंग्जची मूळ पद्धति अमलांत आणली पण फरक एवढाच केला कीं, कलेक्टरासच मुनसफ व म्याजिस्ट्रेट केलें. पुढें कांहीं वर्षेंपर्यंत मोठ्या गुन्ह्यांचे खटले नबाबाच्या डेप्युटीकडे चालविण्याकरितां पाठविले जात, परंतु १७९३ त जे खटले म्याजिस्ट्रेटास चालविण्याचा अधिकार नव्हता ते चालविण्याकरितां कंपनीचे अधिकारी नेमून त्यांचीं चार फिरतीं कोर्टें ठेविलीं. नंतर प्रत्येक जिल्ह्यांत वेगळे न्यायाधीश नेमिले व त्यांच्या हाताखालीं साधे दिवाणी खटले चालवण्याकरितां हिंदी अधिकारी नेमिले. हल्लींची पद्धति लॉर्ड कॉर्नवालीस यानें घालून दिलेलीच, पण त्यांत क्रमानें कांहीं कमी जास्त फरक होऊन झालेली आहे.

१८३६ त बंगाल इलाखा फार वाढल्यामुळें त्याचे दोन भाग करण्यांत आले. ते बंगाल्यांतील (१) फोर्ट विल्यम व (२) आग्रा हे होत. आग्र्याकरितां एक वेगळा लेफ्टनंट नेमिला. बंगाल्यांतील फोर्ट विल्यम भागामध्यें हल्लींचा बंगालप्रांत व पूर्वबंगाल व आसामचा प्रदेश यांचा समावेश होत होता; यावर गव्हर्नर जनरलचा ताबा असे. ही व्यवस्था १८५४ पर्यंत चालू होती; नंतर त्या सालीं कायमचा लेफ्टनंट-गव्हर्नर नेमल्यामुळें गव्हर्नर जनरलला बंगालचें काम पहाण्याचें उरलें नाहीं. १८७४ त बंगालमधून आसाम प्रांत वेगळा करण्यांत आला व त्यावर चीफ कमिशनर नेमिला.

पण बंगालप्रांत फार अवाढव्य (१८९००० चौरस मैल व सुमारें ८ कोटी लोकसंख्या) असल्यानें एकट्या प्रांतिक सरकारला झेपेनासा होऊन पूर्वबंगालचें नुकसान होऊं लागलें. तेव्हां लॉर्ड कर्झननें डाक्का, चितागांग व राजशाही विभाग आणि आसाम प्रांत हे एकत्र करून त्यावर एक स्वतंत्र लेफ्टनंट गव्हर्नर नेमला व बाकीचा बंगाल सुटसुटीत केला. पण ही बंगालची फाळणी राजकीय वातावरण क्षुब्ध करून सोडणारी ठरली व तीमुळें देशांत फारच अशांतता माजली तेव्हां १९११ त ही फाळणी रद्द करून आसाम पुन्हां चीफ कमिशनरच्या ताब्यांत दिला व बिहार–ओरिसा प्रांत नवीन पाडला. १९१९ च्या सुधारणाकायद्यानें बंगाल, बिहार–ओरिसा व आसाम यांवर एकेक गव्हर्नर नेमला गेला, व या सर्वांनां स्वतंत्र प्रांताधिपतीचा दर्जा मिळाला. अशा रीतीनें बंगाल, बिहार व ओरिसा यांची जी फार प्राचीन काळापासून सांगड घालण्यांत आली होती ती तुटून फक्त बंगाल वेगळा झाला. तेव्हां यापुढें बंगालचा इतिहास स्वतंत्र होईल.

अ व शे ष.—या भागांत अशोकाचे पुष्कळ खोदीव लेख असून त्यांचा काळहि ठरविला गेला आहे. त्यांपैकीं कांहीं खडकांवर—उदाहरणार्थ, पुरी जिल्ह्यांत धौली येथें — व ससराम येथें चंदनपीट टेंकडीवर लहान गुहेंत व—कांहीं खांबांवर अस एकंदर चार असून हल्लींच्या नेपाळ तराईतील बुद्धाचीं पवित्र स्थानें पहाण्याकरितां अशोक ज्या मार्गानें गेला त्या मुझफरपूर व चंपारणच्या भागांतील मार्गावर आहेत; लारिया नंदनगड जवळील खांब अजून शाबूत आहे. यानंतरच्या काळचे लेख पुरी जिल्ह्यांत खंडगिरी व उदयगिरी टेंकड्यांवरील गुप्तकालीन होत. ख्रिस्तपूर्व १६९ मधील खारवेल येथील खोदीव लेखांवरून यांच्या कालाचा निर्णय होतो. इ. स. तिसऱ्या शतकापासून राजगीर येथील सोनभंडार गुहेखेरीज एवढाच काय तो जुना अवशेष राहिलेला भाग दिसतो. दक्षिण बिहारांत बुद्धांचे अवशिष्ट भाग विपुल आहेत. जैन आणि बौद्ध

धर्माचें मूळ स्थान जें प्राचीन मगध तेथें तर असे अवशेष विशेषेंकरून दृष्टीस पडतात; या ठिकाणीं मुसुलमान लोक येईपर्यंत बौद्धधर्म प्रचलित होता.

बुद्धगया येथें प्राचीन काळचे शिलालेख आहेत; त्यांवरून पुष्कळ माहिती मिळते. हे खोदीव लेख अशोकाच्या वेळेपासून सांपडतात. इसवी सन ४५० च्या सुमारास बुद्धगयेचें हल्लीचें देऊळ बांधलें असावें; त्यानंतर त्याची पुष्कळवेळां डागडुजी होऊनहि पुढें तें पडलें; चाळीस वर्षांपूर्वी सरकारच्या मदतीनें तें पुन्हां बांधण्यांत आलें. मेजर वाडेलनें पाटणा येथें प्राचीन पाटलीपुत्र शहराचे अवशष शोधून काढले आहेत. बिहार शहराच्या दक्षिणेस ७ मैलांवर बारागांव येथें मातीच्या ढिगाखालीं नालंदा शहराचे भाग गढून गेलेले दिसतात; हें पालराजांच्या वेळेस बौद्धधर्म शिकण्याचें मुख्य ठिकाण होतें.

पुरी येथें जगन्नाथाचें देऊळ व भुवनेश्वर येथें शिवमंदिरें आहेत. कोरनाक येथें इ. स. १२७९ त नरसिंह देवानें बांधलेलें सूर्याचें देऊळ आहे. याशिवाय प्राचीन देवळें फारशीं नाहींत. त्यांपैकीं मुख्य शहाबाद येथील मुंडेश्वर टेकडीवरील व गयेजवळील अपसार येथील देवळें हीं सहाव्या किंवा सातव्या शतकांतील असावींत; बराकर येथील व झारखंडाच्या जुन्या प्रदेशांत दगडी देवळें असून त्यांपैकीं कांहीं ९०० वर्षांपूर्वीचीं आहेत; बांकुऱ्यांतील भीष्मपूर येथील दोनशें—चारशें वर्षांपूर्वीचीं बंगाली विटांचीं देवळें आहेत व दिनाजपुरांतील कांतनगर येथील देवळें अशींच आहेत.

प्राचीन स्थानें, वस्तू व मूर्ती संशोधण्याचें काम बंगाल्यांतील अनेक संस्थांनीं अंगिकारलें असून त्यांनां बरेंच यशहि आलेलें आहे.

बंगाल्यांत स्वतंत्र मुसुलमान राजे राज्य करीत होते तेव्हां पठाणी धर्तीवर पुष्कळ इमारती तयार झाल्या. या राजांच्या प्राचीन राजधान्या मालडा जिल्ह्यांत गौर आणि पादुआ या होत्या. येथें रामकेरची बारदुआरी, डांकिल दरवाजा, तंतिपार, सोना, लोटन मशिदी, कदमरसूल व फिरोजमिनार वगैरे इमारती आहेत.याशिवाय ७७ घुमटांची शाट गुंबझ मशीद आहे; ही खुलना जिल्ह्यांत बागरघाटाजवळ खानजहाननें बांधली होती. हुगळी जिल्ह्यांत दुसरा पादुआ येथें सुमारें इ. स. १३०० मधील मोठी मशीद आणि मिनार आहे, व त्याजवळ त्रिवेणीजवळ झाफरखान गाझीचा दरगा आणि त्याच काळची मशीद आहे. ससराम येथें शेरशहाची उत्कृष्ट कबर बांधलेली आहे. त्याच्या बापाची कबर तेथेंच असून शहाबाद जिल्ह्यांत पादुआ पोटविभागांत चैनपूरजवळ बख्तयारखानाचें थडगें आहे. ससरामच्या नैर्ऋत्येस २६ मैलांवर शीरगडचा लहान डोंगरी किल्ला शेरशहाच्या वेळेपासून आहे. १६१६ त तयार झालेल्या दिनाजपूरजवळ मनेर येथें शहादौलतचा दरगा आहे; यांत मोंगल काळचें कलाकौशल्य पहाण्यास सापडतें. याच काळच्या पुष्कळ कबरी आणि मशिदी पाटणा, बिहार, राजमहाल, मुर्शिदाबाद, मोंगीर, डक्का येथें आहेत.

**संयुक्तप्रांत,** इतिहास.—वैदिक सूक्तांवरून असें अनुमान निघतें कीं आर्यांची वस्ती २०००वर्षांपूर्वी यमुना नदीच्या पश्चिमेस होती. त्यानंतर त्यांनीं तेथून आपला तळ हलविला. महाभारत व रामायणावरून जी ऐतिहासिक माहिती मिळते, तीवरून आर्यांनीं प्रथमतः आपलें राज्य मिरत येथें व नंतर अयोध्येस स्थापिलें असें दिसतें. मिरत भागांत रहात असलेले हस्तिनापूरचे कौरव व पांडव यांच्यांतील भारतीयुद्धाचें वगैरे वर्णन महाभारतांत आहे. रामायण—महाभारताचा काल निश्चित ठरला नाहीं. तथापि या प्राचीन ग्रंथांवरून असें दिसतें कीं आर्यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या मार्गांनीं हिंदुस्थानांत वसति केली. हिमालयाच्या पायथ्याशीं पोंचल्यानंतर बिहारकडे ते वळले व मगध देश त्यांनीं व्यापून टाकिला. यापुढचा महत्त्वाचा ऐतिहासिक भाग म्हणजे बौद्ध काल होय. बुद्धानें आपल्या आयुष्याचा बराच काल पूर्वेकडील जिल्ह्यांत घालविला ही गोष्ट त्या काळचे शिलालेख, स्तूप, विहार इत्यादिकांवरून सिद्ध होते.

शिकंदर बादशहाच्या वेळीं इकडे चंद्रगुप्त राजा राज्य करीत असून त्याच्या राज्याचा विस्तार हिंदुकुश पर्वतापासून बंगालच्या उपसागरापर्यंत होता.राजधानीचें ठिकाण पाटणा येथें होतें. चंद्रगुप्ताचा नातु अशोक याचे संयुक्तप्रांतांत शिलालेख प्रसिद्धच आहेत ( अलाहाबाद, बनारस व डेहराडून येथील कालसी).

मौर्यांनंतर चार घराणीं उदयाला आलीं ती शूरसेन (सांप्रत मथुरा), उत्तर पांचाल (रोहिलखंड), कोसल (अयोध्या) व कौशांबी (अलाहाबाद) हीं होत. चौथ्या शतकांत मगध (बिहारप्रांत) देशांत चंद्रगुप्त राजा राज्य करीत असून त्याच्या राज्याचा विस्तार सतलज नदीपासून

बंगाल व अयोध्येपासून मध्यहिंदुस्थानापर्यंत होता. ९ व्या शतकांत गुप्त राज्य संपलें. त्यानंतर देशांत बेबंदशाही माजली. सातव्या शतकांत कांहींसें स्थैरस्थावर झालें. त्यावेळीं शिलादित्य माळव्यांत राज्य करीत होता व हर्षवर्धन कनोज येथें होता. ९८८ सालीं गझनीच्या सबक्तगीननें पंजाब मधील तोमर राजांचा पराभव करून तो कनोज पर्यंत आला. १०१८ त महंमद गझनीनें यमुना नदी उतरून बुलंद शहर घेतलें. मथुरा शहराची भरभराट त्यावेळीं अतिशय होती. गझनीनंतर घोरी इकडे स्वाऱ्या करूं लागले. सन ११९१ मध्यें महंमद घोरीनें लागलीच पुढील वर्षीं चांगली तयारी करून पृथ्वीराजाचा पराभव केला व त्याचें राज्य घेतलें. यापुढें मुसुलमानांच्या गुलाम घराण्यानंतर खिलजी राजे झाले. खिलजींच्या सत्तेखालीं रयत फार त्रस्त झाली होती. सन १३४४ त मोठा दुष्काळ पडला. त्या योगानें दुआब भाग वेचिराख झाला. १३९८ त तैमूरलंगाची स्वारी आली. त्यानें दिल्ली सर करून मिरतपर्यंत प्रवेश केला.

सोळाव्या शतकाच्या आरंभीं दिल्ली राजधानी मोडून आग्रयास ठाणें आलें. १५२६ त बाबरनें इब्राहीमचा पराभव पानिपत येथें करून राज्य घेतलें. अकबरानें आग्रा व अलाहाबाद येथील प्रचंड किल्ले बांधले. मोंगलांची अमदानी मागें इतिहासांत वर्णन केलीच आहे. आग्रा येथें अकबराचें थडगें जाहांगीरनें बांधलें. शहाजहाननें आपल्या राणीच्या स्मरणार्थ आग्रयास 'ताजमहाल' नांवाची अत्यंत सुंदर व सुबक अशी इमारत यमुना नदीच्या कांठावर बांधली. जगांत अशी सुंदर दुसरी इमारत नाहीं. शहाजहानच्या चौघा मुलांत गादीबद्दल ज्या लढाया झाल्या त्या या प्रांतानें पाहिल्या आहेत.

औरंगझेब १७०७ मध्यें वारला व त्याजबरोबर या भागांतील व हिंदुस्थानांतील इतर सर्व ठिकाणची सत्ताहि संपुष्टांत आली. औरंगझेबाच्या मरणापूर्वीच जाट लोकांनीं आग्रयास शह देण्याचा उपक्रम आरंभिला होता आणि उत्तरोत्तर ते संयुक्त प्रांतांत घुसूं लागले. १७०६ सालीं शीख लोकांनीं अनत्याचारी धर्मदीक्षा टाकून तलवार धारण केली व संयुक्त प्रांतावर स्वारी केली. या वेळीं मराठ्यांनीं विंध्य पर्वताच्या उत्तरेस आपला मोर्चा फिरविला. फर्रुकशाह बादशहानें त्यांनां दिल्लीहून आमंत्रण पाठविलेंच होतें. मराठ्यांची जरब या वेळेस सर्वत्र सारखी बसली होती. व बुंदेलखंडांतील बुंदेले लोकहि आपल्यावरची मुसुलमानी सत्ता धुडकावून लावण्याचा प्रयत्न करीत होते. बुंदेले लोकांनां मराठ्यांचें पाठबळ उत्तम रीतीनें होतेंच. १७३७ त मराठ्यांनीं आग्रा व इटावा हीं दोन शहरें लुटलीं. परंतु अयोध्येच्या नबाबाचा वजीर सादतअल्ली यानें त्यांचा पराभव केला. १७५१ त सादतअल्लीचा पुतण्या सफदरजंग यानें मराठ्यांनां परत बोलाविलें पण मराठ्यांचा व सफदरजंगाचा स्नेह फार वेळ टिकला नाहीं.

१७३८ त नादीरशहानें दिल्लीवर स्वारी करून पुष्कळशी लूट नेली. त्याचा वारस अहंमदशहा—दुराणी यानें एकदां दिल्ली लुटण्याचा प्रयत्न केला होता परंतु सफदरजंगानें त्याचें कांहीं एक चालू दिलें नाहीं. शहा अलम् वारल्यानंतर १० वर्षांनीं दिल्लीस इराणी दुराणी लोकांचें प्राबल्य विशेष वाढलें. यांत सय्यदबंधू प्रमुख होते.

आतांपर्यंत हिंदुस्थानच्या मुसुलमानी इतिहासांत या प्रांताचा इतिहास गुंतला होता. या काळापासून मात्र पुढें संयुक्त प्रांताचा इतिहास स्वतंत्र रीतीनें देतां येईल. कारण यावेळीं अयोध्येचे नबाब स्वतंत्रता धारण करून राहिले होते व दिल्लीचे बादशहा नांवाचे होते.

अयोध्येचा नबाब सादतअल्ली हा नुसता अयोध्या प्रांताची व्यवस्था पहात नसून अलाहाबादहि त्याच्या देखरेखीखालीं होतें. सादतअल्ली व सफदरजंग दोघेहि बादशहाचे वजीर समजले जात होते. शेरशहाच्या अमदानींत अफगाण—पठाणांचें प्राबल्य वाढूं लागलें. महंमदशहा बंगष हा माळवा व अलाहाबाद या प्रांतांत मुलुखगिरी करीत असे. फर्रुकाबाद शहराची वसाहत त्यानें केलेली होती व मध्य दुआबमध्यें त्यानें स्वतंत्र राज्य स्थापिलें. १७४० मध्यें अली महंमद नांवाचा इसम रोहिलखंडांत सुभ्यावर नेमला होता, तो तिकडेच स्वतंत्र होऊं पाहत होता. सफदरजंग या अयोध्येच्या नबाबानें एकवेळ त्याला हद्दपार केलें होतें परंतु फिरून तो रोहिलखंडमध्यें मुक्रर झाला. १७४९ त अलीमहंमद वारला. तेव्हां सफदरजंग रोहिलखंड व फरुक्काबाद हीं अयोध्येला जोडण्याचा विचार करीत होता. या चकमकींत सफदरजंग प्राणास मुकून अहंमदखान यानें अलीगड पासून कानपूरपर्यंत प्रदेश संपादन केला.

दुराण्यांची तिसरी स्वारी १७५७ त झाली. तेव्हां दुसरा अलमगीर बादशहा होता. नजीबखान नांवाच्या एका पठाण सरदाराचें प्राबल्य दिल्लीस फार वाढलें होतें,

कारण तो दुराणी पक्षाचा होता. अहमदशहा दुराणी काबुलास परत गेल्यावर गाझीउद्दीननें त्याचा पराभव करण्याकरितां मराठ्यांची कुमक मागितली. या गाझीउद्दीननें १७५९ त बादशहाचा खून करून शहाअलम् (दुसरा) याला बादशाही तक्तावर बसविलें. १७६० त अहमदशहा दुराणी हिंदुस्थानांत परत आला. तेव्हां रोहिले व अयोध्येचा नबाब त्याला मिळाले. १७६१ त पानिपत येथें दुराणी व मराठे यांची फार मोठी लढाई होऊन मराठ्यांचा पूर्णपणें पराजय झाला.

पानपतच्या लढाईपासून मराठ्यांचा मात्र बंदोबस्त झाला. पण संयुक्तप्रांतांतील इतर संस्थानिकांवर त्यामुळें कांहींच वचक बसला नाहीं. उत्तरदुआबमध्यें नजीबखान रोहिला त्रास देत होताच. जाट लोक आग्रा सर करून दिल्ली काबीज करण्यासाठीं यत्न करीत होते. पुढें मराठे दिल्लीस येऊन सत्ताधीश झाले. त्यांनीं अलाहाबाद प्रांताची सनद बादशहापासून मिळविली. ते हळू हळू रोहिलखंडापर्यंत पोहोंचले होते. १७७५ मध्यें सुजाउद्दौला वारल्यावर त्याचा मुलगा असफउद्दौला यानें इंग्रजांशीं तह करून बहुतेक बनारस प्रांताखालचा मुलुख इंग्रजांनां दिला. बनारसचा थोडा भाग चेतसिंग याजकडे राहिला होता. त्यानें इंग्रजांची कांहीं जुलमी मागणी नाकारल्यामुळें इंग्रजांनीं त्याचा प्रांत खालसा केला. इकडे मराठ्यांचा फ्रेंच सरदार डी बॉइन यानें उत्तरदुआब, आग्रा व मथुरा हे जिल्हे सर केले. अयोध्येचा नबाब सादतअल्ली यानें आलहाबादचा किल्ला इंग्रजांनां देऊन शिवाय परचक्रापासून आपला बचाव करावा म्हणून ७६ लक्षांची खंडणी दरसाल देण्याचें कबूल केलें होतें.

१९ व्या शतकाच्या आरंभीं बनारस प्रांत व अलाहाबाद किल्ला इंग्रजांकडेच होता. यावेळीं पुन्हां दुराणी हिंदुस्थानावर स्वारी करणार म्हणून अयोध्येचा नबाब सादतअल्ली याला मोठी भीति उत्पन्न झाली. म्हणून गोरखपूर जिल्हा, रोहिलखंड, अलाहाबाद, फत्तेपूर, कानपूर, इटावा, मैनपुरी व मिर्झापूर जिल्हे व तराई परगणा एवढा प्रांत इंग्रजांनां तहाद्वयात दिला. एक वर्षानंतर फरुक्काबादच्या नबाबांनीं आपला प्रांत इंग्रजांच्या स्वाधीन केला.

१८०३ सालीं इंग्रज व मराठे यांमध्यें लढाई सुरू होऊन इंग्रज विजयी झाले व त्यांनां संयुक्तप्रांत बहुतेक मिळाला; एवढेंच नव्हे तर संयुक्तप्रांताबाहेरचा मुलुखहि त्यांच्या सत्तेखालीं आला. त्याचा विस्तार उत्तरेस गोरखपूर (कुमाऊनप्रांत) जिल्ह्यापासून तों दक्षिणेस गोहद–ग्वाल्हेरपर्यंत होता.

प्रथमत: हे सर्व प्रांत बंगाल इलाख्यांत समाविष्ट करून व्हाईसरायाच्या देखरेखीखालीं ठेविले होते. सन १८३३ त पार्लमेंटमध्यें एक कायदा होऊन वायव्येकडील प्रांत बंगालपासून अलग केले व त्या ठिकाणीं लेफ्टनंट गव्हर्नरची योजना केली. वायव्येकडील प्रांतांत त्या वेळेस आग्रा प्रांत (सांप्रतचा) व शिवाय दिल्ली व अजमीर प्रांत येत होते. १४ वर्षांनंतर मेरवाडा वायव्यप्रांतांत समाविष्ट केला गेला आणि नर्मदा व सागरप्रांत १८९३ त सामील केले. बुंदेलखंड, झांशी, जालवण व हमीरपूरचा भाग १८४० ते ५३ पर्यंत संयुक्तप्रांताला जोडले गेले. १८५६ त अयोध्याप्रांत जोडला. बंडानंतर लागलीच दिल्ली प्रांत पंजाबकडे, अयोध्येच्या उत्तरेचा तराई प्रांत नेपाळकडे आणि बरेली व मुरादाबाद यांतील थोडीं गांवें रामपूरच्या नबाबाकडे देण्यांत आलीं. सागर व नर्मदा प्रांत मध्य प्रांताकडे १८६१ सालीं देऊन अजमेर–मेरवाडा १८७१ सालीं हिंदुस्थान सरकारनें आपल्याकडे वर्ग करून घेतले. झांशी व बारिया जिल्ह्यांतहि अशाच प्रकारचे थोडथोडे फेरफार केले.

पण बऱ्याच दिवसांपासून सुरू असलेली बेबंदशाही एकाएकी नाहींशीं होईना. रोहिलखंडांत १८१६ सालीं घरपट्टीवरून बराच असंतोष माजला. तसेंच सहारणपुरांत १८२४ सालीं डाकू लोकांचा फार सुळसुळाट झाला. सबंध प्रांतांत ठगांचा उपद्रव असून, जलमार्गावर सुद्धां चांचेगिरी चालू होती.

१८५७ सालीं शिपायांचें बंड झालें. त्यांत बरेली, फरुक्काबाद, बांदा, कानपूर, झांशी येथील राजांनीं पुढारीपणा घेतला होता. तेव्हां या प्रांतांत बंडवाल्यांचा मोठा जोर होता. आग्रा व अलाहाबादचे किल्लेच फक्त इंग्रजांकडे होते. परंतु लवकरच दिल्ली व कानपूर बंडवाल्यांपासून घेऊन रोहिलखंडहि सर करण्यांत आलें. सर ह्यू रोजनें मध्यहिंदुस्थानपर्यंत जाऊन झांशी घेतली. अशा रीतीनें कंपनीसरकारनें सबंध बंडाचा मोड करून जिकडे तिकडे शांतता प्रस्थापित केली. पोलिसखात्याची स्थापना करून लोकांनां नि:शस्त्र केलें व मोठे किल्ले जमीनदोस्त करून टाकले.

ऐ ति हा सि क अ व शे ष.—या प्रांतांत अशोकाचे शिलालेख काशी, अलाहाबाद, कालसी (डेहराडून जिल्हा)

या ठिकाणीं आहेत. बनारसजवळ सारनाथ येथील, गोरखपूर जिल्ह्यांत कासिया येथील, व बस्ती जिल्ह्यांत पिप्रावा येथील स्तूप व त्यांवरील कोरीव लेख ख्रिस्त-पूर्व ३ ऱ्या व ९ व्या शतकांतील असावेत. हिमालयाचा भाग सोडून संयुक्तप्रांताच्या प्रत्येक भागांत बौद्धांचे अवशेष—इमारती, नाणीं, शिक्के वगैरे—आढळून येतात. मथुरा व ललितपूर येथील जैन देवळें व खोदीव कामें उत्तम स्थितींत सांपडतात.

महाभारत व रामायणांतील ऐतिहासिक स्थळांशिवाय अलीकडील इसवी सन चवथ्या व पांचव्या शतकांतील गुप्तांचे अवशेष या प्रांतांत सांपडतात. गुप्तघराण्यांतील ताम्रपट गोरखपूर, गाझीपूर, इटावा, व बुलंदशहर जिल्ह्यांत आढळले आहेत. झांशी जिल्ह्यांत देवगड येथील लहान पण सुंदर देऊळ याच काळांतलें आहे. कनोज, जोनपूर, अयोध्या, मथुरा आणि बनारस येथें अशा इमारती आढळून येतात कीं, पूर्वी तीं हिंदु देवळें असून त्यांचें रूपांतर मशिदींत झालेलें आहे; व म्हणूनच सांप्रतच्या हिंदु क्षेत्रांतून सुद्धां जुन्या हिंदु इमारती अगर देवळें मुळींच आढळत नाहींत. हरिद्वार, अयोध्या, बनारस आणि मथुरा येथील देवळें अलीकडील बांधणीचीं आहेत. अकबर बादशहा धर्मद्वेष्टा नव्हता. म्हणूनच वृंदावन येथील सुंदर देवळें त्याच्या कालांत झालीं. १५९० सालीं बांधलेलें वृंदावन येथील देऊळ भव्य व सुंदर आहे.

मुसुलमानी इमारती मशिदी, इदगा थडगीं या रूपांत पुष्कळ आहेत. त्यांत बदौन येथें १३ व्या शतकांत अल्तमश बादशहानें बांधलेल्या कांहीं इमारती आहेत. जोनपूर येथील मशीदी फार सुंदर व प्रेक्षणीय आहेत. या मशीदींचे मनोरे उंच असून मनाला थक्क करून सोडणारे आहेत व ते पाहून पुष्कळ अंशीं ईजिप्तमधील मनोऱ्यांची आठवण होते.

१६ व १७ व्या शतकांत अकबर, जहांगीर व शहाजहान यांनीं फत्तेपूर-शिक्री व आग्रा येथील इमारती बांधण्यांत अनोनात द्रव्य खर्च केलें. राजवाडे, भव्य व सुंदर थडगीं व मशीदी हीं पाहतांक्षणींच मोंगल बादशहांच्या वैभवाची साक्ष पटते. १८ व्या शतकांत अयोध्येच्या नबाबांनीं व रोहिल्यांनीं अशाच कांहीं इमारती बांधल्या आहेत.

**पंजाब,** इ ति हा स.—फार प्राचीन काळीं आर्य लोकांनीं पंजाबांत वस्ती केली होती व ऋग्वेदाचाहि कांहीं भाग पंजाबांतच रचला गेला हें पूर्वी विशद केलेंच आहे. ऋग्वेदांत सरस्वती व इतर नद्यांचा उल्लेख आहे. सतलज व बियास यांस शुतुद्रि व विपाश असें संबोधिलें आहे. तदनंतरच्या वैदिक काळांत आर्य लोक आग्नेयीस वळले व ठाणेश्वराजवळ कुरुक्षेत्रांत प्रख्यात भारतीय युद्ध झालें. युधिष्ठिराचें इंद्रप्रस्थ हें हल्लींचें दिल्ली शहर होय.

ख्रिस्तपूर्व ३२६ व्या वर्षी ओहिंद या जागी सिंधु नदी उतरून अलेक्झांडरनें पोरस राजाच्या मांडलिकांवर प्रथम स्वारी केली. ह्या प्रांताची राजधानी तक्षशिला ही सिंधुनदीपासून ३ दिवसांच्या वाटेवर होती. तक्षशिला ही फार प्रेक्षणीय व भरभराटीस आलेली नगरी होती. ती घेऊन अलेक्झांडर झेलमकडे वळला. झेलमवर पोरस ( पुरु ) राजाची व त्याची गांठ पडली. अलेक्झांडरनें पोरसचा पराभव केला पण लवकरच अलेक्झांडरनें त्याला आपला मित्र बनविलें व त्याचें राज्य त्याला परत दिलें. नंतर पोरसचा पोरस याच नावाचा एक पुतण्या होता त्याच्यावर अलेक्झांडरनें स्वारी केली व त्याचा पराभव करून त्याला रावीपार घालविलें. नंतर पिंप्रम व संगल घेतलें पण पुढें त्याचे सैनिक त्रासून गेल्यामुळें तेथून तो परत फिरला. नंतर सिंधप्रांतावर त्यानें स्वारी केली व कांहीं भाग आपल्या ताब्यांत घेतला. पण तिकडील स्थानिक राजांनीं तो त्यास पचूं दिला नाहीं. याचें चरित्र अलेक्झांडर धी ग्रेट या शब्दाखालीं दिलें आहे तें पहावें.

अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर पोरसनें सिंधमधून तेथील यवन अधिकाऱ्यांस हांकून दिलें. पुढें सहा वर्षांनीं चूडासमा यांनीं पोरसचा सूड घेण्यासाठीं त्याचा विश्वासघात करून खून केला. त्याबरोबर सर्व राष्ट्र मॅसिडोनियन सत्तेविरुद्ध उठलें व चंद्रगुप्त मौर्य यानें पंजाब व सिंधु नदीकांठचा मुलूख आपल्या ताब्यांत घेतला. चंद्रगुप्तानें पंजाबांतील सर्व लोक ग्रीक लोकांच्या विरुद्ध एक केले. पुढें १६ वर्षांनंतर (ख्रिस्तपूर्व ३०५) जेव्हां सेल्युकस निकेतर यानें हिंदुस्थानावर स्वारी केली तेव्हां चंद्रगुप्त प्रबळ झाला होता व त्यामुळें निकेतरला, सिंधुनदीच्या पश्चिमेचा मुलूख व आपली स्वतःची मुलगी चंद्रगुप्तास देणें भाग पडलें. चंद्रगुप्तानंतर त्याचा मुलगा बिंदुसार व नातू अशोक यांच्या कारकीर्दींत पंजाबांत बुद्ध धर्मास राजाश्रय मिळाला. ही गोष्ट तोपा येथील स्तंभ व भावलपूर संस्थानांतील सुई विहार येथील बुद्ध अवशेषांवरून

दिसून येते. मौर्य घराण्याच्या कारकीर्दीत सतलजपासून हिंदूकुश पर्वतापर्यंतच्या प्रदेशाची व सिंधचीहि तक्षशिला ही राजधानी होती. अशोकाच्या पश्चात ग्रीस व बॅक्ट्रिया प्रदेशांचा राजा युथीडीमस यानें हिंदुस्थानांत आपली सत्ता वाढविली. परंतु त्यास सुभगसेन यानें अडथळा केला. ह्यानंतर दहा वर्षांनीं (ख्रिस्तपूर्व १९५) युथीडीमसचा मुलगा डेमिट्रीयस यानें पश्चिम पंजाबमध्यें आपली सत्ता स्थापिली व संगल शहर पुन्हां वसवून त्यास युथीडीनिया असें नांव दिलें. यापुढील माहिती मिन्यांडरनें ग्रीक व बॅक्ट्रियन सत्तेचा पुन्हां उत्कर्ष करीपर्यंत आढळत नाहीं. मिन्यांडरचें राज्य पंजाबांत बरेंच पसरलें होतें असें प्लुटार्क म्हणतो. परंतु पश्चिमेकडील रानटी लोकांच्या लाटांनीं हें सर्व राज्य लयास गेलें.

पुढें (ख्रिस्तपूर्व १००) शक राजा मौसमोगा यानें पंजाबच्या वायव्येकडील भागांत राज्य स्थापिलें व तक्षशिला ही आपली राजधानी केली. यूएची वंशीय कुशान लोकांचा नायक कुज्जुलकर कडफिसेस यानें शक राजावर स्वारी करून हिंदुस्थानांतील शेवटचें ग्रीक राज्य पादाक्रांत केलें. त्याचा पुत्र वेमो कडफिसेस यानें सबंध वायव्य हिंदुस्थान काबीज केलें (इ. स. १०). सुमारें इ. स. १९ सालीं गोंडोफेरसच्या आधिपत्याखालीं पार्थियन लोकांचा पंजाबांत अंमल बसला. पण पार्थियन सत्ता फार वेळ टिकली नाहीं. कारण इ. स. ७८ सालीं कनिष्काच्या नेतृत्वाखालीं कुशान लोकांनीं आपली सत्ता पुन्हां मिळविली. कनिष्कानंतर हुविष्क व जुष्क (वासुदेव) हे गादीवर आले. वासुदेवाच्या वेळीं कुशान लोकांचें राज्य पंजाबांत थोड्या प्रदेशावर राहिलें. त्यानंतर लहान यूएची लोकांचा नायक कितोला यानें तें राज्य बळकाविलें. पांचव्या शतकाच्या मध्यांत श्वेतहूणांनी या प्रांतावर स्वारी केली. तोरमाण व त्याचा मुलगा मिहिरकुल यांच्या कारकीर्दींत या हूण लोकांचें पंजाबांत बरेंच दूरवर राज्य पसरलें होतें. संगल ही त्यांची राजधानी होती. राजतरंगिणीमधील मिहिरकुल हाच होय. यानें काश्मीरमध्येंहि आपलें राज्य स्थापिलें. ५४४ मध्यें कारोर येथें त्याचा व सिथियन सत्तेचा नाश झाला. अशोकानंतर पंजाबचा धार्मिक इतिहास चांगलासा माहीत नाहीं. तरी पण मिहिरकुलाच्या वेळीं बौद्ध धर्माचें महत्त्व नाहिसें झालें हें त्यानें केलेल्या बौद्धांच्या छळावरून स्पष्ट होतें.

सहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत ठाणेश्वर येथें एक प्रबळ राज्य स्थापिलें गेलें. यामध्यें झेलम नदीच्या पूर्वेकडील पंजाबच्या भागाचाच काय तो समावेश होत असे. कारण ह्युएन म्हणतो कीं, तक्षशिला व सिंघपूर हे काश्मीरच्या ताब्यांत होते व सिंधूपासून बियासपर्यंतचा मध्यपंजाब संगल राज्यांत असून त्याची राजधानी शाकल ही होती. व मुलतान हें त्या राजाचें मांडलिक संस्थान होतें. आठव्या शतकाच्या आरंभीं ठाणेश्वराचें महत्त्व कमी झालें व कनोजचे तोमर राजे यांनीं आग्नेयपंजाबांत राज्य स्थापिलें. व हंसी घेऊन दिल्ली शहर वसविलें. एका शतकानंतर तोमर राजाच्या जागीं अजमीरचे चव्हाण राजे आले. ही गोष्ट ११५१ त घडली.

मुसुलमान लोकांनीं पंजाबांत दोन मार्गांनीं स्वाऱ्या केल्या. इ. स. ६६४ सालीं एक मुसुलमान सेनापति मुलतानपर्यंत आला होता. परंतु त्या स्वारीचा कांहींच परिणाम झाला नाहीं. पुढें (७१२) महंमद कासीम यानें सिंध जिंकून मुलतान घेतलें. मुलतान हें दाहीर राजाच्या मुलखांत असून रावी नदीच्या उत्तरेस होतें. मुलतानहून त्यानें पुढें दुसऱ्या स्वाऱ्या केल्या. झेलम नदीच्या कांठचें ब्रम्हपूर, सारकोट व कारूर घेऊन देपालपूरहून हिमालयाच्या पायथ्याकडे स्वारी केली. परंतु त्याच्या चुकांमुळें त्याला पुढें जातां आलें नाहीं. व मुलतान व पंजाब मुसुलमानांच्या ताब्यांतून निसटला.

इ. स. ८७१ च्या सुमारास मुलतान प्रांत अरबांच्या अंमलखालीं पुन्हां आला. बाकीचा पंजाब हिंदु राजांच्या ताब्यांत होता. ओहिंद येथें ब्राह्मण राजे राज्य करीत होते तसेंच जालंधर अथवा त्रिगर्त हें एक प्रबळ हिंदु राज्य होतें.

सुमारें एक शतकानंतर पुन्हां हिंदुस्थानावर मुसुलमानांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या. इ. स. ९७९ मध्यें लाहोरचा राजा जयपाळ हा गझनीचा अमीर सबक्तगीन याजवर चालून गेला. लघमान येथें त्यानें सबक्तगीनचा पराभव केला. जयपाळचे दिल्ली, अजमीर, कालिंजर व कनोज येथील राजांशीं स्नेहसंबंध होते. पुढें नऊ वर्षांनीं सबक्तगीननें सिंधु नदीपर्यंतचा मुलूख आपल्या ताब्यांत घेतला. सबक्तगीनच्या नंतर गझनीकर महमूदनें १००१ सालापासून हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. याची माहिती याच्या नांवाखालीं (गझनी घराणें-ज्ञानकोश वि. १२) पहावी. लागोपाठ पराभव झाल्यानें जयपाळानें स्वतःस जाळून घेतलें. त्याचा मुलगा अनंगपाळ यानें मुलतानचा सुभेदार अबुलफतेह लोदी याची मदत घेतली तरी पण

१००६ सालीं त्याचा पेशावर येथें पराभव झाला. पुन्हां अनंगपाळानें सर्व हिंदु राजांचा एक जंगी संघ तयार केला व महमुदास तोंड दिलें पण त्यांतहि आपसांतील फाटाफुटीनें त्याचा पेशावर येथें पराभव झाला. या संघांत उज्जनी व ग्वाल्हेर वगैरे दूरदूरचे राजे सामील झाले होते. नंतर महमूद यानें नगरकोट (कांग्रा) लुटलें. १०१० सालीं महमूदनें मुलतानवर स्वारी करून तेथील लोदी सुभेदारास हद्दपार केलें. इ. स. १०१४ सालीं त्यानें नंदनत्रिलोचनपाल यास काश्मीरकडे पिटाळलें. याच वर्षी यानें ठाणेश्वर लुटलें. पुढें (१०२१) त्रिलोचनानें महमुदाशीं लढाई केली पण तींत महमुदाचा जय झाला व त्रिलोचन मारला गेला. शिवालिक (हंसी) प्रांत महमुदाचा पुत्र मसूद यानें जिंकला. पुढें १०४१ सालीं तुर्कांनीं घालवून दिल्यानें मसूद पंजबांत येऊन राहिला व त्याचें राज्यहि पंजाबपुरतेंच उरलें.

नंतर १४० वर्षांनीं ( ११८१ ) मलिक खुश्रूपासून महंमद घोरीनें लाहोर घेतलें. यानें मुलतान (११७५) व पेशावरहि (११७९) घेतलें.महंमदनें ११८१ सालीं लाहोर घेऊन सरहिंद घेतलें व पृथ्वीराजावर स्वारी केली. परंतु पृथ्वीराजानें त्याचा ठाणेश्वराजवळ तलावरी येथें मोड केला, परंतु पुन्हां नवें सैन्य घेऊन तो चालून आला व त्यानें पृथ्वीराजाचा ठाणेश्वराजवळ पराभव करून त्यास कैद केलें. या जयामुळें अजमीर आणि सर्व सिवालिक राज्य, हें महंमदाच्या हातीं आलें. कुतुबुद्दीन ऐबक यानें ११९३ मध्यें दिल्ली घेऊन या स्वारीचें कार्य पुरें केलें.

महंमदाच्या मरणानंतर कुतुबुद्दीन लाहोरास स्वतंत्र राजा झाला. त्याच्यानंतर नासिरुद्दीन कुबाचा यानें पुढें पंजाब आपल्या हाताखालीं घातला. परंतु ताजुद्दीन गझनीकर यानें नासिरुद्दीनापासून पंजाब हिसकावून घेतला. नंतर त्यानें दिल्लीस अल्तमशवर स्वारी केली पण त्यामध्यें त्याचा पराभव होऊन तो अल्तमशच्या हातीं सांपडला व अशा रीतीनें अल्तमश पंजाबचा राजा झाला. याप्रमाणें पंजाब प्रांत दिल्लीच्या बादशहाच्या ताब्यांत गेला. मध्यंतरी ख्वॉरिझमि लोकांस मध्यआशियामधून चेंगीझखान मोंगल यानें हांकून लावलें. तेव्हां त्यांचा सुलतान जलालुद्दीन हा पंजाबमध्यें मुलतानकडे आला व नासिरुद्दीनवर हल्ला करून त्यानें तो प्रांत काबीज केला. ही पंजाबवरील पहिली मोंगल स्वारी होय. पुढें जलालुद्दीनवर चेंगीझखान यानें सैन्य पाठविलें. त्या सैन्यानें मुलतान मिळविलें (१२२३). आणि दुसऱ्या एका मोंगल सैन्यानें जलालुद्दीनास पंजाब सोडावयास लावलें. जलालुद्दीन यानें पळतां पळतां युच शहर जाळून टाकलें.

यानंतर पांच वर्षांनीं अल्तमशनें नासिरुद्दीन याचा पराभव केला व मुलतान, युच व सिंध आपल्या राज्यास जोडिलीं. त्याची सत्ता सर्व पंजाबभर होती व तिला बगदादच्या खलिफानें १२२९ त मान्यता दिली होती. रेझिया सुलताना ही गादीवर आल्यावर लाहोर, हंसी व मुलतान येथील मांडलिकांनीं तिची सत्ता झुगारून दिली. इतक्यांत (१२४१) एका मोंगल सैन्यानें लाहोर लुटलें व युच व सिंध स्वतंत्र झाले. पुढें (१२४६) बलबन यानें मोंगलांस युकचा वेढा उठविण्यास भाग पाडलें. यानंतर २० वर्षेंपर्यंत बलबन व त्याचा भाऊ शेरखान यांनीं मोंगलांस थोपवून ठेवलें तरी पण मोंगलांनीं सिंधूच्या मुलुखांत आपले पाय रोंवले. अल्लाउद्दीन खिलजीच्या वेळीं (१२९६–१३०५) तो दक्षिणेकडे गुंतला असतां मोंगल लोक पंजाबवर चढाई करीत होते. बरोबर २ लाख फौज घेऊन ते दिल्लीस पोहोंचले पण तेथें त्यांचा मोड झाला (१२९८). पुन्हां (१३०३) त्यांनीं दिल्लीस येऊन शहरास वेढा दिला. परंतु याहि खेपेस त्यांचा मोड झाला. याप्रमाणें दर वर्षी (१३०४ पर्यंत) ते पंजाबमध्यें स्वाऱ्या करीत. एकदोनदां त्यांचा जय होऊन त्यांनीं मुलतान व शिवालिक वगैरे भाग जिंकला. परंतु ते परत जात असतांना पंजाबचा सुभेदार गाझी बेग यानें त्यांचा धुव्वा उडविला. त्यानंतर १३१६ पर्यंत त्यांच्या स्वाऱ्यांचा त्रास झाला नाहीं. १३१६ त अल्लाउदीन मरण पावला, नंतर चार वर्षें बंडाळी माजली व दिल्लीस तुघलक वंश गादीवर आला. त्याच्याहातून जरी मोंगलांपासून मुलतानचें रक्षण झालें नाहीं तरी दिल्लीचें रक्षण करण्यासाठीं त्यानें त्यांस जबर लांच भरला. वायव्यसरहद्दीकडे याच सुमारास (१३४३) अफगाण लोकांनीं त्रास देण्यास सुरुवात केली. त्यांनीं मुलतान घेतलें, सनाम व सामानाजवळील मुलुखांत बंड झालें व गख्खर लोकांनीं लाहोर काबीज केलें. फिरोज तुघलखांपासून पंजाबाच्या अर्वाचीन इतिहासास विवक्षित वळण लागलें. त्यानें बरेच कालवे खणले, मुख्यत: यमुनेचे कालवे हे यानेंच खोदलेले आहेत. त्यानें हिस्सार गांव स्थापिलें, सरहिंद हा स्वतंत्र सुभा केला. नागरकोट (कांग्रा), सिरमूर व अंबाल्याचा उत्तर भाग काबीज केला. पुढें १३९० त खोकर लोकांनीं लाहोर घेतलें. १३९५ त

सर्व साम्राज्यांत अव्यवस्था माजली तेव्हां देपालपूरचा सुभा सारंगखान यानें स्वतःच मुलतानवर हल्ला केला, या गडबडींत मोंगल पुन्हां आले. १३९७ त पीर महंमद यानें युक्त घेऊन मुलतानवर स्वारी केली व तें घेतलें (१३९८). या योगानें तैमूरचा मार्ग सुलभ झाला. मिठाच्या डोंगरांच्या दक्षिणेस सिंधु उतरून तैमूरनें तलंब लुटलें व तो अजोधनहून भाटनेरला आला. नंतर फतेहाबादहून तोहना ओलांडून कैथाल व पानिपत मार्गानें दिल्लीस आला व त्यानें दिल्ली लुटली. यमुनापार होऊन त्यानें हरद्वारवर हल्ला केला. सिरमूरच्या राजाचा पराभव करून सिवलिकमधून पुढें जाऊन त्यानें नगरकोट घेतलें. जम्मूहि त्याच्या हातीं लागलें. मार्चमध्यें तो बन्नु येथें राहिला (१३९९). या स्वारीमध्यें तैमूरनें हजारों पुरुष, बायका व मुलें यांची कत्तल केली व एकंदर मुलुखाची राखरांगोळी केली. त्यानें खिजरखानास मुलतानास ठेविलें. त्याच्या पश्चात दिल्लीच्या तक्ताबद्दल पुन्हां झगडा सुरू झाला व भयंकर दुष्काळ आणि रोगाची साथ सर्व देशभर पसरली. त्याचा फायदा घेऊन पंजाबचे सरदार लोक स्वतंत्र झाले व बाबरच्या वेळेपर्यंत दिल्लीच्या राजांनां त्यांच्यावर अंमल बसवितां आला नाहीं. १४१४ त खिजरखानानें दिल्ली सर केली व सय्यद वंशाची स्थापना केली. परंतु हे सय्यद राजे मागील राजांप्रमाणेंच नामधारी होते. त्यामुळें काबूलचा मोंगल सुभेदार पंजाबमध्यें ढवळाढवळ करी. सरहद्दीवर कोणी तरी मजबूत सुभेदार रक्षण करण्यास असावा असें वाटून बहलोल लोदी यास १४४१ मध्यें देपालपूर व लाहोर येथें नेमिलें पण बहलोल यानेंच खोकर लोकांशीं तह करून १४५१ मध्यें दिल्ली काबीज केली व अफगाण अथवा पठाण वंशाची स्थापना केली. लोदी राजांच्या अंमलांत पंजाबमध्यें साधारण शांतता नांदली; कारण तेव्हां तेथें लुटण्यासारखें कांहींच उरलें नव्हतें. पंजाबचा सुभेदार दौलतखान लोदी यानें समरकंदच्या बाबरची मदत घेऊन स्वतंत्रता धारण केली व बाबरास लाहोर दिलें. बाबरनें देपालपूर घेऊन दिल्लीवर चढाई केली (१५२६) आणि पानिपत येथें दिल्लीचा बादशहा इब्राहीम लोदी याचा पराभव केला. व मोंगलांचें राज्य स्थापिलें.

बाबरच्या पश्चात पुन्हां अफगाणांनीं पंजाब घेतला. तेव्हां बाबरच्या दुसऱ्या मुलानें (कामरान) अफगाणांपासून पंजाब आपल्या ताब्यांत घेतला. १५४० मध्यें शेरशहानें हुमायुनास हिंदुस्थानांतून इराणांत हांकून लाविलें. व पंजाबामध्यें आपला अंमल बसविला व झेलम जिल्ह्यांतील रोहटस गांव वसविलें. पुढें (इराणी) शहाची मदत घेऊन हुमायूननें कामरान यास काबूलहून हांकून लाविलें यावेळीं दिल्लीस हिमू हा विक्रमाजित हें नांव धारण करून बादशहा बनला होता. नंतर (१५५५) त्यानें सरहिंद येथें शिकंदर सूरि या अकबरानें पंजाबच्या सुभेदाराचा पराभव केला आणि दिल्ली घेतली. हिमूचा पानिपत येथें पराभव केला होता.

अकबर गादीवर आल्यापासून मोंगली साम्राज्य पूर्णपणें प्रस्थापित झालें. व वीस वर्षांच्या दीर्घकालीन युद्धानंतर पंजाबांत शांतता नांदूं लागली. अकबरानें १५८६ त स्वारी करून वायव्येकडील मुलुख ताब्यांत आणिला. अकबराच्या राज्यापासून पंजाबचाहि बराच फायदा झाला. त्याच्या वेळींच तेथील आर्वाचीन काळची जमीनधाऱ्याची पद्धत सुरू झाली. जहांगीरच्या वेळीं त्याचा मुलगा खुश्रू यानें बंड करून लाहोर घेतलें; तेव्हां स्वतः जहांगीरनें तें बंड मोडलें व बंडखोरांस कडक शासन केलें. जहांगीर यास १६२६ त महाबतखानानें झेलम नदीच्या कांठीं त्याच्या परिवारासह कैद केलें. पुढल्याच वर्षी भिम्बर येथें जहांगीर मरण पावला. लाहोरजवळ शहादरा येथें त्याचें दफन केलें. त्याची कबर प्रेक्षणीय आहे. जहांगीरनें आपल्या कारकीर्दीच्या शेवटीं पांच वर्षें लाहोर ही राजधानी केली होती. पुढें (१६२८) शहाजहान गादीवर बसला. त्यानें आग्रा येथें राजधानी नेली. त्याच्या शाहरियार या धाकट्या भावानें लाहोर येथें बंड केलें पण त्याचा आसफखान यानें पराभव केला व त्यास त्याच्या अनुयायांसह ठार मारिलें. शहाजहानच्या कारकीर्दींत पंजाबांत भरभराट व स्वस्थता राहिली व बाहेरील स्वाऱ्या विशेष झाल्या नाहींत. तरी पण सरहद्दीपलीकडे लढाया सुरूच होत्या. मोंगलांनीं १६३९ त कंदाहार घेतलें. पण दहा वर्षांनंतर त्यांनां तें परत द्यावें लागलें. पुढें १६५२ मध्यें तें पुन्हां घेण्यासाठीं औरंगझेब व दाराशिकोह यांनीं केलेला प्रयत्न फसला. बल्क व बदकशान येथें मिळालेल्या विजयानें औरंगझेबाच्या हिंदुकुश पर्वतांतील पराजयावर विरजण पडलें. पुढें १६५७ त औरंगझेबाकडून दाराचा पराभव झाल्यामुळें तो पंजाबांत पळून आला. त्याला तेथें कांहीं अनुयायी मिळाले पण त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. दारास तेथूनहि पळून जावें लागलें.

औरंगझेबाच्या वेळीं पंजाबमध्यें शहाजहानच्या कारकीर्दीप्रमाणेंच स्वस्थता नांदत होती. फक्त १६७३-७५ मध्यें अफगाण लोकांनीं बंड केलें होतें व याचप्रमाणें नारनोळ येथेंहि १६७६ त बंड झालें. अफगाण लढाई दोन वर्षे चालली व अखेर औरंगझेबानें कपट करून अफगाणांची कत्तल करून ती संपविली. नारनालच्या सत्नामीप्रमाणें आग्र्याचे व अजमीरचे हिंदु बादशाही सैन्याच्या तुकड्यांचा पराभव करून दिल्लीवर चाल करून आले.सर्व सैन्यांत गडबड झाली. पण औरंगझेबानें सैन्याला धीर देऊन हिंदूशीं तोंड देऊन त्यांचा मोड केला. औरंगझेबाच्या मरणाच्या वेळीं मोंगली साम्राज्याच्या नाशाचीं चिन्हें दिसूं लागलीं व १७०७ नंतर पंजाबमध्यें एका नवीन सत्तेचा उदय झाला.

ही नवी सत्ता म्हणजे शीख सत्ता होय. शीख हे बाबा नानक यानें स्थापिलेल्या धार्मिक पंथाचे लोक होत. बावा नानक लाहोरजवळ पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धांत जन्मला व डेरानानक या रावी नदीच्या कांठच्या गांवीं १९३८ त वारला.याची सविस्तर माहिती प्रिन्सेपच्या पंजाबच्या इतिहासांत आहे. शिवाय ज्ञानकोश विभाग १६ ( न, पृ. २०० ) पहा. नानकानंतर चवथा गुरु जो रामदास त्यानें अकबरापासून ज्या जागीं हल्लीं शीख धर्माचें केंद्र अमृतसर शहर आहे तें मागून घेतलें. या जागीं त्यानें एक तलाव बांधून त्यामध्यें एक देऊळ बांधण्यास सुरवात केली. त्याचा मुलगा अर्जुनमल्ल यानें तें काम पुढें चालविलें. तो मोठ्या ऐश्वर्यांत राहत असे व त्यानें पंजाबांत आपल्या पंथाचे लोक पुष्कळ वाढविले. आणि त्यांच्यामध्यें लष्करी शिक्षणाचा प्रसार केला. त्यामुळें मोंगल सरकारला त्यांचा मत्सर वाटूं लागला. शेवटीं लाहोरच्या सुभेदारानें त्यांस पकडून लाहोर येथें कैद करून आणून त्यांचा क्रूरपणानें वध केला. या कृत्यामुळें शीख लोक धार्मिक पंथापासून परावृत्त होऊन लढवय्ये बनले. त्यांच्या गुरूच्या खुनामुळें त्यांच्यांत सुडाचें वारें शिरलें. व अर्जुनमल्लाचा मुलगा हरगोविंद यानें या कामीं पुढाकार घेतला ते सरकारशीं उघड उघड विरोध करूं लागले. आणि गुरु गोविंदसिंग याच्या वेळीं तर शिखांचें एक राष्ट्रच बनलें. मुसलमानांनीं गुरुगोविंदाच्या बायकामुलांची कत्तल केली. या मुसलमानांच्या क्रूरतेनें शीख लोकांस बेहोष करून धर्मवेडे बनविलें. गुरुगोविंदाचा शिष्य बंदा याच्या नेतृत्वाखालीं त्यांनीं पूर्वपंजाबांत धुमाकूळ सुरू केला व मुसलमानांस त्रास देण्यास सुरुवात केली. त्यांनीं सरहिंदच्या सुभेदाराचा पराभव केला व तेथें आपलें ठाणें दिलें. तेथून सतलज व यमुना यांच्या काठांनीं ते सहाराणपूर पर्यंत गेले. तेथें त्यांना प्रतिरोध झाला. त्यामुळें ते लुधियाना व त्या जवळचा मुलुख यामध्यें येऊन राहिले पण तेथेंहि फार वेळ पर्यंत स्वस्थ बसले नाहींत. त्यांनीं लवकरच लाहोर ते दिल्ली पर्यंतचा सर्व मुलुख लुटून घेतला, त्यामुळें बहादुरशहास त्यांच्यांशीं लढण्याकरितां स्वतः दक्षिणेंतून उत्तरेस यावें लागलें. त्यानें शीख लोकांस डाबेरच्या किल्ल्यांत कोंडलें पण गुरु बंदा यानें भयंकर संग्राम करून त्यांचा वेढा फोडला. पुढें १७१२ त बहादुरशहा मरण पावला व शीख लोकांचें पारिपत्य करणें राहून गेलें.नंतरच्या गडबडींत शीख लोकांनीं आपली शक्ति वाढविली व भोंवतालच्या मुलुखांत आपलें वस्तान बसविलें तेव्हां १७१६ त फर्रुकसियरनें अब्दुस समदखान यास शीखांवर पाठविलें त्यानें त्यांचा पुष्कळ ठिकाणीं पराभव केला व बंदा यास बंदीवान करून दिल्लीस पाठविलें. तेथें त्याचा अमानुष रीतीनें वध झाला. त्यानंतर शीख लोकांचा अतिशय छळ झाला.

पुढें १७३८ त नादीरशहानें पंजाबवर स्वारी केली, थेट दिल्लीवर जाऊन दिल्ली घेतली. तो परत गेल्यावर दिल्लीचें राज्य मोडकळीस आलें. त्याचा फायदा घेऊन शीख लोकांनीं पुन्हां उचल केली, तींत शिखांचा मधून मधून पराभव झाला. तरी त्यांचें बळ वाढतच चाललें. यानंतर १७६२ सालीं शीख लोकांवर पुन्हां संकट आलें. अहमदशहा अबदालीनें त्यांचा मोड केला व त्यांचा सतलज पर्यंत पाठलाग केला. परत जातांना यानें अमृतसर शहराचा नाश केला व तेथील देऊळ पाडिलें, तळें गाळानें भरून टाकलें. व तेथें गोवध केला. पण अबदाली गेल्यावर शिखांनीं पुन्हां देऊळ वगैरे बांधून मुसलमानाविरुद्ध लढाया करून आपलें स्वातंत्र्य मिळविलें.

या सुमारास शीख धर्माचें स्वरूप बरेंच पालटलें होतें. नानकाच्या वेळचें सोंवळेपणाचें स्वरूप जाऊन तेथें लढवय्येपणाचें पाणी खेळूं लागलें. बरेच संघ स्थापन होऊन त्यांचें मुख्य केंद्र अमृतसर शहर बनलें. दिल्लीच्या बादशहानें पंजाब प्रांत अहमदशहास दिला होता पण वास्तविक अहमदशहाची तेथें बिलकुल सत्ता नव्हती. १७६३ नंतर लवकरच शीख लोकांनीं तेथें आपली सत्ता स्थापिली. पुढें १८०९ त अफगाण राज्यक्रांति

झाली. तिच्यामुळें त्यांचें चांगलेंच फावलें. रणजित सिंगानें लाहोर काबीज केलें (१७९९). त्यानें हळू हळू आपली सत्ता बहुतेक पंजाबवर बसविली व जवळच्या कांहीं शीख जहागीरदारांवर स्वारी केली (१८०८). त्या वेळीं त्या शीख जहागीरदारांनीं इंग्रजांचें साहाय्य मागितलें तेव्हां इंग्रज व रणजितसिंग यांच्यामध्यें तह झाला. त्यांत सतलजच्या पश्चिमेस रणजितानें स्वारी करूं नये व परस्परांचा स्नेह असावा असें ठरलें. इंग्रजांनीं रणजितच्या सतलज नदीपलीकडील सर्व मुलुखाचें स्वामित्व कबूल केलें. रणजितनें शेवटपर्यंत वरील तह पाळिला. रणजितसिंह यानें १८१८ त मुलतान घेतलें व पंजाबच्या अगदीं दक्षिणेपर्यंत आपलें राज्य वाढविलें. त्याच वर्षी त्यानें सिंधु नदी ओलांडून पेशावर काबीज केलें व काश्मीरहि जिंकिलें. तो १८३९ त मरण पावल्यानंतर त्याचा मुलगा खरकसिंग हा गादीवर बसला पण तोहि एक वर्षानें मेला. नंतर रणजितच्या राज्यांत घोटाळा माजला. कांहीं शीख सरदारांनीं इंग्रजी प्रांतांत लुटालूट केली. यामुळें लाहोरदरबारचें व इंग्रजांचें वांकडें आलें व दरबारांतील फाटाफुटीचा फायदा घेऊन इंग्रजांनीं युद्ध पुकारलें. १८४९ च्या दिसेंबरमध्यें येथें पहिली लढाई झाली. आपसांतील फुटीमुळें शिखांचा पराभव झाला. तीन दिवसांनीं फिरोजशाह येथें दुसरी लढाई झाली. या लढाईंत दोन्ही बाजू समबल ठरल्या. नंतर २२ जानेवारी १८४६ रोजी अलिवाल येथें लढाई झाली. तींत इंग्रज यशस्वी झाले. यानंतर शिखांचें सोब्रान हें मजबूत ठाणें पडलें व येथें पहिलें शीख युद्ध संपलें. नंतर लाहोर येथें तह झाला. या तहांत इंग्रजांनां सतलज व बियास दुआब व सव्वा दोन कोटी रु. युद्धखर्च मिळाला. या रकमेची भरपाई होण्याची आशा नसल्यामुळें बियास, सिंधु दुआब व काश्मीर आणि हजारा प्रांत इंग्रजांनीं घेतला. शीख सैन्य कमी करण्यांत आलें. लाहोरचें सर्व सैन्य काढून टाकून दुसरें इंग्रजांच्या विश्वासाचें सैन्य ठेविलें. या तहाच्या दुसऱ्या अटीमुळें सतलजनदीच्या दोन्ही कांठच्या मुलखावरील ताबा इंग्रजांस मिळाला. जम्मूच्या गुलाबसिंगास इंग्रजांनीं आपला मांडलिक बनविलें व लाहोरास इंग्रजी रेसिडेंट व इंग्रजी सैन्य ठेवलें गेलें. याच वेळीं गुलाबसिंग यास काश्मीर प्रांत देऊन त्याच्यापासून १ कोटी १२॥ लक्ष रु. घण्याचा निराळा तह केला पण काश्मीरचा सुभेदार यानें इंग्रजांनां काश्मीर देण्याचें नाकारलें. तेव्हां इंग्रजांनीं दिवाण लालसिंग यास पदच्युत करून इंग्रजांनीं तेथें रीजन्सी कौन्सिल स्थापून तेथील रेसिडेंटाच्या सल्ल्यानें महाराजा धुलीपसिंगाचें राज्य चालवावें असें ठरलें. (१८४६).

वर वर जरी शांतता दिसत होती व राज्यघटनेचें काम सुरू होतें तरी लोकांत फार असंतोष माजला होता. गोवधाच्या मनाईचे हुकूम रद्द झाले होते व मुसलमानांस पुन्हां पहिल्याप्रमाणें व्यक्तिस्वातंत्र्य मिळालें होतें. सैन्यांतून कमी झालेले शीख खेडोपाडीं पसरून उत्सुकतेनें लढाईची वाट पहात होते. अशा स्थितींत (१८४८) मुलतानचा माजी दिवाण मूलराज यानें लढाई पुकारली. यामुळें सर्व पंजाबभर धुमाकूळ माजला. मुलतान शहर इंग्रज सेनापतीनें वेढलें पण शिखांनीं तो वेढा उठविला. चतरसिंग आणि शेरसिंग या पुढाऱ्यांनीं काबूलच्या अमीराची मदत मागितली. दोस्त महंमदानें लगेच पेशावर घेतलें व कांहीं सैन्य शिखांच्या मदतीसाठीं पाठविलें. तेव्हां लॉर्ड गोच्या आधिपत्याखालीं इंग्रजी सैन्यानें सतलज नदी ओलांडली.त्यानें शेरसिंगाचा रामनगर येथें पराभव केला. चिलिअनवाला येथील लढाईंत कोणीच हरलें नाहीं. पुढें शेरसिंग यास चतरसिंग हा अफगाण स्वारांसह येऊन मिळाला. इकडे गो यास व्हीग मिळाला व अखेरीस शीखांचा पराभव झाला. व १८४९ च्या मार्चांत सर्व पंजाब प्रांत इंग्रजांनीं खालसा केला. धुलीपसिंगास ५०००० पौंड सालीना पेन्शन देण्यांत आलें. नंतर पंजाबचा राज्यकारभार एका बोर्ड ऑफ अॅडमिनिस्ट्रेशनकडे सोंपविला. पुढें तेथें चीफ कमिशनरची योजना झाली. सर जॉन लॉरेन्स हा पहिला गव्हर्नर होय.

१८५७ मध्यें पंजाबमध्यें ३६००० हिंदि, १३००० पंजाबी, १०००० यूरोपीयन व ९००० लष्करी पोलीस इतकें सैन्य होतें. बरेचसे यूरोपीयन पेशावर व अंबाला याच्या उत्तरेस होते. दिल्लीच्या कत्तलीची बातमी १२ मे रोजीं लाहोरला आली व तेथील शिपायांत चळवळ सुरू झाली. पण १३३००० लोकांचीं शस्त्रें मियानमीर येथें काढून घेतलीं. गोविंदगड व फिलौर या किल्ल्यांत एकदम यूरोपीयन सैन्य भरण्यांत आलें. गोविंदगडहून अमृतसरवर मारा करतां येत असून फिलौर किल्ल्यांत दारूगोळा होता. १४ मे रोजी फिरोजपूर येथें, २१ मे ला मरदान येथें, ७-८ जूनला जालंदर येथें, जुलैच्या पहिल्या आठवड्यांत झेलम, सियालकोट व पेशावर येथें असे सर्वत्र शिपायी लोक

उठले. परंतु याच वेळीं १३००० शिपायांचीं शस्त्रें काढून घेण्यांत आलीं. इकडे सैन्याची अशी व्यवस्था करतांना दिल्लीस नव्या सैन्याची कुमक पाठविणें चालूच होतें. १७ मे च्या सुमारास पंजाबमध्यें पलटनवाल्यांसंबंधी लोकांत सहानुभूति राहिली नाहीं असें दिसून आलें. म्हणून पंजाबमध्यें नवीन १८ पलटणी तयार करण्यांत आल्या. सुरवातीस चार यूरोपियन रेजिमेंटें दिल्लीस पाठविलीं. आगष्टमध्यें दिल्लीच्या कुमकेकरतां पंजाबांतून मोठें सैन्य पाठवावें लागलें. पंजाबमध्यें फक्त ४९००० गोरें सैन्य राखून ठेविलें होतें. यावेळीं आणीबाणीचा प्रसंग आला. दिल्ली लवकर सर न झाल्यास पंजाबमध्यें गडबड सुरू होण्याचा संभव होता. मरी येथील बंडाळी व रावी—सतलज दुआबांतील गडबड यावरून इंग्रजी सत्तेच्या स्थायिकत्वाविषयीं लोकांचा विश्वास डळमळला आहे असें दिसून आलें. तेव्हां लष्करी जोरावर दोन्हीहि ठिकाणची गडबड दडपून टाकण्यांत आली व ता. १४ सप्टेंबरला दिल्ली शहर हातीं आलें. यामुळें पुढील सर्व धोका नाहींसा झाला.

या नानागर्दीच्या प्रसंगीं पंजाबच्या सरदारांच्या राजनिष्ठेमुळें इंग्रजांना जय मिळाला. जिंदचा राजा हा पलटणवाल्यांशीं लढण्यास सर्वांच्या आधीं तयार झाला. पतियाळच्या व नाभाच्या राजांनींहि पुष्कळ साहाय्य केलें. भावलपूरचा नबाब मात्र बिलकुल हलला नाहीं. बाकीच्या सर्व राजेरजवाड्यांनीं शक्य ती मदत केली. पुढें इंग्रजांनीं पतियाळा, जिंद व नाभा येथील राजांस इनाम म्हणून पुष्कळ जमीनी दिल्या व कपुरथळाच्या राजास अयोध्या प्रांतांतील एक तालुकदारी जहागीर बहाल केली.

यानंतर पंजाबची व्यापारी व औद्योगिक प्रगति झपाट्यानें झाली. १८९८ मध्यें यमुनेच्या पूर्वतीरावरील मुलुख व झाज्जरच्या नबाबाचा खालसा केलेला मुलुख व बहादुरगड या सर्वांचा मिळून 'वायव्येकडील प्रांत' बनविण्यांत आला. बाकीच्या उरलेल्या प्रांतांत सध्यांचा दिल्ली प्रांत, रोरटक, गुरगांव, हिस्सार, करनूळ व फिरोजपूरचा कांहीं भाग यांचा समावेश होत असे. १८५९ सालीं पंजाबमध्यें पहिला आगगाडीचा फांटा अमृतसर ते मुलतानपर्यंत झाला, व बारीदुआब कालवा सुरू करण्यांत आला. कांहीं डोंगरी लोकांवर केलेल्या निम लष्करी स्वाऱ्या वगळल्यास पंजाबमध्यें त्यानंतर साधारण शांतता होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. सर्वत्र कालवे झाले असून पुष्कळ नव्या रेल्वे तयार झाल्या आहेत. १९०१ सालीं वायव्यसरहद्दीकडील प्रांत बनविला गेला. यामध्यें सिंधु नदीच्या पश्चिमेकडील पंजाब प्रांताचा समावेश होतो. तरी पण यामध्यें मियानवाला जिल्ह्याची इसाखेल तहशील, डेरागाजीखान व ट्रान्स फ्रांटियरचा मुलुख यांचा समावेश होत नाहीं.

अ व शे ष.—पंजाबमध्यें वैदिक संस्कृतीसंबंधीं पुरातन वस्तूंचा कांहींच पत्ता प्रथम लागला नाहीं. पण अलीकडे हरप्पा येथें कांहीं अवशेष सांपडले आहेत. अशोकाच्या वेळेचे कांहीं अवशेष मात्र सांपडले आहेत. दिल्ली येथील स्तंभावरील कोरीव लेख हे त्यांपैकींच आहेत. हे लेख पुरातन ब्राह्मी लिपींत आहेत. शाहबाझगढी व मानेश्वर येथील लेख मात्र दुसऱ्या लिपींत आहेत. शाहधेरी येथील तक्षशिला नगरीच्या अवशेषांवरून प्राचीन मौर्य राजांच्या राजधानीच्या मोठेपणाची साक्ष पटते. तक्षशिलेच्या आग्नेयीस माणिकयाल आहे. तेथील स्तूप हा फाहिआन यानें पाहिलेला स्तूप आहे असें कनिंगहॅम म्हणतो. याजवळच दुसरा एक स्तूप आहे, तो कनिष्काच्या वेळीं उभारला गेला असें त्यावरील खरोष्ठी लेखांत लिहिलें आहे.

कांग्रा जिल्ह्यांत कांहीं बुद्ध अवशेष सांपडले आहेत. त्यावरून ईशान्य पंजाबमध्यें हिमालयाकडच्या बाजूस बौद्ध धर्माचा प्रसार झाला होता असें दिसतें. कन्हियारा (कृष्ण विहार ?) जवळील पथ्यार येथेंहि कांहीं कोरीव लेख सांपडले आहेत. खुद्द कन्हियारा येथेंहि कांहीं लेख सांपडले आहेत. हे खरोष्ठी व ब्राह्मी लिपींत आहेत. यावरून तेथें १-२ऱ्या शतकांत बुद्ध आश्रम होता असें दिसतें. चारसद्दा येथील लेखांत बौद्ध धर्माचीं तत्त्वें लिहिलेलीं आहेत. त्याचप्रमाणें तख्त–इ–बहाई येथील स्तूप व नगरहार येथील अवशेष बुद्धासंबंधीं आहेत.

पंजाबमध्यें पुरातन हिंदु वस्तू नाहींत. कारण या प्रांतांतील शहरें नद्यांच्या कांठावर असून तीं पुष्कळ वेळां वाहून गेलीं आहेत आणि मुसुलमापूर्वे हिंदु वस्तूंचा समूळ नाश केला आहे. दिल्ली येथील जुम्मा मशीद २७ देवळें पाडून त्यांच्या सामुग्रीनें बांधली आहे. याच मशिदीमध्यें राजा चंद्र अथवा दुसरा चंद्रगुप्त याच्या वेळचा एक लोहस्तंभ आहे. हिमालयाच्या बाजूस मात्र पुरातन हिंदु देवळें आहेत. वैजनाथ व नुरपूर येथें पुरातन दगडी देवळें आहेत. कांग्रा येथील देवळें १९०५ मध्यें धरणीकंपानें नाश पावलीं. कुलु येथील पाषाणलिंग देवळांत फार जुनें शिल्पकाम आहे आणि

सतलज नदीवरील निरमंद गांवीं परशुरामाच्या देवळांत राजा समुद्रसेन याचा ताम्रपट आहे. मनाली येथें हिडिंबा देवीच्या देवळांत लांकडावर कोरलेल्या लेखांत सहाव्या शतकांत तें देऊळ बांधलें असा उल्लेख आहे. नगर येथील देवळांत लांकडी कोन आहेत. हीं सर्व कांग्रा जिल्ह्यांत आहेत. चंबा संस्थानांतील बरमार व चित्रादि देवळें आठव्या शतकांत बांधलीं गेलीं आहेत. ह्या देवळाची तऱ्हा निराळ्या प्रकारची आहे. त्रिलोकनाथ (मंडी संस्थान) येथील देवळांत शारदालेख आहेत. क्षारडोंगरांतील मालेट व कठवार येथील देवळें काश्मिरी पद्धतीचीं आहेत.

मुसुलमानी अंमलांत शिल्पकामाची नवीन तऱ्हा सुरू झाली. पंजाबमध्यें ही तऱ्हा विशेष दृष्टीस पडते. कुवत उल्-इस्लाम, कुतुब मिनार, अल्तमशचें थडगें, अल्लाउद्दीन दरवाजा, दिल्लीची जमातखाना मशीद वगैरे पठाण अमलांतील शिल्प दर्शवितात. मालिकपूर येथील अल्तमशच्या मुलाचें थडगें हेंहि प्रेक्षणीय आहे. तघलख राजाच्या वेळचें तघलगाबाद, फेजाबाद वगैरेवरून निराळेंच शिल्प दिसून येतें. मुबारकपूर येथील मोतकी मशीद ही पठाण कारागीरीची प्रतिमा आहे. त्याचप्रमाणें इंद्रप्रस्थ येथील शेरशहाची किलाईकोना मशीद फार भव्य आहे. मोंगल लोकांनीं मुसुलमानी शिल्प कलेचें पुनरुज्जीवन केलें. अकबरानें हुमायूनचें बांधलेलें थडगें, वगैरे प्रसिद्ध आहेत. मिहरलि येथें आदमखान याचें थडगें, तसेंच लाहोर येथील मोतीमशीद, निळा बुरूज, खानीखाना वगैरे स्थळें फार प्रेक्षणीय आहेत. शहाजहान यानें नवी दिल्ली वसवून तिचें नांव शहाजहानाबाद असें ठेविलें होतें. दिवाणी आम व दिवाणी ई-खास हे अति प्रसिद्ध आहेत. लाहोर येथें औरंगझेब यानें बादशाही मशीद बांधली आणि दिल्ली येथील लाल-किल्ल्यांत मोतीमशीद बांधली. यानंतर लाहोर येथें एक आणि दिल्ली येथें तीन 'सोनरी' मशीदी बांधण्यांत आल्या.

नैर्ऋत्य पंजाबमध्यें शिल्पाची एक निराळीच तऱ्हा प्रचारांत आली. मुलतान येथील रुक्नुद्दीनच्या थडग्यावरून या शिल्पाची कल्पना होते. १८०८ मध्यें मुझफरखान यानें शुजाबाद येथें जहाजीमहाल बांधला, तोहि प्रेक्षणीय आहे.

**मध्यप्रांत, इतिहास.**—उत्तरहिंदुस्थानांतील लोक ह्या प्रदेशास गोंडवन ह्या नांवानें संबोधीत असत. रामायणकालीं राम दण्डकारण्याकडे जात असतां सुतीक्ष्ण ऋषींच्या आश्रमीं कांहीं काळ विश्रांतीसाठीं राहिला होता. म्हणजे सध्यांच्या रामटेक टेंकडीवरच तो आश्रम असावा. अगदीं अलीकडे जेव्हां मुसुलमान लोकांच्या स्वाऱ्या दक्षिणेवर झाल्या त्या वेळेस ते गोंडवनांतून न जातां पश्चिमेच्या बाजूनें अशीरगड किल्ल्या जवळून दक्षिणेंत उतरत असत.

इतिहाससंबंधीं संगतवार माहिती मिळण्याच्या पूर्वी येथें कांहीं कांहीं रजपूत घराण्यांनीं आपलीं राज्यें स्थापिलीं होतीं असें दिसतें. जबलपूर जिल्ह्यांत रूपनाथ येथें व सागर जिल्ह्यांत एरण येथें सांपडलेल्या अशोकाच्या शिलालेखांवरून असें दिसून येतें कीं साधारण तिसऱ्या किंवा चवथ्या शतकाच्या सुमारास वरील ठिकाणीं मगध येथील गुप्त घराण्याचीं राज्यें असावींत. नागपूर व वर्धा ह्या प्रांताभोंवतालच्या प्रदेशांत इसवी सनापूर्वी दोन शतकें विदर्भदेशचे हिंदु राजे राज्य करीत असावे. त्यानंतर तेलंगणांतील आंध्र राजे इसवी सनानंतर २०० वर्षें त्याच प्रदेशावर राज्य करीत होते. त्यानंतर दक्षिणचे राष्ट्रकूट रजपूत त्याच प्रदेशांत ११व्या शतकापर्यंत ठाणें देऊन होते.

नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेशांत रजपुतांच्या चेदि, चंदेल, चव्हाण या घराण्यांनीं बाराव्या शतकापर्यंत राज्य केलें. छत्तीसगडांत रजपुतांच्या हैहय घराण्यांनीं रत्नपूर येथें राजधानी स्थापून ते बरेच दिवस तो प्रदेश राखून होते. याप्रमाणें जुन्या काळच्या लेखांवरून साधारण ११ किंवा १२ व्या शतकापर्यंतची माहिती उपलब्ध होते. त्यानंतर जवळ जवळ ३०० वर्षें ऐतिहासिक दृष्ट्या सुसंगत अशी माहिती मिळत नाहीं.

गोंड राज्याचा पहिल्याप्रथम उदय म्हटला म्हणजे चवदाव्या शतकाच्या शेवटीं सुरू होतो. बैतूल जिल्ह्यांत खेर्ला येथें प्रथम त्यांचें राज्य सुरू झालें. त्यानंतर त्यांच्याच घराण्यांतील नरसिंगराव यानें माळवा व खानदेश हस्तगत केले. पुढें गढामंडलच्या गोंड राजांनीं ५२ गड काबीज करून सागर, दमोह, भोपाळ, शिवनी येथपर्यंत राज्याचा विस्तार केला. हें मंडला घराणें साधारण ६७० च्या सुमारास उदयास आलें व त्यानें १४८० पर्यंत टिकाव धरला. बख्त बुलंद नांवाच्या एका गोंड राजानें छिंदवाडा प्रदेशांत देवगड येथें राज्य स्थापन केलें. त्यानेंच नागपूर शहर वसविलें आणि आपल्या राज्याचा विस्तार भंडारा, बालाघाटपर्यंत

केला. दक्षिणेस एका निराळ्याच घराण्यानें चांदा येथें निराळें राज्य स्थापिलें. ह्याचा विस्तार वऱ्हाडच्याहि पलीकडे झाला होता. अशा तऱ्हेनें सर्व गोंडवनभर गढामंडला, देवगड व चांदा ह्या घराण्यांचीं साधारण एकाच वेळेस साम्राज्यें पसरलीं होतीं.

मोंगल साम्राज्याच्यावेळीं अकबरानें १६०० त अशीरगड किल्ला घेतला व पुढें जहांगीरनें आपलें ठाणें कांहीं दिवस पौनार, अष्टी, वर्धा ह्या ठिकाणीं ठेवलें होतें. तरी मोंगल साम्राज्यकालीं वरील घराणीं तग धरून राहिलीं होतीं. १७३३ त पेशव्यांनीं पहिल्या-प्रथम बुंदेलखंडावर स्वारी केली व १७४२ त गढा मंडल्यापर्यंत जाऊन येथील राजापासून चौथाई कर वसूल करण्यास सुरवात केली. अशा तऱ्हेनें संग्राम-सिंहापासून सतत ३०० वर्षें तग धरून राहिलेलें गढा-मंडलाचें राज्य १७८१ त नामशेष झालें. ह्यापेक्षांहि थोड्या काळांत चांदा व देवगडचीं राज्यें मोडकळीस आलीं. चांद सुलतानाच्या वेळेस गादीसाठीं भांडणें होऊन वऱ्हाडच्या रघूजी भोंसल्यास मध्यें पडावें लागलें. त्यानें नागपूर येथें आपल्या राजधानीचें ठिकाण ठेवलें होतें. पुढें १७९१ मध्य भोंसल्यांनीं देवगड, छत्तीसगड व चांदा येथें स्वाऱ्या करून ते प्रांत काबीज केले. पहिला रघोजी १७५५ मध्यें मेल्यानंतर नागपूरचें राज्य विस्तारच पावत गेलें. हें भोंसल्यांचें राज्य पेशव्यांचें आधिपत्य मानण्यास नाखूष असल्याकारणानें रघोजीचा मुलगा जानोजी यास निजाम व पेशवे यांनीं १७६१ मध्यें पराजित केलें व त्यांच्यावर आपलें वर्चस्व प्रस्था-पित केलें. १७८९ मध्यें त्या पुढील राजा मुधोजी यानें नर्मदेच्या नजीकचा प्रांत काबीज केला व पुढें १७९६–९८ च्या सुमारास हुशंगाबाद, सागर, दमोह हे जिल्हे हस्तगत केले. ह्यानंतर दुसऱ्या रघोजीच्या वेळेस नाग-पूरचें राज्य फार विस्तार पावलें.

सन १८०३ पर्यंत भोंसल्यांचें व इंग्रजांचें सख्य होतें. नंतर शिंद्यांशीं सलोखा करावा लागल्याकारणानें असई-अडगांव येथील लढाया होऊन देवगांवचा तह झाला व इंग्रजांस कटक, संबळपूर व वऱ्हाडचा कांहीं भाग द्यावा लागला. १८०३ पासून १८१८ पर्यंत राज्यांत बरीच अंदाधुंदी माजली. मुधोजीनें रघोजीच्या मुलास मारविलें. व जेव्हां इंग्रज व पेशवे ह्यांच्यामध्यें वितुष्ट माजलें तेव्हां ह्यानेंहि इंग्रजांशीं शत्रुत्व संपादन केलें. १८१७ मध्यें सीताबर्डी येथें लढाई होऊन मुधोजीस नागपुरांतून पळ काढावा लागला. ह्या लढाईनें इंग्रजांच्या ताब्यांत बराचसा प्रदेश आला. १८१८ पासून तों १८३० पर्यंत सर रिचर्ड जेंकिन्स यानें राज्यकारभार पाहिला त्यानंतर तिसऱ्या रघोजीस गादीवर बसविलें. परंतु त्याच्या मरणानंतर १८५३ मध्यें नागपूरचें राज्य खालसा केलें.

उत्तरेकडील प्रांतांपैकीं १८१८ मध्यें मुधोजी(आप्पा-साहेब)कडून मंडला, बैतूल, शिवनी व नर्मदा हे प्रांत इंग्रजांस मिळाले व पुढें बुंदेल्यांच्या बंडानंतर सागर-कडील सर्व प्रांत इंग्रजांच्या राज्यास जोडला गेला. १८५७ च्या बंडामध्यें सागर, जबलपूर, गढामंडला, शिवनी या ठिकाणीं लहान लहान बंडें झालीं. परंतु कामठी येथील मद्रासच्या पलटणींनीं वेळेवरच जाऊन बंदोबस्त केला व नंतर सर्वत्र शांतता प्रस्थापित झाली. १९०३ सालीं वऱ्हाड प्रांत निजामाकडून कायमच्या भाडेपट्ट्यानें घेऊन तो मध्यप्रांतास जोडून टाकिला. या वऱ्हाडप्रांताचा इतिहास मुख्य ज्ञानकोशांत (शरीरखंड विभाग १९–२०) दिलेलाच आहे.

**अवशेष.**—हा प्रांत पुराणवस्तुसंशोधनाच्या दृष्टीनें फारसा महत्त्वाचा नाहीं. जबलपूर जिल्ह्यांत रूपनाथ येथें अशोककालीन एक शिलालेख सांपडला आहे. तिगवन येथें सांची येथील स्तूपासारखा देवळाचा अवशेषभाग आहे. सागर जिल्ह्यांत एरण येथें प्राचीन कारागिरीचे कांहीं नमुने दिसून येतात. बुद्धकाळची एक कोरींव गुहा चांदा जिल्ह्यांत भांदक येथें आहे. मांधाता, मार्कंडी, शिवनारायण येथें ब्राह्मणी पद्धतीचीं उत्तम देवळें आहेत. हेमाडपंती देवळें सर्व प्रांतभर थोड्याबहुत प्रमाणानें आढळून येतात. मुसलमानी शिल्पकलेचीं कांहीं दृश्यें बऱ्हाणपूर येथील कांहीं मशिदींमध्यें दिसून येतात. शिल्पकलेच्या दृष्टीनें कमी महत्त्वाच्या (गोंड राजांच्या वेळच्या) कांहीं इमारती रायगड व गढी येथें आहेत. मराठ्यांच्या व बुंदेल्यांच्यावेळचे किल्ले सर्व ठिकाणीं आहेत.

**ब्रह्मदेश, इतिहास.**—याचा प्राचीन इतिहास दंत-कथात्मकच आहे. पण हा इतिहास माहितीच्या दृष्टीनें फारच महत्त्वाचा आहे. व मुख्य गोष्ट ही आहे कीं दंतकथा आणि खरा इतिहास यांचा इतका मिलाफ झाला आहे कीं, तीं एकमेकांपासून वेगळीं करणें फार अवघड आहे. साधारणपणें असें वाटतें कीं ब्रह्मदेशांत जे लोक आले ते मध्य आशियांतून आले असावे व त्यांचें

मुख्य ठाणें इरावतीच्या खोऱ्यांतील तगौंग हें असून तेथून पुष्कळशा टोळया चोहोंकडे पसरून त्यांनीं निरनिराळीं नामाभिधानें धारण केलीं. ह्यापैकींच एक टोळी प्रोम येथें पीउस् वंश या नांवानें राज्य करीत होती.

दक्षिण ब्रह्मदेश हा फार प्राचीन काळापासून तलैंग अथवा पेगुअन ह्यांच्या हातीं होता. हे तलैंग मोन-अनाम ह्या टोळीचे वंशज होते. त्यांचें मुख्य ठिकाण थेटन हें होतें. निरनिराळ्या टोळ्यांत सतत लढाया चालू असत. इ. स. ७४२ मध्यें तलैंग ह्यांनीं प्रोमचा विध्वंस केला म्हणून पेगन येथें ब्रह्मी राज्य स्थापिलें गेलें. ह्या राज्यांत ११ व्या पासून १३ व्या शतकापर्यंत शांतता नांदत असल्यामुळें पेगन येथें बरींच कला-कौशल्याचीं कामें करावयास सांपडली. त्यांच्या प्रसिद्ध अनव्रत ह्या राजानें तलैंग राज्याचा मोड करून बौद्ध धर्माचा एक ग्रंथ थेटन येथें आणला, व उत्तर ब्रह्मदेशांत तो धर्म सुरू केला. तेराव्या शतकानंतर ब्रह्मदेशावर चिनी शान लोकांची स्वारी झाली, त्यामुळें पेगन वंश नामशेष होऊन, लहान लहान स्वतंत्र राज्यें स्थापन झालीं. नंतर १६ व्या शतकांत तौंगू राजांनीं उचल खाऊन सर्व तलैंग राज्य घेऊन, पेगू येथें राजधानी स्थापून आव्हापर्यंत बहुतेक देश पादाक्रांत केला. ह्याच वेळीं म्लेंच्छ लोकांनींहि आपले पाय पसरण्यास सुरुवात केली होती. १६ व्या शतकाच्या शेवटीं डच लोकांनीं नीग्राईस बेट घेतलें. १७ व्या शतकाच्या सुरवातीस ईस्ट इंडिया कंपनीनें सिरिअम, मार्तावान व आव्हा येथें वखारी स्थापन केल्या आणि व्यापाराचा पाया मजबूत करण्यांत १७ वें शतक घालविलें. अठराव्या शतकाच्या मध्यंतरीं तलैंग लोकांनीं बंड करून पेगू येथें स्वतंत्रता स्थापून आव्हावर स्वारी केली व तेथें आपलें वर्चस्व स्थापिलें व ब्रह्मी लोकांची त्यांच्या अलौंगपया ह्या राजानें मोन वंशापासून सुटका केली.

अलौंगपया राजानें बहुतेक सगळा ब्रह्मदेश आपल्या ताब्यांत आणला. ही गोष्ट १७६० त झाली. त्यापूर्वी मुख्य ब्रह्मदेशाच्या पश्चिमेकडे आराकानयोमा आणि पूर्वेकडे पेगुअन असे दोन भाग होते. त्याच्या कारकीर्दीत परदेशी व्यापाऱ्यांचें मुळींच बस्तान बसेना. पण अलौंगपयानंतर ह्या परदेशी व्यापाऱ्यांची चांगली पोळी पिकली. अलौंगपयानंतर जो राजा झाला त्याचें नांव नौंगडावग्यी होतें. ह्यानें १७६० पासून १७६४ पर्यंत राज्य केलें. ह्याच्यानंतर त्याचा भाऊ सिनब्युशिन (१७६४--१७७४) गादीवर आला. ह्यानें सयाम व मणिपूर यांवर स्वारी केली आणि दोनदां चीनच्या स्वाऱ्या परतवून लाविल्या. नंतर त्याचा मुलगा सिंगुमिन हा गादीवर आला. नंतर मौंगमौंग हा सिंगुमिनचा चुलतभाऊ १७८१ मध्यें गादीवर आला. परंतु थोडक्याच दिवसांत हा त्याचा चुलता बोदपया याजकडून मारला गेला. ह्या राजाच्या अमदानींत १७८४ मध्यें मणिपूरवर स्वारी केल्यामुळें आराकानचें राज्य आणि क्यूबोचें खोरें व १७९३ त सयाम यांच्याबरोबर तह होऊन तेनासेरीमचा किनारा, ताव्हाय आणि मर्गुई हीं बंदरें मिळून सध्यांचा ब्रह्मदेश बनला. १७८३ मध्यें आव्हा येथील राजधानी अमरपूरला नेली.

आराकान हातीं आल्यामुळें इंग्रजसरकारशीं ब्रह्मी लोकांचा प्रत्यक्ष संबंध येऊं लागला आणि भांडणतंटे सुरू झाले. १७९५ मध्यें हिंदुस्थानसरकारनें राजकीय आणि व्यापारी भांडणतंटे मिटविण्याकरितां एक वकील अमरपूर येथें पाठविला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. आणखीहि कांहीं प्रतिनिधी मधून मधून पाठविले जात असत, परंतु हे सर्व प्रयत्न फुकट गेले. याच संधीस (१८१९ त) बोदपया मेला आणि बग्यीडा हा गादीवर आला. त्यानें १८२२ त आसामवर स्वारी करून तो आपलासा केला. परंतु आराकान आणि आसाम हे दोन प्रांत हिंदुस्थानसरकारच्या सरहद्दीवर असल्यामुळें त्यांनां फार त्रास पोंचूं लागला. १८२४ त या कारणामुळें ब्रह्मदेशाशीं लढाईला सुरवात झाली आणि १८२६ त येन्दाबूचा तह होऊन आराकान आणि तेनासरीमचे प्रांत, आसाम व इतर संस्थानें खालसा होऊन नुकसानभरपाई द्यावी लागली. शिवाय एका पोलिटिकल एजन्टाची ब्रह्मदेशाच्या दरबारीं नेमणूक झालीच. ह्यालाच पहिली ब्रह्मी लढाई असें म्हणतात.

१८३७ त आव्हाच्या राजास वेड लागल्यामुळें त्याच्या थरवड्डी नांवाच्या भावाकडून तो पदच्युत केला गेला. परंतु हा राजा इंग्रजांबरोबर सलोख्यानें वागत नव्हता, म्हणून पोलिटिकल एंजटला १८३९ त परत बोलविण्यांत आलें. थरवड्डी १८४६ त वारल्यानंतर त्याचा मुलगा पागन मिन हा गादीवर बसला. हा तर इंग्रज सरकारशीं उघड उघड द्वेषबुद्धीनेंच वागत असे. शेवटीं १८५१ त जेव्हां यानें दोन व्यापारी जहाजांच्या मालकांनां कैदेंत टाकलें तेव्हां इंग्रजसरकारला लढाई

करणें भाग पडलें. आणि १८५२ त ही लढाई बंद होऊन पेगू प्रांत इंग्रजांच्या हातीं लागला. नंतर १८६२ त आराकान, पेगू, मार्ताबान आणि तेनासेरीम एकत्र करून त्यावर एक चीफकमिशनर नेमला गेला.

१८५७ मध्यें मण्डालें ही राजधानी करण्यांत आली. व्यापारविषयक करार वगैरे ठरविण्याकरितां १८६२ मध्यें ब्रह्मदेशच्या राजाबरोबर तह करण्यांत आला. ह्या तहान्वयें इरावती नदी व्यापाराला खुली झाली; आणि इंग्रजसरकारनें सरहद्दीवरील जकाती काढून टाकल्या. तथापि ब्रह्मी लोक कराराप्रमाणें वागत नसल्यामुळें १८६७ त दुसरा तह करणें भाग पडलें. ह्यांत पूर्वींच्या सर्व शर्ती कायम ठेवून, ब्रह्मदेशच्या राजाला व्यापार प्रतिबंधक असे मक्ते देतां येऊं नयेत ही एक जास्त शर्त घालण्यांत आली. परंतु कितीहि शर्ती घातल्या तरी त्यांचा कांहीं एक उपयोग नव्हता, म्हणून दिवसानुदिवस मण्डालें आणि रंगून या दोन राज्यांचा संबंध जास्त ढिला होत चालला. ह्याच वर्षी म्हणजे १८७८ त मिण्डोनमिन वारला. १८६८ आणि १८७४ मध्य व्यापार वाढविण्याकरितां चीन देशांत दोन स्वाऱ्या पाठविल्या गेल्या, परंतु त्यांचा फारसा उपयोग झाला नाहीं.

मिंडोनमिनच्या मरणानंतर त्याचा मुलगा थीबा गादीवर बसला. थीबा राजा तरी इंग्रज सरकारशीं सलोखा ठेवील असें वाटलें होतें. परंतु गादीवर आल्यावर त्यानें आपल्या बहुतेक नातेवाईकांची कत्तल केली. त्याचें इंग्रजसरकारशीं राजकीय बाबतींत जमेनासें झालें. शेवटीं १८८५ मध्यें ही गोष्ट निकरावर आली. मध्यंतरीं १८८२ पासून १८८४ पर्यंत मणिपूर–ब्रह्मदेश सरहद्द ठरविण्याच्या वेळीं प्रकरण थोडेसें हातघाईवर आलें. नंतर मण्डालेच्या हायकोर्टानें एका इंग्रजी कंपनीला फसवणुकीच्या गुन्ह्याबद्दल ३३ लक्ष रु. दंड केला. ही गोष्ट इंग्रज सरकारला आवडली नाहीं. शेवटीं १८८५ त लढाईचा प्रसंग आला आणि त्याच वर्षी पराभव पावलेल्या थीबा राजाला रत्नागिरी येथें नेऊन ठेविलें. १८८६ मध्यें उत्तर आणि दक्षिण ब्रह्मदेश एक करून तो मुलुख इंग्रजसरकारचा आहे असें जाहीर करण्यांत आलें. प्रारंभीं सरकारला निरनिराळ्या जातींच्या लोकांचा बंदोबस्त करण्यांत फार अडचणी आल्या. कांहीं ठिकाणीं बंडें झालीं. सर्वांत मोठें बंड म्हणजे शान संस्थानांतील वुन्थो हें होय. शेवटीं १८९१ मध्यें सर्वत्र शांतता पसरली आणि रंगून येथील चीफ कमिशनरास सर्व ब्रह्मदेशाचा चीफ कमिशनर म्हणून जाहीर करण्यांत आलें. पुढें १८९७ मध्यें तेथें लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्यांत आला.

दोन्ही ब्रह्मदेश एक झाल्यापासून, सयाम व चीन ह्यांचें सख्य आहे. १८८३ मध्यें सयामची सरहद्द ठरविण्यांत आली. १८९२-३ मध्यें सयाम आणि सालविन पलीकडील शान संस्थानें यांच्यामधील सरहद्द ठरविण्यांत आली. १८७६ त चेफ्रू येथें चीनबरोबर तह झाला नंतर पुन्हां १८८६ मध्यें चीनबरोबर करार होऊन त्यांच्यामधील साधारण सरहद्द ठरविण्यांत आली. १९०० पर्यंत कायमची सरहद्द ठरली नव्हती. १८९६ मध्यें ब्रिटिश व फ्रेंच यांच्यामधील सरहद्द ठरली गेली. ह्या सर्व तहानंतर ब्रह्मदेशांत सर्वत्र शांतता नांदूं लागली. १९१९ च्या सुधारणाकायद्याचा फायदा त्यावेळीं ब्रह्मदेशाला, तो देश हिंदी साम्राज्यांतील इतर प्रांतांपेक्षां सर्वतोपरी भिन्न असल्यानें देण्यांत आला नाहीं. १९२२ त वेगळी ब्रह्मदेशसुधारणा कमिटी नेमण्यांत येऊन इतर प्रांताप्रमाणेंच ब्रह्मदेशालाहि सुधारणाकायदा लावण्यांत आला. तेव्हांपासून तो प्रांत एक गव्हर्नर, त्याचें कार्यकारी मंडळ व दिवाण यांच्या सत्तेखालीं आला.

प्राचीन लेखांवरून उत्तरब्रह्मदेशांत नेपाळ, तिबेट वगैरे उत्तरबाजूच्या देशांतील धर्म आणि दक्षिण ब्रह्मदेशांत सीलोन वगैरे दक्षिणबाजूच्या देशांतील धर्म प्रचलित होता असें दिसतें. परंतु अनव्रत राजाच्या कारकीर्दींत सर्व ब्रह्मदेशचा धर्म एक झाला. मंडालें, अमरपूर. वगैरे सारखीं ऐतिहासिक प्रसिद्ध स्थळें या प्रांतांत आहेत.

**आसाम**–याचा मूळापासूनचा इतिहास 'आसाम' लेखांत (ज्ञानकोश, विभाग ८ वा) आला आहे. हा प्रांत प्रथम १८७४ सालीं बंगालच्या लेफ्टनंट गव्हर्नरच्या ताब्यांतून काढून निराळा बनविला. १९०५ सालीं बंगालचा पूर्वभाग हा छोटया प्रांताला जोडून नवीन लेफ्टनंट गव्हर्नरच्या सत्तेखालीं आणला व बंगालची फाळणी केली. हा नवीन पूर्वबंगाल आणि आसामप्रांत ता.१ एप्रिल १९१२ रोजीं पुन्हां फोडून आसाम पूर्ववत वेगळा ठेविला व तो चीफ कमिशनरच्या ताब्यांत दिला. १९१९च्या सुधारणाकायद्यान्वयें याला उच्च दर्जा प्राप्त होऊन गव्हर्नर–इन्–कौन्सिल मिळालें.

**वायव्यसरहद्दप्रांत**–('वायव्यसरहद्द' [ज्ञानकोश, वि. २०]पहा). यावर सध्यां चीफ कमिशनर आहे पण

या प्रांताला सुधारणाकायदा लावून इतर प्रांतांच्या तोडीचा करण्याचें गेल्या सालीं असेंब्लींत ठरलें. तेव्हां लवकरच हा प्रांत गव्हर्नर–इन्–कौन्सिलच्या ताब्यांत जाईल असें वाटतें.

अजमीर–मेरवाड, कुर्ग, बलुचिस्तान, दिल्ली आणि अंदमान–निकोबार या इतर राजकीय विभागांवर कमीशनर नेमलेले आहेत. या मुलुखांचा इतिहास त्या त्या नांवाखालीं (ज्ञानकोश–शरीरखंडांत) आढळेल.

आतांपर्यंत प्रांतांच्या घटनेचा इतिहास दिला. आतां य प्रांतांचे क्षेत्रफळ व लोकसंख्येची कल्पना येण्यासाठीं पुढील कोष्टक दिलें आहे. सर्व प्रांतांची आधुनिक माहिती शरीरखंडांत त्या त्या नांवाखालीं दिलेलीच आहे.

## प्रांतांचें क्षेत्रफळ, वस्ती, जमाखर्च व अधिपती

| प्रांत | क्षेत्रफळ (चौरस मैल) | लोकसंख्या (लक्ष) | मुख्य वस्ती | जमा | खर्च | अधिपति |
|---|---|---|---|---|---|---|
| मद्रास | १४२२६० | ४२९ | हिंदु | १२९७७९१६९ | १२६०७६८४८ | गव्हर्नर |
| मुंबई | १२३६२१ | १९९ | ,, | १४१७१९८४३ | १३९३१७२६४ | ,, |
| बंगाल | ७६८४३ | ४६९ | हिंदु व मुसुलमान समसमान | ९८४९९८७४ | ९९९२०९२७ | ,, |
| संयुक्तप्रांत | १०६२९९ | ४५९ | हिंदु | १००६०४८४० | १०७०९७७०९ | ,, |
| पंजाब | ९९८४६ | २०९ | हिंदु व मुसुलमान | ८२७९०००९ | ८८९४४१९९ | ,, |
| ब्रह्मदेश | २३३७०७ | १३० | बौद्ध | ८८६११६२८ | १०३९९३३३३ | ,, |
| बिहार–ओरिसा | ८३१६१ | ३४० | हिंदु | ४९४१११२६ | ४६३२४३२८ | ,, |
| मध्यप्रांत | ९९८७६ | १४० | ,, | ५१९३३९३८ | ४८९९७४०४ | ,, |
| आसाम | ५३०१५ | ७५ | निम्यावर हिंदु व ⅓ वर मुसुलमान | १८४४३२१९ | २०५४६९५० | ,, |
| वायव्यसरहद्द | १३४१९ | २२ | मुसुलमान | ... | ... | चीफ कमिशनर |
| अजमीर मेरवाडा | २७११ | ५ | हिंदु | ... | .... | ,, |
| कुर्ग | १५८२ | १॥ | ,, | ... | ... | ,, |
| दिल्ली | ५९३ | ५ | ,, | ... | ... | ,, |

### हिंदी संस्थानें.

हिंदुस्थानचें एकंदर क्षेत्रफळ १७७३१६३ चौरस मैल असून लोकसंख्या ३१९१३२९३७ म्हणजे जगांतील एकंदर लोकसंख्येचा एकपंचमांश आहे. पण हिंदुस्थानचा बराचसा भाग खुद्द ब्रिटिश अंमलाखालीं नाहीं. ब्रिटिश सार्वभौम सरकारचे मांडलिक या नात्यानें हिंदी संस्थानिकांच्या सत्तेखालीं जो मुलुख आहे त्याचें क्षेत्रफळ ६७९२६७ चौरस मैल असून त्यांतील लोकसंख्या सुमारें ७ कोटी आहे. या हिंदी संस्थानांचें स्वरूप व प्रकार फार निरनिराळे आहेत. त्यांचें आकारमान इतकें भिन्न भिन्न आहे कीं, राजपुतान्यांतील लावा नांवाच्या संस्थानाचें क्षेत्रफळ अवघें १९ चौरस मैल असून सिमला हिल स्टेट्स (हिमालयांतील डोंगरी संस्थानें) तर केवळ लहान लहान जहागिरीवजा आहेत. उलटपक्षीं कांहीं संस्थानें फार मोठीं असून त्यांपैकीं निज़ाम–हैद्राबाद हें संस्थान यूरोपांतल्या इटली देशाइतकें मोठें आहे व त्याची लोकसंख्या १ कोटी ३० लक्ष आहे. भौगोलिक दृष्ट्याहि पश्चिम राजपुतान्यांतील राहण्याला अगदीं त्याज्य असा संस्थानी भाग. हिंदुस्थानचा बाग म्हणून नांवाजलेल्या मुलुखांपैकीं बडोदें संस्थान, कृषिविषयक संपत्तीनें श्रीमंत असें म्हैसूर संस्थान आणि भूगोलावरील एकंदर प्रदेशांपैकीं सर्वांत अधिक निसर्गशोभायुक्त भूभागांतील काश्मीर संस्थान असे अनेकविध प्रकार संस्थानी मुलुखांत आहेत.

**संस्थानांचा साम्राज्यसरकारशीं संबंध**—ज्या परिस्थितींत हिंदी संस्थानें अस्तित्वांत आलीं आणि

त्यांचा ब्रिटिश सत्तेशीं संबंध जडला ती इतकी विविध आहे कीं, तिचा येथें सारांश देणेंहि शक्य नाहीं. तत्संबंधीं विशेष माहिती त्या त्या संस्थानच्या नांवाखालीं ज्ञानकोशांत दिली आहे. ठोकळ मानानें एवढें म्हणतां येईल कीं, जसजशी ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीची सत्ता वाढत चालली तसतशीं हिंदी राज्यें तिच्या सत्तेखालीं आलीं आणि तेथील राजांनां संस्थानिक उर्फ मांडलिक राजे म्हणून गादीवर कायम ठेवण्यांत आलें. या सर्वसामान्य धोरणाला कांहीं काळ एक महत्त्वाचा अपवाद झाला. लॉर्ड डलहौसी हा गव्हर्नरजनरल असतांना ईस्ट इंडिया कंपनीसरकारनें औरस वारसांच्या अभावीं संस्थानें खालसा करण्याचा उपक्रम केला. हिंदु धर्मशास्त्राप्रमाणें औरस संतति नसल्यास दत्तकपुत्र घेण्याची परवानगी असते. पण अशा दत्तक पुत्रांनां संस्थानिक बनविल्यानें प्रजेचें कल्याण साधेल कीं नाहीं असा विचार पडल्यामुळें वरील धोरण स्वीकारण्यांत येऊन तदनुसार सातारा व नागपूर हीं संस्थानें ब्रिटिश कंपनीच्या मुलुखांत सामील करण्यांत आलीं व अयोध्येचें राज्य तेथील राजांचा कारभार फार वाईट असल्याच्या कारणावरून खालसा करण्यांत आलें. या नव्या धोरणानंतर हिंदुस्थानांत १८५७ सालचें बंड झालें. तें मोडल्यावर ब्रिटिश हिंदुस्थानचा राज्यकारभार कंपनीच्या हातून काढून ब्रिटिश साम्राज्यसरकारनें आपल्या हातीं घेतला व त्यावेळीं हिंदी संस्थानांच्या धोरणाविषयीं कायम स्वरूपाचा एक जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला. व्हिक्टोरिया राणीच्या या इतिहासप्रसिद्ध जाहीरनाम्यांत असें नमूद केलें आहे. कीं "आम्हाला आमचा मुलुख आणखी अधिक वाढविण्याची मुळींच इच्छा नाहीं; आणि ज्याप्रमाणें आम्ही आमच्या मुलुखांत कोणालाहि अतिक्रमण करूं देणार नाहीं व आमचे हक्क हिरावून घेऊं देणार नाहीं, त्याचप्रमाणें दुसऱ्यांच्या मुलुखावर किंवा हक्कांवर आम्ही हल्ला होऊं देणार नाहीं. संस्थानिकांचे हक्क, दर्जा व मानमरातब यांनां आम्ही आमच्या स्वतःच्या हक्कांप्रमाणें मान देऊं, आणि आमची अशी इच्छा आहे कीं, त्यांनीं (संस्थानिक व त्यांचे प्रजाजन) आणि आमच्या ब्रिटिश मुलुखांतल्या प्रजाजन या दोघांनींहि आपली भरभराट व समाजोन्नति यांचा उपभोग घ्यावा व ही गोष्ट देशांत अन्तर्गत शांतता व सुराज्यव्यवस्था यांच्या योगानेंच फक्त साध्य होणें शक्य आहे." हा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यापासून देशी संस्थानिकांच्या मुलुखाचा यत्किंचितहि अपहार करण्यांत आला नाहीं. उलटपक्षीं उलट्या दिशेनेंच गोष्टी घडून आल्या. उदाहरणार्थ, म्हैसूर संस्थान बरींच वर्षें ब्रिटिश अमलाखालीं होतें तें १८८१ सालीं पुन्हां जुन्या हिंदु राजघराण्याकडे परत देण्यांत आलें आणि १९२१ सालीं अयोध्या प्रांतांतील एक मोठा जमीनदार बनारसचा महाराज याला राज्यकारभाराचे हक्क देण्यांत आले. पुष्कळ वेळां संस्थानचा राज्यकारभार फार वाईट चालल्यामुळें किंवा संस्थानिक अल्पवयी असल्यामुळें संस्थानचा कारभार ब्रिटिश सरकारला स्वतःच्या हातीं घ्यावा लागे. परंतु अशी जरूरी संपतांच संस्थानी मुलुख योग्य वारसाच्या हातीं परत देण्याचा नियम ब्रिटिश सरकारनें कोठें मोडलेला दिसत नाहीं. औरस संतति नसल्यास दत्तकपुत्र घेण्याचा हक्क बहुतेक सर्व संस्थानिकांस आहे.

**हिंदी संस्थानिकांचे हक्क**--हिंदी संस्थानिकांचे हक्क व जबाबदाऱ्या यांची नोंद इंपीरिअल गॅझिटिअरमध्यें पुढीलप्रमाणें आहे--हिंदी संस्थानिकांनां एकहि अपवाद होऊं न देतां बाहेरच्या संकटांपासून ब्रिटिश सरकारनें त्यांचें संरक्षण केलेलें आहे. तसेंच संस्थानिकांचे संस्थानी राज्यकारभाराचे हक्क कायम राहतील अशी हमी पाळली गेली आहे. संस्थानिकांचा, परराज्यें किंवा इतर संस्थानिक यांच्याशीं येणारा संबंध संस्थानातर्फे ब्रिटिश सरकार पाहतें. संस्थानांतील प्रजाजन पूर्णपणें संस्थानिकांच्याच सत्तेखालीं आहेत. संस्थानिकांनां किंवा त्यांच्या प्रजाजनांनां ब्रिटिश सरकारचे कोणतेहि कायदे बंधनकारक नसतात. संस्थानी मुलुखांत पळून गेलेले गुन्हेगार मात्र ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत परत द्यावे लागतात. परंतु ब्रिटिश सरकारी पोलिसांनां संस्थानिकांच्या परवानगीशिवाय संस्थानी हद्दींत शिरून असले गुन्हेगार कैद करतां येत नाहींत. येणेंप्रमाणें परराष्ट्रीय कारभार संस्थानिकांतर्फे साम्राज्यसरकार पहातें आणि संस्थानिकांच्या अंतर्गत कारभार पहाण्याच्या संपूर्ण अधिकाराला पूर्ण मान देतें. शिवाय संस्थानिकांच्या मुलुखांत -विशेषत: शांतताभंग होण्याचा प्रसंग असले अशा वेळीं -संस्थानी कारभारांत साम्राज्यसरकार हात घालतें. संस्थानिकांनां ब्रिटिश मुलुखांतील व्यापार, रेल्वे, बंदरें व बाजार यांचा योग्य तो उपयोग करतां येतो. संस्थानांनां ब्रिटिश मुलुखाशीं खुला व्यापार करण्याची पूर्ण परवानगी आहे. तसेंच संस्थानी प्रजेला बहुतेक

सर्व प्रकारच्या ब्रिटिश मुलुखांतील सरकारी नोकऱ्यांमध्यें प्रवेश मिळूं शकतो.

**हिंदी संस्थानिकांवरील जबाबदाऱ्या**—उलटपक्षीं कोणत्याहि हिंदी संस्थानानें परराष्ट्रांशीं किंवा दुसऱ्या हिंदी संस्थानांशीं संबंध ठेवतां कामा नये अशी जबाबदारी आहे. तसेंच संस्थानिकांचा राजेपणाचा अधिकार त्या त्या संस्थानी मुलुखाच्या बाहेर कोठेंहि चालत नाहीं. संस्थानी हद्दींतून बाहेर ब्रिटिश मुलुखांत गेलेले संस्थानी प्रजाजन वस्तुतः ब्रिटिश प्रजाजन बनतात. जेथें जेथें परराष्ट्राशीं संबंध येतो तेथें तेथें साम्राज्य सरकारच कारभार पहातें. संस्थानिकांचा परस्परांशीं कांहीं वादग्रस्त प्रश्न उद्भवल्यास तोहि त्यांनीं ब्रिटिश सरकारकडे सोंपविला पाहिजे अशी जबाबदारी त्यांच्यावर आहे. पोलिस खातें, दिखाऊ लष्कर किंवा ब्रिटिश सरकारला मदत म्हणून ठेवावयाचें लष्कर याखेरीज इतर कोणत्याहि प्रकारचें लष्कर ठेवण्याचें काम संस्थानिकांस नसल्यामुळें संस्थानिकांनीं लष्कर किती ठेवावें यासंबंधीं नियम साम्राज्य सरकार ठरवून देतें. पूर्वापार चालत आलेल्या तहाप्रमाणें ब्रिटिश सरकारला संस्थानिकांच्या नोकरांशीं किंवा प्रजेशीं कांहीं कर्तव्य नसलें तरी लॉर्ड कॅनिंगनें १८६० च्या खलित्यामध्यें जें धोरण लिहिलें आहे त्याला लोकमताचा आणि सारासार बुद्धीचा पाठिंबा आहे. तें धोरण असें—"एखाद्या संस्थानसरकारनें केलेलें मोठ्या अन्यायाचें किंवा जुलमाचें वर्तन देशांत अस्वस्थता किंवा बंड उत्पन्न करील अशी स्थिति उत्पन्न झाल्यास संस्थानी कारभारांत हात घालण्यास ब्रिटिश सरकारला कोणतीहि हरकत नाहीं." व अशी आवश्यकता उत्पन्न झाली आहे कीं काय हें ठरविण्याचा सर्व अधिकार गव्हर्नर जनरल-इन-कौन्सिल यास असतो. संस्थानी मुलुखांत राहणाऱ्या ब्रिटिश प्रजाजनांवर किंवा इतर कांहीं विशिष्ट इसमांवर न्यायाधिकार चालविण्याचा हक्क ब्रिटिश कायद्यानें मिळाला असल्यास अशा इसमाची चौकशी करण्याचा अधिकार त्या त्या ब्रिटिश न्यायकोर्टांनां असतो. संस्थानी मुलुखांत जेथें ब्रिटिश कँटोन्मेंटचा प्रदेश असतो त्या मुलुखावरहि ब्रिटिश सरकारचाच न्यायाधिकार चालतो.

**संस्थानांवरचे ब्रिटिश अधिकारी**--हिंदी संस्थानिकांशीं व्यवहार करणारे ब्रिटिश सरकारचे जे अधिकारी असतात त्यांनीं संस्थानी मुलुखांतच रहावें असा नियम आहे. मोठाल्या संस्थानांत रेसिडेंट हा ब्रिटिश सरकारचा प्रतिनिधि म्हणून राहतो, आणि लहान लहान संस्थानांच्या समुच्चयाकरितां गव्हर्नर जनरलचा एजंट आणि त्याच्या मदतीला रेसिडेंट किंवा पोलिटिकल एजंट हे अधिकारी असतात. हिंदी संस्थानिक व ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें येणारा सर्व राजकीय संबंध या अधिकाऱ्यामार्फत चालतो. शिवाय हे अधिकारी संस्थानिकांनां राज्यकारभाराच्या व इतर बाबतींत सल्लामसलत देतात व मदत करतात. प्रांतिक सरकारच्या ताब्यांतील मोठाल्या संस्थानांत वरील प्रकारचेच पोलिटिकल एजंट नेमलेले असतात, पण लहान लहान संस्थानांसंबंधीचा पोलिटिकल एजंट या नात्याचा अधिकार त्या त्या जिल्ह्याच्या कलेक्टरला किंवा कमिशनरला दिलेला असतो.

ब्रिटिश सरकार व हिंदी संस्थानिक यांचा एकोपा अनेक गोष्टींमुळें अधिकाधिक वाढत चालला आहे. संस्थानिकांच्या मुलांनां चांगलें शिक्षण मिळावें म्हणून प्रथम स्वतंत्र शिक्षक नेमून व नंतर या कामाकरितां निराळीं कॉलेजें स्थापून विशेष काळजी घेण्यांत आलेली आहे. अशीं कॉलेजें हल्लीं अजमीर, राजकोट, इंदूर व लाहोर या ठिकाणीं आहेत. इंपीरिअल कॅडेट कोअरमध्यें संस्थानिकांच्या व इतर उच्च घराण्यांतल्या मुलांनां लष्करी शिक्षण देण्यांत येतें. या कोअरचें मुख्य ठाणें डेहराडून येथें आहे. ब्रिटिश मुलुखांतील युनिव्हर्सिटयामार्फत उच्च शिक्षण घेऊन बाहेर पडणाऱ्या इसमांचा उपयोग हिंदी संस्थानिकांनांहि संस्थानी नोकरींत करून घेतां येतो. या कारणामुळें हिंदी संस्थानांच्या राज्यकारभारामध्यें हळू हळू चांगली सुधारणा होत गेली आहे, आणि संस्थानांचा कारभार ब्रिटिश सरकारच्या कारभाराप्रमाणें उच्च दर्जाचा बनत चालला आहे. बऱ्याच हिंदी संस्थानांनीं ब्रिटिश साम्राज्याच्या संरक्षणाच्या जबाबदारींत अंशभाग उचलला आहे. १८८९ सालीं रशियाबरोबर युद्ध होण्याचा प्रसंग उद्भवणार असें दिसूं लागतांच लष्करी मदत करण्याची तयारी संस्थानिकांनीं केली आणि तेव्हांपासून स्वतःचें लष्कर, ब्रिटिश सरकारच्या हिंदी लष्कराच्या दर्जाचें तयार करण्यांत आलें. या संस्थानी लष्कराला इंपीरिअल सर्व्हिस ट्रूप्स असें नांव होतें तें बदलून हल्लीं इंडियन स्टेट फोर्सेस असें नांव देण्यांत आलें आहे. हें सैन्य संस्थानिकांचें असतें, त्यावर लष्करी अधिकारी हिंदी असतात, पण त्यांची तपासणी ब्रिटिश अधिकारी करतात. असें सैन्य हल्लीं सुमारें

२२ हजार आहे. या सैन्याचीं हत्यारें व दारूगोळा सरकारी लष्करासारखा असतो, आणि या संस्थानी सैन्यानें पुष्कळ वेळां आपापल्या संस्थानिकांच्या लष्करी हुकमतीखालींच सरहद्दीवर चीनमध्यें, सोमालीलँडमध्यें आणि गेल्या महायुद्धांत रणांगणावर चांगली कामगिरी बजावली आहे. संस्थानिकांच्या हक्कांनां आणि अधिकारांनां ब्रिटिश साम्राज्यसरकार योग्य मान देतें अशी संस्थानिकांची खात्री झाली आहे. संस्थानांचा राज्यकारभार अधिकाधिक सुधरत गेल्यामुळें त्यांच्या कारभारांत हिंदुस्थान सरकारला हात घालण्याचे प्रसंग कमीकमी येऊं लागले आहेत; या संबंधाचें धोरण लॉर्ड मिंटो या व्हॉइसरायनें १९०९ सालीं उदेपूर येथें केलेल्या आपल्या भाषणांत स्पष्ट सांगितलें आहे. "आमचें धोरण क्वचित होणारे अपवाद खेरीज करून संस्थानांच्या अंतर्गत कारभारांत हात न घालण्याचें आहे. परंतु अंतर्गत कारभारांत पूर्ण स्वातंत्र्य देऊन परचक्रापासून पूर्ण रक्षण करण्याची जबाबदारी पत्करली असल्यामुळें स्वाभाविकपणेंच साम्राज्य सरकारवर संस्थानिकांचा कारभार चांगला चालला आहे कीं नाहीं यावर देखरेख करण्याची जबाबदारी साम्राज्य सरकारवर येते. संस्थानिकांच्या वाईट कारभाराला तटस्थपणाचें धोरण स्वीकारल्यामुळें अप्रत्यक्षपणें मदत केली असा आरोप हिंदुस्थानसरकारवर येतां कामा नये. शिवाय रेल्वे, तारायंत्र व इतर कांहीं बाबी यामुळें ब्रिटिश सरकार व संस्थानें यांचे परस्पर येणारे संबंध सुरक्षित ठेविले पाहिजेत. तथापि संस्थानिकांचें ब्रिटिश सरकारशीं नातें मांडलिक या स्वरूपाचें आहे. ब्रिटिश सरकार आणि संस्थानें यांचें हिताहित एकाच स्वरूपाचें आहे याची जाणीव आणि संस्थानी कारभारांत शक्य तितका कमी हात घालावा या धोरणाची जाणीव हाच या सर्व सरकार–संस्थानिक संबंधपद्धतीचा पाया आहे."

**संस्थानांवरील ब्रिटिश नियंत्रण**–नियंत्रणाच्या सोईकरितां संस्थानांचे तीन प्रकार केले आहेत: (१) प्रत्यक्ष हिंदुस्थानसरकारशीं संबंध असलेलीं मोठालीं चार संस्थानें; (२) एजंटमार्फत हिंदुस्थानसरकारशीं संबंध असलेले संस्थानसमुच्चय (एजन्सी) आणि (३) एजंटमार्फत प्रांतिक सरकारशीं संबंध असलेले संस्थानसमुच्चय.

(१) मोठीं संस्थानें:–निजाम हैद्राबाद; म्हैसूर; बडोदें; काश्मीर.

(२) हिंदुस्थानसरकारच्या एजन्सी:–बलुचिस्तान एजन्सी (३) राजपुतानाएजन्सी (२०); मध्यहिंदुस्थान एजन्सी (७०३); वायव्य सरहद्द संस्थानें (४); मद्रास इलाखा संस्थानें (५); पश्चिम हिंदुस्थान संस्थानें(२०९).

(३) प्रांतिकसरकारएजन्सी:–मुंबई प्रांतिक संस्थानें (३५१); बंगाल प्रांतिक संस्थानें (२); बिहार–ओरिसा प्रांतिक संस्थानें (२६); संयुक्तप्रांत प्रांतिक संस्थानें(३); पंजाब प्रांतिक संस्थानें (१३); ब्रह्मदेश प्रांतिक संस्थानें (५१); आसाम प्रांतिक संस्थानें (२६); संयुक्तप्रांत प्रांतिक संस्थानें. (१५).येणेंप्रमाणें एकूण संस्थानें ८८५ आहेत. त्यांची माहिती त्या त्या नांवाखालीं ज्ञानकोशांत दिली आहे.

**हिंदी संस्थानिकांची खंडणी**–ही खंडणी कित्येक संस्थानांच्या बाबतींत मुलुखाच्या अदलाबदलीबद्दल म्हणून, आणि मुख्यत: संस्थानच्या संरक्षणासाठीं ठेवलेल्या ब्रिटिश सैन्याच्या खर्चासाठीं म्हणून ठेवण्यांत आली आहे. याशिवाय काठेवाडांतील व गुजराथेंतील पुष्कळशीं संस्थानें बडोदे संस्थानला, आणि मध्यहिंदुस्थानांतील कांहीं लहान संस्थानें ग्वाल्हेर संस्थानला खंडणी देतात. शिवाय नवीन वारस गादीवर येण्याच्या वेळीं साम्राज्यसरकारकडे नजराणा द्यावा लागत असे, तो रिवाज बंद केल्याचें १९११ सालीं भरलेल्या दिल्ली दरबारांत बादशहांनीं जाहीर केलें.

**प्रत्यक्ष हिंदुस्थानसरकारला खंडणी देणारीं संस्थानें**

| संस्थान | | पौंड |
|---|---|---|
| जयपूर | खंडणी | २६६६७ |
| कोटा | ,, | १९६४८ |
| उदेपूर | ,, | १३३३३ |
| जोधपूर | ,, | ६५३३ |
| बुंदी | ,, | ८००० |
| इतर संस्थानें | ,, | १९१७० |
| जोधपूर(एरिनपुरा इरेग्युलर फोर्स खर्चास) | | ७६६७ |
| कोटा (देओही इरेग्युलर फोर्स | ,, ) | १३३३३ |
| भोपाळ (भोपाळ लेव्ही | ,, ) | १०७९३ |
| जावरा(युनायटेड माळवा कॉंटिंजंट | ,, ) | ९२४१ |
| माळवा भिल्ल कोअर करितां | ,, | २२८० |
| मध्यप्रांत व वऱ्हाड— | | |
| निरनिराळीं संस्थानें मिळून | खंडणी | १९९९६ |

| संस्थान | | पौंड |
|---|---|---|
| ब्रह्मदेश— | | |
| शान संस्थान | खंडणी | २८९२४ |
| इतर संस्थानें | „ | १३६७ |
| आसाम— | | |
| मणीपूर | „ | ३३३ |
| रामबाई | „ | ७ |
| बंगाल— | | |
| कुचबिहार | „ | ४९१४ |
| संयुक्तप्रांत— | | |
| बनारस | „ | १४६०० |
| कपुरथळा | „ | ८७३३ |
| मंडी | „ | ६६६७ |
| पंजाब— | | |
| इतर संस्थानें | „ | ३०८६ |
| मद्रास— | | |
| त्रावणकोर | „ | ५३३९३ |
| म्हैसूर | पेषकास व तैनात | २३३३३३ |
| कोचीन | „ | १३३३३ |
| त्रावणकोर | „ | ८८८ |
| मुंबई— | | |
| काठेवाड | खंडणी | ३११२९ |
| अनेक लहान संस्थानें | „ | २८२९ |
| बडोदें | तनखा | २९००० |
| सदर्न मराठा कंट्री जहागीरदार | „ | ९७६९ |
| कच्छ | खंडणी | ९४८४ |
| एकूण | | ५८३१६३ |

**नरेंद्रमंडळ (चेंबर ऑफ प्रिन्सेस)**–हिंदुस्थानच्या राज्यकारभारासंबंधाच्या सुधारणांच्या मॉंटेग्यू व लॉर्ड चेम्सफोर्ड यांनीं तयार केलेल्या रिपोर्टांत असें लिहिलें आहे कीं, पूर्वी व्हॉईसराय यांच्या निमंत्रणावरून जी हिंदुस्थानांतील संस्थानिकांची नियतकालिक परिषद भरते तिच्या ऐवजीं एक कायमची सल्लागारसंस्था अमलांत आणावी हें इष्ट आहे; अशा कौन्सिलच्या नियमित सभा भरण्याची आवश्यकता किती आहे हें त्या रिपोर्टात सांगितल्यावर पुढें अशी सूचना केली आहे कीं, अशा कौन्सिलचा व्हॉईसराय प्रेसिडेंट असावा व त्याच्या गैरहजेरींत संस्थानिकांपैकींच एकानें अध्यक्ष व्हावें. या सभेंतील कामकाजासंबंधींचे नियम व्हॉइसरायनें संस्थानिकांचा सल्ला घेऊन तयार करावे आणि त्यांत संस्थानिकांकडून आलेल्या सूचनानुसार वेळोवेळीं योग्य ते फेरफार करावेत.

आणखी एक सूचना अशी करण्यांत आली होती कीं, कौन्सिल ऑफ प्रिन्सेस (नरेंद्रमंडळ) या संस्थेनें दरसाल एक लहानशी स्टँडिंग कमिटी नेमावी. देशी संस्थानांबद्दलचे--विशेषतः पूर्वापार चालत आलेल्या रूढी किंवा वहिवाटीबद्दलचे–निकाल या कमिटीला व्हॉइसरायनें किंवा पोलिटिकल डिपार्टमेंटनें कळवावे.

याशिवाय ज्यांत हिंदी संस्थानांचा संबंध आहे अशा वादग्रस्त प्रश्नांची चौकशी करण्याबद्दल, किंवा संस्थानिकांच्या गैरवर्तनाबद्दल चौकशी करण्याकरितां कमिशन नेमणें आणि कौन्सिल ऑफ स्टेट व कौन्सिल ऑफ प्रिन्सेस या दोघांचा ज्यांत हितसंबंध आहे अशा गोष्टींची एकत्र बसून वाटाघाट करण्याची व्यवस्था करणें यासंबंधीं जाइंट रिपोर्टांत सूचना केल्या. १९१९च्या जानेवारी महिन्याच्या शेवटीं सदरहू योजनेचा विचार करण्याकरितां हिंदी संस्थानिकांची परिषद दिल्ली येथें भरली. या सभेंत ज्या प्रश्नावर सर्वांत अधिक वेळ वादविवाद झाला तो प्रश्न संस्थानांचे, अंतःकारभारांत सर्व अधिकार नाहींत अशीं संस्थानें आणि सर्व अधिकार आहेत अशीं संस्थानें, असे दोन वर्ग करण्यासंबंधाचा होता. कांहीं संस्थानिकांचें मत असें होतें कीं, कौन्सिल ऑफ प्रिन्सेसचे सभासद होण्याचा हक्क अंतर्गत कारभाराचे सर्व अधिकार ज्यांनां आहेत अशा संस्थानिकांसच असावा. उलटपक्षीं कांहींचें मत असें होतें कीं, लहान लहान संस्थानांनां सुद्धां कौन्सिल ऑफ प्रिन्सेसमध्यें कांहीं प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क असावा. पण या बाबतींत उपरिनिर्दिष्ट परिषदेंत कांहीं निकाल लागला नाहीं. तथापि कौन्सिल ऑफ प्रिन्सेस स्थापण्याबद्दलची सूचना सर्वांनां पसंत पडली आणि त्याला 'नरेंद्रमंडळ' हें नांव द्यावें असें सुचविण्यांत आलें.

या परिषदेच्या सूचना सेक्रेटरी ऑफ स्टेटकडे पाठविण्यांत आल्या आणि संस्थानिकांची दुसरी परिषद १९१९च्या नोव्हेंबरमध्यें भरली. तिजमध्यें लॉर्ड चेम्सफोर्ड यानें चेंबर ऑफ प्रिन्सेससंबंधाची ब्रिटिश साम्राज्य सरकारनें मान्य केलेली सामान्य योजना पुढें मांडली. परिषदेनें त्या सूचनेवर वादविवाद करून ती योजना मान्य असल्याचा ठराव पास केला आणि पुढील सालीं सदरहू चेंबर अस्तित्वांत यावें अशी कळकळीची

## हिंदुस्थानांतील मोठीं संस्थानें.

| संस्थानें | क्षेत्रफळ चौ. मै. | लोकसंख्या (१९२१) | अदमासें उत्पन्न रु. हजारीं | राजघराणें |
|---|---|---|---|---|
| हैद्राबाद | ८२६९८ | १२४७१७७० | ५९६६५ | तुर्कोमेन( मुसुलमान ) |
| म्हैसूर | २९४७६ | ५९७८८९२ | ३०८७५ | वैश्य ( हिंदु ) |
| काश्मीर | ८४२५८ | ३३२०५१८ | २१०२५ | डोग्रा रजपुत |
| वडोदें | ८१२७ | २१२६५२२ | २०३६७ | मराठा ( हिंदु ) |
| ग्वाल्हेर | २६३५७ | ३१८६०७५ | २१००० | ,, ,, |
| राजपुताना संस्थानें— | | | | |
| अल्वार | ३२१३ | ७०११५४ | ३३०० | नरुका रजपुत |
| भरतपुर | १९८२ | ४९६४३७ | ३४२५ | जाट ( हिंदु ) |
| बिकानेर | २३३१५ | ६५९६८५ | ६८१५ | राठोड रजपुत |
| बुंदी | २२२० | १८७०६८ | ९४५० | चव्हाण रजपुत |
| धोलपुर | १२०० | २३०१८८ | १३८८ | जाट |
| जयपुर | १६६८२ | २३३८८०२ | ८३२६ | कच्छवाद रजपुत |
| जोधपुर ( मारवाड ) | ३५०६६ | १८४१६४२ | ८८०० | राठोड रजपुत |
| करोली ,, | १२४२ | १३३७३० | ६२८० | जादन रजपुत |
| कोटा ,, | ५६८४ | ६३००६० | ४६९३ | हाडा रजपुत |
| टोंक ,, | २५८६ | २८७८९८ | १६०७ | पठाण (मुसुलमान ) |
| उदयपुर ( मेवाड ) | १२९१५ | १४०६९९० | ४५४० | सिसोदिया रजपुत |
| मध्यहिंदुस्थान संस्थानें— | | | | |
| भोपाळ | ६९०२ | ६९२४४८ | ६२१० | अफगाण ( मुसुलमान ) |
| इंदूर | ९५१९ | ११५१५७८ | १०१७६ | मराठा |
| रेवा | १३००० | १४०१५२४ | ३७२२ | वाघेल रजपुत |
| मुंबई संस्थानें— | | | | |
| कच्छ | ७६१६रण सोडून | ४८४५४७ | २२५९ | जाडेजा रजपुत |
| ईदर | १६६९ | २२६३५१ | १०९० | राठोड रजपुत |
| कोल्हापूर | ३१६२ | ८३२७२६ | ९३२३ | क्षत्रिय ( हिंदु ) |
| खैरपुर ( सिंध ) | ६०५० | १९३१३१ | २४०० | ( मुसुलमान ) |
| जुनागड | ३२८४ | ४६५४९३ | ५५४३ | पठाण ( मुसुलमान ) |
| नवानगर | ३७९१ | ३४५३५३ | ४२९२ | जाडेजा रजपूर |
| भावनगर | २८६० | ४२६४०४ | ४९२५ | गोहिल रजपुत |
| मद्रास संस्थानें— | | | | |
| त्रावणकोर | १४१८ | ९७९८१९ | ५६७५ | क्षत्रिय ( हिंदु ) |
| कोचीन | ७६२५ | ४००६०६२ | १७७७३ | ,, ,, |
| मध्यप्रांत संस्थानें— | | | | |
| बस्तर | १३०६२ | ४६४४०७ | ६३४ | क्षत्रिय सोमवंशी चंदेल |
| बंगाल संस्थानें— | | | | |
| कूचबिहार | १३१८ | ५९२४८९ | ३४०९ | क्षत्रिय ( ब्राह्मो ) |
| त्रिपुर | ४११६ | ३०४४३७ | २३७३ | क्षत्रिय ( हिंदु ) |
| संयुक्तप्रांत संस्थानें— | | | | |
| रामपूर | ८९९ | ४५३६०७ | ५५८२ | सैयदशिया (मुसुलमान) |
| तेहरी ( गढवाल ) | ४४५० | ३१८४८२ | ८१० | क्षत्रिय ( हिंदु ) |
| बनारस | ८७० | ३६२८६० | २५७६ | ब्राह्मण ( हिंदु ) |

| संस्थानें | क्षेत्रफळ चौ. मै. | लोकसंख्या (१९२१) | अदमासें उत्पन्न रु. हजारीं | राजघराणें |
|---|---|---|---|---|
| पंजाब संस्थानें— | | | | |
| पत्याळा | ५९४२ | १४९९७३९ | ९१२३ | सिधु जाट ( शीख ) |
| भावलपुर | १५०३ | ७८११९१ | ४१३० | दाउदपुत्र ( मुसुलमान ) |
| जिंद | १२९९ | ३०८१८३ | २५०० | सिधु जाट ( शीख ) |
| नाभा | ९२८ | २६३३३४ | २००० | ,, ,, |
| कपुरथळा | ५९८ | २८४२७५ | ३००० | अहलुवालिया ( शीख ) |
| मंडी | १२०० | १८५०४८ | ६८५ | रजपुत ( हिंदु ) |
| सिरनुर ( नाहन ) | ११९८ | १४०४४८ | ६०० | ,, |
| चंबा | ३२१६ | १४१८६७ | ४३३ | ,, |

इच्छा प्रदर्शित केली. या चेंबर ऑफ प्रिन्सेसच्या स्थापना-समारंभाच्या वेळीं लॉर्ड चेम्सफोर्ड यानें केलेल्या भाषणांत चेंबरच्या कामकाजाचे नियम तयार करण्यांत, आर्बिट्रेशन कोर्टे (लवादनिवाडा) व इन्क्वायरी (चौकशी) कमिशन यांच्यासंबंधीं ठरावाची रच[illegible]रण्यांत संस्थानिकांच्या कोडिफिकेशन कमिटीची सल्ला व टीका कशी उपयुक्त झाली तें सांगितलें. तसेंच मूळ सुचविलेल्या योजनेंत जो एक महत्त्वाचा फरक झाला असल्याचें सांगितलें तो फरक असा कीं, संस्थानिकांचीं वैयक्तिक कृत्यें व वैयक्तिक संस्थानी कारभाराच्या गोष्टी यासंबंधीं चर्चा चेंबर ऑफ प्रिन्सेसमध्यें होण्यास पूर्ण प्रतिबंध करण्यांत आला. चेंबर ऑफ प्रिन्सेसचें मुख्य काम म्हणजे सामान्यपणें सर्व संस्थानांनां लागू पडणाऱ्या गोष्टींची चर्चा करणें किंवा संस्थानें व ब्रिटिश सरकार किंवा साम्राज्यसरकार यांचे एकमेकांशीं जे संबंध येतात, त्यांसंबंधीं चर्चा करणें. हिंदुस्थानसरकारशीं प्रत्यक्ष संबंध कोणत्या मोठाल्या संस्थानांचा असावा आणि विशेषतः मुंबई इलाख्यांतील महत्त्वाच्या संस्थानांपैकीं कोणाचा असावा यासंबंधीं स्टेटसेक्रेटरीकडे एक सूचना करण्यांत आली होती. पंजाबांतील कांहीं संस्थानांचा हिंदुस्थानसरकारशीं प्रत्यक्ष संबंध जोडण्यांत यावा अशाबद्दलहि एक योजना साम्राज्यसरकारकडे पाठविण्यांत येणार होती. ग्वाल्हेर संस्थानचा संबंध हिंदुस्थानसरकारशीं जोडण्यांत येणार आहे.

या चेंबरचा सरकारी रीत्या उद्घाटनसमारंभ १९२१ फेब्रुवारी ता. ८ रोजीं ड्यूक ऑफ कॉनॉट यांच्या हस्तें करण्यांत आला व तेव्हांपासून ही संस्था लवकरच जोमदार बनली. या संस्थेच्या अध्यक्षत्वाचें काम या संस्थेनें निवडलेल्या चॅन्सेलरकडे देण्यांत आलें. हल्लीं (१९२६) हिज हायनेस विकानेरचे महाराज हे चान्सलर आहेत. शिवाय सहा सभासदांची एक स्टँडिंग कमिटी नेमली असून ती या चेंबरच्या सविस्तर कामकाजाची व्यवस्था पहाते. ही कमिटी दरसाल हिंदुस्थानच्या राजधानीच्या ठिकाणीं दोन किंवा तीन वेळां भरते. या कमिटीचें मुख्य काम, ब्रिटिश हिंदुस्थानचा आणि संस्थानांचा राज्यकारभार यामधील परस्परसंबंध येणाऱ्या गोष्टींची चर्चा करणें हें आहे. ही कमिटी आपला रिपोर्ट दरसाल भरणाऱ्या चेंबरच्या बैठकींत सादर करते. या बैठकींतील कामकाज नेहमीं गुप्तपणें चालतें.

## हिंदुस्थानांतील परकीय मुलुख.

हिंदुस्थानांत फ्रान्स व पोर्तुगाल या दोन यूरोपीयन राष्ट्रांचे लहान लहान मुलुख आहेत.

**पोर्तुगीजांचा मुलुख**—हा मुलुख गोवें प्रांत, दमण प्रांत आणि दीव बेट इतका आहे. त्यांचें एकूण क्षेत्रफळ १६३८ चौ. मैल असून लोकसंख्या (१९१०) ५४८४७२ आहे. गोवें प्रांत मुंबई इलाख्यांत अरबी समुद्रकिनाऱ्यावर आहे; गुजराथ किनाऱ्यावर खंबायताच्या आखाताच्या तोंडाशीं दमण आहे आणि काठेवाड द्वीपकल्पाच्या दक्षिण टोंकाला दीव आहे. दमण प्रांतांतील एका लहान भागाला परगणा नगर–हवेली म्हणतात. दीव बेटामध्यें गोग्ला आणि सिंबोर हीं दोन ठिकाणें प्रसिद्ध आहेत. या पोर्तुगीज प्रांतांविषयी समग्र माहिती ज्ञानकोशांत त्या त्या नांवाखालीं आलेलीच आहे.

**फ्रेंचांचा मुलुख**–हिंदुस्थानांतील फ्रेंचांचा मुलुख पांच वसाहती मिळून झालेला आहे. त्या सर्वांचें मिळून क्षेत्रफळ २०३ चौ. मैल असून १९२३ सालीं एकंदर लोकसंख्या २७२४२७ होती. पांदिचेरीची वसाहत

मुख्य असून ती फ्रेंचांनीं १६७४ त स्थापिली. पांदिचेरीखेरीज कारिकल, चंद्रनगर, माही व यानान या चार वसाहती फ्रेंचांच्या आहेत. या फ्रेंच मुलखासंबंधीं साधारण माहिती 'फ्रेंच इंडिया' या लेखांत दिली असून प्रत्येक वसाहतींची माहिती त्या त्या नांवाखालीं आलेलीच आहे.

## सरहद्दीवरील प्रदेश.

या प्रदेशांसंबंधाच्या ब्रिटिश सरकारच्या धोरणाचे दोन प्रकार आहेत: एक स्थानिक धोरण आणि दुसरें आंतरराष्ट्रीय धोरण. सुमारें गेल्या एक शतकभर आंतरराष्ट्रीय धोरणाला अधिक महत्त्व होतें. परंतु अलीकडे आंतरराष्ट्रीय धोरणाचा प्रश्न कमी महत्त्वाचा होऊन स्थानिक धोरणाच्या प्रश्नाचें महत्त्व अधिकाधिक वाढत चाललें आहे.

**स्था नि क प्र श्न**—स्थानिक धोरणाचा प्रश्न पुढील स्वरूपाचा आहे: अरबी समुद्रापासून नेपाळपर्यंत हिंदुस्थानच्या सरहद्दीवरचा जो प्रांत आहे तो जगांतील अत्यंत उंच अशा पर्वतांच्या रांगांनीं व्यापलेला आहे. याच्यामधील दऱ्यांमध्यें फारच थोडी वसती असून हे पहाडी लोक फार काटक, शूर आणि लढाऊ वृत्तीचे आहेत. शिवाय ते लष्करी बाण्याच्या मुसुलमानी धर्माचे असल्यामुळें अधिकच कडवे आणि फार धर्मवेडे असल्यामुळें त्यांच्याशीं संबंध ठेवणें हें काम फारच अवघड आहे. यांची संख्या थोडी असली तरी तेथील उदरनिर्वाहाचीं साधनें त्यांनां पुरून उरतील इतकीं विपुल आहेत. जगांतील सर्व ठिकाणच्या पहाडी लोकांप्रमाणें हे शूर व धाडसी लोकहि स्वतःच्या शेतकीचें उत्पन्न वर्षभर न पुरल्यामुळें बाकीचे दिवस शेजारच्या हिंदुस्थानांतील समृद्ध प्रदेशांत लुटालूट करून पोट भरतात. सदरहू परिस्थिति स्कॉटलंडच्या हायलंड्स प्रदेशाप्रमाणें आहे. १७४५ च्या बंडानंतर तत्कालीन इंग्लिश सरकारनें यावर एक कायमचा उपाय योजला होता, तो म्हणजे लढवय्या हायलंडर लोकांनां सैन्यामध्यें नोकरी देणें आणि हायलंड प्रदेशांतील अंतर्भागामध्यें लष्कराला वाट असावी म्हणून 'वेड्सरोड' नांवाचा रस्ता तयार करणें हा होय. त्यामुळें अलीकडे बरींच वर्षें हायलंड संबंधाचा प्रश्न अजीबात सुटलेला आहे. तेव्हां याच धोरणाची हिंदुस्थानच्या सरहद्दीच्या बाबतींत उपयुक्तता आपल्या बरोबर ध्यानांत येईल. हिंदुस्थानच्या सरहद्दीसंबंधानें आजपर्यंत दोन धोरणांचा प्रयोग करून पाहण्यांत आला आहे.

**बलुचिस्तान**—या प्रदेशांत शिरून त्यांतील महत्त्वाचीं ठिकाणें लष्करानें व्यापून भोंवतालचा सर्व प्रदेश आपल्या कह्यांत राखणें ही युक्ति सर रॉबर्ट सँडेमननें काढली. त्याबरोबरच त्या प्रदेशांतील जे मुख्य मुख्य अधिपती (स्थानिक टोळ्यांचे राजे) होते त्यांच्याबरोबर तह करून त्यांच्यामार्फत त्या त्या टोळ्यांतील लोकांनां नियंत्रणाखालीं ठेवण्याची योजनाहि त्यानें केली. हें धोरण इतकें यशस्वी झालें कीं बलुचिस्तानच्या सरहद्दीवरील प्रदेशाचा कारभार विशेष खर्चाचा असला तरी सँडेमननें केलेली योजना अमलांत आल्यापासून हिंदुस्थानसरकारला या प्रदेशासंबंधानें फारसा त्रास कधींच झाला नाहीं. या प्रदेशांत नेहमीं पूर्ण शांतता होती असें नाहीं. मधून मधून तेथील लोक लुटीकरितां हल्ले व बंडाळी करीत आणि त्यांच्या बंदोबस्ताकरितां हिंदुस्थानसरकारला लष्करी हालचाली कराव्या लागत. गोमल खिंडीमध्यें असले स्थानिक टोळ्यांचे दंगे १९१९ मध्यें अफगाणिस्ताननें युद्ध पुकारल्यावर सर्वत्र उद्भवले. तथापि सामान्यपणें असें म्हणतां येईल कीं, सँडेमननें बलुचिस्तानास आणि या नांवामध्यें अंतर्भूत होणाऱ्या सरहद्दीवरील मोठ्या विस्तृत प्रदेशास शांतता मिळवून दिली. सांप्रत बलुचिस्तानच्या या प्रदेशासंबंधानें लष्करी दृष्ट्या महत्त्वाचा असा प्रश्नच नाहीं. फक्त आर्थिक व औद्योगिक दृष्ट्या या प्रदेशाची उन्नति करणें जरूरीचें आहे.

**अफगाणिस्तान**—बलुचिस्तानापासून नेपाळच्या सरहद्दीपर्यंत जो प्रदेश पसरलेला आहे त्याची स्थिति मात्र अगदीं निराळ्या स्वरूपाची आहे. गेल्या शतकाचा सुमारें तीनचतुर्थांश इतक्या काळांत या प्रदेशांत बहुतेक सतत लढाया चालू होत्या आणि त्यामुळें हिंदुस्थानची तिजोरी बरीच आटली. या प्रदेशासंबंधानें हिंदुस्थानसरकारनें एक स्पष्ट व निश्चित असें धोरण स्वीकारल्याचें केव्हांहि दिसून येत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, या प्रश्नाच्या बाबतींत दोन अगदीं स्वतंत्र स्वरूपाचीं मतें असलेले पक्ष अस्तित्वांत आहेत. या प्रदेशाची अफगाणिस्तानला लागून असलेली ब्रिटिश सरहद्द निश्चित झाल्यावर त्या सरहद्दीपर्यंतचा सर्व मुलुख किंवा निदान भोंवतालच्या सर्व प्रदेशावर नियंत्रण ठेवतां येईल अशीं सर्व महत्त्वाचीं ठाणीं ब्रिटिश लष्करानें व्यापून टाकावीं असा लष्करी लोकांनीं आग्रह धरला. परंतु केवळ लष्करी दृष्ट्याच विचार न

करणाऱ्या अधिकाऱ्यांपुढें दुसरे दोन महत्त्वाचे प्रश्न होते. त्यांनां हें दिसत होतें कीं, अफगाणिस्तानपर्यंतचा हा सर्व सरहद्दीचा प्रदेश लष्करानें व्यापून टाकणें म्हणजे सरहद्दीसंबंधाचा प्रश्न अधिक उत्तरेकडे सरकविण्यासारखें आहे. त्यायोगानें सरहद्दीवरील पहाडी टोळ्यांनां तोंड देण्याऐवजीं खुद्द अफगाणिस्तानसरकारशीं तोंड देण्याचा प्रसंग येणार. जर अफगाणिस्तानांत बलिष्ठ आणि एकसूत्री सरकार असतें तर असें करण्यास हरकत नव्हती, परंतु अबदुल रहमानखान याच्या कडक अमलाच्या वेळीं सुद्धां अमीराचे हुकूम त्याच्या राज्याच्या दक्षिणेकडील प्रदेशांत नीटसे मानले जात नसत. त्याच्यानंतरचा अमीर हबीबुल्लाखान याच्या कारभाराचें धोरण सामान्यतः जरी शहाणपणाचें आणि यशस्वी होतें तरी त्याचे हुकूम वरच्याहूनहि अधिक कमी मानले जात. तो अमीर आपल्या राज्यांतील या लोकांवर नियंत्रण घालण्यास असमर्थ होता, त्यामुळें सर्वांहून अधिक शांततावादी असलेल्या लॉर्ड मोर्ले या स्टेट सेक्रेटरीच्या कारकीर्दीतहि झेकाखेल आणि मोहमंद या दोन मोहिमा ब्रिटिश सैन्याला कराव्या लागल्या. तरी सुद्धां हबीबुल्लाखानाला खोस्त प्रांतांतील स्वतःच्याच गव्हर्नरनें केलेलें बंड पूर्णपणें मोडतां आलें नाहीं. खोस्त प्रांतांत दळणवळणाचे मार्ग नसल्यामुळें अफगाणसरकारचें सैन्य निरुपायानें परत फिरलें आणि अमीराला त्याच्या बंडखोर सरदाराशीं तह करावा लागला, म्हणून ज्यास डूरंड लाईन (अफगाण व ब्रिटिश या राज्यांमधील ही सरहद्द सर मॉर्टीयर डुरंड या ब्रिटिश वकिलानें ठरविली होती) म्हणतात तेथपर्यंतचा सरहद्दीचा प्रदेश लष्करनें व्यापून टाकल्यास त्यामुळें असा प्रश्न उद्भवतो कीं, बंडाळी उद्भवली म्हणजे केवळ टोळ्यांचा बंदोबस्त करून न भागतां खुद्द अफगाणिस्तानशीं युद्धाचा प्रसंग येणार आणि शिवाय अफगाणिस्तानपर्यंतच्या मार्गावरील बंडखोर टोळ्यांचाहि बंदोबस्त करावा लागणार. दुसरें असें कीं, हें पुरोगामी धोरण (फॉरवर्ड पॉलिसी) लष्करी दृष्ट्या योग्य असलें तरी या धोरणामुळें इतका खर्च वाढला असता कीं, तो हिंदुस्थानच्या तिजोरीला झेंपण्यासारखा नव्हता. शिवाय सदरहू अफगाणिस्तानच्या सरहद्दीवरील प्रश्न, मध्यआशियांत रशियाचा विस्तार होत गेल्यामुळें अधिक भानगडीचा होत चालला होता. ज्या मार्गानीं अनेक शतकें अलेक्झांडर दी ग्रेट याच्या वेळेपासून इराण व मध्यआशियावर स्वाऱ्या करणारे लोक हिंदुस्थान लुटण्याकरितां आले ते सर्वांत सोपे घाटमार्ग याच प्रदेशांत आहेत. म्हणून हे घाटमार्ग ब्रिटिश साम्राज्याच्या संरक्षणाकरितां लष्करानें पूर्ण व्यापून टाकणें शक्य नसलें तरी ते लष्करीनियंत्रणाखालीं ठेवणें अत्यंत जरूर आहे. तेव्हां या सरहद्दी संबंधींचें धोरण, फॉरवर्ड स्कूल (म्हणजे डूरंड लाईनपर्यंत प्रदेश लष्करनें व्यापावा असें म्हणणारा पक्ष) आणि क्लोज बॉर्डर स्कूल (म्हणजे या अडचणीच्या डोंगराळ प्रदेशांत न शिरतां हिंदुस्थानच्या सरहद्दीवर राहूनच पहाडी टोळ्यांनीं हल्ला केल्यास त्यांचा प्रतिकार करावा असें म्हणणारा पक्ष) यांच्यामध्यें हेलकावे खात होतें. वरीलपैकीं दुसरा पक्ष सिंधू नदी हीच सरहद्द समजून तिच्या पलीकडे जाऊं नये असें म्हणणारा होता.

दोन धोरणें—या दोन पक्षांच्या झगड्यामुळें सतत अनिश्चित स्वरूप असलेलें असें मध्यम स्वरूपाचें उर्फ तडजोडीचें धोरण स्वीकारण्यांत आलें, आणि तडजोड म्हटली म्हणजे ती अगदीं असमाधानकारक ठरते; तसाच अनुभव या बाबतींत आला. ब्रिटिश सरकारनें पुढें पुढें सरकून ठिकठिकाणीं ठाणीं स्थापण्याचा उपक्रम केला पण त्यामुळें इकडील पहाडी लोक चिडून गेले व त्यांनां, मौल्यवान वाटणारें स्वतःचें स्वातंत्र्य आपण गमाऊन बसूं अशी भीति वाटूं लागली. पण अशा प्रक्षुब्ध झालेल्या लोकांनां पूर्णपणें कह्यांत ठेवण्याकरितां लागणारीं पुरेशीं ठाणीं ब्रिटिश सरकारनें स्थापिलीं नव्हतीं. शिवाय जीं ठाणीं बसविलीं होतीं तेथेंहि लष्करी साहित्य भरपूर नव्हतें, आणि त्यांच्याशीं दळणवळण राखण्याचीं योग्य साधनेंहि अस्तित्वांत नव्हतीं. हिंदुस्थान आणि अफगाण सरकारची सरहद्द यांच्यामधील प्रदेशाला दि इंडिपेंडंट टेरिटरी असें म्हणत व त्या प्रदेशावर ब्रिटिश सरकारचाहि राज्यकारभार नव्हता आणि अफगाण सरकारचाहि नव्हता. हा प्रदेश पूर्णपणें तेथील पहाडी टोळ्यांच्या ताब्यांत होता. बलुचिस्तानच्या सरहद्दीवर स्वीकारलेलें धोरणच सदरहू सरहद्दीवर कां लागू केलें नाहीं, असा प्रश्न करून त्यावर नेहमीं वादविवाद चालतो परंतु, वास्तविक या दोन सरहद्दीवरच्या परिस्थितींत फार फरक आहे. सर रॉबर्ट सँडेमन याला बलुचिस्तानांत लहान लहान टोळ्यांचीं व्यवस्थित राज्यें आढळून आलीं, आणि या पहाडी लोकांच्या राजांबरोबर तह करणें सोपें गेलें. परंतु अशा प्रकारचीं व्यवस्थित राज्यें अफगाणिस्तानच्या सरहद्दीवर

नाहींत. तेथें जे राजे म्हणून आहेत त्यांची सत्ता त्यांच्याच टोळींतल्या लोकांवर फारशी चालत नाहीं. या टोळ्यांची प्रत्येकीं एक एक लोकसभा असून त्या संघामध्यें वयोवृद्ध शहाण्या लोकांच्या सल्ल्यापेक्षां तरुण लोकांच्या मतांचाच पगडा अधिक बसतो. आणि खुद्द राजापेक्षां अशा लोकसभांचा निर्णय टोळींतील लोक अधिक मानतात. वर सांगितलेल्या तडजोडीच्या धोरणाचें कटु फल १८९७ सालीं भोगावें लागलें. प्रथम टोची व्हॅलीमध्यें लहानसा दंगा झाला पण त्याची ठिणगी सर्वत्र पसरून वायव्यसरहद्दीवरच्या गोमलपासून नेपाळपर्यंतच्या सर्व सरहद्दीवर मोठें बंड उद्भवलें, तें मोडण्याकरितां ३० हजार सैन्य पाठवावें लागलें. पण लष्करी साहित्याच्या वाहतुकीला अत्यंत अडचणी असल्यामुळें एवढ्या मोठ्या सैन्यालाहि तें बंड नीटसें मोडतां आलें नाहीं, आणि कसातरसाच तह करावा लागला. हें संकट उद्भवलें त्याच सुमारास लॉर्ड कर्झन हा हिंदुस्थानचा व्हॉईसराय नेमला गेला. त्यानें सरहद्दीसंबंधाच्या प्रश्नाचा निकाल मोठ्या खुबीनें लावला; प्रथम त्यानें पंजाब प्रांतापासून सरहद्दीचा प्रांत स्वतंत्र बनविला, त्यावर चीफ कमिशनर हा अधिकारी नेमला, नंतर त्यानें फार दूरवर असलेलीं लष्करी ठाणीं उठवून ज्या भागांत सडका, रेल्वे हीं दळणवळणाचीं साधनें होतीं अशा भागांत रेग्युलर ट्रुप्स ठेविलीं. टोची, कुर्रम, खैबर हे महत्त्वाचे घाटमार्ग आणि इतर दूरवरचीं ठाणीं यांच्या संरक्षणाची कामगिरी स्थानिक टोळ्यांमधून बनविलेल्या लोकलमिलीशिया या सैन्यावर सोंपविली आणि त्या सैन्यावर इंडियन आर्मीमधील ब्रिटिश अधिकारी नेमिले. नंतर या भागाची आर्थिक उन्नति करण्याकरितां 'स्वात' कालवा बांधून बरीच जमीन लागवडीस आणली आणि तेथील जंगली जातींनां शेतकी हें उदरनिर्वाहाचें साधन करून दिलें. तेव्हांपासून या कालवे असलेल्या प्रदेशांत जंगली जातींची वस्ती विशेष वाढली आहे.

हें लॉर्ड कर्झनचें धोरण चांगलें यशस्वी झालें. यामुळें पूर्ण शांतता जरी प्रस्थापित झाली नाहीं तरी पूर्वीच्या मानानें बरीच शांतता लाभली. हें धोरण महायुद्धाच्या काळांतहि बदलावें लागलें नाहीं. महायुद्धाचा फायदा घेऊन वाझिरी लोकांनीं स्वतंत्र मुलुखांत बरेच दंगे केले. पुढें १९१९ एप्रिलमध्यें अफगाण लोकांनीं हिंदुस्थानवर स्वारी केली. त्यामुळें तें धोरण पुढें टिकाव धरूं शकलें नाहीं. १९१९ च्या फेब्रुआरी ता. २० रोजीं अमीर हबीबुल्लाखान ठार मारला गेला. त्यानें महायुद्धाच्या आरंभींच हिंदुस्थानसरकारला कळविलें होतें कीं, कांहीं कांहीं वेळीं ब्रिटिशांबरोबर दोस्तीला न शोभणाऱ्या गोष्टी घडल्या तरी एकंदरीनें ही दोस्ती कायम राहील असा दृढ विश्वास ब्रिटिश सरकारनें बाळगावा. जेव्हां तुर्कस्तान महायुद्धांत सामील झालें व इतर मुसुलमानांस जर्मनांच्या बाजूनें युद्धांत भाग घेण्यास सांगूं लागलें तेव्हां अफगाणच्या अमीराची स्थिति खरोखर मोठी अडचणीची झाली होती. अमीरानें तुर्कस्तान, जर्मनी व ऑस्ट्रियाच्या सरकारी मिशनांची गाठ घेतली. पण अमीरानें आपला अफगाण देश महायुद्धांत खालील होऊं दिला नाहीं, आणि जेव्हां सेंट्रल पॉवर्स (जर्मनी व ऑस्ट्रिया) व त्यांच्या कक्षेंतील इतर राष्ट्रें यांचा महायुद्धांत पराभव झाला तेव्हां अमीराचें धोरण पूर्णपणें योग्य असल्याची खात्री पटली. पुढें या त्याच्या धोरणामुळेंच त्याचा खून झाला, व त्याचा भाऊ नासरुल्लाखान याला खुनी बंडखोरांकडून अमीर म्हणून जाहीर करण्यांत आलें. परंतु अफगाणिस्तानांतल्या लोकांनां ही गोष्ट पसंत पडली नाहीं. काबूलमधील सैन्यानें नासरुल्लाखानाला पदच्युत करून हबीबुल्लाखानाचा मुलगा आमनुल्लाखान याला गादीवर बसविलें. या अमीरानें हिंदुस्थानांत त्यावेळीं उत्पन्न झालेल्या अस्वस्थतेची संधि साधून आपल्या शिपायांनां हिंदुस्थानांतील लुटीचें आमिष दाखवून ता. २९ एप्रिल १९१९ रोजीं हिंदुस्थानवर चाल केली. हिंदुस्थानची फौज उलट त्याच्यावर चालून गेली व अफगाण सैन्याचा तिनें सहज पराभव केला. शहर काबीज करून जलालाबाद व काबूल या शहरांवर अनेकवेळां बाँबचे हल्ले करण्यांत आले अखेर अफगाणांच्या विनंतीवरून ता. ८ ऑगस्ट १९१९ रोजीं उभयतांमध्यें तह झाला. या युद्धाचा एक असा वाईट परिणाम झाला कीं, गोमलपासून खैबरपर्यंत सर्व प्रदेशांत बंडाळी उद्भवली आणि लॉर्ड कर्झननें तयार केलेलें ट्रायबल मिलीशिया सैन्य बंडाळीं मोडण्याच्या कामीं उपयोगी पडलें नाहीं. मिलीशिया सैन्यांतले लोक काम सोडून गेले व कांहीं बंडाळींतच सामील झाले. यामुळें लॉर्ड कर्झनचें धोरणच चुकलें असा कांहींचा आक्षेप आहे.

**रशिया आणि ब्रिटिश सरहद्द**—कर्झनचें धोरण यशस्वी झालें असें मानलें तरी त्या यशाचें श्रेय कित्येक अवांतर गोष्टींनां आहे. सरहद्दीवरील धोरण ठरविण्याच्या

बाबतींत रशियाबरोबर चालू असलेला दीर्घकालीन झगडा याचा सर्वांत अधिक परिणाम झाला आहे. आशियामध्यें वर्चस्व कोणाचें असावें याबद्दल झगडा रशिया व ग्रेटब्रिटन यांच्यामध्यें गेलें पाऊणशतक चालू होता. हिंदुस्थानांत ईस्ट इंडिया कंपनी ही संस्था पुढें हिंदुस्थानचा राज्यकारभार पाहणारी संस्था वनण्यास जी परिस्थिति कारणीभूत झाली तशाच प्रकारची परिस्थिति मध्यआशियामध्यें रशियाला आढळून आली. मध्यआशियांतील अनेक खानांचीं लहान लहान राज्यें संस्कृतीच्या बाबतींत मागासलेलीं असून रशियाला वरचेवर त्रास देत असत. त्यामुळें रशियाला त्यांच्यावर चालून जाणें भाग पडलें. याप्रमाणें पुढें चालून जात जात अखेर हिंदुस्थानच्या सरहद्दीपर्यंत जाऊन क्रिमियन युद्धाबद्दल व १८७७-७८ सालीं तुर्कस्तानविरुद्ध मिळविलेल्या जयाचें फळ न लाभूं दिल्याबद्दल ग्रेटब्रिटनवर सूड उगवावा अशा तऱ्हेची बुद्धि रशियन सैन्यांतील कांहीं अधिकाऱ्यांच्या मनांत होती. या कारणामुळें १८७८ मध्यें हिंदुस्थानसरकारला दुसरें अफगाणयुद्ध करावें लागलें. त्यानंतर अबदुर रहमानखान हा अफगाणिस्तानचा अमीर होऊन त्यानें राज्यकारभार चांगल्या तऱ्हेनें चालविला. त्यावेळीं सरहद्दीबद्दल व इतर कांहीं वाद उत्पन्न झाले. तथापि प्रत्यक्ष युद्धाचा प्रसंग आला नाहीं. अखेर १९०७ मध्यें आंग्लो-रशियन दोस्तीचा करार परराष्ट्रमंत्री लॉर्ड ग्रे आणि पेट्रोग्रॅडमधील ब्रिटिश वकील लॉर्ड हार्डिंज यांनीं घडवून आणिला. असा करार व्हावा अशी तत्पूर्वी पुष्कळ मुत्सद्यांनीं खटपट केली परंतु रशियन सैन्याचा मॅन्चुरियाच्या रणभूमीवर आणि रशियाच्या आरमाराचा त्सुशिमाच्या समुद्रावरील लढाईंत जपाननें पराभव केल्यावर वरील प्रकारच्या करारास रशियाची अनुमति मिळाली. या करारामध्यें सरहद्दीवरील सर्व प्रदेशाचा उल्लेख होता व करारांतील कांहीं कलमें असमाधानकारक होतीं. इराणसंबंधींचें कलम अगदींच असमाधानकारक होतें. त्याचा वाईट परिणाम गेल्या महायुद्धांत ग्रेटब्रिटनला भोगावा लागला. तथापि एकंदरीनें हा करार उभयराष्ट्रांना बराच हितकारक झाला असून हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील प्रश्नांच्या बाबतींत रशियाचा आतां फारसा संबंध उरलेला नाहीं. रशियांतील बोल्शेव्हिक सरकारच्या रेड आर्मीचें भय सरहद्दीवर एखादेवेळीं उद्भवतें इतकेंच.

**जर्मनीचें महत्त्व**—ज्याप्रमाणें निसर्गाला निर्वात स्थळ असलेलें खपत नाहीं त्याचप्रमाणें ज्या अप्रगत देशांच्या भोंवताली सुसंस्कृत राष्ट्रें आहेत अशा देशावर एका प्रगत राष्ट्राचें वर्चस्व कमी होतांच दुसऱ्या एखाद्या प्रगत राष्ट्राचें वर्चस्व बसूं लागतें. हिंदुस्थानच्या वायव्यसरहद्दीवरील प्रदेशांत रशियाचें वर्चस्व वरील करारामुळें नष्ट होण्यापूर्वीच बरींच वर्षें त्या प्रदेशांत जर्मनीचें वर्चस्व डोकावूं लागलें होतें. जर्मन लोक केवळ अनुकरणकुशल आहेत, स्वत: कल्पक नाहींत असें अनेक बाबतींत दिसून येतें. मांचुरियांत वर्चस्व स्थापण्याकरितां तिकडे प्रथम रशियानें रेल्वेचा प्रसार केला, याच युक्तीचें अनुकरण करून जर्मनीनें मध्यआशियांत वर्चस्व स्थापण्याकरितां तिकडे प्रथम रेल्वे वाढविण्यास सुरुवात केली. पुढें कैसरनें तुर्कस्तानच्या सुलतानाशीं मैत्री जमविली. आर्मीनियन लोकांच्या झालेल्या अनेक कत्तलींपैकीं एका कत्तलीला हा सुलतान प्रत्यक्ष कारणीभूत झाला असल्यामुळें त्याच्यावर इतर यूरोपियन राष्ट्रांनीं बहिष्कार घातला होता. त्यामुळें कॉन्स्टांटिनोपल येथें जर्मनांचें पूर्ण वर्चस्व लवकर प्रस्थापित झालें. स्वत: कैसरनें पॅलेस्टाईनमधून सफर केली. ती यशस्वी होऊन जर्मनीला ॲनाटोलियांतील मुख्य रेल्वेमध्यें हितसंबंध प्राप्त झाले. पुढें हैदरपाशा या बंदरापासून इराणच्या आखातांतील बंदरापर्यंत बगदादरेल्वे काढण्याची सवलत जर्मनीला मिळाली. या रेल्वेच्या योजनेला ब्रिटिश सरकारची अनुकूलता मिळविण्याचा प्रयत्न जर्मनीनें केला पण तो साधला नाहीं. याच सुमारास तुर्कस्तानांत राज्यक्रांति होऊन सुलतान पदच्युत झाला. तथापि या अडचणींनीं न डगमगतां जर्मनीनें आपले रेल्वे बांधण्याचे प्रयत्न चालूच ठेविले. जर्मनीनें ॲनाटोलियांतील रेल्वे बौर्गुलुपर्यंत नेली आणि बगदादपासून सामारापर्यंत एक फांटा काढला. इराणच्या आखातावरील कोवीट बंदराची बसऱ्यापासून तेथपर्यंत रेल्वे बांधण्याच्या उद्देशानें पहाणी केली. अमानस व तारस पर्वतांमधून रेल्वे नेण्याचें सर्वांत अवघड काम तेंहि तेथें अनेक बोगदे खोदून जर्मनांनीं चालू केलें. या बगदाद रेल्वेला ग्रेटब्रिटनची संमति मिळविण्याचे प्रयत्न जर्मनीनें चालविले होतेच आणि महायुद्ध सुरू होण्यापूर्वी या दोन राष्ट्रांमध्यें एक नक्की ठराव ठरत आला होता. इराणच्या आखातावरील रेल्वेवर ब्रिटिशांची मालकी असावी व बाकीच्या भागावर जर्मनीची मालकी असावी असा करार ठरला. पण त्यावर उभय सरकारच्या सह्या होण्यापूर्वीच महायुद्ध सुरू झालें, तरीहि जर्मनीनें सर्व बेत पुढें

चालू ठेवून वर सांगितलेल्या बोगद्यांचें काम महायुद्ध संपण्यापूर्वी बहुतेक पुरें केलें.

या बगदाद रेल्वेचें महत्त्व ग्रेटब्रिटनच्या फारसें लक्षांत आलें नव्हतें. हा एक आशिया व यूरोपखंड यांनां जोडणारा मोठा रेल्वेमार्ग आहे, आणि त्यामुळें ब्रिटिशांचें समुद्रावरील वर्चस्व कमी होऊन पूर्वेकडील प्रवाशांची व व्यापारी मालाची ने आण या रेल्वेमार्गानें सुरू होईल इतकेंच पुष्कळांनां वाटत होतें. वास्तविक हिंदुस्थानांत एप्रिल ते जूनपर्यंत उन्हाळा फार असल्यामुळें हिंदुस्थानांतून यूरोपांत जाणाऱ्या प्रवाशांची गर्दी या महिन्यांतच फार असते आणि पुढें आक्टोबर, नोव्हेंबरमध्यें हेच प्रवासी हिंदुस्थानकडे परत येतात. मेसापोटेमियामध्येंहि एप्रिल ते जूनपर्यंतच उन्हाळा अत्यंत भयंकर असतो. अशी स्थिति असल्यामुळें मुंबई ते मार्सेलिस या समुद्रावरील मार्गानें सुखकर जलप्रवास करण्याऐवजीं वरील रेल्वेमार्गानें लोक प्रवास करूं लागतील ही कल्पना अगदीं भ्रामक होती. बगदाद रेल्वेमार्गानें प्रवास करणें म्हणजे प्रथम मुंबई किंवा कराचीपासून बसरा किंवा कोवीट बंदरापर्यंत जलप्रवास करून पुढें मेसापोटेमिया व आशियामायनरपासून हैदरपाशापर्यंत अत्यंत प्रखर प्रदेशांतून प्रवास आणि नंतर सर्व यूरोपखंड ओलांडण्याचा प्रवास हा वरील जलमार्गाच्या मानानें बराच अधिक खर्चाचा झाला असता. तसेंच व्यापारी मालाच्या वाहतुकीला हा रेल्वेमार्ग योग्य मानणें चुकीचें होतें. कारण इंग्लंड किंवा जर्मनीपासून बसऱ्यापर्यंत एक टन मालाला भाडें एक पौंड पडतें, व महायुद्धापूर्वी तें १९ शिलिंग होतें. उलटपक्षीं बसऱ्यापासून बगदादपर्यंत एका टनाला रेल्वेभाडें ३० शिलिंगापासून २ पौंडांपर्यंत होतें आणि या रेल्वेमार्गानें हिंदुस्थानपासून जर्मनी किंवा इंग्लंडपर्यंत एकंदर भाडें एका टनास १९ ते २० पौंडांहून कमी पडणें शक्यच नव्हतें. तात्पर्य प्रवाशांची किंवा मालाची रहदारी या रेल्वेमार्गानें चालू होईल ही समजूत अत्यंत चुकीची होती.

पण बर्लिनपासून बगदादपर्यंत अखंड रेल्वे करण्याचें कारण व्यापाराविषयक नसून युद्धनीतिविषयक होतें. या रेल्वेचा उद्देश असा होता कीं कॉन्स्टान्टिनोपल येथील सरकारला आशियामायनर आणि मिडल ईस्ट यांवर पूर्ण प्रभुत्व चालवितां यावें आणि युद्धनीति दृष्ट्या या भागांतील महत्त्वाच्या ठिकाणीं जलदीनें सैन्याच्या हालचाली करतां याव्या. महायुद्धांत जर्मनीचा पराभव झाला असल्यामुळें आणि तुर्कस्तान आपली दैन्यावस्था सुधारण्याच्या कामांत गुंतलें असल्यामुळें आतां या रेल्वेमार्गाच्या युद्धविषयक उपयुक्ततेचा विचार करण्याचें कारण नाहीं. तथापि बसरा व अलेक्झाँड्रेटा आणि हैदरपाशा यांचा व्यापारीदृष्ट्या परस्पर संबंध जोडण्यास ही रेल्वे उपयुक्त असल्यामुळें ती पुरी तयार होणें फायद्याचेंच आहे.

**जर्मनीचें भय व रशियाचें भय**—जर्मनीकडून हिंदुस्थानाला सध्यां कांहीं एक भय नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि रशियाची गोष्ट तशी नाहीं. रशिया चोंहोंकडे आपल्या मतांचा प्रसार करीत आहे. आणि जर जनता आपली राजकीय व्यवस्था बदलूं इच्छील तर त्या जनतेला पाठिंबा देण्याची रशियन सरकारची वृत्ति आहे आणि तीमुळें कांहीं काळपर्यंत रशिया हा बागुलबोवासारखा वाटणें शक्य आहे. पण ब्रिटिश हिंदुस्थानचा कारभार येथील प्रजेला जबाबदार करण्याचें धोरण जसजसें पुढें सरकत जाईल तसतशी रशियाची गडबड करण्याची शक्ती देखील कमी होत जाईल.

**तुर्कस्तान आणि ब्रिटिश सरहद्द**—हिंदुस्थानच्या सरहद्दीच्या प्रश्नांत तुर्कस्तानला महत्त्व कधींच नव्हतें. पण जर्मनीनें तुर्कस्तानशीं दोस्ती केल्यामुळें कांहीं काळ तुर्कस्तानला महत्त्व आलें होतें. मेसापोटेमियावर तुर्कांची सत्ता फार काळ होती, तथापि तुर्कस्तानचें खरें वर्चस्व त्या प्रदेशांत कधींच प्रस्थापित झालेलें नव्हतें. अरब लोकांनीं तुर्कांची सत्ता चालू दिली होती, कारण तुर्की सरकार अरबांनां बहुतेक स्वतंत्र्य देत असे. परंतु जर्मनीनें तुर्कस्तानला वश करून बी. बी. बी. रेल्वे ( बर्लिन–ब्रायझेंटियम–बगदाद ) बांधण्याची योजना केली आणि त्या प्रांतांत तुर्कस्तानला आपली खरीखुरी सत्ता स्थापण्यास प्रवृत्त केलें. परंतु ब्रिटिश सरकारनें कोवीटच्या शेख राजाशीं करार करून तुर्कस्तानच्या सत्तेस विरोध केला. महायुद्ध सुरू झाल्यावर या प्रांतांतील सर्व परिस्थिति बदलली. बसऱ्यापासून बगदादपर्यंतचा प्रदेश ब्रिटिशांनीं हस्तगत केला. लॉर्ड ॲलेन्बीनें पॅलेस्टाईनमधून तुर्कांनां हांकून लाविलें. तथापि महायुद्धानंतरच्या तहांत मेसापाटोमियांतील ब्रिटिश सत्तेबद्दल निश्चित निकाल कांहीं न लागल्यामुळें विशेषतः मोसलप्रांताबद्दल तंटा चालूच राहिला. अखेर १९२३मध्यें लॉसेनच्या तहानें वरील अडचणी दूर झाल्या. अरबी

राज्यावर आपली सत्ता नाहीं हें तुर्कस्ताननें कबूल केलें. यामुळें यापुढें हिंदुस्थानच्या सरहद्दीविषयींच्या प्रश्नांत तुर्कस्तानचा संबंध येणार नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**फ्रान्स आणि ब्रिटिश सरहद्द**–हल्लीं या बाबतींत फ्रान्ससंबंधानें लिहावयाचें कारण नाहीं. पण या प्रश्नाच्या बाबतींत कोणत्या राष्ट्राचें महत्त्व वाढत आहे व कोणाचें कमी होत आहे याचा इतिहास समजण्याकरितां फ्रान्सचा उल्लेख करणेंहि जरूर आहे. इराणच्या आखातावरील मस्कत येथें आगबोटीला कोळसे घेण्याचें ठिकाण करतां यावें असा फ्रान्सचा प्रयत्न चालू आहे. तसेंच गुलामांचा व्यापार बंद व्हावा आणि वायव्य सरहद्दीवरील लोकांनां बंदुकांचा आणि दारूगोळ्याचा जो पुरवठा होतो त्या प्रकारच्या व्यापाराला आळा बसावा ह्या ब्रिटिशांच्या प्रयत्नांनां अडथळा करणें हेहि फ्रान्सचे हेतु होते. शिवाय रशियाप्रमाणें वायव्य सरहद्दीवर ग्रेटब्रिटनला त्रास देण्यास सांपडावा आणि त्या योगानें पश्चिम आफ्रिकेंत विशेषतः गॅंबियाच्या आसपास विशेष सवलती मिळविण्यास सोपें जावें असा फ्रेंचांचा उद्देश होता. पण अँग्लो-फ्रेंच एंटेंट (दोस्तीचा तह) झाल्यावर हळूहळू फ्रान्सचें वरील धोरण बंद पडत चाललें. हिंदुस्थानच्या पूर्व सरहद्दीवरहि फ्रेंचांचीं कांहीं कारस्थानें चालू होतीं. प्रथम फ्रेंच–इंडोचायनांत फ्रान्सनें आपली सत्ता दृढ केली आणि नंतर सयामला आपल्या वर्चस्वाखालीं आणावें आणि ईजिप्तवर ब्रिटननें जें आपलें वर्चस्व स्थापिलें त्याचा मोबदला अशा रीतीनें मिळवावा असें फ्रेंचांच्या मनांत होतें. ब्रह्मदेशाचा थीबा राजा मूर्ख व जुलमी होता. त्यानें ब्रिटिशांशीं वैर आरंभिलें. त्याला कांहीं महत्त्वाकांक्षी फ्रेंच इसमांनीं भर दिली. तथापि दुसऱ्या ब्रह्मी युद्धामध्यें जय मिळून ब्रह्मदेशावर ब्रिटिशांची सत्ता पूर्ण प्रस्थापित झाल्यामुळें आशियांत फ्रेंच मुलुख वाढविण्याची फ्रान्सची आशा नष्ट झाली. तथापि सयामबद्दलचा प्रश्न मिटला नव्हता. सयाम हा देश ब्रिटिश ब्रह्मदेश आणि फ्रेंच इंडोचायना यांच्यामध्यें 'बफर स्टेट' म्हणून कायम राखावा असें ब्रिटिश धोरण होतें. पण फ्रेंच लोकांनीं सयाममध्यें अतिक्रमण करून वरील ब्रिटिश धोरणास बाध आणण्यास सुरवात केली, आणि १८९४ मध्यें हें प्रकरण निकरावर येऊन फ्रेंच व ब्रिटिश राष्ट्रांत उघड युद्ध सुरू होणार असें दिसूं लागलें. पण या युद्धापासून वास्तविक काय लाभ होणार असा प्रश्न उभय राष्ट्रांच्या मुत्सद्यांपुढें येऊन या भांडणांत कांहीं अर्थ नाहीं, ही गोष्ट त्यांनां पटली. आणि म्हणून सयामचें स्वातंत्र्य दोघांनींहि कबूल केलें. सयाममध्यें शहाणपणाचा आणि प्रगतिपर राज्यकारभार सुरू झाल्यामुळें वरील कराराला अधिक दृढ स्वरूप प्राप्त झालें. हल्लीं सयाम सरकार ब्रिटिश व फ्रेंच या दोघा राष्ट्रांशीं सारख्याच भावानें वागत आहे.

**सरहद्दीसंबंधानें नवा प्रश्न**–वरील सर्व विवेचनावरून असें दिसून येईल कीं, सदरहू सरहद्दीबद्दलचा प्रश्न हा केवळ स्थानिक प्रश्न नसून त्याला गेल्या तीन पिढ्या व विशेषतः १८३८ मधील अफगाण युद्धापासून महत्त्वाचें आंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें होतें. ग्रेटब्रिटन व रशिया यांच्यामधील दीर्घकालीन झगडा, पौरस्त्य देशांशीं दळणवळणाकरितां नवा रेल्वेमार्ग तयार करून आशियांत वर्चस्व स्थापण्याची जर्मनीची अल्पकाल टिकलेली महत्त्वाकांक्षा या सर्वांचा या सरहद्दीच्या प्रश्नाच्या बाबतींत परिणाम झालेला आहे. इतर राष्ट्रांमार्फतचे हे सर्व बाह्य परिणाम आतां नाहींसे झाले आहेत, आणि पुन्हां ते अस्तित्वांत येतील अशीं चिन्हें दिसत नाहींत. यामुळें आतां या हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील प्रश्नाला स्थानिक स्वरूप प्राप्त झालें आहे. ही गोष्ट नीट लक्षांत घेतली पाहिजे, तथापि वरील जागतिक घडामोडी चालू असतांना कांहीं स्थानिक गोष्टीहि घडून आल्या आहेत, त्यांचें महत्त्व फार आहे. सरहद्दीवरील टोळ्यांतील लोक शत्रु असले तरी ते आदरास पात्र आहेत. कारण ते शूर, काटक आणि पहिल्या प्रतीचे लढवय्ये आहेत. स्वतःच्या मुलुखाची बारकाईची माहिती असल्यामुळें या टोळ्यांतील लोकांनां ब्रिटिश सैन्यास वाटेल तितका त्रास देणें बरेंच सोपें आहे. पूर्वी त्यांच्या जवळ युद्धसाधनें चांगलीं व भरपूर नसत. पण अलीकडे त्यांनीं बंदुका व दारूगोळा यांचा बराच संग्रह केला आहे. हा पुरवठा त्यांनां रशिया व अफगाणिस्तान यांच्यामार्फत होतो, व इराणच्या आखातांतून येणारें युद्धसाहित्यहि त्यांनां मिळूं शकतें. यामुळें त्यांच्याजवळ हल्लीं युद्धसाधनांचा भरपूर सांठा असतो. या लोकांपैकीं बरेचसे इसम हिंदी सैन्यामध्यें लढाईचें शिक्षण मिळालेले असतात, असाहि कटु अनुभव १९१९ सालच्या अफगाणयुद्धांत आला. अफगाण सरकारचें खडें सैन्य फारसें महत्त्वाचें नव्हतें पण युद्ध सुरू होतांच वजिरिस्तान आणि इतर प्रदेशांतील टोळ्यांतले जे लोक

युद्धांत सामील झाले त्यांचा पराभव करणें फार कठिण गेलें. ते हिंदी सैन्याबरोबर अत्यंत निकरानें लढले. त्यांची नेमबाजी व गोलंदाजी वाखाणण्यासारखी होती. कर्झनच्या योजनेनें निर्माण केलेलें ट्रायबल मिलीशिया सैन्य आतां नष्ट झालें आहे. त्याची जागा कशी भरून काढावी हा महत्त्वाचा प्रश्न आहे.

१९१९ मधील अफगाणयुद्ध संपतांच सरहद्दीवरील महत्त्वाच्या ठिकाणीं खडें सैन्य ठेवण्यांत आलें. पण ही योजना तात्पुरती होती. सरहद्दीवरील प्रदेशांपैकीं वझिरिस्तान हा सर्वांत महत्त्वाचा प्रांत होय. येथील लोक फारच आडदांड असून त्यांनां प्रसंग पडल्यास अफगाणच्या राज्यांत चटकन शिरतां येतें. तूर्त बाहेरून कोणत्याहि राष्ट्राकडून धोका येण्याचा संभव नसल्यामुळ आणि १९२१ च्या तहानें अफगाणिस्तानचें पूर्ण स्वातंत्र्य कबूल केल्यामुळें सर्व हिंदी सैन्य सिंधूनदीपर्यंत मागें हटवून देण्यास हरकत नाहीं असें कांहींचें मत आहे. पण या मताला फारसा मान नाहीं. केटा आणि पेशावर येथें ब्रिटिश सत्ता पूर्ण प्रस्थापित झाली आहे. तथापि गोमलपासून कुर्रमपर्यंतच्या प्रदेशांतील टोळ्यांच्या लोकांच्या भानगडींत मुळींच पडूं नये, मात्र ते हिंदुस्थानावर चालून आल्यास तेवढ्यापुरता बंदोबस्त करावा असें जें दुसरें मत आहे तें बरेंच सबळ आहे. वझिरी लोकांनां कह्यांत ठेवणें अत्यंत त्रासदायक आहे. कारण त्याकरितां वरचेवर लष्कराचा उपयोग करावा लागणार. अशी स्थिति असल्यामुळें वझिरिस्तानांतील लद्धापर्यंतचीं फक्त महत्त्वाचीं ठाणीं ताब्यांत ठेवून तीं इंडियन फ्रांटियर रेल्वेशीं चांगल्या मोटारीसडकांनीं जोडावीं असें लष्करी तज्ज्ञांचें मत आहे.

हा वाद अद्याप मिटलेला नाहीं, व तो कधीं मिटेल असेंहि वाटत नाहीं. हल्लींच्या धोरणाला 'हाफ फॉरवर्ड पॉलिसी' हें नांव देणें योग्य होईल. हल्लीं वझिरिस्तानांतील रझमकपर्यंतचा प्रदेश ब्रिटिश सैन्यानें व्यापलेला आहे. लद्धापर्यंतचा नाहीं. त्याकरितां नवीन रस्ते तयार होत आहेत. जमरूदपर्यंतची रेल्वे लंडीकोटलपर्यंत वाढण्याचें काम पुरें झालें आहे. रेग्युलर सैन्य कमी करून त्या जागीं खासदारांचें सैन्य ठेवण्यांत येत आहे. हें खासदारी सैन्य आणि पूर्वीचें ट्रायबलमिलीशिया सैन्य यांत महत्त्वाचा फरक आहे. या मिलीशिया सैन्याला हत्यारें आणि युद्धसामुग्री हिंदी लष्करी अधिकारी पुरवीत असत. त्यामुळें मिलीशिया सैन्यांतील शिपाई पळून गेल्यास ते हत्यारें व दारूगोळा घेऊन जात व त्याचाच हिंदी सैन्याविरुद्ध उपयोग करीत. खासदार सैनिक स्वतःच्या बंदुका आणतात, आणि ते पळून गेले तरी त्यांत पूर्वीप्रमाणें धोका नाहीं. अशा खासदार सैन्याचा टोळ्यांतील लोकांचे हल्ले परतविण्यास बराच उपयोग झाला आहे.

निरनिराळ्या ब्रिटिश सरहद्दींवरील प्रदेशांची यादी येणेंप्रमाणें-(१) इराणचें आखात; (२) सीस्तन; (३) इराण; (४) वझिरिस्तान; (५) अफगाणिस्तान व (६) ईशान्य सरहद्द. त्यांची थोडक्यांत माहिती अशी:-

इ रा ण च्या आ खा ता व री ल प्र दे श.-पौरस्त्य व्यापाराकरितां पोर्तुगीज, फ्रेंच, डच यांची स्पर्धा चालू होती त्यावेळींच इंग्रजांनीं या भागांत पाय ठेवला, व इंग्रज तेथें कायम राहिले. त्यांनीं चांचे लोकांचा बंदोबस्त केला. १९ व्या शतकांत पुन्हां फ्रान्सनें मस्कतनजीकचें जिस्सा घेण्याचा व रशियानें बंदर आब्बास घेण्याचा प्रयत्न केला, पण दोन्ही राष्ट्रांबरोबर इंग्लंडनें दोस्तीचा तह केल्यावर हें भांडण मिटलें. अलीकडे तुर्कस्तान व जर्मनी यांनीं या प्रदेशावर तावा मिळविण्याचा जोराचा प्रयत्न केला पण महायुद्धामुळें त्यांत अपयश आलें. आंग्लो-पर्शियन ऑइल कंपनीनें वखतिआरी प्रांतांतील तेलाच्या खाणी हातीं घेतल्यामुळें ब्रिटिशांचा हितसंबंध या भागांत विशेष वाढला आहे. येथील प्रमुख ठिकाणें:-(१)मस्कत हें मजबूत ठाणें आहे. येथील शेख राजाला गुलामांचा व्यापार बंद करण्य बद्दल ब्रिटिशांनीं नुकसानभरपाई दिली; व शेखनें १८९२ मध्यें तह करून ब्रिटिशांवर अवलंबून राहण्याचें आणि ब्रिटिशांच्या कबुलीशिवाय कोणालाहि स्वतःचा मुलूख न देण्याचें कबूल केलें. (२)चांचे लोकांचा किनारा (पायरेट कोस्ट) यावर सहा राजांची सत्ता आहे. चांचेगिरी बंद पाडण्याकरितां ब्रिटिशांनीं अनेक मोहिमा केल्या. व १८२० नंतर चांचे लोकांचा उपद्रव बहुतेक बंद झाला. १८५३ मध्यें येथील राजांनीं ब्रिटिशांबरोबर कायमच्या दोस्तीचे तह केले आणि १८७३ सालीं गुलामांचा व्यापार बंद करण्याचें कबूल केलें. (३) पायरेट कोस्टच्या उत्तरेस एक लहान बेहरीन द्वीपसमूह आहे त्यावर शेखची सत्ता आहे. या समूहापैकीं बेहरीन व महरक हीं दोन बेटें मोठीं आहेत आणि तेथें मोतीं काढण्याचा मोठा धंदा चालत असल्यामुळें तीं महत्त्वाचीं आहेत. येथें एखाद्या सालीं पांचपांच लाख पौंड किंमतीचीं मोतीं सांपडतात व त्यावर जकात

सुमारें ८० हजार पौंडांपर्यंत शेखला मिळते. त्यामुळें शेख फार श्रीमंत आहे. बेहरीननजीक एक मोठी दफनभूमि आहे तींत फिनिशियन व्यापाऱ्यांचीं थडगीं असावीत असें मत आहे. (४)कोवीट हें बंदर इराणी आखाताच्या वायव्यकोपऱ्यांत आहे. बगदाद रेल्वेचें टर्मिनस स्टेशन येथें होण्याचा संभव असल्यामुळें या बंदराचें महत्त्व बरेंच वाढत आहे. तथापि बंदरानजीक समुद्र फार उथळ असल्यामुळें मोठाल्या बोटी बंदराला लागण्याची सोय करण्याकरितां फार खर्च करावा लागेल. कोवीटचा शेख स्वतःस तुर्कस्तान सरकारचा नोकर (गव्हर्नर) म्हणवितो. येथील वस्ती २०००० आहे.(५) महामेरा हें ठिकाण शाट-एल्-अरबच्या समोर असून तें एका शेखच्या ताब्यांत आहे. हा शेख तेहरान सरकारचा नोकर म्हणवितो व गव्हर्नर या नात्यानें राज्य करतो, पण तो मांडलिक राजाप्रमाणें वागतो. हें ठिकाण करून नदीच्या मुखाजवळ असल्यामुळें महत्त्व पावलें आहे. कारण करून नदींतून इस्पहानला जावयास सर्वांत जवळचा मार्ग आहे. या गांवीं ॲंग्लो-पर्शियन ऑईल कंपनीनें तेल शुद्ध करण्याचे कारखाने (री फायनरी) स्थापल्यामुळें त्याला अधिक महत्त्व आलें, आणि खोरेमाबादला रेल्वे नेण्याची योजना नक्की झाल्यास हें महत्त्व जास्तच वाढेल. (६) बसरा हें बगदाद रेल्वेचें टर्मिनस होणें अपरिहार्य आहे. तैग्रीस व युफ्रेटीस नद्यांमधील व्यापार याच शहरामार्फत चालणें सोयीचें आहे. शाट-एल-अरब प्रदेशांतील खजूराचा फार मोठा व्यापार याच बंदरामार्फत चालतो. बसऱ्याचें राजकीय भवितव्य मेसापोटेमियांत स्थापलेलें अरबी राज्य व त्याचा राजा फैसल यांच्या भवितव्यावर अवलंबून आहे. महायुद्धकाळांत सदरहू प्रांतासंबंधानें डेईजड जबाबदाऱ्या अंगावर घेण्यांत आल्या. मूळच्या शहाणपणाच्या योजना बगदादपर्यंत पुढें चाल करण्याच्या मूर्खपणानें बिघडविण्यांत आल्या. कट-अल्-अमारा येथें अपयश आल्यावर पुन्हां मोठाल्या लष्करी मोहीमा करून मोसल, कुर्दिस्तान व ट्रान्स जार्डानियाच्या सरहद्दीपर्यंतचा मुलुख हस्तगत करण्यांत आला. हा सर्व प्रदेश ब्रिटिश साम्राज्याचा भाग बनवितां येईल अशी साम्राज्यवादी मुत्सद्यांनां आशा होती. पण लवकरच अरब लोकांनीं बंड केलें व त्यावरून असें दिसून आलें कीं, त्या प्रांतावर केवळ लष्करी सामर्थ्यानेंच सत्ता चालविणें शक्य आहे व त्याला बेसुमार खर्च लागेल. म्हणून फैसल राजाला इराक प्रांताचा राजा ब्रिटिश मांडलिकत्व पत्करण्याच्या अटीवर करण्यांत आलें. इराकचें राज्य व तुर्की राज्य यांच्या सरहद्दी ठरविण्याचें काम राष्ट्रसंघाच्या कौन्सिलनें केल्यावर ब्रिटिश सैन्य या प्रांतांतून काढून नेण्याचें ठरलें आहे. तथापि बसऱ्याचें व्यापारी महत्त्व फार असल्यामुळें बसरा प्रांत ब्रिटिश अमलाखालीं ठेवणेंच इष्ट आहे. (७) या इराणच्या किनाऱ्यावर ब्रिटिश रेसिडेंट व इतर परराष्ट्रीय वकील राहत असल्यामुळें, तसेंच लिंगा हें अत्यंत सुंदर बंदर या किनाऱ्यावर असून तसेंच बंदर आब्बास हें व्यापारी बंदर आणि आरमारी ठाण्याला योग्य ठिकाण असल्यामुळें या किनाऱ्याला महत्त्व आहे. तथापि येथील धक्का अत्यंत वाईट आहे. आब्बास बंदर घेण्याचा प्रयत्न रशियानें बरींच वर्षे चालविला होता त्यामुळें सार्वजनिक लक्ष तिकडे वेधलें होतें.

सी स्ता न.-इराणच्या आखाताकडे लक्ष लागल्यामुळें सीस्तनच्या महत्त्वाकडे दुर्लक्ष झालें होतें. हा प्रदेश ज्या ठिकाणीं रशिया, इराण व अफगाणिस्तान यांची सरहद्द झुलफिकार येथें मिळते आणि ज्या ठिकाणीं इराण व ब्रिटिश साम्राज्य यांची सरहद्द ग्वादूर येथें मिळते त्यांच्यामध्यें आहे. या प्रांतांत गव्हाचें पीक मुबलक होतें. शिवाय युद्धकालीन लष्करी डांवपेंचांनां हें ठिकाण उत्तम आहे. कास्पियन समुद्राकडून येणारी रेल्वे हिंदी महासागरापर्यंत नेण्याला या प्रांतांतून सर्वांत नजीकचा मार्ग आहे. हिंदुस्थानावर स्वारी करण्याला रशियाला या प्रांतांतून सोयीचा मार्ग असल्यामुळें रशियाचें लक्ष या प्रांताकडे विशेष होतें. पण आंग्लो-रशियन दोस्तीच्या तहापासून सीस्तानचें आंतरराष्ट्रीय महत्त्व कमी झालें. केटापासून सीस्तनच्या सरहद्दीवरील किल्ला रोबट येथपर्यंतचें अंतर ४६९ मैल आहे. कारवानांच्या सोयीकरितां बोलन रेल्वे पुढें नुश्कीपर्यंत नेण्यांत आली, व महायुद्धाच्या वेळीं डुझदाबपर्यंत नेण्यांत आली.

इ रा ण.-आंग्लो-इंडियन तहानें इराणचे दोन भाग करून रशियां व ब्रिटन यांनीं एकेक भाग आपापलें वजन वाढविण्याकरितां घेतला.पण या वांटणीबद्दल वस्तुतः स्वतंत्र असलेल्या इराण राष्ट्राला राग आला. तेव्हां ब्रिटिशांशीं असणाऱ्या द्वेषाचा फायदा घेऊन जर्मनांनीं महायुद्धकाळांत येथील जंगली टोळ्यांनां ब्रिटिशांविरुद्ध बंडास प्रवृत्त केलें; आणि तुर्की लोकांनांहि तेहरान येथें बरेंच वर्चस्व स्थापितां आलें. महायुद्धांत पराभूत झाल्यावर जर्मनांचें व तुर्कीचें वर्चस्व नष्ट झालें; व

ब्रिटिशसरकारनें इराणसरकारशीं तह केला; त्यांतील कलमें अशीं:-(१) इराणचें स्वातंत्र्य मान्य करणें, (२) इराणच्या राज्यकारभाराला तज्ज्ञ अधिकारी पुरविणें, (३)इराणी सैन्याला लष्करी कामगार व लष्करी सामुग्री पुरविणें, (४) या खर्चाकरितां इराणला कर्ज (पौंड २०००००; व्याज शें. ७); देणें आणि (५) रेल्वे आणि सडका वगैरे बांधण्यांत इराणला मदत करणें. या तहानें इराणचें परशत्रूपासून संरक्षण करण्याचें काम ब्रिटननें अंगावर घेतलें असा समज झाला, पण बोल्शेव्हिक सैन्य चालून आल्यावर ब्रिटिश सैन्य परत नेण्यांत येतांच हा तह इराणनें निरर्थक मानून रद्द केला; आणि ब्रिटिशांनीं दिलेले सल्लागार इसम परत नेले. त्यामुळें कांहीं काळ बंडाळी माजून अखेर सरदार रिपा ह्यानें राज्यसत्ता हातीं घेतली. त्यानें अमेरिकन तज्ज्ञ फडणीस नेमले.

व झि रि स्ता न.–हिंदुस्थाननें वायव्य सरहद्दीवर धोरण कोणतें ठेवावें हें समजण्याकरितां तेथील लोकांची चांगली माहिती होणें जरूर आहे. वायव्य सरहद्दप्रांतावर ब्रिटिशांची राज्यव्यवस्था चांगली चालू आहे, पण या प्रांतापासून डुरंड लाईन म्हणजे अफगाणिस्तानची सरहद्द येथपर्यंतच्या मुलुखांत म्हणजे वझिरिस्तानांत ब्रिटिश राज्यकारभार चालू नाहीं. या प्रदेशाला इंडिपेंडंट टेरिटरी म्हणतात. तेथील लोक अफगाण, तार्तर, तुर्कोमन, इराणी हिंदु, अरब व ज्यू यांची मिळून बनलेली मिश्र जात आहे, व ती मुसलमानधर्मी आहे. वझिरिस्तानची दक्षिणोत्तर लांबी १६० मैल व पूर्वपश्चिम रुंदी ६० मैल आहे. या प्रांताचा पश्चिम भाग डोंगराळ असून त्यांत डूरंड लाईनपासून १५ मैलांवर वाना व लद्धा हीं दोन ब्रिटिश ठाणीं आहेत. पूर्वभागांत बन्नूनजीकचा प्रदेश फार सुपीक असून इतर प्रदेशहि नदीच्या किंवा कालव्याच्या पाण्यामुळें लागवडीस योग्य आहे. तथापि सर्व लोकांनां पुरेल इतकें धान्य पिकणें शक्य नसल्यामुळें हे लोक आसपासच्या प्रदेशांत लुटालूट करतात. या लोकांच्या दरवेशखेल, महसूद, दावर व बन्नी या चार जाती मुख्य आहेत. यांचे आपसांत मिश्रविवाह क्वचित होतात; इतकेंच नव्हे तर त्यांचें एकमेकांशीं शत्रुत्व आहे. १९१९ च्या अफगाण युद्धाच्या वेळीं मात्र या जातींनीं एकजूट बनविली. १९०४ पासून या लोकांमधूनच ३००० मिलीशिया सैन्य ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं तयार करून व चांगल्या वागणुकीबद्दल दंगेधोपे व लुटालूट न करण्याबद्दल इतर लोकांनां भत्ते देऊन या प्रदेशांत शांतता राखण्यांत आली. १९१९ च्या अफगाण युद्धांत हें मिलिशिया सैन्य शत्रूला मिळालें व कर्झनचें धोरण अपायकारक ठरलें. म्हणून १९२३ पासून 'हाफ फॉरवर्ड पॉलिसी' म्हणजे वझिरिस्तानांतील कांहीं महत्त्वाचीं ठाणीं ताब्यांत ठेवणें, तेथपर्यंतच रेल्वे व सडका बांधणें आणि खासदार पद्धतीचें सैन्य ठेवणें. या धोरणामुळें पूर्वीपेक्षां अधिक शांतता लाभली आहे. वझिरिस्तानचा केंद्रीभूत असलेला महसुद लोकांचा प्रदेश ब्रिटिश सत्तेखालीं आणण्याचा प्रयत्न चालू आहे.

अ फ गा णि स्ता न.–या देशाबरोबरचें ब्रिटिश सरकारचें धोरण रशियाच्या हिंदुस्थानावरील स्वारीशीं अफगाणिस्तानचा संबंध कसा आहे या एकाच गोष्टीवर अवलंबून असे. रशियाच्या स्वारीला सीस्तन प्रांत हा मार्ग असल्यामुळें तेथपर्यंत रशियानें रेल्वे बांधीत आणिली. ब्रिटिश सरकारनें हा मार्ग बंद करण्याकरितां बोलन घाटांतून क्वेटापर्यंत व तेथून पुढें खोजाक बोगद्यामधून अफगाण सरहद्दीवरील न्यू चमनपर्यंत रेल्वे बांधून सैन्य नेण्याची सोय केली. शिवाय न्यू चमन येथें, कंदाहारपर्यंत साठ दिवसांत रेल्वे नेतां येईल अशी सामुग्री तयार ठेवली आहे. क्वेटा येथें सर्व प्रकारचें आधुनिक लष्करी साहित्य सज्ज ठेवलें असल्यमुळें या मार्गानें परकीय स्वारी हिंदुस्थानवर होण्याचा मार्ग पूर्ण बंद झाला आहे असें पुष्कळ लष्करी तज्ज्ञांचें मत आहे. दुसरी रेल्वे जमरूदहून खैबर घाटांतून लंडीकोटलपर्यंत नेली आहे. खैबर घाटांतून चांगली लष्करी सडक बांधून लंडीकोटलवरून अफगाण सरहद्दीवरील लंडीपर्यंत नेली आहे. शिवाय पेशावरपासून रेल्वे मुलुगोरी प्रदेशांतून खैबरघाटापर्यंत बांधण्यास सुरवात करण्यांत आली होती पण तें काम पुढें बंद करण्यांत आलें. १९१९ सालीं अफगाण सैन्यानें हिंदुस्थानावर स्वारी केल्यामुळें युद्ध होऊन दहा दिवसांतच अफगाणांचा पराभव झाला आणि तह झाला ( याशिवाय 'अफगाणिस्तान' पहा).

ई शा न्य स र ह द्द.–या सरहद्दीवर उत्तरेच्या बाजूला काश्मीर, नेपाळ, भूतान, सिक्कीम आणि पलीकडे तिबेट हे देश आहेत (१) तिबेटच्या बाजूनें हिंदुस्थानावर रशिया व चीन यांची स्वारी होण्याचा संभव होता तोंपर्यंत तिबेटसंबंधींच्या धोरणाला विशेष महत्त्व होतें.

हल्लीं रशियांत आणि चीनमध्यें फार गोंधळ माजला असल्यामुळें परकी स्वारीची भीति नष्ट झाली असून तिबेटचा लामा इंग्रजांचा पूर्ण दोस्त बनला आहे ('तिबेट' पहा). (२) काश्मीर हें एकच हिंदुस्थानच्या संरक्षणाची जबाबदारी असलेलें सरहद्दीवरील हिंदी संस्थान आहे, व ही जबाबदारी हें संस्थान स्वतःच्या हिंदी सैन्याच्या मदतीनें चांगल्या प्रकारें पार पाडीत आहे. काश्मीरच्या सैन्यांत पायदळाचीं चार रेजिमेंटें व दोन मौंटन बॅटरी आहेत, आणि सैन्यांत डोग्रा जातीचे उत्तम लढवय्ये रजपूत लोक आहेत ('काश्मीर' पहा). (३) नेपाळ हें चीनच्या तिबेटमधून होणाऱ्या स्वारीला अडथळा करण्याचें लष्करी ठाणें असून हल्लींचा दिवाण सर चंद्र समशेर याचा कारभार उत्तम असून त्याचा इंग्लंडशीं दृढ स्नेह आहे. (४) सिक्कीम व भूतान येथील संस्थानिक मोंगोलियन वंशाचे व बौद्धधर्मी आहेत. भूतानला हिंदुस्थानसरकार एक लक्ष रुपये दरसाल खंडणी देतें आणि भूतानसरकारचे परराष्ट्रीय संबंध ब्रिटिश सल्ल्यानुसार ठेवले जावे अशी अट आहे. (५) आसामच्या सरहद्दीवर डफलामिरी, अबोर व मिश्मी या जाती राहतात. अबोर जातीखेरीज इतरांनीं अलीकडे त्रास दिला नाहीं. १९११ मध्यें मिनयोंग अबोरांनी विल्यम्स व डॉ. ग्रेगरसन यांचा खून केल्यामुळें त्यांच्यावर २९०० सैन्य व ४०० लष्करी पोलीस पाठविण्यांत आले. त्यांच्या दोन तीन लहान चकमकी होऊन अबोरांचा पराभव झाला व खुनी इसम ताब्यांत घेतले. या स्वारीचा खर्च २१६०००० रुपये झाला. मिश्मी आणि मिरी या डोंगराळ प्रदेशांतील लोकांनां सुधारण्याचे कांहीं प्रयत्न मिशनऱ्यांनीं केले. मणीपूरच्या उत्तरेस नागसार हे तिबेटी-ब्रह्मी लोक राहतात. (६) ब्रह्मदेशाच्या पूर्व सरहद्दीवर शान संस्थानें आहेत; तेथील वस्ती १३००००० आहे. यांवर वंशपरंपरेनें राज्य करणारे संस्थानिक आहेत. १९०३ मध्यें नॉर्दर्न शान रेल्वे लाशिओपर्यंत सुरू झाली व ती पुढें चीन देशाशीं जोडण्याचा विचार होता परंतु तिकडून फारसा व्यापार चालत नसल्यामुळें तो बेत रहित झाला. दक्षिण शान संस्थानांत रेल्वे झाली आहे. त्याच्या पलीकडे सयामपर्यंत पांच करेणी संस्थानें आहेत. सयामबरोबर ब्रिटिशांचा स्नेह उत्तम आहे.

---

## प्रकरण ७ वें.

## सांपत्तिक स्थिति

### व्यापार, दळणवळण व आर्थिक परिस्थिति.

प्रत्येक राष्ट्रांतील व्यापाराचा इतिहास त्या राष्ट्रांतील समाजाच्या इतिहासाइतकाच प्राचीन असणार. व्यापाराचे दोन प्रकार असतातः अंतर्गत व परराष्ट्रीय. अंतर्गत व्यापार हा नेहमीं चालतोच; तेव्हां त्यावर राष्ट्राची खरी प्रगति अवलंबून असत नाहीं. तर परदेश्य किंवा बहिर्गत व्यापाराच्या विस्तारावरून त्या राज्याची पूर्वी कितपत उन्नति झाली होती हें ठरविण्यांत येतें. हिंदुस्थानांत वेदकालीं किंबहुना वेदपूर्वकालींहि नौकांच्या द्वारें मोठा बहिर्गत व्यापार चालत असे याबद्दल प्रत्यक्षाप्रत्यक्ष पुरावे उपलब्ध आहेत. व्यापारार्थ दूरदूरच्या देशांत पूर्वी जें नौकानयन होत असे त्याचा सुंदर व उद्बोधक इतिहास श्रीयुत राधाकुमुद मुकर्जींनीं आपल्या A History of Ancient Shipping and Maritime Activities from the Earliest Times. (प्राचीन नौकानयनाचा व दर्यावर्दी चळवळींचा इतिहास) या ग्रंथांत दिला आहे, त्याचाच गोषवारा पुढें देत आहों.

**भारतीय नौकानयनाचा इतिहास,** संस्कृत आणि पाली वाङ्मयांतील प्रत्यक्ष पुरावे.—संस्कृत आणि पाली वाङ्मयांत भारतीयांच्या व्यापारार्थ पर्यटणाबद्दल जरी अनेक उल्लेख आढळतात तरी ज्या योगांनीं त्यांनां आंतरराष्ट्रीय दळणवळण शक्य झालें त्या नौकांविषयीं किंवा नौकाबंधनाविषयीं फारच थोडे उल्लेख उपलब्ध आहेत. आतांपर्यंत दुर्मिळ असलेल्या एकाच "युक्तिकल्पतरु" नांवाच्या संस्कृत ग्रंथांत (कलकत्ता ओरिएंटल सीरीजमध्यें हें प्रसिद्ध झालें आहे) प्राचीन हिंदुस्थानांतील नौकाबंधनाच्या कलेविषयीं, नौकांचे निरनिराळे आकार व जाती, त्या बांधण्यास लागणाऱ्या वस्तू वगैरे सविस्तर माहिती दिली आहे. याशिवाय हिंदुस्थानांतल्या प्राचीन धंद्यांविषयीं त्यांत थोडक्यांत सर्व उपलब्ध माहिती आढळते.

प्राचीन काळीं जहाजें बांधणाऱ्यांनां तीं बांधण्यास लागणाऱ्या वस्तू व त्याचप्रमाणें ज्या लांकडापासून जहाजें तयार करावयाचीं त्याच्या जाती व गुणधर्म यांचें चांगलें ज्ञान असे. "वृक्षायुर्वेदांत" लांकडाच्या

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशा चार निरनिराळ्या जाती सांगितल्या आहेत, ब्राह्मण जातीचें लांकूड हलकें व मऊ असून दुसऱ्या कोणत्याहि जातीच्या लांकडाशीं सांधण्याइतकें सुघट असतें, क्षत्रिय लांकूड दृढांग व लघु (हलकें) पण अघट असें असतें, वैश्य जातीचें कोमल (मऊ) व गुरु (जड) असतें. चवथें, शूद्र जातीचें दृढांग व गुरू असें असतें. द्विजाति या जातीच्या लांकडांत दोन निरनिनिराळ्या जातींचे गुणधर्म सांठलेले असतात. 'युक्तिकल्पतरु' ग्रंथाचा कर्ता भोजनृपति—नौकाबंधनासंबंधीं बोलण्याचा अधिकार असलेला आद्य पुरुष—याच्या मतें क्षत्रिय लांकडापासून बनविलेली नौका सुखसंपदा देते. अशाच नौका समुद्रांत खोल पाण्यांत जाऊं शकतात. इतर जातींच्या लांकडापासून केलेल्या नौका कमकुवत असून, फार दिवस टिकत नाहींत. याखेरीज नौका बांधणारांनां भोज हा ऋशी सूचना देतो कीं, समुद्रांतून चालणाऱ्या नौकांच्या बुडांशीं असणारे तक्ते लोखंडानें कधींहि जोडूं नयेत कारण, या लोखंडामुळें लोहचुंबकखडकांकडे त्या आकर्षिल्या जाऊन नाश पावण्याचा संभव असतो.

लांकडाच्या वर्गीकरणाप्रमाणेंच, नौकांचें त्यांच्या आकारानुसार वर्गीकरण केलेलें युक्तिकल्पतरूंत सांपडतें. प्रथम त्यांचे दोन विभाग केले आहेत: (१) सामान्य व (२) विशेष. पहिल्यांत नदीओढ्यांतून जाणाऱ्या नौका व दुसऱ्यांत फक्त समुद्रांत चालणाऱ्या नौकांचा समावेश होतो. सामान्य या विभागांत आणखी दहा जातींच्या, निरनिराळ्या लांबी, रुंदी व उंची किंवा खोलीच्या ज्या नौका येतात त्या येणेंप्रमाणें (लांबी, रुंदी, उंचीचे आंकडे हातांचे आहेत):—

| नांवें | लांबी | रुंदी | उंची |
|---|---|---|---|
| क्षुद्रा | १६ | ४ | ४ |
| मध्यमा | २४ | १२ | ८ |
| भीमा | ४० | २० | २० |
| चपला | ४८ | २४ | २४ |
| पटला | ६४ | ३२ | ३२ |
| भया | ७२ | ३६ | ३६ |
| दीर्घा | ८८ | ४४ | ४४ |
| पत्रपुटा | ९६ | ४८ | ४८ |
| गर्भरा | ११२ | ५६ | ५६ |
| मन्थरा | १२० | ६० | ६० |

या सामान्य जातीच्या नौकांपैकीं भीमा, भया, व गर्भरा या दुर्दैव ओढून आणतात असा समज आहे; याचें कारण कदाचित् त्यांचीं मापें त्यांनां पाण्यावर स्थिर व समतोल राहून देत नसतील.

'विशेष' या विभागाचे आणखी (अ) दीर्घा व (आ) उन्नता असे पोट-विभाग पाडिले आहेत, पहिल्यांत नौकांची लांबी व दुसऱ्यांत त्यांची उंची, ही प्रामुख्यानें नजरेस येतात. प्रत्यक्ष दीर्घा नौकेची लांबी रुंदी अनुक्रमें ४२, ५ १/४, ४ १/५, दीर्घा या पोट—विभागांत नौकांचे दहा प्रकार आहेत ते असे:—

| नांवें | लांबी | रुंदी | उंची |
|---|---|---|---|
| दीर्घिका | ३२ | ४ | ३ १/५ |
| तरणी | ४८ | ६ | ४ ४/५ |
| लोला | ६४ | ८ | ६ २/५ |
| गत्वरा | ८० | १० | ८ |
| गामिनी | ९६ | १२ | ९ ३/५ |
| तरी | ११२ | १४ | ११ १/५ |
| जंघाला | १२८ | १६ | १२ ४/५ |
| प्लाविनी | १४४ | १८ | १४ २/५ |
| धारिणी | १६० | २० | १६ |
| वेगिनी | १७६ | २२ | १७ ३/५ |

या दहा प्रकारच्या दीर्घा नौकांत लोला, गामिनी व प्लाविनी आणि त्या प्रत्येकीच्या शेजारच्या (गत्वरासारख्या) नौका दुःखदायक होतात.

उन्नता पोट विभागाचे पांच प्रकार आहेत ते असे:—

| नांवें | लांबी | रुंदी | उंची |
|---|---|---|---|
| ऊर्ध्वा | ३२ | १६ | १६ |
| अनूर्ध्वा | ४८ | २४ | २४ |
| स्वर्णमुखी | ६४ | ३२ | ३२ |
| गर्भिणी | ८० | ४० | ४० |
| मन्थरा | ९६ | ४८ | ४८ |

या पांच प्रकारांत अनूर्ध्वा, गर्भिणी व मन्थरा दुःखकारक असतात व ऊर्ध्वा राजाला श्रेयस्कर होते.

या नौका प्रवाशांनां विशेष सुखदायी करण्याकरितां त्या शृंगारून त्यांत अनेक सोयी कशा कराव्यात या विषयींहि युक्तिकल्पतरूंत उत्तम माहिती दिलेली आहे. नौकामंडणार्थ सोनें, रुपें, आणि तांबें यांचें मिश्रण वापरावें; चार शिडांच्या नौकांनां पांढरा रंग द्यावा, तीन शिडांच्यांनां पिंवळा व एकशिडाच्या नौकांनां निळा रंग द्यावा असें सांगितलें आहे. नावांच्या मुखांनां सिंह, महिष,

नाग, हत्ती, व्याघ्र, इत्यादि पशू; बदक, पोपट यांसारखे पक्षी; व वेढ्क मनुष्य इत्यादिकांचे चित्रविचित्र आकार देतात; सोन्यामोत्यांच्या माळा या नौकांनां घालण्यांत येतात अशा तऱ्हेचें वर्णन यांत आढळतें.

नौकांवरील खोल्यांचींहि मजेदार वर्णनें आहेत. या खोल्यांच्या ठिकाणावरून व लांबीवरून नौकांचे तीन प्रकार कल्पिले आहेत. 'सर्वमंदिरा' प्रकारांत एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत सर्वत्र मोठमोठ्या खोल्या असतात. राजाचा खजिना, घोडे आणि स्त्रिया नेण्याकरितां या प्रकारच्या नौकांचा उपयोग करतात. 'मध्यमंदिरा' या प्रकारांत खोल्या मध्यभागीं असतात; विलासयात्रेसाठीं राजेलोक यांचा उपयोग करतात. पावसाळ्यांत सुद्धां यांचा उपयोग व्हावा अशी व्यवस्था केलेली असते. तिसऱ्या प्रकारच्या 'अग्रमंदिरा' नौकांत खोल्या नौकांच्या अग्रभागीं असतात. या नौका लांबच्या प्रवासाला व समुद्रावरील लढायांस विशेष उपयोगी पडतात. पण त्या पावसाळ्यानंतर चालतात. याच प्रकारच्या नौकांतून कदाचित तुग्रूनें आपला पुत्र भुज्यु यास एका दूरच्या द्वीपांत राहणाऱ्या शत्रूंवर पाठविलें असावें. या मोहिमेचा शेवट काय झाला हें ऋग्वेदांत (१.११६,३–५) आलेंच आहे. त्याचप्रमाणें पांडव विदुराच्या सल्ल्यानें विदुरानें युद्धसामुग्रीसह तयार करून ठेवलेल्या अशाच नौकेंतून, त्यांच्या नाशार्थ रचिलेल्या व्यूहाचा भेद करून पळून गेले अशी महाभारतांत कथा आहे. रामायणांत अयोध्याकांडांत ज्यांत शंभर शंभर कैवर्तयुवक शत्रूंचा मार्ग अडविण्यासाठीं म्हणून बसविले होते त्या पांचशें नावा 'अग्रमंदिरा'च होत्या. याच नावांच्या साहाय्यानें बंगाली लोकांनीं रघु राजाला एकदां विरोध केल्याचा कालिदासानें आपल्या रघुवंशांत उल्लेख केला आहे.

या वरील संस्कृतवाङ्मयांतील पुराव्यावरून प्राचीन भारतीय नौका व नौकानयन यांच्या अस्तित्वाविषयीं व उच्च कोटीविषयीं जी माहिती मिळते तिला पाली वाङ्मयांतहि चांगला दुजोरा मिळतो. त्यांत संस्कृत वाङ्मयातल्याप्रमाणेंच जलप्रवास व समुद्रावरील व्यापार यासंबंधीं अनेक उल्लेख आढळतात व असें दिसून येतें कीं त्या वेळच्या नावा बऱ्याच मोठ्या आकाराच्या असाव्यात. जरी त्यांत संस्कृत ग्रंथांतल्याप्रमाणें नावांचीं नक्की मापें दिलेलीं नसतात तथापि किती उतारू त्यांत बसत हें दिलें असल्याकारणानें त्यांच्या आकाराविषयीं अंदाज करतां येतो. सातआठशें माणसें मावतील इतक्या या नौका विस्तृत असत. राजवच्छिय, जनक–जातक, बालहस्स–जातक, समुद्द–वनिज–जातक, सांख–जातक, दाठा धातुवंसो वगैरे पाली ग्रंथांतून नौकांविषयीं वर्णनें आलेलीं आहेत.

**भारतीय शिल्पचित्रें व नाणीं यावरून निघणारे प्रत्यक्ष पुरावे.**–वाङ्मयीन पुराव्यांवरून दिलेल्या निकालांनां बळकटी म्हणून इतर जातींचे–विशेषत: चिरस्मरणीय स्वरूपाचे पुरावे पुढें आणतां येतील. प्राचीन भारतीय कालांत हे आपणांस पाहाण्यास सांपडतील. प्राचीन भारतीय नौकानयनावर हे पुरावे जो प्रकाश पाडतात, तो लवकर नाहींसा होण्यासारखा नाहीं, हें आपलें मोठें भाग्य समजलें पाहिजे.

प्राचीन काळांतील लहान–मोठ्या नौकांचीं अनेक चित्रें दिसून येतात. त्यांचें प्रथम अस्तित्व सांची येथील स्तूपांवर दिसून येतें. या स्तूपांवरील शिल्पाचा काळ ख्रिस्तपूर्व २ ऱ्या शतकांतील असावा. साष्टी बेटांतील कान्हेरीच्या लेण्यांत एक जहाज फुटल्याचा देखावा आहे. भारतीय शिल्पांत समुद्रपर्यटणाचा हाच पहिला देखावा असावा. या लेण्याचा काळ इ. स. २ ऱ्या शतकांतील आहे. अजिंठा येथें २ नंबरच्या लेण्यांत नौकांचीं चित्रें बरींच पहावयास सांपडतात. याचा काळ इ. स. ५२५–६५० हा असावा. या काळीं हिंदुस्थानची वाढ होत होती व त्याची संस्कृति आशियाखंडांतील दुसऱ्या भागांत प्रसार पावत होती. याच काळीं समुद्रावरील दळणवळण मोठ्या प्रमाणांत होतें. तेव्हां अजिंठा लेण्यांतील नौकाविषयक चित्रें प्राचीन काळांतील हिंदुस्थानच्या बाह्य व्यापाराचें उत्तम दर्शक होय असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. या नौकांत अग्रमंदिरा, मध्यमंदिरा या जाती आढळतात. विजयानें सिलोनांत पाय ठेवल्यावेळेचा या ठिकाणचा देखावा फार प्रेक्षणीय आहे. जावामध्यें बोरोबुदुरच्या देवळांत जी नौकांची चित्रमालिका आहे ती पाहतां, भारतीय कला जर कोठें शिखराला पोंचलेली असेल तर ती येथेंच–परक्या ठिकाणीं–होय असें वाटतें. ख्रि. शकाच्या पूर्व शतकांत भारतीयांनीं जावामध्यें वसाहत केल्यावेळचे देखावे पाहून त्यावेळची परिस्थिति डोळ्यांसमोर उभी राहाते. या चित्रांत कांहीं नौकांनां शिडें उभारलीं आहेत, कांहीं बुडत आहेत, कांहीं नांगरीत आहेत, कांहींतील लोक मासे धरण्यानें करमणूक करून घेत आहेत वगैरे निरनिराळीं दृश्यें पाहण्यास मिळतात. यांतील नौका एकाच जातीच्या नसून, त्यांत कमीअधिक

सोयी, त्यांचा लहानमोठेपणा, एक किंवा अधिक शिडें अशासारखे भिन्न प्रकार आहेत. त्यावरून या काळांतील नौकांची कल्पना येते.

भारतीय नौकानयनासंबंधीं नाणकशास्त्रीय पुरावेहि बरेच मिळतात. ज्याप्रमाणें भारतीय शिल्पांत आणि चित्रांत नौकांच्या प्रतिमा दिसून येतात, त्याचप्रमाणें कांहीं प्राचीन भारतीय नाण्यांवर मोठीं मजेदार नौकाचित्रें पाहण्यास मिळतात व त्यांवरून नौकानयनांत आपल्या लोकांची किती प्रगति झाली होती हें चांगलें दिसून येतें. उदाहरणार्थ, इ. स. दुसऱ्या आणि तिसऱ्या शतकांतील आंध्र नाण्यांवर मोठ्या आकाराचीं दुशिडांचीं जहाजें काढलेलीं आहेत व तीं आंध्रांच्या समुद्रावरील सत्तेचीं व व्यापाराचीं द्योतक होत. इतिहास सुद्धां या अनुमानाला पाठिंबा देतो. पहिल्या शतकांत आंध्रांच्या काळीं पश्चिम आशिया, ग्रीस, रोम आणि ईजिप्त व त्याचप्रमाणें चीन आणि दुसरे पूर्वप्रदेश यांच्याशीं जलमार्गानें आणि खुष्कीनें मोठा व्यापार चाले. या आंध्र नाण्यांखेरीज कुरुंबार किंवा पल्लव नाणीं जीं सांपडलीं आहेत त्यांच्या मागच्या बाजूस धोणी(डोणी)सारखें दुशिडी जहाज काढलेलें असतें. कुरुंबार लोकांचा मोठा व्यापार चालत असून, त्याच्यांजवळ अनेक जहाजें असत.

अ प्र त्य क्ष पु रा वे, संस्कृत आणि पाली वाङ्मयांत भारतीयांच्या दर्यावरील व्यापारादि चळवळींसंबंधींचे उल्लेखः—प्राचीन भारतीय वाङ्मयांत नौकानयन, नौकांची रचना यासंबंधींचे प्रत्यक्ष पुरावे जरी फारच थोडे आढळून येतात, तथापि दर्यावरील प्रवास, व्यापार आणि आंतरराष्ट्रीय दळणवळण व व्यापार यांचा राजमार्ग म्हणून समुद्राचा नेहमीं होणारा उपयोग, यासंबंधीं अगणित उल्लेख या वाङ्मयांत आहेत; व हे उल्लेख राष्ट्रीय नौकांचें अस्तित्व आणि वाढ हीं दाखविण्यास अप्रत्यक्ष पुराव्यांदाखल चांगले उपयोगी पडतील.

सर्वांत जुना पुरावा ऋग्वेदांत सांपडतो, त्यांत १. २५, ७; ४८, ३; ५६, २; ११६, ३; ७. ८८, ३–४ वगैरे स्थळीं व्यापाराकरितां आणि इतर कारणांकरितां समुद्रपर्यटण केल्याचे उल्लेख आहेत. रामायणांत हिंदुस्थान व इतर दूरचे देश यांच्यामध्यें समुद्रमार्गानें चांगलें दळणवळण चालत असे अशाबद्दलचे अनेक उल्लेख सांपडतात. महाभारतांत राजसूय यज्ञ, अर्जुनदिग्विजय यांच्या वर्णनांत हिंदुस्थानशीं दळणवळण असलेल्या अनेक बाह्य देशांचा उल्लेख आला आहे. तसेंच द्रोणपर्व, कर्णपर्व, शांतिपर्व यांतून नौकानयनाचा उल्लेख सांपडतो. पण महत्त्वाचा उल्लेख म्हणजे आदिपर्वांत विदुरानें तयार करून ठेविलेल्या नौकेंतून पांडव पळून गेल्याचा होय. या महाकाव्यांखेरीज प्रचंड अशा सूत्रवाङ्मयांत याविषयीं खात्री पटविण्यालायक पुरावे सांपडतात. यानंतरच्या स्मृतींतून सुद्धां दर्याव्यापारासंबंधीं उघड उघड उल्लेख आहेत. मनूनें असा व्यापार करणाऱ्या एका विशिष्ट हिंदु जातीचा उल्लेख करून त्यांनां आवश्यक गोष्टी कोणत्या याविषयीं सविस्तर विवरण केलें आहे. बृहत्संहितादि ज्योतिषग्रंथांतून भारतीय नौकानयनाची भरभराट व दर्यावरील व्यापाराची वाढ झालेली निःसंशय दिसून येते. मार्कण्डेय, वराह वगैरे पुराणांतून तर याविषयीं अनेक वर्णनें व गोष्टी आहेत.

वेद, महाकाव्यें, सूत्रें व पुराणें या धार्मिक ग्रंथांखेरीजहि संस्कृत कवींच्या कृतींतून व्यापार, प्रवास व युद्ध यांच्या कामीं समुद्राचा होत असलेला उपयोग अनेक स्थळीं दिसून येतो. उदा. कालिदासाचा रघुवंश आणि शाकुंतल, हर्षाची रत्नावली, दंडीचें दशकुमारचरित, माघाचें शिशुपालवध आणि याखेरीज कथासरित्सागर, हितोपदेश, नीतिशतक, राजतरंगिणी इत्यादि काव्यकथांत नौकानयनाचा उल्लेख आपल्या नजरेस येतो. या संबंधांत आणखी एक गोष्ट सांगावयाची म्हणजे प्राचीन संस्कृत वाङ्मयांत मोतीं आणि त्यांचा व्यापार यांचा अनेक वेळां उल्लेख आलेला आहे. मोत्यांचा व्यापार म्हणजे त्यावेळीं हिंदुस्थानचा एक अति महत्त्वाचा व्यापार असून दक्षिणेस तामिळ प्रदेशांत तो चालत असे. आतां मोठे धाडसी, दर्यावर्दी व खवळलेल्या समुद्रालाहि दाद न देणाऱ्या नौका असल्यावांचून मोतीं काढणें शक्य नव्हतें हें सांगावयास नकोच.

याप्रमाणें प्रत्येक जातीच्या संस्कृत वाङ्मयांत, हिंदुस्थानचा दर्यावरील व्यापार व प्राचीन काळीं समुद्राच्या राजमार्गानें चालणारा आंतरराष्ट्रीय व्यापार यासंबंधीं अनेक पुरावे सांपडतात. बौद्धवाङ्मयांतहि अशाच तऱ्हेचे पुरावे आढळतात. महावंसो व इतर ग्रंथ यांत दिलेल्या विजयाच्या कथांतून दर्या व दर्याव्यापार यासंबंधीं अनेक उल्लेख आहेत. पिटक, जातक यांतील कथा दर्याव्यापार उदीम, प्रवास, व्यापारी लोक, जहाजें बुडणें, नवीन देशांत वसाहत करणें इत्यादि विषयांनीं भरलेल्या आहेत. तेव्हां या ग्रंथरचनाकाळीं दर्याव्यापार मोठ्या प्रमाणांत चालू होता हें निर्विवाद आहे.

भारतीयांच्या समुद्रावरील चळवळींचा इतिहास, मौर्यपूर्वकाल ( ख्रिस्तपूर्व ३२१ पर्यंत ):—आतांपर्यंत आपण ब्राह्मणी व बौद्ध ग्रंथांतून नौकानयन व नौकारचना यांचें अस्तित्व व वाढ प्रत्यक्षाप्रत्यक्षपणें दाखविणाऱ्या दर्याव्यापारासंबंधीं अनेक उल्लेख कसे येतात हें पाहिलें व आतां यापुढें या व्यापारांत घडलेल्या वास्तविक गोष्टी सांगणें अत्यावश्य आहे; व त्याकरितां वाङ्मयीन व पत्राशिलाभिलिखित आणि नाणक असे सर्व तऱ्हेचे भारतीय व बाह्य पुरावे पुढें मांडावयास पाहिजेत.

या सर्व पुराव्यांवरून असें दिसून येइल कीं, सबंध तीस शतकेंपर्यंत हिंदुस्थान व्यापारी जगाच्या अगदीं हृदयस्थानीं होता व त्याचा व्यापारी संबंध फिनिशियन, ज्यु लोक, असुरी लोक, ग्रीक, ईजिप्तमधील लोक आणि रोमन लोक यांच्याशीं अनुक्रमानें प्राचीन काळीं, व तुर्की लोक व्हेनिस मधील लोक, पोर्चुगीज, डच आणि इंग्रज यांच्याशीं अनुक्रमानें अर्वाचीनकाळीं होता हें उघड दिसतें. यूरोप आणि पश्चिम आशिया यांच्याकडून हिंदुस्थानाला मागवावा लागत असलेला माल म्हणजे जस्त, कथील, कांच, अंबर, हत्यारांकरतां पोलाद व लागणारें कांहीं पोंवळीं व औषधीं द्रव्यें व देवापुढें जाळण्याकरितां धूप वगैरे अरबस्तानांतून आणवीत असत. आतां हिंदुस्थानांतून बाहेर जाणारा माल म्हटला म्हणजे लोंकर, गोमेद, शिवधातु, वैडूर्य, हिंग, कस्तुरी, लोंकरी सामान, रंगीत गालिचे इ. पण अतीशय मौल्यवान् निर्गत वस्तु म्हणजे रेशीम. इराणी राष्ट्राच्या अमदानींत रेशीम सोन्याच्या भारंभार विकीत. रेशमाच्या खालोखाल सुती कापड; याशिवाय तेलें, पितळी भांडीं, गूळ (काकवी), मीठ, औषधें रंग आणि सुगंधीं द्रव्यें हे जिन्नस हिंदुस्थान बाह्य देशांनां पाठवी. मिरची, दालचिनी व इतर मसाल्याचे पदार्थ यूरोपला पुरवण्याचा सर्व मक्ता हिंदुस्थानकडेच असे. यामुळें व्यापारी जगांत हिंदुस्थानला महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें होतें; व व्यापारी कांटा त्याच्याकडे जो झुकलेला असे तो बाह्य देशांतील संपत्तीचा त्याला मोबदला देऊन, समतोल करावा लागे. कारण त्याला इतर राष्ट्रांकडून मौल्यवान धातूंखेरीज दुसऱ्या कोणत्याहि वस्तूंची अपेक्षा नसे. यामुळें पुष्कळ शतकेंपर्यंत जगांतील धातुमय संपत्तीचा मोठा निधि हिंदुस्थान असे.

हिंदुस्थानचा दर्याव्यापार ऋग्वेदकालाइतका प्राचीन म्हणतां येईल. ऋग्वेदांत नौकासंपत्ति मिळविण्याकरतां अफाट समुद्रांत प्रवास करणारे व्यापारी यांचा उल्लेख पुष्कळदां आढळतो. हा ऋग्वेदकालीन व्यापार बहुधां खाल्डिया, बाबिलोन आणि ईजिप्त यांच्याशीं चालत असावा; कारण त्या देशांतील अति प्राचीन अवशेषांत हिंदुस्थानांतील सागवानासारखे जिन्नस दिसून येतात. ईजिप्त आणि असुरी पुराणवस्तुसंशोधक या व्यापारासंबंधीं अनेक पुरावे दाखवितात. पण ख्रिस्तपूर्व सातव्या शतकापर्यंत हिंदुस्थान व बाबिलोन यांच्यामध्यें दर्याव्यापार असल्याविषयीं वाङ्मयीन किंवा पुराणवस्तुविषयक पुरावे मुळींच मिळत नाहींत असें कांहींनीं दाखविलें आहे. दुसऱ्या कांहींच्या मतें मनुष्यप्राण्याच्या अतिशय प्राचीन कालापासून हिंदुस्थान व अरबस्तान यांच्यांत दर्याव्यापार चालू होता. सोनें, जवाहीर, हास्तिदंत, नीळ, लांकूड वगैरे जिन्नस हिंदुस्थानांतून बाहेर जात. प्रथम ऋग्वेदांत अस्पष्ट उल्लेखिलेला व नंतर ईजिप्त आणि असुरी प्राचीन वस्तुविषयक पुराव्यांनीं सिद्ध झालेला हा प्राचीन भारतीय दर्याव्यापार बायबलमध्येंहि अनेक स्थळीं सूचित केला आहे असें बऱ्याच तज्ज्ञ लोकांचें मत आहे. जवाहीर, मसाला, हस्तिदंत, वस्त्रें, मोर इत्यादि हिंदुस्थानांतील माल त्यांत स्पष्टपणें निर्देशिला आहे. हिंदुस्थानच्या बाह्य व्यापाराचा बायबलमध्यें स्पष्ट उल्लेख आहे याला आणखी पुरावा म्हणजे जुन्या कराराच्या हिब्रू प्रतींत जुने द्राविडी शब्द आढळले आहेत. सालोमन आणि हिरम राजांच्या कारकीर्दींत दख्खनच्या बंदरांतून उंची मसाल्यानें भरलेलीं जहाजें पॅलेस्टाईन व पश्चिम आशियांतील दुसऱ्या देशांनां जात असत असें दिसतें. हा बायबलकाळांतील हिंदुस्थानचा बाह्य व्यापार झाला. आतां ग्रीक ग्रंथकारांनीं हिंदुस्थानच्या आंतरराष्ट्रीय व्यापाराविषयीं केलेला उल्लेख हिरोडोटस (ख्रिस्तपूर्व ४५०), प्लीनी, टसियस (ख्रिस्त पूर्व ४००) यासारख्यांच्या ग्रंथांत स्पष्टपणें सांपडतो. क्सर्क्सीसच्या लष्करांतील सुती वस्त्रें धारण करणारी भारतीयांची धनुर्धारी तुकडी, झाडापासून तयार होणारी लोंकर, जवाहीर, कुत्रीं, सोनें उकरून काढण्याऱ्या मुंग्यांची गोष्ट वगैरेंचें हिरोडोटसनें वर्णन दिलें आहे. टेसियसच्या "इंडिका"मध्यें एका मसाल्याच्या पदार्थाकरितां द्राविडी शब्द योजिला आहे. शिवाय ब्रह्मदेशांतील तेलाच्या खाणीहि निर्देशिल्या आहेत.

मौर्यकाल ( ख्रिस्तपूर्व ३२१–१८४ ):—या कालाला अलेक्झांडरच्या हिंदुस्थानावरील मोहिमांपासून सुरवात

झाली असें अजमासानें म्हणतां येईल. ॲरियन, कर्टियस, यांसारख्या ग्रीक ग्रंथकारांनीं या मोहिमांचीं जीं वर्णनें लिहिलीं आहेत, त्यांत या काळची हिंदुस्थानची आर्थिक स्थिति चांगली दृष्टीस पडते. जहाजें बांधण्याचा धंदा त्या वेळीं मोठ्या भरभराटींत असून, नदी व समुद्र यांतून मोठ्या प्रमाणांत चालत असलेल्या व्यापारामुळें या धंद्याच्या वाढीला चांगलें उत्तेजन मिळे. अलेक्झांडरला या देश्य जहाजांची मोठीच मदत झाली. सैन्य वाहून नेण्यास अशीं २००० पर्यंत जहाजें त्याच्या दिमतीस असत. हा धंदा त्यावेळच्या मौर्यसरकारच्या हातांत असे. कलाभिज्ञ लोकांत जहाजें बांधणाऱ्यांचा स्वतंत्र वर्ग असून, तो सरकारी नोकरींत असे असें मेग्यास्थिनीसनें लिहिलें आहे. सिंहलद्वीपाच्या वर्णनांत प्लीनीनें असें म्हटलें आहे कीं, हिंदुस्थान व लंका यामधील समुद्रांत चालणारीं जहाजें विशिष्ट प्रकारचीं बांधलेलीं असत; खलाशी ताऱ्यांकडे पाहून आपला मार्ग काढीत नसून जवळ पक्षी बाळगांत व ते मधून मधून सोडून देऊन त्यांच्या गत्यनुरोधानें जमीनीची दिशा ठरवीत. या जुन्या जहाजांची वहनशक्ति साधारणपणें ७९ टन असे, असेंहि तो लिहितो. सम्राट चंद्रगुप्ताच्या युद्धखात्यांतील सहा मंडळांपैकीं एक आरमारी मंडळ असून, त्याचें अस्तित्व व सुव्यवस्था, हीं राष्ट्रांत नौकानयनाची किती वाढ झाली होती हें दर्शवितात. या आरमारी मंडळाबद्दल व आरमारी खात्याबद्दल माहिती समजण्यास आपणांस केवळ मेग्यास्थिनीस याच्या सारख्या परकीयांवर अवलंबून राहावें लागत नसून, यासंबंधाची उत्तम खात्रीलायक माहिती त्याच काळांत झालेल्या कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत सविस्तर मिळते. हा ग्रंथ मोठ्या ऐतिहासिक महत्त्वाचा असून २००० वर्षांहूनहि पूर्वीच्या मौर्यकालीन हिंदुस्थानाच्या विशेष उच्च व विविध संस्कृतीचें हुबेहूब चित्र आपल्या डोळ्यांपुढें उभें करतो. तेव्हां या काळच्या नौकानयनाविषयीं व दर्याव्यापाराविषयीं या ग्रंथांत पाहणें बरें.

आरमारखात्याच्या वरिष्ठाला नावाध्यक्ष असें नांव असे. त्यानें समुद्र, नद्या, सरोवरें, यांतून चालणाऱ्या सर्व नौकांवर देखरेख करावयाची असे. बंदरावरील कर वसूल झाला कीं नाहीं हें त्यानें प्रथम पाहावयाचें असे. या निरनिराळ्या प्रकारच्या बंदरांवरील करांकडे पाहिलें असतां त्या काळीं समुद्रावरील चळवळी कोणत्या प्रकारच्या व दर्जाच्या होत्या हें उघड होतें. समुद्रकांठचीं व नदीकांठचीं गांवें, कोळी लोक, व्यापारी, उतारू वगैरेंनां हे कर भरावे लागत. नावध्यक्षाला द्यावयाच्या या करांखेरीज, दुसरे निरनिराळ्या प्रकारचे नौका-कर असत. उतारू लोक बरोबर जीं जनावरें व जिन्नसा घेत त्या मानानें माफकरूपांत कर द्यावा लागे. गाड्या, ओझ्याचीं जनावरें, व मालाचे गठ्ठे यांवर नौका-कर असे करवसूलीखेरीज नावाध्यक्षाला बंदरासंबंधीं नियमांची अंमलबजावणी करावी लागत असे. हे नियम नौकांनां संकटमुक्त करून त्यांनां लागेल ती मदत देण्यास तत्पर असत. दुसऱ्याची बायको किंवा मुलगी पळविणारा, दुसऱ्याचें धन हरण करणारा, गुन्ह्याचा संशय असलेला मनुष्य, ढोंगी बैरागी वगैरेंनां अडविण्याचा नावध्यक्षाला अधिकार असे तो नियम मोडणारांचें धन किंवा माल जप्त करवीत असे. अधिकारी लोक परकीयांवर बारीक नजर ठेवून त्यांची राहण्याची, खाण्यापिण्याची वगैरे व्यवस्था उत्तम ठेवीत.

या अत्युत्कृष्ट नियमांचें अस्तित्व असें निःसंशय सिद्ध करितें कीं, ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांतील मौर्य साम्राज्याचें परकीय राष्ट्रांशीं सतत दळणवळण असे व बरेचसे परकीय लोक कामानिमित्त मौर्य राजधानीला येत. त्यावेळीं बाह्य व्यापार इतका वाढला होता कीं, नुसती आयात मालावरील जकात घेतल्यास, तें एक मोठें वाढतें उत्पन्नाचें साधन होई. अशोकाच्या कारकीर्दींत तर हिंदुस्थान हें जुन्या जगांतील व्यापाराचें व अध्यात्मज्ञानाचें केंद्र बनलें होतें; व त्याला ही योग्यता प्राप्त होण्याला उत्कृष्ट राष्ट्रीयनौकानयन व दळणवळणाची पद्धत हींच उपयोगी पडलीं असलीं पाहिजेत.

आंध्रकुशानकाल, रोमशीं दळणवळण( ख्रिस्तपूर्व २ रें शतक ते इ. स. ३ रें शतक):—मौर्यकालानंतर दक्षिणेंतील आंध्रांचा आणि उत्तरेकडील कुशानांचा काळ येतो; या काळांतहि मागीलप्रमाणेंच हिंदुस्थानचा बाह्य व्यापार वाढला होता, हें ग्रीक, रोमन व इतर परकीय ग्रंथकारांच्या लेखनांवरून दिसून येतें. इतकेंच नव्हे तर खुद्द हिंदुस्थानांतच याबद्दल नाण्यांचे पुरावे सांपडतात. आंध्रकाल (ख्रिस्तपूर्व २०० ते इ. स. २५०) हा बऱ्याच ऊर्जितावस्थेचा काळ होता. पश्चिम आशिया, ग्रीस, रोम, ईजिप्त व त्याचप्रमाणें चीन आणि दुसरे पूर्वदेश यांच्याशीं जल व स्थल मार्गांनीं दाक्षिणहिंदुस्थानचा मोठा व्यापार चालू होता. रोमला वकीलमंडळें पाठविण्यांत येत; सिरियन युद्धाच्या कामीं

हिंदुस्थानचे हत्ती उपयोगांत आणले होते. दर वर्षी पुष्कळ मसाल्याचे पदार्थ रोमला जात; व इकडे दक्षिण हिंदुस्थानांत रोमन नाणीं असंख्यात येत. इ. स. ६८ मध्यें बरेचसे ज्यू लोक, त्यांनां रोममध्यें बराच जाच होत असल्याकारणानें, मलबार किनाऱ्यावर येऊन राहिले.

इकडे उत्तरेंत कुशानांच्या काळीं हिंदुस्थानवर रोमचा चांगलाच पगडा बसला होता. रेशीम, रत्नें, मसाल्याचे पदार्थ वगैरेंच्या मोबदला रोममधील सुवर्णाचा प्रवाह राजांच्या खजिन्यांत जो येत होता त्याबरोबर रोमन विचार व कलाहि येत होत्या असें म्हणणें वावगें होणार नाहीं. याचा परिणाम भारतीय कलेची एक नवीन गांधारशाखा उत्पन्न होण्यांत झाला व याशिवाय रोमन सुवर्णनाण्यांच्या बरहुकूम उत्तरेंत या राजांचीं नाणीं पाडण्यांत आलीं.

नाण्यांच्या पुराव्यांवरून हिंदुस्थान आणि पश्चिम विशेषत: रोम-यांच्यामधील मोठ्या व्यापाराची वाढ सिद्ध होते. इतकेंच नव्हे तर या व्यापारविषयक चळवळीचें केंद्र दक्षिणेकडे तामिळ प्रांतांत होतें हेंहि दिसून येतें. दक्षिणहिंदुस्थान, मदुरा व कोइमतूर जिल्ह्यांत सांपडलेलीं रोमन नाणीं हीं उत्तरहिंदुस्थानांत सांपडलेल्या नाण्यांपेक्षां संख्येनें जास्त आहेत. पूर्वकिनाऱ्यावर सांपडलेल्या बऱ्याचशा आंध्र नाण्यांवर मोठ्या दुशिडी जहाजाचें जें चित्र पाहाण्यांत येतें त्यावरून आंध्रांचा मोठ्या प्रमाणात असणारा दर्याव्यापार स्पष्टपणें सूचित होतो. हिंदुस्थानचा पाश्चात्त्यांशीं असणारा व्यापार रोमन साम्राज्याच्या उदयापासून तर अतिशयच वाढला. त्यापूर्वी मुख्यत्वेंकरून ईजिप्तशीं व्यापार चाले. हा व्यापार वाढण्याचें एक मोठें कारण म्हणजे हिंदी महासागरांत पावसाळी वारे नियमित असतात असा अजमासें इ. स. ४७ मध्यें लागलेला शोध होय. या शोधानंतर जहाजें थेट मलबार किनाऱ्यावरील मुझिरिस (मुयिरिकोट्टु) बंदरीं येऊं लागलीं. या रोमन व्यापाराकरतां जाणारा माल म्हणजे मुख्यत: मसाल्याचे पदार्थ सुगंधी द्रव्यें, जवाहीर, मोतीं, रेशीम, मलमल व सूत इत्यादि. इसवी सनाच्या पहिल्या दोन शतकांत व्यापारांत पडणाऱ्या रोमन लोकांनीं दक्षिणहिंदुस्थानांत आपल्या वसाहती केल्या होत्या, असें मानण्याला नाण्यांच्या पुराव्याखेरीज दुसरेहि पुरावे सांपडतात. यवन, ज्यांचे मूक, म्लेच्छ असे कांहीं राजरक्षक असत, असें ज्यांचें तामिळ ग्रंथांतरीं वर्णन आढळतें ते युरोपियन (रोमन, ग्रीक इ.) शिपाई असत हें निःसंशय होय. दक्षिणहिंदुस्थानांत या लोकांचे दुसरेहि अवशेष सांपडतात.

याशिवाय संस्कृत, पाली वगैरे देश्य वाङ्मयांत रोमकाचा उल्लेख आढळतो; उदाहरणार्थ, राजसूययज्ञाच्यावेळीं इंद्रप्रस्थास सम्राट युधिष्ठिराकडे रोमन मौल्यवान नजराणे घेऊन आले असें, महाभारतांत (सभा. अध्याय ९१) आलें आहे. पैतामह, वासिष्ठ, सूर्य, पुलिश व रोमकसिद्धांत या पांच प्रख्यात ज्योतिष ग्रंथांत रोमन भिक्षूंमध्यें तुलना केलेली दृष्टीस पडते. परकीय ग्रंथांतून सुद्धां या व्यापारासंबंधीं अनेक पुरावे सांपडतात. पेरिप्लस या उत्कृष्ट ग्रंथांत हिंदुस्थानशीं व्यापार, तेथील व्यापाराचीं ठिकाणें, व्यापारी माल वगैरेचीं चांगली माहिती मिळते. टॉलेमीच्या जिआग्रफीमध्यें सिंधुमुखापासून गंगामुखापर्यंतचा सबंध समुद्रकिनारा वर्णिला आहे. या ग्रंथांतून जुने द्राविडी शब्द पुष्कळसे आढळतात.

यावेळच्या तामिळ वाङ्मयांत दक्षिणहिंदुस्थानांतील कांहीं बंदरांविषयीं सविस्तर व विश्वसनीय अशी माहिती मिळते. यांत विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे या चोल राज्यांतील बंदरांतून चुना व विटा यांनीं बांधलेलीं दीपगृहें असत. या काळांत हिंदुस्थानचा रोमशीं व्यापारी संबंध जसा होता त्याचप्रमाणें राजकीय संबंधहि होता हें तत्कालीन ग्रंथांवरून उघड होतें. हिंदु राजे रोमला वकिलाती पाठवीत अशाबद्दलचे पुरावे आहेत.

उत्तरहिंदुस्थानांतील हिंदु साम्राज्यवर्धनाचा काळ; गुप्त व हर्षवर्धन यांचा काल (इ. स. ४-७ शतक):- हिंदुस्थानचा रोमशीं ज्या शतकांत व्यापारी व राजकीय संबंध होता. त्याच वेळीं इकडे दूरवर पूर्वेकडील देशांशींहि त्याचा व्यापार जोरांत होता. प्राचीन बौद्ध ग्रंथांतून बंगालचा उपसागर आणि हिंदी महासागर यांतून होणाऱ्या सफरी व बंगाल आणि सिंहलद्वीप, मद्रास आणि ब्रह्मदेश यांच्यामध्यें अव्याहत चालणारा व्यापार चांगला प्रतिबिंबित केला आहे. हिंदुस्थानच्या पश्चिम भागांतील लोकांपेक्षां कारोमांडल किनाऱ्यावरील लोकांची मूळापासून प्रख्याति असे. ख्रिस्ती शकाच्या पहिल्या दोन शतकांत कारोमांडल किनाऱ्यावरील बंदरांतून पौरस्त्य व पाश्चिमात्त्य देशांशीं मोठ्या प्रमाणावर व्यापार चाले अशा विषयींचे पुरावे प्राचीन तामिळी वाङ्मयांत व ग्रीक आणि रोमन ग्रंथकारांच्या लेखांत जागजागीं आहेत. चोल आरमारांनीं बंगालचा उपसागर

आणि हिंदी महासागर पालथा घालून गंगा, इरावती या नद्यांच्या मुखांजवळील प्रदेश, मलायीद्वीपसमूह हे आपल्या कक्षेंत आणिले होते. तेलगू राज्यांतील कांहीं लोक पेगूमध्यें येऊन त्यांनीं तो प्रांत बळकाविला व या कारणानें तेथील लोकांनां ब्रह्मी व इतर परकीय लोक पुष्कळ दिवसांपासून तलैंग या नांवानें ओळखीत आहेत.

तामिळी लोकांच्या खालोखाल दर्यावरील चळवळींत भाग घेणारे दुसरे लोक म्हणजे कलिंग देशांतील होत. प्रथम यांचें सिंहलद्वीपाशीं दळणवळण असे पण पुढें त्यांनीं ब्रह्मदेशाशीं वळण बांधलें. पगूत वर हिंदु चिन्हें अललेलीं जीं नाणीं व पदकें सांपडलीं आहेत त्यावरून हा संबंध विशेष व्यक्त होतो. प्राचीन काळीं कलिंगातून आलेल्या लोकांचे 'क्लिंग' नांवानें प्रसिद्ध असलेले वंशज आजहि सिंगापूर येथें आढळतात. तामिळी आणि मद्रासी लोकांनांहि तेथें क्लिंग असें संबोधण्यांत येतें. बौद्ध सत्तेच्या मध्यकालांत म्हणजे पहिल्या पांच सहा शतकांत हिंदुस्थानचा पूर्व किनारा व त्याच्या समोरील बंगालच्या उपसागरापलीकडील किनारा यांच्यांतील दळणवळण अतिशयच वाढलें होतें पण पुढें बौद्धांचा छळ होऊं लागल्यावर त्याला उतरती कळा लागली.

जावांतील वसाहती:—भारतीयांच्या पूर्वेकडील दर्यावरील चळवळींत विशेष महत्त्वाची आणि अभिमानाची गोष्ट म्हणजे त्यांनीं जावांत केलेल्या वसाहती होत. या वसाहत-चळवळीला आणि हिंदुस्थानच्या अभिवृद्धीला प्रथम चेतना कलिंग देशांत मिळाली. कलिंग देशांतून इ. स. ७५ त हिंदूंची एक मोठी टोळी निघून ती जावांत उतरली. तिनें तेथील रहिवाशांत सुधारणा केली व तेथें आपला शक सुरू केला. या गोष्टीला निःसंशय पुरावा म्हणून जावांत अद्यापि अस्तित्वांत असलेले हिंदु अवशेष व इतिहास, राजकीय निबंध व खोदीव लेख याकरतां उपयोगांत आणीत असलेली एक संस्कृतजन्य भाषा हीं मांडितां येतात. गुजराथनेंच प्रथम जावांत वसाहत केली असें म्हणणारा एक पक्ष आहे पण पूर्व किनाऱ्यावर बंगाल, ओरिसा व मच्छलीपट्टण या ठिकाणच्या लोकांनीं सुमात्रा, जावा व कांबोज येथें वसाहती करण्यांत बराच मोठा भाग घेतला होता असें अनेक विद्वानांचें मत आहे. शक व श्वेतहूण यांची सत्ता ऱ्हास पावूं लागल्यावर व ब्राह्मणधर्माचा अंमल उत्तरहिंदुस्थानांत चालू लागल्यावर बरेच लोक जावाकडे फिरले. गुजराथेंतील बंदरांतून श्रीहर्ष आणि त्याचा पिता प्रभाकरवर्धन यांच्या तडाक्यांतून सुटून जाऊं इच्छिणारे अनेक शरणार्थी लोक जावाची समृद्धि ऐकून तिकडे नौकानयन करूं लागले. गुजराथ व इतर देश आणि जावा यांच्यांत बराच व्यापार चाले अशाविषयीं जावांतील बखरींतून बरेच उल्लेख आढळतात. वरील कारणांखेरीज अरब व तुर्क यांच्या सातव्या शतकांतील स्वाऱ्या, मगधापासून बामियनपर्यंत चिनी सैन्याची विजयी मोहीम (इ. स. ६४५ -६५०), बौद्ध राजघराण्याचा ब्राह्मण दिवाणांकडून झालेला नाश यांसारख्या गोष्टींमुळेंहि उत्तर हिंदुस्थानांतील लोक सिंध आणि गुजराथमधील बंदरांतून दक्षिणेकडे एकामागून एक जाऊं लागले असावेत. जावाच्या समृद्धीमुळेंहि हे शक, हूण व गुर्जर लोक तिकडे आकर्षिले गेले असले पाहिजेत. सोनें व जवाहीर याबद्दलची जावाची प्रसिद्धि त्यावेळीं हिंदुस्थानांत बरीच हाती.

बंगाली लोकांच्या दर्यावरील चळवळी:—दर्याव्यापार आणि वसाहत यासंबंधांत प्रमुख भाग घेणारे दुसरे लोक म्हणजे बंगाली लोक होत. ख्रिस्ती शकारंभीच्या शतकांत बंगाली बौद्धांनीं धर्म, युद्धकला व दर्याव्यापार यांत चांगलें प्रावीण्य संपादून मोठी मर्दुमकी गाजविली होती असे आपला इतिहास सांगतो; तेव्हां त्यावर विश्वास ठेवणें भाग आहे. एरवीं बंगाली लोकांसंबंधानें या गोष्टी काल्पनिक वाटणें साहाजिकच आहे. हे लोक बौद्ध धर्माचा प्रसार करण्याकरितां चीन, कोरिया व जपानपर्यंत गेले होते. अतीश, दीपंकर यांसारखे त्यांच्यांतील विद्वान सर्व बौद्धजगांत प्रख्यात आहेत. कांहीं जपानी धर्मग्रंथ बंगाली लिपींत आहेत असा नवीन शोध लागला आहे. जावांतील बुरोबुदुर मंदिरांत जें उत्कृष्ट शिल्प दृग्गोचर होतें तें तयार करण्यांत कलिंग व गुर्जर कारागिरांबरोबर बंगाली शिल्पज्ञहि होतें असें कलाचिकित्सकांचें मत आहे. त्यांत जीं जहाजांचीं चित्रें आहेत त्यासारखीं जहाजें बांधून हे बंगाली लोक सीलोन, जावा, सुमात्रा, चीन आणि जपान या देशांस जात असावेत. महावंसो वगैरे बौद्धग्रंथांतून विजय नांवाचा बंगाली राजपुत्र आपल्या सातशें अनुयायांसह अदमासें ख्रिस्तपूर्व ५५० मध्यें सिलोनला गेला व तेथें त्यानें वसाहत केली असें वर्णन आढळतें. बंगाली वाङ्मयांत देखील त्यांचा दर्याव्यापार आणि इतर चळवळी उल्लेखिल्या आहेत. नावाड्यांची भरती बहुत करून पूर्व बंगालमधून होत असावीसें दिसतें.

'गंगाप्रसाद', 'सागरफेना', 'हंसरव', 'दुर्गावर', 'सिंहमुखी' वगैरे नौकांचीं मजेदार नांवें बंगाली काव्य-ग्रंथांतून आढळतात. बंगालमधील त्या काळचीं मोठमोठीं व्यापारी स्थळें म्हणजे सातगांव, सोनारगांव, चांप किंवा भागलपूर होत. ताम्रलिप्त हें बंदर फार महत्त्वाचें असून पेरिप्लसमध्येंहि त्याचा निर्देश असावा असें वाटतें. हें ठिकाण फार प्राचीन म्हणजे अशोकाच्याहि पूर्वीचें आहे चिनी प्रवाशांनीं हें ठिकाण पाहून याचें वर्णन लिहून ठेविलें आहे. हें स्थळ बौद्धधर्माचें एक केंद्र असून येथें दहा बौद्धमठ होत.

चीनशी दळणवळण:–हिंदुस्थान व चीन यांच्यामधील जलमार्गानें दळणवळण निदान ख्रिस्ती शकाच्या आरंभापासून सुरू झालें असावें. प्रो. लाकूपेरीच्या मतें या गोष्टीला ख्रिस्तपूर्व ६८० पासून सुरुवात झाली. ५ व्या–६ व्या शतकापर्यंत हा व्यापार हिंदूंकडेच होता, कारण तोंपर्यंत चिनी लोक इकडे आले नव्हत. चिनी बखरींप्रमाणें पाहतां ख्रिस्ती शकाच्या १।२ शतकांत हिंदुस्थानांतील राजांकडून चीनच्या दरबारी येणाऱ्या पुष्कळ वकिलाती खंडणीच्या नांवाखालीं व्यापारी माल चीनमध्यें आणीत. आणखी या बखरींवरून असेंहि दिसतें कीं, चीन व सिलोन यांच्या समानराष्ट्रधर्मामुळें जलमार्गानें त्यांचें नित्य दळणवळण होत असे. इ. स. ७३० त रचलेल्या चिनी तिपिटकाच्या काइ–युएन क्याटलॉगांत चीनमध्यें बौद्धधर्माचा प्रसार व धर्मग्रंथांचीं भाषांतरें करणाऱ्या माणसांविषयीं माहिती दिलेली आहे. यापैकीं पुष्कळांनीं हिंदुस्थान–चीनमधील समुद्रप्रवास केलेला होता. शाक्य वंशांतील बुद्धभद्र नांवाचा एक भारतीय इ. स. ३९८ मध्यें चीनमध्यें उतरला. यानंतर दोन वर्षांनीं फाहिआन हा हिंदुस्थानांत जलमार्गानें आला. यांच्यानंतर दक्षिणहिंदुस्थान व चीन यांचा समुद्रपर्यटण करणारे अनेक बुद्धभिक्षू या काइ-युएन क्याटलॉगांत व दुसऱ्या चिनी ग्रंथांत उल्लेखिले आहेत. हिंदुस्थान–सिलोनमधून अनेक भिक्षुणींचे तांडे चिनांत येऊन त्यांनीं तेथें भिक्षुणीसंघ स्थापिले. सहाव्या शतकांत तर हिंदुस्थान व चीन यांमधील समुद्रावरील दळणवळण अतिशयच वाढलें. बोधिधर्म नांवाचा दक्षिण हिंदुस्थानांतील एक राजपुत्र व बौद्ध धर्माचा एक मोठा पुरस्कर्ता इ. स. ५२६ मध्यें आपल्या वृद्धपणीं चीनमध्यें येऊन तेथील धर्मप्रसारक चळवळीला त्यानें विशेष चैतन्य आणिलें. एका वेळीं एका प्रांतांत ३०००० च्या वर भारतीय भिक्षु व १०००० वर भारतीय कुटुंबें आपला राष्ट्रधर्म व कला चीनच्या भूमींत रुजविण्यास उद्युक्त झालीं होतीं (तसाच विभाग १ पृ. २३३ पहा).

पश्चिमकिनाऱ्यावरील समुद्रावरच्या चळवळी:–गुप्तसाम्राज्याच्या अखेरच्या दिवसांत म्हणजे ५ व्या आणि ६ व्या शतकांत पश्चिमेकडेहि भारतीयांच्या समुद्रावरील चळवळी इतर ठिकाणांप्रमाणेंच उघड दिसून येत होत्या. सिंध आणि गुजराथमधील बंदरें आरमारी झटापटींच्या केंद्रांपैकीं होतीं असें दिसतें. या बंदरांतूनच धाडसी भारतीय जावाला वसाहत करण्याकरितां नौकांत बसून निघाले होते. सिलोनशीं व्यापार करणारीं मुख्य ठिकाणें म्हणजे सिंधु किंवा देवल आणि सोरठ किंवा वेरावळ हीं होत असें इ. स. ५२६ त कॉसमसला आढळून आलें. सहाव्या शतकांत श्वेतहूणांनीं हांकलून लाविल्यामुळें सिंध आणि कच्छमधील जाटांनीं बहेरिन आखातांतील द्वीपांत वास्तव्य केलें होतें. श्रीहर्षाच्या कारकीर्दीत सुराष्ट्रांतील लोक व्यापार आणि मालाची देवघेव करून समुद्रावर आपला उदरनिर्वाह करीत असत असें इ. स. ६३० त ह्युएनत्संगनें लिहून ठेविलें आहे. तो पुढें असेंहि म्हणतो कीं, इराणांतील प्रमुख शहरांतून हिंदु लोक आपल्या धर्माप्रमाणें वागून सुखानें राहत असत. मुसुलमानांच्या समुद्रावरील पहिल्या स्वाऱ्यांच्यावेळीं (इ.स.६३०–७७०) जाट लोकच बहुधां प्रेरक शक्ती दाखल होते. सातव्या व आठव्या शतकांत जेव्हां गुजराथेहून जावा आणि कांबोज येथें जलमार्गानें स्थलांतरें झालीं तेव्हां चिनी जहाजें दीव बंदरांत आलीं होतीं; त्यांचे कर्णधार बहुधां जाटच होते. सिंध, कच्छ आणि गुजराथ किनाऱ्यावर समुद्रावर कर्तबगारी दाखविणारे जाटांखेरीज दुसरेहि लोक असत. उदाहरणार्थ, सातव्या आणि आठव्या शतकांत चावडा कुळांतील गुर्जरांनीं जाट लोकांची चांचेगिरी नाहींशी करण्याचा प्रयत्न केला पण पुढें तेच जास्त तापदायक चांचे बनले.

दक्षिणहिंदुस्थानांतील हिंदु साम्राज्यवर्धनाचा काळ (७ व्या शतकाच्या मध्यापासून उत्तरहिंदुस्थानांतील मुसुलमानांच्या विजयापर्यंत) चोलांचा उदय:–गुप्त आणि हर्षवर्धन यांच्या कालासारखाच यांच्यानंतरचा कालहि समुद्रावरील कर्तबगाऱ्या व वसाहतीविषयक चळवळी यांच्यामुळें संस्मरणीय झालेला होता. या कालीं हिंदुस्थानचा आणखी विस्तार झाला. पूर्वसमुद्रांत दर्यावरील चळवळींना जोस्त वाव मिळाली. हिंदुस्थान आणि चीन

यांच्या संबंधाबरोबर जपानशींहि संबंध येऊं लागला. सुवर्णभूमि किंवा ब्रह्मदेशापासून चीनपर्यंतचा सवंध किनारा व त्याचप्रमाणें मलाया द्वीपसमूहांतील द्वीपांचा किनारा वर्धमान भारतीय वसाहतींनीं व नाविक स्थानांनीं गजबजून गेला होता. सुमात्रांतील श्रीभोज, जावांतील कलिंग, बोर्निओंतील महासीन आणि बलि, भोजपर इत्यादि द्वीपें भारतीयांच्या वसाहती असून, त्यांत भारतीय आचारविचारपद्धति, चालीरीति व संस्कृत विद्याहि दृष्टोत्पत्तीस येई असें इ-त्सिंग नांवाचा प्रख्यात चिनी प्रवासी अनुभवानें सांगतो. तसेंच या काळांत हिंदु बौद्ध चीनला व चिनी बौद्ध हिंदुस्थानला येत जात असल्याचे चिनी बखरींतून उल्लेख आहेत. हिंदुधर्मोपदेशक जपानलाहि जाऊन तेथें धर्म व संस्कृत भाषेचा प्रसार करीत असल्याचें जपानी ग्रंथांत दिसून येतें. भारतीयांनीं जपानच्या धर्माचो जशी वाढ केली तशी त्याच्या उद्योगधंद्यांचीहि केली आहे. अकरा शतकांपूर्वी दोघा भारतीयांनीं जपानांत कपासाची कशी माहिती करून दिली याची हकीकत जपानच्या सरकारी बखरींतून दिली आहे.

दहाव्या शतकाच्या अखेरीस व अकराव्या शतकाच्या प्रारंभीं चोल राजांच्या अमदानींत, दाक्षिणहिंदुस्थानांत दर्यावरील चळवळींनां ऊत आला होता. चोल घराण्यांतील पहिला राजा राजराज हा इ. स. ९८५ त गादीवर आला. यानें आपल्या कारकीर्दीत सुरुवातीलाच कंदळूरच्या मार्गांतील चेर आरमार नष्ट केलें व आपल्या २७ वर्षांच्या जयशाली कारकीर्दीला उत्तम आरंभ केला. तो दाक्षिणहिंदुस्थानचा सम्राट बनला व त्यानें बलिष्ठ आरमार बनवून सिंहलद्वीपहि आपल्या ताब्यांत घेतलें. याचा पुत्र पहिला राजेंद्रचोलदेव याच्या वैभवशाली अमदानींत तर चोलांची सत्ता शिखरास पोंचली व त्यांचें साम्राज्य अतिशय विस्तार पावलें. यानें बंगाल, बिहार, ओरिसा व गुजराथ जिंकून गंगेचा किनारा गांठला, सिलोन व दुसरीं शेंकडों बेटें हस्तगत केलीं, जहाजांतून सैन्य पाठवून कदरम(प्राचीन प्रोम किंवा पेगू)च्या राजाला बंदीवान केलें, अशा तऱ्हेचें त्याच्या शिलालेखांतून वर्णन आढळतें. तेव्हां यावरून असें दिसून येतें कीं, चोलांची समुद्रावरील सत्ता अतिशयच वाढली होती. ब्रह्मदेशाच्या किनाऱ्यावरहि हिचा प्रभाव दिसून येत होता. चोल साम्राटांच्या दर्यावरील चळवळी बंगालच्या उपसागरांतच केवळ चालू होत्या असें नसून चीनपर्यंत पूर्वेकडील देशांशींहि यांचा संबंध दिसून येतो. संगशिह या चिनी ग्रंथांत, चीनला वकीलाती पाठविणाऱ्या दोन चोल राजांचीं नांवें आलीं आहेत.

मुसुलमानी युग—मोंगलपूर्वकाल (११ वें शतक—१९ वें शतक):—या कालखंडांत, मुसलमानांचें हिंदुस्थानांत आगमन व त्यांचे विजय यानंतरच्या कालांतील भारतीय नौकानयनाचा इतिहास संक्षेपानें देण्यांत येईल.

सिंधच्या इतिहासांत—त्यांतल्यात्यांत हा प्रदेश अरबांनीं पादाक्रांत केल्याच्या इतिहासांत—भारतीयांच्या नाविक चळवळींचीं व पराक्रमांचीं अनेक उदाहरणें सांपडतात. निझामुद्दीन अहमदच्या तबकत—इ—अकबरी ग्रंथावरून पाहतां अकराव्या शतकांत सुलतान महंमदनें जाट लोकांवर स्वारी केली व त्यांचा नाश केला. या चकमकींत सुलतानच्या बाजूस मोठीं बलिष्ठ १४०० जहाजें व जाटांकडे ४००० जहाजें होतीं असें वर्णन आहे. ११ व्या शतकांतील भारतीयांच्या दर्यावरील चळवळींचें मजेदार वर्णन अल्बेरूणीनें दिलेलें आहे. पश्चिम किनाऱ्यावर उपद्रव देणाऱ्या बवरी नांवाच्या चांचे लोकांचा त्यानें उल्लेख केला आहे. बैर संज्ञक नौकांतून हे लोक हल्ले चढवीत असत म्हणून त्यांनां बवरी असें नांव आहे. गुजराथच्या किनाऱ्यावर बराच व्यापार चाले. तेथून माळव्यांतून येणारी साखर, मासे, आणि बैल जहाजांतून सर्व देशांनां व शहरांनां रवाना होत. त्या काळीं मलबारसुद्धां हिंदुस्थानची किल्ली होती. माणीक, मोतीं, सुगंधी द्रव्यें, गवत इत्यादि त्याठिकाणीं होणारे जिन्नस इराक, खोरासान, सिरिया, रूम आणि यूरोप येथें पाठविण्यांत येत असत. ही एक मोठी उतारपेठच होती. चीन, मचीन, हिंद आणि सिंध येथून अनेक प्रकारचा निवडक माल व कापड भरून जहाजें येत. १२ व्या शतकांत सिंध आणि दुसऱ्या देशांतील जहाजें उतरण्याकरितां देवल नांवाचें एक बंदर अल्—इद्रिसीला आढळलें. भडोच हेंहि एक दुसरें बंदर होतें. या बंदरांत चीन, उमान, सिंध वगैरे देशांहून माल भरून जहाजें येत. कारोमांडलचें कापड, मलबारचे वेलदोडे आणि मन्सुराचीं लिंबें यांचा त्यानें उल्लेख केला आहे. गुप्त (इ. स. ३१९—५००) आणि श्वेतहूण (इ. स. ५००—५८०) यांचीं नाणीं मादागास्कर व मलाया द्वीपसमूह यांतून १२ व्या शतकांत चालू होतीं व जावाच्या व्यापाऱ्यांनां मादागास्कर येथील लोकांची भाषा समजत असे. यावरून या काळीं जलमार्गानें हिंदुस्थानचा केवढा व्यापार चाले हें कळून येणार आहे.

तेराव्या शतकांतली एक महत्त्वाची आरमारी मोहीम म्हणजे घियासुद्दीन बल्बन (इ. स. १२६६-८६) यानें बंगालचा सुभेदार तुघ्रिलखान याच्यावर केलेली होय. दमास्कसचा अबुल फेदा व मार्कोपोलो हे परदेशांतील प्रवाशी या शतकाच्या अखेरीस हिंदुस्थानांत आले. अबुल फेदा (इ. स. १२७३-१३३१) यानें मलबारची मिरची व कारोमांडलचें सुंदर कापड यांचा उल्लेख केला आहे. कारोमांडल किनाऱ्यावर मोतीं काढण्याचा मोठा व्यापार होता व गुजराथच्या किनाऱ्यावर मोठी धाडसाची चांचेगिरी चालू असे, असें मार्कोपोलो यास इ. स. १२९२ मध्यें आढळलें. सोकोत्रा हिंदुचांच्यांच्या आधीन झाले व त्यांच्या जवळचा लुबाडलेला माल तेथ विक्रीला येई. कैल ( तिनेवेल्ली जिल्ह्यांमधील कायल ), कोइलम, ठाणा, खंबायत, एडन या बंदरांचा मार्कोपोलो नामनिर्देश करून त्यांच्या व्यापाराचें वर्णन करतो. त्यानें भारतीय नौकांविषयीं जें मजेदार व महत्त्वाचें वर्णन लिहून ठेविलें आहे, तें पाहाण्याजोगें आहे. नौकाबंधनाच्या सविस्तर माहितीखेरीज त्यांचे आकार, स्वरूप, जोडकामाचीं साधनें व दुरुस्त करण्याची पद्धत याविषयींहि त्यानें लिहिलें आहे. ज्यांनां ३०० नावाडी लागतील इतक्या मोठ्या आकाराचीं जहाजें त्यानें पाहिलीं होतीं. मोठ्या जहाजांना बहुतेक एक नौकापृष्ठ असे व त्याच्या खालीं लहान लहान साठ खोल्या असत; व दर खोलींत एका व्यापाऱ्याची राहण्याची सोय असे. याखेरीज गलबतांतल्या माल साठविण्याच्या जागेंत जाड फळ्यांच्या तेरा खोल्या केलेल्या असत. या खोल्यामुळें जर कदाचित् जहाजाला भोंक पडून पाणी आंत येऊं लागलें तर तें एका खोलींतून दुसरींत जाऊं शकत नसे व त्यामुळें त्यांतील माल दुसऱ्या खोलींत सुरक्षित राहत असे. मलबारवरील मोतीं काढण्याच्या धंद्याचेंहि त्यानें सुंदर वर्णन दिलें आहे.

चौदाव्या शतकांत फ्रायर ओडोरिक ( इसवी सन १३२१ ) यानें हिंदीमहासागरांतील आपल्या प्रवासाचें जें वृत्त लिहिलें आहे त्यावरून गुजराथच्या रजपूत खलाशांच्या अंगीं असणारी योग्यता व नाविक कौशल्य चांगलें दृष्टोत्पत्तीस येतें. सोमनाथ आणि चीन यांमध्यें प्रवास करणाऱ्या रजपूत जहाजांचा याहूनहि प्राचीन उल्लेख यूलच्या कॅथेमध्यें आहे. प्रख्यात अरबी प्रवासी इब्न बतुता हा याच शतकांत हिंदुस्थानांत होता. मलबारी लोकांची चांचेगिरी आणि समुद्रव्यवसायाबद्दलच्या मार्कोपोलोच्या विधानाला यानेंहि दुजोरा दिला आहे. याच शतकांत वसफ् हा परदशांतून मलबारांत येणाऱ्या इराणी व अरबी घोड्यांविषयीं उल्लेख करतो. अबू बकरच्या कारकीर्दींत ही आयात घोड्यांची संख्या दरसाल १०००० असे. हा घोड्यांचा व्यापार मार्कोपोलोनेंहि पाहिला होता. परदेशांतून घोडे आणण्यांत देशाच्या उत्पन्नाचा पुष्कळसा भाग खर्च होई असें त्यानें म्हटलें आहे. इ. स. १३७२ मध्यें सुलतान फिरोझशहा तघलखनें ९०००० घोडेस्वार व ४८० हत्ती असलेलें आपलें सैन्य ५००० होड्यांतून थट्टा येथें स्वारीकरितां नेलें. इसवी सन १३८८ मध्यें तैमूरनें दोन दिवसांत नावांचा पूल बांधून सिंधूनद ओलांडिला. गंगानदीवर त्याला अनेक जलयुद्धें करावीं लागलीं.

मार्कोपोलोनंतर हिंदुस्थानासंबंधीं परकीयांनीं लिहिलेली महत्त्वाची माहिती म्हणजे महुयत या मुसुलमानी चिनी मनुष्यानें लिहून ठेविलेली होय. १५ व्या शतकाच्या आरंभीं यानें हिंदुस्थान व इतर प्रदेश यांच्या सफरी केल्या. कालिकत ( इ. स. १४०९ ) ही मोठी व्यापारी पेठ असलेली त्याला आढळून आली. या शतकांत बंगाल व चीन यांच्यामध्यें मोठा दर्याव्यापार व दळणवळण असे. या कालीं बंगालमध्यें चालू असलेल्या चांदीच्या नाण्याला टुंगकिया म्हणत. कालिकत बंदराविषयीं अबू-अर रझाक् (इ. स. १४४२) नें फारच मजेदार व विस्तृत माहिती दिली आहे. हें बंदर जगांतील नौकानयनाच्या केंद्रांपैकीं एक होतें. येथून मक्केला मिरीं भरून नेहमीं जहाजें जात. १५ व्या शतकाच्या पूर्वार्धांतील दुसरा प्रवासी निकोलो कॉंटी यानें भारतीय नौकानयन व व्यापार यासंबंधीं चांगली माहिती दिली आहे. हिंदुस्थानवासी लोक आमच्यापेक्षां मोठीं जहाजें बांधतात अशी त्यानें कबुली दिली आहे. दक्षिणेकडील हिंदी व्यापारी इतके श्रीमंत असतात कीं, प्रत्येकीं १५००० सोन्याचीं नाणीं किंमत पडेल इतक्या भारी किंमतीच्या स्वतःच्या चाळीस जहाजांतून ते आपला व्यापार करतील, अशा तऱ्हेचें यानें केलेलें आश्चर्यकारक विधान मननीय आहे.

याखेरीज १५ व्या आणि १६ व्या शतकांतील दुसऱ्या अशा गोष्टी आहेत कीं, भारतीयांच्या दर्यावरील चळवळींपैकीं बहुतेक पश्चिम किनाऱ्यावरच्या आहेत असें त्यावरून दिसून येईल. पोर्तुगीजांच्या आगमनापर्यंत (इ.स.१५००-१५०८) अमदाबादचे सुलतान

सागरसम्राट होते. इसवी सन १४९३–१४६९ या कालांत विशालगडच्या राजानें आपली सत्ता समुद्रावर बसवून मुसुलमानांच्या व्यापारास तो अडथळा करीत असे. वास्को दि गामाला इ. स. १४९८ मध्यें पूर्व-आफ्रिकेंत, खंबायत व हिंदुस्थानांतील दुसरे भाग येथून आलेले खलाशी आढळले. ते दक्षिणोत्तरकडील ताऱ्यांच्या मदतीनें व नाविक यंत्रांचा उपयोग करून सुरक्षित प्रवास करीत. इ. स. १५०८ मध्ये चौल बंदरापासून कांहीं अंतरावर पोर्तुगीजांचा नाश करण्याकरितां गुजराथचें आरमार ईजिप्तच्या आरमाराला मिळालें; आणि १५२१ त गुजराथ राजाच्या आरमाराधिपतीनें पोर्तुगीजांचा चौलजवळ पराभव करून एक जहाज बुडविलें. यानंतर पोर्तुगीजांशीं बऱ्याच आरमारी लढाया झाल्या. या काळांत पश्चिमकिनाऱ्यावरील मोठया व्यापारी पेठा म्हणजे चौल व दाभोळ. इराण व तांबडया समुद्राच्या मार्गानें यूरोप यांच्याशीं येथून मोठा व्यापार चालत असे. वसईहून लांकूड मक्केला जाई. अगाशी येथें लांकडाचा मोठा व्यापार होता असें पोर्तुगीज बखरकारांनीं लिहिलें आहे. तांबडया समुद्रांत कप्तान सारिसनें अडविलेलें एक दाभोळचें जहाज, नाळपासून सुकाणूपर्यंत १५३ फूट लांब, ४२ फूट रुंद, ३१ फूट उंच आणि १२०० टन वहनशक्तीचें होतें; त्याचें मुख्य शीड १०८ फूट आणि आडवी काठी (परवाण) १३२ फूट होती. त्याकाळचीं (१६११) इंग्रज लोकांचीं जहजें फार तर ३०० किंवा ३५० फूट असत.

सोळाव्या शतकांत कालिकतहि मोठें नौकानयनाचें केंद्र बनलें होतें. वर्थेम या परदेशी प्रवाश्यानें येथील नौकानयनाची विस्तृत माहिती दिली आहे. नौकांचे भाग, त्यांनां लागणारी सामुग्री, त्यांचीं नांवें, आणि नौकानयनाच्या वेळा हीं सर्व त्यानें वर्णिलीं आहेत.

अकबराची कारकीर्द.—अकबराच्या पूर्वीच्या नाविक चळवळीविषयीं फारशी माहिती नाहीं. बाबरच्या दोन लढाया मात्र आढळतात. इ. स. १५२८ मध्यें कनोजजवळ गंगेवर नौकायुद्ध करून, त्यानें शत्रूचीं तीस–चाळीस जहाजें हस्तगत केलीं. दुसरी गोग्रा नदीवरील लढाई होय. हींत खरिदच्या सैन्यानें १००–१५० जहाजें जमवून बाबरला तोंड दिलें.

अकबराच्या कारकीर्दींत भारतीय नौकानयनाला व नौकाबंधनाला—विशेषतः बंगाल्यांत—चांगला पाठिंबा मिळाला .ऐने–ई–अकबरींत यासंबंधीं भरपूर माहिती आहे. अकबरानें आरमारी खात्याच्या व्यवस्थेसाठीं मोठया श्रमानें चांगले कार्यक्षम नियम घालून दिले होते. या खात्याकडे चार कामें असत : पहिलें काम, नौकानयनासाठीं लहान-मोठ्या नौकांच्या पुरवठयाकडे लक्ष देणें व नौकाबंधनावर देखरेख ठेवणें; दुसरें, हुषार नाविकांनां नोकरींत घेणें; प्रत्येक जहाजावर बारा प्रकारचे अधिकारी व त्यांच्या हाताखालचे लोक असत. आरमारी खात्याकडे असलेलें तिसरें महत्त्वाचें काम म्हणजे नद्यांच्या तीरावर राखण करणें. याकरितां एक हुशार मनुष्य नेमीत; तरीसंबंधाची प्रत्येक गोष्ट तो ठरवी, त्यांच्या वहनशक्तीचें नियमन करी आणि थोडया आगाऊ सूचनेनंतर प्रवाश्यांनां तरी देण्याची व्यवस्था करी. चवथें काम कर लादणें, वसूल करणें, व सूट देणें हें होय. अकबराच्या साम्राज्यांतील प्रत्येक भाग नौकांनीं गजबजलेला असे; नौकाबंधनाचीं प्रमुख केंद्रें म्हणजे बंगाल, काश्मीर आणि ठठ्ठा हीं होत.

बंगालमधील नौकानयनाच्या वाढीची साग्र माहिती 'औसिल तूमर जुम्मा' नांवाच्या इ. स. १५८२ त राजा तोडरमल्लानें केलेल्या बंगालच्या जमाबंदीच्या ठोकताळ्यावरून मिळेल. बादशाही नौवरा(आरमारा)करतां कांहीं परगणे तोडून दिले होते. जहागीरदारांनांहि बादशहाकरतां जहाजें पदरीं बाळगावीं लागत. बादशाही आरमार बहुधां डाक्का येथें असे; व तेथून तें मग व इतर परदेशी चांचे यांच्या पीडेपासून बंगालच्या किनाऱ्याचें संरक्षण करी. बादशाही नौवर बांधण्याची सामुग्री सिलहट येथून येई. या ठिकाणीं नौकाबंधनास लागणारें लांकूड मुबलक असे. आराकानच्या राज्यांतील सन्द्वीप येथून फिरंगी व मग आरमारें येत. सेसरी डि फेड्रिसी नांवाचा व्हेनेशियन प्रवाशी १५६५ सालीं आपल्या लेखांत असें विधान करतो कीं, हिंदुस्थानच्या या भागांत नौकाबंधनाची सामुग्री इतकी मोठी होती कीं, कान्स्टँटिनोपलच्या सुलतानास आपलीं जहाजें अलेक्झांड्रिया येथून बांधवून आणण्यापेक्षां या ठिकाणाहूनच आणावीणें स्वस्त पडत असे.

लढाऊ नौकांखेरीज बादशहा, सुमेदार आणि श्रीमंत लोक यांच्यासाठीं केलिनौका असत. त्यांनां त्यांच्या अग्रभागावरील चित्रांवरून, 'मोरपंखी', 'मगरचेर' अशा प्रकारचीं गांवें दिलेलीं असत. नौकेंत बसून सफर करणें हा त्यावेळीं नबाबांप्रमाणेंच श्रीमंत लोकांचाहि सामान्य व आवडता असा खेळ असे.

बंगालच्या जोडीला सिंधप्रांतहि भारतीय नौकानयनाचें एक प्रमुख केंद्र होतें. अबुल-फजलच्या माहितीवरून, एकट्या ठट्टा सरकारांत ४०,००० जहाजें भाड्यानें देण्यासारखीं होतीं. सिंधु नदीच्या कांठीं लहोरी बंदर अतिशय महत्त्वाचें असे व तेथील बंदर नियमांचें विस्तृत वर्णन तारीख-इ-ताहिरीमध्यें चांगलें दिलें आहे.

आतां अकबराच्या कारकीर्दीतील कांहीं नौकायुद्धांकडे वळूं. इ. स. १५८० त बादशहानें राजा तोडरमल्ल याला १००० नौकांनिशीं गुजराथची वसुली करण्यास पाठविलें. १५७४ त बंगाल-बिहारवरील मोहिमेंत, अकबर स्वतः आरमार सिद्ध करून पाटणा येथें गेला होता. राजा मानसिंग बंगालचा सुभेदार असतांना पूर्वबंगाल्यांत नाविक चळवळीचा झालेला स्फोट विशेष लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे. शिवाय, मोंगलसरकार डाक्का येथें नौवर (आरमार) तयार करण्यांत गुंतलें असतां कांहीं स्वतंत्र हिंदु जमीनदार हळू हळू गुप्त रीतीनें स्वतःच्या आरमाराची व्यवस्था करीत होते, याविषयीं पुरावे आढळतात. या हिंदु नाविक चळवळीचीं मुख्य केंद्रें, श्रीपुर, बक्ल किंवा चंद्रद्वीप आणि चंडिकान (सौगोरद्वीप) हीं होत. श्रीपुरचा अधिपति केदारराय हा असून त्याच्याजवळ पुष्कळशा लढाऊ नौका तयार असत. यानें बरेच पराक्रम करून, आराकानच्या राजाला व मानसिंगालाहि नौकायुद्धांत जर्जर केलें. बक्ल हें नाविक शक्तीचें दुसरें महत्त्वाचें केंद्र असून रामचंद्रराय नांवाच्या जमीनदाराच्या ताब्यांत होतें. यानें जेसोरच्या प्रतापादित्याच्या हातावर तुरी दिल्या. कीर्तिनारायण नांवाच्या याच्या मुलानेंहि मोठी कर्तबगारी गाजवून मेघना नदीच्या मुखाजवळील फिरंग्यांची वसाहत मोडून टाकली. डाक्काचा नवाब देखील याची मैत्री करूं चहात होता.

त्यावेळीं बंगालमध्यें हिंदूंचें समुद्रावरील सत्तेचें अतिशय महत्त्वाचें स्थान म्हणजे चंडिकान किंवा सौगोर द्वीप होय. जेसोरच्या प्रतापादित्याच्या विधायक बुद्धीचें हें फळ होतें. या ठिकाणीं अनेक लढाऊ नौका लढाईच्या तयारींत अक्षय असत. धुघली जहाज-घाट, व चकश्री या ठिकाकीं प्रतापादित्याचे नौका बांधण्याचे कारखाने व गोबा असत.

याकाळीं बंगालच्या दर्यावरील चळवळीला केवळ युद्धांतच वाव मिळाली असें नव्हे, तर शांतताकाळच्या सौम्य कलांनांहि त्यानें प्रोत्साहन दिलेलें आहे. १६ व्या शतकांत बंगाल पाहून गेलेल्या परदेशी लखेकांनीं व प्रवाशांनीं दर्याव्यापारामुळें या प्रांतांत वाहून येणारी अलोट संपत्ति व येथील बंदरांचें माहात्म्य व ऐश्वर्य मोठ्या गौरवानें उल्लेखिलें आहे. या प्रांतांत विपुल धान्य, सर्व प्रकारचें मांस, खंडोगणती साखर, आणि कापडाचे गठ्ठेच्यागठ्ठे असलेले या प्रवाशांनीं पाहिले आहेत. हिंदुस्थानांत सर्वांत श्रेष्ठ प्रतीचें कापड सोनारगांव येथें तयार होई. हिंदुस्थान, सिलोन, पेगू, मलाक्का, सुमात्रा आणि दुसरे देश येथून कापड व तांदूळ नेत. सातगांव हें बंगालमधील दुसरें मोठें वाणिज्यस्थान होतें. बंगाल मिठाच्या व्यापाराकरतांहि प्रसिद्ध होतें. संद्वीप येथून प्रति वर्षी मिठानें भरलेल्या ३०० नौका बाहेर जात.

बंगालमधील या काळचें अतिशय महत्त्वाचें व्यापारी केंद्र म्हणजे गौर शहर होय. याचें वर्णन अनेक परदेशी प्रवाशांनीं केलें आहे. हें चोहोंबाजूंनीं नद्यांनीं वेष्टिल्यामुळें, येथें साहजिकपणें नौकाबंधन व दर्यावरील चळवळ विशेष जोमांत असे. हें दोन लाख वस्तीचें शहर होतें. येथून दरसाल सुती व रेशमी कापड भरून ५० जहाजें परदेशीं जात.

अकबरपासून औरंगझेबापर्यंतः—अकबराच्या कारकीर्दीतील भारतीय नौकानयनाची व नौकाबंधनाची वाढ त्याच्या मृत्यूनंतरहि पुढें चालू राहिली. इ. स. १६०५ मध्यें बंगालचा सुभेदार इस्लामखान यानें राजधानीचें ठिकाण राजमहालहून डाक्का येथें हलविलें व अफगाण आणि मग यांचे हल्ले परतविण्याकरितां आरमार व तोफखाना वाढविला. जहांगीरच्या कारकीर्दींत मग चांचे लोक लुटीकरितां डाक्का येथें येत व वस्तुतः सबंध बंगाल ते आपली जहागीर समजत असें एक तत्कालीन इतिहासकार म्हणतो. अकबराच्या अखेरच्या दिवसांत व पुढेंहि शहाजहानच्या कारकीर्दींत पूर्वबंगालच्या सरहद्दीवरील टोळ्या मोंगल राज्याला फार पीडा देत असत. हा प्रदेश कुचबिहार आणि आसाम यांच्या हद्दींत असे. इ. स. १५९६ मध्यें कुचबिहारचा राजा लछमी( लक्ष्मी )नारायण यावर सरकारी मोहीम निघाली होती. राजाच्या सैन्यांत ४००० घोडदळ, २००००० पायदळ, ७०० हत्ती आणि १००० जहाजांचें आरमार होतें. इ. स. १६०० त कुच हा जोचा राजा परीचत याच्या आरमाराला तोंड देण्याकरितां ५०० जहाजांचें बादशाही आरमार पाठविण्यांत आलें होतें. या

सुभ्याच्या दक्षिणभागावर मगांचे हल्ले सुरू होतेच. या वेळीं या सुभ्याची जमाबंदी मगापासून किनाऱ्यांचें संरक्षण करण्याकरितां दिलेल्या जहागिऱ्यांतच बहुतेक गडप होई आणि सरकारी उत्पन्न इतकें खालावलें होतें कीं, फिदाईखानाला बंगालची सुभेदारी बादशाहाला दरसाल दहा लाख रुपये देण्याच्या अटीवर मिळाली. बंगालच्या आरमाराचा ऱ्हास आणि मग व फिरंगी यांची वाढती सत्ता वरील स्थिति ज्यास्त निकृष्ट करण्यास कारणीभूत झाली. इ. स. १६३९ मध्यें राजपुत्र सुजा सुभेदार झाल्यावर तर त्याच्या हलगर्जीपणामुळें व त्याच्या नोकरांच्या बलात्कारामुळें व जुलुमामुळें आरमाराकरतां दिलेल्या परगण्यांचा नाश झाला व नाविक अधिकारी व लोक दारिद्र्यग्रस्त झाले.

औरंगझेबाच्या कारकीर्दींत जेव्हां इ. स. १६६० मध्यें मीरजुमला बंगालचा सुभेदार झाला तेव्हां त्यानें आरमाराच्या तनख्याकरितां १४ लाख रुपयांची नेमणूक करून दिली. त्यानें आसाम व कुचबिहारवर सैन्य व आरमार घेऊन चाल केली व त्यांचा पाडाव केला. आसामी मोहिमेंत शत्रूंचीं ३००।४०० लढाऊ जहाजें काबीज केलीं. आसामी लोकांनीं एक हजारांवर मोठीं मोठीं जहाजें जाळिलीं. बादशाही आरमारांत ज्या जातींचीं एकंदर ३२३ जहाजें होतीं त्यांची नांवें व संख्या पुढीलप्रमाणें:—कोसह(१९९), जलवह(४८), घराब(१०), परिंदह (७), वज्र (४), सल्ब (२), पटिलह(५०), पटिल (१), भर (१), बलम (२), ऱ्हटगिरि (१०), महालगिरि (९), पल्वर व इतर (२४),

पण हा विजय मीरजुमल्यास मानवला नाहीं, कारण लवकरच भयंकर रोग पसरून पुष्कळसें सैन्य, नाविक अधिकारी लोक, व स्वत: मीरजुमला मृत्युमुखीं पडला. मीरजुमल्याच्या मृत्यूमुळें बंगाली आरमार पार मोडलें व याचा फायदा घेऊन १६६४ च्या आरंभीं चांचे लोक डाक्क्याला येऊन त्यांनीं या बादशाही आरमाराचा अवशेष लढविणारा जो मुनवरखान नांवाचा नावाध्यक्ष होता त्याचा पराभव केला. इ. स. १६६४ त शाहिस्तेखान सुभेदारीवर आल्यावर त्यानें चांचेगिरीचा नायनाट करण्याकरितां नवीन आरमार बांधण्याकडे सर्व लक्ष पुरविलें. त्यावेळचीं नौकाबंधनाचीं प्रमुख ठिकाणें म्हणजे हुगळी, बालेश्वर, मुरंग, चिलमरी, जेसोर व करिबरी हीं होत. या सर्व ठिकाणांहून त्यानें जहाजें बांधून मागविलीं व त्याकरतां लागणारी सर्व सामुग्री जमा केली, अधिकारी नेमले, परगणे व जहागिऱ्या तोडून दिल्या व अशा रीतीनें अखंड परिश्रम करून थोड्या अवधींत सर्व साधनांनीं परिपूर्ण अशीं ३०० जहाजें जय्यत तयार ठेविलीं. यानंतर फिरंगी व आराकानीं लोकांशीं लढाई देऊन त्यांचा पूर्ण मोड केला व त्यांचीं बरीच जहाजें हस्तगत केलीं.

औरंगझेबाच्या काळीं बंगालखेरीज हिंदुस्थानच्या दुसऱ्या भागांतहि भारतीय नौकानयनाची व दर्याव्यापाराची वाढ झालेली स्पष्ट दिसून येते. कारोमांडल किनाऱ्यावरचें मोठें व्यापारी बंदर म्हणजे मच्छलीपट्टण होतें. तेथील व्यापाराचा व वड्या वड्या व्यापाऱ्यांचा उल्लेख थॉमस बौरेसारख्या प्रवाशांनीं केलेला आहे. येथून खासगी जहाजें माल भरून आराकान, पेगू, तेनासेरीम, केदा, मलाक्का, मोका, इराण व मालदीव बेटें या ठिकाणीं जात असत, असें त्यांनीं लिहिलें आहे.

गोवळकोंड्याच्या राजाजवळ व्यापारी आरमार असे. त्याचीं अनेक जहाजें दरसाल आकारान, तेनासेरीभ व सीलोन येथें स्वत:करितां व आपल्या सरदारांकरितां हत्ती खरेदी करण्यास जात. मच्छलीपट्टणापासून उत्तरेकडे ४२ मैल असणारें नरसापूर हें ठिकाणहि नौकानयनाचें एक महत्त्वाचें केंद्र होतें. येथें लांकूड पुष्कळ असून, नौका बनविणें व दुरुस्त करणें हींहि कामें चांगलीं होत. मदपोलममध्यें नौकाबंधनाचें काम मोठ्या प्रमाणावर होत असून, पुष्कळ इंग्रज व्यापाऱ्यांचीं जहाजें या ठिकाणीं तयार केलीं जात; शिवाय सर्व तऱ्हेचें लोखंडी सामना येथील राहिवासी करून देत. येथील कारागिर जगांतील दुसऱ्या कोणत्याहि भागांतील कारागिरांपेक्षां कमी प्रतीचे मुळींच नव्हते. नबाब शाहिस्तेखानानें व्यापारी वर्गावर देशाच्या संरक्षणार्थ आरमार बांधण्यासाठीं एक प्रकारची 'जहाजपट्टी' बसविली होती. असें थॉमस बौरे हा म्हणतो. नबाबाचीं व्यापारीं जहाजें दरसा डाक्का, बल्सोर आणि पिप्ली येथून सीलोन, तेनासेरीम, मालदीव बेटें वगैरे देशांत माल घेऊन जात व तेथून हत्ती, कवड्या, काथ्या वगैरे जिन्नस आणीत. मसूल, कतमरन, पटेल, ओलोको, बुझगरू, पुर्गू, बूर इत्यादि जातींचीं जहाजें जीं बांधण्यांत येत त्याविषयीं सविस्तर वर्णन बौरेनें दिलें आहे.

औरंगझेबाच्या काळीं पश्चिम किनाऱ्यावरहि महत्त्वाचीं व्यापारी ठिकाणें होतीं. सुरतेस औरंगझेबाचीं चार जहाजें यात्रेकरूंस मक्केला मोफत नेण्यासाठीं म्हणून

नेहमीं तयार असत, असें डॉ. फ्रायर लिहितो. यांखेरीज सुरतेस इतर लोकांचींहि सार्धी लढाऊ जहाजें दृष्टीस पडत. या किनाऱ्यावरहि चांच्यांचा बराच उपद्रव असे. एव्हेरी नामक इंग्रज चांच्यानें अबदुल गफूर या व्यापाऱ्याचें संपत्तीनें भरलेलें एक जहाज, तसेंच औरंगझेब बादशहाचें सुरतेस असणारें 'गंज-सुवै-इ' नांवाचें प्रचंड जहाज त्यावरील ९२ लाख रुपये किमतीच्या मालासह लुटलें व इतर बरीच पुंडाई केली.

मराठी काल:-याच काळांत शिवाजीनें नौकाबंधनाच्या धंद्याला उदार आश्रय दिल्यानें भारतीय नौकानयन व दर्याव्यापार यांनां मोठें प्रोत्साहन मिळालें. मराठी सत्तेच्या वाढीबरोबर त्याच्या प्रचंड आरमाराचीहि वाढ होत होती. विजयदुर्ग, कुलाबा, सिंधुदुर्ग, रत्नागिरी, अंजनवेल आणि इतर बंदरांत गोद्या बांधण्यांत आल्या. या ठिकाणीं लढाऊ जहाजेंहि बांधिलीं जात. इ. स. १६९८ मध्यें कान्होजी आंग्रे याला दर्यासारंग ही पदवी देऊन आरमाराधिकारी करण्यांत आलें. आंग्र्याच्या कारकीर्दीसारखी मोठया पराक्रमाची व कर्तबगारीची कारकीर्द भारतीयांच्या दर्यावरील चळवळींच्या बखरींत क्वचित एखादीदुसरीच दृष्टी पडेल. याच्या देखरेखीखालीं मराठ्यांची आरमारी सत्ता शिखरास पोंचली. मुंबईसरकारास आंग्र्यांचा पाडाव करण्यास अर्धशतक झगडावें लागलें होतें. यांचा वचक इंग्रज व इतर फिरंग्यांवर असे. कान्होजी आंग्रे १७२९ मध्यें वारल्यावर त्याचा पुत्र संभाजी यानें बापासारखाच पराक्रम करून फिरंग्यांनां जेरीस आणलें. याच्यानंतर तुळोजीनें वडील व भाऊ यांचा कित्ता गिरविला. कच्छपासून कोचीनपर्यंत याचीं जहाजें फिरत व लूट मिळवीत. याचें पेशव्यांशीं वैमनस्य आल्याकारणानें पेशवे व इंग्रज एकत्र होऊन इ. स. १७५६ त त्यांनीं विजयदुर्गावर हल्ला केला व आंग्र्यांचें बलिष्ठ आरमार व त्यांची समुद्रावरील सत्ता कायमची नाहींशी करून टाकिली. आंग्र्यांच्या नाशाबरोबर मराठ्यांची दर्यावरील सत्ताहि लोपली.

शत्रूंच्या लढाऊ किंवा व्यापारी जहाजांवर हल्ला करणारें आंग्र्यांचें मुख्य आरमार म्हणजे आठ किंवा दहा गराब आणि चाळीस किंवा पन्नास गालिवात यांचा समूह होय. गराबांनां दोन शिडांपेक्षां जास्त शिडें नसत. हीं लांबीपेक्षां रुंदच जास्त असत. यांवर नऊ किंवा बारा पौंड गोळे फेंकणाऱ्या दोन तोफा असत. गालिवात वल्हवून नेण्याच्या मोठया होड्या असत. यांचें वजन सत्तर पौंडांपर्यंत असे. यांत चाळीस किंवा पन्नास वल्हीं असत व यांचा वेग तासी चार मैलांपर्यंत असे. यावर दोन किंवा चार पौंड गोळा फेंकणाऱ्या सहा किंवा आठ तोफा असत.

औरंगझेबाचा काल:-मोंगलसाम्राज्याच्या ऱ्हासानंतर भारतीय नौकानयनाला इंग्रजांकडून प्रोत्साहन मिळालें. अजमासें दोन अडीच शतकेंपर्यंत ब्रिटिश हिंदुस्थानानें चांगल्या प्रतिष्ठित आकाराचें व विलक्षण सामर्थ्यवान् असें आरमार आपल्या पदरीं ठेविलें होतें ही गोष्ट पुष्कळांनां माहीत नसावीसें दिसतें. या आरमारांचा इतिहास अनेक उज्वल पराक्रमांनीं व उपयुक्त कार्यांनीं कसा रचलेला आहे हें त्या काळचें इंग्रजी दप्तर पाहिल्यास कळून येईल. मुंबईच्या आरमाराची विशेष कीर्ति आहे.त्याचा इतिहास १६१२ त उघडला. त्यावर्षी सुरत येथें पोर्तुगीज व इतर चांचे यांपासून संरक्षण करण्याकरितां एक काफिला बांधला; १६१५ मध्यें येथील आरमारीखातें कायम केलें. १७ व्या शतकापर्यंत याचा बराच विस्तार झाला. पुढें येथील पसारा मुंबईस नेण्यांत येऊन, मुंबईचें आरमार बरेंच वाढविलें. येथून पुढें विख्यात पारशी जहाज बांधणाऱ्यांचा (नौकाशिल्पज्ञांचा) भारतीय वरिष्ठ आरमारी खात्याशीं संबंध येतो. लौजी नासरंजी नांवाचा सुरतेच्या जहाजांच्या कारखान्यांतील फोरमन हा कारखान्याबरोबर सुरतेहून मुंबईस गेला. या कारखान्याचा इतिहास म्हणजे एका बुद्धिमान पारशी कुळाच्या उदयाचा इतिहासच होईल. १७५७ त हा कारखाना वाढविला. १७७१ मध्यें लौजीनें आपले फ्रामजी मतशेखजी व जमशेटजी बोमनजी नांवाचे दोन नातू या कारखान्यांत नोकरीस ठेवले. १७७४ त लौजी वारल्यावर त्याचे नातू उदयास आले. त्यांनीं मुंबई आरमार व बादशाही आरमार याकरितां आपल्या देखरेखीखालीं चांगलीं जहाजें बांधविलीं. इ.स. १८०२ मध्यें राजाच्या आरमारी खात्यास कांहीं लढाऊ जहाजें बांधवावयाचीं होतीं व त्याकरितां एका युरोपियन शिल्पज्ञाची नेमणूक करण्याचा विचार होता. पण नाविकाध्यक्षांनां जमशेटजीची कीर्ति माहीत असल्यानें त्याच्याकडेच हें काम सोपविण्यांत आलें. हीं जहाजें सर्वोत्कृष्ट ठरल्यावर याची कीर्ति इंग्लंडभर पसरली. इ. स. १७३६ पासून १८३७ पर्यंत खालील पारशी गृहस्थ एकामागून एक मुंबईच्या सरकारी डॉकयार्ड(गोदी)मध्यें वरिष्ठ जहाजबांधणी अंमलदार होते:-लौजी (१७३६-१७७४),

मनशेखजी व बोमनजी (१७७४–१७८३), फ्रामजी व जमशेटजी (१७९३–१८०५), जमशेटजी आणि रतनजी (१८०५–१८११), जमशेटजी व नौरोजी (१८११–१८२१), नौरोजी व कर्सेटजी (१८२१–१८३७).

या पारशी नौकाशिल्पज्ञांच्या अंमलाखालीं या डॉकयार्डची कार्यक्षमता इतकी वाढली कीं, अशा तऱ्हेचें डॉकयार्ड यूरोपखंडांत कोठेंहि आढळणार नाहीं असें लेफ्टनंट लो आपल्या ग्रंथांत स्पष्ट म्हणतो. मुंबईस नौकाबंधनाला बऱ्याच नैसर्गिक साधनांची अनुकूलता असे. मलबार आणि गुजराथ यांच्या अरण्यांच्या मध्यभागीं ही वस्ती असल्यानें प्रत्येक समुद्रमार्गें वायुप्रवाहाबरोबर येथें लांकडाचा पुरवठा होई. शिवाय मुंबईचीं सागवानी लांकडाचीं जहाजें इंग्लंडच्या ओकच्या जहाजांपेक्षां फार उच्च दर्जाचीं असत. ग्रेटब्रिटनच्या आरमारांतील प्रत्येक जहाज १२ वर्षांनीं टाकाऊ होई तर मुंबईचीं सागवानी लांकडाचीं जहाजें ५० वर्षें व अधिकहि टिकत असें लेफ्टनंट कर्नल वॉकरनें १८११ मध्यें लिहून ठेविलें आहे. मुंबईस बांधिलेलीं जहाजें इंग्लंडच्या गोद्यांतून बांधविलेल्या जहाजांपेक्षां चौपटीनें स्वस्त पडतात असें याचें मत होतें.

ईस्ट इंडिया कंपनीनें बंगाली आरमार बांधण्यालाहि चांगली मदत केली होती. इ. स. १८०१–१८२१ पर्यंत (दोनहि वर्षें धरून) हुगळी नदीवर १०५६९३ टनांचीं २३७ जहाजें बांधण्यांत आलीं. प्रत्येक टनाला सरासरी २०० रुपये खर्च पडला असें धरल्यास सर्व खर्च दोन कोटी रुपयांपेक्षां जास्त होतो. यांतील बराचसा पैसा एतद्देशीय कारागीर व मजूर यांच्या पगारांत खर्च झाला व त्यायोगें देशाचा बराच फायदा झाला असें जॉन फिप्स म्हणतो.

याप्रमाणें ईस्ट इंडिया कंपनीच्या प्रयत्नांनीं निर्माण झालेलें व बांधिलें गेलेलें हें भारतीय आरमार पहिल्या व दुसऱ्या ब्रह्मी युद्धांत आणि पहिल्या चिनी युद्धांत चांगलें उपयोगी पडलें. इराणी आखात, तांबडा समुद्र आणि पूर्व आफ्रिकेचा किनारा यांसारख्या परकीय समुद्रांतहि यानें कामगिरी केली आहे. भारतीय व्यापाऱ्यांनीं दूरच्या देशांशीं चालविलेल्या धंद्यांस याचें बरेंच संरक्षण व मदत होती.

१८४० च्या नंतर भारतीय आरमाराला उतरती कळा लागली. या सालाच्या पुढें एकहि मोठें जहाज बांधिलें गेलें नाहीं. १८६३ च्या एप्रिल महिन्यांत हिंदुस्थानचा कारभार ब्रिटिश सरकारच्या हातीं गेल्यावर या आरमाराला कायमची रजा देण्यांत आली. याशिवाय 'आरमार' लेखांतील (शरीरखंड वि. ८) भारतीय आरमार पहा.

हिंदुस्थानच्या परकीय देशांशीं होणाऱ्या व्यापाराविषयीं अनेक परकीय प्रवाशांनीं वर्णनें लिहून ठेवलीं आहेत. पुढें दिलेल्या पेरिप्लुस या ग्रंथाच्या कर्त्यानें दिलेल्या माहितीवरून हिंदुस्थानांतून यूरोपमधील वगैरे पश्चिम देशांत कोणकोणते जिन्नस जात आणि कोणतीं व्यापारांचीं ठिकाणें होतीं याची थोडीशी कल्पना येईल.

**हिंदुस्थानचे व्यापाराचे मार्ग**—(१) हिंदुस्थानच्या पूर्वेकडील थिना (सिनाई) येथून रेशिम कच्चें आणि पक्कें, तसेंच रेशमी कपड हे जिन्नस बॅक्ट्रियामधून बरुगझ बंदराकडे खुष्कीच्या मार्गानें अथवा गंगामार्गानें लिमुरिके म्हणजे तामिळ देशांत आणिले जात असत. (२) कमर (कावेरीपट्टम्), पोदोके (पांदिचेरी किंवा पुलिकत?) यांचा व्यापार लिमुरिकेशीं व तसाच गंगा आणि ख्रुसे या प्रदेशांशीं होता. येथें ईजिप्तमधील मालाची आयात होऊन लिमुरिके म्हणजे तामिळ प्रदेशांतल्या मालाची निर्गत होत असे. (३) ईजिप्तपासून थेट तामिळ प्रांतांतील मौझिरिस(मुयिरी)पर्यंत जलमार्गानें. (५) पैठण, तगर (जुन्नर) या मार्गानें दक्षिणेकडील प्रांताचा, व उज्जनीच्या मार्गानें उत्तरेकडील प्रांताचा व्यापार पश्चिम हिंदुस्थानांतील मुख्य बंदर बरुगझ (भडोच) याच्याशीं चालत असे. (६) परदेशांतील जहाजें अरबस्तानांतील मौझा, डिओडोरस (पेरिम), युडाइमान (एडन), कने, डिऑसकोरिडिस (सोकोत्रा; संस्कृत द्वीप सुखाधार), ओमानच्या आखातांतील मोसच (सध्यांचे ऑसेरा), इराणी आखातांतील बसरा व युफ्रेटीस नदी यांच्यामधील आपोलोगास, सिंधुनदीच्या प्रांतांतील बरबेरिका व मिनागर, (इरिनान म्हणजे कच्छचें रण), त्यानंतर बरुगझ (भडोच) येथें येत. पश्चिम हिंदुस्थानांतील सर्वांत महत्त्वाचें हें बंदर होय. येथून पुढें कोंकणपट्टीतील लहान बंदरें सोडून तामिळ प्रांतांतील मुख्य बंदर नेलकुंद (बहुधां त्रावणकोरमधील कनेट्टी आणि कोलम यांच्यामध्यें असलेलें) येथें जात. (इं. अँ. पु. ८).

**हिंदुस्थानांतील व्यापाराचीं ठिकाणें**,—पूर्वेकडील प्रदेशः—(१) थिना शहरः—कच्चें आणि पक्कें रेशीम आणि रेशमी कापड; (२) गंगा नदीः—विडयाचीं पानें, जटामांवसी, मोतीं, उत्तमोत्तम मलमल; (३) ख्रुसे

(मलाक्का?):-शिंपा, सर्वोत्कृष्ट कांसवाच्या पाठी; (४) मसालिया (संस्कृत मौसल):-मलमल; (५) दिसरीनी प्रांत (ब्राह्मणी नदीजवळील):-हत्ती; (५) पलैसिमौदन (संस्कृत ताम्रपर्णी-सिलोन बेट):-मोतीं, पारदर्शक मौल्यवान खडे, मलमल, कांसवाच्या पाठी वगैरे.

दक्षिणेकडील प्रदेश:-(७)कमर (कावेरीपट्टम्); (८) पोदौके पुलिकात(पांदिचेरी);(९)सूपत्म(संस्कृत सू-पत्न). या तीन ठिकाणचे व्यापारी पडावांतून किनाऱ्याकिनाऱ्यानें लिमुरिके(तामिळ)पर्यंत जात व तसेंच गंगा व क्रुसेपर्यंत जात. (१०) नेलकुंद(हें त्रावणकोरमधील कनेट्टी व कोलम् यांच्यामध्यें असावें); याचा संबंध बकरे(सध्याचें मरकरी) या नदीमुखाजवळील खेडेगांवाशीं होता. हें दक्षिणेकडील मुख्य बंदर, यांत व्यापाराचे जिन्नस बहुतेक सर्व होते; (११) मौझिरिस (मुयिरी)येथें अरिकके व ईजिप्तकडील जहाजें थेट येत; (१२) नौरा (होनावर असून तामिळ प्रांतांत); (१३) तुंदिस (तुंडी तामिळ प्रांतांत).

पश्चिमेकडील प्रदेश:-लहान बंदरें (स्थानिक व्यापाराच्या जागा); (१४) अकबरान; (१५) सौप्पर (वसईजवळील सूपारा); (१६) कल्लिएन (कल्याण); (१७) सौमुल्ल (चौल); (१८) मंदगोर (राजापूर); (१९) पलैपत्मै (बाणकोट?); (२०)मेलिझिगर(जयगड?); (२१) बुझंटिअन (विजयदुर्ग अथवा यशवंत गड);(२२) तोपरन (देवगड); (२३) तुरनस बोअस (बंदा अथवा तिरकल नदी अथवा अर्चरे); (२४) अगिडिआइ (गोआ), (२५) कैनिताई (सेंट जार्ज बेट); या सर्व किनाऱ्यावर चांचेगिरी होती. (२६) सर्वांत महत्त्वाचें व्यापारी बंदर बरुगझ (भडोच); (२७) ओझिनी (उज्जैन)शहर; याचा व्यापार बरुगझशीं चालत होता; (२८) पैठण; (२९) तगर (जुन्नर); पैठण व तगर यांचाहि बरुगझशीं व्यापार चालू होता. (३०) मिनागर सुराष्ट्राची राजधानी (इंदुराजवळ) याचा व्यापार बरुगझशीं चालत होता; (३१) सिंधुप्रांतांतील बरबरिके; हेंहि एक मोठें बंदर होतें. (३२) सिंधु प्रांतांतील मिनागर (ठठ्ठा, बक्कर अथवा मनसुर); [ इं. अँ. पु. ८ पृ. ११८-९१ ].

आतां पोर्तुगीज, डच, इंग्रज, यांसारख्या परकीय लोकांनीं हिंदुस्थानशीं व्यापारी दळणवळण कसें ठेविलें होतें व त्यांत कोणाची सरशी कशी झाली याविषयीं थोडें विवेचन करूं.

## हिंदुस्थानचा परदेशाशीं व्यापाराविषयींचा इतिहास,

प्रा ची न द ळ ण व ळ ण.-भरतभूमीचें दळणवळण मुख्यतः पश्चिम राष्ट्रांशीं होत असे. या दळणवळणाचे तीन मार्ग असत: (१) सिंधु नदीपासून हिंदुकुशपर्यंत आणि आक्सस नदी आणि तेथून काळासमुद्र अथवा कास्पियन समुद्र. (२) दुसरा मार्ग खिस्तपूर्व सातव्या शतकांत आढळला. त्या मार्गानें हिंदुस्थानचे व्यापारी प्रथमतः जलमार्गानें इराणच्या आखातांत जाऊन नंतर खुष्कीनें मेसोपोटेमियांतून सीरिया व तेथून ईजिप्तमध्यें जात. (३) तिसरा मार्ग खुष्कीनें तांबड्या समुद्रांतून भूमध्यसमुद्रामध्यें. हा तिसरा मार्ग इ. स. ४७ त सांपडला. हिंदुस्थानचा त्यावेळचा बाहेर जाणारा माल म्हणजे मसाला, जडजवाहीर, मलमल, कापसाचीं वस्त्रें आणि ह्या मालाच्या मोबदला हिंदुस्थानांत सोनें, चांदी, पितळ अथवा तांबें, कथील, शिसें, पोंवळीं आण कापड येत असे. सरासरी त्यावेळेला हिंदुस्थानांत बाहेरचा पैसा ४५८००० पौंडांइतका येत असे.

म ध्य का ल.-पूर्वीच्या उत्तरेकडील मार्गाला महत्त्व नसलें तरी त्यानें चीन आणि यूरोप हे देश जोडले गेले असल्यामुळें व यूरोपांतील धर्मयुद्धाच्या वेळीं सीरियाकडील रस्ता बंद झाल्यामुळें त्याला फार महत्त्व आलें होतें. हा व्यापार तुर्क लोकांनीं १४५३ त कान्स्टांटिनोपल घेईतोंपर्यंत जिनोव्हाच्या व्यापाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं असून बायझंटाईन मालाला किफायतीची बाब होती. तुर्कांच्या प्रामुख्यानंतर तो बंद पडूं लागला. अरब लोकांच्या ताब्यांतील जो सीरियाकडील लमाणी व्यापार. तोहि मोंगलांच्या उदयानंतर नष्टप्राय होऊं लागला आणि व्हेनिसच्या व्यापाऱ्यांच्या हातांतील मध्यसमुद्राचा मार्ग तुर्क लोकांनीं १६ व्या शतकाच्या प्रारंभीं ईजिप्त घेतलें त्यावेळेला तुर्कांच्या हातांत आला आणि यामुळें यूरोपीयांस व्यापारी मार्ग निराळा शोधण्याखेरीज गत्यंतर नव्हतें.

पोर्तुगीज:-पंधरावें शतकभर प्रयत्न करतां करतां पोर्तुगीज लोकांपैकीं वास्को ड गामा हा आफ्रिकेच्या किनाऱ्यानें १४९८ त कालिकत येथें येऊन पोंचला. आणि मलबार किनाऱ्यावरील बंदरांत, सीलोन अथवा मलाक्काचे व्यापारी आणि इराणचें आखात किंवा तांबडासमुद्र यांतून येणारे व्यापारी यांच्या गांठी पडत असत असें त्याला दिसून आलें. अरब लोकांचा सर्व व्यापार पोर्तुगीज लोकांनीं आपल्या ताब्यांत जबरदस्तीनें घेऊन निरनिराळ्या ठिकाणीं वखारी स्थापून

त्यांत संरक्षणार्थ सैन्यें आणून ठेवलीं. इराणच्या आखातांत ओर्मझ् येथें एक किल्ला बांधला; गोव्यामुळें मलबार किनाऱ्यावरील मिरीं आणि सुंठ ह्यांचा व्यापार हस्तगत झाला आणि मलाक्का घेतल्यामुळें अगदीं पूर्वेकडील मसाल्याचा व्यापार पोर्तुगीजांच्या हस्तगत झाला. हे पोर्तुगीज लोक मसाला, जवाहीर, औषधें, रंग, उटणीं कलाकौशल्याच्या वस्तू, आणि कच्चा माल हीं बाहेर पाठवून त्याच्या मोबदला रुपें देत व लोंकरीचें कापड, तागाचें कापड, मखमल, भांडीं, लोखंडी सामान, कांच वगैरे जिन्नस आणीत असत.

डच आणि इंग्रजः—पोर्तुगीज लोकांनां पोपच्या आज्ञापत्रानें हिंदुस्थानच्या व्यापाराचा कुलमक्ता मिळाल्यामुळें अँन्टवर्प हें व्यापाराचें केंद्र होऊन बसलें. वायव्येकडील किंवा ईशान्येकडील मार्ग न सांपडल्यामुळें दुसरीं यूरोपियन राष्ट्रेंहि या व्यापारांत हात घालूं पहात होतीं, आणि त्याच वेळेस म्हणजे १५८० त स्पेन आणि पोर्तुगाल ह्यांचें ऐक्य होऊन अँन्टवर्पचा नाश होऊन यूरोपांतील प्रॉटेस्टंट आणि कॅथोलिक राष्ट्रांचा बेबनाव निकरावर येऊन ठेपला. लेव्हांटकडे व्यापार करणाऱ्या इंग्रजी मंडळाला १५८१ मध्यें सनद मिळून १५९३ त हिंदुस्थानबरोबर खुष्कीनें व्यापार करण्याचा अधिकार प्राप्त झाला. १५९५ आणि १६०१ ह्याच्या दरम्यान १५ डच तार्फे हिंदुस्थानांत आले. आणि हा त्यांचा व्यापार बुडविण्याकरितां १६०० मध्यें पहिली ईस्टइंडिया कंपनी स्थापन झाली. पहिल्यानें ह्या कंपनीचा व्यापार मसाल्याच्या बेटांशींच असे. परंतु मागाहून सुरत येथें आल्यानंतर तें त्यांचें हिंदुस्थानांत मुख्य ठिकाण झालें.

सतरावें आणि अठरावें शतकः—सतराव्या शतकाच्या सुमारास पोर्तुगीज लोकांनीं चांचेगिरीचा धंदा उचलल्यामुळें त्यांनां ह्या व्यापारांतून पळ काढावा लागला. आणि नंतर डच आणि इंग्रज यांच्यांत मसाल्याच्या बेटांत झटापटी होऊन इंग्रजांस मसाल्याचीं बेटें सोडावीं लागलीं. तरी पण त्यांनीं हिंदुस्थानांतील आपला पाय पक्का केला. पूर्वकिनाऱ्यावर आणि बंगाल्यांत वखारी स्थापन झाल्या आणि सर्व प्रकारच्या अडचणींतून पार पडून त्यांनीं व्यापाराला ऊर्जितावस्था आणून दिली.

जरी हिंदुस्थानचा नौकागत व्यापार पुष्कळ वाढला आहे तरी सतराव्या शतकांतहि तो विशेष कमी होता असें समजूं नये. हल्लीं तो एकट्या पाश्चात्त्यांच्याच हातांत असल्यामुळें व हिशेबाच्या वगैरे सोयीमुळें तो पुष्कळसा वाटतो तथापि त्या वेळीं एकंदर जगाचा बहुतेक व्यापार हिंदुस्थानाशींच चालू होता. बहुतेक राष्ट्रें आपापल्या जहाजांतून हिंदुस्थानाशीं व्यापार करीत. त्या वेळीं मोठमोठे नामांकित व्यापारी व पेढीवाले हिंदुस्थानांत होते. पैशाची किंमत आजच्यापेक्षां त्या वेळीं तिप्पट होती. ह्या सर्व गोष्टी घ्यानांत घेतल्या म्हणजे त्या काळच्या व्यापाराची कल्पना होईल. सन १८०४ त होळकरांबरोबर लढत असतां इंग्रजांस पैशांची जरूर लागली. तेव्हां अर्जुनजी नाथजी त्रिवेदी नामक सुरतेच्या एका व्यापाऱ्यानें त्यांस बत्तीस लाख रुपयांची रक्कम उसनवार म्हणून सहज काढून दिली. व्होज व्होरा म्हणून शिवाजीच्या वेळेस सुरतेस एक व्यापारी होता, त्याच्या इतका धनसंपन्न इसम त्या वेळीं सगळ्या पृथ्वीवर दुसरा कोणी नव्हता. हॅमिल्टन म्हणतो, अब्दुल गफूर म्हणून एक व्यापारी माझ्या ओळखीचा होता, त्याचा एकट्याचा व्यापार ईस्ट इंडिया कंपनीच्या एकंदर व्यापाराएवढा होता. तो मरण पावल्यावर, कंपनीचें त्याजकडे कांहीं घेणें निघालें तेव्हां त्याच्या जिंदगींतून सुमारें एक कोट रुपये कंपनीस मिळाले. सारांश, त्या वेळच्या व्यापाराचा अंदाज अशा उदाहरणावरून केला पाहिजे [ इचलकरंजी संस्थानचा इतिहास ].

अठराव्या शतकाच्या सुरवातीला इंग्रजांनां फ्रेंच लोकांशीं तोंड देणें भाग पडल्यामुळें देश मिळविण्याकडे कंपनीचें फार लक्ष गेलें. १८१३ त सर्व व्यापार बंद होऊन फक्त चीन देशाच्या व्यापाराचा कुलमक्ता कंपनीकडे राहिला होता तोहि १८३३ त अजीबात बंद झाला.

प्राचीन व्यापाराचें धोरणः—हिंदुस्थानचा हा परकीय व्यापार पुष्कळ शतकें तसाच कायम होता. पोर्तुगीज लोक आले तरी किनाऱ्यावरील व्यापारांत थोडीशी भर पडली. परंतु फक्त किनाऱ्यावर उत्पन्न होणारे पदार्थ आणि जडजवाहिरासारखे, कमी वजन आणि किंमत फार अशा मालाचाच फक्त व्यापार होई. सध्यां निरनिराळ्या वस्तूंची देवघेव होते तशी त्यावेळीं होत नव्हती. कारण कोणत्या भागांत कोणता माल विकतो आणि तो समुद्रकिनाऱ्यावर कसा आणावा हाच मोठा प्रश्न असे. त्यावेळीं सध्यांसारखे दळणवळणाचे मार्ग नसल्यामुळें कोणीहि किनाऱ्यापासून दूर

जाण्यास धजत नसे, आणि कदाचित तेवढ्यांतल्या तेवढ्यांत व्यापाराचीं जरी साधनें असलीं तरी भारी वजनाचा माल नेऊन मुळींच फायदा होत तसे. पुन्हां दोन बाजूंला दोन मोठमोठे पर्वत असल्यामुळें आंत घुसणें अशक्य होतें. पूर्व किनाऱ्यावर तर मुळींच बंदर नसून फक्त गंगानदीच्या तोंडाजवळ कायतें एक बंदर. म्हणून व्यापाराला जितकें महत्त्व सध्यां आहे तसे त्यावेळीं नव्हतें असें म्हणणें म्हणजे अतिशयोक्ति होणार नाहीं.

इंग्रजी व्यापाराची वाढः—वरील अडचणींमुळें इंग्रज कंपनी आपला व्यापार अमर्यादित करूं शकली नाहीं. वर्षाच्या काठीं त्यांचा सर्व पूर्व देशांशीं व्यापार म्हणजे साधारण ६०० टन वहन शक्तीचीं ५।६ जहाजें भरून जात. त्यांतल्यात्यांत दळणवळणाच्या सोयी अगदींच अपुऱ्या असत. नेहमी दुसऱ्या राष्ट्रांशीं युद्ध, व्यापारविषयक वर्चस्वाकरितां भांडणें, महाग वरतू ह्या अडचणी आणि अशाच प्रकारच्या बऱ्याच अडचणी असत. शिवाय मर्यादित किंवा आंखलेला व्यापारी मक्ता असे. इतकेंहि असून कंपनीनें आपला व्यापार भरभराटीस आणलाच. १६७५ मध्यें कंपनीच्या निर्गत मालाची किंमत ४३०००० पौंड, व आयात मालाची किंमत ८६०००० पौंड होती. यात फायदाहि अतिशय झाला. शेवटीं १८१३ त कंपनीचा मक्ता काढून घेण्याचा विचार चालला होता. त्यावेळीं २९००००० पौंडांचा व्यापार झाला. व १८३४ त १४,३४,२२,९०० रुपये किंमतीच्या मालाच व्यापार झाला.

व्यापारविषयक फरकः—१८ व्या आणि १९ व्या शतकांतील इंग्रजी व्यापारांत आणि पोर्तुगीज व्यापारांत बराच फरक होता. याचें मुख्य कारण म्हणजे इंग्लंडांत वाफेच्या शक्तीचा उदय हें होय. त्यामुळें हातांनीं तयार केलेला माल यंत्रांनीं केलेल्या मालांशीं टक्कर देऊं शकला नाहीं. निर्गत मालांत लवकरच निळीची भर पडली व पश्चिम बेटांतील गुलामांची मुक्तता झाल्यानें तेथील साखरेचा व्यापार कांहीं काळ मंदावला व त्यामुळें या देशांतून कांहीं साखर बाहेर जाऊं लागली.

मंदाईचीं कारणेंः—कंपनीनें हिंदुस्थान देश बराचसा पादाक्रांत केला होता तरी नैसर्गिक अडचणीमुळें व्यापार जोमानें चालेना. १९ व्या शतकाच्या सुरवातीला लष्करी कामाकरितांच जे कांहीं रस्ते होते त्यानींच व्यापार करावा लागे. परंतु हे मार्ग सर्व देशांत नसल्यामुळें व्यापाराचीं, बैलगाड्या किंवा गोण्यांचे बैल किंवा एखाद्या देशांतील एखादी नदी हींच साधनें असत. परंतु ह्या साधनांमुळें व्यापार भरभराटीस यावा तसा आला नाहीं. शिवाय चोर व लुटारू ह्यांच्यामुळें अतिशयच त्रास होत असे. तेव्हां सुलभ दळणवळणाच्या साधनाभावामुळें एक देश उपाशी मरे तर दुसरा देश अजीर्णामुळें रोगग्रस्त होई. यावेळीं विलायतेंत माल न्यावयाचा म्हणजे अतिशय खर्चाचें आणि जोखमीचें काम असे. फक्त एखाद्या मालाची किंवा वस्तूची जर मागणीच आली तर मात्र ती वस्तु हरप्रयत्न करून तिकडे नेत असत.

१८५८ नंतरच्या सुधारणाः—गंगानदीच्या प्रदेशांत दळणवळणाचे मार्ग सुधारण्याचे प्रयत्न चालले होते तरी १८५७ च्या बंडाच्या वेळीं फक्त २७० मैलांचीच रेल्वे होती. एक फांटा कलकत्त्यापासून आणि दुसर मुंबईपासून सुरू होता. परंतु बंड मोडण्यांत अतिशय खर्च झाल्यामुळें लोकांवर कर वाढले आणि इंग्रजांच्या लक्षांत एक गोष्ट आली ती ही कीं दळणवळणाचे मार्ग वाढविणें व अवश्य सुधारणांमध्यें मुख्य सुधारणा करणें हीच होय. म्हणून रेल्वे तयार करण्याचें काम झपाट्यानें सुरू झालें. तसेंच कालवे बांधण्यांत आले, जमाबंदीपद्धतींत सुधारणा झाली आणि निरनिराळ्या राज्यकारभारासंबंधीं सुधारणा झाल्या व ह्यामुळें राज्याला बळकटी येऊन व्यापार वाढला.

यूरोपमध्यें माल नेण्याला लागणारा खर्चः—रेल्वे सुरू होण्यापूर्वी व्यापारांत कोणत्याहि तऱ्हेची ढवळाढवळ करणें किंवा शेतकऱ्यांनां उत्तेजन देणें शक्य नव्हतें. शिवाय रेल्वेची पद्धत सुरू झाली तरी इंग्लंडमध्यें माल नेण्याला अतिशय खर्च आणि वेळ लागे म्हणूनहि व्यापार जेथल्या तेथेंच राहिला. नंतर जेव्हां १८६९ त सुवेझचा कालवा सुरू झाला तेव्हां वेळेचा आणि पैशांचा प्रश्न आपोआपच सुटला. त्यामुळें १८७० पासून व्यापाराला अतिशय ऊर्जितावस्था प्राप्त झाली. हिंदुस्थानचा माल इंग्लंडच्या बाजारांत जेथें मजुरीचा दर जास्त असे अशा दुसऱ्या राष्ट्रांच्या मालाशीं टक्कर देऊं लागला आणि हा सुपरिणाम १८७०–८० त पहावयास मिळाला.

वसूलपद्धति, आयात, निर्गत मालावरील जकातः—१८५७ च्या बंडामुळें सरकारला अतिशय खर्च आला आणि तो कोणत्या रीतीनें भरून काढावयाचा हा प्रश्न येऊन उभा राहिला. ह्या प्रश्नाचें उत्तर म्हणजे

वसुलाच्या पद्धतीची सुधारणा करणें हें होय. तेव्हां एक उपाय म्हणून आयात व निर्गत मालावरील जकात शें. २० पासून उतरत उतरत १८७५ त ५॥ टक्क्यांपर्यंत नेऊन १८८२ त अजीबात ती बंद केली. परंतु निर्गत मालावरील जकात मात्र १८७३ सालापासून हळू हळू काढून टाकण्यांत आली आणि १८८० सालीं फक्त तांदुळावरच जकात राहिली.

देशांतील दस्तुरीचें उत्पन्नः-आयात-निर्गत मालावरील जकातीबरोबरच दस्तुरी ही एक दुसरी उत्पन्नाची बाब असे. ही दस्तुरी देशी संस्थानांत, त्याचप्रमाणें इंग्रजी अंमलांतहि वसूल केली जात असे. ही दस्तुरी सिंधु नदीपासून तों तहत बंगालच्या उपसागरापर्यंत वसूल करीत. वाटेंत तपासणी ठेवलेली असे याचें मुख्य कारण उत्तरहिंदुस्थानांतून जाणाऱ्या मिठावरील दस्तुरीचे दर निरनिराळे असत. परंतु यामुळें साखरेवर जकात बसून पश्चिम किनाऱ्यावर मॉरिशस साखरेचा प्रवेश झाला. कित्येक जिन्नस ह्या दस्तुरीखालीं दडपले जात. परंतु लॉर्ड मेयो ह्यानें ही पद्धत काढून टाकून मिठावरील कराचा दर सर्व देशभर एकच सुरू केला. साधारण हा दस्तुरीचा अडथळा १८७९ मध्यें नाहींसा करून टाकण्यांत आला. तरी कोठें कोठें अजूनहि दस्तुरी वसूल करतात. परंतु दस्तुरी काढल्यामुळें व्यापाराला फार फायदा झाला. कांहीं प्रांतांत म्युनिसिपालिटी आयात-निर्गत मालावरील जकात वसूल करते.

हुंडणावळीसंबंधीं अडचणीः-राज्यकारभारांत सुधारणा झाल्या, दळणवळण सुरळीत व बिनधोक चालू झालें परंतु व्यापाराला बाधक अशा हुंडावळींतील अडचणी भासूं लागल्या. हिंदुस्थानचा व्यापार म्हणजे बहुतेक यूरोपीयन राष्ट्रांशीं होत असे. तेथील चलनी नाणें व येथील चलनी नाणें यांत फरक असल्यामुळें पुष्कळ घट येई. येथील रुपयाची किंमत कमी झाली म्हणजे आयात मालाबद्दल लागणारे जास्त रुपये पाठवावे लागत आणि त्यामुळें हे जास्त लागणारे रुपये उत्पन्न करण्याकरितां सरकारला रयतेवर जास्त कर लादावा लागे. ह्या अडणीमुळें व्यापार साधारण बसावयाचाच परंतु आगगाड्या, तारायंत्रें वगैरे दळणवळणाच्या मार्गांत सुधारणा झाल्यामुळें ह्या अधिक कराचा बोजा जास्त न वाढून व्यापार वाढतच चालला. हा कराचा बोजा वाढत असल्यामुळें रयतेला मात्र व्यापाराचा फायदा घेतां आला नाहीं.

सरकार व व्यापारः-ईस्ट इंडिया कंपनी नाहींशी झाली तरी कांहीं लोक मधून मधून आपला व्यापार चालवीत असतच. त्यामुळें त्यांच्यावर फिर्यादी वगैरे करण्याचें काम चालूच होतें. पुष्कळ वर्षें यूरोपीयन लोकांनां गव्हर्नर जनरलच्या परवानगीशिवाय जमीन वगैरे घेतां येत नसे पण प्रयोगाखातर मात्र थोडीशी जमीन यूरोपियन लोकांनां देत असत; असें कित्येक वर्षें चाललें. रेल्वे, रस्ते इत्यादि सुधारणा करण्यांत व्यापारी दृष्टि तर होतीच परंतु मुख्य हेतु लष्कराच्या सोयी करण्याचा होता.

शेतकीखातेंः-१८६६ च्या दुष्काळाच्या चवकशीचा परिणाम म्हणजे शेतकी व व्यापारी खात्याची स्थापना होय. परंतु पैशाच्या दृष्टीनें जेव्हां हें खातें लवकरच बंद करावें लागलें तेव्हां व्यापारविषयक बाबी जमाबंदी खात्याकडे सोंपविण्यांत येऊन १८७६-७८ च्या दुष्काळप्रसंगीं फक्त महसूल आणि शेतकीकरतां एक खातें उघडण्यांत आलें. तेव्हांपासून सरकारचें व्यापाराकडे दुर्लक्ष आहे अशी ओरड सुरू झाली.

उद्योगखातेंः-सरकारवर व्यापाराकडे दुर्लक्ष असल्याचा जो आरोप करण्यांत आला होता तो दूर करण्याकरितां १९०५ मध्यें दळणवळण व उद्योगखातें स्थापण्यांत येऊन कौन्सिलांतील एका सभासदाकडे त्याची जबाबदारी देण्यांत आली. व त्याच्याकडे जमीन महसूल खातें, शेतकी खातें आणि सरकारी इंजिनिअरिंग खातें हीं खातीं देण्यांत आलीं आणि त्यावर एक डायरेक्टर जनरल ऑफ कमर्शियल इन्टेलिजन्स नेमण्यांत आला.

व्यापारी संघः-व्यापाराची वाढ झाली तेव्हां मोठमोठ्या शहरीं व्यापारी संघ (चेंबर ऑफ कॉमर्स) स्थापन झाले व त्यांनां सरकारहि मानूं लागलें.

१८३४ पासून सर्वसाधारण व्यापारी वाढः--दुष्काळासारख्या अडचणी आल्या तरी ही वाढ खुंटली नाहीं. कारण रेल्वे, कालवे, पाटबंधारे इत्यादि सुधारणा जोरानें होत होत्या. पूर्वीं हिंदुस्थानांतून निर्गत अतिशय होत असून आयात मात्र कमी होत असे. त्यामुळें हिंदुस्थानांत बाहेरचा पैसा अतिशय येई म्हणून ह्या भूमीला सुवर्णभूमि असें सार्थ नामाभिधान प्राप्त झालें होतें. हा पैसा दागिन्यांच्या रूपानें किंवा जमिनींत पुरून ठेवीत असत; कारण जुलमी राजे त्याकाळीं चोर ह्यांच्या भीतीमुळें तो तसा ठेवावा लागे. व त्याकाळीं लोकांचा खर्चहि कमी असे, कारण त्यावेळीं सध्यांसारख्या खर्चाच्या बाबी नसून त्या

फारच कमी असत. पूर्वी रेशीम, मसाला, नीळ, कॅलिको (कापड), हस्तिदंत हा माल बाहेर जात असे आणि हा माल मौल्यवान असल्यामुळें त्याची किंमतहि रगड मिळत असे. नंतर साखर, रंग व करडईसारखा गळिताचा माल जाऊं लागला आणि सध्यां तर धान्य, कच्चा कापूस, सूत, कच्चा ताग, गळित धान्यें वगैरे साधारण रोजचे पदार्थ बाहेर जाऊं लागले आहेत. ईस्ट इंडिया कंपनीच्या वेळीं लोकरीचा माल जास्त आयात होत असे; आतां कापड ( जवळ जवळ $\frac{२}{३}$ ) धातू, मातीचीं भांडीं, यंत्रसामुग्री साखर व मीठ हा माल येऊं लागला आहे तेव्हां पूर्वी वर सांगितल्याप्रमाणें येथें बाहेरून पैसा येत असे. परंतु सध्यां येथील पैसा बाहेर जात आहे.

तेव्हां हा देश आज इंग्लंडचा ऋणको आहे, आणि हें देणें नियामितपणें दिलेंच पाहिजे. ऋणको होण्याचीं कारणें सार्वजनिक कार्याकरितां कर्ज काढलेल्या पैशाचें आणि कांहीं रेल्वे कंपन्यांच्या कर्जाचें व्याज, हिंदुस्थानाकरतां दिवाणी आणि लष्करी खात्याकरितां द्यावे लागणारे पैसे, यांत्रिक सामुग्री, दिवाणी आणि लष्करी अधिकाऱ्यांचीं इंग्लंडांत द्यावी लागणारीं पेन्शनें आणि रजेवरील भत्ते, येथें धंदे करणाऱ्या यूरोपीयन लोकांचा फायदा इत्यादि अनेक तऱ्हांनीं हिंदुस्थानांतून इंग्लंडास पैसा जातो. तो सरासरी दरवर्षी २५०००००० पौंड जातो, आणि हें कर्ज दिवसेंदिवस वाढतच जातें; कारण कांहीं कठिण प्रसंगीं किंवा अडचणीच्या वेळीं इंग्लंडांतहि कर्ज काढावें लागतें.

आजमितीला हिंदुस्थानसरकारला १०००कोटीरुपयांपेक्षां जास्त कर्ज आहे. पण यापैकीं उत्पादक कर्ज सुमारें तीनचतुर्थांशाच्या जवळ जवळ आहे.

आजच्या हिंदुस्थानच्या व्यापाराची परिस्थिति त्याच्या आयात निर्गत मालावर अवलंबून असल्याकारणानें हा आयात व निर्गत होणारा माल कोणता, तो किती प्रमाणांत आयात निर्गत होतो हें पाहिलें पाहिजे. यूरोपांतील राजकीय परिस्थित्यनुसार हिंदी व्यापारांत नेहेमीं बदल होत जातो. तसेंच हिंदुस्थानांतून बाहेर जाणाऱ्या कच्च्या मालाच्या किंमतींपेक्षां हिंदुस्थानांत येणाऱ्या पक्क्या मालाच्या किंमती फारच जबर असतात व त्यामुळें हिंदुस्थानासारखे कृषिप्रधान देश व्यापारांत डबघाईस येतात. १९२३–२४ सालीं हिंदुस्थानाला आपल्या आयात मालाकरितां १९१३–१४ सालांतल्यापेक्षां शेंकडा ९० जास्त रक्कम द्यावी लागली, तर निर्गत मालाकरतां १९१३–१४सालापेक्षां फक्त शेंकडा ४५ च जास्त मिळाली. महायुद्धापूर्वीचा जो आयात–निर्गत व्यापार होता तो मधील दहा वर्षांच्या काळांत कमजास्त होत होत पुन्हां पूर्वपदावर कसा येत चालला आहे हें १९१३–१४ सालांतील मालाच्या जाहीर किंमतीशीं तुलना करून तयार केलेल्या पुढील व्यापारी मालाच्या आयातनिर्गत आंकड्यांच्या कोष्टकावरून दिसून येईल (आंकडे कोट रुपयांचे आहेत).

| साल | आयात | निर्गत | पुनर्निर्गत सोडून एकंदर व्यापार |
|---|---|---|---|
| १९१३–१४ | १८३ | २४४ | ४२७ |
| १९१९–२० | १०१ | १९८ | २९९ |
| १९२०–२१ | १४२ | १७२ | ३१४ |
| १९२१–२२ | १२४ | १८२ | ३०६ |
| १९२२–२३ | १३८ | २१४ | ३५२ |
| १९२३–२४ | १२० | २४० | ३६० |
| १९२४–२५ | १३७ | २५० | ३८७ |
| १९२५–२६ | १४३ | २४६ | ३८९ |

बंगाल, ब्रह्मदेश, मद्रास, मुंबई व सिंध या भागांतून माल बाहेर जातो व येतो. तेव्हां या प्रांतांतील १९२३–२४ सालचे आयातनिर्गतीचे आंकडे तपासूं ( यांत सरकारी खजीना व माल धरला नाहीं ).

| देश | आयात | निर्गत |
|---|---|---|
| बंगाल | ८२,४६,६०,७९६ | १,३२,२९,९०,६०४ |
| ब्रह्मदेश | १८,४९,५५,०२४ | ३९,५०,८१,९९५ |
| मद्रास | २०,०७,३२,१८८ | ३५,९१,२८,७५४ |
| मुंबई | १,३६,४७,०२,२२३ | १,१७,९१,८६,०३३ |
| सिंध | २२,३०,९०,५६२ | ३९,९९,७३,००४ |

आयात माल, कापड व सूत (१९२५–२६ सालीं ६५६७ लाख रु.):–हिंदुस्थानांत बाहेरून येणाऱ्या एकंदर मालांत सुती कापडाचा माल फार असतो. सर्व आयात मालांत याचें प्रमाण शें. ३० असतें. १९२३-२४ सालीं या आयात मालाची किंमत ६७$\frac{१}{२}$ कोटी रुपये होती. या सुती कापडांत साधें व पीळदार सूत; करडें, पांढरें, रंगीत व सर्व प्रकारचे फेंट्स कापड; पायमोजे वगैरे ( होजीयरी ) कपडे, हातरुमाल व शाली; दोरा हीं येतात. हा कापडी माल युनायटेड किंग्डम व जपान या देशांतून येतो.

( साल १९२३–२४ )

| आयात कापडी माल | किंमत लाख रुपये |
|---|---|
| पीळदार व साधें सूत | ७९४ |
| कापड– | |
| कोरें, करडें ( विन धुवट ) | २३०३ |
| पांढरें ( धुवट ) | १९४४ |
| रंगीत, छापील किंवा रंगविलेलें | १७६९ |
| सर्व प्रकारचे फेंट्स् | ६९ |
| होजीयरी | ९४ |
| हात रुमाल व शाली | २३ |
| दोरा | ७१ |
| इतर प्रकार | ८२ |
| एकूण | ६७४८ |

रेशीम–(कच्चें व तयार, ३७९ लाख रु. ):–शेंकडा ९३ इतकें कच्चे रेशीम चीन, हाँगकाँग मधून येतें व बाकीचें मुख्यत्वें सयाम आणि जपान येथून येतें. १९२३–२४ सालीं एक कोटी एकोणीस लक्ष रुपयांचें १८२९००० पौंड कच्चें रेशीम इकडे आलें. आयात रेशमी कापडाची किंमत दोन कोटी तीस लक्ष रुपये होती. शें. ९८ वर कापड चीन, हाँगकाँग व जपान या देशांतून येतें. रेशमी कापड ब्रह्मदेशांत फार खपतें.

कृत्रिम रेशीम (२१९ लाख रुपये):–मागील पांच वर्षांपासून याची आयात झपाट्यानें वाढत आहे. ती गेल्या दोन वर्षांत तर फारच वाढली. वाढती निपज, उतरती किंमत व हातमाग आणि गिरण्यांतून याचा वाढता उपयोग व कमी केलेली जकात या कारणांनीं ही प्रगति झाली आहे. या आयातीचा सुमारें निम्मा भाग इटलींतील आहे हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

धातू व त्यांचे जिन्नस (२९३६ लाख रुपये):–लोखंड व पोलाद या धातू व त्यांचे जिन्नस विशेषतः फार येतात. आयात मालांत त्यांचा अनुक्रम नेहेमीं दुसरा किंवा तिसरा लागतो. एकंदर २९३ कोटी रुपयांच्या आयात धातुजिन्नसांमध्यें लोखंड व पोलादाची किंमतच सुमारें १८ कोटी रु. होती. जर या धातूच्या मालांत यंत्रें, गिरणीसामान, हत्यारें, रेल्वेचें सामान, गाड्या वगैरे माल मिळविला तर आयात मालाची रक्कम ६७ कोटी रुपयांपर्यंत जाईल.

यंत्रें व गिरणीसामान (१९८७ लाख रु. ):–१९२१ पासून १९२४ पर्यंत या मालाचा अनुक्रम कापडाच्या खालोखाल म्हणजे दुसरा लागत होता. १९२३–२४ सालीं सर्व प्रकारचीं जीं यंत्रें हिंदुस्थानांत आलीं त्यांची किंमत सुमारें २० कोटी रुपये होती. या मागील सालांतून ही किंमत बरीच जास्त होती. विशेषतः १९२१–२२ सालीं ३९ कोटी रुपयांपर्यंत ती गेली होती. पण गेल्या तीन वर्षांपासून हा माल कमी होतोसा दिसतो. कारण १९२५–२६ सालीं १९८७ लाख रुपयांचा माल आयात झाला. कापडाप्रमाणेंच युनायटेड किंग्डममधून हा बहुतेक सर्व माल येतो.

रेल्वे सामान व गाड्यांचा माल(८१४ लाख रु. ):–सरकारी व खाजगी मालाची किंमत १९२४-२५ सालीं ७ कोटी रुपये होती. यापैकीं खाजगी ५ कोटी ७२ लक्ष आणि सरकारी 1 कोटी २८ लक्ष रुपये होती. १९२५-२६ सालीं ४ कोटी ९९ लक्ष खाजगी व ३ कोटी १५ लक्ष सरकारी माल होता.

मोटारगाड्या(४४९ लक्ष रु.):–मोटारगाड्यांवर ३० टक्के जकात आहे तरी आयात सारखी वाढत आहे. कारण १९२२–२३ सालीं ४३२३ मोटारी आल्या तर पुढील सालीं ७९८४ आल्या; याच्या दोन वर्षांपूर्वी (१९२१-२२सालीं)२८९९च आल्या होत्या. १९२५–२६ सालीं १२७५७ मोटारींची आयात झाली! यांपैकीं शेंकडा ३७ कानडाहून, शें. ३२ अमेरिकेंतून व शें. १९ युनायटेड किंग्डममधून व शें. ७ इटलींतून आल्या. अमेरिकेचा माल कमी होत असून युनायटेड किंग्डमचा वाढत आहे असें मागील सालांच्या आंकड्यांवरून दिसतें. या मोटारींच्या व्यापारांत बंगालचा भाग शें. ३६, मुंबईचा शें. २९, मद्रासचा शें. १४, व ब्रह्मदेशाचा शें. १३ आहे. हलक्या गाड्या फार येतात व पाश्चात्त्य देशांत दरसाल मोटारींची किंमत सारखी उतरत असल्यानें त्यांची आयात वाढत आहे.

भांडींकुंडीं ( ५२० लाख रुपये ):–या व्यापाराची चलती आहे. एन्यामेलचीं भांडीं, दिवे व इतर हत्यारें, शेतकीचीं व यांत्रिक हत्यारें हीं फारकरून येतात. १९२३–२४ सालीं शेतकीचीं हत्यारें २१ लाख, इतर हत्यारें (यंत्रांचीं हत्यारें सोडून) ६८ लाख, गवंड्यांचें सामान २४ लाख, घरगुती भांडींकुंडीं ९ लाख, एन्यामेलचीं लोखंडी भांडीं ३१ लाख, धातूचे दिवे ६० लाख, दिव्याचे भाग ९ लाख, स्टोव्ह ७ लाख, तिजोऱ्या ४ लाख, गॅस मँटल ५ लाख व इतर प्रकार २०४ लाख इतक्या रुपये किंमतीचें सामान आलें. एलेक्ट्रो प्लेटेड

भांडीं इंग्लंडहूनच बहुधां येतात व त्यांची किंमत ९ १/२ लाखापर्यंत असते.

चाकू-कात्र्या ( ३३ लाख रुपये ):--हा माल ३/४ जर्मनींतून व १/४ युनायटेड किंग्डममधून येतो.

साखर ( १९८ लाख रु. ):-शेंकडा ८०-९० साखर जावाहून आयात होते; आयात साखरेचा शें. ४३ इतका हिस्सा बंगाल, शें, २२ मुंबई, शें. २४ कराची, शें. ९ ब्रह्मदेश व शें. २ मद्रास यांत विभागला जातो. मॉरिशस साखर विशेषतः मुंबईसच येते व ती विलायतेस जाऊं लागल्यापासून तिचें प्रमाण फारच कमी झालें आहे. १९२५-२६ सालीं जगांत पुष्कळ साखर (२३६१५००० टन) उत्पन्न झाली व हिंदुस्थाननेंहि ती फारच (७३२६०० टन) घेतली. तरी देखील महायुद्धापूर्वी इतकी साखर अद्याप येत नाहीं. कारण १९१३-१४ सालीं ८०३००० टन साखर परदेशांतून आली.

खनिज तेलें (१००५ लाख रु.):-राकेल, जळाऊ, व लुब्रिकेटिंग अशीं खनिज तेलें येतात. पेट्रोल बहुतेक सर्व ब्रह्मदेशांतूनच येतें. १९२५-२६ सालीं १८७ दशलक्ष गॅलन तेल आयात झालें. आगगाड्या, आगबोटी, यंत्रें वगैरे वाढत चालल्याकारणानें जळाऊ तेलाला मागणी फार आहे. इराणहून शें. ७५ इतकें हें तेल येतें. त्याखेरीज बोर्नीओ व स्ट्रेट्स सेटलमेंटहून येतें. लुब्रिकेटिंग तेल मुख्यतः अमेरिकेहून येतें.

खाद्यपेयें (४९१ लाख रु.):-बाटल्यांतून व डब्यांतून येणारे जिन्नस, पिठें, घट्ट दूध, बिस्किटें, मांस, चीज, मोरंबे, लोणचीं, चटण्या, कोको, चाकोलेट, लोणी, तूप, व्हिनेगार (शिरका) वगैरे प्रकार यांत येतात. या मालाची आयात सारखी वाढत आहे.

रसायनें (२०२ १/२ लाख रुपये):-या मालाच्या किंमतीचा शें. ४४ इतका हिस्सा सोडा व सोडामिश्र जिनसांचा आहे.

औषधें (१८३ १/२ लाख रु.):-यांतील मुख्य औषधी पदार्थ म्हणजे क्विनाईन होय. हें इंग्लंड अमेरिकेहून बरेंचसें येतें तरी मूळ कच्चा माल जावाचा असतो.

मादक पेयें (३३४ लाख रु.):-यांची आयात वाढत्या प्रमाणांत आहे. कारण १९२४-२५ सालीं आयात किंमत ३२८ लाख रु. होती व त्यामागील सालीं ३१४ १/२ लाख रु. होती. एल, बीर, ब्रँडी, गिन, स्पिरीट, रम, व्हिस्की, हे दारूचे सर्व प्रकार कमजास्त प्रमाणांत परदेशांहून येतात.

साधे कागद व पुठ्ठयाचे कागद (२८१ लाख रु.):-१९२५-२६ सालीं ८७४०० टन कागद आला. जर्मन कागदाचा भाव बराच उतरल्यानें कागदाची आयात एकसारखी वाढत आहे. १९२५ च्या सप्टेंबरपासून एका पौंडाला एक आणा अशी संरक्षक जकात कांहीं छापण्याच्या व लिहिण्याच्या कागदावर बसविली आहे.

मीठ (१०४ लाख रु.):-परदेशाहून मीठ बंगाल व ब्रह्मदेश या भागांत येतें; पैकीं ८८ टक्के बंगाल्यांत व ११ टक्के ब्रह्मदेशांत येतें. या बाहेरून येणाऱ्या मिठाचें प्रमाण सारखें उतरत आहे. १९२४-२५ सालीं १४३ लाख रुपयांचें ६१६००० टन मीठ आलें तर १९२५-२६ सालीं १०४ लाख रुपयांचें ५६०००० टनच .मीठ आलें.

कांच व कांचसामान (२९९ १/२ लाख रु.):-जपान व जर्मनी यांनां मागें टाकून चेकोस्लोव्हाकियानें या व्यापारांत आघाडी मारली आहे. १९२५-२६ सालीं चेकोस्लोव्हाकियांतून ८२ ३/४ लक्ष किंमतीचा माल आला.

तंबाखू (२१३ लाख रु.):-१९२५-२६ सालच्या २१३ लाख रुपयांच्या आयातीमध्यें १९९ लाख रु. आयात फक्त सिगारेटचीच होती. बिन तयार केलेली तंबाखू जी इकडे येते तिचा शें. ९७ इतका हिस्सा अमेरिकेहून येतो. या बिन तयार केलेल्या आयात तंबाखूची किंमत ३३ ३/४ लाख रुपये होती. हिंदुस्थानांतच सध्यां सिगारेट तयार होत असल्यानें ही तंबाखूची मागणी वाढती आहे. सुमारें दोन लाख रु. किंमतीच्या सिगारेट बाहेरून येतात.

आगकाड्या (९३ १/२ लाख रु.):-१९२५-२६ सालीं सुमारें ८० लक्ष ग्रोस पेट्या परदेशांहून आल्या. १९२४ सालच्या मार्चच्या १ तारखेपासून काड्या व पेट्या करण्याच्या मालावर मोठी जकात बसविली आहे. कारण जपानांतून बहुतेक आयता तयार माल मागवून येथें फक्त काड्या व पेट्या बनवीत व या रीतीनें जकात चुकवीत. हा बहुतेक सर्व माल 'सेफ्टी'च असतो व निम्म्याच्यावर जपानांतून येतो. बाकीचा स्वीडनमधून येतो. नॉर्वे व चेकोस्लोव्हाकिया इकडूनहि पेट्या येतात.

सीमेंट (६५ लाख रु.):-सुमारें एक लाख टन सीमेंट बाहेरून येतें व बहुतेक माल युनायटेड किंग्डमधूनच येतो. हिंदुस्थानांत सीमेंटचा धंदा सुरू झाल्यापासून परदेशांतून येणारें सीमेंट निम्म्यानें कमी झालें आहे.

रंगविण्याचे व कातडीं कमावण्याचे जिन्नस:–दरसाल अडीच कोटीपर्यंत 'सिन्थेटिक' रंग येतात. बहुतेक रंग जर्मनीहूनच निर्गत होतात.

कोळसा:–पांच–सहा लाख टन कोळसा बाहेरून येतो. इतके दिवस युनायटेड किंगडमचा माल येत असे पण आतां बराचसा माल आफ्रिकेहून येतो.

रत्नें व मोतीं:–दरसाल सुमारें एक कोटी रुपयांपर्यंत रत्नें आयात होतात रत्नांमध्यें हिरेच बव्हंशीं असतात. हीं रत्नें बेल्जमहून फार येतात मोतीं ८०।९० लाख रुपयांचीं बेहरिन बेटें व मस्कतहून येतात(आंकडे हजारांचे).

## आयात मालाचें कोष्टक ( १९२३–२४ )

| आयात माल | किंमत रुपये |
|---|---|
| कापूस माल | ६७४८४९ |
| साखर | १५४९०६ |
| खनिज धातू | २४३७०९ |
| यंत्रें व गिरणींसामान | १९१३१८ |
| रेशीम | ४६२१६ |
| तेलें | ८६९१७ |
| रासायनिक द्रव्यें व औषधें | २०४७४ |
| भांडीकुंडीं | ४४२२८ |
| मद्यपेय- द्रव्यें | ३१४५८ |
| आगकाडया | १४९९१ |
| कागद व पुठ्ठे | २७१०७ |
| मीठ | ११०२७ |
| लोंकरीचें कापड | २४४०९ |
| मसाल्याचे जिन्नस | २९८७७ |
| खाद्यपेय | २८०२१ |
| लहान यंत्रें व हत्यारें | ३२९७७ |
| तंबाखू | २२६१८ |
| कांच | २४५७४ |
| रंगविण्याचें व कातडीं कमावण्याचें सामान | २९३५३ |
| औषधी सामान | १८१३२ |
| लांकूड | ६५३९ |
| कपडे व अंगावर वापरण्याचे जिन्नस | १४१२४ |
| साबण | ११९२७ |
| बांधकामाचें सामान | १२४७७ |
| फळें व भाजीपाला | १७०७९ |
| रंग (पेंट) व रंगद्रव्यें | १३०८९ |
| चहा | ६४९२ |
| किरकोळ सामान–फीत, सुया, सुत गुंडया व टोप्यांचे पट्टे वगैरे | ९९०२ |
| यांत्रिक पट्टे | ८८१२ |
| यांत्रिक गाडया | २८१२६ |
| लेखनसाहित्य ( स्टेशनरी ) | ८९०६ |
| जनावरें जिवंत | १९८६ |
| आगगाडया व सामान | ११७२४६ |
| बुकें व छापील कागद | ५१४२ |
| चिनी मातीचीं भांडीं | ७०९० |
| बूट, पादत्राणें | २५४४ |
| छत्र्या व छत्र्यांचें सामान | ५९९८ |
| धान्य, कडधान्य | ४३८९ |
| कोळसा, जळण | १७६२० |

निर्गत माल, कापूस ( ९४९९ लाख रु. ):–अमेरिकन कापसाला तेजी चढल्यामुळें कमी भावाचा हिंदुस्थानी कापूस परदेशीं जास्त खपूं लागला. १९२५–२६ सालीं ४१,७३,००० गट्ठे ( ४०० पौंडांचा एक गट्ठा ) निर्गत झाले तर त्याच्या मागच्या सालांत ३२,२६,००० गट्ठे बाहेर गेले. याप्रमाणें शें. २९ इतकी मालांत वाढ झाली असली तरी शें. ४ इतकीच वाढ किंमतींत झाली. कारण १९२५–२६ सालीं भाव उतरला. हिंदुस्थानांतून निर्गत होणाऱ्या एकंदर मालाच्या किंमतीचा $\frac{1}{4}$ नुसती या निर्गत कापसाची किंमत असते.

कापसाचा तयार माल ( ९६५ लाख रु ):–हिं. सरकारनें १ डिसेंबर १९२५ पासून देशी मालावरील जकात काढून टाकिली पण तरीहि देशी गिरणीवाल्यांनां परदेशी कापडाच्या व्यापारापुढें टिकाव धरवेना. तेव्हां त्यांनीं विशेष प्रकारचें संरक्षण सरकारकडे मागितलें. त्यावरून सरकारनें कॉटन टेक्स्टाईल टॅरिफ बोर्ड नेमिलें व त्याच्या सूचनांचा व गिरणीवाल्यांच्या मागणीचा विचार करून आयात सुतावर दर पौंडामागें दीड आणा जकात बसविली. ही जकात १९३० पर्यंतच रहावयाची आहे. पुढें जपानची स्थिति पाहून ती उठेल.

सूत ( २९३ लाख रु. ):–हिंदी गिरण्यांतून सुमारें ६००–७०० दशलक्ष पौंडांपर्यंत सूत निघतें. महायुद्धानंतर हिदुस्थानांतून परदेशीं कमी सूत जाऊं लागलें. १९१३–१४सालीं सरासरी १९३दशलक्ष पौंड सूत बाहेर जात होतें तें १९२५–२६ सालीं सारें ३२ दशलक्ष

पौंडच गेलें. यावरून परदेशांशीं स्पर्धा करण्यांत हिंदुस्थानचा टिकाव लागत नाहीं हें चांगलें दिसून येतें.

कापड (६१६ लाख रु.):—हिंदुस्थानी कापडाची मॅंचेस्टर कापडाशीं फारशी स्पर्धा नसून ती जपानशींच मोठ्या प्रमाणांत आहे. तेव्हां या मालाला बाहेरून मागणी दरसाल कमी कमी येत असते हें उघड आहे. कमी मागणीमुळें कापडहि कमी निघतें. तेव्हां हा व्यापार मुळींच आशाजनक नाहीं.

ताग (९६७९ लाख रु.):—हा निर्गत व्यापार मात्र भरभराटींत आहे. सुमारें १५ लक्ष टन वजनाचा ताग बाहेर जातो. या तागाचा कच्चा माल सुमारें शें. ४० व पक्का ६० बाहेर जातो. १९२५–२६ सालीं बेचाळीस कोटी पन्नास लक्ष पोतीं परदेशीं गेलीं, त्यांची किंमत २६३ कोटीपर्यंत होती. गोणपाट कपडा १ अब्ज, ४५ कोटी, ६१ लक्ष वार (सुमारें ३२ कोटी रु. किंमतीचा) निर्गत झाला.

धान्य व पीठ(४८०३ लाख रु.):--महायुद्धाच्या वेळीं व नंतरहि कांहीं वर्षें धान्य व पीठ परदेशीं कमी जात असे व हल्लीं त्याची निर्गत महायुद्धापूर्वीइतकी सरासरीनें होत चालली आहे.१९२५–२६ सालीं३०६३००० टन धान्य बाहेर गेलें. याच्या मागील वर्षीं ६९ कोटी रुपयांचें ४२६०००० टन गेलें. या धान्यापैकीं सुमारें शें. ६४ तांदूळ, शें. २० गहूं, व कणीक, शें. ८ कडधान्य वगैरे व शें. ५ बार्ली असतें.

तांदूळ (३९९० लाख रु.):–१९२५–२६ सालीं ८२ दशलक्ष एकरांत तयार झालेला ३० दशलक्ष टन तांदूळ निर्गत झाला. तांदुळाची निर्गत वाढती आहे.

गहूं (३६० लाख रु.):–महायुद्धापूर्वी जितका गहूं परदेशीं जात असे तितका पुढें जाईनासा झाला. पण १९२४–२५ सालीं पुन्हां तो पूर्वीच्या प्रमाणांत गेला, पण पुढील सालीं याच्या ⅓ सुद्धां निर्गत झाला नाहीं!

### गव्हाच्या निर्गतीचे आंकडे

| साल | हजार टन | किंमत लाख रु. |
|---|---|---|
| १९१३–१४ | १२०२ | ... |
| १९२०–२१ | २३८ | ... |
| १९२१–२२ | ८१ | ... |
| १९२२–२३ | २२० | ३४४ |
| १९२३–२४ | ६३८ | ९११ |
| १९२४–२५ | १११२ | १७१९ |
| १९२५–२६ | २१२ | ३६० |

कणीक (१९६ लाख रु.):–१९२५-२६ सालीं एकंदर ६७००० टन कणीक बाहेर गेली. यापैकीं ईजिप्तनें १४००० टन, मेसापोटेमियानें ७५०० टन, एडननें ७९०० टन व इराणनें ८३०० टन घेतली. अरबस्तानला ९६०० टन गेली व कांहीं सिलोनला गेली. पूर्वी ईजिप्तची मागणी आतांच्या दुप्पट असे, व मेसापोटेमियाची आतांच्या निम्पट असे. इराणकडून येणारी मागणी तर पूर्वीच्या तिप्पटीच्या वर आहे. पण उलट अरबस्तान व सिलोन इकडील मागणी निम्यानें कमी झाली आहे.

गळिताचीं धान्यें (२९६४ लाख रु.):-निर्गत मालांत याचा अनुक्रम चवथा–पांचवा लागतो. या मालापैकीं सुमारें शें. ३० अळशी, शें. २६ शिरसी, शें. २० भुइमूग, शें. १२ सरकी, व शें. ७ एरंडी असते. १९२५–२६ सालीं. १२५००० टन माल उठला.

चहा (२७१२ लाख रु.):--साधारणतः हिंदुस्थानांत ३५ कोटी पौंड चहा तयार होतो. यापैकीं शें. ६२ आसामांत, शें. २५ उत्तरहिंदुस्थानांत (आसाम सोडून) व शें. १३ दक्षिणहिंदुस्थानांत होतो. चहाचें पीक वाढतें आहे. कारण १९०५ सालीं ५२८००० एकर जमिनीवर चहा होता तर १९२५ सालीं ७२९००० एकर जमीन या कामीं अडली होती. तसेंच १९०५ सालीं २२ कोटी पौंड चहा उत्पन्न होत असे तो आज ३५ कोटींवर होऊं लागला आहे. चहाची निर्गतहि वाढली आहे ती अशी (पौंडांचे आंकडे हजारांचे आहेत):–

| साल | उ. हिंदुस्थानांत कलकत्ता चितागांग | द. हिंदुस्थानांत मद्रास बंदरें | मुंबई सिंध ब्रह्मदेश |
|---|---|---|---|
| १९०५–०६ | १९९७३७ | १२६८० | १८०७ |
| १९१५–१६ | ३०१४०३ | २५८४० | ११२२७ |
| १९२१–२२ | २८४०८६ | २७२३३ | २५५९ |
| १९२२–२३ | २५३७९६ | ३०३८६ | ४११४ |
| १९२३–२४ | २९६७७८ | ३८५६० | ३४१७ |

बहुतेक चहा युनायटेड किंग्डम व कानडा या देशांत जातो.

कातडीं (१४२१ लाख रु.):–कच्चीं जाड कातडीं जर्मनी व इटली या देशांत फार जातात. महायुद्धांत याचा व्यापार कमी झाला होता तो पुन्हां वाढला. आतां एकंदर कातड्याच्या निर्गतींत ⅔ किंमतीची निर्गत जाड

कच्च्या कातडयांचीच असते. सुमारें एक कोटी रु. किंमतीचीं गाईचीं कातडीं जर्मनींत व त्याच्या निम्यानें इटलींत जातात. १९२३--२४ सालीं २८९ लाख किंमतीचीं जाड कातडीं जीं परदेशांत गेलीं त्यांपैकीं २१८ लाख रु. किंमतीचीं या दोन देशांतच गेलीं. १९२३ सालीं निर्गत कातडयावरील जकात १५ टक्क्यांपासून ५ टक्क्यांपर्यंत, उतरविल्याकारणानें हा व्यापार वाढला. १९२५--२६ सालीं कमावलेलें जाड कातडें १२१०० टन (किं. ३०५ लाख रु.) परदेशांत गेलें व एकंदर कातडीं १४२१ लाख रु. किंमतीचीं गेलीं.

लाख (६९० लाख रु.):-अमेरिकेहून लाखला फार मागणी असते. त्याच्या खालोखाल यु. किंग्डम, फ्रान्स वगैरे पाश्चात्त्य देशांतून असते. तेथें ग्रामोफोनचा माल, वार्निशें, लिथोग्राफ शाई, विजेच्या कामीं वगैरे लाखेचा उपयोग करतात.

कची लोंकर (३८० लाख रु.):--पंजाब (हिस्सार जिल्हा); सयुक्तप्रांत (गढवाल, अलमोरा व नैनीताल); सिंध; बलुचिस्तान व बिकानेरसंस्थान या भागांत मुख्यत: ही लोंकर होते. परदेशांत ब्लँकेटें, रग, गालिचे वगैरे जाडेंभरडें कापड करण्याकरितां ही लोंकर निर्गत होते.

तेलें (१७९ लाख रु.):--१९२४--२५ सालीं निर्गत तेलाची किंमत ३४४ लाख रु. होती. हल्लीं वनस्पतींचीं तेलें (चंदन व इतर पदार्थांचीं) परदेशीं जास्त जातात. १९२५ -२६सालीं४४$\frac{1}{2}$लाख रु.किंमतीचीं १६२३००० गॅलन इतकी वनस्पतिजन्य तेलें बाहेर पाठविण्यांत आलीं.

धातू (शुद्ध व अशुद्ध) (७२९लाख रु.):--१९२५--२६ सालीं अशुद्ध धातू ६१९०००टन बाहेर गेली. बाहेर जाणाऱ्या धातूंत मँगॅनीज, लोखंड, सोनें, चांदी वगैरे धातू आहेत.

'पिग' (कच्चें) लोखंड (१७५ लाख रु.):--१९२५--२६ सालीं ३८२००० टन हें लोखंड परदेशीं गेलें.बहुतेक (३८०८००) लोखंड बंगालमधूनच जातें व थोडें (१२००) मद्रासहून जातें. बहुतेक लोखंड जपान व अमेरिका या देशांत व कांहीं यु. किंग्डम, इटली, न्यूझीलंड व चीन येथें जातें. पुढील कोष्टकावरून गेल्या तीन वर्षांत हिंदुस्थानांत लोखंड व पोलाद किती तयार झालें हें कळेल (आंकडे हजारांचे आहेत).

| उत्पादन | १९२३--२४ | १९२४--२५ | १९२५--२६ |
|---|---|---|---|
| पिग लोखंड | ७१६ | ८८४ | ८७५ |
| पोलाद | २३५ | ३७० | ४७१ |
| अगदीं पक्कें | १६३ | २४८ | ३२६ |

सन १९२२--२३ मधील हिंदुस्थानांतून निर्यात झालेला प्रमुख खाजगी व्यापारी माल व त्यांच्या किंमती खालीलप्रमाणें होत्या:--

## निर्गत मालाचें कोष्टक

| निर्गतमाल | किंमत हजार रु. |
|---|---|
| ताग (कच्चा माल) | २०००० ६ |
| ,, (पक्का माल) | ४२२८३५ |
| कापूस (कच्चा) | ९८४७०९ |
| ,, (पक्का माल) | १०९५४९ |
| तांदूळ | ३४८९८५ |
| गहूं व कणीक | १०२६०१ |
| इतर धान्यें | ५७१२७ |
| चहा | ३१६४६१ |
| कातडीं | १३००४५ |
| बीं (गळिताचें धान्य) | २९८१७१ |
| लाख (लाखेच्या रंगाशिवाय) | ९०६२७ |
| लोंकर (कच्चा माल) | ३१७४८ |
| ,, (पक्का माल) | ८२६० |
| अफू | २६६३१ |
| तेलें | २९००२ |
| रबर (कच्चा माल) | ११४४६ |
| निळीचा रंग | २००३ |
| इतर रंग | १०१७० |
| प्याराफीन मेण | ११४१४ |
| मसल्याचे जिन्नस | ११०८६ |
| मीठ | २६८७ |
| कॉफी | १५७४५ |
| भांग (कच्चा माल) | ७६४२ |
| मँग्यानीज धातु | १७६८६ |
| इतर खनिज धातू | ४०१३८ |
| पेंड | १९४०९ |
| खाद्यपेयं | ६०३४ |
| फळें व भाजीपाला | ७१७८ |
| तंबाखू | १०२९७ |
| रेशीम (कच्चा माल) | ५०२१ |
| रेशीम (पक्का माल) | ४२७० |
| काथ्याचा माल | १०२१९ |
| खतें | १५८८८ |
| लांकूड | १२७०९ |
| कोळसा | २२३० |
| साखर | ९९९७ |
| गवत, कोंडा | १२८४५ |

हिंदुस्थानच्या आयात निर्गत मालाच्या येण्याजाण्याची दिशा, कोणतीं राष्ट्रें किती माल घेतात व परत देतात हें पुढील कोष्टकावरून समजेल. पुढील तीन सालच्या आंकड्यांवरून आयात निर्गतीची प्रगति समजेल.

## आयात निर्गतीचें कोष्टक

| | आयात | | | निर्गत | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | १९२१-२२ | १९२२-२३ | १९२३-२४ | १९२१-२२ | १९२२-२३ | १९२३-२४ |
| यूरोपीयन देश | लक्ष रु. | लक्ष रु. | लक्ष रु. | लक्ष रु. | लक्ष रु. | लक्ष रु. |
| रशिया | ५ | १ | १५ | ... | १ | ... |
| स्वीडन | ९६ | ११३ | १३३ | २८ | २५ | २८ |
| नॉर्वे | ३८ | ८२ | ६८ | २५ | ३८ | ३८ |
| जर्मनी | ७२५ | ११८९ | ११८९ | १६३४ | २२६४ | २५११ |
| नेदर्लंड्स | २३६ | २२२ | २२८ | २७३ | ४०८ | ५९६ |
| बेल्जियम | ५३३ | ६३२ | ५५१ | ८०३ | ११३७ | १३९० |
| फ्रान्स | २३३ | १९६ | २२३ | ९९० | १५५७ | २००५ |
| स्पेन | २९ | ६ | ९ | १८४ | ३१७ | ३७९ |
| स्वित्सर्लंड | १०२ | ११० | १६३ | १ | २ | १ |
| इटली | २०० | २१० | २७३ | ५८५ | १०२९ | २१८२ |
| ऑस्ट्रिया | २० | २९ | ७६ | ८५ | १२६ | १५४ |
| हंगेरी | ... | ... | ४२ | ... | ... | ... |
| तुर्कस्तान ( यूरोपियन ) | .... | ... | ... | २४ | २८ | ४६ |
| इतर देश | ५२ | ९० | १६२ | ५८ | ८९ | १३३ |
| एकूण | २२५९ | २९०० | ३१३२ | ४६९० | ७०२१ | ९४६३ |

**उद्योगधंदे**—हिंदुस्थानचा व्यापार सर्वस्वी येथील उद्योगधंद्यांवर अवलंबून आहे, तथापि येथील उद्योगधंदे लोकांच्या वाढत्या गरजा भागविण्यास फारच कमी उपयोगास येतात. पाश्चात्त्य देशांतील शास्त्रीय रीत्या उत्पादन व पद्धतशीर स्पर्धा यांपुढें बहुतेक उद्योगधंदे टिकाव धरूं शकल नाहींत व सरकारहि देशी धंद्यांनां संरक्षण देण्याच्या बाबतींत फार आढेवेढे घेत असतें. त्यामुळें देशी उद्योगधंद्यांचें भवितव्य आज तरी उज्वल वाटत नाहीं. १९२१ सालीं सेक्रेटरी ऑफ स्टेटनें परवानगी दिल्यावर हिंदुस्थानसरकारनें उद्योगधंद्यांचें एक मध्यवर्ती खातें उघडलें. या खात्याकडे औद्योगिक शिक्षण, भूस्तरशास्त्र व खनिजशास्त्र, भूपृष्ठपहाणी, कारखाने, मजुरांविषयीं कारभार, पेटंट व कॉपीराईट देणें, स्टेशनरी, छपाई, हवामान, विमानें, पोस्ट व तारा, पाटबंधारे, आणि इतर बांधकामें इतक्या गोष्टी दिल्या आहेत. तथापि प्रत्यक्ष स्थानिक उद्योगधंद्यांनां मदत करण्याचें काम प्रांतिक सरकारकडे (सोंपीव खात्याकडे) सोंपविलें असल्यामुळें या मध्यवर्ती खात्याला देखरेख व सल्ला देण्याखेरीज विशेष काम नसतें. एखाद्या धंद्याला उत्तेजन देणें, औद्योगिक आणि धंदेशिक्षणाची सोय करणें, कच्च्या पदार्थावर प्रयोग करून संशोधन करणें व त्याचा धंद्याला उपयोग करून देणें या गोष्टी प्रांतिक हिंदी दिवाणांकडे दिल्या आहेत. पण प्रत्येक प्रांतांत काटकसरीची कात्री लागल्यानें दिवाण फारसें कांहीं करूं शकत नाहींत हा मुंबई प्रांताचा अनुभव सर्वत्र लागू पडण्यासारखा आहे.

हिंदी धंद्यांनां सरकारी उत्तेजन मागणीच्या रूपानें मिळावें म्हणून औद्योगिक कमिशनच्या शिफारसीवरून सरकारला व रेल्वेला लागणारा देशी माल विकत घेण्यासाठीं एक इंडियन स्टोअर्स डिपार्टमेंट म्हणून खातें उघडलें. हें खातें विकत घ्यावयाच्या मालाची तो तयार होत असतांना तपासणी करतें व योग्य वाटणाऱ्या मालाची खरेदी करतें. याच्या प्रांतिक शाखाहि आहेत. १९२४ सालीं या खात्यामार्फत कापडी माल १.२७ कोटी रुपयांचा व यांत्रिक माल १.०८ कोटी रुपयांचा खरेदी झाला. हें खातें कारखानदारांनां व्यापारी सल्ला व माहिती

पुरवितें. तथापि हिंदी उद्योगधंद्यांची खरी पहाणी करावयाची तर प्रत्येक प्रांताकडे लक्ष दिलें पाहिजे व त्याची औद्योगिक तपासणी केली पाहिजे.

मुंबई.—या प्रांतांत पैशाच्या टंचाईमुळें व विद्यमान व्यापारधंद्यांच्या खालावलेल्या परिस्थितीमुळें प्रांतिक औद्योगिक खात्याला फारसें कांहीं करतां आलें नाहीं विणकामांत मात्र विणकऱ्यांनां नवीन सुलभ योजना पटवून देण्याचें काम यशस्वी झालेलें दिसतें. १९२४ सालीं कौन्सिलनें या खात्याचा डायरेक्टरहि कमी केला व त्यामुळें को-ऑपरेटिव्ह रजिस्ट्रारकडे हें खातें सांभाळण्यास दिलें आहे. रंगकाम व चिटांची छपाई यांचें मात्र शिक्षण देण्याची व्यवस्था कायम आहे. प्रांतांचा मुख्य धंदा म्हणजे शेतकी आहे व शेतकीखातेंहि निराळें स्वतंत्र आहे.

मध्यप्रांत.—येथील औद्योगिक खात्याच्या मदतीला एक सल्लागार मंडळ आहे. पैशाच्या अभावामुळें मुंबई प्रमाणें येथील स्थिति आहे. नवीन योजना मुळींच नाहींत. नाहीं म्हणावयास नागपूरला एक कातडीं कमावण्याची शाळा उघडली आहे.

मद्रास.—या प्रांतांत सरकारनियुक्त औद्योगिक मंडळाच्या शिफारसीवरून सरकार धंद्यांनां मदत देत असतें. पण हें मंडळ फारशा शिफारसी, धंद्याची परिस्थिति किंवा योजना मंडळाच्या कक्षेबाहेरच्या आहेत म्हणून करीतच नाहीं. सरकारचें मुख्य लक्ष रेशमाच्या धंद्याकडे सध्यां आहे. व्यापारी व औद्योगिक माहिती देणारी एक सरकारी संस्था आहे. जरतार व कशिद्याचें काम यांची वाढ करण्याकरितां सरकारनें एक अधिकारी नेमला आहे. कांहीं सरकारी कारखानें मद्रास प्रांतांत आहेत; उदा. कालिकत येथील केरळ सोप इन्स्टिटयूट, फ्रूट प्रिझर्व्हिंग इन्स्टिटयूट, इत्यादि औद्योगिक शिक्षणाच्या शाळाहि चांगल्या आहेत.

बंगाल.—या प्रांतांत इतर प्रांतांप्रमाणें पैशाचें दुर्भिक्ष असूनहि औद्योगिक खात्यानें चांगलें काम केल्याचें आढळून येतें. कातडीं कमावणें, लाख शुद्ध करणें, आगकाड्या करणें वगैरे धंद्यांत चांगलें उपयुक्त संशोधनहि झालें आहे. गुंडया तयार करणारे, शिंपांवर काम करणारे, तेलें शुद्ध करणारे व इतर लहान लहान धंदे करणाऱ्यांनां सरकारनें मदत दिलेली आहे. शिवाय धंदेवाइकांनां उपयुक्त असें प्रयोगद्वारां शिक्षणहि देण्यांत येत असतें. लहान व घरगुती धंद्यांची तपासणी करून सरकारनें तयार केलेला अहवाल फारच मननीय झाला आहे.

बिहार व ओरिसा.—येथील औद्योगिक मंडळानें आगकाड्यांचा प्रायोगिक कारखाना काढणें, छोटानागपूरमध्यें घायपात व यंत्र्यांचा धंदा कसा चालेल याची पहाणी करणें, टसरच्या धंद्यांत खाजगी धंदेवाइकाला मदत करणें यासारख्या गोष्टी या मंडळानें १९२४—२५ सालीं केल्या होत्या. याशिवाय डायरेक्टर ऑफ इन्डस्ट्रीज सारखे सरकारी नोकर खाजगी धंदेवाइकांनां हरएक प्रकारची—विशेषतः यंत्रांच्या उपयोगांत—मदत करीत असतात व या मदतीचा लोकांनां फारच उपयोग होतोसा दिसतो. या प्रांतांत धंदेशिक्षणाकरतां बिहार कॉलेज ऑफ इंजिनियरिंग ही संस्था सरकारनें उघडली आहे. या प्रांतांतील भागलपूरच्या रेशमाला साम्राज्य प्रदर्शनांत मोठी मागणी होती. तेव्हां या प्रांतांतून बरेंचसें रेशीम निर्गत होत जाईल असें वाटतें.

संयुक्तप्रांत.—या प्रांतांत औद्योगिक शिक्षणाच्या शाळा व कॉलेजें बरींच आहेत व यांतून शिकून बाहेर पडलेले विद्यार्थीहि बेकार नाहींत. दिवसां कामावर असणारे बरेचसे कारागीर रात्रींच्या शाळांतून आपापल्या धंद्यांतील शिक्षण घेत असतात व अशा कारागीर विद्यार्थ्यांची संख्या वाढती आहे. येथील औद्योगिक खात्याचाहि, धंद्यांचें प्रायोगिक शिक्षण देऊन प्रांतांतील उद्योगधंदे ऊर्जितावस्थेस आणण्याचा प्रयत्न चालू आहे. ब्रिटिशसाम्राज्य प्रदर्शनांत येथील व्यापारी—कारखानदारांनीं सुमारें १० लाख रुपयांचा माल खपविला. तथापि प्रांतिक सरकारची अशी कुरकूर आहे कीं, सुशिक्षित तरुण सरकारी नोकरींत किंवा वकिलीच्या धंद्यांत पडतात व धनिक लोक आपला पैसा व्यवहारांत न गुंतवितां जमीनींत घालतात.

पंजाब.—या प्रांतांतील मॅक्लॅगन इंजिनिअरिंग कॉलेज चांगलें सुधारलें आहे. शाहायारा येथील कारखाना प्रायोगिक शिक्षणाकरितां आतां पुरा झाला आहे. अटक ऑईल कंपनी पेट्रोल, केरोसिन व इतर तेलें मोठ्या प्रमाणांत काढीत असून पंजाबांत तरी तेलाचा व्यापार सर्वस्वी हिच्या हातीं आला आहे. पंजाब आर्ट्स अँड क्रॅफ्ट्स डेपोनेंहि कारागिरांचा संबंध जगाच्या बाजाराशीं नेऊन भिडविला असून प्रांतिक कारागिरींत बरीच सुधारणा घडवून आणली आहे.

याप्रमाणें हिंदुस्थानसरकारनें १९२४–२५ सालचा देशाचा एकंदर औद्योगिक अहवाल पार्लमेंटला सादर केला होता. हंसक्षीरन्यायानें यांतून देशाच्या औद्योगिक उन्नतीचा आढावा काढून घेतां येण्यासारखा आहे.

शे त की चा धं दा–वरीलप्रमाणें प्रांतिक औद्योगिक स्थिति असतांनाहि मुख्य भर ज्याच्यावर आहे त्या शेतकीच्या धंद्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. हिंदी लोकांचा मुख्य पोटाचा धंदा म्हटला म्हणजे शेतकी होय. कारण प्रत्येक चार माणसांच्या गटापैकीं तीन माणसें प्रत्यक्ष शेतकीवर अवलंबून आहेत. तेव्हां कांहीं काळ तरी या शेतकीच्या धंद्याची वाढ करून देश उन्नतीला आणला पाहिजे. या देशांत शेतीला उपयोगी पडणाऱ्या नैसर्गिक गोष्टींची मुळींच वाण नाही पण योजक पाहिजेत. तसेंच शास्त्रीय योजना आणि मोठें भांडवल यांची मुख्य जोड या धंद्याला दिली पाहिजे. हल्लीं कांहीं श्रीमंत शेतकरी शेतीच्या कामीं शास्त्रीय उपकरणांची मदत घेत असतात व ही मदत त्यांनां फार किफायतशीरहि होते. पण बहुतेक शेतकरी वर्ग दरिद्री व रोख पैशांचें दुर्भिक्ष असलेला; तेव्हां यांत्रिक साधनांचा उपयोग कितीहि माहीत असला तरी त्याला कांहीं एक करतां येत नाहीं. त्याला आपल्या थोडक्याशा उत्पन्नावरच कसाबसा गुजराणा करावा लागतो व पावसाच्या आणि जमीनीच्या नैसर्गिक मगदुरावर निमूटपणें अवलंबून रहावें लागतें.

तेव्हां शेतकऱ्याला निदान उत्कृष्ट पीक तरी काढतां यावें म्हणून सरकारी शेतकी खात्याचा प्रयत्न असतो. पण पैशाच्या टंचाईमुळें आपणाला मनाजोगें आणि लोकांच्या डोळ्यांत भरण्यासारखें काम करतां येत नाहीं असें प्रत्येक प्रांतांतील शेतीखात्याचें म्हणणें असतें. वारिष्ठ शेतकीखातें पुसा येथें असून त्याचा वार्षिक खर्च सुमारें १२ लाख रुपये आहे; एकंदर प्रांतिक शेतकी खात्यांचा खर्च सुमारें एक कोटी रुपये आहे. पुसा येथें मोठी कृषिसंशोधनशाला असून सुशिक्षित शेतकरी करण्यासाठीं सर्व प्रांतांतून शेतकी कॉलेजें आहेत.तथापि अद्याप या सुशिक्षित पदवीधर शेतकऱ्यांचा देशाला मुळींच उपयोग होत नाहीं असें मोठ्या नाइलाजानें म्हणावें लागतें.

हिंदुस्थानांतील शेतीचा प्राचीन अर्वाचीन इतिहास, शेतकऱ्यांची स्थिति, हिंदुस्थानांत शेतीचा व्याप, येथील जमीनीचे प्रकार व त्यांतील पिकें, हवामान, रोग, पाण्यानें भिजणाऱ्या जमीनीचा तपशील, शेतीचीं जनावरें, आर्थिक दृष्ट्या शेतीची पहाणी वगैरे शेतीच्या आनुषंगिक अशा अनेक गोष्टींचें विवेचन ज्ञानकोशाच्या शरीरखंडांतील 'कृषि' या लेखांत (वि. १२, क. पृ. ६२१–६५४) केलेलें आढळेल. याखेरीज 'जमीनदार व कुळें' व 'जमीनमहसूल' हे लेखहि (ज्ञानकोश वि. १३) उपयोगी पडतील.

पुढील कोष्टकांत मुख्य पिकाखालीं किती जमीन होती व तीन वर्षांत किती पीक निघत असे हें दिसून येईल (आंकडे हजारांचे आहेत).

### पिकाखालीं असणारी जमीन व तींतील उत्पन्न

| | १९२१–२२ | | १९२२–२३ | | १९२३–२४ | |
|---|---|---|---|---|---|---|
| पिकाचें नांव | जमीन एकर | उत्पन्न | जमीन एकर | उत्पन्न | जमीन एकर | उत्पन्न |
| तांदूळ | ८१६६२ | ३३१६० टन | ८२४०१ | ३३७१६ टन | ७८२२७ | २८२९८ टन |
| गहूं | २८२०७ | ९८३० ,, | ३०८४४ | ९९८२ ,, | ३११७८ | ९७५४ ,, |
| ऊंस | २३९९ | २६१८ ,, | २७४० | ३०१४ ,, | २९१६ | ३०६६ ,, |
| अळशी | ३०११ | ४३६ ,, | ३३८२ | ५३३ ,, | ३७३० | ४६२ ,, |
| शिरसू व मोहरी | ६३९९ | ११६८ ,, | ६२०९ | १२०९ ,, | ६१३४ | ११५४ ,, |
| तीळ | ५७४६ | ५१८ ,, | ४९९२ | ४८१ ,, | ५०१८ | ४३१ ,, |
| भुइमूग | २१४४ | ९५९ ,, | २६३३ | १२३६ ,, | २७३१ | १०७८ ,, |
| कापूस | १८४९१ | ४४८५ गट्ठे | २१७९२ | ५०७५ गट्ठे | २३०८८ | ५०७५ ,, |
| ताग | १५१८ | ३९८५ ,, | १८०० | ५४०८ ,, | २७४१ | ६९९६ ,, |
| चहा | ७०९ | २७४२६३ पौंड | ७०७ | ३१०५९८ पौंड | ... | ... |
| कॉफी | १२७ | २०५८६ ,, | १३१ | २५४६७ ,, | ... | ... |
| रबर | १२४ | ९०५६ ,, | १२८ | ११९१२ ,, | ... | ... |
| नीळ | ३३४ | ६७ ,, | २८५ | ५२ ,, | १८५ | ३६ पौंड |

शेतींतआजचीप्रगति.—हिंदुस्थानच्या सर्व पिकांत मुख्य पीक तांदुळाचें आहे. तेव्हां त्या पिकांत सुधारणा करण्याची शेतकी खात्याची खटपट चालू आहे. त्याप्रमाणें गव्हांवरचे प्रयोग यशस्वी होत आहेत. मात्र साखरेची पैदास मागणीपेक्षां फारच कमी होत आहे. याकरतां हिंदी साखरेच्या कारखानदारांचा संघ व सरकार हे ऊंसाचीं शेतें व साखरेचे कारखाने यांत प्रयोग करून पहात आहेत. मुख्य धंद्याचें पीक म्हणजे कापसाचें; तेव्हां कापूस लांब धाग्याचा निघावा म्हणून इंडियन सेंट्रल कॉटन कमिटी खटपट करीत आहे व कापसांत होणारी भसळ बंद करण्यासाठीं कॉटन ट्रॅन्स्पोर्ट ॲक्ट नांवाचा कायदाहि तिनें पास करून घेतला आहे. त्याप्रमाणें सरकी काढण्याच्या व कापूस दाबण्याच्या कारखान्यांवरहि, तेथें अनिष्ट प्रकार होऊं नयेत म्हणून आपलें नियंत्रण ठेविलें आहे. तागाच्या बाबतींतहि नवीन उत्कृष्ट जाती निर्माण करण्याचे प्रयत्न चालले असून सणापासूनहि धागा काढण्याच्या बाबतींत यश येत आहे. तंबाखू उत्तम निघाल्यास आयात तंबाखूच्या मोठ्या मालाची पिछेहाट करतां येईल म्हणून तंबाखूच्या रोपांवर प्रयोग चालू आहेत. या सर्वांबरोबरच जमीनीची मशागत व निरनिराळीं खतें करण्याचाहि उद्योग चाललाच आहे. दुभत्याचीं जनावरें सुदृढ व जास्तींत जास्त उत्पन्न देणारीं होण्याकरितां त्यांची संकरनिर्मिति व खाण्यापिण्याची उत्तम निगा यांकडे लक्ष देण्यांत येत आहे. दुभत्याचा धंदाहि कसा किफायतशीर व परदेशांशीं स्पर्धा करण्यांत टिकाव धरून राहील असा होईल याचें शिक्षण त्या धंद्यांतील लोकांनां देण्यांत येत असतें. हल्लीं बरेच सुशिक्षित व पांढरपेशे लोक हा धंदा करीत असतात तेव्हां या दुभत्याच्या धंद्यांत तरी निदान हिंदुस्थान लवकर सरसावेल असें वाटतें. पाश्चात्त्य देशांतून सुधारलेलीं शेतकीचीं यंत्रें व उपकरणें दिवसानुदिवस मोठ्या प्रमाणावर येत आहेत व सरकारचेंहि या आयातीला उत्तेजन आहे व सरकारी इंजिनियर व यांत्रिक तज्ज्ञ हीं शेतकीचीं आयुधें कशीं वापरावींत याचें बहुधां मोफत शिक्षण शेतकऱ्यांनां देत आहेत. याकरितां शेतकीचीं प्रदर्शनें भरत आहेत व या सर्वांचा परिणामहि दिसून येत आहे. या बाबतींत निश्चित सरकारी धोरणहि ठरविण्यांत येऊन १९२६ च्या जानेवारी महिन्यांत एक बादशाही शेतकी कमिशन नेमण्यांत आलें. मार्क्विस ऑफ लिन्लिथगो हे याचे अध्यक्ष असून पांच हिंदी सभासद या कमिशनमध्यें आहेत. इंग्लंड व हिंदुस्थान या देशांत चोहोंकडे फिरून साक्षी घेण्याचें काम चालू आहे. हिंदुस्थानांतील शेतकीची व खेड्यांतील आर्थिक स्थितीची पहाणी करून शेतीची सुधारणा आणि खेड्यापाड्यांतील लोकांची उन्नत्ति करण्यासाठीं सूचना करण्याचें मोठें जबावदारीचें कार्य या कमिटीकडे आहे.

पाटबंधारे.—हिंदुस्थानांतील शेतकी सुधारण्यासाठीं पाटबंधाऱ्यांची अवश्यकता होती. प्राचीन काळापासून नदीचे कालवे काढून त्यांवर बरीच जमीन सुपीक करण्याची सररहा पद्धत आहे ('कालवे', ज्ञानकोश. शरीरखंड वि. १० पहा). आज हिंदुस्थानांत पाटबंधाऱ्यांची सोय इतकी झाली आहे कीं, जगांतील दुसऱ्या कोणत्याहि देशाला यापुढें हार खावी लागेल. विहिरींच्या पाण्यावरहि बरीच जमीन (सुमारें सव्वा कोटी एकर) भिजली जाते व हल्लीं विहिरींनां पंप लावण्याची युक्ति माहीत झाल्यापासून तर विहिरींचा बराच उपयोग करण्यांत येत असतो. पण ही खाजगी पाण्याची सोय झाली. सरकार पाणी देण्याची जी सोय करीत असतें ती तळीं व कालवे बांधून करते. हिंदुस्थानांत तळीं असंख्यात आहेत. नुसत्या मद्रास इलाख्यांत ३५००० वर अशीं शेती—बागायतीच्या उपयोगी पडणारीं तळीं आहेत व त्यांवर वीस–तीस लाख एकर जमीन भिजते. कालव्यांचे दोन प्रकार आहेतः अखंड प्रवाहाच्या नद्यांपासून काढलेले व पाण्याचा कृत्रिम सांठा करून त्यापासून काढलेले. पहिल्या प्रकारचे कालवे हिमालयापासून उगम पावणाऱ्या नद्यांपासून काढलेले आहेत; कारण या नद्यांनां उन्हाळ्यांत देखील बर्फामुळें पाणी असतें. दुसऱ्या प्रकारचे कालवे दक्षिणेंतील होत. १९१९ चा सुधारणांचा कायदा अंमलांत आल्यापासून पाटबंधाऱ्यांच्या कामावर प्रांतिक राखीव खात्याची सत्ता ठेवली. फक्त ५० लाख रु. च्या वरील काम हिंदुस्थानसरकारकडे जाऊन त्यानें त्याबद्दल सेक्रेटरी ऑफ स्टेटची संमति घ्यावी लागते.

१९२३–२४ सालीं पाटबंधाऱ्याखालील एकंदर जमिनीचें (संस्थानी प्रदेश वगळून) क्षेत्रफळ पावणेतीन कोटी एकर होतें. म्हणजे पिकाच्या जमीनीपैकीं शेंकडा १२ असें हें प्रमाण पडलें. एकंदर लहानमोठ्या कालव्यांची लांबी सुमारें ६७००० मैल होती व सरकारनें ज्यांनां पाणी पुरविलें आहे अशा पिकांची किंमत सुमारें

## १९२४–२५ सालचा पाटबंधाऱ्याच्या कामाचा आढावा

| प्रांत | पाटाचें क्षेत्र–मैल कालवे मोठे | लहान | पाटाखालची जमीन–एकर | एकंदर खर्चीं भांडवल–रुपये | एकंदर जमा रुपये | कामास झालेला खर्च–रुपये | निव्वळ उत्पन्न रुपये | खर्चाशीं शें. प्र. | सरासरी खर्चावरील व्याज | कामाच्या खर्चाचें जमेशीं शें.प्र. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उत्पादक कामें— | | | | | | | | | | |
| मद्रास | ४०४९ | ८३०३ | २१४०८६२ | ७१९३४४५६ | १२८१६८२१ | ४३९८४६० | ८४१८३६१ | ११.७ | २३२५७१३ | ३४.३२ |
| मुंबई | ५६९८ | ७९४ | २८४८२४० | ९४१४२५०४ | ७७४४०१० | ३८८३४७२ | ३८६०५३८ | ७.१३ | १९३१५९७ | ५०.१५ |
| संयुक्तप्रांत | १४५९ | ८८०५ | २०७२९८९ | १४०८१६५५० | १११४३७६१ | ४६८४५४५ | ६४५९२१७ | ४.५९ | ५००१५२९ | ४.२०४ |
| पंजाब | ३४३८ | १३११९ | १०२८६८१० | २६२३०६५०९ | ६०६२९८७१ | १६३७५८७६ | ४४२६३९९५ | १६.८७ | ९११६८४५ | २७.०१ |
| ब्रह्मदेश | ३२२ | ८३२ | ३८२४८५ | २४८१५१६५ | २०१४६३१ | ९३३२०८ | १०८१४२३ | ४.३६ | ८६९८९८ | ४६.३२ |
| मध्यप्रांत | २२१ | ८४६ | २०७३७० | १९३१८१८४ | ३५४२२७ | ५१८४२४ | –१६४१९७ | .... | ८४६२२० | १४६.३५ |
| वायव्य सरहद्द प्रांत | ८८ | २०० | २०३५०७ | ५६७२७९८ | ९२९५४५ | २२५५५१ | ७०३९९४ | १२.४१ | १८४१०९ | २४.२६ |
| एकूण | १५२७५ | ३२८९९ | १८१४२२६३ | ५७९००६१६६ | ९५६३२८६७ | ३१०१९५३६ | ६४६१३३३१ | ११.१६ | २०२७६४११ | ३२.४४ |
| अनुत्पादक कामें— | | | | | | | | | | |
| मद्रास | ७५१ | ७०५ | १७७९२२ | ४०४६२१८४ | ८३२४४१ | ४२३५८९ | ४०८८५२ | १.०१ | १३४६२८० | ५०.८९ |
| मुंबई | ८१९८ | ११०६ | ६३८४७६ | ९८०८६०१६ | ३३६०२२७ | २२३९१८९ | ११२१०३८ | १.१४ | ३७८८५७९ | ६६.६४ |
| बंगाल | ६९ | २५४ | ७६२३५ | ८४९६२१३ | २६८२१९ | १८३८३५ | ८४३८४ | ०.९९ | २७६४०६ | ६८.५४ |
| संयुक्तप्रांत | ४२८ | १३६२ | २१०४४१ | २९३५९८४७ | ५४१२२७ | ८२४६८८ | –२८३४६१ | .... | १०२४३५० | १५२.३७ |
| पंजाब | १६० | १५२ | १०२४८० | ६१४०८१ | २१९९३४ | १५६१६६ | ६३७६८ | १०.३८ | २०३०९ | ७१.०० |
| ब्रह्मदेश | ... | ... | ... | २७४०८६ | ... | ... | .... | ... | ९१३१ | |
| बिहार–ओरिसा | ७६४ | २७५२ | ८२४४८६ | ६२७०५४४३ | ३३३८२०४ | १८१६१३२ | १५२२०७२ | २.४३ | २०३८४५० | .... |
| मध्यप्रांत | ६९ | १४०२ | १९९४२६ | ३१६५७५०६ | ५७७९५७ | ५२९७९३ | ४८१६४ | ०.१५ | १३०७९८४ | ५४.४० |
| वायव्य सरहद्द प्रांत | १४४ | ३४६ | १५२०४९ | २३०२७९६३ | ७१३९४७ | ३९५७१९ | ३१८२२८ | १.३८ | ७८४८३९ | ९१.६७ |
| राजपुताना | ... | ... | ... | ३५४७९३३ | ८५९०९ | ८५३४० | ५६९ | ०.०२ | ११५०३९ | ५५.४३ |
| बलुचिस्तान | ८ | ७१ | २२९१६ | ३१७०६६८ | ७३८३२ | ४९८२९ | २४००३ | ०.७६ | ११४१८३ | ९९.३४ |
| एकूण | ४२९१ | ८१५० | २४०४४३१ | ३०१४०१९४० | १००११८९७ | ६७०४२८० | ३३०७६१७ | १.०९ | १०८२५५५० | ६७.४९ |
| अखिल भारतीय | १५९० | ... | ७७८३१५ | ५५४३६९७३ | २८४६४८३ | २५६९३८६ | २७७०९७ | ०.५ | २३५६६७५ | ६६.९६ |
| बंधारे वगैरे कामें | | | | | | | | | | ९०.२६ |
| १९२४–२५ | २१११५६ | ४१०४९ | २१३३५००९ | ९३५८४५०७९ | १०८४९१२४७ | ४०२९४२०२ | ६८१९८०४५ | ७.२९ | ३३४५८६३६ | ३७.१४ |

१४७⅓ कोटी रु. होती. सर्व प्रांतांपैकीं पंजाबांत जास्त पाटबंधारे आहेत, म्हणजे एक कोटी एकर जमीन त्यांवर भिजते. याखेरीज सुमारें सहा लाख एकर जमीन संस्थानांतून आहे. पंजाबच्या खालोखाल मद्रास इलाखा येईल; त्यांत सुमारें पाऊण कोटी एकर जमीन भिजते. नंतर सिंध (सुमारें ३९ लक्ष एकर) व शेवटीं संयुक्तप्रांत; यांत सुमारें २० लक्ष एकर पाटबंधाऱ्यांपासूनच्या पाण्याखालीं आहे. या सर्व पाटबंधाऱ्यांच्या व त्यांच्या आनुषंगानें चालणाऱ्या कामाकरितां १९२३–२४ अखेर सुमारें ९० कोटी रुपये खर्च झालेले आहेत. यांपासून उत्पन्न १०·६९ कोटी रुपये होतें तर खर्च ३.७७ कोटी रु. होता. म्हणजे गुंतविलेल्या भांडवलावर फायदा ७.७० टक्के पडला.

शरदा–किच्चा आणि शरदा–अयोध्या कालवा, सतलज कालवे, लाईड (सक्कर) बॅरेज नीराव्हॅली डेव्हलपमेंट प्रॉजेक्ट, कावेरी रेझर्व्हायर प्रॉजेक्ट, हीं मोठालीं नवीन कामें चालू आहेत. हीं पुरीं झाल्यास चार कोटी एकर जमीन भिजूं लागेल. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील पाटबंधाऱ्यांवर भिजणारी जमीन, पाटाची लांबी, त्यास लागणारा खर्च वगैरेंचें कोष्टक मागील पृष्ठावर दिलें आहे.

इ त र उ द्यो ग धं दे.–शेतीच्या खालोखाल मुख्य धंदा म्हणजे कापड विणण्याचा होय. त्यानंतर रेशीम तयार करणें व विणणें, शाली व गालींचे विणणें, लांकूड कातणें, आणि धातुकाम करणें, हे देशी धंदे होत. शेतीच्या धंद्याला जोडूनच पण सर्वस्वी यूरोपियन लोकांच्या हातीं असणारा धंदा म्हणजे चहाचा. या चहाच्या मळ्यांवर काम करणारे लोक सुमारें आठ लाख आहेत. बरेचसे लोक स्वतः धंदे करीत नसून कोणत्या ना कोणत्या तरी कारखान्यांत काम करीत असतात. फॅक्टरी ॲक्टाखालीं येणाऱ्या कारखान्यांतून १९२२ सालीं पुढील कोष्टकांत दाखविल्याप्रमाणें लोक काम करीत होते.

## फॅक्टरी ॲक्टाखालील कारखाने व कामकरी लोक

| धंद्याचा प्रकार | कारखान्यांची संख्या | लोकांची संख्या (आंकडे हजारांचे) |
|---|---|---|
| सूत काढण्याच्या व विणण्याच्या गिरण्या | २६४ | ३२७ |
| तागाच्या गिरण्या | ८९ | ३२० |
| सरकी काढणें व कापूस दाबण्याच्या गिरण्या | १६३२ | १२२ |
| रेल्वे व ट्राम्वे कारखाने | १०८ | १४९ |
| तांदुळाच्या गिरण्या | ९३१ | ५५ |
| इंजिनिरिंग कारखाने | २०९ | ३८ |
| हत्यारें–दारूगोळा कारखाने | ६ | ११ |
| छापखाने | १९३ | ३१ |
| कातड्याचे जिन्नस व कातडीं कमावणें | ३९ | ८ |
| ताग दाबण्याचे कारखाने | ११४ | २८ |
| कौलें–विटांच्या गिरण्या | ४७ | ७ |
| गोद्या–पोर्टट्रस्टचे कारखाने | २१ | २१ |
| चहाचे कारखाने | २६५ | १६ |
| लोखंड–पोलादाचे कारखाने | ६६ | ४१ |
| लांकूड करवतणें–गिरण्या | १७४ | १७ |
| पेट्रोलचे कारखाने | १६ | १३ |
| लोंकरीच्या गिरण्या | १० | ७ |
| साखरेच्या गिरण्या | ४० | १३ |
| दगडांचे कारखाने | ६ | ३ |
| तेलाच्या गिरण्या | १५८ | ८ |
| केरोसिनचे डबे भरण्याचे कारखाने | २९ | ९ |
| तंबाखूचे कारखाने | १६ | ३ |
| कागदाच्या गिरण्या | ७ | ५ |
| लाखेचे कारखाने | ९ | २ |
| रबराचे कारखाने | ... | ... |
| रेशमाच्या गिरण्या | ५ | १ |
| इतर | ७०२ | ११० |
| एकूण | ५१४४ | १३६१ |

या कोष्टकावरून कोणत्या कारखान्यांत कामाकरितां जाण्याकडे लोकांचा ओढा असतो व कोणत्या धंद्याला किती माणसें लागतात हें दिसून येईल. लोकसंख्येवरून उतरता अनुक्रम असा लागतो:–कापसाचें सूत व कापड काढणें, तागा तयार करणें, रेल्वे, ट्रामवे, जिन प्रेस, इंजिनियरिंग, तांदूळ, कौलें, विटा, तागप्रेस, छापखाने, गोद्या वगैरे, लोखंड, पोलाद, हत्यारें, दारूगोळा, लांकूड करवतणें, कातडीं, साखर, तेलें, पेट्रोल, दगड, दोर, रेशीम, लाख, लोंकर, राकेल डबे, रबर,

चुना, गाड्या करणें, मोटार नीट करणें, कागद, भांडीं, पीठ, तंबाखू, व सिमेंट. यावरून लोकांचे उपयोगाचे प्रकारहि कळतील. आतां यांवरील कारखान्या खेरीजहि लोक निरनिराळ्या खात्यांत नोकरींत आहेत. तेव्हां लोकांच्या एकंदर उद्योगाचें कोष्टक पाहूं.

## निरनिराळ्या उद्योगांतील लोक

उद्योगधंद्याच्या दृष्टीनें हिंदुस्थानांतील लोकांचें १९२१ सालीं खालील प्रमाणें र्गीकरण लावतां येईल (आंकडे हजारांचे).

| धंद्याचें नांव | लोक |
|---|---|
| कुरण राखण व शेतकी | २२९०४५ |
| मच्छीमार व पारध | १६०७ |
| खाणी व मीठ वगैरे | ५४२ |
| उद्योगधंदे— | ३३१६७ |
| कापड | ७८४८ |
| कपडे वगैरे | ७४२९ |
| लांकूड | ३६१४ |
| खाद्यपदार्थ | ३१०० |
| कुंभारकाम | २२१५ |
| इमारतबांधकाम | १७९४ |
| धातुकाम | १८०२ |
| रासायनिक वगैरे | ११९४ |
| कातडें वगैरे | ७३१ |
| इतर व्यापार | ३४८४ |
| वाहतुक (पोष्ट व तारायंत्र यांसह) | ४३३१ |
| व्यापार-उदीम- | १८११५ |
| उपहारगृहें (खाद्यपदार्थांचा व्यापार) | ९९८९ |
| कापडव्यापार | १२८६ |
| बँका, विमाकंपन्या वगैरे | ९९३ |
| इतर व्यापार | ५८४६ |
| लष्कर व आरमार | ७९८ |
| विमानदल | १ |
| पोलीस | १४२३ |
| सार्वजनिक खातीं | २६४४ |
| सुशिक्षित धंदे व कला यांकडे | ५०२१ |
| धर्म | २४५८ |
| शिक्षण | ८०५ |
| वैद्यक | ६६० |
| इतर | १०९८ |
| घरगुती कामें | ४५७० |
| इतर सर्व | १४८३२ |
| एकूण | ३१६०५९१ |

कंपन्या:—व्यापार—उदीम करण्यासाठीं सुधारलेली पद्धत म्हणजे कंपन्या स्थापून त्या रजिस्टर करून घेणें. समाईक भांडवलाच्या कंपन्या वाढल्या आहेत. १९२२ सालच्या मार्च अखेर समाईक भांडवलाच्या रजिस्टर कंपन्या हिंदुस्थानांत ५१८९ असून त्यांचें वसूल झालेलें भांडवल २३० कोटी रुपयांवर होतें.

**हिंदुस्थानची भिन्नभिन्न शास्त्रीय पाहणी**(सायंटिफिक सर्व्हे):—देशाची सर्वांगीण उन्नति,—विशेषत: औद्योगिक—व्हावी म्हणून सुशिक्षित सरकार निरनिराळ्या दृष्टींनीं देशाची पहाणी करीत असतें. या पद्धतीला अनुसरून हिंदुस्थानसरकारनें पुढील पहाणी केलेली आहे.

**व न स्प ति वि ष य क प हा णी** (बोटॅनिकल सर्व्हे):—हिंदुस्थानसरकारचें बोटॅनिकल सर्व्हे डिपार्टमेंट या खात्याच्या डायरेक्टरच्या नियंत्रणाखालीं असून त्याच्या मदतीला दुसरे तीन अधिकारी आहेत. ते वनस्पतींची तपासणी करून सारूप्य ठरविण्याचें काम करीत असतात. या डायरेक्टरच्या ताब्यांत ब्रह्मदेशांतील सिंकोना झाडांचे मळेहि असतात. महायुद्धानंतर औद्योगिक धोरण ठरवितांना हिंदुस्थानसरकारनें १९१६ सालींच असें ठरविलें कीं, हिंदुस्थानांत सिंकोना झाडाची लागवड वाढविण्यास शक्य ते सर्व प्रयत्न केले पाहिजेत म्हणून हिंदुस्थानच्या बोटॅनिकल सर्व्हेचा माजी डायरेक्टर कर्नल ए. टी. गेट यास सिंकोनाच्या लागवडीकरितां योग्य जमिनी शोधण्यासाठीं नेमलें. त्यानें १९१८ मध्यें केलेल्या शिफारशीनुसार ब्रह्मदेशांतील तत्रोई जिल्हा या लागवडीकरतां राखून ठेवून १९२० सालीं प्रथम लागवडीच्या कामास सुरवात करण्यांत आली. दरसाल ५ शें एकर जमिनीवर लागवड करण्याचें ठरून १९२८ सालापासून दरसाल ९० हजार पौंड उत्पन्न होईल असा अजमास ठरला. पण १९२१—२२ सालच्या अतिवृष्टीनें ही सर्व लागवड वाहून गेली आणि या जिल्ह्यांतील योजना बंद करण्यांत येऊन ब्रह्मदेशांतील मेर्गुइ जिल्ह्यांत १९२२ सालीं लागवड सुरू करण्यांत आली. या सिंकोना लागवडीची वाढ समाधानकारक असल्याचें प्रसिद्ध झालें आहे.

पुढें काटकसर कमिटीनें सांगितल्यावरून पहिलीं चार वर्षें दरसाल २५० एकरच लागवड करण्याचें ठरलें. त्यायोगें १९३० पासून ४५ हजार पौंड उत्पन्न होईल

असा अंदाज आहे. शिवाय हिंदुस्थानसरकारच्या सांगण्यावरून बंगाल व मद्रास सरकारनें वाढ करण्याचें काम चालविलें असून बंगाल्यांत दरसाल २०० एकर, मद्रासेंत २३० एकर व हिंदुस्थानसरकारची दरसाल २९० एकर याप्रमाणें वाढ सुरू रहाणार आहे. या एकंदर लागवडीपासून दरसाल उत्पन्न एक लक्ष वीस हजार पौंड होईल असा अंदाज असून हिंदुस्थानांत दरसाल एकंदर खप एक लक्ष सोळा हजार पौंडांचा आहे.

हिंदुस्थानांत या औषधाला मागणी किती आहे याचा अंदाज करणें कठिण आहे. मलेरिया तापाचे ऐंशी लक्ष रोगी दवाखाने व रुग्णालयें यांमध्यें दरसाल औषधांकरितां जातात. व प्रत्येक रोग्याला कमींतकमी ११० ग्रेन क्विनाईन लागतें, या हिशोबानें या औषधाचा एकंदर खप दरसाल एक लक्ष पंचवीस हजार पौंड आहे. तथापि प्रत्येक रोग्याला वास्तविक जरूर तितकें क्विनाईन मिळत नाहीं कारण त्याची किंमत फार असते. दवाखान्यांत न जाणाऱ्या मलेरियाच्या रोग्यांची संख्या दहा कोटी आहे म्हणून क्विनाईनचा खप पंधरा लक्ष पौंडपर्यंत वाढण्याचा संभव आहे. इटलीमध्यें १९०२ सालीं सिंकोनाच्या लागवडीचा धंदा जेव्हां सरकारनें आपल्या हातीं घेतला तेव्हां क्विनाईनची किंमत उतरून खप पुष्कळ वाढला आणि मलेरियापासून होणाऱ्या दरसाल मृत्यूंची संख्या पंधरा हजारांवरून तीन हजारांवर आली. हिंदुस्थानसरकारच्या पब्लिक हेल्थ कमिशनरनें आपल्या वार्षिक रिपोर्टांत असें म्हटलें आहे कीं, क्विनाईनचा खप पांच लक्ष पौंड होऊं लागेपर्यंत रोगाच्या प्रतिकाराचा प्रश्न बरोबर सुटला असें म्हणतां येणार नाहीं.

भू स्त र शा स्त्री य प हा णी.—हिंदुस्थानांतील भूस्तरशास्त्रीय पहाणीचा अंतिम हेतु हिंदुस्थानचा भूस्तरशास्त्रीय नकाशा तयार करणें हा आहे. कारण अशा प्रकारचा बिनचुक नकाशा तयार करण्यावर भूस्तर शास्त्रविषयक बऱ्याच प्रश्नांचा निकाल लागणें अवलंबून आहे. या खात्याकडून जी माहिती प्रसिद्ध होते तिला नकाशे जोडलेले असतात. या नकाशांच्या मदतीनें खाणी खणण्याचा धंदा करणाऱ्या मालकांनां व इंजिनियरांनां सर्व प्रास्ताविक माहिती मिळते देशाची सामान्य पहाणी आणि भूस्तरविषयक नकाशा करण्याचें काम चालू असतांना महत्त्वाचीं खनिज द्रव्यें बऱ्याच वेळां आढळून येतात. हे शोध ताबडतोब प्रसिद्ध करण्यांत येतात आणि कंपन्यांनां शोध लागलेल्या ठिकाणीं खाणी खणण्याचें काम हातीं घेण्यास प्रवृत्त करण्यांत येतें. खनिज द्रव्यें, खडक आणि प्रस्तरावशेष (फॉसिल्स) ह्यांचा संग्रह करून तीं हिंदुस्थानांतील पदार्थसंग्रहालयांत प्रदर्शनांकरितां ठेवतात. कोणी खासगी संशोधकानें खनिज द्रव्यें, दगड आणि प्रस्तरावशेष या खात्यकडे पाठविल्यास त्यांची तपासणी करून त्याची जात ठरविण्याचें काम हें खातें करतें. या खात्याकडून प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांत मेमॉइअर्स, रेकार्ड्स व पॅलेऑँटॉलॉजिया इंडिका यांचा समावेश होतो.

प्रा णि शा स्त्र वि ष य क प हा णी.—या प्रकारची पहाणी करण्याची योजना १९१६ सालीं अमलांत आली. स्टेटसेक्रेटरीनें पुढील सूचना मंजूर केल्याः— या खात्याचें मुख्य ठिकाण इंडियन म्युझियम हें राहील. इंडियन म्यूझिअममधील झुऑलॉजिकल आणि अँथ्रॉपॉलॉजिकल सर्व्हे हें खातें हिंदुस्थानसरकार आपल्या हातीं घेणार आणि त्यामार्फत प्राणिशास्त्रविषयक संशोधन चालू ठेवणार. अँथ्रॉपॉलॉजिकल सेक्शन इंडियन म्यूझियमच्या ट्रस्टींच्या ताब्यांत रहाणार. झुऑलॉजिकल सर्व्हे हें खातें हिंदुस्थानांत प्राणिशास्त्रविषयक जो संग्रह आहे त्याचें संरक्षक बनणार. त्याच्याकडे येणाऱ्या प्राणिविषयक नमुन्यांची तपासणी करून त्याची जात ठरविण्याचें काम शक्य तितकें हिंदुस्थानांतील तज्ज्ञांकडून करविणार व ज्या विषयाचे तज्ज्ञ येथें नसतील त्या प्रकारचें काम परदेशच्या तज्ज्ञांकडून करवून घेण्याची व्यवस्था करणार. या खात्याचा डॉ. ॲनन्डेल हा डायरेक्टर होता तो वारल्यानंतर त्याच्या जागीं कांहीं दिवस डॉ. बेनीप्रसाद हा ॲक्टिंग प्रेसिडेंट होता. नंतर मेजर आर. बी. सेवेल यांस नेमण्यांत आलें (१९२४).

स स्त न प्रा णि वि ष य क प हा णी.—हिंदुस्थान, ब्रह्मदेश व सिलोनमध्यें सस्तनप्राणी कोठें कोठें आढळतात त्यासंबंधीं शक्य तितकी पूर्ण माहिती मिळविण्याच्या उद्देशानें हें खातें १९१२ सालीं स्थापन करण्यांत आलें. तसेंच बॉंबे नॅचरल हिस्टरी सोसायटीचें म्यूझियम, ब्रिटिश म्यूझियम आणि हिंदुस्थानांतील इतर नॅचरल हिस्टरीच्या म्यूझियम्स यांमधील संग्रहांत हिंदुस्थानांतील सस्तन प्राण्यांची अधिक भर घालणें हाहि एक आणखी उद्देश होता. १८९१ पर्यंत हिंदुस्थानांतील सदरहू शास्त्रज्ञांनां (नॅचरॉलिस्ट) डॉ. जेर्डनकृत मॅमल्स ऑफ इंडिया या १८७४ मध्यें प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांतील माहितीवर अवलंबून रहावें लागत असे. १८८४

मध्यें आर. ए. स्टर्नडेल यानें नॅचरल हिस्ट्री ऑफ इंडियन मॅमल्स हें पुस्तक प्रसिद्ध केलें, पण त्यांत डॉ.जेर्डनच्या पुस्तकांतल्यापेक्षां अधिक माहिती फारशी नव्हती. १८८१ मध्यें झोऑलॉजिकल सोसायटीचा ऑनररी सेक्रेटरी डॉ. स्लेटर यानें तयार केलेलें आणि डार्विन, हूकर, हक्सले व इतर सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ यांच्या सह्या असलेलें एक विनंतिपत्र हिंदुस्थानच्या स्टेट सेक्रेटरीकडे पाठविण्यांत आलें. हिंदुस्थानांतील प्राणिविषयक माहिती देणारी एक पुस्तकमाला तयार करावी व त्या कामावर डॉ. ब्लॅनफोर्ड याला संपादक नेमावें अशी शिफारस त्या विनंतिपत्रांत केली होती. १८८८–९० सालीं फॉना ऑफ ब्रिटिश इंडिया या पुस्तकमालेंतील सस्तनप्राणिविषयक ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत आला. त्यानंतर या विषयांत अधिक संशोधन होऊन नवे प्राणी सांपडले आहेत त्यांचें पृथक्करण व वर्गीकरण होऊन एतद्विषयक ज्ञानांत भर पडल्यामुळें ब्लॅनफोर्डचा ग्रंथ निरुपयोगी ठरला आहे. ही उणीव दूर करण्याकरितां ब्रिटिश म्यूझियमच्या अधिकाऱ्यांच्या सूचनेवरून बॅांबे नॅचरल हिस्ट्री सोसायटीनें हिंदुस्थानांतील सस्तन प्राणीविषयक पहाणी (मॅमल सर्व्हे) करण्याचें ठरवून त्याकरितां द्रव्यसाहाय्य देण्याबद्दल विनंतिपत्र काढलें. तदनुसार १९११ पासून १९२० पर्यंत एकलाखाहून अधिक रुपये फंड जमला. त्यांत हिंदी संस्थानिक, हिंदुस्थानसरकार, प्रांतिक सरकारें व इतर अनेकांनी-इंग्लंड व अमेरिकेमधील कांहीं संस्थांनीं–वर्गण्या दिल्या. महायुद्ध सुरू होण्याच्या सालापर्यंत सिंधचा कांहीं भाग, गुजराथ, कच्छ, काठेवाड, दक्षिण महाराष्ट्र, कानडा, मध्यप्रांतांतील कांहीं भाग आणि बंगाल व बहारमधील कांहीं जिल्हे या शिवाय कुमाऊन दार्जिलिंग, सिकीम, भूतानमधील कांहीं भाग, चिंदविन नदीकांठचा प्रदेश आणि सर्व सिलोन इतक्या मुलुखाची पद्धतशीर पहाणी पुरी झाली होती. या पहाणीमध्यें सुमारें १७००० नमुने जमा झाले होते. ते ब्रिटिश म्यूझियमकडे पाठविण्यांत आले. त्यांची प्राणिशास्त्रज्ञांनीं तपासणी करून तत्संबंधीं संशोधनविषयक माहिती बॅांबे नॅचरल हिस्ट्री सोसायटीच्या मासिकांत प्रसिद्ध करण्यांत आली. हे जे नवीन शोध लागले आहेत तत्संबंधीं पुस्तक लिहून तयार करण्याचें काम एम्. सी. हिंटन हे करीत आहेत. महायुद्ध संपल्यानंतर सदरहू पाहणीचें काम करण्याकरतां सी. झिमरोज यास आसाम व मेर्गुइ आर्चिपेलागोमध्यें पाठविण्यांत आलें व नंतर ग्वाल्हेर संस्थानांत पाठविण्यांत आलें. त्याशिवाय पूर्व घाट, कांग्रा जिल्हा, पंजाब सॉल्ट रेंज, दक्षिण हिंदुस्थान व नेपाळ या भागांची पहाणी करण्यांत आली. नंतर हिमालयाच्या पायथ्याच्या टेंकड्या आणि पिंडारी दरी येथें पहाणीचें काम हातीं घेतलें.

शा स्त्री य स ल्ला गा र मं ड ळ (बोर्ड ऑफ सायंटिफिक ॲडव्हाइस.–हें बोर्ड हल्लीं इंचकेप (काटकसर) कमिटीच्या शिफारशीवरून बंद ठेवण्यांत आलें आहे. या बोर्डांत मीटिऑरॉलॉजिकल, जिऑलॅाजिकल, बॉटॅनिकल, फॉरेस्ट व सर्व्हे डिपार्टमेंट यांचे वरिष्ठ अधिकारी, ॲग्रिकल्चरल आणि सिव्हिल व्हेटरिनरी डिपार्टमेंट्स यांचे प्रतिनिधी आणि इतर शास्त्रीय तज्ज्ञ होते. हें बोर्ड १९०२ मध्यें सरकारी शास्त्रीय संशोधनकार्यास सल्ला व मदत देण्याकरितां नेमलें होतें. गेल्या सालीं सिमला येथें भरलेल्या युनिव्हर्सिटीज कॉन्फरन्सनें हें बोर्ड पुन्हां अस्तित्वांत यावें अशी शिफारस केली आहे.

इं डि य न रि स र्च फं ड.–हा फंड व त्याची व्यवस्था पहाणारी ॲसोसिएशन यांच्यावरहि काटकसर कमिटीच्या धोरणामुळें प्रतिकूल परिणाम झाला आहे. शास्त्रीय संशोधनाचें कार्य हिंदुस्थानांत झपाट्यानें वाढत आहे. अफूच्या उत्पन्नांतून ९ लक्ष रुपये १९११ सालीं कसौली येथील सेंट्रल रिसर्च इन्स्टिटयूटमध्यें चालू असलेल्या साथीच्या रोगाविषयीं संशोधनाला देणगी म्हणून राखून ठेवण्यांत आले. या कार्याला मदत करण्याकरितां इंडियन रिसर्च फंड ॲसोसिएशन स्थापण्यांत आली. १९११–१२ सालीं सेंट्रल रिसर्च फंडाला सरकारनें आणखी ६ लक्ष रुपयांची देणगी दिली. १९१३–१४ सालीं हिंदुस्थानच्या उत्पन्नांतून दरसाल ९ लक्ष रुपये मलेरिया प्रतिबंधक उपायाकडे खर्च करण्याचें ठरलें. रिसर्चफंडाचें मेडिकल रिसर्च जर्नल नांवाचें नियतकालिक प्रसिद्ध करण्याचें ठरलें. यामध्यें हिंदुस्थानांतील वैद्यकीय आणि स्वच्छताविषयक संशोधनासंबंधीं माहिती प्रसिद्ध होते. १९२२ सालीं इंपीरियल मेडिकल रिसर्च इन्स्टिट्यूट ही इमारत ॲसोशिएशनच्या फंडांतून बांधण्याचें ठरलें. याच सालीं डॉ. निशिकांत दे यानें महारोगावरील औषधें, महारोग्याचें रक्त आणि त्याला प्रतिकार करणारे प्राणी यांचे रसायनशास्त्रीय संशोधनविषयक महत्त्वाचे शोध लावले. १९२२ सालीं निरनिराळ्या संशोधक तज्ज्ञांनीं चरणारा व्रण (कॅन्सर), इन्फ्लुएन्झा, न्यूमोनिया, काळा आजार व मलेरिया

रोगावर क्विनाईनचा परिणाम वगैरे प्रश्नांसंबंधीं संशोधनकार्य केलें.

हिंदुस्थानची पाहणी (सर्व्हे ऑफ इंडिया).—ह्या हिंदुस्थानच्या सर्व्हे खात्याला अनेक प्रकारचीं कामें करावीं लागतात तीं ट्रिग्नामेट्रिकल (त्रीकोणमितीभूमापन) पहाणी, टोपोग्रॅफिकल (स्थलवर्णनविषयक) पहाणी, जंगल पहाणी, आणि इतर विशिष्ट प्रकारच्या पहाण्या आणि संशोधन आणि नकाशे तयार करणें हीं कामें करावीं लागतात. कॅडेस्ट्रल (जमीनजुमल्याच्या आणि इतर इस्टेटीच्या सरकारी नोंदीसंबंधीं) पहाणी, प्रांतिक सरकारची लँडरेकॉर्ड्स अँड सेटलमेंट हीं खातीं करतात. १९०४ सालीं टोपोग्रॅफिकल सर्व्हेचे नकाशे सदोष असल्याचें आढळून आलें. आजतागाइतची बरोबर माहिती असलेला नकाशा तयार करण्याकरितां आणि वेळोवेळीं नव्या दुरुस्त्या करून नकाशे तयार करण्याकरितां दरसाल २१०००० रुपये अधिक खर्च करण्याचें आणि नकाशांच्या आकारांत आणि गुणांत सुधारणा करण्याचें ठरलें. सामान्यतः एक मैलास एक इंच, रिझर्व्ह फॉरेस्ट आणि इतर विशेष प्रकारच्या क्षेत्राकरितां एका मैलास दोन इंच, आणि ओसाड नापीक जमीनीला एक मैलास अर्धा इंच हें स्केल वापरण्याचें ठरलें. अलीकडील काटकसरीच्या धोरणामुळें या खात्याच्या कामालाहि बराच अडथळा आला आहे.

इंडियन सायन्स कॉंग्रेस.—ही कॉंग्रेस तिचे हल्लींचे ऑनररी जनरल सेक्रेटरी डॉ. जे. एल्. सीमन्सेग व पी. एस्. मॅक्महोन यांच्या प्रयत्नामुळें स्थापन झाली. या संस्थेचा जमाखर्च आणि दरसालच्या बैठकीच्या प्रसिद्धीचें काम यांची व्यवस्था बंगालची आशियाटिक सोसायटी करते. या संस्थेचे उद्देश—(१) शास्त्रीय संशोधनास उत्तेजन देणें आणि तत्संबंधीं झालेलें काम हिंदुस्थानांतील शास्त्रीय संशोधकांनां कळविणें, (२) शास्त्रीय संशोधनांत गुंतलेल्या लोकांची एकमेकांशीं मुलाखत व ओळख होण्यास संधि देणें व (३) शास्त्रीय संशोधनाच्या कार्याकडे सामान्य जनतेचें लक्ष वेधणें. या उद्देशानें ही कॉंग्रेस दरसाल निरनिराळ्या ठिकाणीं भरविण्यांत येते आणि त्यावेळीं कॉंग्रेसच्या कामासंबंधीं माहिती देण्याकरितां सायंकाळीं जाहीर व्याख्यानें करण्यांत येतात. या कॉंग्रेसच्या कामाला अधिकाधिक उत्साह व उत्तेजन प्राप्त होत आहे. कॉंग्रेसची बैठक दरसाल जानेवारी महिन्यांत भरते व ती सहा दिवस चालते. प्रांतिक सरकारचा वरिष्ठ अधिकारी (गव्हर्नर) हा कॉंग्रेसच्या पेट्रन असतो. आणि बैठकीचा अध्यक्ष सुरवातीचें मुख्य भाषण करतो. हा अध्यक्ष दरसाल निवडला जातो, व त्याची निवड पुढील शास्त्रीय शाखांच्या तज्ज्ञांमधून आळीपाळीनें होतें. शास्त्रीय शाखा पुढील प्रमाणें आहेत—(१) कृषि, (२) पदार्थविज्ञान व गणित, (३) रसायनशास्त्र व्यावहारिक (अलपाइड) व वनस्पतिशास्त्र, (४) प्राणिशास्त्र व मानववंशशास्त्र, (५) वनस्पतिशास्त्र, (६) भूस्तरशास्त्र, (७) वैद्यकीय संशोधन. मुख्य भाषणानंतर प्रत्येक शाखेंतील तज्ज्ञांची बैठक पृथक् पृथक् होते. प्रत्येक शाखेच्या बैठकीचा अध्यक्ष दरसाल निवडला जातो. बैठकीच्या दिवशीं सकाळीं निबंधवाचन व चर्चा आणि संध्याकाळीं सुप्रसिद्ध स्थळें पहाणें, जाहीर व्याख्यानें देणें वगैरे कामें होतात.

**शेतकी पतपेढ्या व सहकारी चळवळ, आवश्यकता.**—हिंदुस्थानच्या लोकसंख्येपैकीं शेंकडा ६० हून अधिक इसम शेतीवर उपजीविका करणारे आहेत. आणि अशा कोट्यवधि शेतकरी वर्गापैकीं बहुसंख्याक लोक केवळ हातावर पोट भरणारे आहेत. शेतकऱ्याचा धंदा आरोग्यदायक व उत्पादक स्वरूपाचा आहे आणि शेतकरी वर्ग हा प्रामाणिक व व्यवहारांत सरळ अशा स्वभावाचा असतो असा पूर्वापार लौकिक आहे. दुष्काळाच्या काळांत व आपद्ग्रस्त स्थितींत सांपडल्यावर कधीं कधीं हे लोक लबाड व नितीनियम न मानणारे बनतात. दारिद्र्यामुळें, शिक्षणाच्या अभावामुळें आणि दूरदृष्टि नसल्यामुळें यांनां वेळोवेळीं कर्ज काढण्याचा प्रसंग येतो. दरसाल शेतकीच्या कामाकरितां जनावरें व बियाणें विकत घेण्याकरितां, शेत जमीनीची दुरुस्ती करण्याकरितां, कुटुंबांतील लग्नकार्यादि समारंभांकरितां वगैरे प्रसंगीं शेतकऱ्याला गांवांतील सावकाराची मदत घ्यावी लागते. अशा प्रकारें काढलेल्या कर्जावर सावकारी व्याजाचा दर बराच भारी असतो. शिवाय इतर प्रकारेंहि सावकार कुळाकडून पैसा उकळतात, दस्तऐवज करून घेतांना त्यांनां लागणारा स्टँप वगैरेंचा खर्च शेतकऱ्यांनाच करावा लागतो. शेतकऱ्याला दारिद्र्य येण्याचें मुख्य कारण असें आहे कीं, शिक्षण व दूरदृष्टि नसल्यामुळें शेतकरी लोक आपल्या प्राप्तींतून शिल्लक ठेवण्याचा प्रयत्न मुळींच न करतां उधळेपणानें विवाहादि समारंभांत आणि मद्यपानादि व्यसनांत पैशाची उधळपट्टी करतात. शिवाय अशाहि गोष्टी ऐकण्यांत आहेत

कीं, थोडा फार पैसा शिल्लक राहिल्यास ते कोणास न कळवितां जमिनींत पुरून ठेवतात. त्यामुळें कुटुंबांतील कर्ता इसम मरण पावल्यावर तो पैसा त्याच्या कुटुंबीयांच्या हातीं लागत नाहीं. स्वतःची स्थिति सुधारावी अशा प्रकारची इच्छा किंवा ध्येय शेतकऱ्याला मुळींच नसतें. अशा प्रकारची ही शेतकरी वर्गाची दुःस्थिति नाहींशी करण्याला सहकारी पतपेढ्या हा अगदीं रामबाण उपाय आहे. कारण अशा संस्थेंत शेतकऱ्याला स्वतःची थोडी-फार शिल्लक ठेव म्हणून ठेवण्याची व तसेंच गरजेच्या प्रसंगीं अनेक प्रकारच्या सवलतींनीं व कमी व्याजानें कर्ज मिळण्याची सोय होते, काटकसरीनें वागण्याचें व स्वतः वरील जबाबदारी ओळखण्याचें शिक्षण मिळतें. या कारणास्तव सहकारी संस्था स्थापण्यास हिंदुस्थानांतील दरिद्री व कर्जबाजारी शेतकरी वर्ग हें फार चांगलें क्षेत्र आहे. विशेषतः शेतकरी वर्ग हा महत्त्वाचा उत्पादक वर्ग असल्यामुळें सहकारी पद्धतीनें कार्य करण्याचें तत्त्व या वर्गाला माहीत झाल्यास हल्लींपेक्षां शेतकीचें उत्पन्न वाढून शेतकरीवर्गाला प्राप्ति अधिक होऊं लागेल.

सहकारी पतपेढ्या शेतकऱ्यांकरितां काढण्याची योजना प्रथम सर डब्ल्यू. वेडरबर्न व न्या. रानडे यांनीं सुचविली, पण तिला त्या वेळच्या स्टेट सेक्रेटरींची संमति मिळाली नाहीं. पुढें लॉर्ड कर्झनच्या कारकीर्दींत कोऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायटीज् ॲक्ट (१९०४ सालीं) पास झाला. पण या कायद्याच्या अंमलबजावणीच्या वेळीं कांहीं दोष दिसून आल्यामुळें १९१२मध्यें सुधारलेला नवा कायदा करण्यांत आला. त्यांतहि अनुभवानें कांहीं दोष दिसले, ते दूर करण्याकरितां मुंबई कायदेकौन्सिलनें १९२४–२५ सालीं नवा कायदा केला. ('पेढया व पत' ज्ञानकोश, वि. १७, प, पृष्ठ १६७ लेख पहा).

**शेतीच्या पतपेढ्यांचें भांडवल.**—शहरांतील पतपेढ्यांपेक्षां खेडेगांवांतील शेतकऱ्यांच्या पतपेढ्या चालविणें हें काम फार अवघड आहे. म्हणून सहकारी चळवळीच्या प्रवर्तकांनीं आपलें सर्व लक्ष या कामाकडे लावलें. निरनिराळ्या प्रांतांत शेतीच्या पतपेढ्यांची (ॲग्रिकल्चरल सोसायटीज) रचना निरनिराळ्या प्रकारची होती. कांहीं सोसायट्यांच्या रजिस्टरांनीं पूर्ण 'रैफीसेन' पद्धति तर कांहींनीं 'लुझाटी' पद्धति स्वीकारिली. पंजाब, ब्रह्मदेश व संयुक्तप्रांत यांमध्यें अनियमित जबाबदारीची (अन् लिमिटेड लायाबिलिटी) सोसायटी, तिच्या सभासदत्वाची ठराविक फी, हिस्से विकून जमविलेलें कांहीं भांडवल आणि हिश्शांचें भांडवल वसूल करण्याकरितां हप्ते, या प्रकारच्या रचनेची सोसायटी हा नमुना सर्वसाधारण आहे आणि हाच नमुना हल्लीं बहुतेक सर्व हिंदुस्थानांत मान्य होत चालला आहे. कांहीं सोसायटींच्या नियमांत (बाय–लॉ) सभासदांनां सोसायटीचे सर्व हक्क व फायदे मिळण्याकरितां कांहीं ठेव ठेवणें अवश्य असतें. मुंबई व मध्यप्रांतांत हिश्शांनीं जमविलेलें भांडवल मुळींच नसतें, फक्त सभासदत्वाची फी असते. सोसायटीच्या व्यवहाराला लागणारें भांडवल कांहीं सभासदांनीं व इतर स्थानिक हितचिंतकांनीं ठेवलेल्या ठेवींमधून व बहुतेक भांडवल सेंट्रल व इतर कोऑपरेटिव्ह सोसायट्यांनीं दिलेल्या कर्जाऊ रकमेमधून उभारलें जातें. सर्व इलाख्यांत नव्या स्थापन झालेल्या सोसायट्यांनां आरंभींचें भांडवल पुरविण्याकरितां सरकार दरसाल कांहीं रक्कम कर्जाऊ देण्याकरितां म्हणून राखून ठेवितें. सामान्यतः ही सरकारकडून मिळणारी रक्कम सोसायटीनें ठेवींच्या रूपानें जमविलेल्या भांडवला इतकी असते. पूर्वीं सरकार अशा पतपेढ्यांनां देणगी रूपानें मदत करीत असे पण ती पद्धत हल्लीं बहुतेक बंद करण्यांत आली आहे. तथापि पतपेढ्यांच्या कार्यप्रगतीला अडथळा झाला नाहीं. अशा सोसायट्यांत गुंतलेल्या एकंदर १४ ३/४ कोटी भांडवलापैकीं १ १/२ कोटी भांडवल हिश्शांनीं जमविलेलें, २ कोटी गंगाजळी (रिझर्व), ३/४ कोटी सभासदांच्या ठेवी, १/४ सभासेदतरांच्या व सोसायट्यांच्या ठेवी, आणि ९ कोटी सेंट्रल कोऑपरेटिव्ह सोसायट्यांचें कर्ज अशा प्रकारें जमविलेलें कर्ज होतें. १/४ कोटी रुपये सरकार ॲडव्हान्स दिले. १९२३ सालापासून मुंबई सरकार लँड इंप्रुव्हमेंट लोन्स ॲक्टान्वयें प्रायमरी सोसायट्या आणि सेंट्रल बँका यांच्या मार्फत शेतकऱ्यांनां ॲडव्हान्स देण्याकरितां प्रॉव्हिन्शियल बँकेजवळ कांहीं रक्कम ठेवीत असतें.

**शेतकीच्या पतपेढ्यांची (ॲग्रिकल्चरल क्रेडिट सोसायट्या) घटना.**—हिंदुस्थानांतील शेतकीच्या पतपेढ्यांचा सर्वसामान्य नमुना 'रैफीसेन' सोसायटी-सारखा असतो; म्हणजे पेढीची व्यवस्था पाहणारे इसम बिनपगारी असतात, फायदा भागीदारांनां वाटीत नाहींत व पेढीचें कार्यक्षेत्र मर्यादित प्रदेशापुरतेंच असतें. पंजाब, संयुक्तप्रांत व ब्रह्मदेश यांमध्यें फायद्यापैकीं भाग दहा वर्षांनंतर वांटावा असा नियम आहे. खेडेगांवांत अशा पतपेढ्यांचें हिशोबलेखनाचें काम करण्यास लायक

इसम आढळत नाहींत, म्हणून गांवांतील शिक्षकाला किंवा कुळकर्ण्याला सेक्रेटरीचें काम देतात. पुरेसा पगार देऊन नोकर ठेवण्यास ऐपत नसल्यास आसपासच्या दोनचार पतपेढ्या मिळून एक भरपूर पगारावर सेक्रेटरी नेमतात. पतपेढ्यांचा सेक्रेटरी केवळ बिनचूक हिशेब लिहिणाराच असून भागत नाहीं; त्यापेक्षां त्याच्या अंगीं अधिक कर्तृत्व असावें लागतें. म्हणून शिक्षण देऊन लायक सेक्रेटरी तयार करण्याच्या शाळा मुंबई इलाखा, पंजाब व इतरत्र अलीकडे काढण्यांत आल्या आहेत. शिवाय मॅनेजिंग कमिटींतील इसमांनाहि सहकारी कार्यपद्धतींतील तत्त्वांची माहिती व्याख्यानद्वारां देण्याच्या योजना कांहीं प्रांतांत करण्यांत आल्या आहेत.

पतपेढ्यांचा अन्तर्गत कारभार.—सोसायटीच्या मॅनेजिंग कमिटींत ५ ते ९ सभासद असतात आणि गांवांतील प्रमुख इसम चेअरमन असतो. रोजचें काम करण्यास सेक्रेटरी असतो व त्याच्यावर देखरेख मॅनेजिंग कमिटी ठेवते. नवे सभासद करून घेणें, ठेवी घेणें, कर्जाऊ रक्कमा मिळविणें आणि सभासदांनां कर्जाऊ द्यावयाच्या रक्कमा मंजूर करणें आणि कर्जफेड वेळच्यावेळीं होत नसेल त्या इसमांबद्दल योग्य व जरूर ती तजवीज करणें हीं कामें मॅनेजिंग कमिटी करते. शिवाय हल्लीं अशी पद्धति प्रचलित आहे कीं, सर्वसाधारण सभेत, प्रत्येक सभासदाला किती रक्कम कर्जाऊ द्यावी त्याबद्दल निर्णय वर्षातून एकदां किंवा दोनदां ठरविला जातो, व अशा प्रकारें ठरलेल्या मर्यादेपर्यंत रक्कम कर्जाऊ देण्यास मॅनेजिंग कमिटी मंजूरी देऊं शकते. सोसायटीचे हिशेब लिहिण्याचें काम सेक्रेटरी करतो आणि त्याला लागणारे आंखलेले तक्ते, कागद, बुकें वगैरे रजिस्ट्रारच्या ऑफीसकडून पुरविलीं जातात. हिशेबाचीं बुकें प्रांतिक सरकारनें केलेल्या नियमानुसार लिहिलीं जातात आणि तीं तपासण्याचा अधिकार वरिष्ठ स्थानिक अधिकारी, रजिस्ट्रार व त्याच्या नोकरांनां असतो. तसेंच दरसाल हिशेब तपासणीचें काम कोऑपरेटिव्ह सोसायट्यांच्या रजिस्ट्रारच्या हाताखालीं काम करणारे ऑडिटर करतात आणि सोसायट्यांच्या कामाची तपासणी ऑनररी किंवा पगारी इन्स्पेक्टर मधून मधून करतात. ब्रह्मदेश व मद्रासमध्यें तपासणीचें काम यूनिअन्सकडून होतें आणि संयुक्तप्रांत, बिहार–ओरिसा, अजमीर, मेरवाड व बंगालमध्यें देखरेखीचें काम सेंट्रल बँकेकडे असतें. मध्यप्रांतांत तपासणीचें काम सेंट्रल बँकेमार्फत काम करणाऱ्या प्रॉव्हिन्शियल फेडरेशनच्या नियंत्रणाखालीं केलें जातें आणि मुंबई इलाख्यांत हें काम कांहीं अंशीं यूनियन्सकडून, कांहीं अंशीं सेंट्रल बँकांकडून आणि कांहीं अंशीं ऑनररी ऑर्गनायझर्सकडून केलें जातें.

कोआपरेटिव्ह सोसायट्यांसंबंधीं सर्व अंतिम अधिकार सर्व सभासदांच्या भरणाऱ्या सर्वसाधारण सभेला असतो. अशा वार्षिक साधारण सभेमध्यें हिशेब पुढें मांडले जातात, बॅलन्स-शीट पास करण्यांत येतो, आणि मॅनेजिंग कमिटी, चेअरमन व सेक्रेटरी यांची निवडणूक केली जाते. कांहीं प्रांतांत अशा सभेंत प्रत्येक सभासदाला द्यावयाच्या कर्जाची मर्यादा ठरविणें, मॅनेजिंग कमिटीनें कर्जाऊ रक्कम घेण्याची कमाल मर्यादा ठरविणें, गैरवर्तणूक किंवा महत्त्वाचा अपराध याबद्दल सभासदाला बडतर्फ करणें, कर्जाऊ द्यावयाच्या रक्कमेवरील व ठेवीवरील व्याजाचे दर ठरविणें हीं कामेंहि केलीं जातात. सोसायटीला होणारा निव्वळ नफा दरसाल रिझर्व्ह फंडांत टाकण्यांत येतो, कारण हा नफा डिव्हिडंड किंवा बोनस म्हणून सभासदांस वांटण्याची मनाई आहे. तसेंच रिझर्व्ह फंडांतील रक्कमहि रजिस्ट्रारच्या परवानगीशिवाय खर्च करतां येत नाहीं. आणि हा रिझर्व्ह फंड कायद्यानें ठरविलेल्या नियमांबरहुकूम ठराविक बँकांमध्यें ठेवावा लागतो. रिझर्व्ह फंड, अनपेक्षित तूट आल्यास भरून काढण्याकरितां व सोसायटी कर्जाऊ रकमा घेते त्यांनां तारण म्हणून ठेवलेला असतो. मध्यप्रांत, मद्रास व इतर कांहीं थोडे प्रांत खेरीज करून बाकीच्या प्रांतांत प्रायमरी सोसायट्यांच्या रिझर्व्ह फंडाचा भांडवलाप्रमाणेंच उपयोग करतात. पण ठेवी बऱ्याच असल्यास रिझर्व्ह फंडास हात लावीत नाहींत.

मुख्य दोष.—प्रायमरी सोसायट्यांमधील मुख्य दोष पुढीलप्रमाणें आहेत:—सर्वांत महत्त्वाचा दोष म्हणजे वक्तशीरपणाचा अभाव. याचें कारण खेडेगांवांतील ऐदीपणाची राहणी आणि उत्पन्न व खर्च यांची तोंडमिळवणी होणेंच कठिण असल्यामुळें शिलकेचा अभाव हीं होत. दुसरा दोष सोसायटीच्या कामाबद्दल सभासदांमधील औदासिन्य हा आहे, व त्याचें कारण शिक्षण व उच्च ध्येयें हीं खेडेगांवी लोकांत नसतात हें आहे. सोसायटीचे सामान्य सभासद सर्व गोष्टी मॅनेजिंग कमिटीवर सोंपवितात, आणि मॅनेजिंग कमिटीचे सभासद चेअरमन, सेक्रेटरी किंवा दुसरा एखादा सभासद यांच्यावर सोपवितात. दुसरा दोष कागदी मेळ जमवून बिनावी

कर्ज देण्याची आक्षेपाई पद्धति हा आहे. आणखी एक महत्त्वाचा दोष म्हटला म्हणजे सोसायटीकडून बँकेच्या पद्धतीचे सर्व व्यवहार चोखपणें केले जात नाहींत. उदा. ठेव ठेवण्यास कोणी आल्याबरोबर ठेव घेणें, ठेव परत मागितल्याबरोबर खोळंबा न करतां देणें आणि मागितलेलें कर्ज प्रत्यक्ष जरूरीचा विचार करून ताबडतोब देणें. बऱ्याचशा सोसायटयांत वर्षांतून दोन वेळीं काम पुष्कळसें केलें जातें—एक शेत लागवडीच्या वेळेस शेतकऱ्यांनां बींबियाण्याकरितां कर्ज काढावें लागतें त्या वेळीं; व दुसरें, पीक तयार झाल्यावर कर्जाच्या वसूलीच्या वेळीं, कित्येक प्रांतांत कर्जाच्या मागणीचा पैसा सोसायटीकडून हातीं येण्यास सभासदांनां कित्येक आठवडे वाट पहावी लागते आणि पेरणीचा हंगाम तर साधला पाहिजे म्हणून सोसायटीऐवजीं इतर सावकाराकडूनच कर्ज काढण्याची पाळी येते. हा दोष नाहींसा करण्याकरतां डिस्ट्रिक्ट बँक किंवा सेंट्रल बँकेच्या शाखा जागजागीं उघडण्यांत येत आहेत. जमीनीच्या तारणावर ज्यांनां मोठाली रक्कम इतर कर्ज फेडण्याकरितां किंवा शेती सुधारण्याकरितां पाहिजे असते त्यांच्याकरतां लँड मॉर्टगेज सोसायटी नामक निराळ्या तऱ्हेच्या सोसायटया पंजाबांत स्थापन करण्यांत येत आहेत इतर प्रांतांत अशा सोसायटया निघणें जरूर असून मद्रास व मुंबई इलाख्यांत त्याकरितां प्रयत्न चालू आहेत.तथापि अशा सोसायटयाहि मोठ्या मुदतीनें कर्ज देऊं शकत नसल्यामुळें खाजगी सावकारच शेतकऱ्यांनां पहावा लागतो. त्याचें उच्चाटन सोसायटया करूं शकत नाहींत.

शे त की त र सो सा य ट्या.—नॉन-ॲग्रिकल्चरल क्रेडिट सोसायटया नगरें व शहरें यांमध्यें निघाल्या आहेत. त्यांचा हेतु लहानलहान उद्योगधंद्यांत व व्यापारांत पडलेल्या लोकांची आणि कारखान्यांत व सरकारी खात्यांत नोकरी करणाऱ्यांची आर्थिक व नैतिक स्थिति सुधारावी हा आहे. या सोसायटया 'लिमिटेड लायबिलीटी' या स्वरूपाच्या असतात; कारण यांतील सभासदांची स्थावर ईस्टेट बहुधां नसतेच, आणि सभासदांनां परस्परांची माहिती नसते. अशा सोसायटयांची रचना Schulze Delizsch पद्धतीची असते. बहुतेक सोसायटयांचें काम करणारे इसम ऑनररी असतात,पण सोसायटीच्या कामाचा विस्तार वाढल्यानंतर पगारी इसम नेमतात. अशा सोसायटयांच्या भांडवलापैकीं बराचसा भाग शेअरच्या रूपानें उभारलेला असून शेअरची रक्कम मासिक हप्त्यांनीं भरावयाची असते. बाकीचें भांडवल सभासदांच्या व इतर इसमांच्या ठेवींच्या पैशांतून उभारलें जातें. भांडवलाकरितां को-आपरेटिव्ह बँका आणि सोसायटया यांकडून घेतलेलें कर्ज थोडें असतें. १९२२-२३ सालाच्या शेवटीं ९ कोटी भांडवलापैकीं सेंट्रल बँकांमधून घेतलेली रक्कम फक्त ४० लाख होती.

प्रत्येक वर्षाच्या शेवटीं अशा सोसायटयांनां होणाऱ्या निव्वळ नफ्यापैकीं ¼ रक्कम रिझर्व फंडांत ठेवावी लागते आणि उरलेली रक्कम डिव्हिडंड किंवा बोनस म्हणून वांटतां येते. या सोसायट्यांच्या कामामध्येंहि कांहीं दोष आहेत. त्यांपैकीं सर्वांत मोठा दोष म्हणजे जी सहकारितेची मूलभूत वृत्ति असावयास पाहिजे तिचाच अभाव अशा सोसायटयांत दिसून येतो. सोसायटीला पुष्कळ नफा होऊन चांगला डिव्हिडंड देतां यावा ही प्रबळ इच्छा असते; त्यामुळें कर्जावर व्याजाचा दर वाजवीपेक्षां भारी ठेवणें, फायद्यांत भागीदार होतील असे नवे सभासद करून घेणें वगैरे युक्त्या सोसायटयांतील प्रमुख इसम योजूं लागतात.

शेतकीतर सोसायटयांमध्यें समाजांतील निरनिराळ्या जाती किंवा वर्ग, कारखानदार व व्यापारी मंडळ्या, रेल्वे कंपन्या, सरकारी ऑफिसें, वगैरेंमधील नोकरांनीं स्थापलेल्या सोसायटयांचा समावेश होतो. मुंबई व ब्रह्मदेश यांमध्यें शहरांतील लहान लहान व्यापाऱ्यांनां व कारागिरांनां मदत करण्याकरितां इटलींतील पीपल्स बँकांच्या नमुन्यावर कांहीं सोसायटया स्थापण्यांत आल्या आहेत. मुंबई आणि ब्रह्मदेश यांमधील मोठाल्या बँका चालू ठेवी घेतात; कॅशक्रेडिट, ओव्हरड्राफ्ट वगैरे पद्धतीनें पैसे देतात व स्थानिक हुंडया (बिल्स ऑफ एक्सचेंज) काढतात व वटवितात. अशा बँकाच बिनभांडवलवाल्या लोकांनां खरी खरी मदत करतात व अशा बँकांनींच व्यापार व उद्योगधंदे यांची वाढ करण्यास इतर देशांत सामान्य स्थितींतल्या लोकांनां मदत केलेली आहे. मोठाल्या शेतकीतर सोसायटयांनां स्वतःच्या सभासदांची गरज भागवून उरलेल्या शिलकींतून रजिस्ट्रारच्या आगाऊ मिळविलेल्या परवानगीनें लहान लहान प्रायमरी सोसायट्यांनां ॲडव्हान्स रक्कम देतां येते. पण ही पद्धति बंद पडत चालली असून प्रायमरी सोसायटयांत उरलेली शिल्लक सेंट्रल बँकांत ठेवण्याची प्रवृत्ति वाढत आहे.

उद्योगधंद्यांच्या प्रगतीमुळें व शहरांच्या वाढीमुळें मोठे कारखाने असलेल्या शहरांत मजूरकाम करणारांचा

महत्त्वाचा वर्ग उत्पन्न झाला आहे. हा वर्गहि खेड्यांतील शेतकरी वर्गाप्रमाणेंच कर्जबाजारी असतो, कारण मजुरांनां पगार अगदीं अपुरा असतो. अशा मजूरवर्गामध्यें सहकारी कार्यपद्धतीचें तत्त्व प्रसृत केल्यास सहकारी संस्थांच्या वाढीला हें मोठें क्षेत्र आहे व त्यामुळें मजूरवर्गाची आर्थिक स्थिति सुधारण्याचीं साधनें त्यांनां उपलब्ध होतील. परंतु या दिशेनें पद्धतशीर प्रयत्न फारच थोड्या ठिकाणीं झाले आहेत. या प्रकारचा पहिला प्रयत्न मुंबईस डेट रिडेम्पशन कमिटीतर्फे करण्यांत आला. मद्रासमध्यें यासंबंधीं अस्पृश्य वर्गांत व म्युनिसिपालिटीच्या हलक्या पगाराच्या नोकरांत कार्य बरेंच झालें आहे. मुंबईमधील सोशल सर्व्हिस लीगनें अलीकडे फॅक्टऱ्यांमधील कामकऱ्यांकरतां पुष्कळ क्रेडिट सोसायटया स्थापिल्या आहेत. कामकऱ्यांची स्थिति सुधारण्याच्या कार्यांतल्या क्रेडिट सोसायटया स्थापणें हें एक आवश्यक अंग मानलें जातें.

दि ले लें क र्ज.—शेतकी व शेतकीतर सोसायटयांच्या सभासदांनां दिलेल्या कर्जांच्या रकमांची एकंदर बेरीज १९२२–२३ सालीं अनुक्रमें रु. ६,४२,६८,६३० व रु. ४,४२,४५,७९१ होती. कर्ज बहुधां दोन जामीन घेऊन दिलें जातें. तथापि स्थावर किंवा जंगम मिळकतीच्या तारणावरहि कांहीं अटींवर कर्ज देण्याची मोकळीक सोसायटयांनां कायद्यानें दिलेली आहे. कधीं कधीं व विशेषतः लांब मुदतीच्या किंवा मोठया रकमेच्या कर्जांकरितां कबजेगहाणहि घेतात.

कर्जाऊ दिलेली रक्कम उत्पादक कार्याकडे लावली जावी असा निर्बंध घालणें अशक्य असते. कांहीं परिस्थितींत अनुत्पादक कार्याकरितां कर्ज द्यावें लागतें व तें देणें योग्य असतें. तथापि कर्ज काढण्याशिवाय गत्यंतर नाहीं व कर्जाऊ रकमेंतून खर्च वाजवीपेक्षां फाजील होणार नाहीं इतकी सावधगिरी सोसायटयांनी घ्यावी. शेतकीच्या सोसायटयांनीं पुढील कामांकरतां कर्ज द्यावें: शेतलागवडीचा खर्च, गुरेंढोरें, वैरण, बियाणें, खतें, शेतीचीं आउतें वगैरेंची खरेदी, खंड किंवा शेतसारा किंवा पाणीपट्टी, जमिनीची दुरुस्ती, विहिरी खणणें, नवीन जमीन खरेदी करणें, मागील कर्ज फेडणें किंवा गहाण पडलेली मिळकत सोडविणें आणि दुष्काळांत उदरनिर्वाह करणें. शेतकीतर सोसायटयांनीं कारखान्याकरतां कच्चा माल खरेदी करणें, व्यापाराकरतां माल विकत घेणें, घर बांधणें, आयुष्यक्रमांतील अन्नवस्त्रादि आवश्यक गोष्टी खरेदी करणें वगैरे कामाकरतां कर्ज द्यावें. शेतकी किंवा लहान सहान व्यापारांत रोजच्या गरजा भागविण्याकरतां काढलेल्या कर्जाची फेड करण्याला मुदत एक वर्ष किंवा त्यांहूनहि कमी असते आणि मागील कर्ज फेडण्याकरतां किंवा जमिनीची सुधारणा करण्याकरतां काढलेलें कर्ज फेडण्याला मुदत पांच वर्षें किंवा अधिक असते. कांहीं प्रांतांतील सहकारी संस्थांच्या कामांतील एक मोठी असमाधानाची गोष्ट म्हणजे कर्जफेडीच्या कामांत सभासदांकडून होत असलेली दिरंगाई व हलगर्जीपणा व या बाबतीकडे सोसायटयांचें होत असलेलें दुर्लक्ष्य. कर्जफेडीच्या कामांत वक्तशीरपणा पाळला नाहीं तर सहकारी पतपेढ्या आर्थिक व शैक्षणिक या दोन्ही दृष्टींनीं अयशस्वी होतात हें निश्चित असल्यामुळें क्रेडिट सोसायटयांचे प्रवर्तक या बाबतींत सोसायटयांनां योग्य सल्ला देण्यांत मुळींच कसूर करीत नाहींत. कोआपरेटिव्ह सोसायटीज ॲक्टाअन्वयें सोसायटीच्या कर्जाला इतर(सरकार जमीनदार खेरीज) सावकारांच्या कर्जाहून अग्रस्थान (प्रायॉरिटी) मिळतें आणि त्या कर्जफेडीकरतां शेतांतील पीक, गुरें, वैरण, शेतीचीं आउतें वगैरे जप्त करतां येतात. शिवाय सरकारसाऱ्याची बाकी ज्या प्रकारें वसूल करतां येतें त्याप्रमाणेंच सोसायटीचें कर्ज वसूल करतां यावें असा कायदा करण्याचे प्रयत्न चालू आहेत तथापि असा कायदा झाल्यास कर्जफेडीचे हप्ते वसूल करण्याकडे अधिक शिथिलता उत्पन्न होईल. एखादी सोसायटी बंद झाली तर मात्र तिच्या मागील कर्जाची वसुली जमीनसाऱ्याच्या वसुलीप्रमाणें करावी असा कायदा बंगाल व बिहार–ओरिसा प्रांतांत केला असून इतर प्रांतांतहि करण्यांत आला आहे.

शे त की सो सा य ट्यां नां पै शा चा पु र व ठा.—सहकारी संस्थांच्या चळवळीची प्राथमिक कार्यमर्यादा ओलांडली नाहीं तोंच एक फार निकडीचा प्रश्न पुढें आला. तो प्रश्न म्हणजे सोसायटयांनां पैसा कसा पुरवावा ? सोसायटयांची संख्या वाढत चालली होती, अशा स्थितींत हा प्रश्न निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळ्या प्रकारें सोडविण्यांत आला. मद्रासमध्यें १९०७ मध्यें सरकारमदतीशिवाय एक सेंट्रल बँक स्थापण्यांत आली व ती सर्व कोआपरेटिव्ह सोसायटयांनां कर्जाऊ रक्कम देत असे. नंतर जिल्ह्यांच्या ठिकाणीं बँका स्थापण्यांत आल्या, इतर इलाख्यांत जिल्ह्याच्या व तालुक्यांच्या

ठिकाणीं बँका स्थापण्यांत आल्या आणि कांहीं ठिकाणीं जाईंट स्टॉक बँका शेतकी सोसायट्यांना पैसे पुरवूं लागल्या, कांहीं चांगल्या स्थितीच्या शेतकीतर सोसायट्या शेतकी सोसायट्यांनां पैसा देऊं लागल्या. कांहीं प्रांतांत सरकारहि पैसा पुरवीत असे, परंतु सोसायट्यांची प्रगति होऊं लागल्यावर ही मदत कमी करण्यांत आली. मुंबई इलाख्यांत स्थानिक बँका स्थापण्याची योजना झाली नाहीं, आणि शेतकी सोसायट्यांची संख्याहि फार सावकाशपणें वाढत गेल्यामुळें सेंट्रल बँकांनां भरपूर कार्यक्षेत्र न मिळाल्यामुळें त्या यशस्वी होणें कठिण झालें, म्हणून १९११ सालीं बाँबे सेंट्रल को-आपरेटिव्ह बँक इलाख्यांतील सर्व को-आपरेटिव्ह सोसायट्यांनां पैसा पुरविण्याकरितां स्थापण्यांत आली. नंतर स्थानिक सेंट्रल बँका स्थापण्यांत आल्या व त्यांनीं आपापल्या जिल्ह्यांतील सोसायट्यांनां पैसा पुरविण्याचें काम चालविलें आहे. म्हणून मुंबईमधील बँकेनें प्रॉव्हिन्शियल बँक असें नांव घेऊन त्या प्रकारचेंच काम तिनें स्वतःकडे घेतलें आहे. ज्या भागांत सेंट्रल बँक स्थापन होण्याचा वर्त संभव नाहीं त्या भागांतील प्रायमरी सोसायट्यांनां पैसा पुरविण्याचें काम प्रॉव्हिन्शियल बँक करते. ज्या भागांत प्रॉव्हिन्शियल बँक पैसा पुरविते अशा सर्व भागांत मिळून दहा शाखा स्थापण्यांत आल्या आहेत आणि जिल्हासेंट्रलबँकांनीं सहा शाखा काढल्या आहेत.

वर सांगितलेल्या मद्रास सेंट्रल बँकेलाहि प्रॉव्हिन्शियल बँकेचें स्वरूप देण्यांत आलें असून जिल्हाबँकांशीं विरोध न येऊं देतां तिचें काम चालतें. उत्तर ब्रह्मदेश, मध्यप्रांत, बिहार-ओरिसा व बंगालमध्यें प्रॉव्हिन्शियल बँका स्थापल्या आहेत. संयुक्तप्रांत व पंजाब यामध्यें प्रॉव्हिन्शियल बँकेचा विचार चालू असून आसाम व म्हैसूरमध्यें प्रॉव्हिन्शियल बँका अलीकडे स्थापल्या आहेत. सेंट्रल बँका तीन प्रकारच्या आहेत:-(१) ज्या बँकांचे सभासद खाजगी व्यक्ती असतात आणि सोसायट्यांनां खाजगी व्यक्तीच्यासारखेच हक्क देऊन सभासद करण्यांत येतें अशा बँका; (२) फक्त सोसायट्यांनांच सभासद होतां येतें अशा बँका व (३) खासगी व्यक्ति व सोसायट्या या दोघांनाहि सभासद होतां येतें आणि सोसायट्यांतर्फे स्वतंत्र प्रतिनिधी डायरेक्टरांच्या बोर्डांत घेतले जातात अशा बँका. मिश्र स्वरूपाच्या बँकांची बहुसंख्या आहे. तात्त्विक दृष्ट्या संयुक्त (फेड-रल) स्वरूपाची सेंट्रल बँक हा सर्वोत्तम नमुना होय; पण सोयीच्या दृष्टीनें मिश्र स्वरूपाच्या सेंट्रल बँकाच बहुतेक प्रांतांत लोकप्रिय झाल्या आहेत. तथापि बंगाल व पंजाबमध्यें आणि कांहीं अंशीं संयुक्तप्रांत व बिहार-ओरिसामध्यें फेडरल स्वरूपाच्या सेंट्रल बँका अलीकडे चांगल्या चालूं लागल्या आहेत.

सेंट्रल बँकांचीं कामें.-सेंट्रल बँकांचीं कामें सोसायट्यांचे फंड समतोल राखणें आणि भांडवल पुरविणें ही आहेत. पण या केवळ बँकविषयक कार्याखेरीज सोसायट्या स्थापणें व त्यांवर देखरेख ठेवणें हीं कामें या बँका बहुधा करतात. पंजाब, मद्रास व ब्रह्मदेश खेरीज करून बाकी सर्व मोठ्या प्रांतांत सेंट्रल बँका स्वतःशीं जोडलेल्या सोसायट्यांनां मार्ग दर्शकत्वाचें व देखरेखीचें काम करतात आणि कांहीं प्रांतांत नव्या सोसायट्या स्थापण्याचें, तसेंच सहकारी तत्त्वाच्या प्रकाराचें आणि अशा सोसायट्या चालविण्यास लागणारें शिक्षण देण्याचें काम करतात. एकेका सेंट्रल बँकेचें कार्यक्षेत्र एकेक जिल्हा हें असतें. पण उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांत व बंगाल्यांत तालुकानिहाय सेंट्रल सोसायट्या आहेत व कांहीं ठिकाणीं तालुक्याहूनहि लहान भागांकरितां स्वतंत्र सेंट्रल सोसायट्या आहेत. सेंट्रल सोसायट्यांच्या वर्गांत यूनियन्स नांवाच्या संस्थांचा समावेश करतात. यूनियन्स म्हणजे सोसायट्यांचे संघ. संघांचें काम देखरेखीचें असतें. प्रायमरी सोसायट्यांनां लोन पुरण्याची तजवीज करण्याचें काम कांहीं संघ करतात व कांहीं करीत नाहींत. पण प्रत्यक्ष बँकेचें काम कोणताहि संघ करीत नाहीं. पण पंजाबमध्यें मात्र संघ हा स्वतःच्या लहान क्षेत्रापुरता सेंट्रल बँक होऊन मुळींच निराळा असतो. संघाचें कार्य मध्यवर्ती खेड्यांपासून पांच ते आठ मैलांच्या टापूपुरतें मर्यादित असतें. मद्रासमध्यें संघ स्थापले गेले आहेत, पण हे संघ लोनबद्दलची जामीनकी पत्करीत नाहींत. उलट पक्षीं मुंबई इलाख्यांतील यूनियन्स जामीनकी पत्करीत असत. पण अलीकडे ही पद्धति बदलत असून कर्ज पुरविण्याची सर्व जबाबदारी सेंट्रल बँकाच पत्करतात. मुंबई इलाख्यांत बऱ्याच मोठ्या क्षेत्रांतील सोसायट्यांवर देखरेख ठेवण्याचें काम संघ करतात व त्या कामाकरितां चांगले ट्रेंड सुपरवायझर नेमतात. ब्रह्मदेश व मद्रासमध्यें यूनियन्सचें डिस्ट्रिक्ट कौन्सिलांत संयोगीकरण (फेडरेशन) करण्याचें काम चालू आहे.

संघटना व प्रचार.—बहुतेक प्रांतांत सोसायटया स्थापणें व त्यांवर देखरेख ठेवणें हें काम रजिस्ट्रार हा असिस्टंट रजिस्ट्रार, ऑडिटर, इतर कांहीं सरकारी अधिकारी व ऑननरी बिनसरकारी अधिकारी यांच्या मदतीनें करतो. ज्या ठिकाणीं सेंट्रल बँका आहेत तेथें हे सेंट्रल बँकांचे डायरेक्टर स्वतः किंवा इतर पगारी एजंटामार्फत हें काम करतात. ऑननरी काम करणाऱ्या लोकांची संख्या हळू हळू वाढत आहे. आणि कांहीं प्रांतांत मुद्दाम ऑननरी ऑर्गनायझर नेमलेले असतात व ते रजिस्ट्रारला या कामांत मदत करतात. तथापि ऑननरी इसमाकडून हें काम अनियमित व अव्यवस्थितपणें होतें. आणि बहुतेक मोठया प्रांतांत,अशा बिन सरकारी इसमांचे प्रयत्न व्यवस्थितपणें व जबाबदारीनें व्हावे याकरितां हिंदुस्थानांतहि जर्मनी, इंग्लंड, आयर्लंड वगैरे देशांतल्याप्रमाणें स्वतंत्र ऑर्गनायझेशन सोसायटया किंवा संघ स्थापन होणें जरूर आहे. या संस्था क्रेडिटसोसायटया स्थापण्याकरितां आणि चालविण्याकरितां लागणारें शिक्षण देतात. सोसायटयांचा जमाखर्च तपासण्याचेंहि काम कांहीं ठराविक मोबदला घेऊन करण्याची व्यवस्था व्हावयास पाहिजे. अशा संस्थांनां कोऑपरेटिव्ह सोसायटयांचें धोरण ठरविण्याचा अधिकार मिळाला पाहिजे. असें झालें म्हणजे रजिस्ट्रारला हल्लीं जें काम करावें लागतें तें सर्व अशा संस्था करू शकतील. मध्यप्रांतांत कोऑरेटिव्ह सोसायटया व बँका यांचा संघ(फेडरेशन)अस्तित्वांत असून तो देखरेख करणें, जमाखर्च तपासणें, फेडरेशनच्या कामकरी इसमांनां अशा कामाचें शिक्षण देणें, निरनिराळ्या कोऑपरेटिव्ह संस्थांच्या कार्यपद्धतींत एकसूत्रता आणणें आणि सहकारितेच्या तत्त्वाचा प्रसार करणें वगैरे करतो. या संघाच्या कामावर १९२२ सालीं सरकारनें नेमलेल्या एका इंन्क्वायरी कमिटीच्या रिपोर्टांत प्रतिकूल टीका केलेली आहे.आणि हा संघ मोडून दुसरी स्वतंत्र शिक्षण देणारी संस्था स्थापावी अशी सूचना केली आहे. अशी संस्था वऱ्हाडांत प्रथम स्थापन झाली. मद्रासमध्यें एक प्रॉव्हिन्शियल यूनियन स्थापण्यांत आली असून तिचें मुख्य काम शिक्षण व प्रचार(प्रॉपोगँडा) विषयक आहे. कोऑपरेटिव्ह जर्नल प्रसिद्ध करणें व परिषदा भरविणें एवढींच कामें सांप्रत चालू आहेत. हल्लीं हिची रचना व कामाची दिशा बदलून तिला या चळवळींतील मध्यवर्ती व स्वयंसत्ताक संस्था बनविली आहे. मुंबईमध्यें १९१८ सालीं सहकारी संस्थांचा प्रसार करण्याकरितां आणि तें कार्य करणाऱ्यांच्या प्रयत्नांचें एकत्रीकरण करण्याकरितां सेंट्रल इन्स्टिटयूट नांवाची संस्था स्थापण्यांत आली. या संस्थेचा उद्देश या इलाख्यांतील सहकारी चळवळीची प्रगति होणें आणि निरनिराळ्या इसमांच्या कार्यांत सारखेपणा उत्पन्न करणें हा आहे. या संस्थेचें काम खेडेगांवांमध्यें तिच्या निरनिराळ्या शाखांमार्फत चालतें. या शाखा भाषावारीच्या तत्त्वानुसार काढल्या आहेत. ही संस्था हिंदुस्थानांतील बिनसरकारी मध्यवर्ती संस्थांमध्यें सर्वांत अधिक कार्यकर्ती आहे आणि तिनें इंटर नॅशनल कोऑपरेटिव्ह कॉन्फरन्सला आपले प्रतिनिधी पाठवून आणि १९२३ सालीं घेंठ येथें भरलेल्या इंटर नॅशनल कोऑपरेटिव्ह एक्झिबिशनमध्यें भाग घेऊन आंतरराष्ट्रीय संबंध जोडले आहेत. बंगालमध्यें अशाच प्रकारचें कार्य करणारी संस्था स्थापन करण्यांत आली आहे. या सोसायटीनें कोऑपरेटिव्ह डिपार्टमेंटकडून होत असलेलें शिक्षणविषयक आणि प्रसारविषयक काम हातीं घेतलें आहे, आणि कॉलेजांतील विद्यार्थ्यांनां कोऑपरेटिव्ह स्टोअर्स स्थापण्यास मदत केली आहे. या सोसायटीनें आपल्या शाखाहि काढल्या आहेत आणि खेडेगांवांतील सोसायटयांच्या सभासदांनां आणि सेक्रेटरींनां शिक्षण देण्याची व्यवस्था केली आहे. मध्यप्रांतांतल्या प्रमाणें बिहार—ओरिसा प्रांतांत एक फेडरेशन अस्तित्वांत असून तिनें प्रचाराच्या कामाकरितां एक स्पेशल ऑफिसर नेमला आहे. पंजाबमध्यें एक प्रांतिक यूनिअन स्थापिली असून ती प्रायमरी सोसायटयांचे हिशेब तपासणें आणि सहकारी कार्याचा प्रसार करणें हीं कामें करते. ब्रह्मदेशामध्यें प्रायमरी सोसायटयांचे हिशोब तपासण्याचें काम एक सेंट्रल कौन्सिल करतें. या कौन्सिलचे सभासद सरकारी खात्यांतील वरिष्ठ अधिकारी आणि कोऑपरेटिव्ह संस्थांचे प्रतिनिधी असतात. हें कौन्सिल प्रांतिक कॉन्फरन्सच्या कामांत मदत करितें, आणि रजिस्ट्रारचे सल्लागार मंडळ म्हणून काम करितें. सहकारी संस्थांचा प्रचार करण्याचें, त्या स्थापण्याचें आणि त्यांच्यावर देखरेख ठेवण्याचें काम प्रायमरी सोसायटयांच्या यूनिअन्सच्या जिल्हानिहाय बनविलेल्या फेडरेशन्स करितात. मुंबई इलाख्यांतील उपर्युक्त इन्स्टिटयूट नांवाच्या संस्थेसारख्या संस्था शिक्षणविषयक व प्रचारविषयक काम करण्याकरितां हैद्राबाद, म्हैसूर, त्रावणकोर वगैरे संस्थानांत स्थापाव्या

व राजपुतान्यांतील संस्थानांकरितां व अजमीर मेरवाड प्रांताकरितां अजमीर येथें स्थापाव्या असा विचार चालू आहे. प्रातिनिधिक कोऑपरेटिव्ह, एजन्सींच्या कामांची वर सांगितल्याप्रमाणें वाढ अगदीं अलीकडे झाली आहे आणि भविष्यकाळांत त्यांच्या कामाचें स्वरूप कशा प्रकारचें होईल हें आज निश्चित सांगणें शक्य नाहीं.

स ह का री सं स्थां चे इ त र प्र का र.—दुरुस्ती झालेला कोऑपरेटिव्ह सोसायटयांचा कायदा पास झाल्यानंतर सहकारी संस्थांचें तत्त्व पतपेढयाखेरीज इतर अनेक प्रकारच्या कार्यांकडे लावण्यास सुरुवात झाली, पण पक्का माल तयार करणाऱ्या आणि तो विकत घेणाऱ्या लोकांच्या सहकारी संस्था स्थापाव्या अशी मागणी गेल्या थोड्या वर्षांत होऊं लागली आहे, आणि शेतांत पिकणारे जिन्नस विकत घेणें आणि विकत देणें या कामाकरितां सहकारी संस्था अलीकडे स्थापन झाल्या आहेत. १९१८-१९ पूर्वी या देशांत कांहीं स्टोअर्स सोसायटीज निघाल्या होत्या. सर्व प्रांतांमध्यें—विशेषतः मद्रासमध्यें—मालाची देवघेव करणाऱ्या सहकारी संस्था मध्यमवर्गामध्यें स्थापन झाल्या आहेत व बंगाल आणि संयुक्तप्रांतांत कॉलेजांनां जोडलेल्या वसतिगृहांमध्यें राहणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां कोऑपरेटिव्ह स्टोअर्स काढण्यास सुरुवात झाली आहे. या पकारची चळवळ, जीवनक्रमाला लागणाऱ्या अवश्य वस्तू अधिकाधिक महाग होत चालल्याकारणानें आणि महायुद्धामध्यें नफेबाजी फार वाढल्यामुळें लोकप्रिय होत चालली आहे. सप्लाय यूनिअन्स, स्टोअर्स सोसायटीज आणि पतपेढयांनां जोडलेलीं डिस्ट्रिब्यूटिव्ह डिपार्टमेंट्स या प्रकारच्या सहकारी संस्था कांहीं प्रांतांत स्थापन झाल्या आहेत; आणि अशा प्रकारच्या सहकारितेनें चालविलेल्या दुकानांनां मोठ्या प्रमाणावर माल कमी किंमतीनें मिळावा अशी व्यवस्था करण्याच्या योजना चालू आहेत. पंजाब आणि मद्रासमध्यें खेडेगांवातून सहकारितेच्या तत्त्वावर मालविक्रीचीं दुकानें काढण्याबद्दल खटपट सरकारी नोकरांमार्फत चालू असून तिला यशहि बऱ्याच प्रमाणांत आलें आहे. सप्लाय यूनिअन्स आणि प्रायमरी पर्चेस अँड सेल्स सोसायटीज यांची स्थिति भरभराटीची नाहीं. मुंबई, मद्रास आणि बंगाल व दुसऱ्या कांहीं प्रांतांतील शहरांमध्यें माल खरेदी करणाऱ्या लोकांनीं सहकारी तत्त्वावर दुकानें काढण्याच्या चळवळीकडे विशेष लक्ष दिलें होतें. परंतु महायुद्ध संपल्यानंतर एकदोन वर्षांच्या काळांत अशा संस्था स्थापण्याबद्दल जो उत्साह दिसत होता तो अलीकडे मावळत चालला आहे. पण हल्लीं ज्या थोड्याशा स्टोअर सोसायटीज शिल्लक आहेत, त्यांनां मात्र कायमपणा प्राप्त झाला असून त्या भरभराटींत आहेत.

कांहीं प्रांतांमध्यें या देशांतील जुने उद्योगधंदे आणि खेडेगांवांत चालणारे घरगुती कारखाने (कॉटेज इंडस्ट्रीज) कोऑपरेटिव्ह सोसायट्या स्थापून पुन्हां ऊर्जितावस्थेंत आणावे असा प्रयत्न चालू आहे. अशा संस्थांपैकीं कांहीं फक्त हलक्या व्याजावर भांडवल पुरवितात पण कांहीं ठिकाणीं अशा संस्था कच्चा माल पुरविणें आणि पक्क्या मालाची विक्री करणें हीं कामेंहि करतात. हिंदुस्थानांत पाश्चात्त्य यंत्रसामुग्रीचा प्रवेश होण्यापूर्वी हातमागांचा धंदा सर्व हिंदुस्थानभर चांगल्या भरभराटींत होता. आणि तोच धंदा पुन्हां चांगल्या स्थितींत यावा म्हणून हातमागावरील विणकऱ्यांच्या कोऑपरेटिव्ह सोसायट्या स्थापण्याचे प्रयत्न चालू आहेत. अशा विणकऱ्यांच्या सोसायट्यांपैकीं बहुतेक फक्त पतपेढया आहेत. परंतु कांहीं सोसायट्या विणकर सभासदांकरितां चांगलें सूत खरेदी करण्याचें काम करतात आणि कांहीं सोसायट्या विणकर सभासदांनीं तयार केलेलें कापड विकण्याकरितां स्टोअर्स काढतात. तसेंच जुन्या मताच्या विणकरी वर्गामध्यें नवे सुधारलेल्या पद्धतीचे हातमाग आणि नव्या पद्धती सुरू करण्यास या सोसायट्याच कारणीभूत झाल्या आहेत. बंगाल आणि पंजाबमध्यें विणकऱ्यांच्या सोसायट्यांमध्यें सुव्यवस्था करण्याच्या कामीं सेंट्रल यूनियन्सना बरेंच यश आलें आहे, आणि अशाच प्रकारचें कार्य बिहार-ओरिसा व मुंबई प्रांतामध्येंहि चांगलें फलदायी झालें आहे. औद्योगिक स्वरूपाच्या आणखी कांहीं थोड्या सहकारी संस्था स्थापन झाल्या आहेत. मध्यप्रांतांत दूधविक्रीचा, रंगकामाचा, टोपल्या करण्याचा व पितळेचीं भांडीं करण्याचा धंदा करणाऱ्या लोकांमध्यें अशा सहकारी संस्था स्थापन झाल्या आहेत. पंजाब व मुंबई इलाख्यांत चांभार आणि ढोर या लोकांमध्यें आणि म्हैसूर संस्थानांत सुतार, कातारी, लोहार आणि कुंभार यांच्या संस्था स्थापन झाल्या आहेत. म्हैसूर संस्थानांत कारागिरांच्या सोसायट्यांची प्रगति व्हावी म्हणून भांडवल आणि धंदा चालविण्याची माहिती सरकार देतें. मुंबई इलाख्यांत पक्का माल तयार

करण्याकरितां सहकारी संस्था स्थापण्याची चळवळ कासार, सोनार, सुतार, रंगारी आणि इतर धंदेवाल्या लोकांमध्यें पसरली आहे. याच चळवळीचा आणखी एक परिणाम म्हणजे मजूर वर्गांमध्यें इटलीमधील लेबर सोसायटयासारख्या कोऑपरेटिव्ह सोसायट्या काढण्यांत आल्या आहेत. या प्रकारच्या कार्याला प्रथम सुरुवात काश्मीरमध्यें झाली आणि मद्रास व मुंबईमध्यें प्रयोगादाखल अशा प्रकारच्या संस्था सुरू करण्यांत आल्या आहेत. अशा संस्थांचा उद्देश खाजगी किंवा सार्वजनिक कामामध्यें मजूरांनां योग्य करारावर काम लावून देणें, आणि त्यांनां मिळणारा नफा त्यांचीच आर्थिक व सामाजिक स्थिति सुधारण्याकडे लावणें हा आहे. इंडियन इंडस्ट्रिअल कमिशननें खेडेगांवांतील लहान घरगुती धंदे कसे ऊर्जितावस्थेस येतील आणि कोआपरेटिव्ह सोसायटया स्थापल्यानें ते ऊर्जितावस्थेस येणें कितपत शक्य आहे या गोष्टींची चौकशी केली. कमिशननें या बाबतींत केलेल्या सूचना फारशा निश्चित स्वरूपाच्या नाहींत. तथापि यंत्रसामुग्री विकत घेण्याकरितां सरकारनें कर्ज द्यावें अशी कमिशनची शिफारस आहे. आणि घरगुती कारखान्यांत तयार केलेला माल विक्रीकरितां बाजारामध्यें चांगल्या तऱ्हेनें मांडणें अवश्य आहे या गोष्टीवर कमिशननें जोर दिला आहे. उद्योगधंद्यांच्या लोकांमध्यें सहकारी संस्था स्थापन होण्याकरितां सहकारी पतपेढयांचें तत्त्व त्यांनां चांगलें समजावून सांगितलें पाहिजे. शिवाय अशा धंदेवाल्यांनां त्यांच्या धंद्यांतील विशिष्ट कलेचें शिक्षणहि दिलें पाहिजे. तसेंच बाजारामध्यें कोणत्या प्रकारच्या मालाला मागणी आहे त्यासंबंधीं माहिती कारागिरांनां पुरविण्याचें काम औद्योगिक खात्याच्या स्थानिक शाखांनीं करावें असें सरकारनें ठरविलें आहे. उद्योगधंदेवाल्या लोकांमध्यें कोआपरेटिव्ह सोसायटया स्थापणें हें काम प्रांतिक औद्योगिक खात्याचें आहे. परंतु या खात्यापुढें मोठाले कारखाने कसे उभारावे हा बिकट प्रश्न असल्यामुळें घरगुती लहान सहान धंद्यांच्या प्रगतीकडे या खात्याला लक्ष देण्यास सांपडेल किंवा नाहीं याबद्दल शंका आहे.

ब्रह्मदेशामध्यें गुरांचा विमा उतरण्याच्या कार्यांत (कॅटल इन्शुअरन्स) पुढाकार घेण्यांत आला आहे. या कार्याकरितां व्हिलेज इन्शुअरन्स सोसायटया खेडोखेडीं स्थापण्यांत आल्या असून एक मध्यवर्ती विमासंस्था ( सेंट्रल री इन्शुअरन्स सोसायटी ) स्थापण्यांत आली आहे. या संस्थेला सरकारकडून कांहीं पैशाची मदत मिळते. इतर प्रांतांमध्यें गुरांकरितां सहकारी विमा संस्था स्थापण्याच्या कार्याची अगदीं अल्प प्रगति झाली आहे. पण पंजाबमध्यें अशा पांच विमासंस्था स्थापण्याची चळवळ इतकी यशस्वी झाली आहे कीं, एक री इन्शुअरन्स सोसायटी स्थापण्याचीहि आवश्यकता वाटूं लागली आहे.

शे त की च्या स ह का री सं स्था.—थोडया काळापूर्वीपर्यंत कोआपरेटिव्ह सोसायटया सभासदांना कमी व्याजानें कर्ज देणें या एकाच उद्देशाकरितां स्थापल्या गेल्या होत्या. परंतु अलीकडे अशा संस्थांनीं निरनिराळ्या प्रकारच्या कार्यक्षेत्रांत प्रवेश केला आहे. कांहीं प्रांतांत ग्रेन बँक्स स्थापन केल्या आहेत. या बँकांत प्रत्यक्ष धान्यच ठेव म्हणून घेतात आणि पुढें चांगला दर आला म्हणजे तें धान्य विकतात किंवा दुष्काळाच्या वेळीं सभासदांनां तें धान्य पुरवितात. अशा बँका बिहार–ओरिसा, बंगाल, म्हैसूर आणि कूर्ग या प्रांतांत स्थापन झाल्या आहेत. अशाच पद्धतीच्या सोसायटया वैरणीचा साठा करून ठेवण्याकरितां बडोदें संस्थानांत स्थापन झाल्या असून त्यांच्या योगानें खेडेगांवांतील एक मोठा महत्त्वाचा आर्थिक प्रश्न सुटण्यास मदत होणार आहे. सहकारितेचें तत्त्व दुसऱ्या एका कार्याकरितां अमलांत आणलें जात आहे. तें कार्य म्हणजे शुद्ध आणि निवडक बीं–बियाणें खरेदी करून तें सभासदांनां पुरविणें हें आहे. अशा तऱ्हेच्या बियाणें पुरविण्याच्या लहान लहान सोसायट्या मुंबई इलाखा आणि वऱ्हाड-मध्यप्रांतामध्यें बऱ्याचशा स्थापन झाल्या आहेत. खतांची खरेदी व विक्री सहकारितेच्या तत्त्वावर करण्याकरितां सोसायटया स्थापन झाल्यास त्याहि शेतकऱ्यांनां फार फायदेशीर होतील. अशा तऱ्हेचे कांहीं स्टोअर्स मद्रास, बंगाल आणि मुंबई इलाख्यांत स्थापन झाले आहेत. पंजाब आणि मद्रासमध्यें शेतकीला लागणारीं आउतें वगैरे सामान पुरविण्याकरितां क्रेडिट सोसायट्या स्थापन झाल्या आहेत. त्या कमिशन इंडेंट पद्धतीनें काम करतात.

शेतकीच्या पतपेढ्या चांगल्या चालूं लागल्या म्हणजे धान्यहि संयुक्त पद्धतीनें विकणें लोकप्रिय होऊं लागतें. बंगालमध्यें वैरण संयुक्त पद्धतीनें विकण्याकरितां सोसायटया प्रथम सुरू झाल्या आणि या दिशेनें मुंबई इलाख्यांत अतिशय प्रगति झाली आहे. कापूस आणि

गूळ, तसेंच इतर शेतकीचे जिन्नस विकण्याकरितां महाराष्ट्रांत (डेक्कन) व कर्नाटकामध्यें सोसायटया स्थापन झाल्या आहेत. या प्रकारच्या संस्थांकडे लोकांचें बरेंच लक्ष गेलें असून मुंबई इलाख्यांतल्याप्रमाणें मद्रास व पंजाबमध्यें अशा संस्था स्थापन झाल्या आहेत व पंजाबांत त्यांनां बरेंच यशहि आलें आहे. कांहीं प्रांतांमध्यें या कामाकरितां स्वतंत्र सोसायटया निघाल्या नसून क्रेडिट सोसायटया व सेंट्रल बँकाच हें काम करतात. कांहीं ठिकाणीं क्रेडिट सोसायटया शेतकीला लागणारीं हत्यारें सभासदांकरितां एकत्र खरेदी करतात. उत्तर हिंदुस्थानांत हें काम सेंट्रल बँका करतात. प्रॉव्हिन्शिअल बँकेच्या शाखा बीं, खतें व आउतें पुरविणें आणि शेतांत उत्पन्न झालेलें धान्य व इतर जिन्नस विकणें हीं कामें करतात. पुष्कळ प्रांतांमध्यें दुधाचा पुरवठा करण्याचा प्रश्न सोडविण्याचे प्रयत्न चालू आहेत. या कार्याकरितां कोऑपरेटिव्ह डेअऱ्या स्थापन झाल्या असून त्या कमी किमतींत निर्मळ दुधाचा पुरवठा करण्याचें काम करतात. एक-दोन प्रांतांमध्यें लोणी व तूप पुरविणाऱ्या कोऑपरेटिव्ह सोसायटया स्थापन झाल्या आहेत. गुरांची निपज करणाऱ्या सोसायटया मध्यप्रांत व इतर ठिकाणीं स्थापन झाल्या आहेत. भात सडून तांदूळ करणें, गूळ तयार करणें, शेतीला पाणी पुरविणें (लिफ्ट इरिगेशन) वगैरे कामांकरितां सोसायटया स्थापन झाल्या आहेत. बंगाल्यांतील बर्द्वान विभागामध्यें पाणी पुरविणाऱ्या सोसायटयांची विशेष प्रगति झाली आहे. हा विभाग अलीकडे जलप्रलय आणि दुष्काळ यांनीं दारिद्र्यग्रस्त झाला होता. पण इरिगेशन सोसायटया निघाल्यापासून या विभागाची चांगली सुधारणा होऊं लागली आहे. कापसाची सरकी काढण्याचे कारखाने (जिनिंगे) काढण्याच प्रयत्न सहकारितेच्या तत्त्वावर झाले आहेत. पंजाबमध्यें शेतकीच्या बाबतींत आणखी एक महत्त्वाचा प्रयोग चालू आहे निरनिराळ्या ठिकाणीं असलेलीं लहान लहान शेतें एकत्र करण्याकरितां सोसायटया स्थापन झाल्या आहेत. या सोसायटयांचा उद्देश असा आहे कीं, सभासदांची निरनिराळ्या ठिकाणीं असलेलीं शेतें असतील त्याऐवजीं एक एकत्र समूह होईल अशा तऱ्हेनें पुन्हां शेतांची मालकी ठरवून देणें हा आहे. याप्रमाणें आपखुषीनें हा शेतांच्या एकत्रीकरणाचा प्रश्न सुटल्यास त्या योगानें हिंदुस्थानांतील शेतीसंबंधींची एक महत्त्वाची अनिष्ट स्थिति दूर होणार आहे. मुंबई इलाख्यांत ही अनिष्ट स्थिति नाहींशी करण्याकरितां एका निराळ्या दिशेनें प्रयत्न चालू आहे; एकत्र शेती करण्याकरितां कोऑपरेटिव्ह सोसायटया स्थापन होत आहेत. आणि ही चळवळ यशस्वी झाल्यास सहकारितेनें एकत्र शेती करण्याची पद्धत सुरू होईल. ही पद्धत इटली देशामध्यें अत्यंत यशस्वी झाली आहे.

सा मा जि क सु धा र णा.—कांहीं ठिकाणीं सहकारी संस्थांमुळें शिक्षणाला उत्तेजन मिळालें आहे आणि खेडेगांवांतील सोसायटयांच्या सभासदांनीं सोसायटयांच्या कागदपत्रावर आंगठा उठविण्याऐवजीं लेखी सही करतां यावी म्हणून बरेंच वय झालें असतांहि लिहिण्यावाचण्याचें शिक्षण संपादन केल्याचीं उदाहरणें घडलीं आहेत. त्यामुळें ते सोसायटीच्या कामांत फार लक्ष घालूं लागले. पंजाबमध्यें रात्रीच्या शाळा चालविण्याकरितां स्वतंत्र रूरल सोसायटया स्थापन झाल्या आहेत. मुंबईमध्यें सर विठ्ठलदास ठाकरसी यांनीं दिलेल्या मोठ्या देणगीच्या मदतीनें मोठ्या वयाच्या इसमांकरितां रात्रीच्या शाळा चालविण्यांत आल्या आहेत. आणि पंजाब, बिहार, बंगाल व इतर ठिकाणीं सहकारी संस्थाच शिक्षणावर बराच खर्च करीत आहेत. कांहीं ठिकाणीं सोसायटयांनीं मद्यपानाला आळा घालण्याचे प्रयत्न चालविले आहेत. दारूबाज असलेल्या सभासदांना सोसायटींतून काढून सभासदांची नीतिमत्ता उच्च दर्जाची असावी असा कटाक्ष ठेवणें व त्यांची राहणी सुधारण्याचा प्रयत्न करणें वगैरे गोष्टी या सोसायटया करतात. तसेंच विवाहादि समारंभांत बेसुमार खर्च करणें या गोष्टीसहि विरोध करून अप्रत्यक्षपणें काटकसरीनें राहण्याची संवय सभासदांना लावण्याचें काम सोसायटया करतात. वडिलार्जित कर्जाचा निकाल लावण्याची (लिक्विडेशन) सोय सोसायटयांनीं केल्यामुळें कर्जबाजारीपणांत खितपत पडलेले पुष्कळ शेतकरी कर्जमुक्त झाले आहेत; आणि ते पुन्हां कर्जदारी होण्याची भीति नष्ट झाली आहे. पूर्वीं ज्यांनां शें. २० ते ७५ व्याजानें कर्ज काढावें लागत असे त्याच शेतकऱ्यांनां थोडक्या पतीवर ९ ते १८ शें. व्याजानें कर्ज मिळण्याची सोय झाली आहे. हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांनीं खेडेगांवांतील सावकारांच्याऐवजी कोऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायटयांकडून कर्ज घेतल्यामुळें नुसत्या व्याजाच्या बाबतींत सुमारें एक कोटीहून अधिक रुपयांची बचत होत आहे. सावकारांनींहि साहजिकपणेंच व्याजाचे दर कमी केले असून

सावकारांबद्दल पूर्वी जी मोठी भीति वाटत असे ती हल्लीं नष्ट झाली आहे. शेतकऱ्यांनां देवघेवीच्या वगैरे व्यावहारिक गोष्टींचें अधिक ज्ञान झाल्यामुळें स्वतःचा शेतीचा धंदा अधिक किफायतशीरपणें कसा करावा हें त्यांनां अधिक समजूं लागलें आहे. काटकसर करून पैसा शिल्लक ठेवण्याची उपयुक्तता त्यांनां अधिक चांगली समजूं लागली आहे. सार्वजनिक हिताच्या गोष्टी सामुदायिकपणानें केल्यामुळें अशा एकीपासून काय फायदे होतात तें शेतकऱ्यांनां चांगलें कळूं लागलें आहे आणि कोर्टांत दावे भांडण्याची त्यांची प्रवृत्ति कमी होत चालली आहे. पंजाबमध्यें अशा कित्येक सोसायट्या स्थापन झाल्या आहेत कीं, त्यांच्या सभासदांनां सर्व 'तंटे लवादामार्फत तोडून घेऊं व लवादाचे निकाल मान्य करूं' अशी अट मान्य करावी लागते. सोसायटींचें काम करूं लागल्यामुळें पुष्कळ सभासदांमध्यें स्वावलंबन व आत्मविश्वास हे गुण उत्पन्न झाले आहेत. कोआपरेटिव्ह सोसायट्यांपासून झालेला सर्वांत अत्यंत महत्त्वाचा परिणाम म्हणजे संघशक्तीचें आद्यतत्त्व—प्रत्येक जण सर्वांकरितां व सर्वजण प्रत्येककारतां ही गोष्ट—खेडेगांवीं सोसायट्यांच्या सभासदांनां समजूं लागली आहे. हिंदुस्थान हा प्राचीन ग्रामव्यवस्थेबद्दल प्रसिद्धच आहे, तशाच प्रकारचा सामुदायिक जीवितक्रम चालविण्याचें शिक्षण पुन्हां खेडयापाडयांनां कोआपरेटिव्ह सोसायट्यांमुळें मिळूं लागलें आहे.

## १९२४–२५ सालांतील सोसायट्या

| प्रांत | दशलक्ष लोकसंख्या | मध्यवर्ती (प्रॉव्हिन्शियल सेंट्रल व बँकिंग युनियनसह) | देखरेख करणारे जबाबदारसंघ व री-इन्शुअरन्स | शेतकी (गुरांच्या-विमा सोसायट्या-सह) | बिगरशेतकी | एकूण सोसायट्या | लक्ष वस्तीशीं सोसायटींचें प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मद्रास | ४२.३ | ३२ | ३२३ | ९४७२ | १३१२ | १११३९ | २६.३ |
| मुंबई | १९.३ | २१ | ७३ | ३३८६ | ६४६ | ४१२६ | २१.४ |
| बंगाल | ४६.७ | ९२ | ६ | १०२०२ | ७४७ | ११०४७ | २३.७ |
| बिहार व ओरिसा | ३४.० | ९८ | १७१ | ५८६२ | ३३६ | ६४२७ | १८.९ |
| संयुक्तप्रांत | ४५.४ | ७३ | २ | ५६७८ | २४४ | ५९९७ | १३.२ |
| पंजाब | २०.७ | ११२ | ... | ११४१० | ९६८ | १२४९० | ६०.३ |
| ब्रह्मदेश | ११.७ | २४ | ६३९ | ४६०८ | २२२ | ५५४९ | ४७.४ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | १३.९ | ३६ | १११ | ४१६७ | ५० | ४३६४ | ३१.४ |
| आसाम | ७.६ | १८ | ... | ७६१ | ४४ | ८२३ | १०.८ |
| कूर्ग | ०.२ | १ | ६ | १६२ | १३ | १८२ | ९१.० |
| अजमीर–मेरवाड | ०.५ | ७ | २ | ४५६ | ६८ | ५३३ | १०६.६ |
| हैद्र.बाद | ०.१ | ... | ... | ... | ९ | ९ | ९.० |
| दिल्ली | ०.५ | १ | ... | १६९ | ३८ | २०८ | ४१.६ |
| एकूण(ब्रिटिश हिंदुस्थान ) | २४२.९ | ४७५ | १३२९ | ५६३९३ | ४६९७ | ६२८९४ | २५.९ |
| संस्थानें— | | | | | | | |
| म्हैसूर | ६.० | १८ | .... | ११६४ | २८७ | १४६९ | २४.५ |
| बडोदें | २.१ | ५ | ... | ६०१ | ६३ | ६६९ | ३१.९ |
| हैद्राबाद | १२.५ | १९ | ... | १४९० | २५७ | १७६६ | १४.१ |
| भोपाळ | ०.७ | २४ | ११ | ९३१ | ... | ९६६ | १३८.० |
| ग्वाल्हेर | ३.२ | ... | .... | २१८२ | ३० | २२१२ | ६९.१ |
| इंदूर | १.१ | ५ | .... | २३६ | २८ | २६९ | २४.५ |
| काश्मीर | ३.३ | ९ | .... | १२८४ | ७० | १३६३ | ४१.३ |
| एकूण संस्थानें | २८.९ | ८० | ११ | ३७८८८ | ७३५ | ८७१४ | ३०.२ |
| एकूण | २७१.८ | ५५५ | १३४० | ६४१८१ | ५४३२ | ७१६०८ | २६.३ |

मध्यवर्ती:—या सदरांत प्रांतिक आणि मध्यवर्ती बँका आणि बँकांचे संघ येतात

देखरेख व गॅरंटी संघ:—यांत री-इन्शुअरन्स सोसायटया येतात.

शेतकी:—यांत गुरांच्या विमा कंपन्या येतात.

## हिंदुस्थानांतील पेढ्यांचें वाढतें भांडवल

| साल | भागीचें भांडवल वसूल झालेलें | वर्ष अखेर कर्ज व ठेवी | | | | | रिझर्व्ह व इतर फंड | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | सभासदां-कडून | सोसाय-टयांकडून | प्रांतिक व मध्यवर्ती | सरकार कडून | बिगर सभासदां-कडून व इतर | | |
| १९०६-०७ ते १९०९-१० | १३१९ | १४१२ | १३५९ | | ५८६ | १९६९ | १६७ | ६८१२ |
| १९१०-११ ते १९१४-१५ | ८८८७ | ८८२८ | १९३४२ | | १०८७ | १४१९८ | २५०० | ५३८४२ |
| १९१५-१६ ते १९१९-२० | २५१९७ | ९६३५ | ४७८१ | ५०३१९ | २५५८ | ४७०२५ | १२३३२ | १५१८४७ |
| १९२०-२१ | ४०५२५ | १६३६० | ९९४१ | ९१७९९ | ४९५० | ७९२५२ | २१४६६ | २६४२९३ |
| १९२१-२२ | ४०३६९ | २२४७४ | १२३७६ | १०७४२४ | ५२४६ | ९१९९४ | २५३४१ | ३११२२४ |
| १९२२-२३ | ५१२४५ | २६९७७ | १४८२२ | ११८७७१ | ५५३८ | १०७७३९ | ३०२९८ | ३५५३९० |
| १९२३-२४ | ५७२९३ | २९३८२ | १८५२२ | १३५२१३ | ७३७५ | १२१८८७ | ३५६२५ | ४०५२९७ |
| १९२४-२५ | ६७४०० | ३२०३० | १९३३० | १६१७३४ | १०७३७ | १४७२३८ | ४३४६० | ४८१९२९ |

## १९०६-०७ पासून आतांपर्यंत सभासदांची वाढती संख्या

| साल | मध्यवर्ती | देखरेख करणारे व हमीदारसंघ | शेतकी | शेतकीतर सभासद | एकूण सभासद |
|---|---|---|---|---|---|
| १९०६-०७ ते १९०९-१० | १९८७ | | १०७६४३ | ९४२६७ | १६१९१० |
| १९१०-११ ते १९१४-१५ | २३६७७ | | ४५९०९६ | ८९१५७ | ५४८२५३ |
| १९१५-१६ ते १९१९-२० | ८९९२५ | १०९७१ | ९०२९३०* | २२६०३१ | ११२८९६१ |
| १९२०-२१ | १४३४८८ | १९३२२ | १३६२३९१ | ३९०५१३ | १७५३९०४ |
| १९२१-२२ | १५४९७८ | २१५५४ | १५२३६१४ | ४५०६७६ | १९७३२९० |
| १९२२-२३ | १६३६७५ | २४७३० | १६१३३६८ | ४८९०७८ | ११०२४४६ |
| १९२३-२४ | १६६५८९ | २८७२० | १७७४९१३ | ५३८६५४ | २३१३५६७ |
| १९२४-२५ | १९३३८५ | २७८५८ | २०३१२०६ | ५९८६२४ | २६२९८३० |

* १९१५-१६ व १९१६-१७सालांतील गुरांच्या विम्याच्या सोसायटयांच्याशिवाय आणि १९१७-१८ सालांतील मुंबई व संयुक्तप्रांताशिवाय.

## १९०६–०७ पासून आतांपर्यंत सभासदांची संख्या

| साल | मध्यवर्ती | सुपरव्हिजिंग व गॅरांटिंग युनिअन्स | शेतकी | बिगर शेतकरी | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १९०६–०७ ते १९०९–१० | १७ | | १७१३ | १९६ | १९२६ |
| १९१०–११ ते १९१४–१५ | २३१ | | १०८९१ | ६६४ | ११७८६ |
| १९१५–१६ ते १९१९–२० | ३०४ | ६३८ | २५८७३ | १६६२ | २८४७७ |
| १९१९–१९२० | ४०० | ९९४ | ३६७१६ | २६६२ | ४०७७२ |
| १९२०–१९२१ | ४४९ | ११५० | ४२५८२ | ३३२२ | ४७५०३ |
| १९२१–१९२२ | ४८० | १२४० | ४६७८८ | ३६७४ | ५२१८२ |
| १९२२–१९२३ | ५१४ | १३७९ | ५०२८६ | ३१५७ | ५६१३६ |
| १९२३–१९२४ | ५३० | १४०२ | ५४६४५ | ४५२९ | ६११९६ |
| १९२४–१९२५ | ५५५ | १३४० | ६४२८१ | ५४३२ | ७१६०८ |

**दळणवळण**--व्यापार व इतर दळणवळण यांच्या सोयीसाठीं रस्ते, कालवे व नद्या, आगगाडया, पोष्ट, तारायंत्रें वगैरे साधनांची फार जरूरी असते व सुधारलेल्या राष्ट्रांतून या साधनांची बरीच वाढ दिसून येते. हिंदुस्थानांत पूर्वी सध्यांसारख्या आगगाडया व पोष्ट, तारायंत्रें नव्हतीं तरी रस्ते–व्यापारी व रहदारीचे–सोयीचे करण्याकडे सरकारचें लक्ष असे. मोंगल अमदानींत उत्तरहिंदुस्थानांत लाहोर–पेशावरपर्यंत चांगले रस्ते केलेले होते. महाराष्ट्रांत पेशव्यांच्या अमदानींत व नंतर व्यापारी वाहतुकीचे मार्ग कोणते होते याची माहिती ज्ञानकोशाच्या पहिल्या विभागांत दिलेली आहे. आज निरनिराळ्या प्रांतांतून सरकारच्या ताब्यांतले मोठे सार्वजनिक रस्ते–साधे व खडी घालून तयार केलेले–किती मैल लांबीचे आहेत याची माहिती पुढील कोष्टकावरून होईल

| प्रांत | साल | खडीचे रस्ते | बिनखडीचे रस्ते | एकूण |
|---|---|---|---|---|
| बंगाल | १९२१ २२ | ३१४० | ३२८२४ | ३५९६४ |
| आसाम | १९२२–२३ | ४४७ | १५५९ | २००६ |
| बिहार ओरिसा | ,, | ३४६६ | २४५१३ | २७९७९ |
| संयुक्तप्रांत | ,, | ७४४८ | २६६०३ | ३५०५१ |
| पंजाब | ,, | ३०७४ | २२२३७ | २५३११ |
| ब्रह्मदेश | १९२१–२२ | २३५८ | ११९३३ | १३४९१ |
| वऱ्हाड-मध्यप्रांत | १९२२–२३ | ४२५५ | ३९०० | ८१५५ |
| मद्रास | १९२०–२१ | १८३६० | ७९९६ | २६३५६ |
| मुंबई | १९२१–२२ | ८५३५ | २०५४८ | २९०८३ |
| वायव्य सरहद्दप्रांत | १९२२–२३ | ९४८ | ७१६ | १६६४ |
| कूर्ग | ,, | २४५ | १७३ | ४१८ |
| राजपुताना | १९२०–२१ | ३२१ | २८७ | ६०८ |
| बलुचिस्तान | १९२१–२२ | ९८४ | ३४८ | १३३२ |
| लष्करी कामासाठीं | १९२२–२३ | २०७५ | ११५१ | ३२२६ |

**वाहतुकीचे कालवे.**–बऱ्याचशा प्रांतांतून शेती–बागायतीकरितां काढलेल्या कालव्यांतून लहान बोटी–होडयांतून प्रवास करतां येतो आणि माल वाहून नेतां येतो. नौकानयनाला उपयोगी अशा निरनिराळ्या प्रांतांतील कालव्यांची लांबी अशीः–मद्रास १४३९; मैल संयुक्तप्रांत ४१२ मैल; पंजाब, २६३ मैल; बंगाल, १३९६ मैल; बिहार–ओरिसा, ५०१ मैल व ब्रह्मदेश, ६० मैल.

आ ग गा ड्या.–हिंदुस्थानांतील आगगाड्यांसंबंधीं सविस्तर माहिती ज्ञानकोश–शरीरखंडांत (विभाग ७) दिलेलीच आहे. तेव्हां या ठिकाणीं फक्त आज किती प्रगति झाली हेंच स्थूलपणें पहावयाचें आहे. १९२६च्या मार्च महिन्याच्या अखेरीस एकंदर३८९७९.४८ मैलांचा आगगाडी रस्ता हिंदुस्थानांत होता त्यांपैकीं ब्राड गेज १८९३१.७० मैल; मीटर–गेज १९८७३ ४० मैल; नॅरोगेज ३७७४.४९ मैल अशा प्रकारचे रस्ते होते. हे मैलांचें प्रमाण आगगाडीच्या पहिल्या–दुसऱ्या–तिसऱ्या या तीन वर्गांत विभागलें तर पुढीलप्रमाणें बसेल:—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पहिला वर्ग | ३४६९९.८२ | मैल | = | शें. | ८९.९३ |
| दुसरा | ,, २९७७.०६ | ,, | = | ,, | ७.७२ |
| तिसरा | ,, ९०६.६० | ,, | = | ,, | २.३९ |

तसेंच पहिल्या वर्गांत सर्व ब्रॉडगेजचे मैल, शें. ८७ मीटरगेजचे मैल व शें. ५३.३ नॅरोगेजचे मैल येतील. शेंकडा ७० इतके मैल आगगाडी सरकारी असून प्रत्यक्ष सरकारच कारभार पहातें असे किती मैल हें काढल्यास शें. ४० हें प्रमाण येईल. १९२५ सालीं ईस्ट इंडियन रेल्वे व ग्रेट इंडियन पेनिन्शुलर रेल्वे या सरकारच्या ताब्यात आल्या.

१९२५–२६ सालच्या सरकारी साल अखेरीस एकंदर २४४६.६० मैल नवा रस्ता चालू होता; त्यापैकीं १०१६.१३ ब्राडगेज, १११९.२४ मीटरगेज व ३१९.२३ नॅरोगेज रस्ता होता. त्यासालीं ११०२.१६ मैलांचा आणखी रस्ता करण्याला संमति दिली होती. नव्या आगगाड्यांपैकीं खैबर रल्वे ही तारीख १ नोव्हेंबर १९२५ ला पुरी होऊन सुरू झाली. हा २८ मैलांचा आगगाडीचा रस्ता असून जमरूडपासून लंडी-कोटलपर्यंत २१ मैलांचा रस्ता मोठ्या प्रयासानें १९२०–२५या पांच वर्षांत तयार झाला. पुढील लंडी-खान्यापर्यंतचा रस्ता बहुतेक तयार आहे.

१९२४ सालीं असेंब्लीनें ठराव करून रेल्वे खातें इतर खात्यांपासून निराळें करविलें व त्याचें जमा-खर्चाचें अंदाजपत्रक निराळें मांडण्याची वहिवाट पाडली. यामुळें रेल्वेबोर्डाला स्वतंत्रपणें धडाडीनें प्रगति करण्यास वाव मिळाला. आतां यापुढें दरसाल १००० मैल आगगाडी झाली पाहिजे अशी बोर्डाची महत्त्वाकांक्षा आहे. शिवाय विजेच्या साहाय्यानें सर्व आगगाड्या चालविण्याची खटपट चालू आहे व या बाबतींत उपक्रमहि झाला आहे. तसेंच हिंदुस्थान–सीलोन, व हिंदुस्थान–ब्रह्मदेश यांचा थेटपर्यंत रेल्वेनें संबंध जोडण्याचा विचार चालू आहे.

पो ष्ट–ता रा यं त्रें.–आगगाडीच्या खालोखाल दळण-वळणाच्या कामांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे पोष्ट–तारा-यंत्रें होत. हें साधन लोकांच्या सोयीचें तर आहेच पण विशेषत: हें सरकारच्या अत्यंत उपयोगी पडतें. या खात्याला बऱ्याचशा गोष्टी कराव्या लागतात. लोकांचा पेढीवाला, एजंट आणि दूरचा माल आणून देणारा (बाजार करणारा) या दृष्टींनीं लोकांनां हें खातें हिता-वह आहेच. तसेंच हिंदुस्थानांत बाहेरून येणाऱ्या जिन्न-सांवरचा कर वसूल करणें, सरकारी नोकरांचा विमा उतरणें, हिंदी लष्करांतील पेन्शनरांची पेन्शनें देणें, लष्करी जमावाकरितां राखीव माल सांभाळणें यांसा-रख्या सरकारी कामगिऱ्या कराव्या लागतात. क्विना-ईन सुद्धां पोष्टच विकतें. या सर्व उपयुक्त गोष्टी कर-णारीं पोष्ट आफिसें संबंध हिंदुस्थानांत बरींच असतील असें साहजिक वाटतें, पण हीं सारीं सुमारें २०००० ऑफिसें असून त्यांतून सुमारें एक लाख लोक काम करितात. १९०३–०४ सालीं पोष्टाचा व्यवहार पुढील प्रमाणें झाला (आंकडे हजारांचे).

| पोष्टांतील वस्तू | संख्या |
|---|---|
| पाकीटें, कार्डें, व मनीऑर्डरी | १०८१७०६ |
| वर्तमानपत्रें | ७१०२० |
| पार्सलें | १३९६६ |
| पॅकेट | ७५८९६ |

पोष्टखात्याचें या सालचें एकंदर उत्पन्न ४९२३६११ पौंड व खर्च ४३९८२०८ पौंड होता.

ता रा.—गेल्या पंचवीस–तीस वर्षांत या खात्याची किती वाढ झाली हें पुढील आंकड्यावरून दिसून येईल. १८९७–९८ सालीं ५०३०५ मैल लाईन आणि १५५०८८ मैल लांबीच्या तारा होत्या; १९२५ च्या मार्च अखेरीस हे आंकडे अनुक्रमें ९३०५४ व ४६१५९२ होते. डिपार्टमेंटल तार ऑफिसें २९७ अनु-क्रमें आणि १६५ (९ किनाऱ्यावरील रेडिओ ऑफिसें धरून) असून पोष्टाला जोडून असणारीं तारऑफिसें १६३४ होतीं तीं ३५५५ झालीं. पैसे दिलेल्या तारांची संख्या पुढील प्रमाणें:—

| | | सन १८९७–९८ | १९२४–२५ |
|---|---|---|---|
| देशांतील | खाजगी | ४१०७२७० | १५३९४०४४ |
| | सरकारी | ८६०३८२ | ११०४५९० |
| | छापखान्याकडील | ३५९१० | ४५९१३४ |
| परदेशी | खाजगी | ७३५६७९ | २८१५६३६ |
| | सरकारी | ९८९६ | ३२४१५ |
| | छापखान्याकडील | ५२७८ | ३६७३० |

१९२३—२४ सालें अखेर या खात्यांत एकूण १३७७० माणसें कामावर होतीं. या सालाच्या अखेर या खात्यावर सुमारें एकवीस कोट रुपये खर्च झाले आहेत व त्या सालीं सुमारें ३ लाख रुपये तूट आली.

बि न ता री.-१९२४ २५ अखेरीस एकंदर २३ स्टेशनें होतीं. फक्त पोर्टब्लेअरच्या स्टेशनहून लोकांनां एकदम तारा पाठविण्याची सोय केलेली होती. रंगून-मद्रास यांचा असणारा बिनतारी संबंध चांगला यशस्वी असून असेच आणखी संबंध जोडण्याचा विचार आहे.

टे ले फो न.-याचाहि प्रसार मोठ्या प्रमाणांत चालू आहे. १९२४ सालच्या मार्च अखेर सरकारी खात्यानें स्थापिलेले टेलेफोन एक्सचेंजेस एकूण २३१ असून १२००७ सरळ लाईनीजोड आणि १६३४ वाढविलेले टेलेफोन होते. टेलेफोन कंपन्यांचे एक्सचेंजेस १४ असून त्यांचे जोड २९२२२ होते.

ब्रॉ ड का स्टिं ग -हिंदुस्थानांत अद्याप या साधनाची फारशी प्रगति झाली नाहीं. तथापि दिवसानुदिवस लोकांनां याची उपयुक्तता पटत चालली आहे. आणि व्यापारी दळणवळणाच्या कामींहि या साधनाचा चांगला उपयोग होत आहे. मुंबई, मद्रास, कलकत्ता व रंगून या चार ठिकाणीं रेडिओक्लब निघाले असून त्यांच्या द्वारें वक्तशीरपणें ठराविक कार्यक्रम फैलावले जात आहेत. ब्रॉडकास्टिंग कंपन्या काढण्याला सरकारनें परवानगी दिली असून सध्यां मुंबई व कलकत्ता या दोन ठिकाणीं अशा कंपन्या आहेत. आणखीहि कंपन्या हिंदुस्थानभर लवकरच निघतील असा अंदाज आहे.

वि मा नें.-हिंदुस्थानांत आगगाड्यांप्रमाणें लवकरच विमानें हीं दळणवळणाचीं मुख्य साधनें होऊन राहतील. यूरोप ते ऑस्ट्रेलिया व पूर्वेकडील राष्ट्रें यांचा मार्ग हिंदुस्थानावरून असल्यानें हिंदुस्थानावरून तिकडील विमानें तर जाणारच पण खुद्द हिंदुस्थानांतहि बऱ्याच बिकट भागांत जाण्यायेण्यासाठीं विमानें आवश्यक होणार. हिंदुस्थान देशच असा आहे कीं, त्यांत सर्वत्र रेल्वे किंवा इतर गाड्या नेणें शक्य नाहीं. तेव्हां त्याकरितां विमानें ठेवणें फार सोयीचें होईल. देशांत व्यापाराचीं केंद्रस्थानें फार लांब लांब असल्यानें विमानें हें जलद व्यवहार करण्याचें प्रमुख साधन होऊन बसेल यांत शंका नाहीं.

हवेंतील रस्ते ठरविण्याचा उपक्रम सुरू आहे. मुंबई-कलकत्ता, कलकत्ता-रंगून, कलकत्ता-दिल्ली व दिल्ली-कराची हे मार्ग नक्की केलेले आहेत. डमडम (कलकत्ता), बामरावली (अलाहाबाद), गिलबर्ट टेंकडी (मुंबई) या ठिकाणीं मुलकी विमानगृहें बांधलीं आहेत. लष्करी वैमानिक दल आहेच व त्याचीं गृहेंहि वायव्य-सरहद्दप्रांतांत आहेत. तेव्हां तींहि मुलकी विमानवाहतुकीला उपयोगी पडणार आहेत. हिंदुस्थान आणि इंग्लंड यांमध्यें वैमानिक दळणवळण चालू झालें म्हणजे आपोआपच देशांत अंतर्भागांत विमानांचा व्यवहार सुरू होईल. ब्रिटिश साम्राज्याचे मुख्य वैमानिक दलाचे अधिपति इंग्लंड-हिंदुस्थान मार्ग पाहून गेले आहेत. हिंदुस्थानसरकारहि पाश्चात्त्य वैमानिकांनां हिंदुस्थानावरून जाण्याच्या कामीं मदत करीत आहे. तेव्हां थोड्याच वर्षांत दळणवळणाचें मुख्य साधन म्हणून विमानांचा उपयोग होत जाईल.

**लोकांची आर्थिक स्थिति**—ब्रिटिश सत्तेखालीं हिंदुस्थानचें आर्थिक कल्याण झालें किंवा नाहीं हा प्रश्न वादग्रस्त आहे. जुन्या पिढींतील अर्थशास्त्रज्ञ हे इंग्रजी राज्यानें हिंदुस्थानचें कल्याण झालें अशा मताचे आहेत. परंतु हल्लीं अर्थशास्त्रज्ञांचा असा एक वर्ग निर्माण झाला आहे कीं, तो वर्ग इंग्रजी राज्यास दोष देऊं लागला. या नवीन अर्थशास्त्रज्ञांचें म्हणणें असें कीं, इंग्रजी राज्यानें हिंदुस्थानचें अल्पांशानें कल्याण झालें असेल परंतु त्यांच्या कारकीर्दींत हिंदुस्थानचे लोक बेकार व भिकारी झाले. हिंदुस्थानचें हित झाल्याबद्दल कांहीं पुरावा मिळूं शकेल; नाहीं असें नाहीं. रेल्वे उतारूंची वाढती संख्या लक्षांत घेतली असतां असें दिसून येईल कीं लोकांची सोय केली कीं, ते पैसे खर्च करण्याला तयार होतात. कांहीं दिवसांपूर्वी रुपयांचा तुटवडा पडला असतां जे लोक पूर्वी चांदीचे दागीने वापरीत नसत ते सुद्धां चांदीचे दागीने करूं लागले. गेल्या दुष्काळास शेतकऱ्यांनीं जें नेटानें तोंड दिलें त्यावरून हिंदुस्थानचा आर्थिक परिस्थिति पूर्वीपेक्षां सुधारली आहे असेंच दिसून येईल. पावसाची स्थिति अनिष्ट असतांना सुद्धां अडचणीच्या काळीं जे लोक प्राचीन काळीं कंदमूळांवर रहात असत ते धान्याची धारण महाग-तीन चार शेर-असतांना देखील धान्यच वापरूं शकत.

याशिवाय हिंदी लोकांची आर्थिक स्थिति पूर्वीपेक्षां चांगली आहे असें दाखविण्यास कांहीं प्रत्यक्ष प्रमाणेंहि देण्यांत येतात. हल्लीं हिंदुस्थानचें दर माणशीं उत्पन्न किती आहे हें दाखवून आर्थिक स्थितीची नीट कल्पना

आणून देण्याचा प्रयत्न होतो. हें माणशी उत्पन्न काढणें बरेंच कठिण काम आहे; तेव्हां अगदीं नक्की आंकडा मिळतो अशांतला भाग नाहीं. गेल्या शतकाच्या अखेरीस हिंदुस्थानचें दर माणशीं वार्षिक उत्पन्न दरसाल ३० रु.च होतें.म्हणजे हा आंकडा कमींत कमी माणशी किती उत्पन्न होतें हें दर्शवितो. मद्रास सरकारच्या आंकडेखात्यानें जे शेतकरी वर्गाच्या उत्पन्नाविषयीं आंकडे गोळा करून कांहीं दिवसांपूर्वी प्रसिद्ध केले त्यावरून तेथील दरमाणशीं वार्षिक उत्पन्न १०० रुपयापेक्षां थोडें जास्त आहे,असें दिसून येतें. मुंबई इलाख्यांत शहरांत(Urban) लोकांचें वार्षिक उत्पन्न १०० रुपये आहे व ग्रामवासी (rural) लोकांचे ७५ रुपये आहे. एकदां हिंदी पुढाऱ्यांनीं हिंदुस्थानच्या वार्षिक उत्पन्नाची चवकशी करण्याची मागणी सरकारपाशीं केली पण सरकारला हें काम फार खर्चाचें वाटलें व शिवाय खरी माहिती मिळेल कीं नाहीं याबद्दल शंका आली. तथापि लोकांच्या मागणीला कांहीं जबाब म्हणून सरकारनें एम्. विश्वेश्वरय्या यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमेटी नेमली.

दहापंधरा वर्षांपूर्वीपेक्षां हल्लीं ठिकठिकाणीं मजुरीचे दर दुपटीनें वाढले आहेत. मुंबई इलाख्यांत १९१३ सालीं शेतांत काम करणाऱ्या मजुराची मजुरी ४ आणे ९ पै होती; ती १९२२ सालीं ९ आणे झाली. तालुक्याच्या अगर जिल्ह्याच्या ठिकाणची बिन कसबी गड्याची मजुरी ६ आणे ३ पै वरून १२ आण्यांवर गेली. कारागिरी मजुरीचेहि दर वाढले. मुंबई इलाख्यांत कसबी मजुराची दैनिक प्राप्ति १३ आणे ९ पै ची रु. १८१०९ झाली. पंजाबमध्यें हाच प्रकार दिसून येतो. मजुरीची पहाणी झाली तेव्हां बिनकसबी व कसबी मजुरांचे दर दुपटीनें वाढल्याचें दिसून आलें. त्याबरोबरच धान्याच्या दरांतहि महागाई झाली. पूर्वी ३ रु. देऊन जेवढें धान्य मिळत असे तेवढें धान्य घेण्यास सध्यां ६ रु. द्यावे लागतात. तथापि अगदीं अलीकडे या दरांत पुन्हां पालट झाला आहे. मजुरीहि उतरली आहे व धान्यहि थोडें स्वस्त झालें आहे.

वरील गोष्टींवरून हिंदुस्थानची आर्थिक स्थिति दिवसानुदिवस सुधारत आहे असें धरलें तरी हिंदुस्थानांतील बरेंचसे लोक एक प्रकारच्या दुष्काळग्रस्त परिस्थितीनें गांजलेले आहेत. मुंबई इलाख्यांत १९२१ सालीं गरीब वर्गास त्यांच्या मिळकतीपैकीं शेंकडा ६८ इतका भाग केवळ अन्नाकरतां खर्च करावा लागत असे व शें. १५ कपड्यालत्त्याकरतां खर्च करावा लागे; बाकीचा शें. ११ दररोजच्या व्यवहारांत लागणाऱ्या जिन्नसाकरतां खर्च करणें भाग पडे. व उरलेले फक्त शें. ६ हे पैसे मात्र त्यांच्या स्वतःच्या इच्छेस अनुसरून करमणुकीखातर, सुखसोयीकरतां व शिक्षणाकरतां खर्च करण्यास सवड असे ! मुंबईतील मजूरवर्गाच्या मिळकतीची व खर्चाची कांहीं दिवसांपूर्वी पहाणी केली तेव्हां असें दिसून आलें कीं, मजुरास आपल्या सरासरी ५२ रु. मासिक प्राप्तींतून शेंकडा ५६.८ अन्नाकरतां, शेंकडा ९.६ कपडालत्ता खरेदी करण्याकरतां, शें. ७.७ घरभाडें, शें. ७.४ रु सर्पण व दिवाबत्ती, व शें. १८.५ इतर कारणाकरतां खर्च करावे लागतात. यावरून एवढें दिसतें कीं, जरी यदाकदाचित आर्थिक स्थिति सुधारत असली तरी ती सुधारणा अगदीं मंद व असमाधानकारक आहे. व म्हणूनच याचें खापर सरकारच्या डोक्यावर फोडलें जातें. तेव्हां लोक साहजिकच उद्योगधंद्याला सरकारकडून मदत मागत आहेत, व शेती व उद्योगधंदे यांची वाढ होण्याकरतां सरकारी प्रयत्नांची आवश्यकता आहे असें प्रतिपादीत आहेत. सरकारला या गोष्टी आतांपर्यंत कांहीं कारणांनीं कां होईना करतां आल्या नाहींत व म्हणूनच हिंदी लोक त्यांस दोष देत आहेत.

हल्लीं सरकारचा खर्च प्रमाणाबाहेर वाढला असल्यानें हिंदुस्थान गरीब झालें आहे तेव्हां यापुढें तरी नवीन सुधारणान्वयें झालेल्या काटकसरीनें ही स्थिति नाहींशी होईल अशी आशा आहे. लोकांच्या दीन दशेचें एक कारण असें सांगण्यांत येतें कीं, हिंदु समाज पैसा मिळण्याचें ध्येय योग्य व श्रेयस्कर न मानतां अगदीं गौण दर्जाचें मानतो. हिंदूंची धार्मिक भावना व सामाजिक रचना अशीच आहे कीं ती त्यांस गरीब बनविते. हे आरोप सर्वस्वी खोटे नाहींत. तथापि मुख्य कारण हें कीं हिंदी लोकांची उत्पादनशक्तीच कमी आहे. हिंदुस्थानांतील शेतकरी आपल्या जमिनीपासून जेवढें उत्पन्न काढतात त्याच्या निम्यानें तींत खत घालीत नाहींत, जमिनीची निगा करीत नाहींत व या योगानें दिवसानुदिवस जमीन निकस होत आहे. फार झालें तर एखादा हिंदी शेतकरी कांहीं थोडी पैशाची पुंजी मात्र शक्य झाल्यास आपल्या मुलाकरितां ठेवूं शकतो. परंतु यूरोपांतील शेतकरी आपली जमीन पिकानें समृद्ध करून तींत खत घालून व तिची निगा राखून, उत्तम अशा स्थितींत आपल्या मुलास देतो आणि फक्त चालू

व्यवहारापुरतेंच भांडवल जवळ ठेवतो. हिंदी शेतकऱ्याचीं शेतकीचीं अवजारें जुन्या तऱ्हेचीं असून असलेल्या स्थितींतच तो समाधानी वृत्तीनें रहातो, आपल्या सुखसोयी करण्याकरतां लागणारे पैसे मिळविण्याकरतां धडपड करण्याचें तो नाकारतो. आपलीं प्राथमिक स्वरूपांतील अवजारें व पिढीजाद झोंपडी तो दर वर्षी दुरुस्त करील पण जरा जास्त खर्च करून कायमची इमारत अगर सुधारलेलीं हत्यारें तो वापरावयाचा नाहीं. याला मुख्य कारण त्यास शिक्षण कांहींहि मिळालेलें नसतें. यांत भर म्हणूनच कीं काय हिंदुस्थानची प्रजा दर वर्षी मोठ्या प्रमाणांत वाढत आहे. अविभक्त कुटुंबपद्धति हेंहि भिकेस एक कारण झालें आहे. कारण कुटुंबांतील एका कर्त्या माणसास बऱ्याच आळशी माणसांनां पोसावें लागतें. तसेंच हिंदी समाजांतील कांहीं दुराग्रहहि या गरीबीस कारण झाले आहेत. पांढरपेशांनां कारखान्यांत मजूर म्हणून काम करणें कमीपणाचें वाटतें. तेव्हां बराच धडधाकट उच्च वर्ग भिक्षावृत्तीवर राहणें पत्करतो व गरीब लोकांनीं दिलेल्या दानांतून आपला कसावसा उदरनिर्वाह करतो. याशिवाय अपात्रीं दानें, रूढींनां बळी पडणें, लग्न मुंजी-कुलधर्म वगैरे बाबतींत त्याचा बराच पैसा खर्च होतो.

इतर राष्ट्रांतल्यापेक्षां हिंदुस्थानांत बराच मोठा स्त्रीवर्ग पुरुषांच्या जिवावर अवलंबून असतो. खालच्या वर्गांतील स्त्रिया मजूरी करूं शकतात हें खरें परंतु उच्च वर्गांतील स्त्रियांनीं कामधंदा करणें कमीपणाचें समजलें जातें. यामुळें शें. ५० इतकी लोकसंख्या बसून आहे. हिंदी लोकांची आयुष्यमर्यादाहि अगदीं थोडी आहे. तेव्हां या व अशा इतर आणखी कांहीं कारणांनीं हिंदुस्थान देश दारिद्र्यानें गांजून गेला आहे एवढें स्पष्ट दिसून येतें.

हिंदुस्थानांतील लहान गरीब शेतकरीहि शेतकीच्या जोडीला दुसरा कोणताहि धंदा करून आपलें उत्पन्न वाढवीत नाहीं. सुधारलेल्या मोठ्या पाश्चात्य राष्ट्रांत देखील लहान शेतकऱ्याला फळें तयार करणें, रेशीम काढणें, कोंबड्या-बदकें बाळगणें वगैरे दुसरे धंदे करावे लागतात. पण इकडे बहुतेक शेतकरी चार पांच महिने स्वस्थच बसून रहातो. तेव्हां त्यांनीं इतर लहानसहान धंदे फावल्यावेळीं किंवा मुख्य धंद्याच्या जोडीनें केले पाहिजेत याची जाणीव आतां म. गांधींच्या चळवळीनें होऊं लागली आहे. सुशिक्षित वर्गांनीं मिशनऱ्यांप्रमाणें खेडयांतील लोकांनां उन्नतीचा मार्ग दाखवून दिला पाहिजे, एवढेंच नव्हे तर आपण स्वतः खेडयांत राहून तेथील सुधारणा केली पाहिजे. एरव्हीं कोणत्याहि सरकारला सध्यांची परिस्थिति फारशी सुधारतां यावयाची नाहीं. सरकार फक्त शास्त्रीय साधनांचा शेतकऱ्यांत प्रसार करील, सरकारी तत्त्वावर काटकसरीला उत्तेजन देईल, व लोकांनां स्वतःच्या पायावर उभें राहतां येईल इतकें शिक्षण देईल. बाकीच्या गोष्टी स्वराज्यांतहि लोकांनां स्वतःच केल्या पाहिजेत. सरकारला नुसते दोष लावून काम भागणार नाहीं.

---

## प्रकरण ८ वें.

## बौद्धिक प्रगति.

शिक्षण—हिंदुस्थानांतील सांप्रतच्या शिक्षणपद्धती संबंधीं बरोबर ज्ञान होण्यास त्यासंबंधीं इतिहास पाहिला पाहिजे. हल्लीं हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत शिक्षणविषयाइतक्या भानगडी आणि मतभेद असलेला दुसरा विषय नाहीं. आतांपर्यंत सरकारनें स्थानिक संस्थांनीं व शिक्षणाभिमानी खासगी इसमांनीं आपल्या हातांतील मर्यादित द्रव्यनिधी, ज्यांनां शिक्षणाचे फायदे समजले आहेत अशा लोकांची शिक्षणविषयक मागणी पुरी करण्यांत खर्च केले आहेत. पण ज्या लोकांमध्यें शिक्षण मिळविण्यासंबंधीं इच्छा मुळींच नाहीं अशा लोकांमध्यें ती इच्छा उत्पन्न करण्याकडे फारसें लक्ष देण्यांत आलेलें नाहीं, आणि असा समाज फार मोठा असल्यामुळें हल्लींच्या शिक्षणपद्धतीनें समाजांतील वरचा वर्ग चांगला सुशिक्षित व खालचे वर्ग अगदीं निरक्षर अशी दुरवस्था उत्पन्न झाली आहे. अशा या अस्वाभाविक शिक्षणवाढीमुळें समाजव्यवस्थेंत मोठाले दोष उत्पन्न झाले आहेत. त्याविरुद्ध अगदीं अलीकडे जोराची चळवळ सुरू झाली असून खालच्या वर्गांत शिक्षणप्रसार करण्याकरितां कित्येक प्रांतांत सक्तीच्या प्राथमिक शिक्षणासंबंधानें कायदे पास करण्यांत आले आहेत.

पा श्चा त्य वि द्ये चा प्र वे श.—ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानांत आपल्या सत्तेच्या प्रारंभींच्या काळांत पाश्चात्य विद्येचा प्रसार हिंदुस्थानांत करण्याचा, लोकप्रियतेच्या दृष्टीनें संशयास्पद प्रयोग करण्याकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. त्या काळांतील पहिला गव्हर्नरजनरल

वॉरन हेस्टिंग्ज हा तर पौरस्त्य कायदे व वाङ्मय यांचा चाहता होता. त्यामुळें त्यानें हिंदुस्थानांतील प्राचीन विषयांचा अभ्यास व भरभराट व्हावी असें धोरण स्वीकारलें. १८१३ च्या कायद्यानें देखील ज्यावेळीं एक लक्ष रुपये शास्त्रीय ज्ञानाच्या प्रसाराकरितां देण्याचें ठरविलें त्या वेळीं त्या कायद्याचा उद्देशहि संस्कृत व अरबी शास्त्रीय ज्ञानाला उत्तेजन देण्याचा आहे, असा अर्थ करण्यांत आला. त्याच्या पुढल्या वर्षी कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांनीं हिंदु लोकांतील घरगुती शिक्षण देण्याच्या पद्धतीला द्रव्यद्वारा आणि पदवीदानद्वारा उत्तेजन द्यावें अशीच शिफारस गव्हर्नरजनरलला केली.

तात्पर्य, पाश्चात्त्य विद्येचा प्रवेश हिंदुस्थानांत प्रथम ब्रिटिश सरकारमार्फत न होतां इतर मार्गांनीं झाला. १८१६ मध्यें डेव्हिड हेअर नांवाच्या कलकत्त्यास राहणाऱ्या एका इंग्रज घड्याळवाल्यानें बंगालमधील राममोहनराय नांवाच्या विद्वान ब्राह्मण गृहस्थाला पाश्चात्त्य विद्येचें शिक्षण देण्याकरितां एक हिंदु कॉलेज स्थापण्याच्या कार्यांत मदत करण्याचें ठरविलें. या नव्या संस्थेसंबंधीं ख्रिस्ती मिशनरी आणि पुराणमताभिमानी हिंदु या दोघांनीं अविश्वास प्रगट केला. तथापि हळूहळू ही संस्था जोरावत गेली. यानंतर १९ वर्षांनीं बंगालमध्यें नेमलेल्या सार्वजनिक शिक्षणासंबंधीं कमिटीनें असा रिपोर्ट केला कीं, इंग्रजी शिक्षणाची आवड बरीच वाढली असून हिंदु कॉलेजांत शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या तरुणांच्या नेतृत्वाखालीं निरनिराळ्या भागांत शाळा स्थापन होत आहेत. मुंबई इलाख्यांत एल्फिनस्टन गव्हर्नराच्या स्मरणार्थ १८२७ मध्यें एल्फिस्टन इन्स्टिट्यूट नांवाची संस्था स्थापण्यांत आली. यानंतर विशेष महत्त्वाची नवीन गोष्ट म्हणजे १८३५ मध्यें पाश्चात्त्य वैद्यकशास्त्र शिकविण्याकरितां कलकत्ता मेडिकल कॉलेज स्थापण्यांत आलें. ही संस्था अयशस्वी होईल, कारण मृताच्या शवाला शिवण्यास हिंदु धर्माच्या उच्च जातींनां प्रतिबंध आहे असें भाकित कांहीं लोकांनीं केलें होतें. तथापि या अडचणीस न जुमानतां मधुसूदन गुप्त यानीं कांहीं धाडसी विद्यार्थी जमा करून मानवी शरीरावर शस्त्रवैद्यकीय प्रयोग करण्याचें काम सुरू केलें. तेव्हांपासून उच्च जातींतील हिंदूंनीं पाश्चात्त्य वैद्यकाच्या सर्व शाखांचा अभ्यास मनःपूर्वक चालविला आहे.

पाश्चात्त्य विद्येच्या प्रसाराला उत्तेजन देणारा दुसरा वर्ग ख्रिस्ती मिशनऱ्यांचा होय. १८१८ मध्यें श्रीरामपूर येथें केरी, मार्शमन आणि यार्ड या तिघांनीं मिळून पहिलें मिशनरी कॉलेज स्थापिलें आणि यानंतर १२ वर्षांनीं अलेक्झांडर डफ यानें हिंदुस्थानांतील मिशनऱ्यांच्या कार्याचें सर्वच धोरण बदलून धर्मप्रसारापेक्षां शिक्षणप्रसारावर अधिक जोर देण्याचें ठरविलें आणि त्या उद्देशानें कलकत्त्यास एक शाळा व एक कॉलेज स्थापिलें. मद्रासमध्यें मिशनऱ्यांचे प्रयत्न याच्याहि पूर्वी सुरू झाले होते आणि १७८७ मध्येंच श्वॉझ नांवाच्या मिशनऱ्याच्या देखरेखीखालीं कांहीं मिशनरी शाळा चालू झाल्या होत्या. मद्रास ख्रिश्चन कॉलेज १८३७ मध्यें सुरू करण्यांत आलें. मुंबईस १८३४ मध्यें वुइल्सन स्कूल व पुढें कॉलेजहि सुरू करण्यांत आलें.

शिक्षणासंबंधाच्या सरकारी धोरणांत महत्त्वाची क्रांति १८३५ सालीं झाली. प्रथम मेकॉले नामक इंग्रज अधिकाऱ्यानें आपली प्रसिद्ध मतपत्रिका लिहिली व तिच्याच आधारें तत्कालीन गव्हर्नर जनरल लॉर्ड वुइल्यम बेंटिक यानें सरकारी खलिता लिहिला आणि सरकारनें शिक्षणविषयक नवें धोरण स्वीकारलें. तेव्हांपासून सरकारनें असें ठरविलें कीं, धार्मिक बाबतींत तटस्थ वृत्ति राखून पाश्चात्त्य विद्येच्या प्रसाराकरितांच दुय्यम शाळा आणि कॉलेजें सरकारी खर्चानें काढावयाचीं, आणि त्यांच्यांत इंग्रजी भाषेच्या द्वारें शिक्षण द्यावयाचें. तथापि या निर्णयामुळें पौरस्त्य विद्येकडे दुर्लक्ष करावें असें ठरलें नव्हतें किंवा देशी भाषांच्या प्रगतीला उत्तेजन देऊं नये असेंहि ठरलें नव्हतें. पाश्चात्त्य विद्येच्या प्रसाराला दुसऱ्या अनेक गोष्टींमुळें उत्तेजन मिळालें. १८३५ मध्यें मुद्रणस्वातंत्र्य देण्यांत आलें, कोर्टांमध्यें पर्शियन भाषेच्या ऐवजीं इंग्रजी भाषा सुरू करण्याचें ठरलें आणि १८४४ मध्यें तर हेनरी हार्डिंज यानें असा हुकूम सोडला कीं, पाश्चात्त्य शिक्षण घेतलेल्या इसमांनांच सरकारी नोकरी प्रथम देण्यांत यावी. यामुळें पाश्चात्त्य शिक्षणाचा पाया हिंदुस्थानांत पक्का घातला गेला. मुसुलमान लोक अद्यापहि पाश्चात्त्य शिक्षणसंस्थांपासून अलिप्त होते तरी इंग्रजी शाळांबद्दल मागणी इतकी वाढली होती कीं, सरकारला ती पुरी करणें अशक्य झालें. पाश्चात्त्य शिक्षणप्रसार करण्यासंबंधानें मुसुलमानी समाजांत अगदीं अलीकडे बरीच जागृति उत्पन्न झाली आहे.

**इंग्रजी शिक्षणाची वाढ व व्यवस्था.**—१८२३मध्यें सर चार्लस वुड यानें पाठविलेल्या खलित्यापासून हिंदुस्थानांतील शिक्षणाच्या इतिहासांत एका नव्या युगाला

आरंभ होतो. या खलित्यांत सर्वांत महत्त्वाचा मुद्दा प्राथमिक शिक्षणाच्या महत्त्वावर दिलेला जोर हा होता. जुनी कल्पना अशी होती कीं, उच्च वर्गांनां शिक्षण मिळालें म्हणजे तें खालच्या वर्गांतहि हळू हळू पसरेल, पण ही कल्पना चुकीची ठरली.म्हणून नवें धोरण, सर्व सामान्य जनतेचें अज्ञान हा देशाला सर्वांत मोठा शाप आहे हें जाणून तें अज्ञान दूर करण्याचा प्रयत्न करण्याचें ठरलें. या कार्याकरितां प्रत्येक प्रांतांत सार्वजनिक शिक्षणखातें स्वतंत्र स्थापण्यांत आलें. या खलित्यानें १८३९ पासून चालत आलेल्या दुसऱ्याहि एका धोरणांत फरक केला. शिक्षणाप्रीत्यर्थ सर्व सरकारी पैसा कांहीं थोडया सरकारी शाळा व कॉलेजें यांवर खर्च करण्यांत येत असे, त्याऐवजीं खासगी संस्थांनां मदतीदाखल देणग्या देण्याचें धोरण सुरू करण्यांत आलें. याच खलित्यांतील आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे युनिव्हर्सिट्या स्थापण्याची योजना ही होय. तदनुसार कलकत्ता, मद्रास व मुंबई या तीन युनिव्हर्सिट्या स्थापण्यांत आल्या. अॅफीलीएटिंग युनिव्हर्सिटी असें त्यांचें स्वरूप होतें. या पद्धतीमुळें अनेक फायदे झाले;सरकारी नोकरीकरितां निःपक्षपातीपणें लायक इसम निवडण्याची सोय झाली, मागासलेलीं ठिकाणें कॉलेजांच्या स्थापनेमुळें भरभराटीस आलीं, पाश्चात्त्य शिक्षणाबद्दल हिंदी लोकांमध्यें कळकळ फार झपाटयानें वाढली आणि शिक्षणसंस्थांची वाढ सरकारी मदतीच्या थोडक्या पैशानें पुष्कळ झाली. या नव्या युनिव्हर्सिटया प्रत्यक्ष अध्यापनाचें काम करीत नसून,फक्त परीक्षा घेऊन पदवी देण्याचें काम करीत असत.यामुळें सर्व कॉलेजांत शिक्षणक्रम सारख्या प्रकारचा सुरू झाला. १८८२ मधल्या एज्युकेशन कमिटीनें मदत (ग्रँट इन एड) पद्धतीला अधिक विस्तृत प्रमाणांत उत्तेजन दिलें. उच्च शिक्षण सरकारी नियंत्रणाखालून काढून खाजगी प्रयत्नांनां उत्तेजन दिलें. या पद्धतीमुळें एक असा तोटा झाला कीं, फींचे दर ठरविण्याचें स्वातंत्र्य खाजगी संस्थांनां दिल्यामुळें उच्च शिक्षणांतहि फींचे दर हलके ठेवण्यांत आले आणि भरपूर पैशाच्या अभावीं खाजगी शिक्षणसंस्थांत हलक्याप्रतीचें शिक्षण मिळूं लागलें.

१९०२-०४ च्या सुधारणा.–१९०२ मध्यें लॉर्ड कर्झनच्या वेळीं सरकारनें नेमलेल्या युनिव्हर्सिटी कमिशननें जो रिपोर्ट तयार केला तदनुसार १९०४ मध्यें युनिव्हर्सिटीज ॲक्ट पास करण्यांत आला. या कायद्याचा मुख्य उद्देश युनिव्हर्सिट्यांवर सरकारचें नियंत्रण अधिक ठेवणें आणि निमसरकारी शाळांवर व कॉलेजांवर युनिव्हर्सिटीचें अधिक नियंत्रण ठेवणें हा होता. युनिव्हर्सिटीच्या चान्सेलरनें सीनेटच्या सभासदांपैकीं शेंकडा ८० इसम नेमावे आणि बाकीच्यांची निवड मंजूर करावी आणि कोणतीहि निवड रद्द करण्याचा अधिकार सरकारला असावा, तसेंच कॉलेजें युनिव्हर्सिटीला जोडून घेण्या न घेण्यासंबंधाच्या युनिव्हर्सिटीच्या ठरावांनां सरकारी मंजुरीची आवश्यकता असावी असें ठरविण्यांत आलें.सर्व शाळा व कॉलेजें यांनां मंजूरी (रेकग्निशन) देण्याची आणि त्या तपासण्याची अबाबदारी युनिव्हर्सिटीवर टाकण्यांत आली. शिवाय शाळा तपासण्याचें काम सार्वजनिक शिक्षण खात्याच्या अधिकाऱ्यांकडून करण्यांत येत असे. युनिव्हर्सिट्यांनां अध्यापनाचें काम करण्याची परवानगी देण्यांत आली पण हें अध्यापनकार्य पोस्ट ग्रॅज्युएट कोर्स व नूतन संशोधन यासंबंधीं असावें असें ठरलें. प्रत्येक युनिव्हर्सिटीचें अधिकारक्षेत्र ठरविण्यांत आलें.

१९०४ पासून आद्यापपर्यंत हेंच धोरण सामान्यतः चालू आहे. यांत कांहीं सुधारणा करण्याची आवश्यकता वाटत असल्यामुळें हिंदु, म्हैसूर, मुस्लीम वगैरे स्वतंत्र युनिव्हर्सिट्या निराळ्या पद्धतीवर काढण्यांत आल्या आहेत. जुन्या युनिव्हर्सिट्यांनीं सुधारणा सुचविण्याकरतां कमिटया नेमल्या. त्यांपैकीं कलकत्ता युनिव्हर्सिटीनें नेमलेल्या सॅडलर कमिटीचा व मुंबई युनिव्हर्सिटीच्या रिफार्म कमिटीचा रिपोर्ट विशेष मार्गदर्शक झाला आहे.१९०४ च्या धोरणानुसार शिक्षणकार्याची झालेली सध्यांची वाढ पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

| शिक्षणसंस्था | संस्थांची संख्या | | विद्यार्थी | |
|---|---|---|---|---|
| | १९२४ | १९२५ | १९२४ | १९२५ |
| आर्ट कॉलेजें | १७० | १८५ | ५६१८९ | ६२५४३ |
| प्रोफेशनल ( धंद्यांची ) कॉलेजें | ६७ | ७४ | १६०८४ | १७२८६ |
| हायस्कुलें | २४२१ | २५३० | ६७८०६४ | ७१४४३६ |
| मध्यमप्रतीच्या शाळा | ६९७७ | ७५१९ | ७५०१८८ | ८२९७२२ |
| प्राथमिक शाळा | १६८००४ | १७५५९९ | ६९५४७६४ | ७३०७२६२ |
| विशिष्ट शाळा | ६६१७ | ७७२३ | २१७३४४ | २५५१६२ |
| रजिस्टर न झालेल्या शाळा | ३४८६० | ३४६०२ | ६४२६५१ | ६१०६३३ |
| एकूण | २१९११६ | २२८२३२ | ९३१५२८४ | ९७९७०४४ |

## हिंदुस्थानांतील शिक्षणवाढीचें कोष्टक

| | १९११-१२ | १९२१-२२ | १९२४ २५ |
|---|---|---|---|
| क्षेत्रफळ ( चौरस मैल ) | १८८८२६ | १०९१२२९ | १०९१३४७ |
| लोकसंख्या } पुरुष | १४००६३७५ | १२६९०२१२० | १२६९१६१९६ |
| लोकसंख्या } स्त्रिया | १३०७१६७३ | १२०१९५५३१ | १२०१८३३१० |
| एकूण लोकसंख्या | २७०७८०४८ | २४७०९७६५१ | २४७०९७५०६ |
| पुरुषांच्या सार्वजनिक संस्था– | | | |
| आर्टस कॉलेजांची संख्या | ११ | १५२ | १६९ |
| हायस्कुलांची संख्या | ११७ | २०४० | २२९४ |
| प्राथमिक शाळांची संख्या | ११२६७ | १३७४३५ | १५०९११ |
| सार्वजनिक संस्थांतील पुरुषवर्ग विद्यार्थी– | | | |
| आर्टकॉलेजांतील | ३१७७ | ४४६७० | ६३१८९ |
| हायस्कूलमधील | ३९५६९ | ५५८२१२ | ६६४५९३ |
| प्राथमिक शाळांतील | ५९३१९७ | ५१११८५० | ५९८३२६० |
| सार्वजनिक संस्थांतील विद्यार्थ्यांचें पुरुष– संख्येशीं प्रमाण | ३१.८ | ५.०४ | ६.०५ |
| स्त्रियांच्या सार्वजनिक संस्था– | | | |
| आर्ट कॉलेजांची संख्या | ... | १५ | १६ |
| हायस्कुलांची संख्या | २४ | २०८ | २३६ |
| प्राथमिक शाळांची संख्या | ११२१ | २२६३५ | २४६७७ |
| सार्वजनिक संस्थांतील स्त्रीविद्यार्थी– | | | |
| आर्टकॉलेजांतील | ८१ | १२६३ | १८०७ |
| हायस्कूलमधील | २९८७ | ३६६९८ | ४७३९० |
| प्राथमिक शाळांतील | ११२१०५ | ११९८५५० | १३२४००२ |
| सार्वजनिक संस्थांतील स्त्री विद्यार्थ्यांचें स्त्री संख्येशीं प्रमाण | ६.१ | १.१२ | १.९४ |
| सार्वजनिक संस्थांतील एकूण विद्यार्थी { पुरुष | ६६७४६९ | ६४०१३८३ | ७६८८९०१ |
| सार्वजनिक संस्थांतील एकूण विद्यार्थी { स्त्रिया | ११९५९६ | १३४०८४२ | १४९७५१० |
| एकूण | ७८७०६५ | ७७४२२२५ | ९१८६४११ |
| सर्व सार्वजानिक संस्थांतील विद्यार्थी(स्त्री-पुरुष मिळून) | ६७८०७२१ | ८३८१३५० | ९७९७३४४ |
| एकूण विद्यार्थ्यांचें लोकसंख्येशीं प्रमाण { पुरुष | ... | ५.४९ | ६.४७ |
| एकूण विद्यार्थ्यांचें लोकसंख्येशीं प्रमाण { स्त्रिया | ... | १.१८ | १.३१ |
| एकूण | ... | ३.३९ | ३.९६ |
| खर्च रुपये ( आंकडे हजारांचे आहेत )– | | | |
| प्रांतिक जमाबंदीपैकीं | ४६६० | ९०२३० | २९८०२ |
| लोकलफंडपैकीं | १०८४ | १६८२६ | १८०६८ |
| म्युनिसिपलफंडापैकीं | ९५४ | ७९०५ | ९२६८ |
| सार्वजनिक फंडापैकीं एकूणखर्च | १७७०३ | ११४९६१ | १२७१२८ |
| फीपैकीं | २४४९ | ३८००९ | ४६८६३ |
| इतर | ३२५३ | ३०७८३ | ३४७५७ |
| सर्व मिळून एकूण | ७८५९२ | १८३७५३ | २०८७४८ |

असहकारिता.—सरकारी युनिव्हर्सिट्या व शिक्षण-खातें यांवर जोराची टीका १९२१ च्या असहकारितेच्या काळांत झाली, इतकेंच नव्हे तर सरकारी शिक्षणसंस्था सोडण्याबद्दल व नवीन सुरू केलेल्या राष्ट्रीय शिक्षण-संस्थांत दाखल होण्याबद्दल विद्यार्थ्यांचीं मनें वळविण्यांत आली. त्याचा परिणाम पुढील कोष्टकावरून दिसेल.

## असहकारितेचा शिक्षणावर परिणाम

| प्रांत | १९२१–२२ सालांतील राष्ट्रीय शाळा व कॉलेजें | | १९२१ च्या मार्चपर्यंत रजिस्टर झालेल्या संस्थावर असहकारितेचा परिणाम | | |
|---|---|---|---|---|---|
| | संस्था | विद्यार्थी | विद्यार्थी | संस्थांतून निघालेले | परत आलेले |
| मद्रास | ९२ | ५०७२ | १७११११ | ८२० | ... |
| मुंबई | १८९ | १७१०० | ४२४१६ | २३५० | २३९ |
| बंगाल | १९० | १४८१९ | १०३१०७ | ११९५७ | .... |
| संयुक्तप्रांत | १३७ | ८४७६ | ४९१७१ | २६२६ | ७८९ |
| पंजाब | ६९ | ८०४६ | १११०७८ | १३०९ | ८४१ |
| ब्रह्मदेश | ९२ | १६२१८ | ३६८७५ | १३०३१ | ७४७ |
| बिहार–ओरिसा | ४४२ | १७३३० | २३१९० | १८२६ | .... |
| मध्यप्रांत | ८६ | ६३३८ | ७१७५९ | १८२४ | ४५४ |
| आसाम | ३८ | १९०८ | १२१८६ | ११३९ | ३५६ |
| वायव्यसरहद्द प्रांत | ४ | १२० | ४१३४२ | .... | .... |
| मायनर ॲड्मिनिस्ट्रेशन | १० | २२५५ | ४५५०८ | ९७१ | ७० |

## दर हजारीं साक्षरतेचें प्रमाण

| प्रांत, संस्थान व एजन्सी | ५ आणि पुढील वय | | | ५–१० | | १०–१५ | | १५–२० | | २० वर्षांपुढील | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | मनुष्यें | पुरुष | स्त्रिया | पुरुष | स्त्रिया | पुरुष | स्त्रिया | पुरुष | स्त्रिया | पुरुष | स्त्रिया |
| हिंदुस्थान | ८२ | १३९ | २१ | २९ | १० | ११० | २८ | १७४ | ३६ | १७१ | २० |
| आसाम | ७२ | १२४ | १४ | ३५ | ८ | ११० | २१ | १६४ | २३ | १५० | १३ |
| बलुचिस्तान | ४७ | ७६ | ७ | १०४ | ७६ | २८९ | १८७ | ३०१ | २१७ | ३४६ | १६६ |
| बडोदें | १४७ | २४० | ४७ | ४३ | २० | २८० | ९९ | ३५४ | १०५ | २६५ | ३४ |
| बंगाल | १०४ | १८१ | २१ | ४५ | ११ | १४४ | २९ | २१४ | २८ | २२५ | २१ |
| बिहार आणि ओरिसा | ५१ | ९६ | ६ | १८ | ३ | ७० | ८ | १११ | १० | १२६ | ७ |
| मुंबई | ९५ | १५७ | २७ | ४२ | १५ | १४६ | ४२ | २१७ | ५३ | १८४ | २४ |
| ब्रह्मदेश | ३१७ | ५१० | ११२ | ९६ | ४५ | ३७३ | ११५ | ५६९ | १५६ | ६२० | ११८ |
| मध्यहिंदुस्थान आणि ग्वाल्हेर | ३७ | ६५ | ७ | १४ | ४ | ५१ | ८ | ७८ | ११ | ८२ | ७ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ४९ | ८७ | ९ | १७ | ५ | ८० | १२ | १४२ | १८ | १०४ | ९ |
| कोचीन | २१४ | ३१७ | ११५ | ६९ | ४५ | २५१ | १५० | ३५९ | १७४ | ३९७ | ११३ |
| हैद्राबाद | ३३ | ५७ | ८ | १६ | ५ | ४६ | १० | ८६ | १४ | ६७ | ८ |
| काश्मीर | २६ | ४६ | ३ | ७ | १ | २८ | ३ | ५३ | ४ | ६१ | ३ |
| मद्रास | ९८ | १७३ | २४ | ३५ | १२ | १३९ | ३३ | २०४ | ४४ | २१४ | २२ |
| म्हैसूर | ८४ | १४३ | २२ | ३५ | १२ | १२८ | ३६ | १७४ | ४३ | १६९ | १९ |
| वायव्य सरहद्द प्रांत | ५० | ८० | १० | ११ | ३ | ४७ | ११ | २१४ | २० | १०२ | २१ |
| पंजाब व दिल्ली | ४६ | ७६ | ९ | ६ | ३ | ५४ | १२ | ९८ | १७ | ९७ | १० |
| राजपुताना आणि अजमीर | ४२ | ७४ | ६ | १० | २ | ४९ | ५ | ८६ | ९ | ९७ | ६ |
| त्रावणकोर | २७९ | ३८० | १७३ | १३५ | १४८ | ३५७ | २१० | ४३७ | २२६ | ४४० | १६० |
| संयुक्तप्रांत | ४२ | ७३ | ७ | १४ | ३ | ६२ | ९ | ९२ | १२ | ८९ | ७ |

सा क्ष र ते ची वा ढ.–साक्षरता ह्या शब्दाचा अर्थ बराच संदिग्ध असल्यामुळें त्याची स्पष्ट व्याख्या सेन्सस अधिकाऱ्यांनीं ठरविली ती अशी:–ज्या इसमास पत्र लिहितां येतें त्यास साक्षर म्हणावें. पुष्कळ इसमांनां संवयीमुळें चांगलें वाचतां येतें पण लिहितां मुळींच येत नाहीं. धार्मिक श्रद्धेमुळें कुराण वाचूं शकणारे मुसुलमान पुष्कळ आढळतात; पण त्यांनां लेखनाचें ज्ञान नसतें. शिवाय साक्षर सदरांत आपलें नांव यावें ही साहजिक महत्त्वाकांक्षा मात्र पुष्कळ मनुष्यांस असते. तथापि वरील व्याख्येमुळें फक्त वाचतां येतें अशा इसमांचा समावेश साक्षर या सदरांत केला नाहीं. उलटपक्षीं वायव्यसरहद्दप्रांतांत लेखणीपेक्षां तरवारीलाच मान जास्त असल्यामुळें तेथील जातींचे लोक लिहितां वाचतां येण्याचा दुबळा सद्‌गुण अंगीं असल्याचें कबूल करण्यास नाखूष असल्याचें आढळतें. साक्षरता दर्शविणारे दरहजारी प्रमाणाचे प्रांतवार आंकडे मागें ३८९ पृष्ठावरील कोष्टकांत दिले आहेत. यूरोपियन देश व अमेरिका यांत पांच वर्षांपर्यंत वयाचीं मुलें साक्षरतेच्या हिशोबांत धरीत नाहींत. हा नियम सदरहू कोष्टकांतहि पाळला आहे.

या कोष्टकावरून दिसून येईल कीं, ब्रह्मदेशांत साक्षरतेचें प्रमाण सर्व प्रांतांहून अधिक म्हणजे शें. ९० हून अधिक आहे. कारण तो देश बहुतेक बौद्धधर्मी असून बौद्धधर्मी मठांमध्यें सार्वत्रिक शिक्षणाची सोय अनेक शतकांच्या परंपरेनें चालू आहे. त्याचप्रमाणें पूर्व, पश्चिम, व दक्षिणेकडील समुद्रकांठच्या प्रांतांत मध्य व उत्तर हिंदुस्थानांतील प्रांतांपेक्षां हें प्रमाण अधिक आहे. याला कारणें आर्थिक, राजकीय, सामाजिक, धार्मिक आणि मानववंशविषयकहि आहेत. मोठमोठीं शहरें व त्यांच्या आसपासचे प्रदेश कीं ज्या ठिकाणीं व्यापार व उद्योगधंदे पुष्कळ चालतात तेथील लोकांत साक्षरतेचें प्रमाण अधिक असतें. बंगालमध्यें ब्रिटिशसरकारचा अंमल इतर प्रांतांपेक्षां प्रथम बसून शांततेचीं वर्षें अधिक लाभलीं त्यामुळें तेथें शिक्षणप्रसार अधिक झाला आहे. एकेका प्रांताच्या साक्षरतेचें निरनिराळें प्रमाण वेगवेगळें असतें. मुंबई इलाख्यांतील गुजराथमध्यें हें प्रमाण सर्वांत अधिक म्हणजे हजारीं १९६ आणि सिंधमध्यें सर्वांत कमी म्हणजे ६२ आहे.

सर्व हिंदुस्थान मिळून १९११ मध्यें पुरुष दर हजारीं १४० साक्षर होते ते १९२१ सालीं हजारीं १६१ आणि स्त्रिया १३ ते २३ अशी साक्षरतेंत वाढ झाली. ब्रह्मदेशांतील वाढ ४९६ असलेली ५७६ झाली. पण बौद्ध मठांतील शिक्षण ब्रिटिश सरकारी प्राथमिक शाळांपेक्षां कमी प्रतीचें असतें. आसाम, बंगाल व मुंबई यांमध्यें इतर प्रांतांपेक्षां शिक्षणप्रसार अधिक झाला आहे; तसेंच बडोदें, त्रावणकोर, कोचीन व म्हैसूर या संस्थानांत १९०६ सालापासून सक्तीचें प्राथमिक शिक्षण सुरू करण्यात आलें आहे.

## स्त्रियांत साक्षरतेची वाढ

| प्रांत | साक्षर स्त्रियांचें दर हजारी प्रमाण १९०१–१९११ | साक्षर स्त्रियांचें दर हजारी प्रमाण १९११–१९२१ | १९२१ सालांतील साक्षर स्त्रियांची संख्या |
|---|---|---|---|
| हिंदुस्थान | ६३ | ७१ | २७८२२१३ |
| आसाम | ५८ | १२० | ४६००२ |
| बडोदें | १७३ | २१९ | ४९३०० |
| बंगाल | ५७ | ५८ | ४०७८३१ |
| बिहार–ओरिसा | | | १०९७३९ |
| मुंबई | ६४ | ६६ | ३००९९२ |
| ब्रह्मदेश | ६१ | ७३ | ६२९७०६ |
| मध्यहिंदुस्थान-ग्वाल्हेर | १९ | ११० | २९२०३ |
| मध्यप्रांत–वऱ्हाड | ४६ | ११४ | ५२३०४ |
| कोचीन | ५१ | ७५ | ४९३२० |
| हैद्राबाद | ३३ | ७३ | ४३३४० |
| काश्मीर | ३७ | १३१ | ४००७ |
| मद्रास | ५९ | ५८ | ४५६८९५ |
| म्हैसूर | ६९ | ६१ | ५७०२३ |
| वायव्यसरहद्दप्रांत | २४ | ५१ | ८९८७ |
| पंजाब व दिल्ली | ६९ | ४९ | ९२४७५ |
| राजपुताना–अजमीर | ५३ | ४९ | २३९५५५ |
| त्रावणकोर | ८९ | २२४ | २९६०६७ |
| संयुक्तप्रांत | ९ | १०९ | १३४००४ |

स्त्रियांमध्यें शिक्षणाचा प्रसार फारच अल्प झाला आहे, आणि मध्यप्रांत, बिहार–ओरिसा, राजपुताना, काश्मीर, हैद्राबाद वगैरे भागांत तो फारच कमी आहे; दहा वर्षांत स्त्रीशिक्षणाचें पाऊल सारखें

पुढें पडत आहे यांत शंका नाहीं. शिक्षण हें मनुष्याच्या बुद्धिविकासाचें (कल्चर) दर्शक असतें; संस्कृतीचें (सिव्हिलिझेशन) दर्शक नसतें. हिंदुस्थानांतील हिंदु व इस्लामी या दोन्ही संस्कृती पुरुषवर्गाच्या शिक्षणाला प्रतिबंधक नाहींत, पण स्त्रीशिक्षणाला प्रतिबंधक आहेत आणि हल्ली स्त्रीशिक्षणाला जें उत्तेजन मिळत आहे तें केवळ पाश्चात्त्य शिक्षण व पाश्चात्त्य विचार ग्रहण केलेल्या सुशिक्षित समाजाकडूनच मिळत आहे. सर्वसाधारण हिंदु समाजाची वृत्ति हें स्त्रीशिक्षण अनवश्यक, पुराणमतविघातक (अनूऑर्थोडॉक्स) आणि दुष्परिणामी आहे, अशी आहे. हिंदुस्थानांतल्या जुन्या चालीरीतीहि शिक्षण घेण्याला अडथळा करणाऱ्या आहेत. उदाहरणार्थ, पडदापद्धति, बालविवाह यांमुळें मुलींनां पुरेशीं वर्षें शाळेंत जावयास सांपडत नाहीं. तसेंच स्त्रियांनीं मोठेपणीं उद्योगधंद्यांत पडणें पुराणमतवादी समाजाला पसंत नसल्यामुळें मुलींच्या शाळांनां शिक्षकिणीहि मिळत नाहींत. पुरुषवर्गांत केवळ साक्षरतेचें प्रमाण वाढल्यानें स्त्रीशिक्षणास अनुकूल वातावरण निर्माण होत नाहीं; तर उच्च शिक्षणाचा प्रसार पुरुषवर्गांत जितका अधिक होईल त्या मानानें स्त्रीशिक्षणाचा पुरस्कार अधिक केला जाईल. स्त्रीशिक्षणाच्या प्रांतिक साक्षरतेचें कोष्टक पृष्ठ ३९० वर पहावें.

धर्म वार शिक्षणप्रसार.—निरनिराळ्या धर्मांच्या लोकांतील क्षिक्षणाचें हजारी प्रमाण दर्शविणारें कोष्टक येणेंप्रमाणें:—

| वर्ग | पुरुष | स्त्रिया |
|---|---|---|
| झोरास्ट्रियन | ७८९ | ६७२ |
| जैन | ५१४ | ७६ |
| बौद्ध | ४८४ | ९६ |
| खिस्ती | ३०९ | १८० |
| हिंदु | ११५ | १४ |
| शीख | ९४ | १४ |
| मुसुलमान | ८१ | ७ |
| वन्य | १४ | १ |

पारशी लोकांत पुरुष व स्त्रिया दोन्ही वर्गांत शिक्षणप्रसार इतर सर्व समाजापेक्षां जास्त आहे; कारण पारशी वर्ग बहुतेक व्यापारधंदा व नोकऱ्या करणारा असून शिवाय त्या समाजाची बहुतेक वस्ती मुंबई शहर व त्याच्या आसपास समुद्रकिनाऱ्यालगत आहे. तसेंच हा समाज लहान व जातिभेदविरहित आणि पाश्चात्त्य चालीरीतींचें अनुकरण करण्यांत अघाडीला आहे. त्यामुळें केवळ पुरुषांतच नव्हे तर स्त्रियांतहि शिक्षणाचा प्रसार फार झाला आहे. पारशी लोकांच्या खालोखाल जैन समाजांत शिक्षणप्रसार अधिक आहे; पण तो पुरुषवर्गांतच आहे. त्याचें कारण जैन लोक बहुतेक व्यापारांत पडलेले आहेत. बौद्ध समाजांतील पुरुषांत व स्त्रियांत साक्षरतेचें प्रमाण सुमारें जैनांइतकेंच आहे. खिस्ती लोकांत शिक्षणाचा प्रसार इतर समाजांच्या मानानें बराच अधिक आहे. हिंदुसमाजांतील पुरुषवर्गांतील शिक्षणाची वाढ हजारी ११६ वरून १३० आणि स्त्रीवर्गांत ९ वरून १६वर इतकी झाली आहे. म्हणजे स्त्रियांत शिक्षणप्रसार अधिक वेगानें होत आहे. शिखांमध्यें गेल्या दशकांत शिक्षणाचें हजारी प्रमाण १२१ वरून १०७ इतकें उतरलें आहे. पण त्याचें कारण शिखांची संख्या, हलक्या निरक्षर जातींच्या लोकांची नवी भरती होऊन बरीच वाढली आहे. शिवाय गुरुमुखी भाषेचा सरकारी नोकरीच्या दृष्टीनें ऊर्दु भाषेपेक्षां फार कमी उपयोग असल्यामुळें शीख लोक स्वतःची मातृभाषा शिकण्याकडे दुर्लक्ष करूं लागले आहेत. मुसुलमानांत शिक्षणप्रसार फार कमी आहे; याचें कारण बंगाल, पंजाब, वायव्य-सरहद्द प्रांत व सिंध येथील मुसुलमान शेतकी करणारे आहेत. हिंदूसमाजांत अनेक हलक्या जाती समाविष्ट झाल्या असल्यामुळें शिक्षणप्रसाराचें प्रमाण कमी दिसतें, पण कांहीं उच्च हिंदु जातीच्या पुरुषवर्गांत हें प्रमाण पारशांच्या बरोबरीनें आहे.

जातीव शिक्षणप्रसार.—निरनिराळ्या जातींत पुरुष आणि स्त्रिया यांच्यामध्यें शिक्षण प्रसार किती झाला यासंबंधींचें जातवार आकडयांचें कोष्टक पुढील पृष्ठावर दिलें आहे. त्यांत मुंबई इलाख्यांतील व मध्यहिंदुस्थानांतील भिल्ल; बंगाल व बिहार—ओरिसांतील संताळ; मध्यप्रांत आणि संयुक्तप्रांत मधील चांभार; मध्यप्रांत व मध्यहिंदुस्थानांतील गोंड; पंजाबांतील चुरा आणि राजपुतान्यांतील जाट या जातींमध्यें साक्षरता फक्त पुरुषांतच आणि तीहि अल्पप्रमाणांत असल्यामुळें त्यांचे आंकडे दिले नाहींत.

फक्त संपादकांनां आणून ठेविलें. या अत्युदार धोरणामुळें हिंदुस्थानांतील लेखकवर्गाला मोठा आनंद झाल्यास नवल नाहीं. पण यामुळें कंपनीचे डिरेक्टर मेटकाफवर फार रागावले व मेटकाफला नोकरीचा राजीनामा द्यावा लागला. तथापि वृत्तपत्रांनां यावेळीं जें पूर्ण स्वातंत्र्य लाभलें तें लार्ड लिटनच्या कारकीर्दीपर्यंत टिकलें.

हिंदुस्थानांत बोल्शेविझमचीं तत्त्वें रुजूं नयेत म्हणून हिंदुस्थान सरकारचा सध्यां प्रयत्न चाललेला असतो, त्याच प्रकारचा प्रयत्न १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत हिंदी लोकांत रशियाविषयीं स्नेहभाव उत्पन्न होऊं नये म्हणून चालला होता. देशी वर्तमानपत्रें इंग्रजी राज्याविरुद्ध व रशियाच्या बाजूनें लिहून लोकांचीं मनें कलुषित करतात असा सरकारचा ग्रह होऊन १८७८ त देशी वृत्तपत्रांसंबंधीं एक नवीन कायदा करण्यांत आला. पण लिटनच्या मागून येणारा रिपन थोर स्वभावाचा व पूर्ण प्रागतिक मताचा असल्यानें त्यानें १८८२ मध्यें हा 'व्हर्नाक्युलर प्रेस ॲक्ट' रद्द करून त्याची गरज भागविण्याकरितां इंडियन पिनल कोडांत नवीन १२४ अ कलम घातलें. पुढें मिंटोशाहींत हिंदुस्थानांत फार अत्याचार होऊं लागल्यानें व त्यांनां वृत्तपत्रांची चिथावणी असते असा सरकारचा ठाम ग्रह झाल्यानें १९०८ चा व १९१० चा असे एकामागून एक प्रेसॲक्ट करण्यांत येऊन वृत्तपत्रांची पूर्ण मुस्कटदाबी झाली. त्यानंतर गेल्या महायुद्धांत इतर देशांतल्याप्रमाणें हिंदुस्थानांतहि सेन्सार ऑफिस उघडण्यांत आलें व सर्वच लेखन व्यवसायावर धाड आली. महायुद्ध संपल्यावर सेन्सारशिपहि उठली. १९२२ त प्रेस ॲक्ट रद्द होऊन दि प्रेस ॲंड रेजिस्ट्रेशन ऑफ बुक्स ॲक्ट व पोस्ट ॲक्ट यामध्यें कांहीं सुधारणा झाल्या.

**आ द्य दे शी व र्त मा न प त्रें.**—अगदीं पहिलें देशी भाषेंतील प्रकाशन म्हणजे १७७८ त हॅलनहेडनें लिहिलेलें बंगाली व्याकरण होय. पहिलें वृत्तपत्रहि बंगालीच असून तें इ. स. १८१८ त निघूं लागलें. प्रसिद्ध इतिहासकार जॉन क्लार्क मार्शमन हा त्याचा संपादक असून 'समाचार—दर्पण' हें त्याचें सुंदर नांव होतें. पहिलें मराठी वर्तमानपत्र (ज्ञानप्रकाश) यानंतर बऱ्याच वर्षांनीं (१८४६-४७ त) निघूं लागलें.

**व र्त मा प त्रां ची वा ढ.**—वर्तमानपत्रांची वाढ याच्या पुढें कशी झपाट्यानें झाली हें लक्षांत घेण्याजोगें आहे. ९७ सालच्या बंडानंतर (१८९८ त) सबंध हिंदुस्थानांत एकंदर ४४ (१९ आंग्लोइंडियन व २९ देशी) वृत्तपत्रें निघत होतीं. १८८८ त बंगाल्यांत ३८, मद्रासेंत २२, मुंबईत ७८ व उत्तर आणि मध्य हिंदुस्थानांत ६९ याप्रमाणें पत्रें प्रसिद्ध होत असत. १९१८ मध्यें सबंध हिंदुस्थानांत एकंदर ८८३ वृत्तपत्रें चालू होतीं; त्यांपैकीं मद्रासेंत २१४, मुंबईत १९४, संयुक्तप्रांतांत १२८ व बंगाल्यांत ११७ पत्रें प्रसिद्ध होत असत. याप्रमाणें दर तीस वर्षांची वाढ लक्षांत घेतां देशाच्या पारतंत्र्यावस्थेंत प्रजावृद्धि फार होते असें जें म्हणतात त्याचप्रमाणें मुद्रणनियंत्रणाचे सांपळे चोहोंकडे ठेविले असतांहि वृत्तपत्रांची वाढ खुंटत नाहीं असें म्हणावें लागेल. तथापि या वाढीचें मुख्य कारण देशाच्या सुशिक्षिततेची वाढ हें होय.

**ग्रंथप्रकाशन**—शाळा, कॉलेजें, विश्वविद्यालयें या शिक्षणसंस्थांखेरिज आणखीहि शिक्षणाचीं साधनें देशांत असतात. त्यांपैकीं मुख्य महत्त्वाचीं म्हणजे ग्रंथ व नियतकालिकें हीं होत. नियतकालिकें अथवा वृत्तपत्रें यासंबंधीं विवेचन वर केलेंच आहे. दरसाल देशांत ग्रंथप्रकाशन कसें काय चाललें आहे याची पहाणी केल्यास तेथील शिक्षणप्रसाराची थोडीशी कल्पना येईल. १९२२-२३ सालीं हिंदुस्थानांतील पुढील प्रांतांतून जीं वृत्तपत्रें व नियतकालिकें निघालीं त्यांची संख्या अशीः—मद्रास ११२३; मुंबई ११३१; बंगाल ४९९; संयुक्तप्रांत ३७०; पंजाब ३२४; ब्रह्मदेश १७४; बिहार आणि ओरिसा ६२; वऱ्हाड—मध्यप्रांत ६१; आसाम २७ व दिल्ली ९९. हीं प्रकाशनें इंग्रजीं, बंगाली, हिंदी, उडिया, कानडी, सिंधि, संस्कृत, ब्रह्मी, चिनी, फारसी, गुजराथी, मराठी, करेण, तामिळ, तेलगू, मल्याळी, अरबी, हिंदुस्थानी, खासी, गुरुमुखी, लॅटिन, फ्रेंच वगैरे भाषांतून निघतात. आतां प्रत्येक प्रांतांत एखाद्या विशिष्ट सालीं ग्रंथप्रकाशन किती झालें याचा थोडासा विचार करूं.

**मुं ब ई (१९२४-२५).**—१९२४-२५ सालीं २२५८ पुस्तकें व १३३० नियतकालिकें नोंदलीं गेलीं होतीं. या पुस्तकांत ६४२ गुजराथी, ९१७ मराठी, २७४ हिंदी, २३३ इंग्रजी व बाकीचीं इतर भाषांतील होतीं एकंदर वर्तमानपत्रें २०५ होतीं, त्याच्या मागील वर्षी ही संख्या १९४ होती. २०५ पैकीं ९९ खुद्द मुंबईत, ३५ मध्यविभागांत, २७ उत्तरविभागांत, ३३ दाक्षिणविभागांत, ४२ सिंधप्रांतांत व ९संस्थानांत प्रसिद्ध होत असत. यांपैकीं ३९ टक्के ब्राह्मणांच्या देखरेखीखालीं निघत.

मद्रास.–१९२५–२६ सालीं पूर्वीलप्रमाणें प्रकाशन झालें: मद्रास सरकारच्या ताब्यांतील रेकार्ड आफिसांतील "डिस्पॅचेस टु इंग्लंड १७०१–१७१३" पर्यंतचे छापले. एकंदर ३९२६ पुस्तकें व ८४७ नियतकालिकें निघालीं.

बंगाल.–१९२२–२३ सालीं २९७७ पुस्तकें व १४०९ नियतकालिकें नोंदलीं गेलीं. यांपैकीं ५१ पुस्तकें नियतकालिकांतून निवडलेल्या लेखांचीं होतीं व त्यांत सारीं ३३ बंगाली भाषेंतील होतीं. वर्तमानपत्रें ४९६ असून त्यांत २९८ बंगाली, १४६ इंग्रजी व बाकीचीं हिंदी, आसामी वगैरे होतीं. खुद्द कलकत्त्यास ३२७ वर्तमानपत्रें प्रसिद्ध होत असत.

संयुक्त प्रांत.–१९२५–२६ सालीं पुस्तकप्रकाशनाची संख्या २६९३ होती हिंदी पुस्तकें ५२.५ टक्के व ऊर्दू १८ टक्के होतीं. मराठींत तीन पुस्तकें प्रसिद्ध झालीं. धार्मिक पुस्तकांत हिंदु व मुसलमान या दोन्ही समाजांवर परस्पर टीकाग्रंथ होते. राजकीय ग्रंथांत सरकारवर टीका होती वर्तमानपत्रें, मासिकें वगैरेंची संख्या ५८० होती. ग्रंथप्रकाशनस्थलांत लखनौचा नंबर पहिला होता. लीडर, डेली टेलिग्राफ, प्रताप, भविष्य, अभय वगैरे प्रमुख नियतकालिकें होत.

पंजाब.–१९२३–२४ सालीं २३६ नियतकालिकें निघालीं. त्यांत हिंदूंच्या मालकीचीं ९१, मुसुलमानांचीं ८२ आणि शिखांचीं ३२ होतीं.

मराठी वाङ्मय.—सन १९२५ सालीं मराठी भाषेंत लहानमोठीं ९९१ पुस्तकें प्रसिद्ध झालीं. त्याच प्रमाणें गुजराथी भाषेंत ९९३, कानडींत ९९ व सिंधींत २३४ पुस्तकें प्रसिद्ध झालीं. मराठी ९९१ पुस्तकांत पुढील वर्गवारी पडते: चरित्रें २९, नाटकें २६, काव्यें १००, कादंबऱ्या व गोष्टी १०७, इतिहास ६, राजकारण ४, धर्म ३०, वैद्यक व आरोग्य १२, कायदा ४, ज्योतिष ८, कोश (ज्ञानकोश) ९, धंदे १३, कला ५, शालोपयोगी ३९, तत्त्वज्ञान १७ व बाकीचीं किरकोळ होतीं. या सालीं ६४ नियतकालिकें सुरू होतीं.

**वाङ्मय प्रवर्तक समाज**–देशांतील वाङ्मयप्रवर्तक वर्गाबद्दल सविस्तर विचार 'वाङ्मयसूची'च्या प्रस्तावनेंत केलाच आहे (पृ. २९ पासून पुढें). परकीय राज्य, परकीय भाषेचें महत्त्व, स्वकार्यविन्मुखता, व संख्याक्षय हीं मुख्य कारणें समाजांतील उच्च वर्गाचें वजन कमी होण्याचीं आहेत. ब्राह्मणासारख्या उच्च जातीचा क्षय होत आहे हें आंकडयांवरून दिसून येतें. क्षयाचे आंकडे, त्याचीं कारणें, जातवारीचे वृद्धिक्षयाचें कोष्टक हीं सर्व वाङ्मयसूचीच्या प्रस्तावनेंत दिलींच आहेत. त्यावरून वाङ्मयप्रवर्तनाच्या कार्याविषयीं माहिती होईलच.

**वाङ्मयीन संस्था**, अँथ्रॉपॉलॉजिकल सोसायटी ऑफ बॉम्बे.–ही मानवशास्त्राच्या शोधाची संस्था मुंबईस १८८६ त स्थापन झाली. या विषयांत हिंदुस्थानांत शोध करणें व जगांतील या विषयाच्यासाठीं स्थापन झालेल्या संस्थांशीं सहकार्य करणें हा उद्देश या संस्थेचा आहे. दरमहा सभा भरून शोधपर निबंध वाचले जातात व त्यांचें एक नियतकालिक प्रसिद्ध होतें. सन १९२७ सालीं हिचे अध्यक्ष डॉ. जीवनजी जमशेटजी मोदी हे आहेत.

बनारस मॅथेम्याटिकल सोसायटी.–ही काशीस १९१८ मध्यें गणितशास्त्रांत नवीन शोध लावण्यासाठीं स्थापन झाली. हिचें एक नियतकालिक असून त्यांत संस्थेचें कामकाज छापलें जातें. हिची एक लायब्ररी आहे.

भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर, पुणें.–येथें डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या ८० व्या वाढदिवसाच्या वेळीं (६ जुलै १९१७) ही संस्था स्थापन झाली. पौरस्त्य प्राचीन ग्रंथ मूळ व टीकेसहित छापणें हा हिचा उद्देश आहे. हिची एक लायब्ररी आहे; विद्यार्थीवर्ग संशोधनशास्त्रांत तयार करणें व पौरस्त्य ग्रंथांबद्दल व इतर साधनांबद्दल माहिती पुरविणें हेहि हिचे उद्देश आहेत. डॉ. भांडारकर यांची महत्त्वाची लायब्ररी त्यांनीं या संस्थेस दिली आहे. सन १९१८ च्या एप्रिलपासून सरकारनें डेक्कन कॉलेजांतील सर्व हस्तलिखितसंग्रह संस्थेस देऊन वार्षिक तीन हजार रुपयांची नेमणूक करून दिली. गव्हर्नमेंट ओरिएंटल सेरीजमधील ग्रंथप्रकाशनासाठींहि सरकारनें सालीना १२ हजार रु. ची नेमणूक करून दिली आहे. श्री. औंधकर पंतप्रतिनिधि यांनीं सालीना पांच हजारांची नेमणूक दिल्यावरून त्यांच्या इच्छेप्रमाणें संस्थेनें एक महाभारताची शुद्ध प्रत काढण्याचें काम चालविलें आहे. मुंबई युनिव्हर्सिटी व ब्रह्मदेश, म्हैसूर आणि बडोदेंसरकारकडून संस्थेस मदतीचीं वचनें मिळाली आहेत. संस्थेची एक षाण्मासिक पत्रिका आहे. संस्थेनें पहिलें ओरिएंटल कान्फरन्स (१९१९) भरविलें होतें. टाटा व जैनसमाज यांनीं मदत करून संस्थेला इमारत बांधून दिली आहे.

ज्ञा न को श मं ड ळ.-हें नागपूर येथें इ. स. १९१६ त स्थापन झालें. हल्लीं हें पुणें येथें काम करीत असून मंडळानें महाराष्ट्रीय ज्ञानकोश नांवाचा २१ भागांचा एक मोठा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. डॉ श्री. व्यं. केतकर एम्. ए. पीएच्. डी. हे या मंडळाचे चालक व मुख्य संपादक आहेत. महाराष्ट्र वाङ्मयसूची नांवाचा एक उपयुक्त संदर्भग्रंथहि मंडळानें प्रसिद्ध केला असून विद्यासेवक नांवाचें एक मासिक मंडळ काढीत असतें.

भा र त इ ति हा स सं शो ध क मं ड ळ.-हें मंडळ पुणें येथें शके १८३२ सालीं कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांच्या खटपटीनें स्थापन झालें. हिंदुस्थानचा-विशेषत: महाराष्ट्राचा आणि मराठी साम्राज्याचा-इतिहास ज्या ज्या साधनांनीं उजेडांत येईल तीं तीं सर्व प्रकारचीं साधनें छापून प्रसिद्ध करणें व त्यांचा संग्रह करणें हा या मंडळाचा मुख्य उद्देश आहे. आतांपर्यंत मंडळानें ३० ग्रंथ प्रसिद्ध केले असून दरवर्षी एक अहवालहि प्रसिद्ध होत असतो.

म हा रा ष्ट्र सा हि त्य प रि ष द मुं ब ई.-स्थापना १९०९; उद्देश मराठी भाषा, वाङ्मय व साहित्य यांची उन्नति करणें व त्यांचा व्यासंग वाढविणें. मुख्य कचेरी मुंबईस व तिच्या शाखा नाशिक, पुणें वगैरे ठिकाणीं आहेत. आतांपर्यंत संस्थेच्या तर्फे महाराष्ट्रसाहित्यसंमेलनें बारा भरलीं आहेत.

इं डि य न मॅ थे मॅ टि क ल सो सा य टी.-ही १९०७ मध्यें स्थापिली गेली. गणित शास्त्रांत शोध लावणें हा उद्देश आहे. हिचें एक नियतकालिक असून त्यांत गणित विषयावरील लेख येतात. हिची एक लायब्ररी पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजांत ठेवलेली आहे.

बॉं बे ब्रॅं च ऑ फ धी रॉ य ल ए शि या टि क सो सा य टी.-ही मुंबई येथें १८०४ मध्यें पौरस्त्य कला, शास्त्रें व वाङ्मय यांच्या संशोधनार्थ स्थापन झाली. या विषयांवर संस्थेच्या सभेंत जे निबंध वाचले जातात ते संस्थेच्या अहवालांतून प्रसिद्ध होतात. बंगालमध्यें अशीच एक रॉयल एशियाटिक सोसायटीची शाखा आहे.

म द्रा स लि ट र री सो सा य टी ॲ न्ड ऑ क्झि लि य री ऑ फ धी रॉ य ल ए शि या टि क सो सा य टी.-ही मद्रास येथें स्थापन झाली असून वाङ्मयप्रकाशन हा तिचा उद्देश आहे.

रं गू न लि ट र री सो सा य टी.-ही रंगून येथें स्थापन झाली असून वाङ्मयप्रकाशनाचा तिचा उद्देश आहे.

प्रे स ओ न र्स अ सो सि ए श न, मुं ब ई.-ही मुंबईस ता. ३० एप्रिल १९१९ रोजीं स्थापन झाली. छापखान्यांची सुधारणा व हिताहित पहाणें व तत्संबंधी इतर व्यवहार चालविणें, छापखान्यांचे मालक व कामगार वर्ग यांच्यात स्नेहभाव राखणें, त्यांच्या अडचणी पहाणें वगैरे उद्देश या संस्थेचे आहेत. अशीच एक संस्था पुणें येथेंहि आहे.

थि ऑ स फि क ल ए ज्यु के श न ल ट्र स्ट.-१९१३ त अड्यार येथें स्थापन झाला. हिंदी मुलें व मुली यांनां शिक्षण देणें हा मुख्य उद्देश. बौद्धिक शिक्षणाप्रमाणेंच शारीरिक व धार्मिक शिक्षणाकडेहि ही संस्था विशेष लक्ष देत असते. अड्यार येथील थिऑसाफिकल शाळा व कॉलेज, मदनपल्ली येथील थिऑसाफिकल कॉलेज, बनारस येथील मुलांची थिऑ. शाळा व तेथीलच स्त्रियांचें थिऑ. कॉलेज इतक्या शिक्षणसंस्था या ट्रस्टच्या तर्फे चालत आहेत. मदनपल्ली येथें एक युनिटरी रसिडेन्सिअल युनिव्हर्सिटी काढण्याचा संस्थेचा उद्देश आहे.

वि मे न्स इं डि य न अ सो सि ए श न.-ही १९१७मध्यें अड्यार येथें स्थापिली. उद्देश स्त्रियांच्या उपयोगी पडणें (सेवासदनाप्रमाणें) असून सध्यां हिच्या ६१ शाखा आहेत; त्यांत शिक्षणाचे वर्ग असून स्त्रियोपयोगी धंदे व वाङ्मय शिक्षण मिळतें. स्त्रियांच्या मतदारीच्या हक्काचें शिक्षण व चळवळहि संस्था करते. सर्व हिंदुस्थानांत या विषयाची सोय फक्त याच संस्थेंत आहे. संस्थेकडून "स्त्रीधर्म" नांवाचें एक मासिक निघतें. दक्षिणेंत हिच्या शाखा पुष्कळ आहेत. हिंदुस्थानांतील शास्त्रीय संस्थांची माहिती ज्ञानकोश वि. ९ च्या परिशिष्टांत दिली आहे.

---

## प्रकरण ९ वें.

## आरोग्य.

हिंदुस्थानांतील आरोग्यखात्याचा इतिहास गेल्या पन्नास वर्षांचा आहे. या अवधींत शहरांच्या आरोग्यविषयक स्थितींत बरीच सुधारणा झाली आहे. पण लोकसंख्येपैकीं मोठा भाग खेडेगांवांत राहतो व खेडेगांवांचें आरोग्य सुधारण्याचें काम फारच मंदपणें चाललें आहे. खेडेगांवांतहि लोकांची राहणी बरीच स्वच्छतेची असते पण सार्वजनिक स्वच्छता व आरोग्य यासबंधीं जाणीव त्यांच्यामध्यें उत्पन्न झालेली नाहीं.

खेडेगांवांतील घरांत भरपूर हवा व प्रकाश मिळण्याची सोय नसते व घरांत माणसांची संख्या वाजवीपेक्षां जास्त असते. खेड्यांतील रस्ते व भोंवतालचा भाग घाणीनें भरलेला, गुरांनीं दाटी केलेला, निरुपयोगी झाडझुडपांनीं व्यापलेला व घाणेरडें पाणी सांचलेल्या डबक्यांनीं विषारी वायुयुक्त बनलेला असतो. तेथील तलावांतील पाणी घाणेरडें झालेलें असतें तरी त्याचाच उपयोग धुण्याकडे, स्वयंपाकाकडे व पिण्याकडे केला जातो. ही स्थिति अलीकडे शिक्षण वाढल्यामुळें आणि पैसा हातीं असल्यामुळें सुधारत आहे. १९१९ सालच्या सुधारणाकायद्यानें आरोग्य हा विषय प्रांतिक आणि सोंपीव म्हणजे दिवाणाच्या जबाबदारींतला बनविला. या सुधारणेमुळें काय परिणाम झाला याबद्दल थोडासा निर्देश हिंदुस्थानसरकारच्या पब्लिक हेल्थ कमिशनरनें १९२१–२२ च्या रिपोर्टांत केला आहे. हा विषय दिवाणाच्या हातीं गेल्यापासून आरोग्यविषयक प्रश्नासंबंधीं लोकांमध्यें जागृति अधिक दिसूं लागली आहे. आरोग्यविषयक कामांत भाग घेणाऱ्या स्थानिक संस्था स्थापन झाल्या आहेत. १९२२ मध्यें हिंदुस्थानांतील मृत्यूचें सरासरी प्रमाण २४.०२ होतें. १९२१ सालापेक्षां १९२२ सालीं पंधरा लक्ष मृत्यु कमी झाले. आरोग्यविषयक स्थितीची तपासणी करून सुधारणेच्या सूचना करण्याकरितां एक कमिशन नेमणें हल्लीं फार जरूर आहे.

## जन्ममृत्यूचें प्रांतवार प्रमाण

| प्रांत | हजारीं जन्माचें प्रमाण | | | | हजारीं मृत्यूचें प्रमाण | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | १९२४ | १९२३ | १९२२ | १९१७–२१ | १९२४ | १९२३ | १९२२ | १९१७–२१ |
| दिल्ली | ४२.४३ | ४२.०७ | ४१.२० | ... | ३३.५७ | ३७.९० | २४.९१ | ४८.०६ |
| बंगाल | २९.५ | २९.९० | २७.४० | ३०.२० | २५.९ | २५.५० | २५.२० | ३२.०० |
| बिहार व ओरिसा | ३५.७ | ३७.०० | ३५.०० | ३५.४० | २९.१ | २५.०० | २४.१० | ३९.६० |
| आसाम | ३१.०४ | २८.८२ | २८.४३ | २८.६० | २७.३० | २३.५४ | २६.८३ | ३२.१८ |
| संयुक्तप्रांत | ३४.७२ | ३६.०४ | ३२.१७ | ३७.६६ | २८.२९ | २३.३७ | २५.०१ | ४७.७५ |
| पंजाब | ४०.१ | ४३.२० | ३९.३० | ४०.०० | ४३.४ | ३०.०९ | २२.०७ | ३९.१६ |
| वायव्य सरहद्द प्रांत | २७.० | २७.६० | २३.७० | २८.६० | ३१.० | २३.७४ | २१.६८ | ३५.४१ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ४४.१८ | ४५.६३ | ३५.८० | ४५.५५ | ३२.५९ | ३०.५३ | २९.३१ | ५३.२० |
| मद्रास | ३४.९ | ३३.१० | ३०.०० | २८.४० | २४.५ | २२.२ | २१.०० | २७.७० |
| कूर्ग | २१.२० | २५.६२ | २६.०७ | २७.५५ | ४१.०६ | २९.१४ | ३४.६० | ३६.२६ |
| मुंबई | ३५.६० | ३५.५८ | ३२.३९ | ३१.६२ | २७.६३ | २५.०९ | २३.६१ | ४३.२० |
| ब्रह्मदेश ( खालचा ) | २७.४० | २९.५१ | २७.२७ | ३०.६० | २१.५४ | २०.८७ | २२.४१ | २८.२६ |
| ब्रह्मदेश ( वरचा ) | ३३.३३ | ३२.५६ | ३४.१८ | ३५.६५ | २४.९६ | २९.६२ | २१.९० | २९.२६ |
| अजमीर–मेरवाड | | | ३०.२८ | ३०.७२ | | | २२.१९ | ६०.७६ |
| एकूण. | | | ३१.८५ | ३३.९७ | | | २४.०२ | ३८.४२ |

१९२४ साल आरोग्याच्या दृष्टीनें बरें होतें. मद्रास आणि मुंबई प्रांतखेरीज करून मृत्यूचें प्रमाण कमी झालें होतें. तसेंच कूर्ग खेरीज सर्व प्रांतांत मृत्यूपेक्षां जननाची संख्या अधिक आहे. १९२२सालीं एक वर्षाच्या आंतील अर्भकांच्या मृत्यूचें प्रमाण शें. २३.२ होतें व त्या मागील सालीं २०.८ होतें. १९२३ सालीं २४.६ व १९२४ सालीं २२.८ होतें. बालमृत्यु हें आरोग्यविषयक स्थितीचें फार चांगलें गमक आहे. हिंदुस्थानांत जन्मानंतर पहिल्याच महिन्यांत शेंकडा ४८.१ बालमृत्यू होतात, आणि पहिल्या आठवड्यांत एकंदर मृत्यूंपैकीं ⅓ मृत्यू होतात. बालमृत्यूला मुख्य कारण आरोग्यविषयक स्थिति असमाधानकारक असणें हेंच आहे. इतर रोगांपैकीं मलेरिया रोगाचा प्रसार दरसाल होतो व तो मोठ्या प्रमाणावर होतो. जगांतील बहुतेक भागांत हा रोग नेहमीं होत असल्यामुळें त्यासंबंधीं संशोधन अलीकडे बरेंच झालें आहे. मलेरिया रोगानें सर्व समाजाची शारीरिक अवनति होते. या रोगानें पीडिलेल्या लोकांची इच्छाशक्ति, कामाची आवड, सार्वजनिक कामें पार

पाडण्याची उमेद वगैरे सर्व कमी होतात. एकट्या बंगाल प्रांतांत दरसाल २८३००००० लोकांना मलेरिया होतो, या मानानें सर्व हिंदुस्थानांत या रोगानें ग्रासलेल्या लोकांची संख्या निदान १० कोटी असली पाहिजे. हा मलेरिया घालविण्यासाठीं बऱ्याच खटपटी चालू आहेत. लष्कर हद्दींत यावर फार खर्चहि होत असतो. १९२५-२६ सालीं लष्करी बजेटांत एक लाख रुपये या चळवळीकरितां राखून ठेविले होते. तथापि हीहि रक्कम कमी पडते अशी कुरकूर आहे. राष्ट्रसंघानें मलेरियाला उपाय शोधण्यासाठीं एक कमिटीहि नेमली आहे. अलीकडे पुष्कळ लोक देवी टोंचून घेतात त्यामुळें देवीनें मरणाऱ्या लोकांची संख्या बरीच कमी आहे. ही संख्या १८७७ च्या सुमारास दरसाल २४८७१२ होती .ती हल्लीं ८२३३८ वर आली आहे.

क्रूर प्राण्यांपासून मृत्यु:-ब्रिटिश हिंदुस्थानांत १९२५ त १९७४, १९२४ सालीं २५८७ व १९२३ त ३६०५ इसम क्रूर प्राण्यांनीं मारले. १९२५ सालच्या मृत्यूंपैकीं वाघांनीं ९७४, चित्त्यांनीं १८१, लांडग्यांनीं २६५, अस्वलांनीं ८२, हत्तींनीं ७८ आणि तरसांनीं ६ मारले. वाघांनीं मारलेल्या इसमांची सर्वांत अधिक संख्या मद्रासेंत, चित्त्यांनीं मारलेल्यांची वऱ्हाड-मध्यप्रांतांत, लांडग्यांनीं मारलेल्यांची संयुक्तप्रांतांत, अस्वलांनीं मारलेल्यांची बिहार-ओरिसांत आणि हत्तींनीं मारलेल्यांची आसामांत आहे. बाकीच्या प्राण्यांनीं मारलेल्या ३८८ इसमांपैकीं ७३ रानडुकरांनीं व ९८ सुसरांनी मारलेले आहेत. क्रूर प्राण्यांनीं मारलेल्या इसमांची सर्वांत अधिक संख्या मद्रास प्रांतांत आहे. ही निरनिराळ्या प्राण्यांकडून होणारी मृत्युसंख्या निरनिराळ्या सालीं निरनिराळी भरते.

सर्पदंश:-साप चावून मेलेल्यांची संख्या १९२५ सालीं १९३०८ होती. याच्या मागील सालांत ती जास्त होती. ही संख्या बंगाल-मुंबईमध्यें जास्त व मद्रास, संयुक्तप्रांत, पंजाब, ब्रह्मदेश व मध्यप्रांत, बिहार-ओरिसा यांमध्यें कमी झाली.

ठार मारलेले क्रूर प्राणी:-१९२५ सालीं २१६०५ क्रूर प्राणी मारले गेले. त्यांत १६०५ वाघ, ४६६० चित्ते, २४८५ अस्वलें आणि २३६१ लांडगे होते. याबद्दल १५५५६६७ रुपये बक्षिसादाखल दिले गेले. व ४१००४ साप मारले गेले त्याबद्दल १५७९ रुपये बक्षीस दिले गेले.

मुख्य रोग.-प्राणघातक रोगांचे मुख्य तीन वर्ग आहेत (१) दोषीताप,(२) पचनेंद्रियविषयक रोग,(३) फुप्फुसांसंबंधींचे रोग. निरनिराळ्या मुख्य रोगांमुळें होणाऱ्या मृत्यूंचें दरहजारीं प्रमाण पुढील कोष्टकांत आहे दिलें.

## निरनिराळ्या रोगांमुळें होणाऱ्या मृत्यूंचें प्रांतवारी हजारीं प्रमाण

| प्रांत | कॉलरा | देवी | प्लेग | ताप | अमांश व अतिसार | फुप्फुसाचे रोग | इतर कारणें |
|---|---|---|---|---|---|---|---|
| दिल्ली | .२४ | .२५ | ४.८६ | १६.०३ | .७४ | ८.६२ | २.७८ |
| बंगाल | १.० | .१ | .०००७ | १९.६ | .५ | .६ | ४.० |
| बिहार आणि ओरिसा | .२२ | .२ | .३ | १९.३ | .७ | .२ | ५.९ |
| आसाम | २.७९ | .२४ | .... | १६.५२ | १.६२ | .९८ | ५.१३ |
| संयुक्तप्रांत | १.४८ | .०६ | १.२४ | २०.८९ | .२६ | .६० | ३.७६ |
| पंजाब | ०.१६ | ०.२० | १२.२४ | २२.०४ | ०.५८ | २.६६ | ५.५५ |
| वायव्यसरहद्दप्रांत | ०.०४ | ०.१० | ५.३४ | २१.४० | ०.१२ | १.२० | २.८४ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | .७० | .०७ | .८० | १७.३२ | २.३५ | २.६७ | ८.६८ |
| मद्रास | १.३ | ०.४ | ०.१ | ७.९ | १.८ | १.६ | ११.४ |
| कूर्ग | ०.१५ | ०.४२ | ०.०२ | ३४.२० | १.१८ | १.३२ | ३.७७ |
| मुंबई | .४३ | .५८ | .४८ | ११.२० | १.५१ | ४.७५ | ७.६६ |
| ब्रह्मदेश | .७५ | .२३ | .५१ | ६.९६ | .७० | १.०३ | ११.२८ |
| अजमीर-मेरवाड | ०.०१ | १.२५ | ... | १८.०३ | ०.४१ | ०.५२ | ४.६७ |
| एकूण ब्रिटिश इंडिया | १.२२ | .२३ | १.५० | १६.६० | .९५ | १.३८ | ६.६१ |
| १९२३-२४ | १.० | .१८ | .९५ | १९.९५ | .७७ | १.२३ | ६.२१ |

वैद्यकीय संस्था.–हिंदुस्थानांत १९२४ सालीं ३६६९ सरकारी, निमसरकारी व खाजगी दवाखाने व रुग्णालयें होतीं, व त्यांत रोग्यांची संख्या ३९३८१०३२ होती. शस्त्रक्रियांची संख्याहि वाढती आहे.

वैद्यकीय कॉलेजें:–हिंदुस्थानांत सात वैद्यकीय कॉलेजें मुंबई, मद्रास, कलकत्ता, बेलगाचिया, लाहोर, दिल्ली व लखनौ. १८ शाळा आहेत. डेहराडून येथें एक क्ष–किरण (एक्स–रे) संस्था आहे.

पाश्चूर इंन्स्टिटयूट्स:–श्वानदंशावर उपचार करणाऱ्या संस्था कसौली (पंजाब), कुन्नूर (मद्रास), शिलाँग (आसाम), रंगून (ब्रह्मदेश), व परळ (मुंबई) येथें आहेत. अलिकडे कुत्र्याच्या विषावर उपचार करण्याचें काम पुंणें वगैरेसारख्या मोठमोठे दवाखाने असलेल्या बहुतेक सर्व ठिकाणीं होतें.

वेडयांचीं इस्पितळें:–वेडया लोकांनां औषधोपचार करणारीं वेडयांचीं इस्पितळें (ल्युनॅटिक असायलम्स) थोडीं आहेत; पण त्यांतील संख्या सारखी वाढत आहे. हीं इस्पितळें १९०९ सालीं २२ होतीं व त्यांत त्या सालीं वेड्यांची संख्या नवी २१३६ मिळवून एकूण संख्या ९६४० होती.

महारोग्यांचीं इस्पितळें:–या प्रकारचीं इस्पितळें पुष्कळ आहेत. त्यांत मद्रास लेपर असायलम, माटुंगा लेपर होम (मुंबई), त्रिवेंद्रवम् स्टेट लेपर असायलम व कलकत्ता लेपर असायलम हीं मुख्य आहेत. शिवाय सरकारी मदतीनें चाललेलीं पुष्कळ असून मिशनऱ्यांनीं चालविलेलीं सुमारें ९० इस्पितळें आहेत.

हिंदुस्थानांतील महारोग्यांची माहिती:–महारोग्यांची संख्या १९२१ सालीं १०२५१३ आणि १९११ सालीं १०९०९४ होती. या रोगावर मुख्य योजना म्हणजे प्रथम रोग्याला समाजांतून दूर ठेवणें ही आहे. शिवाय या रोगावरचीं विशिष्ट औषधें (स्पेशल लेपर क्लिनिक्स) रोग्यांनां फुकट मिळण्याची व्यवस्था करावी. शेवटची गोष्ट म्हणजे हा रोग कसा पसरतो, त्यावर अगदी अलीकडे शोध लागलेले औषधोपचार वगैरे संबंधीं माहितीचा प्रसार सर्व लोकांमध्यें करणें ही आहे. नुकताच लेडी आयर्विन यांनीं लेप्रसी फंड सुरू केलेला आहे.

शिशुसंगोपानाची चळवळ:–हिंदुस्थानांत बालमृत्यूंची संख्या भयप्रद आहे. दरसाल वीस लक्ष मुलें मरतात. लहान मुलांचें आरोग्य सुधारण्याच्या उद्देशानें ऑल इंडिया मॅटर्निटी अँड चाइल्ड वेलफेअर लीग स्थापन झाली असून सुईणींनां (मिड–वाईफ) शिक्षण आणि मातांनां बालसंगोपनाचें ज्ञान देण्याच्या सोयी मोठाल्या शहरांमधून झाल्या आहेत. नॅशनल असोसिएशनकडून या बाबतींत चांगलें काम होत असून लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें १९००० पौंड मदत देण्याचें ठरविलें आहे. हें कार्य करणाऱ्या संस्था पुढीलप्रमाणें आहेत–मुंबई–लेडी विलिंग्डन मॅटर्निटी होम; बॉम्बे इन्फन्ट वेलफेअर सोसायटी, ८ इन्फन्ट वेलफेअर सेंटर, रेडक्रॉस सोसायटीची शाखा; सुरत–हेंडरसन ऑफ थॅल्किम स्कीम, दिल्लींतील इन्फन्ट वेलफेअर सेंटर व ट्रेनिंग स्कूल, लेडी चेम्सफर्ड लीग; मद्रास–लेडी चेम्सफर्ड लीगची व रेडक्रॉस सोसायटीची शाखा, कोऑपरेटिव्ह मिडवाइफ्ज स्कीम; पंजाब–लेडी चेम्सफर्ड लीगची शाखा व एक इन्फन्ट वेलफेअर सेंटर; कलकत्ता–सहा मिडवाईफ सुपरवायझर आणि सहा हेल्थ व्हिजिटर, सहा रेडक्रॉस चाइल्ड वेलफेअर सेंटर; पुणें सेवासदन सोसायटी, ट्रेनिंग स्कूल, मॅटर्निटी हॉस्पिटल, शिवाय अलाहाबाद, क्वेटा, पेशावर, इंदूर, शिकंदराबाद, कूर्ग वगैरे ठिकाणीं रेडक्रॉस सोसायटीच्या शाखा आहेत. दुष्काळ, दारिद्र्य व सांथींचे रोग यांनीं ग्रासलेल्या हिंदुस्थान देशांत सुदृढ मुलांची संख्या जास्त असावी किंवा अशक्त व रोगी अशा मुलांची बेसुमार संख्या उत्पन्न करून ती मृत्यूला बळी पडूं द्यावी हा प्रश्न हिंदी समाजापुढें आहे. पाश्चात्य शिशुसंगोपनाच्या प्रश्नांतून वैद्यकीय तपासणी, डेंटल क्लिनिक्स, आरोग्यावह गृहें, मोकळ्या हवेचीं क्रीडांगणें वगैरे सोयी करण्याचें प्रश्न उपस्थित झाले आहेत. हिंदुस्थानांत या सर्व गोष्टी होणें दूरच आहे. पण निदान दरसाल २० लक्ष बालमृत्यू आणि त्याच मानानें अशक्त कमकुवत मुलांची मोठी संख्या यांनां आळा घालून लायक नागरिक कसे करावे याचें ज्ञान मातांनां करून देणें हें काम प्रथम व्हावयास पाहिजे.

इंडियन रेडक्रॉस सोसायटी:—गेलें महायुद्ध सुरू झालें त्यावेळीं रेडक्रॉस सोसायटीतर्फे जें काम होतें तें हिंदुस्थानांत व मेसापोटेमियांत सेंट जॉन अँब्युलन्स असोसिएशननें व इतर प्रांतिक संस्थांनीं हातीं घतलें. १९१६ च्या आगष्ट पासून ऑर्डर आफ सेंट जॉन ऑफ जेरुसलेमच्या आणि ब्रिटिश रेडक्रॉस सोसायटीच्या जाइंट वॉर कमिटीच्या एका शाखेनें हें काम हातीं घतलें.

या कमिटीच्या अखेरच्या रिपोर्टांत असें दिलें आहे कीं, १९२० जून पर्यंत एकंदर फंड १७७८५७१६ रुपये जमला, त्यापैकीं १७ लक्ष रुपये रेडक्रॉस सोसायटीनें दिले. रेडक्रॉसच्या कामाकरितां हिंदुस्थान व मेसापोटेमिया मिळून ११७ लक्ष रुपये खर्च झाले. १९१९ मध्यें रेडक्रॉस सोसायटीच्या इंटर नॅशनल लीगला सामील होण्याचें निमंत्रण केलें. १९२० सालीं वरिष्ठ कायदे कौन्सिलनें ठराव पास करून इंडियन रेडक्रॉस सोसायटी स्थापून तिला प्रांतिक शाखा जोडून घेण्याची योजना केली.

रेडक्रॉस सोसायटीचे उद्देश येणेंप्रमाणें-(१) आजारी व जखमी शिपायांची शुश्रूषा, (२) क्षयरोग्यांची शुश्रूषा ( शिपाई व खलाशी यांची सोय प्रथम करणें), (३) बालसंगोपन, ( ४ ) इस्पितळें व आरोग्यवर्धक अशा संस्थांनां कपडे पुरविणें, ( ५ ) इतर मदत, ( ६ ) होम सर्व्हिस अॅम्ब्युलन्स वर्क, ( ७ ) सैन्यांतील कामावरील व कामावर नसलेल्या शिपायांनां मदत करणें. या सोसायटीचा अध्यक्ष व्हाईसरॉय असून २९ सभासदांची एक मॅनेजिंग बॉडी असते. त्यापैकीं १२ सभासद प्रांतिक शाखांचे व्हाईस प्रेसिडेंट असतात, ८ सभासद सोसायटीच्या वार्षिक जनरल मीटिंगनें निवडलेले व ९ सभासद अध्यक्षनियुक्त असतात. १९२६ सालीं या सोसायटीच्या ताब्यांत निरनिराळ्या बँकांचे ६७,९३,००० रुपये किंमतीचे रोखे होते.

सेंट जॉन अॅम्ब्युलन्स असोसिएशनः—ही संस्था १८७७ मध्यें इंग्लंडांत स्थापन झाली. तिचे उद्देश-(१) अपघात किंवा अकस्मात आजारी झालेल्यांनां तात्कालिक मदत (फर्स्ट एड) करण्याचें ज्ञान देणें, (२) आरोग्य व स्वच्छतेसंबंधीं ज्ञान देणें, (३) अॅम्ब्युलन्सचें सामान तयार करून पुरविणें, (४) अॅम्ब्युलन्स कार, इनव्हॅलिड ट्रान्सपोर्ट कोअर व नार्सिंग कोअर तयार करणें व (५) रोग्यांनां इतर मदत करणें. १९१० मध्यें या असोसिएशनचें इंडियन कौन्सिल स्थापन झालें. १९२९ सालीं या कौन्सिलचे प्रेसिडेंट व्हाइसरॉय आणि मुख्य सेनापति असून सभासद १७ होते.

वेडे व वेडयांचीं इस्पितळें:-रोग्यांप्रमाणें वेडयांकरितांहि हिंदुस्थानांत अद्याप भरपूर इस्पितळें नाहींत. हिंदी संस्थानांत तर ही उणीव फारच आहे. त्यामुळें कैद्यांच्या तुरुंगांतच वेडयांनां ठेवण्यांत येतें. १९२१ च्या खानेसुमारीवरून पाहतां दर दहा हजार माणसांत तीन वेडे असें प्रमाण पडतें. तर युनायटेड किंगडममध्यें वेडयांचें प्रमाण १० हजार लोकसंख्येंत ४० पडतें. युनायटेड किंग्डममध्यें दुबळया मनाचे लोकहि वेडयांत गणले जातात इकडे तसेंच केलें तर ही संख्या फार फुगेल. हिंदुस्थानांतील वेडयांच्या संख्येचें कोष्टक पुढें दिलें आहे (आंकडे हजारांचे आहेत ).

## हिंदुस्थानांतील वेड्यांची प्रांतवार संख्या

| प्रांत, संस्थानें आणि एजन्सीज | एकंदर लोकसंख्या | | | वेडयांची लोकसंख्या | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | पुरुष | स्त्रिया | एकूण | पुरुष | स्त्रिया | एकूण |
| ब्रिटिश सत्तेखालील प्रांत | १३९२४३ | १३१७०७ | २७०९५० | ४५ | २८ | ७३ |
| संस्थानें आणि एजन्सी | २४७५२ | २३२३९ | ४७९९१ | ९ | ५ | १५ |
| एकूण (हिंदुस्थान) | १६३९९५ | १५४९४६ | ३१८९४१ | ५४ | ३३ | ८८ |

एकंदर सुमारें ८८ हजार वेडयां पैकीं फक्त ९७१२ वेडे इसम राहण्यापुरतींच इस्पितळें आहेत म्हणजे १० वेडयांपैकीं फक्त एक इसमाची सोय इस्पितळांत होते. इस्पितळांची संख्या आणि त्यांतील वेडयांची स्थिति दर्शविणारें प्रांतवार कोष्टक पुढील पानावर दिलें आहे.

वेड्यांच्या इस्पितळांची व्यवस्था प्रांतिक मेडिकल आफिसरांच्या देखरेखीखालीं चालते. मद्रास, येरवडा (मुंबई), लाहोर, आग्रा, बऱ्हाणपूर (बंगाल), व रंगून येथील सेंट्रल जेलनां जोडून वेडयांकरितां एक स्वतंत्र सुपरिंटेंडेंट नेमलेला असतो. बाकीचीं इस्पितळें स्थानिक सिव्हिल सर्जनच्या देखरेखीखालीं असतात. वेड्यांचा बंदोबस्त या दृष्टीनें इस्पितळांच्या इमारती चांगल्या आहेत; पण औषधोपचारांच्या योजना फारशा चांगल्या नाहींत. 'सायकिएट्री'कडे फारसें कोणी लक्ष देत नसल्यामुळें हिंदुस्थानांतील वेड्यांच्या वर्गीकरणाकरितां ज पारिभाषिक शब्द वापरतात ते निरुपयोगी असतात. हिंदुस्थानांतील वेड्यांची वर्गवारी दर्शविणाऱ्या कोष्टकांत खूळ (इंडियसी); नाद (मॅनिअ); उद्विग्नता (मेलंकोलिया); फेंपरें = वेड वेडाचे इतर प्रकार; विचारशक्तिहीनता हीं सदरें असतात. बहुतेक वेडे उद्विग्नता ( मेलंकोलिया ) आणि नाद ( मॅनिआ ) या सदरांत पडतात.

## हिंदुस्थानांतील वेड्यांचीं इस्पितळे व वेड्यांची संख्या

| प्रांत | इस्पितळांची संख्या | दाखल झालेल्या वेड्यांची संख्या | वेडयांची एकंदर संख्या | | | बरे होऊन बाहेर पाठविलेले | मेलेले | दररोजचें सरासरी प्रमाण | दररोजचें आजारी-पणाचें प्रमाण | गुन्हेगार वेडे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | पुरुष | स्त्रिया | एकूण | | | | | |
| बंगाल | ४ | २२४ | ९९९ | १७३ | ११७२ | ८५ | ५५ | ९७७.०५ | ८९.०१ | ५६९ |
| आसाम | १ | ७० | ४१० | ९७ | ५०७ | ३८ | २२ | ४३६.९७ | ३२.७८ | २२० |
| बिहार—ओरिसा | १ | ७० | ३०० | ५४ | ३५४ | ३२ | ५ | २९१.६१ | ३४.९० | १५९ |
| संयुक्तप्रांत | ३ | २९६ | १२९१ | ३०९ | १६०० | १७२ | १४८ | १२८७.१६ | २०४.८२ | २८५ |
| पंजाब | १ | ३२२ | ९२९ | २६४ | ११९३ | १४४ | ९९ | ८७५.२७ | ५२.१७ | १८७ |
| मध्यप्रांत | १ | ९९ | ३४६ | ९४ | ४३९ | ३६ | १७ | ३६१.९४ | ११.७३ | १३२ |
| मुंबई | ६ | ५३५ | १५२९ | ४७३ | २००२ | २८५ | १२० | १४८९.६ | ६६.८ | २७६ |
| मद्रास | ३ | ३३७ | ९३३ | ३१२ | १२९५ | १४९ | १०७ | ९४१.५८ | १२८.४७ | १९० |
| ब्रह्मदेश | २ | २०४ | ९८४ | १६६ | ११५० | ७६ | १०३ | ९४४.७६ | ११७.९८ | ४८३ |
| १९२४ | २२ | २१५७ | ७७७१ | १९४१ | ९७१२ | १०१७ | ६७६ | ७६०५.९४ | ७३८.६८ | २५०१ |
| १९२३ | २२ | २१३६ | ७७९० | १८५० | ९६४० | ९७२ | ६२८ | ७६०५.२१ | ७८०.९० | २४३१ |

आरोग्याच्या बाबतींत स्त्रियांची कामगिरी:—रुग्णालयांत व दवाखान्यांत रोग्यांच्या सुश्रूषेसाठीं स्त्रिया असल्यास फार उपयोग होतो हें आतां सर्वांच्या अनुभवास आलेंच आहे. तेव्हां वैद्यकींत स्त्रियांचा शिरकाव करण्याकरितां ज्या संस्थांचा प्रयत्न चालला आहे त्यांची माहिती पुढें दिली आहे—

हिंदुस्थानांतील वैद्यकीय स्त्रीनोकर (वुइमेन्स मेडिकल सर्व्हिस).—कौंटेस डफरिन फंड नावाची एक संस्था असून त्याची व्यवस्था एक एक्झीक्यूटिव्ह कमिटी व एक कौन्सिल यांच्याकडे असते. या फंडाला हिंदुस्थानसरकार दरसाल २५००० पौंड मदत देतें. वैद्यकीय स्त्रीनोकर नेमण्याचें काम या संस्थेमार्फत होतें. या नोकरींत हल्लीं ४४ फर्स्टक्लास स्त्रीवैद्य आणि आठ हिंदुस्थानांतील युनिव्हर्सिटीच्या मेडिकल स्त्री ग्रॅज्युएट नेमल्या जातात. त्यांची निवड हिंदुस्थानांत वरील संस्थेच्या कौन्सिलची मेडिकल सबकमिटी करते व इंग्लंडमध्यें निराळी सबकमिटी करते. या सबकमिट्या शारीरिक लायकीचा (फिजिकल फिटनेस) दाखला देण्याचें काम करतात. नोकरीला लायकीच्या अटी (१) ब्रिटिश किंवा संस्थानी प्रजा, (२) वय २४ ते ३० च्या दरम्यान, (३) फर्स्टक्लास मेडिकल ग्रॅज्युएट, (४) आरोग्य व आचरणविषयक सर्टिफिकेट या आहेत. पगार नोकरीच्या मुदतीच्या मानानें दरमहा रु. ४५० पासून ८५० पर्यंत असतो. शिवाय नोकरीच्या कामांत व्यत्यय येत नसेल तर खाजगी धंदा करण्यास मोकळीक असते.

लेडी हार्डिंज मेडिकल कॉलेज:—हें कॉलेज व हॉस्पिटल व नर्सेस आणि कांपौंडर तयार करण्याकरितां ट्रेनिंग स्कूल हीं १९११ मध्यें ब्रिटिश बादशहानीं हिंदुस्थानला दिलेल्या भेटीच्या स्मरणार्थ काढण्यांत आलीं. इमारतीच्या पायाचा दगड लेडी हार्डिंज यानीं १९१४ सालीं बसविला व पुढें लवकरच त्यांनां मृत्यू आल्यामुळें ही संस्था त्यांच्या स्मारकार्थ त्यांच्या नांवानें चालण्याचें ठरलें. कॉलेज १९१९ सालीं व हास्पिटल १९१७ सालीं सुरू झालें. कॉलेजची व्यवस्था पाहणारी एक गव्हर्नींग बॉडी असून तिचा अध्यक्ष इंडियन मेडिकल सर्व्हिसचा डायरेक्टर जनरल असतो. या संस्थेचा उद्देश स्त्रियांनां युनिव्हर्सिट्यांच्या मेडिकल डिग्रीचें शिक्षण देण्याचा असून हास्पिटलमध्यें रोगी स्त्री ठेवण्याची सोय आहे. नर्सेसकरितां ट्रेनिंगस्कूल असून त्यामध्यें नर्सिंग व मिडवाइफ्री यांचें पूर्ण शिक्षण दिलें जातें;

आणि कांपौंडरांकरितां ट्रेनिंगस्कूल असून त्यामध्यें या धंदाचें शिक्षण दिलें जातें.

कौंटेस ऑफ डफरिन फंड:—स्त्री रोग्यांनां स्त्री डॉक्टरांकडून औषधोपचार व्हावे या हेतूनें १८८६ मध्यें नॅशनल असोसिएशन स्थापली गेली. तिचा उद्देश स्त्रियांकरितां निराळीं हास्पिटलें स्थापणें, अस्तित्वांत असलेल्या हास्पिटलांनां स्त्रियांकरितां स्वतंत्र वॉर्ड जोडावे, स्त्रियांना डाक्टरणी, नर्स, मिड–वाईफ होण्याचें शिक्षण द्यावें. या कार्याच्या फंडाला सार्वजनिक देणग्यांचे ६ लक्ष रुपये मिळाले. संस्थेच्या प्रांतिक शाखा निघाल्या. या फंडांतून मुंबई, मद्रास, कलकत्ता व दिल्ली येथील मेडिकल स्कूलमध्यें शिकणाऱ्या स्त्रियांना स्कॉलरशिपा मिळतात; आणि युनाटेड किंग्डममध्यें अभ्यास करण्याकरितां पोस्ट–ग्रॅज्युएट स्कॉलरशिपाहि मिळतात.

१९०३ सालीं व्हिक्टोरिया मेमोरियल स्कॉलरशिप्स फंड उभारण्यांत आला, त्याला ६ लाख रुपये मिळाले. यांतून मिडवाइफ्रीचें शिक्षण देण्याची व्यवस्था प्रत्येक शाखेमार्फत करण्यांत आली आहे. आतांपर्यंत २००० हून अधिक स्त्रिया मिडवाइफ्रीचें शिक्षण घेऊन तयार झाल्या आहेत.

लेडी रीडिंग ऑफ इंडिया फंड.–१९२२ सालीं हा फंड जमविण्यांत आला. त्याचा उद्देश पूर्वीच्या फंडांनां जरूर तर मदत आणि इंडियन नार्सिंग असोसिएशन स्थापणें हा आहे. या फंडांतून इंग्लंडांत पोस्ट-ग्रॅज्युएट ट्रेनिंगचें शिक्षण घेण्याकरितां हिंदी नर्सेसनां पाठवितात. शिवाय सिमल्यास हिंदी स्त्रिया व मुलांकरितां हास्पिटल आणि दिल्लीस नर्सेस करितां होस्टेल या इमारती बांधण्याकरितां खर्च या फंडांतून झाला आहे.

वरील तिन्ही फंड आणि लेडी चेम्सफर्ड ऑल इंडिया मॅटर्निटी लीग या सर्व संस्था एकत्र करून एक संयुक्त कमिटीच्या ताब्यांत १९२३ सालीं देण्यांत आल्या.

**नर्सिंग**–नार्सिंगचें शिक्षण देणाऱ्या संस्था मुंबई, पुणें, मद्रास, कलकत्ता, दिल्ली वगैरे ठिकाणीं आहेत. मुख्य हॉस्पिटलांमध्येंच हें शिक्षण दिलें जातें. हें शिक्षणकार्य चालू करण्याकरितां कलकत्ता, मद्रास, मुंबई, पंजाब वगैरे ठिकाणीं नार्सिंग असोसिएशन्स स्थापन झाल्या आहेत. मुंबईस या कार्याला १८९० पूर्वींच सुरुवात झाली. सेंट जार्ज हॉस्पिटल, जे.जे. हॉस्पिटल, गोकुळदास तेजपाळ हॉस्पिटल, कामा हॉस्पिटल, या मुंबईतील हास्पिटलांची प्रत्येक स्वतंत्र नर्सिंग असोसिएशन असून शिवाय पुणें, कराची, नाशिक, अहमदाबाद, धारवाड, एडन कारवार, माथेरान, अहमदनगर वगैरे ठिकाणीं अशा संस्था स्थापन झाल्या. १९१० मध्यें ह्या सर्व एकत्र होऊन बाम्बे प्रेसिडेन्सी नार्सिंग असोसिएशन स्थापन झाली. या संस्थेतर्फे परीक्षा घेऊन सर्टिफिकेटें दिलीं जातात. रिटायरिंग अलावन्स (काम सोडल्यावर वेतन) मिळावा म्हणून प्रॉव्हिडंड फंडच्या पद्धतीवर योजना करण्यांत आली आहे. युद्ध, रोगाची सांथ, वगैरे प्रसंगीं जादा संख्या उभारतां यावी म्हणून राखीव नर्सेसची योजना (नार्सिंग रिझर्व) करण्यांत आली आहे.

उत्तर हिंदुस्थानांतील अनेक नार्सिंग असोसिएशन्स एकत्र करून १९०६ सालीं 'लेडी मिंटो इंडियन नार्सिंग असोसिएशन' सुरू करण्यांत आली. हिंदुस्थानांतलि नार्सिंग सुपरिंटेंडेंट्सची असोसिएशन (स्थापना १९०६) असून ती हल्लीं हिंदुस्थानच्या ट्रेंड नर्सेस असोसिएशनला (स्थापना १९०८) जोडण्यांत आली. या संयुक्त संस्थेचें काम नार्सिंग शिक्षण देणें हें नसून या धंद्यांत पडलेल्या स्त्रियांची परस्पर ओळख करून या धंद्याचा दर्जा व लौकिक वाढविणें आहे, हें आहे.

देशाचें आरोग्य सुधारण्यास लोकांचीं मनें या बाबतींत प्रथम तयार झालीं पाहिजेत. इकडे सामाजिक व धार्मिक कल्पनांमुळें आरोग्याच्या प्रश्नांनां वाव मिळत नाहीं. कारण हे प्रश्न रूढी व धर्म यांच्या विरुद्ध गोष्टी करावयास सांगतात. याखेरीज लोकांची अवाढव्य संख्या, दारिद्र्य व विरक्त मनःस्थिति यांमुळें आरोग्याच्या बाबतींत सुधारणा होणें फारच दुर्घट होऊन बसतें. तथापि शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार अधिकाधिक होत गेल्यास आशेला मोठीच जागा आहे.

सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी, सेवासदन यांच्या सारख्या समाजसुधारक संस्था देशांत आरोग्य वाढविण्यास फारच उपयोगी पडतात असा अनुभव आलेला आहे. गेल्या दहा पंधरा वर्षांत शहरांतून बऱ्याच इष्ट सुधारणा घडून आलेल्या आहेत पण ⅞ जनता खेड्यांतून रहात असल्यानें खेड्यांत प्रथम आरोग्य नेलें पाहिजे. खेड्यांतील शिक्षकांनां सामान्य वैद्यकीय उपायांची माहिती करून देण्याची योजना मुंबई सरकारनें केलेली आहे. तसेंच खाजगी डॉक्टरांनां कांहीं सरकारी मदत

देऊन ज्या भागांत वैद्य-डॉक्टर नसतील तेथें त्यांस स्थायिक होण्यास उत्तेजन देत आहे. मद्रास सरकारनेंहि अशीच एक योजना केलेली आहे. आरोग्यविषयक सिनेमा चित्रपट खेडयांतून दाखविण्याबद्दल सहकारी संस्थांचा प्रयत्न चालू आहेच. अँटि-मलेरिया संस्थाहि स्थापन झाल्या असून त्यांचें विशेष यश बंगाल्यांत दृष्टीस पडतें.

हिंदुस्थानच्या आरोग्यविषयक प्रश्नाला चालना देण्यासाठीं वैद्यकीय संशोधनाची फार जरूरी आहे. या बाबतींतहि पैशाची टंचाई आडवी येत आहे. इंडियन रिसर्च फंड असोसिएशनचा प्रयत्न हिंदुस्थानांत उद्भवणाऱ्या सांथींसंबंधीं विशेष शोध व उपाय करण्याचा असतो. याकरितां वैद्यकीय संशोधकांच्या परिषदा भरत असतात. राष्ट्रसंघाच्या आरोग्यकमिटींत ठरल्याप्रमाणें हिंदुस्थानसरकार सिंगापूर येथें एपिडेमिऑलॉजिकल इंटेलिजेन्स ब्यूरो काढीत आहे. कलकत्त्यास 'स्कूल ऑफ ट्रॉपिकल मेडिसिन अँड हायजिन' या संस्थेचें उष्णकटिबंधांतील मुख्य रोगांचें संशोधन करण्याचें कार्य बरें चाललें आहे. इंटरनॅशनल कॉंग्रेस ऑफ ट्रॉपिकल मेडिसिन्स या संस्थेचें सातवें अधिवेशन नुकतेंच कलकत्त्यास भरलें होतें. सार्वजनिक आरोग्यविषयक कारभाराची सुव्यवस्था लावण्यास असल्या संस्थांची फार जरूरी असते.

———

## प्रकरण १० वें.

## भारतीय समाजशास्त्र.

**भारतीय समाजशास्त्राचें महत्त्व**—भारतीय समाजाचा अभ्यास इतका विविध आहे कीं, जगांतील कोणत्याहि राष्ट्राच्या जनतेचा अभ्यास इतका विविध आणि मनोरंजक नसेल. जगांतील एकपंचमांश जनता या देशांत आहे आणि या जनतेच्या आजच्या आयुष्यक्रमांत अत्यंत प्राचीन युगापासून निरनिराळ्या काळचे अवशेष शिल्लक राहिल्यामुळें आजच्या समाजाचें वर्णन देखील जगाच्या अत्यंत प्राचीन काळच्या कांहीं सामाजिक स्थितींचें व स्थित्यंतरांचें दर्शक आहे. जनतेच्या मोठ्या संख्येमुळें, विविधतेमुळें आणि इतिहास देतां येईल अशा दीर्घ कालामुळें या इतिहासांत अनेक समाजशास्त्रीय प्रश्न स्वाभाविकपणेंच येऊन जातात, तसेंच भारतीय जनतेच्या सामाजिक इतिहासामध्यें बौद्ध धर्मासारख्या जगद्व्यापी धर्माचा इतिहास येतो व तो या सामाजिक इतिहासाचा अगदीं लहानसा भाग बनतो. अर्ध्या जगाकडून मोठ्या पूर्णत्वास पोंचलेली म्हणून जी बुद्धाची व्यक्ति समजली जाते ती हिंदूंच्या समाजांतील एक फलहीन चळवळ करणारी किंवहुना महासागराला रट्टे लगावण्याचें निष्फळ काम करणारी सामान्य व्यक्ति बनते व येथें करावयाच्या सामाजिक प्रयत्नांचें अधिक कठिण स्वरूप नजरेस येतें. एवढेंच नव्हे तर त्यामुळें अनेक तत्त्वज्ञानें तात्पुरतीं पत्करणारा, मग टाकून देणारा आणि पुन्हा आपलें पूर्वरूप धारण करणारा असा हा समाज दिसूं लागतो, व तो प्रयत्नपरिणाम पाहून पुष्कळ समाजसुधारक गांगरून गेल्यासारखे दिसतात. समाजस्वरूप पालटण्यासाठीं होणाऱ्या व झालेल्या प्रयत्नांची विविधता आणि त्या प्रयत्नांस आलेलें यशापयश यांच्या ज्ञानानें या समाजाच्या इतिहासास निराळाच रंग येतो. अनेक मानवी प्रयत्नांची निष्फलता ज्या समाजाच्या सुधारणेसंबंधाच्या प्रयत्नांत दिसून येते म्हणून ओरड झाली आहे त्या समाजाच्या अभ्यासामुळें दृष्ट होणारें समाजशास्त्र कांहीं तरी "और" असलें पाहिजे असें पुष्कळांस वाटतें, तर कित्येकांस असें वाटतें कीं मोठे समूह उत्पन्न करणें आणि ते देखील समाजामध्यें धार्मिक दुराभिमानी म्हणजे मतभेदाबद्दल दुसऱ्याचे गळे कापण्याची बुद्धि उत्पन्न होऊं न देतां होऊं देणें यासारख्या क्रिया करणारा समाज मोठा यशस्वी होय व त्या समाजाचें व्यावहारिक समाजशास्त्र उच्च प्रतीचें असलें पाहिजे. या सर्व परस्परांहून भिन्न अशा दृष्टींमुळें भारतीय समाजशास्त्र विशेष महत्त्वाचें झालें आहे. या दोन्ही दृष्टी समाजाच्या अल्प अभ्यासाचा परिणाम आहेत यांत शंका नाहीं. सामाजिक प्रयत्नांची आणि त्यांस प्रेरक होणाऱ्या तत्त्वज्ञानांची हिंदु समाज ही स्मशानभूमि होय असा देखावा जरी वरवर पहाणारांस दिसतो, तरी चांगल्या संशोधक दृष्टीनीं या समाजाच्या अत्यंत दीर्घ इतिहासाकडे पाहिलें असतां हा समाजाचा इतिहास अनेक सामाजिक फेरफारांनीं युक्त असा दिसतो, आणि त्यामुळें समाजांत फरक करण्याचे शास्त्रीय नियम कांहीं निराळे असावेत व ते आपणांस अजून कळले नाहींत असें म्हणावें लागेल असा भास होऊं लागतो. अर्थात या समाजाचा इतिहास अभ्यासून सामाजिक स्थितिगतीच्या नियमांचें जें समाजशास्त्र त्यांतून निघेल तें जगाच्या सुधारणेस अत्यंत उपयोगी होईल अशी प्रस्तुत लेखकाची अपेक्षा आहे.

**भारतीय समाजशास्त्र या शब्दाचे दोन अर्थ**-- " भारतीयांचें समाजशास्त्र " सांगावयाचें म्हणजे काय करावयाचें ? भारतीयांचें समाजशास्त्र म्हटल्याबरोबर दोन व्याख्या मनांत उभ्या रहातात: त्यांपैकीं पहिली व्याख्याकल्पना म्हटली म्हणजे " भारतीय समाजाच्या आजच्या संशोधकांनीं केलेल्या पद्धतशीर अभ्यासाचें जें फल तें "भारतीय समाजशास्त्र" होय." दुसरा अर्थ म्हटला म्हणजे "भारतीयांनीं समाजशास्त्राचे जे नियम शोधून काढले असतील ते" होत. या दुसऱ्या दृष्टीनें जें समाजशास्त्र सांगावयाचें त्यांत भारतीयांचें धर्मशास्त्र व अर्थशास्त्र यांचा प्रामुख्यानें निर्देश करावा लागेल. कारण समाजाविषयीं कांहीं तरी दृष्टि मनांत बाळगून केलेल्या क्रियांचें अवगमन या दोन शास्त्रांच्या अभ्यासानेंच होईल. त्याचप्रमाणें उपाध्यायवर्गानें वापरलेल्या समाजनीतीचीं अंगेंहि विचारांत घ्यावीं लागतील. त्याचप्रमाणें पंचायतींचे निवाडे, पंचायतीसारख्या सामाजिक घटना, शुद्धिचळवळ, संघटनाचळवळ या सर्व गोष्टी विवेचनविषय कराव्या लागतील. वरील विषयाचें विवेचन हा भारतीयांनीं निर्माण केलेल्या समाजशास्त्राचा एक भाग होय.

**शास्त्र जुनें कीं नवें**--समाजशास्त्र हें नांव जरी नवें आहे तरी लोकव्यवहार व त्यामुळें उत्पन्न झालेलें ज्ञान हीं फार जुनीं आहेत. अनेक प्रकारचें सामाजिक ज्ञान ग्रंथांत जरी नसलें तरी तें जनतेंत प्रचलित असतें, आणि तें ज्ञान लोकांच्या कार्याकार्याचें नियामक बनतें व तें ज्ञान समाजाचें अलिखित समाजशास्त्र असतें. प्रत्येक मनुष्य कांहीं तरी प्रयोजनामुळें विचार करावयास लागतो; केवळ शास्त्रशोधन म्हणून विचार करण्याची वृत्ति मागाहून म्हणजे समाजशास्त्राच्या अधिक विकसित कालांत उत्पन्न होते हें एक ज्ञानविकासाच्या इतिहासांतील सत्य आहे, आणि तें सामाजिक शास्त्रांच्या इतिहासांत चांगलेंच प्रत्ययास येतें. यासाठीं कायदा, शासनविद्या इत्यादि व्यावहारिक गोष्टींच्या बाबतींत समाजशास्त्र अधिक पुढें सरकतें. नवी स्थिति उत्पन्न होते ती मनुष्याच्या पूर्ण परिश्रमाचा, अनुभवाचा व ज्ञानाचा स्वाभाविक परिणाम म्हणून उत्पन्न होते व यासाठीं आजच्या अभ्यासानें आपण जो समाजप्रगतिविषयक नियम शोधून काढणार तो नियम खरोखर नवें ज्ञान नसून पूर्वजपरिचित ज्ञानाची आजची मांडणी आहे. एवंच सामाजिक फरकाचें श्रेय समाजांत असणाऱ्या समाजशास्त्रीय ज्ञानास देण्यास हरकत नाहीं. इतक्या व्यापक दृष्टीनें पाहिलें तर वर सांगितलेल्या भारतीय समाजशास्त्राच्या दोन कल्पनांतील फरक कमी होतो. प्रत्येक सामाजिक फरक मनुष्यज्ञानविकासामुळेंच झालेला आहे. व समाजांत होणाऱ्या अनेक फरकांचें श्रेय समाजास परिचित असलेल्या समाजशास्त्रीय ज्ञानास देतां येईल.

**भारतीय समाजाचें गतिशास्त्र**--सामाजिक फरकांमुळें जे समाजाचे गतिनियम उघडकीस येतात ते मनुष्य जसजसे अधिकाधिक जाणील तसतसा तो समाजाच्या प्रगतीस स्वेच्छेनें चालना देऊं शकेल. तथापि येथें हेंहि सांगितलें पाहिजे कीं अभ्यासदृष्ट नियमांचें अवगमन करून समाजाच्या प्रगतीस स्वेच्छेनें चालना देण्याची क्रिया अगदीं अर्वाचीन आहे.

**समाजशास्त्र आणि आयुर्नियमन**--प्राचीन काळापासून जें सामाजिक ज्ञान समाजावर परिणाम करीत आहे तें विशेषेंकरून अनुभवावर रचलेल्या भावनांच्या मार्फत परिणाम करीत आहे. प्रत्येक व्यक्ति आपलें कार्यनियमन करते ती तत्त्वांचा विचार करून करीत नाहीं, तर समाजांत प्रचलित असलेल्या समजुती आणि भावना यांचें अनुवर्तन करून करते. उदाहरणार्थ, उष्ट्याची कल्पना घ्या. कांहीं तरी वैद्यकीय ज्ञानावर ही कल्पना रचली गेली आहे आणि उष्ट्यापासून जे लोक अलिप्त राहतात ते केवळ त्यासंबंधाचें शास्त्र लक्षांत घेऊन राहतात असें नाहीं तर ते भावनांच्यामुळें अलिप्त राहतात. उष्ट्याची चिळस लोकांत असते ती चिळस कांहीं ज्ञानावर रचली गेली आहे. तर त्या चिळशीच्या मागें असलेलें ज्ञान हें समाजाच्या शास्त्रीय ज्ञानाचाच अंश नव्हे काय? क्षय असलेल्या कुटुंबांशीं संबंध करण्यास जे लोक तयार नाहींत त्यांच्यामध्यें कांहीं तरी पूर्वानुभवाचें ज्ञान असतें म्हणून ते तयार नाहींत. तर ही विवाहविषयक सावधगिरी लोकांच्या समाजशास्त्रीय ज्ञानाचाच परिणाम नव्हे काय? या तऱ्हेचे लोकांमधील विधिनिषेध लक्षांत घेतले म्हणजे समाजांत प्रचलित असलेलें समाजशास्त्र लक्षांत येतें; मग ते विधिनिषेध पुस्तकांत लिहिलेले असोत अगर नसोत. ते विधिनिषेध भारतीयांचें व्यावहारिक समाजशास्त्रच होय. पुष्कळदां हे विधिनिषेध ज्या समजुतींवर रचले गेले त्या समजुती सत्य नसतील. त्या बाबतींत त्यांचें

समाजशास्त्र चुकलेलें म्हणतां येईल. उदाहरणार्थ, 'शकुन शास्त्र' घ्या. त्याचा अंतरभाव भारतीयांच्या प्रचलित समाजशास्त्रांत केलाच पाहिजे. पण त्या शास्त्रग्रंथांतील चुकांप्रमाणें या शकुनकल्पना चुकीच्या म्हणतां येतील. वर दिलेले सर्व उल्लेख भारतीयांस ठाऊक असलेल्या समाजशास्त्राचे दर्शक आहेत. पण भारतीय समाजाच्या अभ्यासापासून अर्वाचीन संशोधकानें जें शास्त्रज्ञान पैदा केलें त्याचे दर्शक वरील नियम नव्हत.

समाजामध्यें विधिनिषेधांचे जे नियम निघतात ते सर्व परिणामाच्या ज्ञानावरूनच उत्पन्न झालेले आहेत. आजचें समाजशास्त्र वाढत जावयाचें म्हणजे पूर्वीच्या गोष्टींचा व त्याचप्रमाणें नव्या गोष्टींचा अभ्यास करून वाढावयाचें आहे. पूर्वीच्या अभ्यासांत जर अवलोकन अपूर्ण व एकदेशीय असेल तर नवीन अवलोकन अधिक विविध पाहिजे. अवलोकन पद्धतशीर नसेल तर तें पद्धतशीर झालें पाहिजे व दोन व्यवहारांमधील किंवा वस्तूंमधील वरवर दिसणारा कार्यकारणभाव तपासला पाहिजे. या रीतीनें धर्मशास्त्र व कायदेशास्त्र इत्यादि कर्तव्यात्मक समाजशास्त्रें आहेत त्यांचें स्वरूप बदललें पाहिजे.

**अर्वाचीन समाजशास्त्र**—आज जें भारतीयांचें "अर्वाचीन समाजशास्त्र" तयार होत आहे तिकडे आतां लक्ष देऊं.

भारतीय समाजाचा शास्त्रीय अभ्यास आतां हळूहळू चांगला प्रस्थापित होऊं लागला आहे. या अभ्यासास चांगलें साहित्य पुरविण्यास प्रारंभ सरकारी एथ्नालाजीच्या खात्याकडून व सेन्सस म्हणजे शिरोगणतीच्या खात्याकडून झाला. सरकारी खात्याकडून जी भाषाविषयक पहाणी झाली तिनें देखील भारतीय समाजशास्त्राला उपयोगी असें बरेंच साहित्य बाहेर आणलें आहे. भारतीय समाजाच्या आधुनिक स्थितीविषयीं माहिती तर चांगलीच देतां येईल आणि एकंदर भारतीय जनतेच्या इतिहासाचे आतां बरेच महत्त्वाचे धागे सांगतां येतील.

आज जातींची मोजदाद आणि वर्णन यांचा कच्चा खर्डा तयार झाला आहे. लोकांमधील स्थलांतरें, वयें, स्त्रीपुरुषसंख्या हीं मोजलीं गेलीं आहेत, शिक्षणाच्या दृष्टीनें पहाणी झाली आहे आणि समाजाच्या इतिहासाकडे देखील बरेंच लक्ष पोंचलें आहे. आज सामाजिक इतिहासाचीं बरींच अंगें सांगतां येतील.

आजच्या अभ्यासाचे दोन विभाग करतां येतील: एक भाग म्हटला म्हणजे सद्यःस्थितिवर्णनात्मक व दुसरा म्हटला म्हणजे ऐतिहासिक होय. सद्यःस्थितिवर्णनात्मक काम जितकें झालें आहे तितकें ऐतिहासिक काम झालें नाहीं. ऐतिहासिक काम करावयास जें भाषापांडित्य लागतें तें असलेला वर्ग भारतीय भाषाशास्त्राकडे किंवा उपासना व तत्त्वज्ञान, कला व वाङ्मय यांच्या अभ्यासाकडे जसा वळला आहे तसा समाजशास्त्राकडे वळलेला नाहीं व यामुळें ऐतिहासिक समाजशास्त्राचे अभ्यासक फार थोडे आहेत. किंबहुना प्रस्तुत लेखकास स्वतःच्या अभ्यासफलाशिवाय इतरांचीं अभ्यासफलें फारच थोड्या प्रमाणांत देतां येतील.

समाजाच्या ऐतिहासिक अभ्यासांत मात्र एक महत्त्वाचें वैगुण्य राहिलें आहे. आर्यन् भाषा बोलणाऱ्या समाजाचा जितका अभ्यास झाला आहे त्याच्या मानानें द्राविडी समाजाचा अभ्यास फारच कमी झाला आहे. तथापि द्राविडी भाषाशास्त्राकडे लक्ष देऊन समाजाचा अभ्यास करण्याची जी प्रवृत्ति काल्डवेलनें घातली तिनें कांहीं तरी परंपरा स्थापन केली आहे असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. त्या परंपरेनें अभ्यास झाल्यास ऐतिहासिक सत्याची मोठीच फलनिष्पत्ति होईल अशी प्रस्तुत लेखकास अपेक्षा आहे. अभ्यासक्षेत्र मोठें आहे व त्यांत जितके लोक अधिक पडतील तितकें चांगलें.

द्राविड महावंशाचा अभ्यास, त्या अभ्यासांत अनेक पक्ष उत्पन्न होण्याइतका वाढला आहे. सध्यां द्राविडी समाजेतिहासाच्या संशोधक वर्गामध्यें पक्ष पडले आहेत आणि त्या पक्षांत जातिविषयक भावना जागृत झाल्या आहेत. ब्राह्मणेतर पक्ष प्रत्येक महत्त्वाचें संस्कृतीचें अंग ब्राह्मणी पगड्यापूर्वी स्थापन झालें आहे असें म्हणण्याकडे प्रवृत्त होतो तर ब्राह्मण पक्ष प्रत्येक प्रगतीचें श्रेय ब्राह्मणी संस्कारास देऊं लागतो. या प्रवृत्तीचे धागे इतके गुंतागुंतीचे होऊं लागले आहेत कीं, सामाजिक रिवाज, कायदा आणि भाषाशास्त्र या सर्वांत या दोन पक्षविशिष्ट प्रवृत्ती गडबड करीत आहेत. अत्यंत प्राचीन ग्रंथांतील बरेच महत्त्वाचे शब्द संस्कृत शब्दांवरून ब्राह्मण संशोधक व्युत्पादितो तर ब्राह्मणेतर संशोधक ती व्युत्पत्ति खोटी मानतो व तामिळ धातूपासूनच तो शब्द निघाला आहे असें दाखवूं लागतो. दोन्ही बाजूंचें म्हणणें ऐकून आमचें असें मत झालें आहे कीं, ब्राह्मणी संस्कृतीचा परिणाम इतक्या प्राचीन काळीं झाला आहे

कीं, तामिळमधील अत्यंत प्राचीन ग्रंथ जरी घेतले तरी ते ब्राह्मणी परिणामानें अस्पृष्ट नाहींत आणि द्राविडांची वाङ्मययुक्त राष्ट्र अशी ख्याति होण्यास त्यांच्या संस्कृतीवर ब्राह्मण किंवा आर्यन् लोकांच्या आगमनामुळें झालेला परिणामच कारण होता असें वाटतें. हें मत बदलण्यास जर कांहीं निश्चित पुरावा पुढें येईल तर त्याचा आम्ही मोठ्या आनंदानें सत्कार करूं. असो, येथें या वादांत शिरण्यांत कांहीं अर्थ नाहीं. सामाजिक विकासाचा इतिहास लिहिण्यास आज आम्हांस संकल्प करावयाचा झाल्यास आज द्राविडी समाजाचा विकास चांगल्या तऱ्हेनें मांडतां येणार नाहीं हें आजच्या अभ्यासाचें वैगुण्य कबूल केलें पाहिजे. गस्टाव्ह आपर्ट (Original Inhabitants of Bharatvarsha or India) यासारख्या लेखकानें द्राविडमय हिंदुस्थान होतें असें दाखविणारा जो कल्पनाप्रचुर इतिहास लिहिला आहे त्याच्या योगानें प्रामाणिक इतिहासाचें काम यवमात्र पुढें सरकलें असें वाटत नाहीं.

वैदिक कालापासून प्रारंभ करून आर्यन् लोकांच्या इतिहासासच अग्रस्थान देऊन समाजशास्त्राच्या इतिहासास प्रारंभ केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. या तऱ्हेनें भारतीयांचें समाजशास्त्र सांगावयाचें म्हणजे भारतीय समाजाचा इतिहास सांगावयाचा. या इतिहासांत निरनिराळ्या जातींचीं आणि मानववंशांचीं आगमनें, त्यांनीं आपले परस्परसंबंध कसे बसविले, त्यांच्यामध्यें अंतर्गत घटना कशी होती, ती घटना कशी बनली इत्यादि गोष्टींचें वर्णन आलें पाहिजे. तें वर्णन करतांना अनेक स्थित्यंतरें वर्णन करावीं लागतील. आणि समाजांतील अंतःस्थिति बदलण्यासाठीं समाजामध्यें जे कित्येक सहेतुक प्रयत्न व अहेतुक क्रिया झाल्या त्या सांगाव्या लागतील. एखाद्या लोकांचें समाजशास्त्र सांगावयाचें म्हणजे त्या लोकांनीं आपलें भवितव्य स्वायत्त करण्यासाठीं ज्या क्रिया केल्या असतील त्या सांगावयाच्या; त्याचप्रमाणें समाजांत बदल होण्याचे जे नियम भारतीय समाजांत दिसून येतात ते सांगावयाचे व त्या नियमांचें अस्तित्व भारतीयांनीं कितपत ओळखलें होतें हें सांगावयाचें. समाजाची स्थिति बदलण्यासाठीं किंवा समाज स्वायत्त करण्यासाठीं जे जे प्रयत्न झाले त्यांचा इतिहास देणें म्हणजे शासनसंस्थांचा किंवा धार्मिक संस्थांचा इतिहास देणें होय. याबरोबरच समाजामध्यें शासनाभाव असल्यामुळें जें संस्थांचें भ्रष्टीकरण होत असतें तें देणें यासहि समाजशास्त्राच्या इतिहासाचाच भाग म्हणतां येईल. समाजामध्यें समाजशासनासाठीं जो प्रयत्न होतो तो केवळ सत्तेकडून होणारा निग्रहानुग्रहात्मक प्रयत्न नव्हे, तर समाजामध्यें ज्या कल्पना राज्य करीत असतात आणि व्यक्तींचें आयुर्नियमन करीत असतात त्या कल्पनांचे विधान देखील समाजशास्त्रीय इतिहासांत हवें.

"समाजाचा इतिहास" आणि "ऐतिहासिक समाजशास्त्र" हे जवळ जवळ प्रतिशब्द आहेत असें म्हणण्यास आपणांस जें काय हवें तें हें कीं, समाजाचा इतिहास हवा. आपण जेव्हां समाजाच्या स्थित्यंतरासंबंधानें नियम देतों तेव्हां अनेक गोष्टी थोडक्यांत सांगत असतों. सामाजिक मोठमोठीं स्थित्यंतरें सांगणें हें जर आपण ऐतिहासिक समाजशास्त्राचें कार्य धरलें तर आपणांस एक मोठें इतिहासलेखन करावें लागेल व तें करतांना स्थित्यंतराचे चोंहोकडे लागू पडणारे अनेक नियम दिसूनहि येतील. केवळ स्थित्यंतराचे नियम सांगणें हें ऐतिहासिक समाजशास्त्राचें काम धरलें तर सामाजिक इतिहास आणि ऐतिहासिक समाजशास्त्र यांच्यांत शाब्दिक भेद करावा लागेल एवढेंच.

**मानवी समाजाचा विकास**—समाजशास्त्रज्ञांचा किंवा मानवशास्त्रज्ञांचा मुख्य विषय मानवेतिहास होय. त्यांनीं व इतर शास्त्रांच्या अभ्यासकांनीं आजपर्यंत जे परिश्रम केले त्यांवरून त्यांनां मानवेतिहासाविषयक कांहीं गोष्टी समजल्या आहेत व त्याच पुढील संशोधकांनां अभ्यासविस्तारानें सुधारावयाच्या आणि वाढवावयाच्या आहेत. निरनिराळ्या काळांच्या परिस्थितींचीं सर्व अंगें एकदम समजत नाहींत तथापि जी कांहीं माहिती मिळते तीवरून जगाचा एकंदर इतिहास कसा झाला असेल याविषयीं कांहीं कल्पना बसवितां येते. समाजशास्त्रज्ञ आणि मानवेतिहासज्ञ मनुष्यजातीच्या एकंदर इतिहासाविषयीं कल्पना मतांत वागवितात ती येणेंप्रमाणें:—

मनुष्यजाति ही कोणत्या तरी मनुष्यकल्प प्राण्यांत बदल होत होत कोणत्या तरी काळीं आणि कोणत्या तरी स्थळीं तयार झाली.

मनुष्यप्राण्याची जगावर वसति जी कित्येक हजारों किंवा लाखों वर्षें असेल त्या अवधींत एकसारखी वाढत आहे. मूळचीं माणसें फार तर कांहीं हजार असतील आणि त्यांचा वंशविस्तार होत होत आज दीडशें कोटींवर वाढ झाली आहे.

मानवी संस्कृतीच्या जुन्या काळीं म्हणजे सांस्कृतिक प्रगति अल्प असतां मानवी जातीच्या व्यक्तींचें इतस्ततः भ्रमण होऊन मानवजातीच्या अनेक म्हणजे पुष्कळच लहान लहान जमाती तयार झाल्या. याप्रमाणें जे भ्रमण होऊन वियुक्त होत गेले ते बहुतेक एकटे पडले, त्यांचा व इतरांचा संबंध बराच कमी कमी रहात गेला.

संस्कृतीच्या इतिहासांत बऱ्याच उत्तर काळीं हे मानवी समुदाय जे एकाकी आणि एकमेकांकडून जवळ जवळ अस्पृष्ट अशा स्थितींत पडले होते ते आतां अधिक दळणवळण, अधिक परस्पर सहवास, ज्ञातींचें संघीकरण आणि परस्पर विवाह यांच्याकडे प्रवृत्ति दाखवीत आहेत.

मनुष्य पोट भरण्याकरतां स्थलांतर करतो. तो केव्हां केव्हां एखाद्या ठिकाणीं बरींच वर्षें किंवा कायमचा राहतो. हें त्याचें विवक्षित ठिकाणीं राहणें त्याच्या त्या ठिकाणच्या सांपत्तिक स्थितीचा उपयोग करण्याच्या शक्तीवर अवलंबून असतें व ही शक्ति सामान्यतः तो ज्या सांस्कृतिक परिस्थितींत असेल तीवर अवलंबून असतें आणि हीच सृष्ट्युपभोगशक्ति त्याची भविष्यकालीन संस्कृति निश्चित करते.

मनुष्यजातीचें ज्यावेळीं निरनिराळ्या दिशांनीं स्थलांतर होत होतें त्यावेळीं त्यांच्यामध्यें शारीरिक व भाषाविषयक अनेक भेद उत्पन्न झाले आणि यामुळें अनेक मानववंश निर्माण झाले. एकमेकांशीं दळणवळण, अधिक परस्पर सहवास, ज्ञातींचें संघीकरण व परस्पर विवाह यांच्यामुळें या कालांत उत्पन्न झालेले शारीरिक आणि भाषाविषयक भेद कमी कमी होत जात आहेत.

मनुष्यसमूहांचें पृथक्त्व आणि एकाकित्व हीं इतर जातींशीं समागमामुळें आणि पूर्वीपेक्षां अधिक मोठे मनुष्यसमुच्चय बनल्यामुळें मोडत चाललीं आहेत.

मोठ्या समुच्चयाची भावना अनेक कारणांनीं जन्मास आली आहे. आणि त्या अनेक कारणांपैकीं प्रचारशील उपासनासंप्रदाय व शासनसंस्था हीं दोन महत्त्वाचीं होत.

लहान लहान जाती किंवा संस्थानें यांच्या संघीकरणामुळें मोठमोठ्या शासनसंस्था तयार होत आहेत.

मोठ्या शासनसंस्था उत्पन्न करणारें हें जें संघीकरण होई तें अनेक पद्धतींनीं जन्मास येई. एक जाति दुसऱ्या जातीस जिंकी आणि त्या जातीचा आपणांतच समावेश करून घेई. कधीं कधीं एक बलवान् राष्ट्र इतर अनेक राष्ट्रांस जिंकून त्यास एकस्वरूपता आणी. कधीं कधीं अनेक राष्ट्रें एका मोठ्या शत्रूच्या भीतीनें देखील एकीकृत होत आणि पुढें त्यांचे कायमचे संघहि बनत.

मनुष्यजातीचा प्रसार चोहोंकडे होऊन त्यांच्यामध्यें जे भेद उत्पन्न झाले त्या सर्व भेदांमध्यें भाषाभेद हा अत्यंत महत्त्वाचा आहे. तो प्रयाणाचा सूचक आहे. भाषेंतील शब्दसमुच्चय प्रयाणमार्गाचे सूचक आहेत आणि अपभ्रंश कालाचे सूचक आहेत.

प्रस्तुत विचारपरंपरेची आणि भारतीय सामाजिक इतिहासाची संगति येणेंप्रमाणें लावतां येईल—

**मानवी प्राण्यांचीं हिंदुस्थानांत झालेलीं आगमनें**—भारतीय इतिहासांत दोन मनुष्यभ्रमणें प्रमुख आहेतः एक आर्यन् भाषा बोलणारांचें व एक द्राविडी भाषा बोलणारांचें. आर्यन् भाषा बोलणारांचें भ्रमण तपासावयास साहित्य सपाटून आहे. निरनिराळ्या काळच्या प्राकृत भाषांचे प्रांथिक अवशेष उरले आहेत. याशिवाय अर्वाचीन भाषा आहेतच. हें सर्व साहित्य अभ्यासून आर्यन् लोकांच्या परिभ्रमणांचा इतिहास काढतां येईल. त्याचप्रमाणें द्राविडांच्या परिभ्रमणांचा इतिहासहि काढतां येईल. द्राविडी भाषा बोलणाऱ्या निरनिराळ्या लोकांमध्यें सांस्कृतिक दृष्ट्या महदंतर दिसून येतें. गोंड किंवा ब्राहुई यांस असंस्कृत जाती म्हणतां येईल, तर तामिळ, तेलगु, कानडी, वगैरे लोकांस सुसंस्कृत म्हणतां येईल.

द्राविडी लोकांच्या पूर्वी देशांत किती भिन्न मानववंशाचे लोक होते हें सांगतां येत नाहीं. तसेंच द्राविड वंशाचे लोक हिंदुस्थानांत केव्हां आलें हेंहि सांगतां येत नाहीं. तसेंच आर्यन् संस्कृतीचे लोक देशांत येण्यापूर्वी द्राविड लोक कोणत्या सांस्कृतिक स्थितींत होते हेंहि सांगतां येत नाहीं.

**आर्यन् लोकांचें आगमन द्राविडांच्या नंतर झालें काय?**—येथें जी एक कल्पना ऐतिहासिक सत्य म्हणून गृहीत धरली गेली आहे पण जी प्रस्तुत लेखकाच्या मतें सत्य म्हणून गृहीत धरणें बरोबर नाहीं तीविषयीं विवेचन केलें पाहिजे. द्राविडांच्या नंतर आर्यन् लोकांचें आगमन झालें ही गोष्ट केवळ त्यांच्या दक्षिणेकडील वसतीवरून गृहीत धरली आहे. हिंदुस्थानांत येणारे लोक जमीनीकडून येणार तर दक्षिणेकडचे लोक म्हणजे उत्तरेकडील लोकांनीं हाकलून लावलेले लोक होत. त्यामुळें द्राविड वसाहत अगोदरची आणि आर्यन्

वसाहत नंतरची असें केवळ गृहीत धरलें गेलें आहे. आमच्या मतें हें गृहीत देखील अत्यंत शंकास्पद होय.

दक्षिणेकडील वसाहत स्वतंत्रपणें जलमार्गानें येणान्या लोकांनीं होणें शक्य धरल्यास आर्यन् लोकांचें द्रविडांनंतरचें आगमन गृहीत धरण्याचें कारणच उरत नाहीं.

सिंहली लोक आर्यन् भाषेचे आहेत आणि त्यांची वस्ती तेथें फार पूर्वीपासून आहे. लोकांची भाषा एकाएकीं बदलत नाहीं. भाषेला लोक चिकटून असतात असें जर आहे तर सिंहली लोक आर्यन् भाषेच्या पूर्वजांचेच वंशज होते हें उघड आहे आणि यांची वसाहत केव्हां झाली व कशी झाली याचा आपण विचार करूं लागलों तर आर्यन् लोक द्राविडांची फळी फोडून तिकडे गेले असें वाटत नाहीं? तर ते जलमार्गानेंच फार प्राचीन काळीं सिंहलद्वीपांत वसाहत करते झाले असें दिसतें. तर नौकागमनानें देश वसविण्याची क्रिया सिंहलद्वीपांत जर अत्यंत प्राचीन काळीं झाली तर तीच क्रिया होऊन द्रविड लोकांनीं कोठून तरी येऊन दक्षिण हिंदुस्थानच वसविला असें कां शक्य नाहीं. उत्तरेकडील लोकांनीं द्राविडांस विंध्याद्रीपार घालवून दिलें आणि विंध्याच्या दक्षिणेस आल्यानंतर त्यांनीं संस्कृतिसंवर्धन केलें असें वाटत नाहीं. त्यापेक्षां आपण जर असें गृहीत धरलें कीं, द्रविड समुद्रमार्गानें दक्षिणेकडे आले आणि आर्यन् पर्वतराजी ओलांडून उत्तरेकडे वसाहत करते झाले; तर ती कल्पना अधिक बळकट पायाची होईल असें आम्हांस वाटतें.

द्राविडांस दक्षिणेकडे आर्यन् लोकांनीं हांकलून दिलें असा समज होण्याचें एक कारण, वैदिक लोक ज्या लोकांबरोबर लढले ते लोक काळे होते आणि त्यामुळें ते अर्थात द्राविड होते अशी लोकांची समजूत झाली आहे हें होय. तथापि ही समजूतच चुकीची आहे. काळ्या लोकांस वैदिक आर्यांनीं जिंकलें या कल्पनेसच कांहीं एक आधार नाहीं असें आम्हीं 'बुद्धपूर्वजग' या तिसऱ्या विभागांत दाखवून दिलें आहे. ऋग्वेदांत जो संग्राम दिसतो तो गोऱ्या-काळ्यांचा नसून आर्यन् वंशाच्याच दोन शाखांतील आहे. त्या शाखांस आम्ही मांत्र संस्कृतीचे व सूतसंस्कृतीचे लोक अशीं नांवें दिलीं आहेत. शिवाय पादाक्रांत केले ते लोक एकदम पळून जात नाहींत तर तेथेंच जित लोक म्हणून रहातात आणि लढाईतील पराभवानें शासक वर्ग तेवढा बदलतो. वैदिक लोकांच्या आगमनापूर्वींच बहुतेक उत्तर हिंदुस्थान (वऱ्हाडसह) आणि सिंहलद्वीप हा भाग आर्यन् भाषा बोलणारांनीं व्यापिला होता आणि दक्षिण द्राविड लोकांनीं व्यापिली होती व या स्थितींत अजून फारसा फरक झाला नाहीं असें आमचें मत आहे आणि विरुद्ध पक्षाचा निश्चित पुरावा येईपर्यंत हें मत तसेंच राहणार आहे.

अर्थात आर्यन् लोक हे द्राविडांच्या नंतर हिंदुस्थानांत प्रवेश करते झाले व आर्यन् लोकांनीं आपल्या वसतीसाठीं प्रदेश द्राविडांपासून हिसकावून घेतला हेंच आम्हास मान्य नाहीं. आर्य-द्राविडांचा परस्परोच्छेदी संग्राम झाला नाहीं असेंच आम्ही म्हणतों.

द्राविड दक्षिणेकडे व आर्यन् लोक उत्तरेकडे असे दोघेहि भिन्न मार्गांनीं येऊन वसाहत करते झाले असा आमचा समज आहे. या दोघांच्या भिन्नस्थलीन वसाहती भिन्न कालीन झाल्या असणें शक्य आहे. व त्या भिन्नकालीन झाल्या असल्यास या दोन्ही मानववंशांपैकीं कोणता तरी मानववंश अगोदर वसाहत करणारा असेल व द्राविड लोक देखील अगोदर आले असतील. तथापि उत्तरेकडून उचाटन पावून ते दक्षिणेकडे आले असें मात्र गृहीत धरण्यास आम्ही तयार नाहीं.

**आर्यन् लोकांचें समाजशास्त्र द्राविडसंबंधापूर्वींच तयार झालें**—आर्यन् आणि द्राविडांचा संबंध येण्यापूर्वींच आर्यन् लोकांच्या निरनिराळ्या काळीं हिंदुस्थानांत आलेल्या जातींनां व सामाजिक वर्गांनां आपल्या एकमेकांशीं संबंधाविषयीं नियम करावे लागले आणि त्यामुळें वेदकाल संपण्यापूर्वींच महत्त्वाचे सामाजिक प्रश्न उत्पन्न होण्यास व त्यावर वाङ्मय उत्पन्न होण्यास प्रारंभ झाला. भारतीय समाजामध्यें आपले सामाजिक प्रश्न सोडविण्यास व त्यांवर वाङ्मय उत्पन्न करण्यास सुरवात एकाच वेळेला झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. जेव्हां जेव्हां जो सामाजिक प्रश्न उत्पन्न होई तेव्हां तेव्हां तो सोडविण्याचाहि प्रयत्न होई व त्यामुळें जे विचार उत्पन्न होत त्यांस ग्रंथांत स्थान मिळे. यामुळें भारतीयांच्या सामाजिक प्रश्न सोडविण्यास लागणाऱ्या व्यावहारिक समाजशास्त्रास आणि ग्रांथिक समाजशास्त्रास एकाच वेळीं प्रारंभ झाला असें म्हटलें पाहिजे.

भारतीयांचें मुख्य सामाजिक शास्त्र म्हणजे धर्मशास्त्र होय. भारतीयांच्या सामाजिक क्रियांच्या योग्यायोग्यतेविषयीं कल्पना यान शास्त्रांत आहेत. आतां धर्मशास्त्र

हें ज्याप्रमाणें वेद, इतिहास–पुराणें यांचा आश्रय करतें त्याप्रमाणें समाजशास्त्रास देखील तें सर्व वाङ्मय उपयोगी पडणार आहे व यासाठीं भारतीयांच्या समाजशास्त्रीय कल्पनांचें अवगमन होण्यासाठीं प्रथम धर्मशास्त्रग्रंथांचें आणि नंतर त्यास उपबृंहक होणाऱ्या इतर ग्रंथांचें अवगमन केलें पाहिजे. तथापि त्याबरोबर हेंहि सांगून ठेवलें पाहिजे कीं भारतीयांच्या समाजशासनाच्या प्रयत्नांचा इतिहास द्यावयाचा म्हणजे केवळ धर्मशास्त्रें आणि वेदविद्या यांत दृष्ट होणारा इतिहास देऊन भागावयाचें नाहीं; तो केवळ ब्राह्मणी प्रयत्न होय. तथापि तो प्रयत्न अत्यंत महत्त्वाचा होता यांत शंका नाहीं. हिंदुस्थानांतील राजन्य वर्गानें या बाबतींत चांगलासा प्रयत्न केल्याचें दिसत नाहीं. जें ब्राह्मणी वाङ्मय नाहीं असें वाङ्मय म्हटलें म्हणजे बौद्धवाङ्मय; तें उत्तरकालीन आहे, आणि समाजघटनानिर्णायक क्रियांच्या स्पष्टीकरणास अनुपयुक्त असें आहे. शासनशास्त्रविषयक जे ग्रंथ झाले आहेत त्यांत देखील ब्राह्मणांचेंच महत्त्व दिसून येतें. शासनशास्त्रविषयक जो अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ आहे तो तर ब्राह्मणाचा म्हणजे चाणक्याचा होय. शुक्रनीतीमध्यें धर्मशास्त्रांतील अनेक मतांविरुद्ध बंड आहे. उदाहरणार्थ, न्यायासनावर ब्राह्मणांनींच बसावें ही जी धर्मशास्त्राची मागणी आहे तीविरुद्ध शुक्रनीति क्षत्रियांचा अधिकार सांगत आहे. शासनशास्त्रविषयक स्वतंत्र विचार व्यक्त करणारें क्षत्रियवाङ्मय फारसें अस्तित्वांत नाहीं. जें आहे तें केवळ ब्राह्मणी वाङ्मयाच्या मागणींत थोडा बहुत बदल करूं इच्छिणारें आहे.

समाजानें कसें चालावें याविषयीं जेव्हां विचार होऊं लागला तेव्हां वेदांकडे धांव घेण्यांत येऊं लागली आणि वेद हें धर्माचें आदिस्थान आहे अशी मांडणी होऊं लागली. तथापि वेदांचा धर्मशास्त्रापासून निराळेपणा सांगणारी मनुस्मृति ('श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः') देखील वेदांसच आद्यस्थान देती झाली. वेदांस समाजनियमनाच्या बाबतींत आद्यस्थान लोकांनीं दिलें यास कारण असें होतें कीं, जुनी परंपरा ज्यांत विधान पावली आहे असें दुसरें वाङ्मयच नव्हतें. आणि तें नसल्यामुळें नाखुषीनें वेदांस प्राधान्य द्यावें लागलें.

चारहि वेद संपल्यानंतरचा काल जर आपण घेतला तर आपणांस असें दिसून येईल कीं, चारहि वेदांच्या संहिता तयार होण्यापूर्वीच भारतीय समाजशास्त्राचे अत्यंत बिकट प्रश्न अगोदरच सोडविले गेले आहेत, आणि हिंदुसमाजाची रचना निश्चित स्वरूपावर आलेली आहे. ही रचना अनेक शतकें पुढें टिकली व तींत म्हणण्यासारखा समाजघटनेंत बदल पुढें झाला नाहीं. जर आपणांस भारतीयांची खरी समाजशास्त्रीय विद्या पहावयाची असेल तर ज्या काळांत वैदिक वाङ्मय तयार होत होतें व जमत होतें त्या काळाकडेसच संशोधक दृष्टीनें पाहिलें पाहिजे. वेदोत्तर काळांतील सामाजिक इतिहास हा वैदिक कालांत जीं सामाजिक तत्त्वें शिरलीं त्यांच्याच विस्तरणाचा इतिहास आहे. वैदिक कालांत ज्या सामाजिक क्रिया झाल्या त्या मुख्यतः येणेंप्रमाणें:–

(१) अनेक भिन्न संस्कृतींच्या समाजांचें एकीकरण करून एक सामान्य संस्कृति तयार करणें (२) आणि त्या संस्कृतीखालीं अनेक समाज येऊं शकतील आणि समाजविस्तारक क्रिया शक्य होईल असें समाजाचें व त्याच्या संस्कृतीचें स्वरूप बनविणें. हिंदूंच्या समाजशास्त्रामध्यें ज्या कांहीं महत्त्वाच्या गोष्टी आहेत त्यांमध्यें त्यांची समाजविस्तारक पद्धति ही एक महत्त्वाची गोष्ट आहे. जगांत पूर्वीं लहान लहान समाज चोहोंकडे होते तथापि त्या लहान समाजांस एकत्व आणणाऱ्या कांहीं क्रिया झाल्या; त्या क्रियांमध्यें राष्ट्रें तयार करणें व अनेकजनव्यापी संप्रदाय तयार करणें या क्रिया येतात. ख्रिस्त व महंमद यांच्या अनुयायांनीं अनेक लोकांत जें सादृश्य उत्पन्न केलें तें संप्रदायसंवर्धनाच्या क्रियेनें केलें. हिंदूंनीं अनेकजनव्यापि संप्रदाय उत्पन्न केला नाहीं असें नाहीं. त्यांनीं बौद्ध संप्रदाय उत्पन्न केला पण तो हिंदुस्थानांत यश पावला नाहीं, त्यास अन्यत्र यश आलें. तथापि अनेकजनव्यापी संस्कृति निर्माण करून त्या संस्कृतीचें आवरण अनेक लोकांवर पसरवून त्यांनां एक स्वरूप आणण्याची क्रिया हिंदूंनीं केलीच. जगास आत्मसदृश करण्याच्या क्रियेंत हिंदूइतकें यश कोणासच आलें नाहीं असें म्हटलें तर एका दृष्टीनें बरोबर होईल. वीस कोटी हिंदु प्रजेस एका संस्कृतिच्छत्राखालीं आणणें आणि त्या संस्कृतींत जो एक संप्रदाय उत्पन्न झाला त्याच्या छत्राखालीं आणखी तीस–चाळीस कोटी लोक आणणें ही क्रिया करणाऱ्या लोकांचें समाजशास्त्र जगांतील सर्व लोकांच्या समाजशास्त्रापेक्षां श्रेष्ठ प्रतीचें समाजशास्त्र होय असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. तर या जगांतील अत्यंत यशस्वी समाजशास्त्राचें बलाबल तपासलें पाहिजे. व्यापकतेच्या दृष्टीनें

जें समाजशास्त्र अत्यंत बलवान् ठरलें तेंच समाजशास्त्र दार्ढ्याच्या दृष्टीनें अगदीं दुर्बल ठरलें आहे हें देखील त्याबरोबरच कबूल केलें पाहिजे. आणि कांहीं अंशीं अत्यंत व्यापकपणामुळें सामाजिक दृढीकरण कठिण होत गेलें. अत्यंत भिन्न समाज एका छत्राखालीं आणल्यामुळें आणि तो देखील सक्तीनें न आणतां खुशीनें आणला गेल्यामुळें जो अत्यंत भिन्नस्वरूपी लोकांचा समुच्चय बनला आहे तो संघटित कार्य करण्यास असमर्थ झाला आहे अशीहि भीति आज पुष्कळांनां वाटूं लागली आहे. तथापि आपलें स्वतंत्र समाजविस्तारक तत्त्वज्ञान आणि व्यवहारपद्धति निर्माण करणारा हिंदुसमाज हा आपला प्रश्न आपल्या तऱ्हेनेंच सोडवील आणि आपल्या समजामध्यें दृढीकरणाची क्रिया उत्पन्न करील यांत शंका नाहीं.

हिंदूंचें अनेकजनव्यापीसमाज तयार करण्याचें कौशल्य आपण तपासूं लागलों तर आपण आश्चर्यानें थक्क होतों. जें परग्राहकत्व हिंदूंत नाहीं म्हणून बोभाटा आहे तें परग्राहकत्व हिंदूंत चांगल्या प्रमाणांत आहे असें दिसून येतें. हिंदूंमध्यें अनेक मानववंशांतील लोक आहेत. बंगालमधील हिंदूंमध्यें आर्यन् रक्ताच्या जाती फारच थोड्या आहेत व द्राविड व मंगोलियन रक्त बरेंच आहे असें दिसून येतें. तसेंच शिवपूजा व ब्राह्मणादर ही हिंदूंचीं लक्षणें धरलीं तर सयाममध्यें व पलीकडेहि बरेच लोक हिंदु आहेत ही गोष्टहि नजरेस येते. तर हा इतका समाज कोणत्या खुब्यांनीं सदृश झाला हें पाहिलें पाहिजे.

वेदकालांत समाजविस्तारक ज्या क्रिया केल्या किंवा झाल्या त्यांचीं अंगें येणेंप्रमाणें गोषवारतां येतील.—(१) जिंकणाऱ्या राजानें जितांच्या आचार्यास आपलें आचार्य बनविणें. (२) जुन्या कथांस देश्य लोकांच्या पूर्वजांशीं संबद्ध करून आपला धर्म त्यांच्याच पूर्वजांचा होता असें भासविणें. (३) व्रात्यस्तोमासारख्या विधींनीं, "निषादस्थपतिं यजेत" यासारख्या विधिवाक्यांनीं, यजनविशिष्ट धर्मास यजनकर्माच्या बाहेरील मंडळीस लायक करणें. (४) निरनिराळ्या परकीय राष्ट्रजातींस, ते एखाद्या ऋषीच्या द्वाड मुलांचे वंशज आहेत म्हणून काल्पनिक इतिहास त्यांनां चिकटवणें. (५) स्थानिक दैवतें, वाङ्मय यांचा स्वीकार करणें (६) व ही नवस्वीकाराची क्रिया नवीन उत्पन्न झालेल्या व पाखंडी समजल्या जाणाऱ्या संप्रदायाकडून होणें.

अनेकजनव्यापी समाज तयार करण्याची क्रिया ऋग्वेदांतील अत्यंत प्राचीन मंत्रांच्या कालापासूनच दृष्टीस पडते. वैदिक मंत्र ज्या लोकांत उत्पन्न झाले ते मांत्र लोक म्हटले म्हणजे दिवोदास व सुदास यांच्याबरोबर आलेले भरत लोक आणि सतलज नदीपर्यंत वसाहत केलेले देश्य लोक होत. या इतक्या लोकांमध्यें यज्ञपद्धति दिसून येते. तथापि त्यांत देखील बरेच फरक दृष्टीस पडतात. दिवोदासाची एक पद्धति अशी दिसत होती कीं, जो प्रदेश जिंकावयाचा असेल त्या प्रदेशांतील राजाचे गुरू ते आपले गुरू करावयाचे. जित व जेते यांचा मिलाफ करून एक समाज करण्याची ही अगदीं जुनी पद्धति असावी असें दिसतें.

मांत्र कालांतच एक मोठी सामाजिक क्रिया झालेली दिसते. जेव्हां वैदिक वाङ्मय प्रसवतच होतें तेव्हां देश्य आर्यन् लोकांस मांत्र संस्कृतीच्या आर्यन् लोकांनीं पूर्णपणें आत्मसात केलें व त्यांच्यांतीलच अनेक संस्कृत्यंगें घेऊन दोन्ही संस्कृतींची एक संस्कृति बनविली. ऋग्वेदामध्यें लिंगपूजकांचा "हे शिश्नास देव समजणारे" म्हणून उपहास केला आहे तर यजुर्वेदांतील अनेक संहितांत देश्य लोकांच्या देवांचा सत्कार केला आहे. पार्वती, षडानन, गणपति इतक्यांसह शिवदैवत स्वीकारलें आहे. तसेंच यज्ञसंस्थेंत प्राचीन वीरकथांस स्थान देऊन एकंदर सूतवाङ्मयाचा सत्कार केला आहे. तसाच नाग व सर्प यांचा देखील "वेद" मान्य केला आहे. अगदीं प्राचीन सूतवाङ्मय कोणत्या भाषेंत होतें हें सांगतां येत नाहीं. वैदिक भाषा ही एक तऱ्हेची प्राकृत भाषाच होती. तशीच अगदीं प्राचीन सूतवाङ्मयाची भाषा देखील एक तऱ्हेची प्राकृत असणें शक्य आहे. पाणिनीय संस्कृत हें ब्राह्मणें व उपनिषदें यांच्या संस्कृत भाषेशीं मिळतें आहे. सूतसंस्कृतीचें आद्यवाङ्मय पाणिनीय संस्कृत भाषेंत असेल असें संभवत नाहीं. तें कोणत्या तरी संस्कृतसदृश प्राकृत भाषेंत असेल. त्या सूतवाङ्मयावर जी ब्राह्मणी छटा पडली तीवरून असें दिसून येतें कीं, सर्व सूतवाङ्मयाची इतिहासपुराणें म्हणून जी आवृत्ति झाली त्या आवृत्तीमध्यें दोन क्रिया झाल्या; त्या क्रिया म्हटल्या म्हणजे तें वाङ्मय संस्कृत भाषेंत आणणें, तें वाङ्मय वैदिक संस्कृतीशीं संबद्ध करणें आणि त्या वाङ्मयांत ब्राह्मणाचें महत्त्व बिंबविणें. हें वाङ्मय तयार करतांना ब्राह्मणांनीं स्थानिक उपासना व विचारपद्धति ही आपली केली आणि व्यवस्थित केली. वेदांच्या संहिता झाल्या त्यावेळेसच वेदभाषा समजेनाशी झाली होती हें ज्या मंत्रांचा अर्थ विनियोगाला अनुकूल

नाहीं पण ज्या मंत्रांचा केवळ नाद विशिष्ट विनियोगांशीं सदृश दिसतो असे मंत्र यजुर्वेद संहितेंत आहेत अशा मंत्रांच्या संहितेंतील अस्तित्वावरून स्पष्ट होत आहे. "हे कोंबडया तूं गोड आवाजाचा आहेस" अशा अर्थाचा मंत्र ("कुक्कुटोसि मधुजिव्ह") कुटण्याकडे लावला आहे. यावरून त्यावेळेस वेदभाषा लोकांस अपरिचित झाली होती असें दिसून येतें. या मंत्राची भाषा ज्यांस पाणिनीय संस्कृत येत असेल अशा लोकांस न समजण्याइतकी गूढ नाहीं तथापि तसले मंत्र याज्ञवल्क्याच्या कालांत लोकांस न समजण्याइतकी लोकांची भाषा बदलली असावी. "कुक्कुटोसि मधुजिव्ह" या एका मंत्रावरून लोकांची भाषा बदलली होती असा निर्णय काढण्याचें धैर्य आम्हांस होतें याचें कारण असें आहे कीं, हा कुटण्यासाठीं घातलेला मंत्र या संहितेंत नवीन आहे. याज्ञवल्क्य हा यज्ञविषयक नवीन संप्रदाय काढणारा तर त्यास विशेष जपून वागावयास हवें होतें. त्यास श्रौती आपली ही चूक बाहेर काढील अशी भीति यत्किंचितहि न वाटण्यास आपली चूक सामान्यास समजणार नाहीं, याज्ञिक तेवढे समजतील पण त्यांना बिचकण्याचें कारण नाहीं; कारण नवे याज्ञिक आपल्या तर्फेचे आणि जुन्या याज्ञिकांस ते मत्सरी व ते आम्हांस विनाकारण नांवें ठेवतात अशी बतावणी आपणांस सहज करतां येईल असें याज्ञवल्क्यास वाटत असलें पाहिजे.

परकीयांस स्वसदृश करावें आणि त्यांस आपल्या समाजाचें सदस्य करावें म्हणून जी चळवळ झाली तींत व्रात्यस्तोमास महत्त्वाचें स्थान दिलें पाहिजे. हा विधि कीकटांत उत्पन्न झाला. तेथील लोक मांत्र संस्कृतीच्या लोकांपेक्षां भिन्न होते. हे शक असावेत. आणि त्यांचे उपाध्याय मग असावेत. या कीटकांतील मगंद (मगांस धन देणारे) लोक "इंद्रा तुला पायस देत नाहींत तर त्यांचें धन लुटून तूं आम्हाला दे" अशी प्रार्थना विश्वामित्र करता झाला. त्याच मगधातील लोकांस उभें जाळावें म्हणून आदेश यजुर्वेदांतील पुरुषमेध करतो, तर अथर्ववेदांत या मगधांतील व्रात्यांचा सत्कार करा, तेहि ब्रह्म आहेत आणि त्यांना चातुर्वर्ण्यांत स्थान द्या म्हणून सांगणारीं सूक्तें आहेत. व्रात्यस्तोमाचा विधि तांड्यब्राह्मणांत आणि लाट्यायनसूत्रांत आलेला आहे. त्या विधींत व्रात्याचे जुने कपडे काढून त्यांस आर्यांचे कपडे देण्याचा विधि आहे. व्रात्यस्तोम झाला म्हणजे व्रात्य याची त्याच्या पूर्वीच्या समाजांत जी पदवी असेल त्याप्रमाणें त्याचें स्थान नवीन समाजांत उत्पन्न होई. अर्थात प्राचीनांच्या स्वसमाजविस्ताराच्या पद्धतींत व्रात्यस्तोम हा महत्त्वाचें स्थान असलेला विधि होता. आर्यन् लोकांनां हिंदुस्थानांत अनेक असंस्कृत जाती आढळल्या. त्या जातींविषयीं नवीन आलेल्या आर्यन् लोकांस असलेली जुगुप्सा काढावयाची होती व त्याचप्रमाणें या देश्य जातींचा वैदिक परंपरेशीं संबंध चिकटवावयाचा होता हें काम कांहीं काल्पनिक कथांनीं केलें. आंध्रादि कांहीं जातींनां ब्राह्मणांतून विश्वामित्र पुत्र केलेलें आहे. या प्रकारच्या काल्पनिक इतिहासाकडे लक्ष गेल्यामुळें रमेशचंद्र दत्तासारख्या भोळसर लेखकास प्राचीन ग्रंथकारांच्या इतिहासाभिज्ञतेच्या अभावावर टोला मारण्याची हुक्की वारंवार येत आहे पण खरोखर पाहिलें असतां या काल्पनिक कथांनीं समाजाच्या एकीकरणाचें काम बरेंच केलें. म्हणजे इतिहास या दृष्टीनें ती कथा जरी चुकली होती तरी समाजशास्त्रीय प्रयत्नाच्या दृष्टीनें त्या कथेसारखीं स्पष्टीकरणें बरोबर होत.

नवीन लोकांस आपणांमध्यें समाविष्ट करण्याची जी क्रिया झाली ती आपण सूक्ष्मपणें पाहूं गेलें असतां ती त्यावेळच्या पाखंडी लोकांकडून झाली असें दिसेल. वेदकालांतील जबर पाखंडी म्हटले म्हणजे याज्ञवल्क्य व त्याचे अनुयायी शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण होत. हे त्यावेळचे आर्यसमाजी होत असें म्हटल्यास हरकत नाहीं. याज्ञवल्क्यानें नवीन संप्रदाय स्थापन केला व त्यांत अनेक असे अनुयायी मिळविले कीं ज्यांनां आपली आईच ठाऊक आहे आणि बाप ठाऊक नाहीं. त्या मंडळीचे वंशज पुढें ब्राह्मण झालेच पण त्यांचा प्रवेश जुन्या ब्राह्मणांत विवाहदृष्ट्या कधीं झालाच नाहीं (वेदविद्या, पृ. २२०). हें त्यांच्यामध्यें बाप ठाऊक नसलेली मंडळी असल्यामुळें झालें असें मात्र नाहीं. कारण तसली मंडळी शुक्लयजुर्वेद्यांत शिरली आणि ऋग्वेद्यांत शिरली नाहींत असें नाहीं. ऋग्वेद्यांत देखील "क्षेत्रप्रधान" आचार्य होतेच. खुद्द ऋग्वेद्यांचा जो ब्राह्मणग्रंथ शिल्लक आहे त्याचा कर्ता "ऐतरेय" म्हणजे "इतरेचा मुलगा" आहे. याज्ञवल्क्याच्या अनुयायांस जें निराळेपण आलें तें लेकवळे आपल्यांत समाविष्ट केल्यानें आलें नाहीं, तर त्यांच्या मतामुळें, यज्ञविषयक भिक्षुकीच्या भांडणांमुळें, याज्ञवल्क्याच्या एकंदर दंडेली स्वभावामुळें आणि देश्य संस्कृतीविषयीं आणि शूद्रांविषयीं जी त्यांनीं उदार वृत्ति ठेवली त्यांमुळें आलें. यज्ञसंस्था जोंपर्यंत जिवंत होती

तोंपर्यंत ऋत्विजांच्या वर्गांत नवीन लोक शिरतच होते. केवळ बुद्धीच्या योगानें उपजीविका करणाऱ्या लोकांमध्यें जो वर्ग शिरावयाचा तो जमीनदार किंवा घरंदाज लोकांचा वर्ग थोडाच शिरतो? तो हुशार पण दरिद्री असा वर्ग शिरावयाचा आणि त्यामुळें ज्या लोकांनां वडिलोपार्जित द्रव्याचा अंश लेकवळेपणामुळें मिळाला नसेल अशा मंडळींतल्या कांहीं व्यक्ती ऋत्विजाच्या धंद्याकडे वळल्या असल्या तर नवल नाहीं. अनेक जैन साधू व ग्रंथकार ब्राह्मण विधवांचीं मुलें आहेत. ऋग्वेदी मंडळींच्या मनांत असल्या लेकवळ्यांनां ऋत्विजाचें शिक्षण देऊन ऋत्विज म्हणून स्वीकारण्यास संकोच उत्पन्न होऊं नये म्हणून त्या प्रकारच्या प्रजेचें समर्थन करण्यासाठीं ऐतरेयानें कवष ऐलूषाची कथा सांगितली आहे [ ऐ. ब्रा. २ ११; वेदविद्या पृ. २३७ पहा ].

सर्वलोकव्यापी सांस्कृतिक चळवळ सुरू करण्यापूर्वी जो चळवळ करणारा वर्ग असेल त्यांतील द्वैतें नाहींशीं होऊन एक सामान्य संस्कृतीचा वर्ग तयार होण्याची क्रिया व्हावी लागते. ती क्रिया जर झाली नाहीं तर जी संस्कृति पसरवावयाची ती संस्कृतीच उत्पन्न होणार नाहीं. वेदकालाच्या अगदीं प्रारंभींच्या भागांत ही अडचण होतीच, पण ती अडचण प्राचीनांनीं सोडविली. वैदिक धर्म अगदीं बाल्यावस्थेत होता तेव्हां यज्ञसंस्था अशी स्थापन झाली नव्हती. प्रत्येक कुटुंबांत कांहीं स्तोत्रें होतीं तर त्या स्तोत्रांचें एकीकरण होणें आणि निरनिराळे याजकांचे संप्रदाय असणें या क्रिया समाजविस्तारास बाधक होत्या. वैदिक कुलांचा असा एक धर्म नव्हताच. प्रत्येक कुलाचे मंत्र निराळे, दैवतें निराळीं. तर अशा प्रसंगीं धर्माचें एकीकरण होईल तरच तो धर्म प्रसारक्षम होईल. तर धर्माच्या एकीकरणास ज्या क्रिया कारण झाल्या त्याच क्रिया धर्माच्या प्रसारास कारण झाल्या असें म्हणतां येईल. त्या सर्व क्रियांचें सविस्तर वर्णन 'वेदविद्या' व 'बुद्धपूर्व जग' या विभागांत दिलेंच आहे. तथापि त्यांचें सिंहावलोकन येथें उपयुक्त होईल म्हणून तें देत आहें.

लोकांचे भिन्न आचार व वाङ्मय हीं सर्व एकत्र करून यज्ञसंस्था सर्वसामान्य करण्याचा प्रयत्न प्रथम झाला. मोठमोठे सोमयाग होऊं लागले तेव्हां निरनिराळ्या ठिकाणचे स्थानिक यज्ञसंप्रदाय बंद पडून सर्वसामान्य यज्ञपद्धति निघाली. ती यज्ञपद्धति तयार करतांना पुरोहिताच्या धंद्यांतल्या सर्व लोकांचा संग्रह व्हावा असा प्रयत्न झाला. सर्वांचीं स्तोत्रें एकत्र केलीं गेलीं व मोठमोठ्या संहिता बनल्या. निरनिराळ्या यज्ञसंप्रदायांत जीं ऋत्विजांचीं निरनिराळीं नांवें उत्पन्न झालीं होतीं तीं नांवें कायम ठेवून कांहीं ऋत्विजांस दुसऱ्यांचे साहाय्यक बनविलें. त्रैविद्य (ऋग्वेदी, सामवेदी व यजुर्वेदी) व अथर्वे यांच्यांत स्पर्धा असे व अथर्व्यांस नामशेष करण्याचाहि प्रयत्न चालू होता. पण शेवटीं अथर्वे देखील त्रैविद्यांच्या मोठ्या यज्ञांच्या पद्धतींत समाविष्ट झाले व येणेंप्रमाणें सर्वसामान्य वाङ्मय व सर्वसामान्य यज्ञसंस्था हीं तयार झालीं.

वेदकालांतच घरोघरचें अग्निहोत्र बंद पडलें, मोठे यज्ञ सुरू झाले आणि सामान्य जनांचें कर्तव्य मोठ्या सुरू असलेल्या यज्ञास पैशांची मदत करावी एवढेंच उरलें. या परिस्थितीचा वाङ्मयविषयक आणि कर्मविषयक एकीकरणाचा परिणाम झाला. तथापि वैयक्तिक कर्मलोपामुळें देखील महत्त्वाचा परिणाम झाला. कर्मलोपामुळें यज्ञसंस्था असलेले लोक व नसलेले लोक यांत फरक कमी कमी होत चालला व ही गोष्ट सर्व लोकांच्या एकीकरणास कारण झाली. मांत्र व सूत या संस्कृतींच्या म्हणजे जुन्या आर्यन् लोकांस व नव्या लोकांस करावयाचें कर्म एकच उरलें आणि तें म्हटलें म्हणजे पैसा देणें हें होय. या फरकाचा समाजघटनेवर जो मोठा परिणाम झाला त्यांत भाषेवरहि झाला व तो आज दिसून येत आहे. वर्ण हा शब्द वैदिक कर्मभेदामुळें म्हणजे यजनभेदामुळें भिन्न दिसणाऱ्या वर्गांनां न लागतां पुढें लौकिक कर्मभेदामुळें भिन्न दिसणाऱ्या वर्गांनां लागला.

ऋग्वेदाच्या काळांत ब्राह्मणादि चारहि वर्ग होते पण त्यांस वर्ण ही संज्ञा नव्हती. वर्ण हा शब्द आर्य व दास या दोन वर्गांनां लावीत असत. कालांतरानें हा शब्द ब्राह्मणादि चार वर्गांनां लागूं लागला. तर असा बदल होण्याचें कारण काय? वर्ण या शब्दानें जी कल्पना व्यक्त होत होती ती पालटली कीं काय ? शब्दाच्या अर्थांत जें स्थित्यंतर झालें तें समाजामधील कोणत्या स्थित्यंतरामुळें झालें ? ज्या लोकांनीं शब्दाचें अर्थांतर केलें त्यांच्या मनांत कांहीं सामाजिक कल्पना होत्या काय? याविषयीं विचार करतां त्यावेळेची बदलत जाणारी स्थिति लक्षांत येते. आर्यांचें लक्षण यजनशीलता आणि दासांचें लक्षण म्हटलें म्हणजे त्याचा अभाव. जर केवळ यजनशीलतेमुळेंच दोन प्रकारच्या व्यक्तींत भेद मानावा असें तत्त्व ठरलें व ग्राह्य झालें

तर ज्या वर्गांतील यजनशीलता नाहींशी होन जाईल तो दास वर्ण ठरूं लागेल. पण समाजामध्यें असें स्थित्यंतर होऊं लागलें होतें कीं, चांगल्या लोकांतीलच घरोघरचें अग्निहोत्र नाहींसें होऊन केवळ धंदेवाईकांनीं ऋत्विजाचें कर्म करावें आणि कोणी तरी म्हातारपणीं अग्निहोत्र घ्यावें, व सामान्य लोकांनीं चालू यज्ञांत दक्षिणा दिली म्हणजे त्यांचें कर्तव्य आटोपलें. शिवाय यजन हा जसजसा धंदा होऊं लागला तसतशी निषादस्थपतींस देखील यज्ञविषयक कर्म करण्यास अधिकार देण्याकडे प्रवृत्ति झाली. तेव्हां केवळ यजनकर्मावरून समाजाचे वर्ग पाडणें अयोग्य होऊं लागलें. कारण आर्यन् समाजाचा बहुतेक वर्ग यज्ञ न करणारा आणि चालू यज्ञांत दक्षिणा देऊन आपलें कर्तव्य आटोपलें असें समजणारा आणि निषाद देखील यज्ञ करण्यास अधिकारी; अशा स्थितींत आर्य आणि दास हा फरकच नाहींसा झाला आणि वर्ण हा शब्द निरुपयोगी होऊं लागला. त्याच स्थितींत ब्राह्मणादि वर्गास समुच्चयवाचक सामान्य शब्द नव्हता. कां कीं यापैकीं प्रत्येक शब्द समुच्चयवाचक असल्यामुळें कदाचित सर्वांस लागू पडणाऱ्या वर्गवाचक शब्दाची बराच काळ गरजहि लागली नसावी. वर्ण हा शब्द इतर संहितांतून पुढें येत नाहीं. तर तो एकदम धर्मशास्त्रांत दृष्टीस पडतो. त्यांनीं हा वैदिक शब्द निराळ्या अर्थानें उपयोगांत आणला.

एवंच वेदांच्या संहितीकरणामुळें आणि त्याबरोबर विकास झालेल्या यज्ञसंस्थेमुळें, आणि यज्ञकर्म धंदेवाईकांच्या हातांत गेल्यामुळें सर्वजनमान्य वाङ्मय तयार झालें. वाङ्मयाचा अभ्यास करून त्यावर उपजीविका करणारी आणि सर्वत्र आपल्या विद्येचें महत्त्व सांगणारी जात तयार झाली. लोकांतील यजनविषयक भेद नाहींसा झाला व ब्राह्मणांनीं यजन करावें व इतरांनीं ब्राह्मणांकडून यजन करवावें अशी परिस्थिति झाली आणि त्या वाङ्मयांत सूतवाङ्मयासहि स्थान मिळाल्यामुळें राष्ट्रीय संस्कृति तयार झाली.

समाजामध्यें अनेकजनव्यापी संस्कृति तयार करण्याचें काम झालें तरी जो मोठा जनसमूह झाला त्याच्या दृढीकरणाचें काम व्हावयाचें होतें. आणि तें काम पुढें हळू हळू सुरूहि होतें. ब्राह्मण चोहोंकडे पसरले आणि त्यामुळें प्रत्येक ठिकाणीं समाज ब्राह्मणयुक्त झाला. जेथें ब्राह्मण जात तेथें इतर लोकांचें क्षत्रिय, वैश्य, शूद्र या तीन वर्णांत वर्गीकरण करण्याचें आणि त्या प्रकारच्या वर्गीकरणावर पुस्तकें लिहिण्याची क्रिया व्हावयास हवी होती व ती पुढें झालीहि. हें पुढचें काम धर्मशास्त्रांनीं व पुराणांनीं केलें. जेथें ब्राह्मण जात त्यांनीं तेथील राजास क्षत्रिय संस्कार करावेत आणि तेथील राजांस त्या संस्कारांमुळें हिंदुस्थानांतील राजांच्या तोडीचें करावें ही क्रिया चालूच होती. ही क्रिया करतांना त्यांचा प्रसार जर जगभर झाला असता तर जगभर हिंदु समाज स्थापन झाला असता. ही क्रिया नाहीं तरी बराच प्रदेशभर झाली आणि तो प्रदेश म्हटला म्हणजे इराणपासून इंडो-चायनापर्यंतचा मुलूख होय. इतक्या व्यापक प्रदेशाचें एकत्व ग्रीकांनीं पाहिलें होतें. आणि यासाठीं त्यांनीं गंगा नदी ही हिंदुस्थानची मध्य रेषा धरून गंगेच्या अलीकडचा इंडिया आणि गंगेपलीकडचा इंडिया अशी विभागणी केली होती. अजूनहि त्या भागास इंडो-चायना अथवा फरदर इंडिया म्हणजे पलीकडचा हिंदुस्थान हें नांव आहे.

धर्मशास्त्रकारांचा काल वैदिक वाङ्मयाच्या कालापुढचा होय. धर्मशास्त्रकारांनां मोठमोठे प्रश्न सोडवावयाचे नव्हते. ते अगोदरच सुटलेले होते. पौराणिक कल्पना, उपनिषदांतील विचार हीं सर्व स्थापित झालेलीं होतीं आणि या वेळेस समाजामध्यें स्थिर आयुष्यक्रम उत्पन्न झालेला होता. आणि राष्ट्रशासनास उपयोगी असें जरी वाङ्मय त्यांस उत्पन्न करतां आलें नाहीं तरी अव्यवस्थित व अत्यंत भिन्न आयुष्यक्रमांनां कांहीं सर्वसामान्य रीतींच्या नियमाखालीं आणण्याची क्रिया चालू होती.

धर्मशास्त्रीकरणामध्यें समाजाचें समाजशास्त्रीय ज्ञान दृष्ट होतें. जो समाज आत्मशासनक्षम असतो त्याची कायदेपद्धति पाहिली म्हणजे त्या समाजाचें समाजशास्त्रीय ज्ञान कितपत उच्च प्रकारचें आहे हें दिसून येतें. राजे लोकांनीं शासननियम करावेत हें तत्त्व फार उशीरा जगांत मान्य झालें आहे. जेव्हां नवीन नियम करण्याचा कोणास अखत्यारच नाहीं, जसा धर्म किंवा "लॉ" असेल तसाच अमलांत आणणें राजाचें कर्तव्य असेल तेव्हां धर्मशास्त्रांत सुधारणा करीत जाणें हें लेखकांवरच पडतें. या दृष्टीनें धर्मशास्त्रकारांचें समाजांत महत्त्व असतें. भारतीयांच्या समाजशास्त्रीय ज्ञानाची किंमत ठरवावयाची तर हे धर्मशास्त्रच त्यांनीं कसें वाढविलें, त्यांत सुधारणा त्यांनीं कितपत केली हें पाहिलें पाहिजे. आणि या दृष्टीनें भारतीयांच्या धर्मशास्त्रदृष्ट

समाजनियमनशास्त्रांत बरींच प्रगतिचिन्हें दिसून येतात. धर्मशास्त्रांकडे समाजशास्त्रदृष्टीनें अवलोकन करूं लागलें असतां असें दिसून येतें कीं, भारतीयांचें धर्मशास्त्रविकासकालीन समाजशास्त्र बरेंच उच्च तऱ्हेचें होतें.

**धर्मशास्त्र आणि जैमिनि**—जैमिनीनें वेदांचें नित्यत्व आणि चोदनापरत्व जरी आग्रहानें सिद्ध केलें तरी त्यामुळें तो समाजाच्या प्रगतीच्या विरुद्ध होता असें दूषण त्यास देतां येणार नाहीं. त्यानें उलट समाजाच्या व्यावहारिक धर्मास स्वातंत्र्य दिलें. तो श्रौतक्रिया म्हणजे तीन अग्नींवरील करावयाची यज्ञक्रिया हाच कायतो धर्म समजे. बाकी इतर गोष्टी त्याच्या मतें केवळ व्यवहार होत्या. त्या गोष्टींमध्यें वेदांचें बंधकत्व त्याच्या दृष्टीनें नव्हतेंच. यज्ञ करावयाचा झाल्यास तत्संबद्ध क्रिया मात्र जशा श्रुतींत सांगितल्या असतील तशा करा, इतर बाबतींत वेदांकडे जाण्याचें कारणच नाहीं, त्या सर्व व्यवहार होत, त्या तुम्हीं आपल्या हिताहिताच्या दृष्टीनें करा अशी त्याच्याकडून मोकळीक होती. म्हणजे ज्यास आपण धर्मशास्त्र म्हणतों त्या धर्मशास्त्राच्या बाबतींत जैमिनीनें अत्यंत स्वातंत्र्य दिलें होतें.

**धर्मशास्त्रकारांची प्रगमनशीलता**—ही आपणांस वारंवार दिसून येते. जसा काळ बदलेल तसा नवीन नियम सांगावा इत्यादि क्रिया धर्मशास्त्रांत फारच झाल्या आहेत. उत्तरकालीन धर्मशास्त्रकार कांहीं सामाजिक बाबतींत समाजास विनाकारण जास्त जखडते झाले आहेत हें खरें. उदाहरणार्थ, लग्नाच्या बाबतींत वर्णविषयक नियम त्यांनीं जास्त संकुचित केले, तथापि एकंदरींत त्यांच्यामध्यें प्रगमनशीलता होती ही गोष्ट लपत नाहीं. त्यांनीं ज्या विषयावर धर्मशास्त्रांत कांहीं नियमच नव्हते अशा अनेक विषयांवर धर्मशास्त्रांत नियम घातले आहेत. बौधायन, वसिष्ठ इत्यादि जुन्या धर्मशास्त्रकारांचे विवेचनविषय आणि मनु, याज्ञवल्क्य, बृहस्पति व नारद यांचे विवेचनविषय यांमध्यें जें अंतर दिसून येतें तें मुख्यत: असें आहे कीं, अधिक उत्तरकालीन धर्मशास्त्रकार आपले विवेचनविषय अधिक व्यापक करीत आहेत.

हिंदूंच्या धर्मशास्त्रांत जो एक विशेष भाग उत्तरोत्तर वाढत चाललेला दिसतो तो हा कीं, त्यांच्यामध्यें सोंवळ्या-ओंवळ्याचे नियम एकसारखे वाढत चालले आहेत. हा परिणाम कशाचा असा विचार करतां असें म्हणावें लागेल कीं, कांहीं अंशी शौचधर्मविषयक नियम हा खरोखर समाजविकास आहे. आरोग्यविषयक स्थिति चांगली रहावी म्हणून स्पर्शास्पर्श विचार जगांत वाढतच आहे. तथापि हा विचार वाढत असतां लोकांचें आरोग्यशास्त्रच जर प्रगत झालें नाहीं तर मात्र ते नियम आरोग्यशास्त्राचे न राहतां केवळ विचार न करतां मानावयाचे आणि तत्त्व बाजूस ठेवून बाह्यस्वरूप तेवढें पाळावयाचे विधी बनतात. समाजाच्या शौचधर्मविषयक भावना वाढल्या पण शुचि किंवा अशुचि सांगणारें शास्त्र वाढलें नाहीं म्हणजे वेडा स्पर्शास्पर्शविचार समाजांत बोकाळतो. स्वच्छ किंवा अस्वच्छ हें न पाहतां शूद्रस्पृष्ट किंवा ब्राह्मणस्पृष्ट हा विचार उत्पन्न झाला, आणि उत्तरकालीन धर्मशास्त्रांचे ग्रंथ याच कारणामुळें तिरस्करणीय झाले आहेत.

धर्मशास्त्राचें वाङ्मय पुष्कळच आहे. त्या सर्व वाङ्मयांतील सर्व सामाजिक तत्त्वें येथें मांडण्यास अवकाश नाहीं. तथापि धर्मशास्त्रांतील एकच ग्रंथ घेऊन त्यांत समाजशास्त्राची काय स्थिति दृष्टीस पडते हें पाहूं गेल्यास काम जरासें कमी होतें. यासाठीं धर्मशास्त्रावरील अत्यंत व्यापक ग्रंथ जो मनुस्मृति त्यांत येणाऱ्या सामाजिक विचारांपैकीं कांहीं मुख्य विचारांकडे लक्ष ओढणें ही क्रिया येथें करतों.

**धर्माधर्मनिश्चयाचें साधन**—धर्म किंवा अधर्म हें ठरवावयाचें कशा वरून? या प्रश्नाचें मनुस्मृति उत्तर देत आहे तें असें कीं, "ज्याचा परिणाम सुखांत होतो तो धर्म", आणि "ज्याचा परिणाम दु:खांत होतो तो अधर्म".धर्माधर्मविवेक हा कर्मांच्या विवेचनासाठीं पाहिजे आहे. म्हणजे सुख कशानें होतें व दु:ख कशानें होतें हें पाहूनच कर्म चांगलें कीं वाईट हें ठरविलें पाहिजे (अध्याय १ श्लोक २६). या बाबतींत मनुस्मृतीचें वचन अगदीं अर्वाचीन लोकांसहि मान्य होणारें आहे. सुखदु:खविचार जसजसा अधिकाधिक सूक्ष्म होत जाईल तसतशी धर्माधर्मविवेकांतहि सुधारणा झाली पाहिजे हें कोणीहि मान्य करील.

**धर्माचरण हें स्वाभाविक कीं प्रयत्नमूलक**—प्राचीन धर्मशास्त्राच्या मूळ कल्पनांतील हें वचन जरी सर्वमान्य झालें तरी प्राचीनांच्या अनेक कल्पना मान्य होण्याजोग्या नाहींत. उदाहरणार्थ, प्रत्येक प्राणिमात्राच्या ठायीं कांहीं गुण प्रजापतीनेंच नियुक्त केले आहेत

त्याप्रमाणेंच धर्माचरण व अधर्माचरण नियुक्त केलें आहे हें वचन घ्या.

हिंस्राहिंस्रे मृदुक्रूरे धर्माधर्मावृतानृते
यद्यस्य सो दधात्सर्गे तत्तस्य स्वयमाविशत् (१. २९)

प्रस्तुत श्लोकांत स्मृतिकर्त्यांनें जो घोंटाळा केला आहे तो असा—हिंस्रपणा किंवा अहिंस्रपणा, मृदुता किंवा कठोरता हे गुण जसे स्वाभाविक आहेत तसेच धर्मानें वागणें किंवा अधर्मानें वागणें; सत्यानें वागणें किंवा असत्य आचरणें हे गुण स्वाभाविक आहेत असें त्यानें धरलें आहे. कांहीं व्यक्तींचा किंवा जातींचा असत्यानें वागणें किंवा अधर्मानें वागणें हा धर्मच आहे असें सांगणें अत्यंत भयंकर तत्त्व आहे. तसें सांगितल्यानें, त्यांच्यासाठीं धर्मविवेचनाचा प्रश्नच उरत नाहीं. खरोखर वस्तुस्थिति अशी आहे कीं, सत्यानें आणि धर्मानें वागण्याचे गुण हे मनुष्यांत शिक्षणानें व अभ्यासानें त्याचप्रमाणें ज्ञानविकासानें वाढत असतात. तथापि या प्रकारचा अनुभव ज्या प्राचीनांस नव्हता त्यांस असें वाटणें स्वाभाविक आहे कीं, धर्मानें किंवा सत्यानें वागण्याचा गुण देखील स्वाभाविक आहे. हेंच तत्त्व अधिक स्पष्ट करण्यासाठीं पुढील श्लोकांत असें उदाहरण घेतलें आहे कीं, ज्याप्रमाणें ऋतु ऋतुपरत्वें, आम्रादींच्या ठायीं मंजरीसारखीं चिन्हें धारण करतात त्याचप्रमाणें देही आपले अंतर्भूत गुण व्यक्त करतो (१. ३०).

प्रयत्नानें मनुष्यास उच्च नैतिक आचरण करतां येतें व धर्मानुचरण उत्पन्न होतें या गोष्टी प्राचीनांस पारख्या होत्या अशांतला भाग मुळींच नाहीं. कारण तसें असतें तर नीति व धर्म यांच्या प्रवचनाची आवश्यकताच नव्हती. ज्याअर्थी ते त्यावर इतके परिश्रम करीत त्याअर्थी उपदेश व शिक्षण यांचें महत्त्व ते ओळखीत होते. असें असतां वरील प्रकारची त्यांची कल्पना होण्याचें कारण येणें प्रमाणें दिसतें.—"धर्म" या शब्दाचा एक अर्थ वस्तूच्या अंतर्गत स्वाभाविक गुण असा आहे. व "धर्म" याचा दुसरा एक अर्थ कर्तव्यकर्म असा आहे. वस्तूंचें बाह्य कर्म हा वस्तूंच्या अंतर्गत जे गुण असतील त्यांचाच विकास आहे अशीहि कोणी मांडणी केली तरी ती चूक होणार नाहीं. असें असतां ज्या कनिष्ठ जाती आपला आयुष्यक्रम सोडीत नाहींत त्यांचा तो धर्म आहे असें वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. अनेक असंस्कृत जाती व समाजांतील कनिष्ठ वर्ग, अत्यंत निकरानें प्रयत्न करणारे व अत्यंत अल्प फल अपेक्षिणारे जे युरोप व अमेरिकेंतील समाजसुधारक आहेत त्यांनां त्यांच्या आयुष्यक्रमांत पालट करण्याच्या बाबतींत जर निराश करतात तर प्राचीनांस असें वाटणें शक्य आहे कीं, चोरी करणें व अधर्माचरण हा पुलिंद, बर्बर इत्यादि जातींचा धर्म म्हणजे स्वभाव आहे. पण त्याचा अर्थ चोरी व अधर्माचरण हा त्यांचा धर्म म्हणजे कर्तव्य कर्म आहे असा धर्मशास्त्रकारांचा आशय मुळींच नाहीं. जर या जातींच्या अंगांत असा "धर्म" आहे तर तो उत्पन्न कसा झाला? तर धर्मशास्त्रकार याचें असें स्पष्टीकरण करील कीं तो त्यांच्यांत परमेश्वरी संकल्पानें तद्विषयक गुण शिरून उत्पन्न झाला. या तऱ्हेची एकदां समजूत झाली म्हणजे ती समाजांतील अधिक अभागी वर्गाच्या उन्नतीस अपकर्षक आहे यांत शंका नाहीं.

**धर्माचा युगानुयुग लोप**—धर्म पूर्वी चतुष्पाद होता. पण तो कलियुगांत एकपाद उरला आहे (१. ८१. व पुढें) असें जें धर्मशास्त्रकारांनीं मांडलें आहे त्याचें स्पष्टीकरण फारसें कठिण नाहीं. आपले पूर्वज आपल्यापेक्षां अधिक चांगले होते व गेला दिवस सोन्याचा होता अशा तऱ्हेची इतिहासाविरुद्ध विचारसरणी प्रत्येक लोकांत आढळून येते, त्याचाच हा प्रकार आहे. तथापि यापुढें जें युगधर्मविवेचन आहे तें अधिक चौकशी करावयास लावतें.

**धर्माची कालपरत्वें भिन्नता**—निरनिराळ्या कालांत धर्माचें स्वरूप निरनिराळें आहे असें धर्मशास्त्रकारांनीं तत्त्व वारंवार मांडलें आहे (मनु. १. ८५–८६). त्यांत कृतयुगीं तप, त्रेतायुगीं ज्ञान, द्वापारयुगीं यज्ञ आणि कलियुगीं दान अशी मांडणी केली आहे (१. ८६). या मांडणीचा आपणांस विचार करणें प्राप्त आहे. कारण यांत प्राचीनांची समाजविकासाची कल्पना व्यक्त झाली आहे.

द्वापारयुगांत यज्ञ हाच धर्म होता व कलियुगांत दान हाच धर्म उरला आहे असें जें सांगितलें आहे ती गोष्ट त्यांच्या समोरचीच होती. द्वापारयुगांत म्हणजे कुरुयुद्धापूर्वी यज्ञसंस्था जोरानें चालू होती. व तेव्हांपासून ती लोपावयास लागली होती ह्या गोष्टी त्यांच्या आठवणींतल्या होत्या एवढेंच नव्हे तर कांहीं अंशी त्या फरकाकडे मनुस्मृतिकालीन ब्राह्मण खेदयुक्त दृष्टीनें पहात असत. लोक पूर्वी ब्राह्मणांकडून यज्ञ करवीत आणि आतां करवीत नाहींत याबद्दल त्यांस दुःख होत असावें. आतां प्रश्न असा उरतो कीं ज्ञानधर्म आणि तापसधर्म

यांस मनुस्मृतीनें व पौराणिकांनीं ऐतिहासिक पूर्वता कां दिली ? याविषयीं स्पष्टीकरण आमच्या मतें अगदीं सोपें आहे. धर्मशास्त्रें व पुराणें हें सरस्वतीच्या पूर्वेकडील प्रदेशाचें वाङ्मय आहे. धर्मशास्त्रांवर वेदांपेक्षां इतिहास पुराणवाङ्मयाचाच परिणाम अधिक झाला आहे.

वैदिक वाङ्मयाचें संहितीकरण आणि इतिहास-पुराणवाङ्मयाची जपणूक या क्रिया झाल्या त्या वैदिक वाङ्मयाची उत्पत्ति ज्या पंजाबांत झाली त्या स्थानीं झाल्या नाहींत तर मध्य देशांत झाल्या. आणि पंजाब-म्हणजे पंचनददेश हा असंस्कृत स्थितींत राहिला. या पंचनदांतील निरनिराळ्या भागांस मद्र, आरट्ट आणि वाहिक इत्यादि नांवें होतीं आणि हा देश अधर्माचा म्हणून भारतरचनाकाळीं विख्यात होता हें कर्ण मद्र-राज शल्याच्या उखाळ्या पाखाळ्या काढतांना सांगतो. या मध्य देशाचा इतिहास पाहूं गेलें असतां असाच सांपडेल कीं सूतवाङ्मय हें त्यांचें प्रथमवाङ्मय होतें, आणि वैदिक वाङ्मय हें त्यांचें नंतरचें वाङ्मय व वैदिक धर्म म्हणजे श्रौत--धर्म म्हणजे यज्ञयागादि धर्म देखील उत्तरकालीन होय. या मध्यदेशीय लोकांचा अगोदरचा धर्म पुराणांत दाखविला आहे. त्यांचे प्राचीन ऋषी पुराणांत यज्ञ करतांना दिसत नसून तपश्चर्या करतांना दिसतात. सूतसंस्कृतीमध्यें तपश्चर्येकडून ज्ञानमार्गाकडे लोक वळत होते. अशा स्थितींत पश्चिमेकडून वैदिक धर्म आला हें स्थित्यंतर ज्यांनीं पाहिलें त्यांनां असें वाटणें स्वभाविक आहे कीं, अगदीं पहिला परमार्थ-साधनाचा मार्ग म्हटला म्हणजे तापसमार्ग, नंतरचा ज्ञानमार्ग, त्यानंतरचा यज्ञमार्ग व शेवटचा दानमार्ग.

प्रस्तुत विवेचनांत हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, धर्म या शब्दाचा अर्थ येथें पालटला आहे. येथें त्याचा अर्थ सामाजिक नियमनाच्या पद्धतिवाचक नसून परमार्थाच्या साधनाचा मार्ग या अर्थानें वापरला आहे. आणि अर्थात या दृष्टीनें धर्माविषयीं विचार करणें येथें अनवश्य आहे.

वर सांगितलेले युगानुयुग झालेले फरक लक्षांत घेतले म्हणजे प्रश्न असा उद्भवतो कीं, हे फरक समाजाची प्रगति दाखवितात कीं दुर्गति दाखवितात. धर्मशास्त्रकारांनां हे फरक समाजाच्या दुर्गतीचेच द्योतक आहेत असें वाटत होतें यांत शंका नाहीं. प्रत्येक मनुष्यास त्याच्या दौर्बल्यामुळें तपश्चर्या होईनाशी झाली म्हणून पुढें ज्ञानमार्ग उत्पन्न झाला. पुढें यज्ञधर्म जो उत्पन्न झाला तो देखील मनुष्याचें दौर्बल्यच दाखवितो. यज्ञ म्हणजे काय, तर स्वतःचें देहदंडन करण्याऐवजीं पशूस मारून व त्यास अर्पण करून आपली सुटका करून घ्यावयाचा मार्ग. पण पुढें लोकांनां तोहि कठिण वाटूं लागला व लोक त्याहूनहि सोपा जो दानमर्ग त्याकडे वळले. म्हणजे लोकांस कठिण धर्माच्या ऐवजीं अधिकाधिक सोपा धर्म अवश्य होऊं लागला तर तें त्यांचें दौर्बल्य नव्हे काय ? या दृष्टीनें धर्मशास्त्रकार या एकंदर विकासाकडे पहात होते. आजचे मनुष्यविकासाचे अभ्यासक असें म्हणतील कीं, धर्माचा हेतु समाजाचें रक्षण व स्वास्थ्य हा आहे. आणि तें होण्यासाठीं धर्मविचाराचें पर्यवसान दानाच्या श्रेष्ठतेंत झालें ही गोष्ट प्रगतीचीच द्योतक आहे.

**कर्माचें महत्त्वमापन**—समजांतील प्रत्येक कर्म सारखेंच महत्वाचें आहे काय, हा प्रश्न वारंवार पुढें येतो. वर्गविशिष्ट भावना यासंबंधाच्याच विचारामुळें उत्पन्न होतात. व कांहीं कर्मांस कनिष्ठ मानल्यामुळें तीं कर्में करणाऱ्यांस हलकें मानण्याची प्रवृत्ति समाजांत होते. उलटपक्षीं उच्च प्रतीचीं कर्में नाहींतच, सर्व कर्में सारख्याच प्रतीचीं आहेत असें म्हणणें समाजाच्या अपकर्षास कारण होतें. यासाठीं कर्ममहत्त्वाच्या तारतम्याविषयीं विचार समाजांत पाहिजे. जर कर्तृत्व, बुद्धिमत्ता इत्यादिकांस समाजांत मान मिळणार नाहीं तर समाजाची प्रगतीच बंद होईल. यामुळें कर्माच्या महत्त्वमापनाचा विषय धर्मशास्त्रकारांनां महत्वाचा आहे व मनुस्मृतीनें याविषयीं विवेचन करण्याचें कर्तव्य मुळींच चुकविलें नाहीं.

मनुस्मृतीमध्यें मनुष्याच्या उच्चतेविषयीं तारतम्य येणेंप्रमाणें मांडलें आहे–

"ब्राह्मणेषु च विद्वांसो; विद्वत्सु कृतबुद्धयः
कृतबुद्धिषु कर्तारः कर्तृषु ब्रह्मवादिनः" (१. ९७)

मनुष्याच्या आयुष्याची इतिकर्तव्यता काय, कोणता मनुष्य उच्च योग्यतेचा आहे, इत्यादि प्रश्नांस मनुस्मृतींचें वरील विवेचन विचार करण्याजोगें आहे. ब्राह्मणांमध्यें विद्वान ब्राह्मण उच्च, विद्वान ब्राह्मणांत कृतबुद्धीचा उत्तम असें स्मृति सांगते. "विद्वत्सु कृतबुद्धयः" म्हणजे काय, याचें कुल्लूक स्पष्टीकरण "शास्त्रोक्तानुष्ठानेषु उत्पन्नकर्तव्यताबुद्धयः" येणेंप्रमाणें करतो. म्हणजे विद्वान लोकांपैकीं ज्यांच्यामध्यें आपल्या कर्तव्याची जाणीव झाली आहे असे लोक श्रेष्ठ आहेत असें तो म्हणतो. व ज्या लोकांमध्यें कर्तव्याची जाणीव उत्पन्न

झाली आहे अशा लोकांपैकीं जे कर्ते पुरुष आहेत तेच श्रेष्ठ असें स्मृतीचें म्हणणें आहे. "कर्तृषुब्रह्मवादिन:" म्हणजे जीं कर्ती माणसें आपल्या कार्याचा अंतिम हेतु जाणून कर्मे करतात ते कर्त्या पुरुषांत उत्तम पुरुष आहेत. ही कर्तव्यमीमांसा लक्षांत घेतली तर जग अजूनहि पुढें गेलें नाहीं असें म्हणतां येईल.

**समाज आणि धर्म**—मनुष्यास जें कर्तव्यकर्म आहे तें तो ज्या संघाचा सदस्य असेल त्या संघाच्या सदस्यत्वामुळें आहे आणि तो जितक्या समुच्चयांचा सदस्य असेल तितक्या सर्व समुच्चयांच्या दृष्टीनें त्याला कर्तव्यकर्म आहे व म्हणून

"देशधर्मान् जातिधर्मान् कुलधर्मांश्च शाश्वतान्
पाषंडगणधर्मांश्च शास्त्रेस्मिन्नुक्तवान् मनुः"
( मनु. १. ११८ )

या श्लोकांत देशजाति व कुल या सर्वांच्या दृष्टीनें धर्माचें अस्तित्व मनुस्मृतीनें मान्य केलें आहे. आणि तेंच मत वारंवार इतर ग्रंथांतहि मांडलें गेलें आहे. वरील श्लोकांत एक शब्द महत्त्वाचा आहे. आणि तो म्हटला म्हणजे "पाषंडगणधर्मान्" हा होय. जे लोक धर्मशास्त्रकारास संमत असलेलें परमार्थविषयक मत स्वीकारतात तेच लोक धार्मिक होत, इतर लोक धार्मिक नव्हेत, अशी कोती बुद्धि या स्मृतिकारानें ठेवली नाहीं. जे लोक वेद मानीत नसतील त्यांनांहि धर्मबंधन म्हणजे कर्तव्याकर्तव्यांचें बंधन आहेच आणि तें देखील मनुप्रणीतच आहे असें त्यानें मांडलें आहे. या विवेचनाकडे पाहिलें म्हणजे मनुस्मृतीचें हें मत विसाव्या शतकांतल्या सुधारलेल्या लोकांनां देखील लाजविणारें आहे. इतकी सरळ मान्यता देण्याइतकी उदारबुद्धि जगांत अजून उत्पन्न व्हावयाचीच आहे. हें मत केवळ पुस्तकांतच राहिलें होतें असें नाहीं तर हें प्रत्यक्ष व्यवहारांत होतें. राजधर्मांत ज्ञातिकुलगणादींच्या नियमांची चौकशी करून राजानें ते अमलांत आणावे हें सांगितलें आहे. हिंदु राजांनीं आपल्या राज्यव्यवस्थेंत हें तत्त्व अमलांत आणलें होतें व मलबारच्या प्राचीन राजांनीं सीरियन ख्रिस्ती लोकांस व यहूदी लोकांस आपल्या परंपरागत धर्मानें चालण्याचा अधिकार दिला होता, एवढेंच नव्हे तर त्यांच्या मुख्यास त्याबद्दलचें राजशासन (ताम्रपट)हि दिलें होतें.

**कामना व कर्म**—सामाजिक कार्यामध्यें व्यक्तीच्या मनोधर्माकडे दुर्लक्ष केलें तर कोणतेंच इष्ट साध्य होणार नाहीं. निष्काम कर्म करावें, वासनात्याग करावा इत्यादि आध्यात्मिकांचा आग्रह असतो. धर्मशास्त्राची त्याविषयीं वृत्ति काय होती हें पहाण्याजोगें आहे. केवळ कामात्मता योग्य नाहीं हें मनुस्मृति म्हणते, पण त्या कामात्मतेवर ती कोरडे ओढीत नाहीं. "अकामता इहनास्ति" "वेदाधिगमोहि काम्यः" (२. २) असें स्मृति स्पष्ट सांगत आहे. कामनेच्या जोडीला "संकल्प" पाहिजे. किंबहुना "संकल्पाचा" कामना हा स्वाभाविक परिणाम आहे असें स्मृति म्हणते, "संकल्प" म्हणजे फल आणि कर्म यांच्या कार्यकारणभावाचें ज्ञान. हें ज्ञान मनुष्यमात्रास हवें. व्रतें, यम, नियम हीं संकल्पाशिवाय शक्य नाहींत. मनुष्यानें फलाकडे लक्ष न देतां काम करावयाचें झाल्यास कर्म व फल यांचें कार्यकारण ज्ञान नको आहे. पण जर फल व कर्म यांच्या कार्यकारणभावाचें ज्ञान नसलें तर धर्माधर्मविवेकच उत्पन्न होणार नाहीं. कारण धर्माधर्मविवेक हाच सुखदुःखविषयक परिणामांच्या ज्ञानावर आहे. हें जर ज्ञान असलें तर फलाकडे लक्ष न देतां धर्म करणें अशक्य आहे. एवंच भगवद्गीतेंत फलाशा न ठेवतां कर्म करण्याविषयीं जो आक्रोश केला आहे तो मनुस्मृतीस संमत नाहीं.

**उच्च राष्ट्राचें अनुकरण**—संस्कृतींत जीं राष्ट्रें मागें पडलीं असतील त्यांनीं, जीं राष्ट्रें संस्कृतींत पुढें गेलीं असतील त्यांचें अनुकरण करावें हें तत्त्व मनुस्मृतींत सांगितलें आहे. श्रुति, स्मृति, सदाचार व आपणांस आवडेल तें येणेंप्रमाणें धर्मलक्षण चतुर्विध आहे असें मनुस्मृति म्हणते हें मागें सांगितलेंच आहे. पण सदाचार म्हणजे कोणाचा आचार याचें स्पष्टीकरण विशेष केलें पाहिजे. नाहींतर, "सद्" कोण हें आपणच ठरवावें आणि त्याच्या आचाराला सदाचार म्हणावें ही परिस्थिति उत्पन्न होईल. यासाठीं मनुस्मृति पुढें निश्चयेंकरून सांगते.

"तस्मिन् देशे य आचारः पारंपर्यक्रमागतः
वर्णानां सांतरालानां स सदाचार उच्यते" २. १८

तस्मिन् देशे हें ब्रह्मावर्ताविषयीं म्हटलें आहे. सरस्वती व दृषद्वती यांच्यामधील प्रदेशास "ब्रह्मावर्त" म्हटलें आहे. त्या देशांतील ब्राह्मणादि वर्णांचे आणि मिश्रवर्णीयांचे जे आचार आहेत ते सदाचार होत. ब्रह्मावर्त व त्या शेजारचे कुरु, मत्स्य, पंचाल व शूरसेन या देशांतील ब्राह्मणादि वर्णांप्रमाणें इतर देशांतील लोकांनीं आपले आचार ठेवावेत असें तत्त्व पुढें (२. २०)

सांगितलें आहे. एवंच धर्मशास्त्रकार ज्या-ज्या देशांत जो जो आचार असेल तोच योग्य आहे असें म्हणत नाहींत तर अमुक एका देशांतील आचार श्रेष्ठ प्रकारचे आहेत व इतर राष्ट्रांनीं त्या राष्ट्राचें अनुकरण करावें हें तत्त्व मांडीत आहेत असें तत्त्व मांडण्यास धर्मशास्त्रकारांस कारणहि होतें. कारण इतर भाग ब्रह्मावर्ताच्या व मध्यदेशाच्या मानानें असंस्कृत होता.

**वर्गविशिष्ट नियम**—वर्गविशिष्ट सर्वच नियम निरनिराळ्या वर्गांत उच्चत्वाचें किंवा नीचत्वाचें वारें उत्पन्न करण्यासाठीं नसून अनेक नियम वर्गविशिष्ट अभिमान उत्पन्न करण्यासाठीं आहेत. ब्राह्मणादि तीन वर्णांच्या निरनिराळ्या स्नातकांस निरनिराळे नियम दिसतात, कमरेची दोरी कोणत्या प्रकारची असावी, दंड कोणत्या लांकडाचा असावा इत्यादि विषयींचे नियम आहेत (२.४१, ४९,६९). ब्राह्मणांस किंवा त्यांच्या धर्मशास्त्रकारांस दूषण देणाऱ्या लोकांनीं या भेद संबंधानें धर्मशास्त्रकारांस दूषण दिलें आहे. पण विचार करतां त्यांस दूषण देण्याचें कारण नाहीं असें दिसून येईल. कारण ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे जर तीन निरनिराळे उपजीविकेचे क्रम आहेत तर त्या तिहींसाठीं अभ्यासक्रम देखील निरनिराळे पाहिजेत हें उघड आहे व त्यासाठीं जर एखाद्या आश्रमांत निरनिराळे अभ्यासक्रम असले तर विद्यापीठांत आपल्या अभ्यासक्रमाचें वैशिष्ट्य दाखविणारा निराळा पोषाख असावा ही गोष्ट देखील गैर नाहीं. तर ती वेषभिन्नता उच्चनीचतेची द्योतक नसून वैशिष्ट्याच्या अभिमानाची उत्पादक आहे.

चातुर्वर्ण्याची कल्पना ही कर्मविशिष्ट आहे. जो जें कर्म करतो त्यावरून त्याचा वर्ण ठरवावयाचा, पण वर्णविशिष्ट संस्कार, शिक्षण वगैरे गोष्टी अगोदरच ठरतात त्यामुळें एका वर्णाचे संस्कार व अधिकार आणि दुसऱ्या वर्णाचें कर्म अशी असंगति उत्पन्न होते. ही असंगति कशी काढावी यासंबंधानें प्रश्न होता. धर्मशास्त्रकार शास्ते नव्हते व या प्रकारच्या भानगडींत ते पडत नसत. त्यामुळें धर्मशास्त्रकारांनां एवढेंच शक्य होतें कीं जी वस्तुस्थिति चालू आहे तिच्याशीं धर्मशास्त्र मिळवून घेणें. या तऱ्हेची क्रिया मनुस्मृतीनें केली आहे. धर्मशास्त्रकारांच्या प्रयत्नाव्यतिरिक्त जातिभेदाची अनवस्था दूर करण्यासाठीं प्रयत्न झाले नाहींत. बौद्धांचे प्रयत्न या बाबतींत कांहींच झाले नाहींत. बुद्धानें ब्राह्मणांस शिव्या दिल्या एवढेंच.

धर्मशास्त्रकार चार वर्ण आहेत असें तत्त्व कबूल करीत पण त्यांस असें दिसून येई कीं समाजांत वर्गसदृश व जातिसदृश असे अनेक समुच्चय आहेत. तेव्हां धर्मशास्त्रकारांनां असा प्रश्न पडला कीं मूळ जर चारच वर्ण आहेत तर त्यांत दिसून येणाऱ्या पन्नास-साठ जातींच्या अस्तित्वाचें स्पष्टीकरण करावें कसें ? तसेंच अनेक जाती कर्मानें क्षत्रिय दिसतात पण लोकांत त्यांची गणना शूद्रांमध्यें होत आहे. असेंहि त्यांस दिसून आलें. अशा स्थितींत त्यांनीं स्पष्टीकरण केलें तें येणेंप्रमाणें—(१) कांहीं जातींचें अस्तित्व दोन जातींच्या मिश्रणानें झालें आहे असें सांगितलें तर (२) कांहीं जाती किंवा कुळें क्षत्रिय असतां तीं संस्कारलोपानें हीनवर्ण झालीं असें सांगितलें. याशिवाय जेव्हां वर्ण ब्राह्मणाचा पण कर्म वैश्य-शूद्राचें अशा व्यक्ती दिसल्या तेव्हां त्याविषयीं देखील कांहीं विवेचनाची आवश्यकता होती. तेव्हां धर्मशास्त्रकारांनीं आपद्धर्म प्रकरण लिहिलें. म्हणजे वस्तुस्थितीचें "आपद्धर्म" या नांवानें समर्थन होई. धर्मशास्त्रकार हे कायदे करणारे नव्हते. त्यांस वस्तुस्थिति पालटण्याची सत्ता नव्हती. त्यांनां जें काय शक्य होतें तें हेंच कीं ज्यामुळें धर्मशास्त्राचे नियम आणि सामाजिक स्थिति यांतील अंतर कमी होत जाईल असें स्पष्टीकरण करीत जाणें. असें केल्यानें धर्मशास्त्राप्रमाणें आपण चाललों आहों ही कल्पना लोकांत रहाते आणि धर्मशास्त्राचें महत्त्व रहातें.

मनुस्मृतींतील जो धर्मशास्त्रीय प्रश्नासंबंधानें तात्त्विक खल झाला त्याचें स्थूल समालोचन वर दिलें आहे. मनुस्मृतींत अनेक व्यवहारांचे नियम आले आहेत आणि त्या नियमांच्या पाठीमागें कांहीं तरी सामाजिक दृष्टि आहेच. त्या सर्व गोष्टींचा येथें खल करूं गेल्यास फारच विस्तार होईल म्हणून तें विवेचन येथें करीत नाहीं. दिलेल्या विवेचनावरून एवढें स्पष्ट होईल कीं, धर्मशास्त्रकारांच्या नियमांच्या पाठीमागें कांहीं विशिष्ट समाजशास्त्रीय विचार आहे.

प्रत्येक वर्ग आपापल्या हिताचें संरक्षण करीत असतां समाजास विशिष्ट स्वरूप देत असतो. ब्राह्मणांनां आपल्या विचाराप्रमाणें समाजास स्वरूप देतांना काय करावें लागलें याचें स्वरूप वैदिक ग्रंथकार व स्मृतिकार यांच्या प्रयत्नावरून समजण्यासारखें आहे. क्षत्रिय आणि वैश्य या वर्गांनीं आपल्या इच्छेचा परिणाम सामाजिक तत्त्वज्ञानावर काय केला हें पाहण्याजोगें आहे.

चातुर्वर्ण्यामध्यें क्षत्रियांचें स्थान ब्राह्मणांच्या बरोबरीचें असावें किंबहुना ब्राह्मणांहून उच्च असावें यासंबंधानें जो प्रयत्न झाला त्याचा इतिहास चांगलासा देतां येणार नाहीं. तथापि क्षत्रियांचा त्या बाबतींत निश्चित प्रयत्न होता असें सहज सांगतां येईल. ब्राह्मणांनीं क्षत्रियापेक्षां आपली उच्चता मोठी आहे असें सांगण्यासाठीं जो अट्टहास केला तो क्षत्रियांचे पूर्वप्रयत्न स्पष्टपणें सूचित करतो. ब्राह्मणांचें वाङ्मय शिल्लक राहिलें पण क्षत्रियांच्या क्रियांच्या आठवणी शिल्लक राहिल्या. त्यांचें वाङ्मय मुळी नव्हतेंच. क्षत्रियांची खटपट ब्राह्मणी ग्रंथावरूनच किंबहुना ब्राह्मणी प्रयत्नांच्या इतिहासावरून काढावयाची आहे.

ब्राह्मणांच्या वाङ्मयांत ब्राह्मणांची थोरवी सांगण्याचे जे प्रयत्न झाले त्यांत विश्वामित्राची कथा निर्देशिली पाहिजे. विश्वामित्र ब्राह्मण होण्याचा प्रयत्न करतो असें दाखविलें आहे; आणि जेव्हां त्याचा प्रयत्न असंभाव्य तऱ्हेचा झाला तेव्हांच तो ब्राह्मण बनला असें दाखविलें आहे. तसेंच अनेक राजांनां ब्राह्मणच्छलाबद्दल मोठीं प्रायश्चित्तें मिळालीं अशा कथा रामायण--महाभारतादि ग्रंथांत पसरून दिल्या आहेत. एवढेंच नव्हे तर क्षत्रियांनां इतर लोकांकडून मान्यता मिळूं नये म्हणून जुना क्षात्रियवंश नाहींसाच झाला, आतां केवळ दासीपुत्रांचाच वर्ग शिल्लक राहिला आहे असें त्यांच्यासंबंधानें लोकमत पसरवून दिलें आहे. परशुरामानें २१ वेळा पृथ्वी निःक्षत्रिया केली, आणि नंदांनंतर क्षात्रियकुल नष्ट झालें इत्यादि कथा पसरविणें या सर्व गोष्टी ब्राह्मण--क्षत्रियस्पर्धेचीं अंगें दाखवितात. मनुस्मृतीच्या काळांतच कित्येक राजे शूद्र होते म्हणून उल्लेख आहे. राजत्वावरून जर क्षत्रियत्व ठरतें तर राजा शूद्र कसा असेल. शूद्र याचा अर्थ एवढाच कीं, उपनयनासारखे वैदिक संस्कार नसलेला मनुष्य. ब्राह्मण व क्षत्रिय यांची स्पर्धा चालू असतां क्षत्रियांस हीनत्व देणें हें ब्राह्मणांस अवश्यच होतें. पण केवळ हीनत्वच देऊन भागत नव्हतें तर क्षत्रियत्वच नाकारणें त्यांस अवश्य होत होतें. क्षत्रिय व वैश्य हे दोन्ही वर्ण लुप्त झाले ही गोष्ट, आपलें अनेक पात्र्यांनीं इतरांवर उच्चत्व राखण्यास अवश्य होत होती. पण तसें करण्यांत ब्राह्मण आपलेच पाय कापून घेत होते. संस्कारांस अधिकारी वर्ण पडले तीन; ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य. शूद्रांस फारशा संस्कारांचें--तो शूद्र म्हणून--प्रयोजनच नव्हतें. पण वैश्य व क्षत्रिय समजले जाणारे वर्णच जर शूद्र ठरले तर वैदिक धर्माची बूज कशी राहील आणि ब्राह्मणांची उपजीविका कशी चालेल हा प्रश्न होता.

तो प्रश्न सोडविण्यासाठीं पुराणोक्त कर्में निघालीं म्हणजे कर्म वैदिक कर्मासारखेंच पण वैदिक मंत्रांच्या ऐवजीं पुराणोक्त म्हणजे दुसरे कसले तरी मंत्र घालण्यांत आले व शूद्रकमलाकरासारखे ग्रंथ करण्यांत आले. शूद्र मंडळींकडे उपाध्यायपण मिळविण्याच्या बाबतींत शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण अधिक पटाईत दिसून आले. "शूद्रा वाजसनेयिनः" म्हणून शूद्र कमलाकरांत या संबंधानें विधान आहे. वाजसनेयी ब्राह्मण नवीनच होते, व त्यांस शूद्राकडे जाऊन कर्म करण्यास संकोच कमी वाटत असावा असें दिसतें. आज शूद्र कमलाकरानें वापरलेल्या म्हणजे वस्तुस्थितीसच मान्यता देण्याच्य तऱ्हेनें शास्त्राधार लिहावयाचाच झाल्यास "आर्यसमाजिनः नवहिंदूनाम्" म्हणजे मुसुलमान, ख्रिस्ती वगैरे मंडळी हिंदु झाली तर त्यांच्याकडील कर्मं आर्यसमाजी मंडळींनीं करावें असा नियम देतां येईल; असो. ब्राह्मणांच्या हातीं संस्कार आणि वाङ्मयरूपानें आपलेंच म्हणणें टिकविण्याचें साधन या गोष्टी असल्यामुळें त्यांच्यापुढें क्षत्रियवर्गाचा पराभव झाला असें म्हणतां येईल.

क्षत्रियांच्या चळवळींत बुद्धाचें नांव देतां येण्याजोगें आहे. पण त्यास ब्राह्मणांनां शिव्या देण्यापलीकडे कांहीं करतां आलें नाहीं. त्यानें नवीन संप्रदाय स्थापन केला पण संस्कारांचें काम ब्राह्मणाकडेसच राहिल्यामुळें ब्राह्मणांचें समाजप्रामुख्य बुद्धास विघडवितां आलें नाहीं. क्षत्रिय व वैश्य यांच्यामध्यें संस्कारलोप उत्पन्न करून ब्राह्मणांचें उच्चत्व अधिक स्थापन करण्याकडे मात्र बुद्धाच्या प्रयत्नाचा उपयोग झाला.

**पंचाल चळवळ**—वैश्यानीं चळवळ केली नाहीं असें नाहीं दक्षिण हिंदुस्थानामध्यें समाजसुधारणेची एक महत्वाची चळवळ कोणत्या तरी प्राचीन काळीं सुरू झाली. या चळवळीस सोईस्कर म्हणून "पंचाल चळवळ" हें नांव देणें योग्य होईल. या चळवळीचा हेतु जे शिल्पी वर्ग आहेत त्यांचें ब्राह्मणतुल्य महत्त्व--स्थापन करावें आणि आपापसांत संघटन वाढवून शिल्पीवर्गापुरता तरी जातिभेद मोडून टाकावा असा दिसतो.

या चळवळीची व्याप्ति किती मोठी असावी हें, या ज्ञातींत किती माणसें आज मोडतात यांवरून स्पष्ट कळून येईल. कारागीरवर्गापैकीं जे आज आपणांस

विश्वब्राह्मण म्हणवितात त्यांची संख्या दहा लक्षांहून अधिक आहे. त्यांचे प्रांतवार आंकडे येणेंप्रमाणें:—

| देश | जात | संख्या |
|---|---|---|
| त्रावणकोर | कम्माल | १७००० |
| मद्रास | मलयाळी कम्माल, | ९८००० |
| | तामिळ कम्माल | ५५९००० |
| मद्रास | पांचाल | ५५००० |
| म्हैसूर | पांचाल | १२८००० |
| मुंबई इलाखा | पांचाल | ८०००० |
| हैद्राबाद | पांचाल | ११७००० |
| एकूण | | १०५४००० |

या चळवळीचें स्वरूप सामान्यतः येणेंप्रमाणें:— सोनार, सुतार, लोहार, कांसार आणि पाथरवट या ज्ञातींनीं आपापसांत लग्नव्यवहार वाढवावा, आणि आपणांस ब्राह्मणाची पदवी मिळवावी. यांचें कार्यध्येय केवळ आपणांस व्यक्तिशः सामाजिक उच्च स्थान मिळावें हें नसून जें कार्य आपण करतों त्यासच उच्च स्थान मिळावें हें होतें. आम्ही पूर्वी ब्राह्मण होतों पण सध्यां ब्राह्मणांप्रमाणेंच निरनिराळे धंदे करीत आहों अशी त्यांनीं मांडणी केली नाहीं, तर आम्ही जें कार्य करतों तेंच पवित्र आहे. मूर्ती वगैरे करावयास सोनार, कांसार, पाथरवट इत्यादि जीं माणसें लागतात तीं उच्चप्रकारचीं कामें करीत आहोंत म्हणून आम्हांस ब्राह्मणासमान महत्त्व पाहिजे. म्हणजे श्रमाचें कामाचें व कलेचें पावित्र्य सांगणारी ही चळवळ होती. यांनीं, कारागीरवर्गांत तरी फूट पडूं नये म्हणून एक युक्ति योजिली ती अशी:—

प्रत्येक कर्म विशिष्ट ऋषीपासून उत्पन्न झालें व त्या अर्थी त्या कर्माचें, त्या ऋषीचें नांव तें गोत्र आहे. सोनाराचें गोत्र "सुपर्ण" होय. सुपर्ण नांवाचा कोणी ऋषि होऊन गेला त्यावरून तें पडलें. जर सर्व सोनार सुपर्णगोत्री तर कोणत्याहि सोनारकुलाचें दुसऱ्या सोनार कुलाशीं लग्न होणें शक्य नाहीं, सोनारानें आपली मुलगी सुतारास, कांसारास, पाथरवटास वगैरे अन्यशिल्पीयास दिली पाहिजे. अर्थात अनेक शिल्पें करणाऱ्या कारागिरांत एकत्वाची भावना राखण्यास आपापल्या शिल्पाबद्दल अभिमान उत्पन्न करण्यास ही चळवळ मोठी उपयोगी पडली असली पाहिजे.

या चळवळीचा सुसंगत इतिहास लिहिण्याचा प्रयत्न केला तर तो सामाजिक इतिहास या दृष्टीनें बराच महत्त्वाचा होईल. ब्राह्मण-क्षत्रिय यांची स्पर्धा जुन्या पौराणिक ग्रंथांत आहे. ब्राह्मण आणि कायस्थ यांची कारकुनींतील स्पर्धा प्रसिद्धच आहे. क्षत्रिय ब्राम्हणां-पेक्षां उच्च आहेत असें गौतमबुद्ध वारंवार म्हणे. ब्राह्मण व कारागीर वर्ग यांत कारागीर वर्गाचे ब्राह्मणाशी समतेचे प्रयत्न हा विषय जर आपल्या सामाजिक इतिहासांत नसता तर आपला सामाजिक इतिहास अपूर्ण असता. कारागीरवर्गास आपल्या कार्याबद्दल अभिमान असणें आणि त्यांनींहि समाजांतील अग्रस्थानावर आपला हक्क सांगणें ही गोष्ट कोणत्याहि समाजास कमीपणा आणणारी नाहीं.

या चळवळीचे परिणाम अनेक झाले आहेत. महाराष्ट्रावर जो परिणाम झाला तो पांचालांत न शिरलेल्या कारागीरवर्गावर पांचालांनीं उत्पन्न केलेल्या वाङ्मयाच्या वाचनानें झाला. दैवज्ञ सोनार व त्वष्टाकासार हे देखील ब्राह्मणत्वावर हक्क सांगूं लागले आहेत.

कारागिरांनां आपल्या कार्याबद्दल अभिमान असणें आणि आपण करतो त्या कार्याच्या उच्चत्वावरच समाजांतील अग्रस्थानास हक्क सांगण्याचा प्रयत्न करणें ही गोष्ट समाजास हितावह आहे. ही गोष्ट जाणून प्रारंभीं चळवळ सुरू झाली पण त्या चळवळीचे उच्च हेतु बाजूला राहून ही चळवळ देखील आपल्या तत्त्वाविरुद्ध क्रिया करीत आहे असें दिसतें. उदा. एका काळीं जे सोनार, सुतार व पाथरवट एकीकृत झाले त्या सर्वांची इतर जातींसारखी जात बनली व आपल्या चळवळीचा हेतु निरनिराळ्या शिल्पीवर्गांचें एकीकरण करणें हा आहे हें ती जात विसरली. कांहीं ठिकाणीं लोहारास वगळण्यांत आलें तर कांहीं ठिकाणीं पांचालांनीं निरनिराळे धंदे न करतां केवळ सोनाराचें काम करावयास सुरुवात केली. या पांचालचळवळीवर अधिक संशोधन झालें पाहिजे.

पूर्वोक्त विवेचनावरून असें दिसून येईल कीं समाज आपल्या पुढील प्रश्न सोडविण्यासाठीं जो प्रयत्न करीत आहे त्याचा इतिहास फार जुना असून विविध आहे. समाजसुधारणेची कल्पना केवळ यूरोपीय संसर्गानंतर "सुधारक" नांवाचा जो एक वर्ग तयार झाला तेव्हांपासून आली असें म्हणतां येणार नाहीं. व समाजाच्या अंतर्घटनेवर परिणाम घडवील असें या "सुधारक"वर्गानें जरी कांहीं केलें नाहीं तरी त्यांस आलेल्या अपयशामुळें निराश होण्याचें कारण नाहीं. आपण आपला जुना

सामाजिक इतिहास जास्त उकरीत जाऊं तसतशी आप- णांस प्राचीनांची सामाजिक फरक करण्याची विद्या देखील उपलब्ध होईल व ती आपणांस मार्गदर्शक झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

---

## प्रकरण ११ वें.

## सद्यःस्थिति व स्वयंशासन.

गेल्या आठ वर्षांतील हिंदुस्थानच्या राजकीय इति- हासाकडे स्थूलमानानें लक्ष पुरविल्यास बऱ्याचशा स्थित्यंतरकारक गोष्टी दिसून येतील व एवढया मोठ्या अचानक प्रगतीबद्दल आश्चर्यहि वाटूं लागेल. मागें सर- कारविषयीं जो एक मोठा बाऊ हिंदी प्रजेच्या मनाला वाटत होता तो अजीबात नाहींसा होऊन असहकारि- तेच्या अमदानीपासून लोक अतिशय निर्भयपणें सर- कारवर टीका करूं लागले आहेत व सरकारी अधिका- ऱ्यांनां आपले नोकर म्हणून मानीत आहेत. तसेंच लोकलबोर्डें, म्युनिसिपालिट्या, कॉंग्रेससभा व कौन्सिलें यांच्या निवडणुकींच्या कार्यक्रमांमुळें जातीजातींतील द्वेष- बुद्धि किंवा एकमेकांविषयीं तिटकारा किंवा अपशब्द हीं कमी होत चाललीं आहेत. एखाद्या वर्गाची अवहे- लना करून चालावयाचें नाहीं हें प्रत्येक समाजपुढा- ऱ्याला कळून चुकलें आहे. त्यामुळें पुढारी कोणालाहि शब्दानें किंवा कृतीनें दुखवूं नये म्हणून फार काळजी घेत असतात. असाच इष्ट फरक भिन्नधर्मीयांत घडून आला तर पाहिजे आहे पण त्याकरितां मतदारसंघ एक केले पाहिजेत. हिंदूंचे संघ वेगळे व मुसुलमानांचे वेगळे असें आजचें धोरण टाकलें पाहिजे. एरव्हीं हिंदु समाजांत लोकप्रिय होण्याची कोणीहि मुसुल्मान खटपट करणार नाहीं व हिंदूंहि तसाच मुसुलमानी मताविषयीं बेफि- कीर राहील.

गेल्या आठ वर्षांतील आणखी एक महत्त्वाचें स्थित्यं- तर म्हणजे बहुजनसमाजानें केलेलें स्वत्वस्थापन. १९१९ च्या सुधारणाकायद्यापूर्वी पुढारलेले वर्ग मागासलेल्या वर्गाची सहानुभूति मिळविण्याचा मुळींच प्रयत्न न करतां किंवा त्यांचें हिताहित न पहातां आपणच त्या बहुजनसमाजाचे प्रतिनिधी म्हणून मिरवीत असत व सरकारकडून फायदाहि उपटीत. पण आज मतदानाचा हक्क व्यापक करून वरिष्ठ कायदेमंडळांतहि प्रत्यक्ष उमेदवार पाठविण्याची सोय केल्यानें उमेदवारांनां मागासलेल्या समाजाला जवळ करावें लागतें आणि त्यांच्या विश्वासानेंच निवडून यावें लागतें. आज बरेचसे मागासलेले व ब्राह्मणेतर गृहस्थ कायदेमंडळांतून व मोठाल्या जागांवर आहेत. त्यामुळें स्वतःची लायकी वाढविण्याची जिज्ञासा मागासलेल्या वर्गांत उत्पन्न झालेली दिसते. व ती परिणामीं हितकर झाल्यावांचून राहणार नाहीं.

राजशकट प्रत्यक्ष चालविण्याचें काम जेव्हां हिंदी दिवाणांवर पडलें तेव्हां प्रथम प्रथम गव्हर्नर व त्यांचे यूरोपियन सहकारी यांच्याशीं त्यांनां ज़रा नमतेंच घ्यावें लागत होतें. कारण त्यांनीं स्वाभिमानानें एकदम राजी- नामा दिला असता तर तोहि एका प्रकारें अविचारच झाला असता. कारण त्यांच्या जागेवर येण्याकरितां सर- कारजवळ वाटेलतसें लांगूलचालन करणारी मंडळी थोडीथोडकी नव्हती. अशी मंडळी दिवाणपदांवर आरूढ झाली असती तर राज्यकारभार अधिकच बिघ- डला असता. आतां मात्र दिवाण अधिक धीट व स्वतंत्र बनत चाललेले दिसतात. नुकतेच मध्यप्रांतांतील दिवा- णांनीं आपल्या कारभारांत गव्हर्नरनें नसती ढवळाढवळ केल्यावरून लगेच राजीनामे दिले होते व गव्हर्नरनें दिलगिरी प्रदर्शित करून त्यांच्या कारभारांतून आपला हात काढून घेतल्यावरच त्यांनीं राजीनामे परत घेतले.

सरकारची वरिष्ठ अधिकारांचें हिंदीकरण करण्या- संबंधी वृत्तीहि आजकाल बदललेली दिसते. प्रांतिक व वरिष्ठ सरकारचे फडणीस, गृहमंत्री, वरिष्ठ खात्यांचे सेक्रेटरी, लष्करी अधिकारी वगैरे जागांवर केव्हां केव्हां हिंदी लोक नेमण्यांत येत असतात. एका प्रांताचा गव्ह- र्नर होण्याचाहि मान एकदां एका हिंदी माणसाला ( लॉर्ड सिंह यांनां ) मिळालेला आहे. आतांपर्यंत हिंदी लष्करी अधिकारी कमी असत, पण स्कीन कमिटीचा अहवाल सरकारनें मान्य केला असल्यामुळें यापुढें लष्क- रांतहि चांगली हिंदी भरती होईल.

प्रागतिक चळवळींत हिंदुस्थानचा भाग कबूल केला जात असतो. राष्ट्रसंघांत हिंदुस्थानचा समावेश असल्या- मुळें सार्वराष्ट्रीय प्रश्नांचा विचार हिंदी प्रतिनिधींनां करावा लागतो. ना. शास्त्री यांच्यासारखे हिंदुस्थानचे वकील पर- देशांत तेथील सरकारबरोबरीच्या दर्जानें वागत आहेत. कोठल्याहि सार्वराष्ट्रीय परिषदेला हिंदुस्थानतर्फे प्रति- निधींनां बोलावणें असतें. तेव्हां जगाला हिंदस्थानचें अस्तित्व गेल्या आठ दहा वर्षांपासून विशेष भासूं

लागलेलें दिसत आहे. व यापुढें स्वराज्याचे हप्ते जास्त जास्त मिळत जातील तसें त्याचें सार्वराष्ट्रीय महत्त्व आणखीहि वाढेल.

वर थोडक्यांत दिग्दर्शित केल्यासारखीं स्थित्यंतरें असहकारितेच्या उगमकालापासून घडून आलेलीं आहेत व याच स्थित्यंतरांवर प्रकाश पाडणारा राजकीय इतिहास यापुढें थोडक्यांत द्यावयाचा आहे.

असहकारिता आणि खिलाफत चळवळ यांच्या प्रारंभीच्या अमदानींत सरकारला बरीचशी भीति वाटून त्याला तोंड देण्याकरितां सरकारनेंहि मोठी तयारी केली होती. १९२१ सालांत तर जिकडे तिकडे हिंदु-मुसुलमान व पिकेटिंग दंगे उसळले होते. मालेगांव, धारवाड आणि इतर कांहीं ठिकाणें येथील दंगे शमले जात आहेत तोंच मलबारांत असंख्य मोपल्यांनीं ब्रिटिश सरकारचें राज्य झुगारून देऊन हिंदूंनां मुसुलमान करण्याचा सपाटा चालविला. तेव्हां सरकारला लष्कराची मदत घेऊन हें बंड मोडावें लागलें.

मँटेग्यु-चेम्स्फर्ड सुधारणान्वयें बनलेलीं नवीं कौन्सिलें उघडण्याकरितां इंग्लंडचे युवराज न येतां बादशहांचे काका ड्यूक ऑफ कॅनॉट हे आले होते. त्यांची फेरी अतिशय गुपचुप व खाजगी स्वरूपाची झाली. या सालाच्या अखेर जेव्हां खुद्द प्रिन्स ऑफ वेल्स आले त्या वेळीं काँग्रेसनें त्यांच्या आगमनावर कडकडीत बहिष्कार टाकल्यामुळें, केवळ सरकारी अधिकारी आणि संस्थानिक यांच्या लवाजम्यांतच व त्यांचाच पाहुणचार घेत घेत राजपुत्र हिंदुस्थानभर फिरले; पण त्यांचें प्रयाण झाल्याबरोबर ज्या ज्या ठिकाणी ते गेले त्या त्या बहुतेक शहरांतून पुन्हां दंगे उसळले. तेव्हां सरकारनें बऱ्याचशा पुढाऱ्यांनां तुरुंगांत डांबून ठेविलें, तेव्हां कोठें सरकारला हायसें वाटूं लागलें; तरी पण अकाली शिखांची चळवळ सुरू होतीच. प्रथम ही धार्मिक चळवळ म्हणून उद्भूत झाली होती तरी पुढें तिला राजकीय स्वरूप प्राप्त झालें. सरकार एकसारखें कमीजास्त प्रमाणानें ही चळवळ दाबून टाकीत होतें. अशाच वेळीं साम्राज्यांत हिंदुस्थानचा दर्जा इतर वसाहतींबरोबरीचा झाला आहे हें दाखविण्याकरितां सरकारनें नामदार शास्त्री यांनां कानडा, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड वगैरे वसाहतींतून फिरविलें.

१९२३ च्या आरंभीं असेंब्लीमध्य विन विरोधानें शिरलेल्या प्रागतिक आणि स्वतंत्रपक्षीयांनीं फार मोठ्या प्रयासानें आपण कांहीं तरी लोकहिताची कामगिरी केली हें दाखविण्यासाठीं कां होईना, सरकारविरुद्ध बहुमत करून मिठावरचा कर निम्मपट केला; पण लगेच व्हाईसरायांनीं आपल्या अधिकारांत शिक्केबंदी करून तो पूर्वस्थलीं आणून ठेविला, त्यामुळें सनदशीर चळवळीचे पुरस्कर्ते जे प्रागतिक त्यांच्यांतहि खळबळ उडून गेली व तेहि कौन्सिलबहिष्काराची भाषा बोलूं लागले. १९२३ सालांत असहकारितेला ओहोटी लागल्याचें अगदीं स्पष्ट झालें. महात्मा गांधी साम्राज्यद्रोहाच्या अपराधाबद्दल ६ वर्षांची शिक्षा भोगीत असतां त्यांचे अनुयायी आपापसांत कौन्सिलांतून सरकारशीं लढावें कीं नाहीं याविषयीं अतिशय निकरानें भांडत होते. गया येथील काँग्रेसचे अध्यक्ष श्री. चित्तरंजनदास हे काँग्रेसच्या असहकारितेच्या कार्यक्रमाबरोबरच आपला स्वतंत्र काँग्रेसविरोधी स्वराज्यपक्षाचा कार्यक्रम तयार करीत होते. महाराष्ट्रांतले लोकमान्य पंथाचे ढोंगी असहकारितावादी लगेच दासांच्या पक्षांत मिळाले. हळू हळू स्वराज्यपक्ष प्रबळ होत चालला. असहकारितेला आणखी एक मोठा धक्का जो मिळाला तो म्हणजे हिंदु-मुसुलमानांमधील निकराच्या भांडणांचा होय. इकडे हिंदूंनीं शुद्धि आणि संघटना हातीं घेतल्यामुळें चिडून जाऊन मुसुलमानांनींहि तबलिख आणि तंझिम या चळवळी सुरू केल्या. तेव्हां हिंदुमुसलमानांमधील द्वेष अतिशय बळावत जाऊन सर्व देशभर पसरला आणि १९२३ सालांत एकंदर देशांत १५।२० मोठे दंगे झाले व विनाकारण बरेंच रक्त सांडलें.

तिकडे पंजाबांत बाबर अकालींनीं गांधींच्या अनत्याचारी उपदेशाला धाब्यावर बसवून राजकीय बाबतींत आपल्याविरुद्ध असलेल्या स्वधर्मीयांनांच कंठस्नान घालण्यास सुरवात केली. गुरुद्वारकमिटीच्या देखरेखीखालीं लष्कराच्या धर्तीवर एक अकाली दल तयार झालें होतें. याच वेळीं नाभाचे महाराज रिपुदमनसिंह यांनीं बाहेरून स्वखुशीनें पण आंतून जबरदस्ती आल्यामुळें राज्यत्याग केला. असंतुष्ट महाराज अकाली दलाचे सेनापति बनून मोठें बंड करतील अशी सरकारला भीति पडून त्यांनीं दलसंस्था आणि गुरुद्वारकमिट्या यांनांच अगोदर बेकायदेशीर ठरविलें व अशा बेकायदेशीर संस्थांतील सभासदांची धरपकड चालविली.

१९२३ सालांत वरील दंगलीबरोबर वायव्यसरहद्दीवर खुनांच्या आपत्ती चालू होत्याच. त्यांत अनेक अधिकारी मारले गेले. पण एका यूरोपियन तरुणीला

पळवून नेल्यावर ब्रिटिश सरकारला अतिशय धास्ती वसून त्यानें आपलें सर्व बळ सरहद्दीवर केंद्रीभूत केलें. तेव्हां कोठें तिकडे शांतता होत चालली. तिकडे बंगालमध्यें, बंगालची फाळणी व स्वदेशी चळवळ यांच्या अमदानींत गुप्त अराजक संस्थांचें जाळें ज्याप्रमाणें पसरलें आहे असें सरकारला वाटलें होतें त्याच प्रमाणें आतांहि झालें कीं काय असा त्याला संशय येऊं लागला; पण संशयाला आधारभूत गोष्टी सांपडेनातच. तथापि व्हाईसरायांच्या परवानगीनें बंगालच्या गव्हर्नरनीं एक नवा कायदा (ऑर्डिनन्स) करून त्याअन्वयें व १८१८ च्या तिसऱ्या रेग्युलेशग ॲक्टान्वयें देखील चौकशीशिवाय बंगाल्यांनां तुरुंगांत डांबून टाकलें. यांत कांहीं प्रमुख स्वराजिस्टहि होते. १९२४ सालच्या आरंभीं महात्मा गांधींनां अपेंडिसाईटीजचा रोग होऊन त्यांची प्रकृति ढांसळली तेव्हां सरकारनें त्यांनां सोडून दिलें. म. गांधी सुटल्यावर पुन: ते सरकारविरुद्ध जंगी मोहीम सुरू करून सर्व पक्ष एक करतील अशी जी त्यांच्या कांहीं भोळ्या अनुयायांनां मोठी आशा वाटत होती ती अगदीं फोल ठरून गांधी आणि स्वराजिस्ट यांच्यांतील फूट जास्तच रुंदावली. गांधींच्या मुत्सद्देगिरीवरून देखील बहुजनसमाजाचा विश्वास उडाला व केवळ एक सत्पुरुष म्हणून त्यांच्याविषयींची पूज्यबुद्धि शिल्लक राहिली. गांधी सुटल्यानंतर हिंदुमुसलमानांमधील दुही कमी होईल ही आशा देखील व्यर्थ गेली. वायव्यसरहद्द, पंजाब, संयुक्तप्रांत, दिल्ली, कलकत्ता, मध्यप्रांत आणि हैद्राबाद या भागांतून बकरीदच्या वेळीं हिंदुमुसलमनांत दंगे पुन: जोरांत सुरू झाले, तेव्हां कांहीं प्रत्यक्ष उपाय न सुचून गांधींनीं आततायीपणाचा एकवीस दिवसांचा उपवास आरंभिला. त्याच वेळीं दिल्ली येथें सर्व धर्मीयांची एक परिषद भरली आणि सर्वांच्या एकीकरितां कोणकोणत्या गोष्टी कराव्या यासंबंधीं उघडाउघड चर्चा झाली व परिषदेनें उत्कृष्ट ठराव पास केले, पण गांधींचा उपवास ज्या दिवशीं संपला त्याच दिवसापासून पुन्हां आणखी दंग्यांनां सुरवात झाली. हा दिवस जणूं काय सर्वांनीं अगोदर ठरवून ठेवलाच होता कीं काय असें वाटूं लागलें.

श्री. दास व त्यांचे अनुयायी यांनीं कौन्सिलबहिष्काराला फांटा देऊन कौन्सिलांत जें प्रयाण केलें त्याचा आरंभीं तरी असा अर्थ लावण्यांत येत असे कीं, सध्यांचीं टाकाऊ कौन्सिलें अजीबात मोडून तोडून टाकण्याकरितां आणि द्विदलराज्यपद्धतीला कायमची मूठमाती देण्याकरितां हे स्वराजिस्ट वीर सरकारच्या बालेकिल्ल्यांत घुसले आहेत! ही लोकांची समजूत खरी करून दाखविण्याकरितां आणि गांधींचा पक्ष सोडल्यामुळें आपण देशद्रोही बनलों नाहीं ही गोष्ट कृतीनें सिद्ध करण्याकरितां सर्व प्रांतिक कौन्सिलांतून स्वराजिस्टांनीं अडवणुकीचें धोरण अमलांत आणलें. मध्यप्रांत आणि बंगाल यांच्या दिवाणगिऱ्या, दिवाणांच्या पगाराचें बजेट फेटाळून लावून रद्द करविल्या, पण वरील दोन प्रांतांखेरीज इतरत्र स्वराजिस्टांचें तेज पडलें नाहीं.

या सालीं मांटेग्यु–चेम्सफर्ड सुधारणा कितपत अमलांत आणल्या गेल्या आहेत हें पाहून अहवाल तयार करण्याकरितां लॉर्ड ली यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिशन नेमलें गेलें. या कमिशनपासून देशाचा प्रत्यक्ष फायदा असा फारसा झाला नाहीं. प्रांतिक सरकारचे अधिकार वाढविणें व वरिष्ठ अधिकारावर हिंदी लोक घेणें या दोन गोष्टी सोडल्यास कमिशनपासून सर्व फायदा सिव्हिल सर्व्हंट लोकांचाच झाला. कारण कमिशनच्या सूचनांप्रमाणें त्यांचे पगार जबर वाढले आणि सत्ताहि वाढली.

या वर्षी ऑलेंपिक गेम्समध्यें पहिल्या प्रथमच हिंदी प्रतिनिधी घेण्यांत आला.

चालू सालच्या मागील२।३वर्षांचा राजकीय इतिहास स्थूलमानानें अवलोकन केला असतां असें दिसून येईल कीं, श्री. चित्तरंजनदास यांच्या वजनामुळें स्वराज्यपक्षाला जें महत्त्व प्राप्त झालें होतें तें दासांच्या मृत्यूनंतर (१९२५) ओसरूं लागलें. पं. मोतीलाल नेहरू यांच्या ठिकाणीं दासांइतपत करारीपणा, दूरदर्शीपणा व मनमिळाऊपणा नसल्यामुळें सबंध हिंदुस्थानांतल्या स्वराज्य पक्षावर त्यांनां छाप पाडतां आली नाहीं व त्यामुळें प्रांतिक पुढारी बळावू लागले व या पक्षांतून फितुरीहि होऊं लागली. पहिली फितुरी मध्यप्रांताच्या कायदेकौन्सिलचे अध्यक्ष श्री. तांबे यांची होय. त्यांनीं कार्यकारीमंडळांतील सभासदाची जागा स्वीकारून सरकारची नोकरी पत्करली. त्यांनां पाठिंबा डॉ. मुंजे, श्री. अणे, श्री. न. चिं. केळकर, बॅ. जयकर या टिळकपक्षीयांचा होता, हें उघडकीस येऊन वरील मंडळीचा एक नवा पक्ष 'प्रतिसहकार' या नांवानें स्वराज्यपक्षापासून फुटून पडला. याच वेळीं मुंबई प्रांतांतील गांधींचे वरील कट्टे अनुयायी नंतर कट्टे स्वराजिस्ट जे बॅ. विठ्ठलभाई

पटेल त्यांनीं लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचें अध्यक्षपद स्वीकारून आपली पक्षातीतता व्यक्त केली इतकेंच नव्हे तर जरूर तर व्हाईसरायच्या मकाणाकडे दिवसांतून अनेकदां खेटयाहि घालत जाऊं असें चक्क बोलून दाखविलें. तरी पण अद्याप स्वराजिस्ट त्यांनां आपणापैकींच एक समजतात! याप्रमाणें सरकारनें मोठ्या शिताफीनें पण अगदीं मुकाट्यानें गांधींच्या असहकारिता गोटांत दाणादाण उडवून देऊन लोकपक्षाचें १९२०–२१ सालीं वाढलेलें बल खच्ची करून टाकलें. असहकारितेच्या अमदानींत राजकारणाच्या वातावरणांत सरकारी दृष्टीनें जे अनिष्ट व भयप्रद फरक घडून आले होते ते नाहींसे होत जात जात पुन्हां वातावरण अगदीं पूर्ववत निवळलें व लोक सनदशीर भाषा बोलूं लागले आणि कृतीहि करूं लागले.

या १९२५ सालांत दक्षिण आफ्रिकेंत हिंदी लोकांनां तेथील सरकारचा जाच असह्य होऊन त्यांचें एक शिष्टमंडळ आपलीं गाऱ्हाणीं हिंदुस्थानसरकार व जनता यांच्यापुढें मांडण्याकरितां इकडे आलें होतें. तेव्हां हिंदुस्थानसरकारला कांहीं वाटून त्यानें मि. पॅडिसन यांच्या नेतृत्वाखालीं एक सरकारी शिष्टमंडळ प्रथम दक्षिण-आफ्रिकासरकारचा सल्ला घेऊन तिकडे पाठविलें. करचौकशीकमिटीचेंहि काम या सालअखेर संपून त्याचा अहवाल सरकारच्या दप्तरीं राहिला. हिंदी चलनासंबंधीं विचार करण्याकरितां एक कमिशन याच सालीं नेमण्यांत आलें. या सालच्या काँग्रेसची हकीकतहि निराशाजनक आहे. कारण बॅ. दास वारल्यानंतर स्वराजिस्टांविषयीं मोठ्या सहानुभूतीनें प्रेरित होऊन म. गांधी त्यांच्या बाजूला झुकले व त्याचा परिणाम म्हणजे १९२५ च्या सप्टेंबर महिन्यांत भरलेल्या ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या बैठकींत स्वराजिस्टांनां कौन्सिलांतील काँग्रेसचे प्रतिनिधी म्हणून मानण्यांत झाला. कट्टर असहकारितावाद्यांची ही एवढी मानहानि पुरेशी नव्हती म्हणूनच कीं काय कानपूरच्या काँग्रेस अधिवेशनांत स्वराजिस्टांचा कौन्सिलांतून सरकारशीं लढण्याचा राजकीय कार्यक्रम काँग्रेसचाच म्हणून स्वीकारण्यांत येऊन कट्टरांनां स्वराजिस्टांचे कौन्सिलनिवडणुकींतील खटपटे नेमण्यांत आलें!

पण इकडे स्वराजिस्टांनीं कट्टरांनां आपल्या गोटांत घातलें तर तिकडून त्यांच्यांतलेच महाराष्ट्रीय पुढारी कायमचे फुटून निघाले. बॅ. जयकर, श्री. न. चिं. केळकर, डॉ. मुंजे वगैरेनीं आपण स्वराजिस्टांच्या तिकिटावर निवडून आला तेव्हां आपला नवा कार्यक्रम चालविल्यास मतदारांची फसणूक केल्यासारखें होईल म्हणून कौन्सिलचे राजीनामे दिले. तथापि स्वराजिस्ट डगमगले नाहींत; त्यांनीं कानपूरच्या काँग्रेसमंडपांत सरकारनें 'राष्ट्रीय मागणी' ला उत्तर दिलें नाहीं तर आपण कौन्सिलांतून तडक बाहेर येऊं व पुढील निवडणुकीचा कार्यक्रम आंखण्यास काँग्रेसकमिटीलाच सांगूं अशी कट्टरांनां हमी दिली व त्यांचें तात्पुरतें समाधान केलें.

प्रतिसहकारपक्ष फुटल्यानें वऱ्हाड, मध्यप्रांत व मुंबई या बाजूंकडील स्वराजिस्टांचें बल अगदीं कमी झालें. शिवाय जानेवारींत (१९२६) असेंब्ली उघडतांना व्हाईसरायांनीं जें भाषण केलें तें सर्व राजकीय पक्षांना निराशादायकच होतें. तरी स्वराजिस्टांनीं या वेळीं कौन्सिलांतून बाहेर पाय न काढतां फेब्रुवारी अखेरपर्यंत सरकारच्या अंतःकरणाचा ठाव पहाण्याचा लोचटपणा केला व शेवटीं ऑ. इं. काँग्रेस कमिटीनें ८ मार्च रोजीं स्वराजिस्टांनां असेंब्ली सोडून येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ते बाहेर आले; तसेंच प्रांतिक कौन्सिलांतूनहि एकेक दिवस स्वराजिस्टांनीं निर्याणाचा फार्स करून घेतला. मध्यप्रांतांत मात्र स्वराजिस्टांनीं दिवाणांच्या पगाराची मागणी फेटाळून लावून मग निर्याण केलें. याप्रमाणें सारखीं तीन वर्षेंपर्यंत मध्यप्रांताला दिवाण लाभले नाहींत. ना. पटेल यांनीं अध्यक्षपद सोडावें म्हणजे सरकारवर बराच परिणाम होईल असा प्रयत्न काँग्रेसवाल्यांत चालला होता पण ना. पटेल मधले नाहींत.

या वर्षांत एक व्हाईसरॉय जाऊन दुसरे आले. लॉर्ड रीडिंग हे जातांना लोकांच्या मनांतून उतरले होते. त्यांची सबंध कारकीर्द असहकारिता दडपून टाकण्याच्या प्रयत्नांत गेली असल्यानें ते साहजिकच लोकांनां अरेरावी वाटले. लॉर्ड अर्विन हे नवे व्हॉईसराय शेतकी सुधारण्याच्या कामीं लक्ष घालणारे असल्यानें सर्वत्र शेतकी प्रदर्शनें, शेतकी कमिशनें यांचा बोलबाला झाला.

तेव्हां शेतकीचें बादशाही कमिशन जाहीर होऊन आगस्टमध्यें तिकडील यूरोपियन सभासद इकडे चौकशीला आले. या कमिशनवर कांहीं हिंदी सभासद असून लॉर्ड लिनलिथगो त्याचें अध्यक्ष आहेत. इंग्लंडांत

साक्षी घेऊन पुन्हां हें कमिशन नुकतेंच या हिवाळ्यांत इकडे आलें आहे.

चलन व हुंडणावळ यांची चौकशी करण्याकरितां मागच्या सालांत जें बादशाही कमिशन नेमण्यांत आलें होतें त्याचा अहवाल आगस्ट महिन्यांत बाहेर पडून देशांत खळबळ सुरू झाली. गोल्डस्टँडर्ड रिझर्व्ह व पेपरकरन्सी रिझर्व्ह हीं एकत्र करून एक इंडियन रिझर्व बँक काढावी व रुपयाचा दर १८ पेन्स करावा, सुवर्णचलन सध्यां सुरू करूं नये, अशा तज्ज्ञांचीं मतें या अहवालांत होतीं पण हिंदुस्थानसरकारनें प्रथम १८ पेन्स हा हुंडणावळीचा दर मान्य करून त्यासाठीं एक बिल तयार केलें तेव्हां लोकपक्षीय सभासद सगळाच अहवाल जर सरकार मान्य करील तरच हें हुंडणावळीचें बिल पुढें आणावें असा आग्रह धरून बसले व याचा विचार पुढें ढकलण्यांत आला. तेव्हां नाताळच्या-पूर्वी सेक्रेटरी ऑफ स्टेटनें अहवाल मान्य केल्याचें कळविलें. पण मध्यंतरीं मुंबईच्या व्यापाऱ्यांनीं इंडियन करन्सी लीग स्थापन करून १६ पेन्स दराबद्दल चळवळ चालविली तसेंच देशांत सुवर्णचलन सुरू करण्याविरुद्ध जें कमिशनचें मत होतें तें फिरविण्याचा प्रयत्न चालविला. कांहीं काँग्रेसचे पुढारीहि या चलनविषयक प्रश्नांत पडले व त्यांनीं संघ, पोटसंघ स्थापून या बाबतींत चळवळ मांडली. पण गौहत्तीच्या काँग्रेसनें लीगच्या सभासदानें यासंबंधीं आणलेला ठराव पसार केला नाहीं व लिबरल कॉन्फरन्सच्या अध्यक्षांनीं तर १८ पेन्सलाच दुजोरा दिला.

१९२६ सालच्या उत्तरार्धांत देशांत निवडणुकीची धामधूम चालली होती. हिंदुमुसलमानांत जिकडे तिकडे दंगेधोपे वर्षाच्या सुरुवातीपासून चाललेच होते. कलकत्याला तर फार मोठमोठे दंगे झाले व त्याचे प्रतिध्वनी इतरत्र उत्तरहिंदुस्थानांत एकसारखे उठत होते. शेवटीं वर्षअखेरीस स्वामीश्रद्धानंदजींचा खून एका फालतू मुसलमानानें भर दिवसां त्यांच्या घरीं जाऊन ते अंथरुणाला खिळले असतां केला. तथापि निवडणुकीच्या प्रसंगीं फारसा गोंधळ किंवा दंगा झाला नाहीं. निवडणुकी बहुतेक ब्राह्मण--ब्राह्मणेतर पक्षांतच चुरशीनें लढल्या गेल्या. मुंबई व नागपूरसारख्या शहरांतून स्वराज्य व प्रतिसहकारपक्ष यांमध्यें नेटानें लढा चालला होता. फक्त बंगाल आणि मद्रास या प्रांतांतून स्वराजिस्ट बहुमतानें निवडून आले. पंजाब व मध्यप्रांत यांत तर मागचें बहुमत ढांसळलें आणि इतर ठिकाणीं तर स्वराजिस्ट बहुतेक नामशेष झाले होते.

दक्षिण आफ्रिकेला गेलेल्या पॅडिसन शिष्टमंडळानें तेथील वातावरण बरेंचसें अनुकूल करून घेतलें व आफ्रिकेंतील यूरोपियन रहिवाश्यांचें एक शिष्टमंडळ हिंदुस्थानांत येण्याबद्दल नक्की केलें व तसेंच हिंदुस्थान सरकारचें एक शिष्टमंडळ व आफ्रिकन सरकार यांचें एकत्र खलबत व्हावें म्हणूनहि ठरलें. त्याप्रमाणें मि. बेअर्स व मि. डंकन यांच्या पुढाकारीपणानें आफ्रिकन शिष्टमंडळ इकडे येऊन त्यानें हिंदी लोकांविषयीं बरीच सहानुभूति दाखविली. याच वेळीं यूनियनचा अध्यक्ष जनरल हर्टझोग हा लंडन येथें भरलेल्या साम्राज्य परिषदेला जाऊन आला असल्यामुळें त्याला साम्राज्यविषयक अभिमानहि उत्पन्न झाला होता. तेव्हां याच योग्यवेळीं हिंदी प्रश्नांची छाननी झाल्यास हिंदी लोकांच्या वतीनें बराचसा निकाल होईल असें सर्वत्र वाटूं लागलें. हिंदुस्थानसरकारचें शिष्टमंडळ सर हबिबुल्ला यांच्या नेतृत्वाखालीं आफ्रिकेला गेलें. शिष्टमंडळांत यावेळीं ने. ना. श्रीनिवासशास्त्री होते.

एकेचाळीसावी काँग्रेस आसामांत गौहत्तीला श्री. श्रीनिवास अयंगार यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. या अधिवेशनाला प्रतिसहकारपक्षाचे पुढारी गेले नव्हते. मागच्याप्रमाणेंच दिवाणगिऱ्या किंवा सरकारच्या हातांत असणाऱ्या नोकरीच्या जागा पत्करूं नये व स्वराजिस्टांनीं 'राष्ट्रीय मागणी'ला अनुकूल उत्तर येईपर्यंत बजेट फेंटाळून लावावें वगैरे ठरलें; तथापि राष्ट्रीय हिताचे, शेतकी आणि औद्योगिक उन्नतीचे व मजुरांच्या हक्कसंरक्षणाचे ठराव कौन्सिलांतून आणण्यास काँग्रेसवाल्यांनां परवानगी देण्यांत आली. निर्भेळ स्वातंत्र्य मिळविण्याचें उद्दिष्ट देशापुढें ठेवणारा ठराव खुद्द महात्मा गांधींनींच हाणून पाडला! हिंदुमुसलमानांतील तेढीचे प्रश्न वर्किंग कमिटीच्याकडे सोंपवून या काँग्रसनें गौहत्तीचा गाशा गुंडाळला.

चालू सालची पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे साम्राज्यांत हवेंतून वाहातुक सुरू झाल्याची होय. सर सॅम्युएल होअर हे ब्रिटिश मंत्रिमंडळांतील वैमानिक मंत्री सहकुटुंब लंडनहून दिल्लीला निर्धोक व सुखानें बादशहांचा संदेश घेऊन आले. यापुढें हिंदुस्थानसरकारनें या साम्राज्य वैमानिक मार्गाचे फांटे या देशांत मोठमोठ्या शहराला जाण्याकरितां पाडावयाचे आहेत.

व हें कार्य लवकरच सरकारनें हातीं घेतलेंहि आहे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे आफ्रिकन सरकार व हिंदी शिष्टमंडळ यांच्यामध्यें झालेले समाधानकारक करारमदार होत. या करारांअन्वयें आफ्रिकन सरकारनें क्लास एरियाज रिझर्व्हेशन बिल जें तेथील हिंदी लोकांनां अतिशय घातुक होणार होतें तें सोडून दिलें व हिंदी समाज हा आपल्या प्रजेपैकीं एक अखंड भाग म्हणून कबूल करून हिंदी लोकांच्या शिक्षणाची व अन्य बाबतींत काळजी घेण्याविषयीं आश्वासन दिलें. व्यापारी निर्बंधहि दूर करण्याचें मान्य केलें इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानसरकारचा एक एजंट आफ्रिकेंत ठेवण्याविषयीं हिंदुस्थानसरकारला त्यानें विनंति केली. आफ्रिकेंत हिंदी लोकांनां प्रवेश होण्यास कांहीं सवलती जरी आफ्रिकन सरकारनें ठेवल्या असल्या तरी आफ्रिकेंतील विद्यमान हिंदी लोकांची कांहीं करार न पाळल्यास इकडे बोळवण करण्याच्या आफ्रिकन सरकारच्या स्वार्थी धोरणाला हिंदी शिष्टमंडळानें नाखुषीनें संमति दिली. कारण पाश्चात्त्य पद्धतीची रहाणी देशांत कायम ठेवण्याचा यूनियनसरकारचा हक्क अमान्य करण्यासारखाच नव्हता. तीन वर्षें यूनियनच्या बाहेर राहिल्यास रहिवाशीपणाचा हक्क जातो, असेंहि एक कलम यूनियनसरकारनें घातलें तथापि या करारांच्या मसुद्यांवर ना. शास्त्री, म. गांधी, मि. सी. एफ. अँड्र्यूज यांनीं सद्यःपरिस्थितींत समाधानकारक म्हणून मान्यतेचा शेरा मारला व सरकारनेंहि याचा स्वीकार केला. ने. ना. श्रीनिवासशास्त्री यांनां पहिले एजंट जनरल नेमण्यांत येऊन आफ्रिकेस पाठविलें.

मध्यवर्ती कायदेमंडळांत मार्च महिन्यांत करन्सी बिल सरकारनें पुढें आणलें. हुंडणावळीचा दर १८ पेन्स असावा असा सरकारचा आग्रह व त्याविरुद्ध तो १६ पेन्स असावा ही लोकपक्षीय चळवळ गेल्या सालपासून चालू होती. पण तिचा कांहीं उपयोग न होतां १८ पेन्सांची सूचना कायम झाली.

१८ पेन्स दर कायम झाल्याचें पाहून लोकप्रतिनिधी खवळले व त्यांनीं फायनॅन्स बिलाच्या चर्चेच्या वेळीं मिठावरील कर सव्वा रुपयावरून १० आण्यांवर आणून ठेवला. पण कौन्सिल ऑफ स्टेटनें नेहमींप्रमाणें ही चूक दुरुस्त केली! चालू सालच्या मे महिन्यांत लाहोर, डाका, सुरत व बडोदें या भागांत हिंदुमुसलमानांत दंगे झाले. डाका, सुरत व बडोदें या ठिकाणीं शिवाजीच्या त्रिशत–सांवत्सरिक उत्सवप्रसंगींच्या मिरवणुकीमुळें मुसुलमानांनीं हिंदूंवर हल्ले केले होते मुंबईस तर दंग्याच्या भीतिमुळें हत्तीवरून मिरवणूक काढूं दिली नाहीं.

हिंदुस्थानाला स्वतंत्र आरमार असावें म्हणून त्याची योजना बरेच दिवस कौन्सिलांत व सरकारांत चालू होती शेवटीं यंदा पार्लमेंटमध्यें हिंदी आरमारी बिल पास होऊन त्याला बादशहाची अनुमति मिळाली (२९ जून). आतां हिंदी तरुणांनां आरमारी शिक्षण देण्याची व्यवस्था सरकारकडून होत जाईल, हें खरें. पण आतांच हिंदुस्थानला स्वतंत्र आरमार देण्याचा उदारपणा ब्रिटिशसरकारनें कां दाखविला याबद्दल हिंदी पुढाऱ्यांत तर्कवितर्क चालू आहेत. कोणीं म्हणतात यापुढें युद्धांत आरमारांची फारशी अवश्यकता लागणार नसल्यानें हें अनुपयुक्त शिक्षण हिंदी लोकांनीं घेतल्यास कांहीं बिघडणार नाहीं, असें सरकारचें धोरण असेल. दुसऱ्या कांहींच्या मतें हिंदुस्थानावर अप्रत्यक्ष रीतीनें लष्करी खर्चाचा बोजा बसविण्याचा हा एक प्रकार आहे. वास्तविक हिंदी व्यापारी जहाजांची वाढ करून त्यांचा उत्कर्ष होईल अशा सवलती सरकारनें द्यावयास पाहिजे होत्या. असो. आतां कांहीं हिंदी लोक तरी उत्तम नावाडी व नाविक अधिकारी होऊं लागतील व आज बरींच शतकें हें नाविक शिक्षण आपल्या लोकांनां अगदीं वावडें झालें होतें तें मिळूं लागेल.

जून महिन्यांत नागपुरास हत्याराचा कायदा मोडून सत्याग्रह करण्यास सुरुवात झाली. बंगालच्या देशभक्तांची चौकशीशिवाय तुरुंगांत जी कुचंबणा होत आहे तिच्यावर परिणाम व्हावा म्हणून मि. आवारी यांच्या नेतृत्वाखालीं कांहीं तरुणांनीं हा सत्याग्रह केला. मि. आवारी व कांहीं स्वयंसेवक तुरुंगांत गेल्यानंतर कांहीं दिवसांनीं हा सत्याग्रह थांबला. मद्रासकडे कर्नल नीलचा पुतळा फोडण्याबद्दल असाच सत्याग्रह चालला होता.

हिंदुस्थानसरकारनें गुदस्तां(जून १९२६)कापसाच्या गिरण्यांनां संरक्षण मिळावें म्हणून कापसाच्या व कापडाच्या धंद्याचें निरीक्षण करून योग्य सूचना करण्याकरितां मि. नॉईस यांच्या अध्यक्षतेखालीं एक टारिफबोर्ड नेमलें होतें. या बोर्डाचा अहवाल जूनमध्यें प्रसिद्ध झाला. सभासदांचें (एकंदर तीन नॉईस, पं. कौल व एन्. एस. सुब्बराव) ऐकमत्य न झाल्यानें अध्यक्षांनांच वेगळी

मतपत्रिका जोडावी लागली. बहुमताचा निष्कर्ष असा कीं, जपानशीं स्पर्धा करावी लागत असल्यामुळें हिंदी मालाचा टिकाव लागत नाहीं. या धंद्यांत कांहीं सुधारणा केल्या पाहिजेत. संरक्षक जकात बसवावी. तलम सुताला उत्तेजन देण्यासाठीं दर पौंडाला एक आणा याप्रमाणें चार वर्षें बौंटी द्यावी. मि. नॉईसनां या सूचना मान्य नव्हत्या, फक्त जपानच्या मालावर चार टक्के जकात बसवावी असें त्यांचें म्हणणें होतें. हिंदुस्थान सरकारनें आयात कापडावर जकात वाढविण्याचें नाकारून आयात सुतावर दर पौंडास सुमारें १॥ आणा जकात बसविण्याचें कबूल केलें व गिरण्यांतील यंत्रांबरोबर गिरण्यांतून नेहमीं लागणाऱ्या सामानावरील जकात माफ केली. पण याबरोबरच आयात कृत्रिम रेशमावरची जकात १९ टक्के होती ती निम्मी केली. पण यामुळें गिरणीवाल्यांचा फायदा तर झालाच नाहीं तर उलट सूत महागून तोटा मात्र झाला व हातमागावर कापड काढणाऱ्यांचें फार नुकसान होणार होतें. गिरणीवाल्यांनां आयात कापडावर जादा जकात पाहिजे होती.

गुजराथ आणि काठेवाड या प्रदेशांतील संस्थानांच्या मालकीचीं बरींच चांगलीं बंदरें आहेत. पण हिंदुस्थान सरकार आपलीं जकातीचीं नाकीं या बंदरांशेजारीं ठेवीत असल्यानें संस्थानांनां दर्याव्यापाराचा फारसा फायदा नव्हता. तेव्हां १९०५–१७ पर्यंत संस्थानिक व ब्रिटिश सरकार यांमध्यें वाटाघाटी होऊन १९१७ मध्यें सरकारनें नवा करार करून आपलीं नाकीं उठविलीं व तेव्हांपासून काठेवाडांतील बंदरांची फार भरभराट झाली व संस्थानें अधिकाअधिक सधन होऊं लागलीं. पण यामुळें सरकारचें उत्पन्न बुडूं लागलें व मुंबईचे व्यापारी, संस्थानिक अयोग्य चढाओढ करून माल आपल्या बंदरीं ओढतात अशी तक्रार करूं लागले. तेव्हां हिं. सरकारचे एजंट यांनीं संस्थानिकांशीं वाटाघाट केली पण संस्थानिकांनीं साफ उत्तर दिलें कीं आम्हीं १९१७ चा करार मोडला नाहीं तर सरकारनें आपलें इमान राखावें व आपलीं जकाती नाकीं पुन्हां बसवूं नयेत. हिंदुस्थान सरकारनें कांहीं सवलती दाखवून निर्वाणीचा एक खलिताहि पाठविला पण त्याला उत्तर न आल्यामुळें विरमगांव वगैरे ठिकाणीं सरकारी नाकीं पूर्ववत बसलीं! सरकारच्या या अन्यायी वर्तनाविरुद्ध काठेवाडी संस्थानिकांनीं विलायतेपर्यंतहि ओरड नेली पण अद्याप कांहीं उपयोग झाला नाहीं.

जुलईअखेर गुजराथेंत अतिवृष्टि झाली व पर्जन्यदेव तीवर कोपला आहे कीं काय असें वाटूं लागलें. कारण अहमदाबाद, बडोदें, नाडियाद, काठेवाड, वगैरे भागांत आगगाडीचें अजीबाद दळणवळण तुटलें व बरीच मोठी प्राणहानि या सर्व भागांत झाली. तारांचेहि संबंध तुटल्यामुळें समुद्रांत असहाय्य पडल्याप्रमाणें लोकांची फार दुर्धर स्थिति होऊन गेली. ओरिसा व सिंध या प्रदेशांतहि जलप्रलयामुळें अशीच वाताहात झाली. तेव्हां ही दैवी आपत्ति अंशतः निवारण्यासाठीं खाजगी व सरकारी फंड निघाले असून त्यांतून आपद्ग्रस्तांनां व वाहून गेलेल्या प्रदेशांची पुनर्रचना करण्यासाठीं चांगली मदत होत आहे.

हुंडणावळीचा दर एकदां १८ पेन्स हा ठरला तरी करन्सी बिलाची अजीबात वाट लागली नव्हती. रिझर्व्ह बँकेची जी कमीशनची सूचना होती तिचा विचार करण्याकरितां एक सिलेक्ट कमिटी नेमण्यांत आली. हिचें काम मुंबई व कलकत्ता येथें चालून कमिटीनें ता. २९ जुले रोजी रिपोर्ट तयार केला. कमिटींत लोकपक्षाचें बहुमत असून त्यानें (१) वीस रुपयांची एक मोहोर हें सुवर्णचलन असावें, (२) बँकेचें भांडवल सरकारनें भरावें, (३) बोर्डावरील कांहीं जागा मध्यवर्ती व प्रांतिक कायदेकौन्सिलांनीं भराव्या असें ठरविलें. हा कमिटीचा रिपोर्ट असेंब्लींत आला तेव्हां सरकारी बाजूनें भागीदारी बँक करण्यासाठीं व डायरेक्टरांत होतांहोईतों फारसे लोकपक्षीय प्रतिनिधी न घेण्यासाठीं अटोकाट प्रयत्न केला. तो इतका कीं रिझर्व्ह बँक आपल्या पदरीं पडते कीं नाहीं अशी भीतीहि लोकांनां वाटूं लागली. कारण स्टेट सेक्रेटरीला मनापासून अशी सरकारी अधिकार नष्ट करणारी बँक नको होती. हिं. सरकारचे फडणीस सर बेसिल ब्लॅकेट यांनां तर सद्हेतुपूर्वक ती स्थापन होण्यास पाहिजे होती. तेव्हां शेवटीं ब्लॅकेट साहेबांच्या कलानें घेण्यासहि लोकप्रतिनिधी तयार होते. पण एकाएकी इंग्लंडहून हुकूम सुटून हें बिल मागें घेण्यांत आलें! आतां पुन्हां कदाचित तें कौन्सिलमध्यें येईल असें कांहीं आशावादी म्हणतात.

हिंदी लोकांची लष्करी अधिकारांच्या जागांवर भरती करण्यासंबंधीं स्कीन कमिटीच्या अहवालाप्रमाणें तरतूद व्हावी अशा आशयाचा डॉ. मुंजे यांचा ठराव असेंब्लींत पसार झाला आहे. पण त्याची कितपत अंमलबजावणी होते हें पहाणें आहे.

सप्टेंबर महिन्यांत नागपूर, कानपूर, सोलापूर, अहमदाबाद, रायबरेली वगैरे ठिकाणीं हिंदुमुसलमानांचे दंगे झाले. यापूर्वी बरेच दंगे झाले म्हणून व्हाईसरायांनीं हिंदुमुसलमानांच्या एकीकरितां सर्व पुढाऱ्यांनीं कसून प्रयत्न करावा, त्यांनां आपण वाटेल ती मदत देऊं असा मोठ्या कळकळीनें कौन्सिल सभासदांनां उपदेश केला होता व त्याप्रमाणें एक ऐक्य परिषद बॅ. जिना यांच्या अध्यक्षतेखालीं भरलीहि होती. दिल्लीस तिचें काम चालू असतांना दुसरीकडे एकसारखा रक्तपात होत होता. अखेर या ऐक्यपरिषदेला कांहींहि यश न येतां ती मोडली.

मध्यंतरीं दिवाणगिऱ्या बंद पाडण्यासाठीं दिवाणांसंबंधीं निषेधप्रदर्शक ठराव प्रांतिक कायदेमंडळांतून आणले गेले होते. पण बंगालखेरीज कोठेंहि त्यांचा उपयोग झाला नाहीं. बंगालच्या दोन्ही दिवाणांनीं लगेच राजीनामे सादर केले पण गव्हर्नरनीं पुन्हां दुसरे दिवाण निवडून द्विदलराज्यपद्धति चालू केली.

**स्टॅटुटरी कमिशन**—नव्हेंबरच्या आरंभीं एकदम हिंदुस्थानला पुढील सुधारणांचा हप्ता द्यावा कीं नाहीं, तो कितपत, कोणत्या दर्जाचा द्यावा या गोष्टी चौकशी करून ठरविण्यासाठीं एक स्टॅटुटरी कमिशन नेमल्याचें जाहीर झालें. या कमिशनवर सात सभासद असून त्यांपैकीं ५ कामन्स सभेंतील व २ लॉर्ड्स सभेंतील आहेत. पक्षवारी केल्यास एक लिबरल (अध्यक्ष), दोन लेबर व चार कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाचे आहेत. सर जॉन सायमन हे या कमिशनचे अध्यक्ष आहेत ही त्यांतल्या त्यांत चांगली गोष्ट आहे. पण यावर कोणीहि हिंदी सभासद नाहीं म्हणून हिंदुस्थानांत जिकडे तिकडे कमिशनचा निषेध केला गेला व जात आहे. कमिशनवर अजीबात बहिष्कार घालण्यासंबंधीं चळवळ फार जोरानें चालू आहे. प्रागतिक, स्वराज्यपक्षीय, कट्टर असहकारितावादी, प्रतिसहकारी वगैरे सर्व पक्ष थोड्याफार मतभेदानें या बहिष्काराला अनुकूल आहेत. कांहीं ब्राह्मणेतर व मुसलमान उपपक्ष बहिष्काराच्या विरुद्ध असून कांहीं स्वतंत्र उपपक्ष तटस्थ आहेत. प्रत्येक कौन्सिलांतून एक प्रातिनिधिक सेलेक्ट कमिटी निवडली जाणार असून त्यांमार्फत आलेल्या कैफियतींचा व सूचनांचा कमिशन विचार करणार आहे. कमिशनचा अहवाल तयार झाल्यानंतर हिंदुस्थान सरकार व ब्रिटिश सरकार त्याची बारकाईनें पाहणी करील व हिंदुस्थानांतील निरनिराळ्या पक्षांचीं मतें घेतल्याखेरीज हा अहवाल पार्लमेंटपुढें ठेवला जाणार नाहीं अशा प्रकारची सरकारकडून आशा दाखवून ठेवण्यांत आलेली आहे. या कमिशनचा अहवाल १९२९ पर्यंत बाहेर पडणार नसल्यानें कमिशनच्या वृत्तीविषयीं आज निश्चित कांहींच म्हणतां येणार नाहीं.

**बृहद्भारत**—आपले हिंदी बांधव परदेशांत जे आहेत त्यांची वास्तपुस्त करून त्यांच्याशीं आपला संबंध निगडित करणें हें आपलें कर्तव्य आहे. आपलें परदेशगमन हें किती जुनें आहे हें या भागांतच दुसरीकडे (प्र. ७ सांपत्तिक स्थिति) वर्णिलें आहे. अर्वाचीन परदेशगमनासंबंधीं विस्तृत विचार आंकडेवारीसह ज्ञानकोशाच्या प्रस्तावना खंडांत पहिल्याच विभागांत एका स्वतंत्र प्रकरणांत (प्र. ९ वें) या प्रश्नाच्या महत्त्वामुळेंच करावा लागला असून, त्या ठिकाणीं आफ्रिका व अमेरिका या खंडांतील हिंदी लोकांच्या वसाहतींची दुःखदायक कहाणी दिली आहे. कुलीपद्धतीचा इतिहास, फिजी बेटांतल्याप्रमाणें स्वतंत्र हिंदी लोकांच्या वसाहती, दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांचा अनन्वित छळ, इतर यूरोपियन राष्ट्रांची वृत्ति, मुदतबंद मजूरपद्धति, सरकारी धोरण व मदत, पाश्चात्य देशांत गेलेल्या चिनी जपान्याशीं परदेशस्थ हिंदी मजुरांची तुलना, परदेशांतील आपल्या लोकांची स्थिति सुधारण्यास उपाय वगैरे प्रश्नांची चर्चा वरील प्रकरणांत केलेलीच आहे. तेव्हां या ठिकाणीं फक्त सध्यांची महायुद्धानंतरची बृहद्भारताची कशी काय व्यवस्था आहे, हें थोडक्यांत अवलोकन करूं.

परदेशांत जे हिंदी लोक गेलेले आहेत ते एकाच धंद्याचे, जातीचे किंवा दर्जाचे नाहींत. कांहीं अकुशल (बिगर कारागीर) मजूर फिजी, मॉरिशस, नाताळ, वेस्ट इंडीज यांसारख्या ठिकाणीं विशिष्ट करारांनीं बद्ध होऊन गेले आहेत. दुसरे व्यापारी, कारागीर, कारकून, धंदेवाईक यांसारखे लोक वरील मजुरांच्या मागून आपण होऊनच परदेशीं गेलेले आहेत. ज्या भागांत (उदा. पूर्व आफ्रिका) मुदतबंद मजुरीची पद्धत नाहीं अशा भागांतून विशेषेंकरून हे लोक आहेत. तेव्हां परदेशीं गेलेले सर्वच लोक मजूर म्हणून नांदत नाहींत. यांपैकीं कांहीं थोडे हिंदी लोक स्वयंशासित देशांच्या नागरिकांप्रमाणें हक्क भोगतात पण बाकीच्यांचे फार हाल चालले आहेत. मतदानाचा हक्क व हिंदी लोकांनां स्थायिक होण्यासंबंधांत अडी या बाबतींत तर हिंदी लोकांवर

स्थानिक अधिकारी जनतेचा जुलूम होत आहे व त्याचा कळस आफ्रिकेंत झाला आहे. या जुलुमाचे वांटेकरी दोन आहेत: एक स्वयंशासित (डोमिनीयन) दर्जाचे देश व दुसरा ब्रिटिश वसाहती (कॉलनीज). स्वयंशासित देशाबद्दलच्या तक्रारी कोणाकडे न्यावयाच्या? तेव्हां राहतां राहिल्या ब्रिटिश वसाहती. त्यांच्या दुर्वर्तनाबद्दल मात्र ग्रेटब्रिटन जबाबदार धरलें पाहिजे. १९१८ च्या साम्राज्य युद्धपरिषदेंत जरी प्रत्येक साम्राज्यघटकाला स्वतःच्या देशांत लोक यावेत किंवा येऊं नयेत यासंबंधीं ठरविण्याला मुखत्यारी दिली होती. तथापि १९२१ च्या साम्राज्यपरिषदेंत हिंदी लोकांच्या नागरिक हक्काला मान्यता देण्याबद्दल जेव्हां ठराव झाला होता. त्यावेळीं दक्षिण आफ्रिकाच फक्त नामानिराळी होती पण परिषदेनें, सद्यःस्थितीसंबंधीं हिंदुस्थाननें त्यांच्याशीं स्वतंत्रपणें करारमदार करावेत अशी सूचना दिली होती. म्हणजे यावेळीं हिंदुस्थानचा वसाहतींबरोबरचा समान दर्जा मान्य करण्यांत आला होता.

या परिषदेनंतर ने. ना. श्रीनिवासशास्त्री हे हिंदुस्थानसरकारचे प्रतिनिधि म्हणून साम्राज्यपरिषदेच्या ठरावानुसार डोमिनीयन सरकारशीं हिंदी लोकांच्या परिस्थितीसंबंधीं बोलणें करण्याकरितां कानडा, न्यूझीलंड, व आस्ट्रेलिया या भागांत फिरून आले. पण कांहीं स्थानिक कारणांमुळें परिषदेचा ठराव कोठेंहि तंतोतंत अंमलांत आणतां आला नाहीं. यानंतर हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोकांचें लक्ष कॉलनी व मँडेटेड टेरीटरी यांतील हिंदी लोकांच्याकडे ओढलें गेलें. कांहीं कॉलनी व मँडेटरी प्रदेशांतून हिंदी लोकांचा दर्जा बहुतेक ब्रिटिश नागरिकांबरोबरीचाच आहे. उदा. वेस्ट इंडीजमध्यें ब्रिटिश ग्यायाना, त्रिनिदाद व जमैका या प्रदेशांत बरीच हिंदी वस्ती असून तिचा दर्जा इतरांहून कमी नाहीं. सीलोनमध्यें हिंदी लोकांनां मतदानाचा सरसकट हक्क आहे. त्याचप्रमाणें मॉरिशिअसची गोष्ट आहे. पण फिजीमध्यें लोकसंख्येच्या मानानें हिंदी लोकांचे कौन्सिलमध्यें व म्युनिसिपालिट्यांतून प्रतिनिधी नाहींत, शिवाय फिजीअन नसल्यामुळें त्यांच्यावर डोईपट्टी बसते.

टँगानिका:—टँगानिकाच्या मँडेटरी भागांत बरीच हिंदी वस्ती आहे. १९२३ मध्यें तीन नवे कायदे करून हिंदी लोकांवर कर लादण्यांत आले; इतर कांहीं गोष्टी तिकडच्या राज्यव्यवस्थेंत अशा होत्या कीं, त्यामुळें हिंदी व्यापाऱ्यांचें नुकसान होत असे. तेव्हां हिंदी लोकांनीं संप पुकारून कलोनियल ऑफिसकडे तक्रारी नेल्या, इकडून हिंदुस्थान सरकारनेंहि कलोनियल ऑफिसला स्वतंत्र लिहिलें. यासंबंधीं लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें १९२४ च्या वर्षाधिवेशनांतून राष्ट्रसंघाकडे हिंदुस्थानच्या प्रतिनिधींनीं गाऱ्हाणें नेण्याचें ठरलें.

केनिया:—सर्वांत जास्त त्रास म्हणजे केनियांतील हिंदी लोकांनां होत होता. या वसाहतींत बरेचसे हिंदी-मजूर व भांडवल अडकून राहिलेलें आहे; व या वसाहतीची प्रगति करण्यांत हिंदी लोकांचा बराच मोठा भाग आहे. यूरोपियन लोकांपेक्षां त्यांची संख्याहि जास्त आहे. या वसाहतींतील उंचवट्यावरील प्रदेश हिंदी लोकांनां द्यावयाचे नाहींत; कौन्सिलमध्यें योग्य निवडणूकीनें हिंदी प्रतिनिधी घ्यावयाचे नाहींत. बाहेरचीं हिंदी माणसें वसाहतींत येऊं द्यावयाचीं नाहींत. यांसारख्या प्रतिबंधक गोष्टी यूरोपियन अधिकारी करीत होते. वर्णद्वेष तर भयंकर माजला होता. तेव्हां इकडे हिंदुस्थानांत मोठी खळबळ उडून जाऊन हिंदुस्थान सरकारचा कमकुवतपणाविषयीं धिःक्कारहि करण्यांत आला. तेव्हां हिंदुस्थान सरकारनें मनावर घेऊन ब्रिटिश सरकार व कलोनियल ऑफिस यांच्याकडे मसलती चालविल्या. तेव्हां १९२३ सालीं 'व्हाईट पेपर' प्रसिद्ध झाला. पण त्यांत वसाहत सरकारच्या धोरणालाच उचलून धरलेलें होतें. फक्त ९ हिंदी प्रतिनिधी कौंसिलांत घेतले; टाऊनशिपमध्यें जरी हिंदुयूरोपियनमध्यें भेदभाव ठेवला नाहीं तरी उंचवट्याचे प्रदेश केवळ यूरोपियनांकरितां राखून ठेवण्यांत आले होते. या बादशाही निकालामुळें तर सर्वांचीच तीव्र निराशा झाली. असेंब्लीनें तर रागारागानें इतर ब्रिटिश वसाहतींतील माणसांनां ब्रिटिश इंडियांत येण्यासंबंधांत विशिष्ट अटी घालून एक ठरावहि एका दिवसांत पास केला.

१९२३ च्या साम्राज्य परिषदेंत दक्षिण आफ्रिकेखेरीज इतर वसाहतींनीं हिंदी लोकांचा वसाहतीच्या राज्यांतून ब्रिटिशनागरिकांबरोबरीचा हक्क मान्य केला. व ब्रिटिश वसाहतींतील हिंदी नागरिकांचा विचार करण्यासाठीं एक वसाहत कमिटी नेमण्याचेंहि ठरलें. त्याप्रमाणें १९२४ मध्यें कमिटी बसली व तिचा निर्णय म्हणून पार्लमेंटांत असें जाहीर करण्यांत आलें कीं, मतदान आणि उंचवट्यावरील प्रदेश याबाबतींत 'व्हाईट पेपर' च्या अटींत कांहींहि फरक केला नाहीं; पण केनिया वसाहतींत बाहेरचे हिंदी लोक न येण्याबद्दलची

अट शिथिल केली आहे. हिंदी शेतकऱ्यांकरितां सखल प्रदेशांत कांहीं जागा राखून ठेवावयाची आहे व त्याकरितां हिंदुस्थानांतून एक तज्ज्ञ येईल. याप्रमाणें केनियासंबंधीं उडालेली खळबळ कांहींशी शांत करण्यांत आली.

टँगानिका आणि फिजी यांसंबंधीं कमिटीनें केलेल्या गाऱ्हाण्यांचा निकाल अद्याप बाहेर पडला नाहीं. चौकशी चालू आहे.

पूर्व आफ्रिकाः–१९२४ च्या जून महिन्यांत बादशाही सरकारनें ब्रिटिश पूर्व आफ्रिकेंतील प्रदेशांचा कारभार व आर्थिक प्रगति यांसंबंधीं चौकशी करण्याकरितां लॉर्ड सौथबरोच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली. हिंदुस्थान सरकारच्या विनंतीवरून या कमिटीपुढें पूर्वआफ्रिकेतील हिंदी लोकांचीहि बाजू मांडण्याचें ठरलें. पण यानंतर जें गाडें थांबलें तें थांबलेंच.

दक्षिण आफ्रिकाः–यासंबंधीं मागील (१९२० पर्यंतचा) सविस्तर इतिहास ज्ञा. को. प्रस्तावना खंडाच्या पहिल्या विभागांत दिलाच आहे. नाताळमध्यें १९२२ आणि १९२३ सालीं टाउनशिप मतदानांसंबंधींचा मागील कायदाच पुढें मांडण्यांत आला होता. पण दोन्ही वेळां युनियन सरकारनें त्याला संमति दिली नाहीं. पण १९२३ त युनियन सरकारनें स्वतःच क्लास एरिया बिल पुढें आणून आशियाटिक लोकांनां सक्तीनें दक्षिण आफ्रिकेंत मज्जाव करण्याचा घाट घातला. हिंदी नागरिकांनां यापासून बाध यावयाचा नाहीं अशीं जरी युनियन सरकारनें कितीहि आश्वासनें दिलीं तरी हिंदी लोकांचा त्यांवर साहाजिक विश्वास बसेना. पण मध्यंतरी द. आ. पार्लमेंट बरखास्त झाल्यामुळें हें बिल बारगळलें. पण १९२४ च्या डिसेंबरांत नेटल बरोज ऑर्डिनन्स बिल गव्हर्नर जनरलची संमति मिळून त्याला कायद्याचें स्वरूप आलें. १९२५ सालाच्या आरंभीं कांहीं विशिष्ट धंद्यांत आशियाटिक लोकांची तज्ज्ञता मान्य न करणारा असा माईन्स अँड वर्क्स ॲक्ट युनियन सरकार पुढें आणणार असल्याचेंहि जाहीर झालें. तेव्हां हिंदुस्थान सरकारनें तक्रारी केल्यावरून ठरावाच्या सेलेक्ट कमिटीनें हिंदी लोकांनां सोयीस्कर असा शब्दांचा फरक मात्र केला. हें बिल युनियन असेंब्लीनें पसार केलें व सेनेटनें फेटाळलें. पण पुढील वर्षीं तें पुन्हां घेण्यांत आलें. पण याची फारशी अंमलबजावणी होणार नाहीं असें युनियन सरकारनें हिंदुस्थान सरकारला कळविलें.

१९२५ च्या जुलै महिन्यांत युनियन असेंब्लीमध्यें वरील बिलापेक्षां जास्त जाचक असें एरियाज रिझर्वेशन अँड इमिग्रेशन अँड रजिस्ट्रेशन बिल आणण्यांत आलें. तेव्हां यूनियन सरकारची प्रत्यक्ष समजूत करण्याकरितां व तेथील हिंदी लोकांची परिस्थिति पाहण्याकरितां हिंदुस्थानांतून पॅडिसन शिष्टमंडळ आफ्रिकेंत पाठविण्यांत आलें. तेव्हां यु. सरकार आणि हिंदु. सरकार यांच्यामध्यें असें ठरलें कीं दोन्ही सरकारच्या प्रतिनिधींची मुलाखत केपटाऊनमध्यें व्हावी व तोंपर्यंत बिल पार्लमेंटपुढें ठेऊं नये. हिंदुस्थान सरकारच्या विनंतीवरून एक आफ्रिकन शिष्टमंडळ हिंदुस्थानांत येऊन गेलें. नंतर १९२६ च्या अखेरीस ना. सर हबिबुल्ला यांच्या अध्यक्षतेखालीं एक प्रतिनिधीमंडळ आफ्रिकेला पाठविण्यांत आलें. त्याची हकीकत मागें याच प्रकरणांत येऊन गेली आहे. दोन्ही सरकारांच्या प्रतिनिधींचा वाटाघाट होऊन क्लास एरिया बिल मागें घेण्यांत आलें व हिंदी लोकांनीं उच्च युरोपियन राहाणी पत्करल्याखेरीज त्यांनां द. आफ्रिकेचे नागरिक बनतां येणार नाहीं असें नक्की झालें. ज्यांनां हिंदुस्थानांत परत यावयाचें आहे त्यांची सोय दोन्ही सरकारें लावतील व हिंदुस्थानचा एक वकील दक्षिण आफ्रिकेंत राहील. अशा आशयाचा तह होऊन दगडापेक्षां वीट मऊ असें समाधान हिंदी जनता मानून घेऊं लागली. ने. ना. शास्त्री पहिले एजंट जनरल म्हणून दक्षिण आफ्रिकेंत गेले आहेत व त्यांचें हिंदी लोकांच्या हिताच्या दृष्टीनें कार्य चांगलें चालू आहे.

न वा ए मि ग्रे श न का य दा.–हिंदुस्तानांतून परदेशीं बिगर कारागीर मजूर पाठविणें हें हिंदी लोकांच्या अब्रूला कमीपणा आणण्यासारखें असल्यानें आज सुशिक्षित हिंदी इकडून मजूर पाठविण्याच्या साहाजिक विरुद्ध आहेत. कारण या कूलीच्या राहाणीवरून व वर्तनावरून एकंदर हिंदी लोकांविषयीं परदेशी लोक आपलें मत बनवीत असतात. तेव्हां गेल्या कांहीं वर्षांपासून सीलोन स्ट्रेट्स सेटलमेंट्स आणि फेडेरेटेड मलाया स्टेट्सखेरीज करून बाहेर इतर भागांत अकुशल मजुरांची रवानगी होत नाहीं. इतकेंच नव्हे तर १९२२ सालीं एक नवीन इमिग्रेशन ॲक्टहि या धोरणानें करण्यांत आला. या

कायद्यांत सवड दिल्या प्रमाणें जर केव्हां मजूर पाठविण्यांत येणार असले तरीहि त्याला कायदेकौन्सिलांची परवानगी घ्यावी लागते. हिंदुस्थान सरकारला हिंदी लोक परदेशीं पाठविण्याच्या प्रश्नांत सल्ला देण्यासाठीं कायदेकौन्सिलांतील १२ सभासदांची एक स्टँडिंग एमिग्रेशन कमिटी नेमण्यांत येत असते. याप्रमाणें परदेशी जाणाऱ्या आपल्या लोकांची हिंदी जनता काळजी घेऊं लागल्या कारणानें त्याचा परिणामहि इष्ट असाच झाला आहे. सीलोन आणि मलाया या ठिकाणीं हिंदी मजुरांच्या आर्थिक स्थिती संबंधानें हिंदु सरकारच्या प्रोत्साहनानें चौकशी चालू आहे. सरकारनें या दोन देशांत आपले एजंट नेमलेले आहेत. १९२२ सालीं फिजी व ब्रिटिश ग्वायना येथील हिंदी लोकांनां वसाहत करण्यासाठीं त्या त्या सरकारनें योग्य जमीन दिली आहे कीं नाहीं याची बारकाईनें चौकशी करण्यासाठीं दोन हिंदी शिष्ट मंडळें तिकडे पाठविण्यांत आलीं.

ब्रिटिश ग्वायना—१९२४ च्या आरंभीं ब्रिटिश ग्वायनाहून पुन्हां हिंदी मजूर तिकडे पाठविण्या संबंधांत वाटाघाट करण्याकरितां एक शिष्टमंडळ आलें व त्याची स्टँडिंग एमिग्रेशन कमिटीशीं वाटाघाट होऊन इकडून कांहीं मुद्यांविषयीं चौकशीसाठीं एक अधिकारी पाठविण्याचें ठरलें. त्याप्रमाणें कुंवर महाराजसिंग यांनां तिकडे पाठविण्यांत आलें. त्यांचा अहवाल प्रसिद्ध झाल्यावर व स्टँडिंग कमिटीनें तो स्वीकारल्यावर तो कायदेमंडळापुढें मांडलाव पास करून घेतला. या ठरावान्वयें कांहीं विशिष्ट अटींवर पुन्हां तिकडे मजूर पाठविण्याचें ठरलें आहे.

मॉरिशिअस—१९२३ च्या मार्च महिन्यांत १ वर्षापुरतें मॉरिशिअस येथें बिगर कारागीर मजूर पाठविण्यासंबंधीं ठरावावर असेंब्लिमध्यें चर्चा होऊन तिकडील हिंदी लोकांची परिस्थिति प्रत्यक्ष पाहाण्यासाठीं एक अधिकारी धाडण्याचें ठरलें. कुंवर महाराजासिंगच तिकडे गेले. मॉरिशिअस सरकारचें हिंदी मजुरांशिवाय अडल्यासारखें झालें असल्यानें त्याच्याकडून वारंवार विनंत्या येतच होत्या. तेव्हां नव्या एमिग्रेशन कायद्यामुळें किती फायदा होत आहे हें उघड होतें.

ऑस्ट्रेलिया:—ने. ना. शास्त्री १९२२ सालीं ऑस्ट्रेलियाला गेल्यावेळीं त्यांनां ऑस्ट्रेलियन सरकारनें जें आश्वासन दिलें होतें तें कांहीं अंशीं तरी पाळण्यासाठीं म्हणून १९२५ सालीं कॉमनवेल्थ सीनेटमध्यें एक बिल मांडण्यांत आलें. या बिलान्वयें ऑस्ट्रेलियांत कायम झालेल्या ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रजाजनांनां मतदानाचा हक्क प्राप्त होतो. हें बिल सीनेटमध्यें पसार झालें व आतां सबंध ऑस्ट्रेलियांत कोठेंहि हिंदी लोकांनां मतदान करतां येईल; पण क्वीन्सलंड आणि पश्चिम ऑस्ट्रेलिया हे प्रांत मात्र याला अपवाद आहेत.

**बृहद्भारतासंबंधीं संदर्भ ग्रंथ**—हिंदी परदेशगमनासंबंधीं प्रश्नांची सविस्तर माहिती देणारे पुढील अहवाल महत्त्वाचे वाटतील.

(१) री यूनियनमधील ब्रिटिश हिंदी लोकांची स्थिति व त्यांची तद्देशस्थांकडून होणारी संभावना याची चौकशी करण्याकरतां जें सार्वराष्ट्रीय कमिशन नेमलें होतें त्याचा अहवाल, १८७९.

(२) वसाहतींतून पाठविण्यासाठीं संयुक्त प्रांतांत जी कूलीची भरती करण्यांत येते तिच्या पद्धतीसंबंधीं अहवाल, १८८३.

(३) वसाहतीकरतां संयुक्तप्रांत आणि बंगाल या प्रांतांत मजुरांची जी भरती करण्यांत येते तिच्या पद्धतीसंबंधीं मेजर पिचर आणि मि. ग्रियरसन यांचा अहवाल, १८८३.

(४) 'नेटल इंडियन इमिग्रंट्स'चा अहवाल, १८८५—८७.

(५) री यूनियन, मार्टिनिक, आणि ग्वाडेलुप इकडे पुन्हां मजूर पाठविण्याच्या योजनेवर डॉ. कोमिनचा अहवाल, १८९२.

(६) ईस्ट इंडीजहून सुरिनाम येथील देशांतरासंबंधीं डॉ. कोमिनचा अहवाल, १८९३.

(७) री युनियनच्या एमिग्रेशनसंबंधीं मि. मूरमॅकेंझीचा अहवाल, १८९४.

(८) मॉरिशिअसमधील हिंदी लोकांच्या स्थितीसंबंधीं अहवाल, १८९५.

(९) हिंदी परदेशगमनासंबंधीं चौकशी करण्यासाठीं नेमलेल्या कमिशनरांचा अहवाल, १८९६.

(१०) क्राऊन कॉलनी व प्रोटेक्टोरेटकडे होणाऱ्या हिंदी परदेशगमनासंबंधीं लॉ सँडरसन कमिशनचा अहवाल, १९१०.

(११) दक्षिण आफ्रिका हिंदी चौकशी कमिशनचा अहवाल, १९१४.

(१२) ब्रिटिश कॉलनी (त्रिनिदाद, ब्रिटिश ग्वायना, जमैका व फिजी) व डच कॉलनी सुरिनाम यांतील हिंदी

